भारत-गौरव-ग्रंथमाला, पुष्प ७४ वें.

# "१८५७"



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।

—भगवान् श्रीकृष्ण.

---

लेखक

**प्रो. नारायण केशव बेहेरे,**

एम. ए., बी. एससी.

---

साधी प्रत सवा तीन रुपये] १९२७ [कापडी प्रत साडे तीन रुपये.

राष्ट्रीय जनतेंतही एकोपा नव्हता, आणि साम्राज्यरक्षणाला लागणाऱ्या अंतःकरणाच्या तळमळीची, स्वार्थत्यागाची, चिकाटीची व राजकारणी पेंच समजण्याच्या पात्रतेची आमच्यांत वाण होती.

ऐतिहासिक ग्रंथ वाचावयाचे ते केवळ मनोरंजनाकरितां नसून शिक्षणाकरितां वाचावयाचे असतात. मागच्या चुका ध्यानीं आणून पुढें त्या होऊं नयेत म्हणून आपण कशी दक्षता बाळगली पाहिजे याचें ज्ञान गतेतिहासावरूनच होण्यासारखें आहे.

हिंदुसमाज सध्या जागा झाला असून आपली सर्व बाजूनें संघटना करूं पहात आहे. अशा वेळीं पूर्वी झालेल्या चुका समजणें अगत्याचें आहे. या दृष्टीनेंही या पुस्तकाचें महत्त्व आहे.

एखाद्या अलौकिक विभूतीनें एकादे वेळेस समाजाचें किंवा राष्ट्राचें उत्थान केलें तरी ती स्थिति टिकविण्यास समाजाची पात्रता असली पाहिजे. त्याशिवाय कोणताही समाज सदोदित उन्नतावस्थेंत राहणार नाहीं. आपल्यांत जर कशाची मोठी उणीव असेल तर या गोष्टीची आहे. यामुळेंच अनेक अवतार, रणधुरंधर सेनानायक, महात्मे व राष्ट्रनायक या भरतभूंत निर्माण होऊनही आम्ही जेथच्या तेथेंच कायम आहोंत.

ही स्थिति नाहींशी होऊन खरी परिस्थिति आमच्या लोकांच्या ध्यानीं येऊन त्यापासून त्यांनीं योग्य तो बोध घेऊन आपली सुधारणा करावी, हाही प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध करण्यांत मालेच्या चालकांचा उद्देश आहे.

शेवटीं आमच्या महाराष्ट्र जनतेनें अशा प्रकारच्या ऐतिहासिक ग्रंथप्रसारास हातभार लावून आम्हाला या प्रकारचें ऐतिहासिक वाङ्मय प्रसिद्ध करण्यास प्रोत्साहन द्यावें, अशी त्यांस कळकळीची विनंति करून तूर्त त्यांची रजा घेतों.

सर्वांचा नम्र,

**एम्. एन्. कुळकर्णी.**

॥ ॥

# आधार व आभार.

प्रस्तुत ग्रंथ लिहितांना अनेक पुस्तकांचा मला उपयोग झाला. जुने नवे वर्तमानपत्रांचे व मासिकांचे अंक, बखरी, पत्रव्यवहार, चरित्रात्मक ग्रंथ व बंडासंबंधी इतिहास, या सर्व सामग्रीचा मी सवडीप्रमाणें उपयोग केला. त्याचप्रमाणें, अनेक वृद्ध व तरुण परंतु बहुश्रुत व विचक्षण अशा सद्गृहस्थांशीं याविषयीं कित्येकदां चर्चा केली, त्या सर्व वाग्भटांचा मी अत्यंत आभारी आहें; कारण त्यांच्या आधारावरच या सर्व ग्रंथाची उभारणी झाली आहे. मी अभ्यासलेले कांहीं महत्वाचे आधार खालीं दिले आहेत.


'Sepoy War' —Sir John Kaye
'History of the Indian Mutiny'—Malleson
Story of Indian Mutiny —Henry Gilbert
Recollections of Sepoy Revolt —Mrs. Muter
Two Months in Arrah in 1857 —J. J. Halls
Indian Mutiny —Charles Ball
History of Indian Mutiny —Sir George Forest
Memoirs of my Indian Career—Sir George Campbell
History of Indian Mutiny —Homes
The Indian Empire —Robert Montgomery Martin
Rise & Progress of Indian Mutiny— " "
Diary in India —Sir W. H. Russel
Oxford History of India —Vincent Smith
India in the Victorian Age —R. C. Dutta
Rise of the Christian Power in India—Major Basu
Story of Satara — " "
Other Side of the Medal —E. Thompson
Empire in Asia —Torrence
Dacoity in Excelsis —Major Bird

Empire in India —Evans Bell
History of the Sikhs —Cunningham
Retrospects & Prospects of Indian Policy—Evans Bell
सिपाई युद्धेर इतिहास ( बंगाली ) —श्री. रजनीकांत गुप्त
गदरका इतिहास ( हिंदी ) —श्री. शिवनारायण द्विवेदी
सिपाही विद्रोह ( हिंदी ) —श्री. ईश्वरीप्रसाद शर्मा
अयोध्येचे नबाब ( मराठी ) —श्री. पारसनीस
झांशीच्या राणीचें चरित्र ( मराठी ) —श्री. पारसनीस
माझा प्रवास ( मराठी ) —श्री. चिं. वि. वैद्य

* * * *

कर्नाटक प्रेसचे व भारत गौरव ग्रंथमालेचे मालक श्री. मंगेश नारायण कुळकर्णी ह्यांनीं हें पुस्तक शक्य तितक्या सुंदर रीतीनें प्रकाशित केल्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच होतील; कारण १८५७ च्या बंडावरील एवढें मोठें पुस्तक मराठींत प्रसिद्ध करणें हें धाडसाचें व खर्चाचें काम आहे, आणि अशा उत्साही प्रकाशकांच्या साहाय्याशिवाय लेखकवर्गाचें पाऊल पुढें पडणें शक्य नसतें. तेव्हां त्यांचे एकदां मनःपूर्वक आभार मानतों.

* * * *

या ग्रंथांत जे दोष घुसले असतील त्याबद्दल वाचकांनीं लेखकाला उदार हृदयानें क्षमा करावी; व हंसक्षीरन्यायानें गुणांचें ग्रहण करावें अशी त्यांना नम्र विनंति आहे. मानवी कृती सदोष असावयाची, ह्या सामान्य नियमाला मी अपवाद कसा राहणार ? वाचकांनीं कृपा करून ते दोष माझ्या नजरेस आणल्यास, पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं—तसा ईश्वरकृपेनें व महाराष्ट्रांतील रसिक व स्वदेशाभिमानी वाचकवृंदाच्या प्रेमानें योग आल्यास—ते यथामति व यथाशक्ति दूर करण्याचा प्रयत्न करीन. वाचकांना पुस्तक आवडल्यास माझ्या श्रमांचें चीज झालें, असेंच मी समजेन.

नागपूर,
ता. २५ सप्टेंबर १९२७.

नारायण केशव बेहेरे.

# अनुक्रमणिका.



श्रीमंत नानासाहेब पेशवे—बंडवाले.



पेशव्यांचे रणशूर सेनापती

**तात्या टोपे.**

# " सन १८५७ "



प्रकरण १ लें.

## उपोद्घात.



इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत सुरू झाल्यापासून १८५७ सालच्या बंडासारखी आपत्ती इंग्रजांवर कधींच आली नाहीं. या बंडाचा इतिहास अतिशय करुणाजनक आहे. जे इंग्रज लोक सर्वांना शंभर वर्षांपूर्वी हवेसे वाटत होते, तेच ह्या वेळीं लोकांच्या दृष्टीसमोर नकोसे झाले. या बंडाच्या लाटा सर्व हिंदुस्थानभर एक-समयावच्छेदेंकरून उठल्या. कांहीं ठिकाणीं या लाटा अतिशय जोराच्या होत्या व त्यामुळें जनसमूहांत भयंकर तुफान घडून आलें. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं, लहानशा हवेच्या झुळकेनें पाण्यांत लहरी उत्पन्न होतात तसल्या स्वरूपाची सौम्य खळबळ घडून आली. परंतु हा बंडाचा वणवा सर्व देशभर पेटला होता हें खास! विंध्याद्रीच्या वरचें उत्तर हिंदुस्थान या बंडानें पूर्णपणें व्यापून टाकलें. त्या मानानें दक्षिण मात्र शांत होतो. दक्षिणेंत जर का ही बंडाची लाट पोहोंचती, तर हें बंड मोडणें इंग्रजांना दुरापास्त झालें असतें. परंतु इंग्रजांचें नशीब बलवत्तर असल्यामुळें हा वणवा दक्षिणेकडे भडकला नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत पसरलेला बंडाचा वणवाही इतका तीव्र होता कीं, तो विझवतां विझवितां इंग्रजांच्या नाकीं नऊ आले. मग जर का दक्षिण हिंदुस्थान या वावटळींत सांपडलें असतें, तर इंग्रजांनीं काय केलें असतें हें एक ईश्वरच जाणे. दक्षिण हिंदुस्थानांत त्या वेळीं शांतता नांदत असल्यामुळें, इंग्रजांना निर्विघ्नपणें आपलें सर्व बळ उत्तरेंत एकवटतां येऊन बंडाचा बीमोड करतां आला.

या बंडाला **शिपायांचें बंड** असें नांव बऱ्याच इतिहासकारांनीं दिलें आहे. इंग्रज लोक या देशांत आले त्या वेळीं ते व्यापारी म्हणून आले. त्यांच्या व्यापाराचा व्याप जसजसा वाढूं लागला, तसतशी व्यापाराच्या व व्यापाऱ्यांच्या रक्षणाकरितां फौज व आरमार यांची त्यांना जरूरी भासूं लागली. पुढें हे व्यापारी

हळू हळू या देशाच्या राजकारणांत पडूं लागले, तशी त्यांना अधिक फौजेची जरूर भासूं लागली. तेव्हां यांनीं येथीलच लोक नोकरीस ठेवून व त्यांना लष्करी शिक्षण देऊन त्यांच्या पलटणी उभारल्या. शीख, गुरखे, पठाण, पुरभय्ये व मराठे, या हिंदुस्थानांतील प्रमुख लढवय्या जाती इंग्रजांच्या सैन्यांत भरती झाल्या. याच सैन्याच्या जोरावर इंग्रजांनीं सर्व हिंदुस्थान पादाक्रांत केलें; त्या वेळीं इंग्रजांच्या हुकमतींत खास **ग्रेटब्रिटन**मधून आलेलें गोरें सैन्य, व हिंदुस्थानांतच उभारलेलें हिंदी लोकांचें सैन्य असे दोन विभाग असत. हिंदी लोकांच्या सैन्याला, त्यांच्या रंगामुळें काळें सैन्य किंवा **शिपाई** असें नामाभिधान मिळालें होतें. ज्यांच्या बळावर इंग्रजांनीं हिंदुस्थान जिंकलें, तेच हिंदी सैनिक १८५७ सालच्या बंडांत सामील झाल्यामुळें या बंडाला शिपायांचें बंड असें नांव मिळालें आहे.

इतर इतिहासकारांच्या मतानें या बंडाचे प्रवर्तक हिंदुस्थानांतील असंतुष्ट लोक होते. शिपाई जरी बंडांत सामील झाले असले तरी त्यांना बंडाला प्रवृत्त करणारीं माणसें निराळींच होतीं. इंग्रज लोक व्यापारी म्हणून या देशांत आले, आणि साम, दाम, दंड, भेद या चारी उपायांचा अवलंब करून ते पाहातां पाहातां या देशाचे स्वामी झाले. अनेक राजांचीं राज्यें नष्ट झालीं आणि जहागिरदार व वतनदार यांची सत्ता संपुष्टांत आली. दसहजारी व पंचहजारी पराक्रमी सरदार घरबैठे झाले आणि दिवाण, न्यायाधीश, मंत्री वगैरे थोर थोर अधिकारांच्या जागा हिंदी लोकांच्या हातून नाहींशा झाल्या. मुख्य दिवाणी, फौजी व मुलकी अधिकाऱ्यांच्या जागेवर इंग्रज लोक नांदूं लागले, आणि थोरामोठ्या घराण्यांतील हिंदी लोकांना त्यांच्या हाताखालीं कारकुनाचीं किंवा इतर दुसरीं दुय्यम दर्जाचीं कामें पतकरून संतोष मानून घ्यावा लागला. हातांतील सत्ता, अधिकार व पैसा गेल्यामुळें या लोकांनीं इंग्रजांविरुद्ध साहजिकच बंड पुकारलें व काळ्या पलटणींतील शिपायांना इंग्रजांविरुद्ध लढण्यास उत्तेजित केलें. यांनीं शिपायांमध्यें माजलेल्या असंतोषाचा फायदा करून घेऊन, त्या तव्यावर आपली पोळी भाजून घेतली. या मीमांसेमुळें, इंग्रजी राज्याविरुद्ध उत्पन्न झालेला **लोकांमधील असंतोषाचा पहिला डोंबाळा**, असें नांव या बंडाला द्यावें लागेल.

इतिहासकारांचा एक तिसरा वर्ग आहे. त्यांच्या मतानें हें बंड आपलें राज्य गमावून बसलेल्या राजांनीं व नबाबांनीं उत्पन्न केलें. स्वराज्य जाऊन परराज्य आलें ही गोष्टच लोकांना आवडली नाहीं. परराज्य जरी सुराज्य असलें, तरी लोकांच्या

दृष्टीनें तें स्वराज्यापेक्षां हिणकसच ठरावयाचें. तेव्हां हें परकीय इंग्रजांचें राज्य जाऊन त्या जागीं स्वराज्य उत्पन्न व्हावें, या पवित्र इच्छेनें या बंडाची उभारणी झाली. हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य न राहातां हिंदुमुसलमानांचेंच राज्य पहिल्यासारखें राहावें, ही भावना या बंडाच्या मुळाशीं होती. बंडवाल्यांनीं दिल्लीच्या मोंगल बादशाहाच्या नांवानें द्वाही फिरविली व ब्रह्मावर्ताला नानासाहेबांच्या नांवानें मोडलेल्या पेशवाईचा पुनरुद्धार केला, यावरून ही कल्पना कदाचित खरीही असूं शकेल. बंडाची ही मीमांसा मान्य केली तर स्वराज्यसंस्थापनेचा किंबहुना **राज्यक्रांतीचा पहिला अयशस्वी प्रयत्न** असें नांव या बंडाला देतां येईल.

कदाचित् हीं तिन्ही कारणें खरीं असतील ! या तिन्ही कारणांच्या एकत्र प्रभावानें बंडाची उभारणी झाली असावी. कारण हें बंड इतक्या अक्राळविक्राळ स्वरूपाचें झालें कीं, कांहीं दिवसपर्यंत तरी, इंग्रजांची या देशांतून उचलबांगडी होते कीं काय, असें इतरांनाच काय पण त्यांचें त्यांनाच वाटत होतें. परंतु त्यांच्या सुदैवानें बंडाचा बीमोड झाला, व इंग्रजांचे पाय या देशांत पुरतेपणीं रुजले. बंडाची कोणतीही मीमांसा खरी मानली तरी, बंडाचें मुख्य कारण म्हणजे लार्ड **डलहौशीची** अनिवार राज्यतृष्णा हेंच होय ! लॉर्ड डलहौसी इ० सन १८४८ मध्यें हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होऊन आला, त्या वेळीं इंग्रजांची छाप हिंदुस्थानावर चांगलीच बसली होती. इंग्रजांची सत्ता अत्यंत प्रबळ होती व हिंदुस्थानांतील छोटे मोठे संस्थानिक इंग्रजांशीं नमतें घेऊनच आपापल्या संस्थानांचा राज्यकारभार हांकीत असत. इंग्रजांची सत्ता त्या वेळीं हिंदुस्थानांत सर्वत्र पसरली होती. सत्तेच्या दृष्टीनें इंग्रज हिंदुस्थानांत सार्वभौमच बनले होते. परंतु त्यांचें हिंदुस्थानभर एकछत्री साम्राज्य मात्र झालें नव्हतें. जुन्या मोगल बादशाहाप्रमाणें इंग्रजांचें हिंदुस्थानभर एकछत्री साम्राज्य व्हावें अशी लार्ड डलहौसीची महत्त्वाकांक्षा होती. त्यामुळें हिंदुस्थानभर इतस्ततः पसरलेले, व इंग्रजांच्या कलानें आपल्या संस्थानांचा राज्यकारभार हांकून त्यांच्या कृपेची अपेक्षा करणारे, लहानमोठे हिंदी संस्थानिक लार्ड डलहौसीच्या डोळ्यांत खड्यासारखे खुपूं लागले. त्यांना बाजूस सारून त्यांचीं संस्थानें गिळंकृत करण्याचा त्यानें सपाटा चालविला. न्यायनीतीची कदर न करतां त्यांच्याशीं झालेले पूर्वींचे तहनामे त्यानें कस्पटाप्रमाणें लेखले. डलहौसीच्या या कुटिल राजनीतीमुळें व अघोर राज्यतृष्णेमुळें, सर्व हिंदुस्थानभर असंतोषाची लाट उत्पन्न

झाली, आणि तिचें पर्यवसान १८५७ सालच्या भयंकर बंडांत झालें. याबद्दल सर्व पौर्वात्य व पाश्चिमात्य इतिहासकारांचें एकमत आहे. यामुळें लार्ड डलहौसीच्या आठ वर्षांच्या—१८४८ ते १८५६—कारकीर्दीचें सविस्तर पर्यालोचन करणें जरूरीचें आहे. त्याशिवाय बंडाची पूर्वपीठिका लक्षांत येणार नाहीं आणि बंडाची मीमांसाही करतां येणार नाहीं. याबद्दल कदाचित् लार्ड डलहौसीच एकटा दोषी नसेल. विलायतेंतील कंपनीचे डायरेक्टर तितकेच दोषी असतील. कारण **हाब-हाऊस्** त्या वेळीं विलायतेंतील कंपनीचा मुख्य डायरेक्टर होता, आणि बनेल तोंपर्यंत दत्तकाची कोणाला परवानगी देऊं नये, असें सूत्रवाक्य त्यानें लार्ड डलहौसीला आरंभींच सांगून ठेवलें होतें. हिंदुस्थानचा नकाशा एकजात लाल व्हावा, म्हणजे राज्यकारभार चालविणें सोपें जाईल. खड्यासारखीं संस्थानें वेंचून फेकलीं पाहिजेत, असें कंपनीला त्या वेळीं वाटत असे. न्यायनीतीची कंपनीला चाड नव्हती. कंपनी फक्त आपला खिसा गरम कसा करतां येईल, एवढेंच पहात होती. **माल-कम् लडलोनें** आपल्या ब्रिटिश हिंदुस्थानच्या इतिहासांत म्हटलें आहे (Vol. 1, page 198) "The establishment of the English power in India is an ugly one. It begins in feebleness and cowardice, it is pervaded by rapacity, it closes with a course of fraud and falsehood, of forgery and treason as stupendous as ever lay in the foundation of a great empire." हिंदुस्थानांतील इंग्रजी सत्तेचा इतिहास अतिशय तिटकारा येण्याजोगा आहे. दुर्बलता व भित्रेपणा यांनीं या सत्तेचा प्रारंभ झाला, जुलमानें हिची वाढ झाली, व कपट, असत्य आणि विश्वासघात यांच्या जोरावर ही दृढमूल झाली. कोणतेंही साम्राज्य स्थापन करतांना अशा भीषण स्वरूपाच्या गोष्टी क्वचितच घडल्या असतील. कंपनीच्या राज्याबद्दल हर्बर्ट स्पेन्सर या प्रसिद्ध तत्त्ववेत्त्यानें खालील दुःखपूर्ण उद्गार ( Social Statics ) काढले आहेत:—" The Anglo-Indians of the last century whom Burke described as ' Birds of prey and passage in India ' showed themselves only a shade less cruel than their prototypes of Peru and Mexico. Imagine how black must have been their deeds, when even the directors of the Company admitted that the vast for-

tunes acquired in the inland trade have been obtained by a scene of the most tyrannical and oppressive conduct that was ever known in any age or country. Conceive the atrocious state of society described by Vansitart, who tells us that the English compelled the natives to buy or sell at just what rates they pleased on pain of flogging or confinement....... A cold-blooded treachery was the established policy of the authorities. Princes were betrayed into war with each other; and one of them having been helped to overcome his antagonist, was then himself dethroned for some alleged misdemeanour. Always some muddied stream was at hand as a pretext for official wolves."
गेल्या शतकांतील ज्या इंग्रजांचें 'हिंदुस्थानांत भक्ष्य मिळविण्यासाठीं जाणारे पक्षी' असें बर्कनें वर्णन केलें आहे, ते पेरू किंवा मेक्सिकोमधील त्यांच्या भाऊबंदांपेक्षां फक्त लेशमात्रच कमी क्रूर होते. कोणत्याही देशांत व काळांत ऐकली नसेल अशा दुष्ट व जुलमी पद्धतीमुळेंच व्यापारांत इतका विलक्षण नफा होतो अशी कबूली जेथें खुद्द कंपनीचेच डायरेक्टर देतात, तेथें किती काळीं कृत्यें घडत असतील याची कल्पना करा. कैद किंवा फटके मारण्याचा धाक दाखवून इंग्रजांना रुचेल त्या भावानें माल विकण्यास किंवा खरेदी करण्यास हिंदी लोकांना भाग पाडलें जाई, ही व्हानसिटार्टनें वर्णन केलेली समाजाची भयंकर दुरवस्था लक्षांत आणा.... जाणून बुजून विश्वासघात, ही अधिकाऱ्यांची एक ठराविक नीति होती. एकमेकांशीं युद्ध करण्यास उत्तेजन देण्याचीं कंपनीतर्फे राजेलोकांत कारस्थानें चालत असत, आणि एका राजाच्या मदतीस जाऊन त्याच्या प्रतिस्पर्ध्याचा पाडाव केल्यावर, कांहीं तरी खऱ्याखोट्या अपराधाच्या सबबीवर त्यालाही मग गादीवरून काढून टाकण्यांत येत असे. सरकारी लांडग्यांना आपल्या सोंगाची बतावणी करण्याकरितां एखादा गढूळ ओढा शेजारींच नेहमीं तयार असे.

लार्ड डलहौसी हा या कंपनीच्या राज्यघटनेंतील एक दुवा होता. तो धाडशी व कर्तबगार होता, आणि कोणतेंही काम रेंगाळत न ठेवतां तें मनांत आल्याबरोबर ताबडतोब अमलांत आणण्याची धडाडीही त्याच्यांत होती. ईस्ट इंडिया कंप-

नीच्या डायरेक्टरांनीं १८३४ सालींच आपलें संस्थानी धोरण खालील शब्दांत प्रगट केलें होतें:—"Whenever it is optional with you to give or to withhold your consent to adoptions, the indulgence should be the exception and not the general rule, and should never be granted except as a special mark of approbation," दत्तविधानाला रुकार देणें किंवा न देणें ही गोष्ट तुमच्या हातीं असली, तर दत्तविधानाची परवानगी अपवाद म्हणूनच द्यावी, मामूली रीत्या देऊं नये; व दिली म्हणजे विशिष्ट मेहरबानी या स्वरूपांत द्यावी. कंपनीच्या या धोरणाप्रमाणें डलहौसीच्या पूर्वींही दत्तक नामंजूर करून कुलाबा, मांडवी व अंबाला हीं चिमुकलीं संस्थानें कंपनीनें गट्ट केलीं होतीं. लार्ड डलहौसी हा धडाडीचा कर्तबगार गवर्नर जनरल असल्यामुळें त्यानें कंपनीची इच्छा पूर्णपणें तृप्त करण्याचें ठरविलें. त्याला स्वतांलाही ( सर जान केच्या शब्दांत ) "He never doubted that it was good alike for England and India, that the map of the country which he had been sent to govern should present one surface of red—" ज्या देशावर आपण राज्य करावयास आलों, तेथील रंग एकजात नकाशांत तांबडा झाला, तर इंग्लंड व हिंदुस्थान या दोघांचेंही कल्याण आहे असें वाटत होतें, आणि त्याप्रमाणेंच त्यानें आपलें धोरण ठेवलें. कंपनीच्या कारभाराची राजनीति त्याच्या कारकीर्दींत उत्कर्षास पोहोंचली. हिंदुस्थानचा नकाशा बराचसा लाल झाला. परंतु त्यामुळें कंपनीला अनेक शत्रू उत्पन्न झाले व कंपनीचें हिंदुस्थानांतून उच्चाटन करण्याचा त्यांनीं निश्चय केला आणि त्यामुळें बंड झालें. तेव्हां बंडाचीं कारणें शोधण्याकरितां लार्ड डलहौसीच्या कारकीर्दीचें विस्तृत परीक्षण करणें जरूर आहे; त्याबरोबरच एखादे वेळीं कंपनीचें पूर्ववर्तनही थोडक्यांत तपासणें जरूर पडेल. कारण लार्ड डलहौसी म्हणजे कंपनीची पूर्वपरंपरागत राजनीति पूर्णपणें अमलांत आणून कंपनीस तृप्त करूं पाहणारा एक यंत्राचा भाग होता. या परीक्षणामुळेंच हिंदुस्थानांतील शांतताप्रिय जनता इंग्रजद्वेष्टी कशी बनली, व आपल्याच भाईबंदावर चाल करून जाणारे राजनिष्ठ देशी शिपाई आपल्या इंग्रज अधिकाऱ्यांवर कां उठले व इंग्रजांच्या रक्तानें त्यांनीं आपले हात कां विटाळले, हें समजून येईल.

बंडामुळें दोन्ही बाजू चवताळल्या व दोघांनींही अनेक अत्याचार केले, त्यांची आठवण अत्यंत दुःखदायक आहे. परंतु इंग्रज जेते असल्यामुळें त्यांच्यापैकीं

अनेकांनीं बंडाचे जे इतिहास, गोष्टी व नवलकथा लिहिल्या, त्यांत आपल्या क्रूर कृत्यांवर पांघरूण घालून, हिंदी लोकांच्या हातून जीं त्या वेळीं राक्षसी कृत्यें घडलीं व ज्यांचा मानवतेच्या दृष्टीनें केव्हांही निषेधच करावा लागेल, त्यांचीं भडक वर्णनें उठवून दिलीं आहेत. जगाच्या वेशीवर यामुळें हिंदी लोकांना असलीं अघोरी व रानटी कृत्यें करणारे, म्हणून लाजेनें खालीं मान घालावी लागते. परंतु असली एकतर्फी सजावट म्हणजे इतिहास नव्हे, व सत्य तर नव्हेच नव्हे. पायोनीअर सारख्या पत्रांत एखादे वेळीं the tiger instincts of an Imperial Race बादशाही वृत्तीच्या लोकांची व्याघ्रता उगीच चिथवूं नका, नाहीं तर ५७ प्रमाणें अग्नि व तलवारीचा प्रसाद तुम्हांला देऊं असा उल्लेख येतो; यावरून हे अत्याचार केवळ एकतर्फी नव्हते याची जाणीव मनांतून इंग्रजांना आहे असें दिसतें. परंतु इंग्रज लेखकांच्या अनेकविध ग्रंथांतून त्यांचा बहुधा उल्लेख टाळलेला असतो. अशा स्थितींत बंडाचा यथातथ्य इतिहास आपल्यास बोधक व मार्गदर्शक खास होईल, व बंडासंबंधी प्रचलित असलेल्या बऱ्याच भ्रामक समजुतींचा निरास होईल. इंग्रज ५७ सालीं अत्यंत संतापले होते, व पुढेंही ५७ ची आठवण कोणी कधींमधीं काढतांच ते क्षुब्ध होत. कारण हिंदुस्थानांत पाय ठेवल्या दिवसापासून त्यांची ५७ प्रमाणें विटंबना कधींही झाली नव्हती. त्यामुळें इंग्रजांचा कोप होईल या भीतीनें, त्या वेळीं हजर असलेल्या व तो प्रसंग स्वतां अनुभवलेल्या हिंदी लोकांनीं बंडाच्या आठवणी फारशा लिहिल्या नाहींत, व लिहून ठेवल्या तरी त्या प्रसिद्ध केल्या नाहींत. शिवाय तत्कालीन हिंदु लोकांचा जो पुरावा उपलब्ध आहे व उपलब्ध होण्यासारखा आहे, त्याची विश्वसनीयता इतक्या वर्षांनंतर त्याचा कोणी आधार घेतल्यास प्रश्नार्थक ठरण्याचा संभव आहे. त्यामुळें या विषयावर लेखणी चालवितांना इंग्रज लेखकांच्या लिखाणावरच मुख्य भर ठेवावा लागतो; आणि कोणत्याही देशांतील जेत्यांची भावना स्वतांच्या कर्तबगारीकडे प्रशंसापूर्ण दृष्टीनें पाहण्याची असते. हा मनुष्यस्वभाव आहे व त्याबद्दल इंग्रजांना दोष देण्याचें कारण नाहीं. अशा परिस्थितींतही हा इतिहास शक्य तितक्या निःपक्षपाती व सत्यमय दृष्टीनें लिहिला आहे. यांत कदाचित् पक्षपात झालाच असला, तर तो लेखकाचा दोष नसून साधनसामग्रीच्या एककल्लीपणाचा आहे. आधारभूत बहुतेक ग्रंथ इंग्रज लेखकांचेच असल्यामुळें, चुकून झालाच तर इंग्रजांच्या तर्फेनें पक्षपात घडेल. परंतु त्या विरोधी पुराव्यांतूनही हिंदी लोकांची या महत्वाच्या घटनेकडे पाहण्याची दृष्टी व त्यांची न्यायाची बाजू सुदैवानें उघडकीस आली, आणि बंडवाल्यांना बंड पुकारण्याला

योग्य कारणें घडलीं होतीं; त्यांचे पुढारी राक्षस व दानव नसून पराक्रमी व स्वाभिमानी, आणि त्यांच्यावर झालेल्या अन्यायानें तापट बनलेले होते; आणि सामान्यतः अशा बंडाळींत जगांत कोणत्याही काळीं जितके अत्याचार घडतात तितकेच, किंबहुना शत्रूंच्या मानानें कमीच अत्याचार हिंदी लोकांच्या हातून घडले असें सिद्ध झालें, तर एक हिंदी माणूस या नात्यानें लेखकाला अत्यानंद होईल. परंतु तसें घडेलच अशी खात्री कोण कशी देऊं शकणार ? कारण हा इतिहासग्रंथ आहे, आणि '**नामूलं लिख्यते किंचित्**' हा इतिहासलेखनाचा प्रमुख सिद्धांत आहे, आणि लेखकानें तो या ग्रंथांत पूर्णपणें व प्रामाणिकदृष्टया पाळला आहे.

---

## प्रकरण २ रें

# सातारा येथील कादंबरी.



इंग्रजांना हिंदुस्थानचें राज्य मुसलमानांपासून मिळालें नाहीं. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मुसलमानी सत्ता मोडकळीस आली, आणि मराठ्यांचा वरचष्मा हिंदुस्थानच्या राजकारणांत वाढूं लागला. पुढें मराठे अत्यंत प्रबळ झाले व सर्व हिंदुस्थानभर त्यांनीं आपले हातपाय फैलावले. नांवाजलेल्या शूर रजपूत राजांचा त्यांनीं चुटकीसरसा पराभव केला; आणि मोंगल बादशाहीच्या अमलाखालील प्रांतांतून चौथ व सरदेशमुखी वसूल करण्याचा सपाटा चालविला. मोंगल बादशहतीचें रक्षण मराठ्यांनीं आपले आंगावर घेतलें. त्यामुळें दिल्लीचें राजकारण मराठ्यांच्या मुठींत आलें. मराठ्यांची सर्व हिंदुस्थानभर सत्ता पसरली असल्यामुळें, मराठ्यांच्या हातूनच हिंदुस्थान देशाची प्राप्ती इंग्रजांना झाली. मराठ्यांचें राज्य पुण्यश्लोक शिवाजी महाराजांनीं स्थापन केलें, परंतु तें त्यांच्या वंशांत खरोखर म्हटलें तर फारच थोडे दिवस राहिलें. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर त्यांचे पुत्र छत्रपति संभाजी व राजाराममहाराज, यांचें आयुष्य औरंगजेबासारख्या बलाढ्य मोंगल बादशहाशीं लढून मराठेशाहीचा कसाबसा जीव वांचविण्याचे कामांतच खर्च झालें. संभाजी महाराजांचा मोंगलांच्या कैदेंतच अंत झाला. देशाकरितां व धर्माकरितां त्यांनीं आपल्या प्राणांचें बलिदान करून, केलेल्या स्वच्छंदी वर्तनाचें व इतर अपराधांचें प्रायश्चित्त घेतलें. संभाजीमहाराजांची कारकीर्द

केवळ सात वर्षें टिकली. इ० सन १६८८ सालीं औरंगजेब बादशहानें त्यांचा अत्यंत क्रूरपणानें वध केला. त्या वेळीं त्यांचा मुलगा शाहू हा केवळ सहा वर्षांचा होता. तोच संभाजी महाराजांनंतर मराठ्यांच्या गादीवर हक्कानें व न्यायानें बसावयाचा, परंतु लवकरच औरंगजेबानें त्याला व त्याच्या आईला पकडून कैदेंत टाकलें. तेव्हां निरुपाय म्हणून मराठ्यांनीं राजाराम महाराजांना गादीवर बसविलें. ते वास्तविक त्या वेळीं छत्रपती नसून, कैदेंत असलेल्या बाल छत्रपतींचे प्रतिनिधी म्हणून राज्यकारभार हांकीत होते. त्यामुळें त्यांचें राज्यारोहण न होतां केवळ मंचकारोहण झालें. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहू महाराजांची मुक्तता झाली; आणि इ. सन १७०८ सालीं त्यांना छत्रपति म्हणून अभिषेकही झाला. मोंगलांच्या जनानखान्यांत विलासांत वाढल्यामुळें शाहू महाराजांची कर्तबगारी नष्टप्राय झाली होती. चैन आणि विलास यांतच त्यांचा वेळ खर्च होत असे. त्यांचा स्वभाव अत्यंत आळशी बनला होता. त्यांच्या विलासप्रियतेमुळें त्यांच्या राण्यांचा त्यांच्यावर विलक्षण पगडा बसलेला असे. त्यामुळें त्या राज्यांत वाटेल ते बखेडे माजवीत, व कारभाराचा खेळखंडोबा करीत. शाहूची राणी सकवारबाई व चुलती ताराबाई यांना अधिकाराची विलक्षण चटक लागली असल्यामुळें, त्या सारख्या कारस्थानांत गर्क असत. या बायकी घोटाळ्यांत सांपडलेल्या विलासी छत्रपतींच्या हातून मराठेशाहीचा बोज कसा राहणार? आणि त्या वेळीं बाळाजी विश्वनाथ भट हा ब्राह्मण आपल्या कर्तबगारीनें पेशवा होऊन मराठी राज्याचा आधारस्तंभ झाला नसता तर मराठी राज्य केव्हांच मोडकळीस आलें असतें, किंवा फारतर रुकुडुकू चाललें असतें. मराठ्यांचा दरारा हिंदुस्थानांत बसविण्याइतकी धमक किंवा पराक्रम शाहू महाराजांचे आंगीं नव्हता. धर्मासाठीं व देशासाठीं जिवाची आहुती दिलेल्या शूर पित्याच्या, व मुसलमानांच्या जुलमी अमलांतून हिंदुधर्माची सोडवणूक करून हिंदवी स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवणाऱ्या पितामहाच्या स्मरणामुळें मात्र ते अगदींच बहकले नाहींत. ते स्वतः जरी विलासांत निमग्न झाले होते, तरी पण माणसांची योग्यता पाहून त्यांच्यावर राज्याचा बोजा टाकण्याची तारतम्यबुद्धी त्यांच्या ठिकाणीं वसत होती. बाळाजी विश्वनाथ भट आणि त्याचे शूर व पराक्रमी पुत्र, बाजीराव व चिमाजीआप्पा यांनीं मराठ्यांच्या सत्तेचा दरारा सर्व हिंदुस्थानभर बसविला. बाजीरावाचा मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे, यांच्या कर्तबगारीमुळें व धोरणी शिस्तीनें मराठ्यांनीं जिंकलेल्या मुलखांची उत्तम व्यवस्था लागली.

पेशव्यांच्या या पराक्रमामुळें व विलक्षण कर्तबगारीमुळें त्यांना अनेक शत्रू झाले. खरें पाहूं गेलें असतां पेशवे म्हणजे छत्रपतींच्या अष्टप्रधानांपैकीं एक प्रधान होत. परंतु त्यांनींच मराठी राज्याची इभ्रत वाढविली. शाहूछत्रपतीच्या पंतसचीव, पंत अमात्य, सेनापती, वगैरे बाकीच्या प्रधानांनीं त्या वेळीं तरी नांव घेण्यासारखे कोणतेच पराक्रम गाजविले नाहींत. पेशव्यांच्या वैभवामुळें दिपून जाऊन मत्सरानें त्यांच्या विरुद्ध उघड उघड बंडाळी माजविण्यांत, किंवा आपल्या कुटिल भाषणांनीं दरबारांत पेशव्यांच्या विरुद्ध वेळ सांपडेल तेव्हां, छत्रपतींचे कान भरण्यांतच त्यांचा पराक्रम व त्यांची बुद्धी खर्च होत होती. या मत्सराग्नीनें पेशव्यांच्या कर्तृत्वशक्तीला अनेक वेळां ग्रहण लागत असे. हिंदुस्थान जिंकावयाचे बेत बाजूस सारून या घरभेद्यांच्या व मत्सरी पोपटांच्या कारस्थानाकडे प्रथम लक्ष पुरवून, हे अस्तनींतील निखारे विझवून टाकण्यांत पेशव्यांना आपली कर्तबगारी प्रसंगीं थोडी फार खर्ची घालावी लागत असे. आणि यामुळेंच दिल्लीस मराठा बादशाह उत्पन्न करण्याची पेशव्यांची अफाट महत्त्वाकांक्षा तडीस गेली नाहीं. शाहूछत्रपतींच्या मंत्रिमंडळांत पेशव्यांशिवाय दुसरा कोणीही तडफदार व पराक्रमी वीर, किंवा राजकारणी मुत्सद्दी नव्हता. पेशवे मराठ्यांची अब्रू हिंदुस्थानांत, वाढवीत होते, व त्यांचा दरारा सर्वांना जाणवून देत होते. शाहूमहाराज स्वतः ही गोष्ट जाणून होते. त्यामुळें इतर प्रधानांच्या सांगावांगीनें त्यांनीं पेशव्यांचा अधिकार काढून घेणाचा प्रयत्न केला नाहीं. पेशव्यांचें मोतीं छत्रपतींच्या नाकापेक्षां जड होत चाललें होतें, ही गोष्ट शाहूमहाराजांना स्पष्टपणें दिसतच होती. परंतु त्यांचे बाकीचे प्रधान निस्तेज होते. त्यांच्या हातून कोणतीच कर्तबगारी घडून येत नव्हती. पेशव्यांच्यामुळें मराठेशाहीचा गौरव व विस्तार तरी सारखा वाढीला लागला होता. त्यामुळें सातारा दरबारांत पेशव्यांच्याविरुद्ध चाललेल्या अनेक कारस्थानांचा पगडा शाहूमहाराजांच्या मनावर बसला नाहीं. कारण त्यांना स्वतः लढाईची दगदग उरकत नव्हती, व बाकीचे त्यांचे प्रधान अगदींच सामान्य कोटीचे होते. त्यांच्या हयातींत पेशवे त्यांच्याशीं अत्यंत नम्रपणानें वागत, आणि स्वतंत्र मोठेपण आलें तरी, त्यांना दरबारांत मुजरा करूनच पेशवाईचीं वस्त्रें त्यांच्यापासून संपादन करीत असत. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव व नानासाहेब या तीन पेशव्यांच्या कारकीर्दी शाहूमहाराजांनीं आपल्या हयातींत पाहिल्या. इ. सन १७४९ सालीं ते वारले, तेव्हां मराठ्यांचें वैभव कळसाला जाऊन पोहोंचलें होतें. सर्व हिंदुस्थान मराठ्यांना चळचळां कांपूं लागलें

होतें. या मराठी साम्राज्यावर शाहूमहाराजांची सत्ता नांवाचीच होती. कारण राज्याचीं सर्व सूत्रें पेशव्यांच्या हातीं होतीं. पेशव्यांनीं जसजसे नवे प्रांत जिंकून घेतले, तसतसे ते निरनिराळया सरदारांच्या हवालीं केले. शिंदे, होळकर, पवार व गायकवाड हे छत्रपतींचे सरदार नसून पेशव्यांचे सरदार होते. त्यांची कर्तबगारी पाहून पेशव्यांनींच त्यांना उदयास आणलें होतें. त्यामुळें ते साहजिकच पेशव्यांना आपले धनी मानीत.

शाहूमहाराज वारल्यानंतर पेशव्यांची सत्ता अधिकच दृढ झाली. शाहूमहाराजांना औरसपुत्र नव्हता. त्यांच्या मांडीवर रामराजाला दत्तक देण्यांत आलें. पेशव्यांच्याच अनुमतीनें वागणें त्याला भाग होतें. कारण छत्रपतींच्या दरबारांतील मंत्रिमंडळ अगदींच प्रभावशून्य व पराक्रमहीन बनलें होतें. छत्रपतींच्या धाकट्या पातींतील वंशजांनीं कोल्हापुरास स्थापन केलेला सवता सुभा व तेथील मंत्रिमंडळही याच मासल्याचें होतें. एकमेकांविरुद्ध कुटाळ्या करणें, कारस्थानें रचणें व बंडाळी माजविणें हाच त्यांचा नित्याचा व्यवसाय होऊन बसला होता. हिंदुस्थानांतील मुसलमान राजांशीं लढून, त्यांचा मुलूख पादाक्रांत करून तो आपल्या राज्यास जोडण्याची धमक एकाच्याही आंगांत नव्हती. उलट मुसलमानांची हांजी हांजी करून व त्यांचें साहाय्य मागून पेशव्यांच्या नाशास प्रवृत्त होण्यांत कोणताच कमीपणा त्यांना वाटत नसे. सातारा व कोल्हापूर येथील पुण्यश्लोक शिवाजी महाराजांचे औरस किंवा दत्तक वंशज आणि त्यांचें मंत्रिमंडळ अशा प्रकारचें असल्यामुळें, पेशव्यांच्या पराक्रमाला त्यांचा हा एक वारंवार, लहानसा परंतु चिकाटीचा अडथळाच होत असे. कारण उत्तर हिंदुस्थानांतील व दक्षिणेंतील मुसलमान नबाबांशीं लढून त्यांना आपल्या पराक्रमांनीं जेरीस आणतांना, सातारा व कोल्हापूर येथील राष्ट्रघातकी कारस्थानांकडे नजर पोंचविण्यास शक्तीचा व काळाचा थोडाबहुत व्यय पेशव्यांना करावा लागे. पेशव्यांनीं छत्रपतींची सत्ता बळकाविली हें खरें, परंतु हे छत्रपती स्वतःच आळशी, विलासी व कर्तृत्वशून्य त्या वेळीं बनले होते, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. पेशवे उदयास आले नसते तर हीं राज्यें निजामानें किंवा दुसऱ्या एखाद्या मुसलमान नबाबानें केव्हांच आपल्या घशांत उतरविलीं असतीं. पेशव्यांनीं छत्रपतींची सत्ता बळकाविली असली, तरी त्यांच्या पराक्रमामुळेंच मराठ्यांचें शौर्य महाराष्ट्राबाहेरील हिंदुस्थानास माहीत झालें. त्यांच्या पराक्रमामुळें मराठ्यांचे कृष्णानदीकांठचे घोडे अटकेस जाऊन सिंधुनदाचें पाणी प्याले. पेशव्यांच्या मुळें

अव्वल मराठी पिढींतील जाधव, निंबाळकर, धुळप, मोरे वगैरे मराठे सरदार मागें पडले असले तरी शिंदे, होळकर, गायकवाड, पवार वगैरे नवीन मराठे सरदार उदयास आले. जुन्या परंतु पराक्रमशून्य बनलेल्या मराठे सरदारांची व छत्रपतींच्या इतर नालायक प्रधानांची बडेजाव व इभ्रत पेशवाईंत कमी झाल्यामुळें, त्यांनीं पेशव्यांवर जळफळावें हें साहजिक आहे. परंतु पेशवे ब्राह्मण असले तरी त्यांच्या अमलांतच व त्यांच्याच छत्राखालीं शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे पराक्रमी मराठे वीरांच्या कर्तबगारीला वाव मिळाला, आणि ते पेशव्यांचे अव्वल दर्जाचे सरदार बनले. आज देखील मराठ्यांचीं जीं प्रमुख व समृद्धिशाली संस्थानें आहेत, तीं पेशव्यांच्या कृपेनें उदयास आलेल्या शूर व तेजस्वी मराठे वीरांचीं आहेत. छत्रपतींच्या भोंवतीं पेशव्यांच्या नांवानें खडे फोडणाऱ्या व त्यांतच जिवाचें सार्थक मानणाऱ्या, घरबशा दळूबाईचीं नाहींत ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. पेशव्यांच्या उदयामुळेंच मराठ्यांच्या राज्याचें साम्राज्यांत रूपांतर झालें. दुर्दैवानें हें साम्राज्य फार दिवस टिकलें नाहीं. हें साम्राज्य एकट्या पेशव्यांचें नसून मराठमंडळाचें होतें. पेशवे हे फक्त त्याचे सूत्रचालक होते. शिंदे, होळकर, भोसले, गायकवाड, पटवर्धन, फडके, बुंदेले वगैरे पराक्रमी मराठी सरदार–मंडळीचें हें साम्राज्य होतें. या मंडळाच्या अध्यक्षस्थानीं पेशव्यांची योजना त्यांच्या कर्तबगारीमुळें झालेली होती. छत्रपतींचा अधिकार केवळ नांवाचाच चालत असे. परंतु नांवाकरतां कां होईना पेशवे त्यांचा मान राखण्याचा निदान देखावा तरी शेवटपर्यंत करीत असत. शाहू महाराजांचा दत्तक रामराजा यालाही कांहीं औरस संतति झाली नाहीं. यामुळें इ० सन १७७७ सालीं तो वारल्यानंतर त्याच्या मांडीवर दुसरा एक मुलगा दत्तक देण्यांत आला, व त्याचें नांव दुसरा शाहू हें ठेवण्यांत आलें. हा दुसरा शाहू १८०८ सालीं वारला. त्याला मात्र प्रतापसिंह व शहाजी असे दोन पुत्र होते. थोरल्या शाहू महाराजांनंतरचे हे सर्व नामधारी छत्रपति सातारा येथेंच राहात असत. आणि एक पेशवा मेला म्हणजे दुसऱ्याला पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा समारंभ त्यांच्या हातूनच होत असे. ते राजे असले तरी नांवाचे होते. जी स्थिती दिल्ली येथील मोंगल बादशहांची होती तीच सातारा येथील छत्रपतींची झाली. मुख्य राजघराणें कमजोर झालें, म्हणजे स्वाभाविकच सर्व सत्ता कर्तबगार वजिराच्या हातीं जाते, व तसेंच छत्रपतींचें झालें. कारण त्यांच्या राज्याचा बंदोबस्त पेशव्यांच्या हातीं होता. खर्चण्यासाठीं व इतर दरबारी बडेजावीचे समारंभ करण्यासाठीं त्यांना भरपूर नेमणूक खानगी-

साठीं मिळत असे. परंतु राजकारणाच्या बाबतींत पेशव्यांच्या मर्जीविरुद्ध त्यांना एक पाऊलही टाकतां येत नसे.

इ. स. १७६१ सालीं मराठ्यांचा पानपत येथें पराभव झाला, तरी थोरले माधवराव पेशवे, नाना फडणवीस आणि महादजी शिंदे यांनीं मराठी साम्राज्याला पुन्हा बळकटी आणली, आणि पानपताच्या अपयशाचें काजळ धुतलें गेलें. परंतु थोरले माधवराव पेशवे यांच्या अकालीं मृत्यूनें भाऊबंदकी माजली, आणि नारायणराव पेशव्यांचा त्या भाऊबंदकीपायीं खून झाला. नारायणरावांचा चुलता राघोबादादा हा पेशवा झाला, परंतु बारभाईच्या कारस्थानामुळें त्याला पेशवाई फार दिवस पचली नाहीं. नारायणरावांचा खून झाला त्या वेळीं त्याची पत्नी गंगाबाई गरोदर होती. तिला झालेल्या मुलाचें नांव सवाई माधवराव ठेवून, व त्या अर्भकाला पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा समारंभ करून त्याच्या नांवानें सरदार-मुत्सद्दी मडळींनीं राज्यकारभार सुरू केला. अज्ञान पेशव्याच्या पालकमंडळीला बारभाई हें संख्यावाचक नांव मिळालें होतें. त्यांनीं पुतण्याचा खून करून पेशवाई बळकावून बसलेल्या राघोबाला पदच्युत केलें, व खऱ्या वारसाला तो अधिकार दिला. त्या वेळीं राघोबा संतप्त होऊन इंग्रजांना मिळाला, आणि त्यांच्या मदतीनें पेशवाई हस्तगत करण्याच्या उद्योगास लागला. परंतु बारभाईच्या पराक्रमापुढें व मुत्सद्देगिरीसमोर त्याला व इंग्रजांना हार खावी लागली, आणि ठरलेली पेनशन घेऊन, नाशकास हरि हरि म्हणत स्वस्थपणें राहून पेशवाईवरील हक्क सोडून द्यावा लागला. इंग्रजांचें पिलूं त्या वेळीं पेशवाईत शिरकूं शकलें नाहीं. परंतु सवाई माधवरावांनीं आत्महत्या केल्यामुळें राघोबाचे दिवटे चिरंजीव बाजीराव पेशवे झाले. पानपतानंतर मराठ्यांची अब्रू संभाळून धरणारे, आणि मराठ्यांचा बडेजाव वाढविणारे दोन थोर आणि कर्तबगार पुरुष—महादजी शिंदे आणि नाना फडणवीस हे याच सुमारास दिवंगत झाले. त्यामुळें माजलेल्या अंदाधुंदींत इंग्रजांनीं पुणें दरबारांत आपला शिरकाव करून घेतला, आणि पेशव्यांशीं स्वतंत्र तह करून त्यांच्यावर आपली तैनाती फौज लादली, आणि सल्लामसलतीकरितां पुण्यास आपला एक रेसिडंट ठेवून दिला. पेशव्यांस याप्रमाणें इतर मराठे सरदारमंडळापासून विभक्त करण्यांत येऊन मराठी साम्राज्यांत फूट पाडण्यांत आली. इंग्रजांच्या मतानें त्या वेळीं पेशवे हे मराठी साम्राज्याचे मालक व मुख्य सूत्रधार होते. त्यांना प्रथम अंकित करून घेऊन, नंतर त्या आधारावर त्यांनीं तोच प्रयोग इतरांवर केला. इ. स. १८०२ ते १८०५ पर्यंत शिंदे, होळकर, व भोसले

हे प्रमुख मराठे सरदार इंग्रजांशीं तह करून त्यांचे एकप्रकारें मांडलिक बनले. इंग्रजांच्या तैनाती फौजेचें लचांड सर्वांच्या पाठीवर बसलें, आणि त्यामुळें त्यांना 'भीक नको पण कुत्रा आवर' असें झालें. इंग्रजांच्या त्रासामुळें मराठे मंडळाची पुन्हा एकी होण्याचा संभव दिसूं लागला. पुणें, इंदूर, ग्वाल्हेर व नागपूर येथें खलबतें व राजकारस्थानें सुरू झालीं. पेशव्यांच्या आधिपत्याखालीं पुन्हां सर्व मराठे एक होऊन इंग्रजांशीं मराठ्यांचा निकराचा सामना होण्याचा रंग दिसूं लागला. मराठ्यांचें त्या वेळचें सामर्थ्य इंग्रजांना तशाही स्थितींत न झेपण्यासारखें होतें. तेव्हां या सर्व अनर्थांचें व एकीकरणाचें मूळ जो पेशवा, त्यालाच खो देण्याचा इंग्रजांनीं घाट घातला. बाळाजीपंत नातू या नांवाचा एक देशद्रोही व हलक्या मनाचा ब्राह्मण, इंग्रज रेसिडेंटाचा मुख्य सल्लागार व हस्तक होता. पुण्यांतील सर्व घरभेदेपणाचा मक्ता त्यानें आपल्याकडे घेतला होता. इंग्रजांनीं बाजीरावाला जिणें नको नकोसें केलें. अखेर इंग्रजांच्या जाचाला कंटाळून त्यानें इंग्रजांशीं लढाई पुकारली. पेशव्याला शिंदे, होळकर, भोसले मिळाल्यास प्रसंग कठीण आहे हे इंग्रज ओळखून होते, आणि पुण्याच्या दरबारीं चालत असणाऱ्या खलबतांची व तदनुसार होऊं घातलेल्या मराठे मंडळींतील एकीची माहितीही, इंग्रज रेसिडेंटाला बाळजीपंताकडून मिळाली होती. त्यामुळें पेशव्यावर मात करण्याकरितां बाळाजीपंताच्या सल्ल्यानें इंग्रजांनीं एक नवाच डाव योजला.

इंग्रजांना आतां जणूं काय नव्यानेंच कळलें कीं, मराठेशाहीचे खरे मालक पेशवे नसून छत्रपती आहेत. पेशवे हे छत्रपतींचे प्रधान असतां त्यांनीं सर्व अधिकार स्वतां बळकावून गरीब बिचाऱ्या छत्रपतीला—मराठेशाहीच्या खऱ्या मालकाला सातारा येथें कैदेत ठेवलें. छत्रपतींचा इंग्रजांना कळवळा आला, आणि बंडखोर पेशव्याला त्याच्या तर्फे शासन करण्याचें त्यांनीं ठरविलें. शिंदेहोळकरांवर कुरघोडी करतांना, मराठेशाहीचे प्रमुख अधिपती पेशवे ही इंग्रजांची भावना व दृष्टी होती, आणि म्हणून त्यांनीं १८०३ मध्यें प्रथम पेशव्यांना बगलेंत मारलें, व नंतर शिंदेहोळकरांच्या नांग्या ठेंचल्या. परंतु पंधरा वर्षांनंतर त्यांची दृष्टी बदलली. पेशव्यांचें उच्चाटन कायमचें केल्याशिवाय इंग्रजांचा जम दक्षिणेंत बसणार नाहीं, अशी त्यांची खात्री झाली. त्यामुळें त्यांना पेशवे हे बंडखोर प्रधान, व मराठेशाहीचे खरे मालक साताराचे छत्रपती असें वाटूं लागलें. या वाटण्यांत खरेपणाचा अंश होता अशांतला भाग नाहीं. नाहीं पेक्षां त्यांनीं पेशव्यांचा सर्व मुलूख साताराच्या छत्रपतीच्या पदरांत निमूटपणीं घातला असता. त्यांच्या राजनीतीचा तो एक डाव

होता, आणि घरभेद्या बाळाजीपंत नातूनें तो सुचविला होता. १८१७ सालापासून सातारचे त्यावेळचे छत्रपती प्रतापसिंह, यांच्याशीं नातूच्या मध्यस्थीनें कारस्थान शिजूं लागलें. नातू म्हणजे त्या वेळीं एल्फिन्स्टनच्या नाकांतला बाल होता. त्याच्या मार्फतच प्रतापसिंहाला वश करून घेण्याचे प्रयत्न सुरू झाले. 'पेशवे हे प्रधान असून त्यांनीं सर्व सत्ता बळकावली व तुम्हांला प्रतिबंधांत ठेवलें, त्यामुळें आमचें अंतःकरण तुमच्यासंबंधी तिळतिळ तुटतें.' तुम्ही पेशव्यांचा पक्ष सोडून देऊन आम्हांला येऊन मिळाल व आमच्या तंत्रानें चालाल, तर बंडखोर पेशव्यांचा पराभव करून आम्ही तुमचें राज्य तुम्हाला मिळवून देऊं व मग तुम्ही खरेखुरे मराठी छत्रपती व्हाल,' अशी गोड मोहजालाची भाषा तरुण प्रतापसिंह व त्याची माता यांच्याशीं इंग्रजांतर्फे चालू झाली. भोळा प्रतापसिंह व राजमाता या इंग्रजांच्या मोहजालांत गुरफटलीं. छत्रपतींचे वंशपरंपरेचे इमानी सेवक बाळासाहेब चिटवणीस हे अर्थातच त्या कारस्थानांत होते. त्यांनीं यासंबंधीं लिहिलेली बखर अत्यंत मनोरंजक आहे. आपलें सर्व राज्य आपल्याला मिळणार या कल्पनेनें महाराज प्रतापसिंहाला फार उत्साह आला. परंतु बाजीराव पेशव्यानें, इंग्रजांशीं लढाई सुरू झाल्यावर त्यांना बंदोबस्तांत आपल्या बरोबर ठेवलें होतें. तरी पण संधी साधून छत्रपती आपल्या परिवारासह इंग्रजांच्या छावणींत आले. 'दुसरे बाजीराव पेशवे नालायक असल्यामुळें त्यांना पेशवाई पदावरून काढून टाकण्यांत आलें आहे. त्यांच्या दुर्गुणामुळें मराठी राज्याचें फार नुकसान झालें व पुढेंही होण्यावा संभव दिसत असल्यामुळें त्यांना पदभ्रष्ट करण्यांत आलें. त्यांना यापुढें साहाय्य करतील ते बंडखोर ठरतील,' असल्या अर्थाचा जाहीरनामा छत्रपती प्रतापसिंहाच्या सहीनें प्रसिद्ध करण्यांत आला, आणि हा जाहीरनामा मराठेशाहीच्या सर्व सरदार व हितचिंतकांकडे पाठविण्यांत आला. 'पेशव्यांच्या नालायकीमुळें त्यांचे अधिकार काढून घेण्यांत येऊन राज्यकारभार आम्हीं स्वतां पाहण्याचें ठरविलें आहे, सबब पेशव्यांची आज्ञा यापुढें कोणींही पाळूं नये,' असे छत्रपतींच्या नांवानें संदेश खेड्यापाड्यांतून प्रसृत करण्यांत आले. इंग्रजांबरोबर मराठ्यांचें निशाण मिरवूं लागलें, आणि छत्रपतींचा भगवा झेंडा इंग्रजांच्या छावणींत फडकूं लागला. यामुळें पेशव्यांचें बळ साहाजिकच कमी झालें! आणि त्यांना रसद मिळण्याची देखील पंचाईत पडूं लागली. इंग्रजांनीं छत्रपतींच्या नांवाचा अशा रीतीनें फायदा करून घेतल्यामुळें पेशवाईचा फारच लवकर मोड झाला. कारण जनतेंतील पेशव्यांचें नैतिक बल त्यामुळें कमी झालें. छत्रपतींची आज्ञा

मानावी कीं पेशव्यांची मानावी, असा भ्रम लोकांत इंग्रजांनीं उत्पन्न केला. पेशव्यांचा सर्व मुलूख इंग्रजांच्या स्वाधीन झाला. सातारा शहर तर छत्रपतींचेंच होतें. तें लढाईशिवायच इंग्रजांच्या स्वाधीन झालें. इंग्रजांनीं मात्र शहरावर व किल्ल्यावर थोडा वेळ गोळीबार करून शहर जिंकून घेतल्याचें नाटक करून दाखविलें. किल्ल्यावरून उलट एकही फेर झडली नाहीं, तरी आपल्या पराक्रमाची नाटकी हौस इंग्रजांनीं तेथेंही भागवून घेतली व तलवारीनें राज्य जिंकल्याचा देखावा केला!

परंतु एकदां पेशव्यांचा पराभव झाल्यावर इंग्रजांची भाषा व वृत्ती बदलली. प्रतापसिंहाला केवळ मेहरनजर म्हणून पेशव्यांच्या कैदेंतून सोडवून साताऱ्याच्या गादीवर आम्हीं बसविलें, अशी दयेची भाषा सुरू झाली. प्रतापसिंहानें पुष्कळ सांगून पाहिलें कीं, 'दुसरे शाहू छत्रपती १८०८ सालीं वारल्यावर ताबडतोब मला सातारा येथें राज्याभिषेक झाला होता, तेव्हां तुम्ही मला गादीवर मेहेरबानगीनें बसविलें या बोलण्यांत अर्थ नाहीं. मी पूर्वीपासूनच अभिषिक्त असा छत्रपती होतों. कर्तबगारीनें शून्य परंतु बंडखोर अशा पेशव्याला काढून टाकण्यास तुम्ही मला मदत कराल या आशेनें मी तुम्हांस आपण होऊनच मिळालों.' परंतु ही भाषा ऐकतो कोण? फेब्रुवारी १८१८ मध्यें इंग्रजांनीं साताऱ्यावर आपला कबजा केला, परंतु सप्टेंबर १८१९ पर्यंत महाराजांशीं निश्चित तह होईना. अखेर पेशवाईची पूर्व सीमा, सह्याद्री घाट, आणि नीरा व कृष्णा या टापूमधील लहानसा प्रदेश छत्रपतींच्या स्वाधीन करण्यांत आला. राजमातेच्या अंगाचा या फसवणुकीमुळें तिळपापड उडाला. कारण त्यावेळीं प्रतापसिंहाचें वय लहान असल्यामुळें तो राजकारणांत प्रमुखत्वानें भाग घेत नसे. तिनें बाळाजीपंत नातूची या विश्वासघाताबद्दल खूप खरडपट्टी काढली. रेसिडेंटाच्या उपदेशाप्रमाणें बाळाजीपंतानें तिला निर्माल्यवत् करून छत्रपतीशींच प्रत्यक्ष बोलणेंचालणें सुरू केलें, आणि तिला काशीयात्रेला जाण्याची सल्ला दिली. इंग्रजांशीं १८१७ मध्यें बोलणेंचालणें सुरू झालें, तेव्हां महाराज अज्ञान असल्यामुळें त्यांच्या तर्फे राजमाता, बाळासाहेब चिटणीस व बळवंतराव भोंसले सेनापती यांच्या समक्षच सर्व वाटाघाटी ठरल्या, आणि नालायक बाजीराव पेशव्याला पदभ्रष्ट करून इंग्रज छत्रपतींचे पेशवे बनले. पेशव्यांचा मुलूख घेतांना **'राज्य छत्रपतींचें व कारभार कंपनीसरकारचा'** अशीच द्वाही पुण्यांत व इतर काबीज केलेल्या पेशव्यांच्या मुलखांत इंग्रजांनीं फिरविली. परंतु पेशवाई पूर्णपणें घशांत उतरल्यानंतर पूर्वी दिलेली वचनें पाळणें इंग्रजांना जड वाटूं लागलें. पूर्वी आपला हेतु साधण्याकरितां 'वचने किं दरिद्रता' या



जगदीशपूर येथील प्रमुख बंडवाले

**कुंवरसिंह.**

न्यायानें सर्व वाटाघाटी झाल्या, परंतु एकदा मिळालेलें राज्य आपल्या हातून दुसऱ्याच्या हातीं सोंपविण्याकरितां इंग्रज हिंदुस्थानांत आले नव्हते. पेशवाई मुलूख इंग्रजांच्या हातीं पडल्यावर, पेशव्यांप्रमाणें आम्ही इंग्रज तुमच्याशीं दिखाऊसुद्धां नम्रपणानें नोकर म्हणून वागणार नाहीं, असें एलफिन्स्टननें प्रतापसिंहाला पत्र लिहिलें होतें, परंतु त्यामुळें आपलें राज्य अंगठीच्या खड्याप्रमाणें आटोपशीर व चिमुखडें केलें जाऊन, वर एखादा अपमानास्पद तह आपल्यावर लादला जाईल अशीमात्र त्याला कल्पना नव्हती. हें लहानसें राज्यदेखील इंग्रजांनीं त्याच्याकडे राहूं दिलें नसतें. परंतु एलफिन्स्टननें ग्रँट डफला लिहिलेल्या पत्राप्रमाणें, मराठे व इतर महाराष्ट्रीय लोकांत, ब्राह्मणी राज्याचें पेशवाईच्या अंतानंतरही जें उरलें-सुरलें वजन असेल तें साफ मिटविण्याकरितां म्हणून साताऱ्चें संस्थान राखण्याचें ठरलें. त्यांत प्रतापसिंहावर उपकार नव्हता किंवा दयाही नव्हती; इंग्रजांचा स्वार्थच तेणेंकरून साधावयाचा होता.

बिचाऱ्या प्रतापसिंहानें आलेल्या प्रसंगाला निमूटपणें मान वांकविली, आणि तहाच्या अटींप्रमाणें इंग्रज रेसिडंटाच्या सल्ल्यानें राज्यकारभार करण्यास सुरवात केली. प्रतापसिंहाचा स्वभाव उमदा होता व त्याला कोणतेंही व्यसन नव्हतें. त्यामुळें त्याचें राज्य प्रजेला रामराज्याप्रमाणें वाटल्यास नवल नाहीं. साताऱ्याला आलेला प्रत्येक इंग्रज रेसिडेंट त्याची न्यायप्रियता, प्रजाहितदक्षता व सरळता पाहून मोहित झाला. मुंबई इलाख्याच्या गव्हर्नरांनीं देखील त्याची व त्याच्या बहुविध सद्गुणांची वारंवार मुक्त कंठानें प्रशंसा केली. सरकारी रिपोर्टांत व पत्रव्यवहारांत त्याच्या राज्यकारभाराविषयीं व व्यक्तिशः गुणांविषयीं निरनिराळे प्रशंसापर उल्लेख आहेत. मुबईसरकारकडून गव्हर्नरजनरलकडे व विलायतेंत बोर्ड आफ डायरेक्टर्सकडे जे खलिते. गेले, त्यांत देखील प्रतापसिंहाचीं स्तुतिस्तोत्रें गायलीं गेलीं होतीं. त्यामुळें बोर्डाच्या सभासदांचें मत त्याच्याविषयीं अप्रतिम झालें. महाराजांचा स्वभाव शांत, न्यायप्रिय व उदार होता. त्यामुळें आपला खासगी खर्च कमी करून त्यांनीं प्रजेच्या कल्याणाकरितां अनेक उपयोगी कार्यें केलीं; पूल बांधले, रस्ते तयार केले व दवाखाने आणि इतर सार्वजनिक उपयोगाच्या संस्था आपल्या राज्यांत उघडल्या. या सर्व गोष्टींची वर्दी मुंबई सरकारामार्फत विलायतेंतील कंपनीच्या बोर्डाला कळली. शिवाय साताऱचे ग्रँट डफ वगैरे जुने रेसिडंट पेन्शन घेऊन विलायतेंत गेल्यावर प्रतापसिंह महाराजांविषयीं प्रसंगोपात प्रशंसापर उद्गार काढूं लागले. यामुळें १८३५ सालीं डिसेंबर

महिन्याच्या २९ तारखेस बोर्डानें महाराजांना उद्देशून एक अत्यंत प्रशंसापर खलिता लिहिला आणि त्यांना नजर म्हणून एक रत्नजडित तलवार त्या खलित्याबरोबर मुबईच्या गव्हर्नरकडे पाठवून दिली.

परंतु इकडे १८३३ सालापासून महाराजांचें मुंबईतील इंग्रज अधिकाऱ्यांशीं सूत जमेनासे झालें. पंत सचीव, पंत प्रतिनिधी, फलटणचे निंबाळकर यांच्या जहागिरीवर सातारा दरबारची हुकमत चालावी, कीं परभारें मुबई सरकारची चालावी याबद्दल वाद सुरू झाला. १८१९ च्या तहान्वयें या जहागिरी सातारा दरबारच्या दिमतीला दिल्या गेल्या आहेत, असे महाराजांचें म्हणणें पडलें. परंतु मुंबई सरकारला महाराजांनीं केलेला तहाचा हा अर्थ मान्य होईना. १८१९ चा तह झाला त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर एल्फिन्स्टन व साताऱ्याचे रेसिडेंट ग्रँट डफ यांना विचारून तहाचा अर्थ निश्चित करण्यांत यावा, अशी अत्यंत सरळ सूचना महाराजांनीं मुंबई सरकारला करून पाहिली. परंतु या वेळचे गव्हर्नर लार्ड क्लेअर यांनीं तें सर्व प्रकरण आपल्या तहनाम्यावरील मल्लीनाथीसह विलायतेस बोर्डाकडे निकालाकरितां पाठविलें. विलायतेस बोर्डाच्या सभेत, महाराज प्रतापसिंहांनीं तहनाम्याचा केलेला अर्थच योग्य ठरला. तेव्हां सदर जहागिरींवर सातारा दरबारची देखरेख असावी, असा बोर्डानें निकाल देऊन तो महाराजांना कळविण्यासाठीं मुंबईच्या गव्हर्नराकडे पाठविला. परंतु महाराजांच्या दुर्दैवानें लार्ड क्लेअर या दरम्यान विलायतेस जाऊन त्यांच्या जागीं सर राबर्ट ग्रँट हे मुंबईचे गव्हर्नर आले होते. मुंबईसरकारनें केलेला तहनाम्याचा अर्थ निमूटपणें मान्य न करतां महाराजांनीं विलायतेस बोर्डाकडे अपील केलें, हीच गोष्ट ग्रँटसाहेबांस व त्यांच्या मुंबईच्या सल्लागारांस मगरूरीची व बेपर्वाईची वाटली. ग्रँटसाहेबांची, धर्मनिष्ठ ख्रिस्ती म्हणून त्या वेळीं त्यांच्या चहात्यांत फार ख्याती होती. त्यांनीं लिहिलेल्या अनेक धर्मप्रार्थना ख्रिस्ती मंदिरांत म्हटल्याही जातात. पण ह्या ख्रिस्ती धर्मनिष्ठाला सत्याची काडीमात्र चाड नव्हती असें दिसतें. कारण विलायतेंतील बोर्डानें महाराजांना अनुकूल असा दिलेला निकाल, या धर्मनिष्ठ ग्रँटनें आपल्या दप्तरांत दडवून ठेवला. त्याचप्रमाणें बोर्डानें लिहिलेलें प्रशंसापर पत्र व रत्नजडित तलवार महाराजांकडे पोहोंचती न करतां, त्यानें आपल्या कचेरींतच त्या वस्तु दडपून ठेवल्या आणि महाराज प्रतापसिंहाला कसलाच मागमूस लागूं दिला नाहीं. त्यामुळें आपल्या अपिलाचा निकाल अजून कसा लागत नाहीं या विवंचनेंत प्रतापसिंह गर्क झाले. त्यांनीं १८३५ व १८३६ सालच्या उन्हाळयांत महाबळेश्वर

मुक्कामीं ग्रँटसाहेबांची भेट घेऊन जहागिरीच्या प्रश्नाचा निकाल आपल्या मताप्रमाणें व्हावा असें सुचविलें. तेव्हां ग्रँटनें विलायतेहून अखेर अपिलाचा निकाल महाराजांसारखा लागला ही गोष्ट गुप्त ठेवून, उलट मी तुमच्याबद्दल विलायत सरकारकडे स्वतंत्र खलिता या तहाबाबत पाठवीत आहें, अशी निवळ थाप मारली. महाराजांना फसवूनच हे धर्मनिष्ठ ढोंगी गव्हर्नर तृप्त झाले नाहींत, तर त्यांना परत भेट देण्याचें नाकारून यांनीं महाराजांचा मुद्दाम अपमान केला. १८३६ सालीं तर महाराजांनीं पुन्हां त्यांची भेट घेऊन त्यांना साताऱ्यास आदरानें निमंत्रण केलें. परंतु मुंबई सरकाराविरुद्ध अपील करण्याच्या घोर अपराधाबद्दल, ग्रँटला महाराजांचा अत्यंत राग आला होता. ही स्वतंत्र वृत्ती ग्रँटच्या मतानें मगरूरींत व बंडांत मोडत होती. असल्या राजद्रोहाला, अपीलाचा निकाल गुप्त ठेवणें, त्यांना आलेला मौल्यवान तलवारीचा नजराणा व प्रशंसापर खलिता दडपून बसणें, धडकून खोटीं उत्तरें देऊन त्यांना फसविणें व त्यांना परतभेट न देण्यानें त्यांचा अपमान करणें, ही शिक्षा या धर्मवान गव्हर्नराच्या दृष्टीनें अपुरीच ठरत होती. आणखी काय शिक्षा महाराजांना द्यावी या विचारांत ग्रँटसाहेब असता, बाळाजीपंत नातूनें एक नवें ताट वाढून त्यांच्यापुढें ठेवलें. 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला,' या कव्युक्तीला शोभणाऱ्या दुष्ट लीलाच यापुढें ग्रँटसाहेबांच्या हातून घडल्या.

छत्रपति शिवाजी महाराजांच्या वंशांत जन्माला आल्याबद्दल प्रतापसिंहांना साहजिकच अभिमान वाटत होता. शिवाजी महाराजांचे वारस असल्यामुळें आपण हिंदुपदपादशाहीचे प्रमुख नेते आहों, ही भावना त्याच्या मनांत दृढ वसत असे. त्यांच्या मनाचा कल पाहून त्यांचे आश्रित व इतर सरदार मंडळी त्यांना छत्रपती, हिंदुपदपादशहा, राजराजेश्वर, वगैरे नांवांनीं व बहुमानार्थी पदव्यांनीं संबोधित असत; आणि त्यामुळें महाराजांच्या अंतःकरणालाही गोड अशा गुदगुल्या होत. परंतु या साध्या गोष्टीला तिखटमीठ लावून, महाराजांचे हितशत्रु रेसिडेंटच्या कानांत चुगल्या सांगत असत. महाराजाच्या अशा फुशारकीच्या भाषणामुळें व चढेल वृत्तीनें इंग्रजी सार्वभौम सत्तेला कमीपणा येतो आणि तिची लोकांतील प्रतिष्ठा कमी होते, अशी तक्रार या मंडळीकडून साताऱच्या रेसिडेंटाकडे करण्यांत येई. या चुगलखोर मंडळींत बाळाजीपंत नातू आणि त्यांचे इतर अनुयायी यांचाच मुख्य भरणा असे. पेशवाई बुडविण्याचे कामीं बाळाजीपंताची इंग्रजांना अमोल मदत झाल्यामुळें, त्याला साताऱ्यास दिवाण नेमावें अशी

इंग्रजांनीं महाराजांकडे पूर्वी शिफारस केली होती. परंतु नातूच्या पूर्व वर्तनामुळें महाराजांना स्वाभाविक त्याचा अत्यंत तिटकारा आलेला होता; आणि म्हणूनच इंग्रजांच्या या शिफारशीला महाराजांकडून वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या. बाळाजीपंत नातूला दिवाण नेमल्यास पेशवाईप्रमाणेंच साताऱ्याचेंही वाटोळें होईल, अशी महाराजांना भीति वाटत असल्यामुळें त्यांनीं त्याची नेमणूक केली नाहीं. परंतु यामुळें नातूनें महाराजांविषयीं मनांत दंश धरला. महाराज स्वतःस क्षत्रिय म्हणवून घेत, परंतु पुण्यश्लोक शिवाजी महाराजांचें सुद्धां क्षत्रियत्व नाकबूल करणारे भटजी प्रतापसिंहाच्या क्षत्रियत्वाला थोडेच मान डोलावणार ! प्रतापसिंहानें उदेपूर दरबाराशीं पत्रव्यवहार करून, उदेपुरच्या महाराजांकडून 'भोंसल्यांचें घराणें उदेपुरच्या रजपूत घराण्याची शाखा होय,' असें पत्र आणविलें; आणि आपल्या क्षत्रियत्वाला पाठपुरावा मिळविला. महाराजांचे प्रभू चिटनीस, यांनाही त्यांनीं क्षत्रिय म्हणून गौरविलें; व वेदोक्त कर्में करण्याची पूर्ववत् मुभा दिली. प्रभूंचा वेदोक्ताचा अधिकार मान्य केल्यामुळें व स्वतःलाही वेदोक्ताचा अधिकार आहे असें म्हटल्यामुळें, महाराष्ट्रांतील सातारा, वाई प्रांतांतील कर्मठ ब्राह्मण त्यांच्यावर अतिशय क्रुद्ध झाले; आणि बाळाजीपंत नातूनें महाराजांविरुद्ध उभारलेल्या कटांत सामील झाले. सर राबर्ट ग्रँटसारखा खुनशी गव्हर्नर त्या वेळीं मुंबई इलाख्याचा प्रमुख अधिकारी असल्यामुळें बाळाजीपंताच्या कटाला उत्तेजनच मिळालें, आणि महाराजांचा पाडाव करण्याचा राजरस्ता त्यांना आढळून आला.

बाळाजीपंताच्या या ब्राह्मण साथीदारांनीं, महाराज इंग्रजसरकारशीं राजद्रोहाचें वर्तन करतात आणि त्यांच्या फौजेला फंद-फितूर देतात, असा आरोप महाराजांवर आणला. त्या वेळचा साताऱ्याचा रेसिडेंट कर्नल लाडव्हिक हा अतिशय हलक्या कानाचा होता. त्यानें हा आरोप मुंबईच्या गव्हर्नरकडे, सारासार विचार किंवा कोणतीही चौकशी न करतां लिहून कळविला. गव्हर्नरसाहेब महाराजांचा सूड घेण्यास टपलेलेच होते. त्यांनीं ताबडतोब लाडविक, ओव्हान्स आणि विलोबी यांचें एक कमिशन नेमून महाराजांच्या अपराधाची चौकशी करण्यास फरमाविलें. या कमिशननें सर्व चौकशी अंधारांतच केली. साक्षीपुरावे गुप्तपणें घेण्यांत आले, आणि साक्षीदारांच्या जबान्या किंवा आरोपांची यादी यांपैकीं एक अक्षरदेखील महाराजांना कळविण्यांत आलें नाहीं. महाराजांनीं पुष्कळ सांगून पाहिलें कीं, माझ्यासमोर किंवा उघडपणें चौकशी चालावी; निदान माझ्यावर कोणते आरोप ठेवले आहेत व साक्षीदारांनीं काय जबान्या दिल्या, हें

तरी मला दाखवावें. परंतु त्यांची विनंति पालथ्या घड्यावरील पाण्याप्रमाणें फुकट गेली. या कमिशनपैकीं ओव्हान्स हा अत्यंत दुष्ट व हलकट होता; त्याला नीतीची काडीमात्र चाड नव्हती. या कमिशननें महाराजांचे दिवाण गोविंदराव यांना अटकेंत ठेवलें. प्रथम सातारा, नंतर पुणें व शेवटीं अहमदनगर, याप्रमाणें तीन निरनिराळ्या तुरुंगांत अंधारकोठडीची सजा देऊन गोविंदरावाला डांबून ठेवण्यांत आलें. हेतु हा कीं, तसल्या असह्य छळानें तरी महाराजांनीं फितुर केला असें म्हणण्यास त्यानें तयार व्हावें. गोविंदरावांनीं व महाराजांनीं कमिशनपुढें आपण निरपराधी असल्याबद्दल जीव तोडून सांगितलें, परंतु कमिशनची इच्छाच मुळीं न्याय करण्याची नव्हती. कसें तरी करून महाराजांना दोषी ठरवावें असा चंग बांधूनच ओव्हान्स तेथें आला होता. त्याला साक्षीपुराव्याची व खऱ्याखोट्याची फारशी मातब्बरी नव्हती. परंतु सत्याचा विधिनिषेध न बाळगतांहि, कमिशननें गोळा केलेला अंधारांतील एकतर्फी पुरावा अगदीं कुचकामाचा ठरला. तेव्हां कर्नल लाडविकची साताऱ्याहून उचलबांगडी करण्यांत आली. कारण कर्नल लाडविक हलक्या कानाचा असला तरी नीच स्वभावाचा नव्हता. आणि वाटेल तें खोटें कर्म करण्यास तयार असलेला रेसिडेंट या वेळीं ग्रँटसाहेबास सातारा येथें हवा होता. कर्नल लाडविकला थोडीशी सद्सद्विवेक बुद्धी आहे हें ग्रँटला माहीत होतें. आणि पुढें कांहीं वर्षांनीं, ओव्हान्सच्या आग्रहावरून कमिशनच्या रिपोर्टावर सही केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला आणि कमिशननें तपासलेले साक्षीदार सपशेल खोटें बोलले व गोळा केलेला पुरावा दोन कवडीचा होता, असें त्यानें जाहीररीतीनें प्रसिद्ध केलें. अशा अर्धवट रेसिडेंटाला अर्थातच सातारा येथून 'खो' मिळाला, आणि बेडर ओव्हान्सची त्याच्या जागीं नेमणूक झाली.

ओव्हान्सनें साताऱ्याला गेल्यावर नंगा नाच सुरू केला. भाऊभट लेले नांवाच्या एका हलकट ब्राह्मणाला महाराजांविरुद्ध पुरावा गोळा करण्याकरितां १५० रुपयांचा इसारा देण्यांत आला, आणि ज्याप्रमाणें तो पुढें पुरावा मिळवून आणील, त्या प्रमाणांत त्याला जादा बक्षिस दिलें जाईल, आणि त्याचें संरक्षण केलें जाईल, अशा अर्थाचा एक लेखही आश्वासनार्थ त्याला लिहून देण्यांत आला. या लेखाच्या जोरावर या ब्राम्हणानें साक्षीदार पढवून तयार केले, आणि बनावट पत्रें व दस्तऐवज लिहविले, खोट्या मोहरा तयार केल्या; आणि महाराजांच्या फितुरीचा सर्वत्र डंका वाजविला. महाराजांचे धाकटे बंधु शाहाजी ऊर्फ आप्पासाहेब भोंसले हेदेखील या नीच ब्राम्हणाच्या कटांत सांपडले होते.

प्रतापसिंह महाराजांनीं आपलें हृदय ओव्हान्सजवळ मोकळें केलें आणि त्याच्या तंत्रानें सर्वस्वी चालण्याचें कबूल केलें. परंतु प्रतापसिंहाचा स्वाभिमान इंग्रजांना असह्य झाला असल्यामुळें, त्यांचा घात करण्याचें निश्चित ठरलें होतें. या मंडळींनीं पूर्वींच्या आरोपाशिवाय आणखी दोन आरोप महाराजांवर लादले. इंग्रजांना हिंदुस्थानांतून हांकलून देण्याकरितां, नागपुरच्या पदच्युत अप्पासाहेब भोंसल्याशीं आणि गोव्याच्या पोर्तुगीज गव्हर्नराशीं महाराजांनीं कारस्थान चालविलें, असे हे दोन नवे आरोप होते. या बाबतींतील बनावट पुरावा बाळाजीपंत नातूकडून पेश करण्यांत आला. तीं पत्रें बनावट आहेत असें गोव्याच्या गव्हर्नरनें निक्षून सांगितलें; आणि सातार्‍याच्या महाराजांशीं आपला कोणताही राजकीय पत्रव्यवहार झाला नाहीं असें त्यानें इंग्रजांना कळविलें. परंतु ओव्हान्सच्या दृष्टीनें गोव्याचा गव्हर्नर आणि प्रतापसिंह महाराज हे खोटे ठरून, बाळाजीपंत नातू व भाऊ लेले ही मंडळी खरी टरली. महाराजांच्या विरुद्ध अशी दंगल चालू असून देखील, त्यांना त्यांच्यावरील आरोप स्पष्टपणें कळविण्यांत येईनात, किंवा गोळा केलेला साक्षीपुरावा देखील त्यांना दाखविण्यांत आला नाहीं. यावर महाराजांनीं कलकत्यास गव्हर्नर जनरलकडे दाद मागितली. तेव्हां महाराजांना त्यांच्या विरुद्ध जमा केलेला सर्व साक्षीपुरावा व आरोप वाचून दाखविण्यांत यावे, असा ग्रँटसाहेबाला तेथून हुकूम आला. परंतु ग्रँटसाहेब व त्यांचे हस्तक ओव्हान्स यांनीं हा हुकूमदेखील धाब्यावर बसविला, आणि सामान्य आरोपीला जो हक्क असतो त्यापासूनही महाराजांना वंचित केलें.

याप्रमाणें प्रकार चालू असतांना ग्रँटसाहेब १८३८ सालीं हिंदुस्थानांत दापोरी येथें वारले. सातारा राज्य खालसा झालेलें पाहण्याची त्यांची इच्छा अखेर अपुरीच राहिली. त्यांच्या जागीं रिव्हेट कारनॅक हे मुंबईचे गव्हर्नर होऊन आले. झालेल्या चौकशीवरून कांहींच निश्चित निष्पन्न होत नाहीं, आणि साक्षीपुराव्याचा एकतर्फी प्रकार पाहिल्यामुळें, 'महाराजांविरुद्ध कोणतीही कारवाई करणें इष्ट नाहीं, सबब झालेली चौकशी बंद करावी,' असा हिंदुस्थानसरकारचा अभिप्राय पडला. विलायतेंतील बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचें तसेंच मत पडलें. तेव्हां कारनॅकसाहेब १८३९ सालीं सातारा येथें गेले. परंतु तेथें ते ओव्हान्ससाहेबाच्या भुलथापांत सांपडून भलतेंच करून बसले. झालेल्या प्रकारावर सारवण घालून महाराजांशीं दिलसफाई करण्याकरितां गेलेले नवे गव्हर्नर, हातीं कोणताही अधिकार नसतांना **वरिष्ठ अधिकार्‍यांच्या संमतीशिवाय** महाराजांना पदच्युत करून परत

आले. या चमत्काराची उपपत्ति सरळ आहे. महाराजांनीं, 'माझ्या हातून इंग्रज सरकाराविरुद्ध द्रोह घडला तेव्हां त्याबद्दल मला माफी देण्यांत यावी,' अशा पत्रकावर सही करावी, आणि इतरही कांहीं अपमानास्पद अटी मान्य कराव्या असें गव्हर्नरनें फर्माविलें. अशा माफीपत्रकावर महाराजांची सही मिळवून ग्रँट व ओव्हान्स यांच्या पूर्वीच्या दुष्कृत्यांवर पांघरूण घालण्याचा या नव्या गव्हर्नरचा विचार होता. परंतु महाराजांनीं अशा खोट्या कागदावर सही करण्याचें सपशेल नाकारलें. 'मी सर्वस्वी निरपराधी आहें, सबब मी असल्या अपमानास्पद व खोट्या पत्रकावर राज्य काय परंतु जीव गेला तरी, सही करणार नाहीं,' असें त्यांनीं निक्षून सांगितलें. 'माझा तुम्ही उघड न्याय करा. मग मी त्यांत दोषी ठरलों तर वाटेल ती शिक्षा भोगण्यास मी तयार आहें. परंतु अंधारांत घाव घालून माझ्या अब्रूला व नेकीला असा धक्का लावूं नका. शिवाजी महाराजांच्या कुळांत जन्मलेल्या माझ्यासारख्या अस्सल मराठ्याकडून असें बेइमानीचें व विश्वासघाताचें कृत्य कधींच घडणार नाहीं. मी आपल्या राज्यापेक्षां व प्राणापेक्षांही स्वतःच्या अब्रूची किंमत अधिक समजतों; आणि म्हणून मी या कागदावर कदापि सही करणार नाहीं.' असें बाणेदार उत्तर महाराजांनीं दिलें.

महाराजांची सत्यनिष्ठा व त्यांचा बाणेदारपणा अखेर त्यांना भोंवला. ५ सप्टेंबर रोजीं त्यांना पदच्युत करण्यांत आलें, आणि त्यांचा दुष्ट, कृतघ्न व विश्वासघातकी भाऊ आपासाहेब हे सातारचे महाराज झाले. बाळाजीपंत नातूला दिवाणगिरीचीं वस्त्रें मिळालीं व कर्नल ओव्हान्सची चंगळ सुरू झाली. बिचाऱ्या प्रतापसिंहाच्या कपाळीं मात्र वनवास आला, आणि मेजर कार्पेटरच्या देखरेखीखालीं त्यांना बनारस येथें नजरकैदेंत ठेवण्यांत आलें. कर्नल ओव्हान्स, आपासाहेब व बाळाजीपंत नातू यांच्या श्रमांचें सार्थक होऊन, विश्वासघाताचें गोड फळ त्यांच्या पदरांत पडलें. पण या कटाचा मुख्य सूत्रधार सर राबर्ट ग्रँट हा यापूर्वीं थोडे दिवस वारल्यामुळें, साताऱ्याचें राज्य इंग्रजांच्या घशांत घातल्याबद्दल कंपनीच्या शिरस्त्याप्रमाणें **'अर्ल ऑफ सातारा'** या पदवीनें विभूषित होऊं शकला नाहीं. बिचाऱ्याची महत्त्वाकांक्षा अपुरी राहिली, आणि अतृप्त इच्छेंतच मरण आल्यामुळें त्याला पुढें पिशाचयोनी प्राप्त झाली कीं काय नकळे. कारण दापोरी येथें तो वारला, तेथें एक साहेबाचें भूत वावरतांना लोकांना अजूनही दिसत असतें, असें म्हणतात.

बाळाजीपंत नातू किंवा त्याचा हस्तक भाऊभट लेले, यांची कितीही कठोर शब्दांनीं निंदा किंवा निर्भर्त्सना केली तरी ती क्षम्यच ठरेल. त्यांचे अपराधच अघोरी होते. परंतु या कटांतच प्रतापसिंहाचा भाऊ आपासाहेब भोंसले—छत्रपतींच्या वंशांतलाच हाडामांसाचा पुतळा सामील होता, आणि भावाच्या चितेवर आपल्या पानग्या भाजून घेण्यास त्यानें काडीचाही अनमान केला नाहीं, ही गोष्ट विसरणें शक्य नाहीं. नातू व लेले हे अत्यंत दुष्ट खरे, परंतु ते जाणून बुजून परके. परंतु आपासाहेब तर प्रतापसिंहाचा सहोदर होता ना ? मग त्यानें असा विश्वासघात कां करावा ? तो कांहीं कुकुलें बाळ नव्हता, कीं फसून बिचारा नातूच्या कटांत गेला असें म्हणायला! आप्पासाहेबाचें वय त्या वेळीं ३७ वर्षांचें होतें. बरें, नातूच्या कटांत येऊन प्रतापसिंहाविरुद्ध खोट्या साक्षी भरणारे पलटणी सुभेदार ब्राह्मणेतरच होते. तेव्हा यांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर ह्या वादाचा संबंध जोडणें चुकीचें आहे. प्रतापसिंहाविरुद्ध उभारलेल्या कटांत सर्वच जातींची दुष्ट मंडळी सामील झाली होती. अशा नीच मंडळींचा कोणीही धिक्कारच करील. सारांश, स्वार्थ साधण्याकरितां वाटेल तो नीचपणा करण्यास तयार असणारी मंडळी एकत्र झाली, आणि इंग्रजसरकारचें प्रत्यक्षपणें उघड प्रोत्साहन नसलें तरी अंतःस्थ पाठिंबा आपणास खास आहे, हें जाणून त्या सर्वांनीं प्रतापसिंह महाराजांना फशीं पाडलें व आपल्या तुंबड्या भरून घेतल्या.

महाराजांची व त्यांचे सेनापती बाळासाहेब भोंसले यांची धींड काढण्यांत आली. बाळासाहेबांची पत्नी गरोदर होती. तिला हा तांतडीचा प्रवास सहन होईना. इकडे सेनापतींची प्रकृती खालावली. परंतु त्यांच्या बरोबरच्या फांकड्या इंग्रज अधिकाऱ्याला प्रवासांत अशी दिरंगाई शोभेना. त्यानें सर्वांच्या मागें गर्दीचा लकडा लावला. माणुसकी त्याच्या गांवींही नसल्यामुळें आजाऱ्यांसाठीं वाटेंत खोळंबा करण्याचें त्यानें साफ नाकारलें. याचा परिणाम म्हणजे सेनापतींना वाटेंतच मृत्यू आला, आणि सेनापतीची साध्वी पत्नी रस्त्यावरच बाळंत झाली. लेफ्टनंट क्रिस्टलला याबद्दल बोर्डानें टपका दिला खरा, परंतु त्यामुळें सेनापतीसारखा अमोल मोहरा परत थोडाच येणार होता! अशा हालअपेष्टांत प्रतापसिंह महाराज काशी मुक्कामीं जाऊन पोहोंचले. प्रतापसिंह महाराजांनीं यापूर्वीच आपले वकील मुंबईसरकारच्या अन्यायाविरुद्ध दाद मागण्याकरितां विलायतेस रवाना केले होते. या वकीलांनीं विलायतेला पोहोंचूं नये, म्हणून मुंबई सरकारनें नाहीं नाहीं ते उपाय योजले. त्यांना पोलीसमार्फत धाकदपटशा तर दिला, म्याजिस्ट्रेटकडून

अटक तर करून पाहिली, त्यांनीं सात हजार रुपये भाडें भरून ज्या जहाजांत जागा मिळवली होती, त्या कप्तानाला त्यांना घेतल्याशिवायच मुंबई सोडण्यास भाग पाडून त्यांचे रुपये तर बुडविले. असे नाना उपाय योजले तरी त्या वकीलांचा धीर खचला नाहीं; कारण या तीन वकीलांचें पुढारीपण **रंगो बापूजी** नांवाच्या एका अत्यंत कर्तबगार व इमानी मुत्सद्याकडे होतें. यशवंतराव राजे शिर्के व भगवंतराव विठ्ठल हे त्यांचे दुसरे मदतनीस वकील होते. त्यांनीं विलायतेस जाऊन महाराजांतर्फे व्यवस्थेशीर कारवाई सुरू केली. परंतु गव्हर्नरच्या कृत्याविरुद्ध तेथें उलट निकाल कसा लागावा? इंग्रजी राज्यांत 'प्रेस्टीज' ही अजब चीज आहे. तिचा बोज राहण्याकरितां अन्याय खपतो एवढेंच नव्हे, तर त्या एका अन्यायाला दुसऱ्या अनेक अन्यायांचीं पुटें मिळून न्यायाचें स्वरूप देण्यांत येतें. यशाविषयीं निराश होऊन यशवंतराव व भगवंतराव १८४१ सालीं परत हिंदुस्थानांत आले; परंतु रंगो बापूजी अर्ध्या वाटेंतून परत इंग्लंडला गेला, आणि तेथेंच ठाणें धरून राहिला.

इकडे १८३९ सालीं आप्पासाहेब गादीवर बसल्यानंतर नातू व ओव्हान्स यांचें सातारा येथें राज्य सुरू झालें. वरून दिसावयास टामट्रम होती तरी आंत सांवळा गोंधळ चालू होता. ओव्हान्स मात्र दर रिपोर्टांत गव्हर्नरकडे आप्पासाहेबांचीं स्तुतिस्तोत्रें लिहून पाठवीत होता, आणि आपण केलेल्या अन्यायावर सफेती चढविण्यासाठीं गव्हर्नरसाहेबही रेसिडेंटच्या सुराला सूर मिळवून आप्पासाहेबांची गवर्नर जनरलकडे व विलायतेस बोर्डाकडे प्रशंसा करीत असत. त्यांना तसें लिहिणें भागच होतें. कारण विलायतेस प्रतापसिंहातर्फे रंगो बापूजींची विलक्षण चळवळ चालू होती. सातारचे पूर्वीचे रेसिडेंट ग्रँटडफ, जनरल ब्रिग्ज यांना प्रतापसिंहाचा उमदा स्वभाव व त्यांची सत्यनिष्ठा ठाऊक होती. त्यांनीं रंगो बापूजीला सर्वतोपरी सहाय्य केलें. जान ब्राईट, जोसेफ ह्यूम, जार्ज थामसन वगैरे अनेक सत्यप्रतिज्ञ व नीतिमान इंग्रजांनीं रंगो बापूजीला सर्वतोपरी सहाय्य करून, मुंबईचे गव्हर्नर व रेसिडेंट ओव्हान्स यांचीं नीच कृत्यें उघडकीला आणून प्रतापसिंहास न्याय मिळवून देण्याचा विडाच जणूं उचलला. पार्लमेंटांत, लोकांत, वर्तमानपत्रांत, व्याख्यानांतून या अन्यायाची चर्चा चालू झाली. या लोकक्षोभामुळें पार्लमेंटनें सातारा प्रकरणाचे सर्व सरकारी गुप्त कागदपत्र प्रसिद्ध करण्यास बोर्डास आज्ञा केली. त्यामुळें हे अंतस्थ प्रकार चवाट्यावर आले. कंपनीनें अर्थातच आपल्या नोकरांची तरफदारि करतां येईल, अशा रीतीनें मूळ कागदपत्रांची छाटाछाट करूनच हें सातारा

प्रकरण प्रसिद्ध केलें.* परंतु त्यावरून देखील ओव्हान्स व ग्रँट यांचें अनीतीपर वर्तन व प्रतापसिंहाची वाणेदार सत्यप्रियताच सिद्ध होऊं लागली. विलायतेंतील या खळबळीमुळें, रेसिडेंट ओव्हान्स व मुंबई सरकार यांना प्रतापसिंहाची निंदा, त्याच्या अंमलाखालील राज्यव्यवस्थेची चेष्टा व त्या तुलनेंत आप्पासाहेबांचे दुर्गुण झांकून ठेवून त्यांची प्रशंसा व त्यांच्या अंमलाखालीं झालेल्या प्रजेच्या कोटकल्याणाची तरफदारी करणें भाग होतें. हेतु हाच कीं, पूर्वीचा अन्याय यदाकदाचित् बोर्डाला पटला, तरी सातारा राज्याचें व प्रजेचें त्या अन्यायामुळें हित झालें असें त्यास वाटावें, व झालेली व्यवस्था बोर्डानें उलटवून प्रतापसिंहाला परत गादीवर आणूं नये; कारण त्यांत आपलें नाक कापलें जाईल असें त्यांस वाटे. परंतु रंगो बापूजीची मात्र निराशा झाली नाहीं. त्यानें रेसिडेंट व नातू यांनीं पुराव्यांत दाखल केलेल्या कागदपत्रावरील राजमुद्रा कशा बनावट आहेत, हें दाखवून देण्याकरितां सर्व कागदपत्र खऱ्या व खोट्या राजमुद्रांसह मोडी लिपींत स्वतां विलायतेंत प्रसिद्ध केले, त्याला इंग्रजी भाषांतर जोडलें, आणि हा सातारा प्रकरणाचा ग्रंथ पार्लमेंटच्या प्रत्येक सभासदाला व विलायतेंतील इतर प्रमुख मंडळींना नजर केला; इतकेंच नव्हे, तर जुनें पार्लमेंट बरखास्त होऊन नव्या निवडणुकी सुरू झाल्या, तेव्हां त्यानें आपल्या इंग्लिश मित्रांसह इंग्लंडभर दौरा काढला व ठिकठिकाणच्या सभेत साताऱ्याच्या अन्यायाबद्दल तीव्र व जळजळीत भाषणें केलीं, आणि साताऱ्याच्या राजाला परत गादीवर बसवावें आणि ओव्हान्सची जाहीर चौकशी व्हावी असे ठराव या सभांतून पास करून घेतले.

ज्याप्रमाणें बाळाजीपंत नातूसारखे निमकहराम ब्राह्मण प्रतापसिंहाला साताऱ्यांत मिळाले, त्याप्रमाणें गोविंदराव दिवाण व कृष्णाजी सदाशिव भिडे या दोघां ब्राह्मणांनीं, महाराज पदच्युत होऊन काशीस हद्दपार झाल्यावरही, त्यांची बाजू घेऊन त्यांना अनेक प्रकारें सहाय्य केलें. रेसिडंट, नातू व आप्पासाहेब

---

* "Under the skill which the Court of Directors have all along displayed in suppressing such information as they wished not to appear........." ईस्ट इंडिया कंपनीच्या सरकारी कागदपत्रांच्या विश्वासार्हतेबद्दलचा प्रसिद्ध इतिहासकार **जेम्स मिल** याचा वरील अभिप्राय लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

यांच्यापैकीं कोणाचीच भीति न बाळगतां, त्यांनीं निरनिराळे अर्ज करून खरा प्रकार जाहीर केला, व महाराजांच्या निरपराधीपणाचा पुरावा गोळा केला. नातू व ओव्हान्स हे लांचलुचपत खातात, आणि प्रतापसिंह महाराजांतर्फे विलायतेस चाललेली खटपट हाणून पाडण्याकरितां ओव्हान्सच्या सासऱ्याला व मेहुण्याला विलायतेंत दोन हजार रुपये महिना खुराक सातारा दरबारमार्फत चालू झाला आहे, ही माहिती त्यांनीं पुरविली. इकडे विलायतेसही ओव्हान्सवर अनेक आरोप जाहीर रीतीनें ठेवण्यांत आले. कृष्णाजीपंतानें तर ब्रिटिश हद्दींत येऊन ओव्हान्सवर आरोप केले, आणि ते मी सिद्ध करून द्यावयास तयार आहे असें प्रतिज्ञेवर सांगितलें. परंतु ओव्हान्स व मुंबईसरकार मूग गिळून गप बसले. कोर्टांत हें प्रकरण नेण्याची त्यांची छाती होईना. कारण हें प्रकरण एकदां कोर्टांत गेलें, म्हणजे आपलीं सर्व कृष्णकृत्यें चवाठ्यावर येतील ही भीती त्यांना होती. उलटपक्षीं, आपला उघड उघड न्याय करून गुन्हा शाबीत झाल्यास वाटेल तेवढी कडक शिक्षा द्या, असें प्रतापसिंहाचें मागणें होतें. त्यांच्यातर्फे रंगो बापूजी विलायतेंत हीच मागणी करीत होता. परंतु प्रेस्टीजपुढें न्यायानें हात टेकले. लोकांना मात्र न्याय कोणत्या बाजूस होता हें त्यामुळें नीट कळून चुकलें. बनारसच्या हवेंत प्रतापसिंह महाराजांची प्रकृती ठीक राहीना. तरी त्यांना साताऱ्याच्या थंड व प्रसन्न हवेंत आपले शेवटचे दिवस घालविण्याची परवानगी मिळाली नाहीं. आपला अंत कधीं होईल याचा नेम वाटेनासा झाल्यामुळें, त्यांनीं आपल्यासाठीं जीवाचें मोल दिलेल्या सेनापतीचा मुलगा शास्त्रपूर्वक दत्तक घेतला. सेनापती त्यांच्या नात्यांतले असून त्यांचे दूरचे भाऊच लागत होते. दत्तविधानापूर्वीं त्यांनीं रीतसर सर्व अधिकाऱ्यांना इत्तला देऊन त्यांची परवानगी मागितली. परंतु त्यांना दत्तक घेण्याची कोणींच मनाई केली नाहीं. पार्लमेंटच्या हुकमाप्रमाणें सातारा दप्तरचे सर्व कागदपत्र विलायतेंत प्रसिद्ध झाल्यानंतर, त्यांनीं एकंदर खुलासेवार खलिता लिहून तो गवर्नर जनरलच्या मार्फत बोर्डाकडे रवाना केला. त्या खलित्यांत मूळ एलफिन्स्टननें पेशवाई घेतेवेळीं जी कबुलायत दिली, तेथपासूनचा सातारा प्रकरणाचा संगतवार इतिहास जागजागीं आधार व पुरावे देऊन लिहिला होता. त्या खलित्यानें मुंबईसरकारची सर्व हातचलाखी उघडकीस आणली होती. त्याला उत्तर देणें शक्यच नव्हतें, त्यामुळें गवर्नर जनरलनें तो आपल्या दप्तरांतच दाबून ठेवला. १२ डिसेंबर १८४४ सालीं पाठविलेला हा इतिहासप्रसिद्ध खलिता, प्रतापसिंह महाराज वारल्यानंतर दोन महिन्यांनीं म्हणजे

८ डिसेंबर १८४७ रोजीं विलायतेस रवाना करण्यांत आला. गवर्नर जनरलच्या कचेरींत तान वर्षे पडून राहिलेला हा अर्ज आणखी देखील पडून राहिला असता. परंतु त्या अर्जाचा काय निकाल झाला म्हणून विलायतेंत रंगो बापूजीनें व त्यांच्या इंग्रज मित्रांनीं लकडा लावल्यामुळें तो अर्ज आमच्याकडे अजून आला नाहीं असे निर्लज्जपणाचें उत्तर बोर्डाला द्यावें लागलें, आणि तो खलिता कलकत्त्याहून मागवून घ्यावा लागला. खलित्याबरोबरच प्रतापसिंहमहाराजांच्या मृत्यूची बातमी विलायतेस कळली. त्या वेळीं बोर्डाला हायसें वाटलें असेल. कारण प्रतापसिंहाचा प्रश्न त्यांना बिलकूल विश्रांति घेऊं देत नव्हता. त्यांनीं आजपर्यंत अनेक अन्याय केले असतील, परंतु ह्या सातारा प्रकरणानें ब्रह्मसमंधाप्रमाणें त्यांचा पिच्छा पुरविला होता, आणि याला कारण म्हणजे महाराजांचा एकनिष्ठ वकील रंगो बापूजी! प्रतापसिंहाच्या मृत्यूची बातमी कळल्यानंतर, बोर्डाचे अध्यक्ष हाबहाऊस यांनीं २४ डिसेंबर १८४७ रोजीं गव्हर्नरजनरलला जें पत्र रवाना केलें तें मोठें मासलेवाईक आहे. आपल्या अंमलाखालील संस्थानें व संस्थानिक यांसंबंधीं ईस्ट इंडिआ कंपनीची किती विषारी दृष्टि होती, हें या पत्रावरून उत्तम रीतीनें कळून येतें. हाबहाऊस लिहितात, 'महाराज प्रतापसिंहाचा मृत्यू योग्य वेळीं घडून आला. हल्लीच्या राजाची प्रकृति बरी नसते असें मीं ऐकलें आहे. त्याला मूलबाळ न होतां तो मरण पावला, म्हणजे सातारा खालसा करण्यास कोणतीच आडकाठी उरणार नाहीं. तो दत्तक घेऊं म्हणेल, तर दत्तकाची परवानगी देण्यांत येऊं नये. माझ्या कारकीर्दींत ही गोष्ट घडून आली, तर ब्रिटिश राज्यांत सातारा सामील करण्याबाबत मी कोणताच उपाय योजावयाचा शिल्लक उरूं देणार नाहीं.' हें पत्र कलकत्त्याला येऊन पोहोंचलें तेव्हां सर्वभक्षक डलहौसीनें हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला होता.

कंपनीच्या सुदैवानं ५ एप्रील १८४८ रोजीं आप्पासाहेब महाराजांनीं हाबहाऊसच्या भविष्याप्रमाणें राम म्हटलें. ते वारले तेव्हां रेसिडंटाची स्वारी साताऱ्यास नसून फिरतीवर होती. परंतु आपला अंतकाल ओढवला असें पाहून त्यांनीं सिव्हिलसर्जन डाक्टर मरे यांना राजवाड्यांत बोलावलें, आणि त्यांच्यासमोर शेडगांवकर भोंसल्यांच्या घराण्यांतील एक मुलगा दत्तक घेतला आणि सर्व मंडळीसमोर यथाविधि दत्तविधान करून त्याचें व्यंकटराव असें नांव ठेवलें. हा सर्व प्रकार रेसीडंटला कळविण्याबद्दल त्यांनीं डाक्टर मरेंना विनंती केली, आणि मृत्युकाल जवळ आल्यामुळें त्यांच्या गैरहजेरींत दत्तविधान उरकावें लागलें, याबद्दल

त्यांनीं दिलगिरीही प्रदर्शित केली. दत्तक घेतलेला मुलगा महाराजांच्या भाऊबंदाच्या घराण्यांतीलच होता. राण्या व इतर दरबारी मंडळी यांचीही दत्तविधानाला पूर्ण संमती मिळाली असल्यामुळें, आपल्यामागें आपलें राज्य दत्तकाच्या नांवानें चालेल या भरंवशावर बिचाऱ्यानें प्राण सोडला. बिचारे प्रतापसिंह महाराजही अखेरपर्यंत इंग्रजांच्या न्यायीपणाच्या लौकिकावर विश्वासून होते. आपल्या हयातींत अनुकूल निकाल लागला नाहीं; तरी आपल्याला नाहीं, तर निदान आपल्या मुलाला साताराच्या गादीवर बसवून केलेल्या अन्यायाचें प्रायश्चित्त इंग्रज घेतील, या भरंवशावर राहूनच त्यांचेंही काशी येथें देहावसान झालें. गादीला याप्रमाणें एका-ऐवजीं दोन वारस होते; परंतु साताराचें राज्य अखेर खालसा करण्यांत आलें. प्रतापसिंहाला गादीवरून पदच्युत केलें असल्यामुळें त्यांच्या मुलाचा गादीवर हक्कच लागू होत नाहीं; कारण पदच्युत झाल्यानंतर त्यांनीं दत्तक घेतला, आणि आप्पासाहेबांना दत्तक पुत्र घ्यावयास आम्ही मुळींच परवानगी दिली नव्हती, सबब तोही दत्तक वारस नव्हे, असा कंपनी सरकारचा अभिप्राय पडला. सातारा संस्थानला याप्रमाणें कोणींच कायदेशीर वारस उरला नसल्यामुळें, संस्थान खालसा करून इंग्रजी राज्यांत सामील करून घेण्यांत आलें. किती योग्य व मासलेवाईक न्याय हा !

आप्पासाहेबांनीं घेतलेला दत्तक मंजूर करण्याबद्दल त्या वेळचे रेसिडेंट फ्रेअर व मुंबईचे गव्हर्नर सर जार्ज क्लार्क यांनीं जोराची शिफारस केली, परंतु त्या शिफा-रशीचा कांहींच उपयोग झाला नाहीं. दत्तविधानाच्या कायदेशीरपणाची डलहौ-सीनें केलेली चर्चा वरपांगीची होती. त्याचें खरें हृद्गत, त्यानें सातारा खालसा करण्यासंबंधींचा ३० आगष्ट १८४८ रोजीं जो खलिता लिहिला, त्यांतील १८ ते २१ या कलमांत वाचावयास मिळतें. 'पेशवाईचा नुक्ताच लोप झाला असल्यामुळें, इंग्रजी सत्तेला महाराष्ट्राचा पाठिंबा मिळावा म्हणून १८१८ सालीं सातारा संस्थान अबाधित राखणें जरूरीचें व शहाणपणाचें असेल, नव्हे होतें. त्याबद्दल त्या वेळचे इंग्रज अधिकारी प्रशंसेस पात्र आहेत. परंतु पेशवाई आपल्या ताब्यांत येऊन तीस वर्षें आतां लोटलीं आहेत, आणि प्रजा देखील कोणताही दंगाधोपा न करतां शांतपणें नांदत आहे. त्यामुळें सातारा संस्थान हल्लीं पूर्वीप्रमाणें अबाधित राखण्याचें कोणतेंच कारण उरलें नाहीं. इंग्रजी राज्य आतां मजबूत झालें असून शिंदे-होळकर निरुपद्रवी बनले आहेत. तेव्हां शिवाजीच्या वंशजांचें हें बुजगावणें यापुढें ठेवण्यांत कांहींच मतलब नाहीं.'

सातारा संस्थान अखेर खालसा झालें. इंग्रजांचें उत्पन्न वाढलें. त्यांच्या राज्यामधील एक संस्थानी कुंपण नष्ट होऊन मुंबई इलाखा सलग झाला! यापेक्षां दुसरा फायदा काय बघावयाचा? डलहौसीची प्रशंसा झाली. सातारा खालसा झाल्याचें वर्तमान ऐकून बोर्डाच्या अध्यक्षानें समाधान व्यक्त केलें. त्यानें डलहौसीला लिहिलें, 'रंगो बापूजीचा मित्र जार्ज थामसन हा दत्तकासंबंधी येथें चळवळ करीत आहे. परंतु माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत साताऱ्याचें नांव देखील मी ऐकूं इच्छीत नाहीं.' प्रतापसिंह व आप्पासाहेब याच्या मृत्यूनंतरही दत्तक वारसा संबंधीं रंगो बापूजी खटपट करीत १८५३ पर्यंत इंग्लंडांतच राहिला. परंतु माशानें एकदां गिळलेलें माणिक परत कसें मिळणार? साताऱ्याचें खालसा झालेलें राज्य प्रतापसिंह महाराजांच्या वारसांना मिळून त्यांच्या बाबतींत झालेला अन्याय तर दूर झाला नाहींच, परंतु त्यांची खासगी इस्टेटदेखील त्यांना मिळाली नाहीं. जार्ज थामसन, जोसेफ ह्यूम व जान सुलीवान यांनीं शक्य तितका प्रयत्न केला, परंतु व्यर्थ. ब्रिटिश न्यायदेवता साताराच्या बाबतीत कायमची आंधळी झाली होती.

इकडे प्रतापसिंहाच्या राणीजवळचें द्रव्य संपून तिला खाण्याची ददात पडली! तेव्हां तिनें गव्हर्नर जनरलकडे नेमणुकीकरितां अर्ज केला. साताराच्या गादीवरील हक्क पूर्णपणें सोडून देणें, आणि न्याय मिळविण्याकरितां इंग्लंडांत चालविलेली चळवळ बंद करून रंगो बापूजीस परत बोलावून घेणें, या दोन अटींवर तीस हजार रुपये सालिना नेमणूक, तिला व तिच्या मुलाला मिळून डलहौसीनें चालू केली. नाइलाजामुळें राणीला या दोन्ही दुःखदायक अटी मान्य कराव्या लागल्या! रंगो बापूजीस परत बोलावण्यांत आलें!

चवदा वर्षें विलायतेंत सारखी चळवळ करून रंगो बापूजी द्रव्यानें व प्रकृतीनें खंगून १८५३ सालीं हिंदुस्थानांत परत आला. महाराज पदच्युत झाल्यानंतर व विशेषतः त्याच्या मृत्यूनंतर, त्याला हिंदुस्थानांतून द्रव्याची फारशी मदतही मिळाली नाहीं. परंतु प्रसंगविशेषीं गांठीचे खासगी पैसे सोडून त्यानें विलायतेंत सातारा प्रकरणीं नेटाचा झगडा चालू ठेवला होता. परंतु राणीच्या हुकुमानें त्याला हिंदुस्थानांत परत येणें भाग पडलें. विलायतेंतील त्याच्या अनेक मित्रमंडळींनीं व चहात्यांनीं, त्याला एक सुंदर चांदीचें तबक आपली नांवें कोरून अत्यंत प्रेमादरपूर्वक नजर केलें. त्याला यश आलें

नाहीं हा त्याचा दोष नव्हे. पार्लमेंटांत प्रश्न व ठराव आणवणें, बोर्डाच्या सभेंत प्रश्न व ठराव आणवणें, ओव्हान्सवर खटला करावा ही मागणी करणें, वर्तमानपत्रांतून लेख लिहिणें, पार्लमेंटांतील सभासद अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न करणें, जाहीर व्याख्यानें देणें, पार्लमेंटच्या नव्या निवडणुकीच्या वेळीं मतदारांपुढें तो प्रश्न मांडणें, वगैरे सर्व प्रकारची सनदशीर चळवळ त्यानें त्या वेळीं करून पाहिली. यामुळें प्रभू जातीला ललामभूत असणाऱ्या या चतुर, बुद्धिमान्, देशाभिमानी व राजनिष्ठ मुत्सद्याचें जितकें कौतुक करावें तवढें थोडेंच. हा इंग्लंडला प्रथम गेला तेव्हां याला इंग्रजी येत नव्हतें. परंतु आपल्या कर्तबगारीनें इंग्रजी भाषेचें ज्ञान उतार वयांत संपादन करून, त्यानें ही विलक्षण चळवळ केली. १८३९ ते १८५३ हा त्याच्या चळवळीचा जुना काळ लक्षांत घेतां, त्याच्याविषयीं वाटणारा आदर सहस्रपटीनें वृद्धिंगत होतो. सनदशीर राजकीय चळवळीचा आद्यजनक म्हणून त्याचें नांव अखिल हिंदुस्तानच्या इतिहासांत सदोदित गाजेल.

रंगो बापूजीच्या अविश्रांत श्रमानें सातारा प्रकरणांतील राजकीय कागदपत्र पार्लमेंटनें प्रसिद्ध करविले. त्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीची संस्थानिकांशीं कोणत्या प्रकारें वागण्याची राजनीति असे, या गोष्टीवर सूर्यप्रकाशाइतका स्वच्छ प्रकाश पडला आहे. राजकीय खात्यांतले ( Political Department ) कागदपत्र नेहमीच गुप्त ठेवण्यांत येतात. त्यामुळें अंतस्थ कारस्थानांचा इतिहासकाराला फारसा सुगावा लागत नाहीं. अनुमानानें त्याला चालावें लागतें. परंतु सातारा प्रकरणाच्या निमित्तानें तरी, कंपनीचीं संस्थानिकांशीं चाललेली कुटिल कारस्थानें थोड्या फार प्रमाणांत उघडकीस आलीं, हा रंगो बापूजीचा इतिहासकारांवर उपकारच होय. कारण त्यामुळें बाकीच्या संस्थानांतील तत्कालीन भानगडी समजून घेण्याची किल्ली त्यांच्या हस्तगत झाली, व कंपनीची कुटिलता चवाठ्यावर आली.

## प्रकरण ३ रें.

# पंजाब–प्रकरण.



रणजीतसिंहाला **पंजाबचा सिंह** हें जें नांव मिळालें होतें, तें अगदीं यथार्थ होतें. पंजाबमध्यें मुसलमानांची लोकसंख्या निम्मेपेक्षां अधिक आहे; आणि उरलेल्या लोकसंख्येंत हिंदु व शीख समाविष्ट होतात. शीख लोकांचें संख्याबल अतिशय अल्प असतांना देखील, लष्करी धर्तीच्या त्यांच्या धार्मिक संघटणामुळें पंजाबमध्यें शिखांचें राज्य स्थापन झालें. परंतु रणजीतसिंगासारखा अत्यंत कुशल व तडफदार सेनानायक शीख लोकांना मिळाल्यामुळें, हें यश अतिशय सुलभ रीतीनें त्यांच्या पदरीं पडलें, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. यश मिळविण्याकरितां शिपाई उत्साही व शूर लागतातच, परंतु त्यांचा अधिपतीही तितकाच मुत्सद्दी व शूर असावा लागतो. नेता जर धुरंधर नसेल तर सुकाणूं नसलेल्या जहाजाप्रमाणें सैन्याची स्थिति होते. पंजाबमधील मुसलमानांवर रणजितसिंगानें मात केली, इतकेंच नव्हे, तर खैबरघाटापलीकडील आडदांड अफगाणांनाही त्यानेंच प्रथम हात दाखविला. हिंदूंवर व हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून त्यांना जेरीस आणावयाचें व त्यांचा मुलूख पादाक्रांत करावयाचा, एवढी एकच गोष्ट हजारों वर्षांपासून अफगाणांच्या आंगवळणी पडली होती. 'अफगाण हिंदुस्थानावर स्वारी करून आला कीं तो जिंकावयाचाच!' असा जणूं काय त्रिकालाबाधित सिद्धांत स्थापन झाला होता. पराक्रमी व चिवट अशा इंग्रजांनादेखील अफगाणांचा खराखुरा पराभव कधींच करतां आला नाहीं. कधीं थोडेंसें चुचकारून, तर कधीं लष्करी दडपशाहीचा धाक घालून, तर कधीं वार्षिक खंडणीची लालूच दाखवून अफगाणांशीं सख्य करणें त्यांना इष्ट वाटलें. पूर्ण चिकाटी आंगीं असतांनाही अफगाणांचा इंग्रज पराभव करूं शकले नाहींत. त्यांच्याशीं दोस्ती जोडणें त्यांना इष्ट वाटलें; आणि या दोस्तीकरतांच अफगाणांच्या अमीराला सार्वभौम इंग्रजसरकार वार्षिक खंडणीही देऊं लागलें. या खंडणीला कधीं रशियाचा तर कधीं जर्मनीचा बागुलबुवा आधार म्हणून दाखविण्यांत येत असे [झारशाही व कैसरशाही उलटून पडल्या, तरी बोल्शेविकांच्या मतप्रसारांच्या भीतीनें, निदान त्या पांघरुणाखालीं झाकून अफगाणांच्या अमीराला दिला जाणारा वार्षिक मलिदा अजूनही चालूच आहे.] हिंदुस्थानच्या सरहद्दीवर असलेल्या अत्यंत डोंगराळ व

जाण्यास दुर्गम अशा प्रांतांत, या राकट लोकांची वस्ती असल्यामुळें त्यांना कायमचें जिंकणें इंग्रजांना दुरापास्त झालें आहे. इंग्रजी सत्ता त्यांना प्रसंगविशेषीं नमवूं शकते; परंतु कायमची जिंकूं शकत नाहीं. चिकट व चिवट इंग्रजांना जें कार्य साधलें नाहीं, तें कार्य आपल्या लहानशा कारकीर्दीतच रणजितसिंगानें करून दाखविलें. त्यानें मुसलमानी सत्तेच्या प्रसाराला चांगलाच लगाम घातला. मुसलमानी सत्तेला दक्षिणेंतून मराठ्यांनीं जसा पायबंद घातला, तसाच त्या सत्तेला लगाम घालण्याचा मान उत्तरेकडे शीखांना मिळाला. मुसलमानांच्या बहुसंख्याक प्रदेशांत रणजितसिंगानें आपलें राज्य स्थापन केलें एवढेंच नव्हे, तर हिंदुस्थानच्या बाहेरील अफगाण लोकांनाही त्यानें चांगलाच हात दाखवून, हिंदुस्थानची अनेक पिढ्यांपूर्वी अफगाणांनीं नेलेली लूट त्यानें स्वसामर्थ्यानें परत हिंदुस्थानांत आणली, व लाहोरचें वैभव वाढविलें.

रणजितसिंह जसा शूर होता तसाच तो अव्वल दर्जाचा मुत्सद्दी होता. इंग्रजांशीं त्याचें नातें स्नेहाचें होतें. हाच स्नेहसंबंध त्यानें अखेरपर्यंत टिकविला. इंग्रजांशीं स्नेहसंबंध जोडण्यांत थोडासा स्वार्थाचाही प्रकार होताच. कारण मुसलमान लोकांनीं व त्यांच्या बादशहांनीं शीख लोकांचा व त्यांच्या धर्मगुरूंचा जो अतोनात छळ केला, त्यामुळें शीखांच्या मनांत मुसलमानांविषयीं कायमची अढी बसली होती. मुसलमानांना शीख लोक आपले कट्टे शत्रू समजत असत. रणजितसिंगाच्या नेतृत्वाखालीं जेव्हां शीख लोकांचा उदयकाळ झाला, तेव्हां मुसलमानांना झोडपून त्यांच्या सत्तेचा नायनाट करावयाचा हेंच शीख लोकांचें व रणजितसिहाचें ध्येय ठरलें होतें. पंजाब, जम्मू, काश्मीर व मुलतान हे प्रांत आपल्या पंजाखालीं रणजितसिंग व त्याचे शीख लोक घेत असतां, मुसलमानांच्या बंगाल, बिहार, अलाहाबाद, अयोध्या, लखनौ, दिल्ली या प्रांतांत मुसलमानी सत्तेला इंग्रजांनीं शह देणें, राजकारणाच्या दृष्टीनें रणजितसिंगास इष्ट होतें, आणि म्हणूनच त्यानें इंग्रजांशीं स्नेहसंबंध जोडला व तो शेवटपर्यंत टिकविला. इंग्रजांनाही उलट पक्षीं हा स्नेहसंबंध इष्टच होता. हिंदू व मुसलमान या दोघांचाही पराभव करून, हिंदुस्थान स्वतांच्या पंजाखालीं आणून नंतर आपली सत्ता तेथें दृढ करण्यासाठीं, त्यांना सवड हवीच होती. रणजितसिंगाशीं स्नेहसंबंध जोडल्यामुळें उत्तरेकडच्या सरहद्दीवरील त्यांचा बंदोबस्त परभारेंच पार पडला. आडदांड अफगाण लोकांचें व त्यांच्या हल्ल्यांचें भय बाळगण्याचें इंग्रजांना कारण उरलें नाहीं. कारण त्यांचा समाचार घेण्याकरितां महापराक्रमी

रणजितसिंह सज्जच होऊन बसला होता. पाहुण्याच्या हातून परभारें साप मारून घराचें रक्षण करण्याची त्यांची युक्ति चांगलीच फळाला आली. परंतु रणजित-सिंहाच्या मृत्यूनंतर पंजाबांत निराळीच परिस्थिति उत्पन्न झाली. शीख लोकांचें शौर्य लवमात्रही कमी झालें नव्हतें; आणि रणजितसिंहानेंही आपल्या आमदानींत मुसलमानांना सडकून मार दिला असल्यामुळें, त्यांना डोळा वर करण्याची हिंमतही उरली नव्हती. परंतु महाराज रणजितसिंह वारले तेव्हां त्यांचा मुलगा आणि गादीचा वारस दिलीपसिंह हा अतिशयच लहान होता. त्यामुळें त्याच्या नांवानें पंजाबांत सत्ता कोणी चालवावी, याबद्दल निरनिराळ्या शीख सरदारांत भांडणें उत्पन्न झालीं. कारण महाराज दिलीपसिंह बालवयी असल्यामुळें, जो कोणी शीख सरदार त्यांचा पालनकर्ता व मुख्य मंत्री होणार तोच, निदान ते वयांत येईपर्यंत पंजाबचा राज्यकारभार चालविणार. त्याच्या सत्तेखालींच इतर शीख सरदार व शीखांना वागणें भाग होतें. प्रधान मंत्र्याच्याच जागेवर नव्हे तर खुद्द सिंहासनावर देखील आपला वारसा सांगणारे अनेक उमेदवार त्यावेळीं उभे राहिले. हुशार इंग्रजांनीं आपल्या नेहमींच्या धोरणाला अनुसरून या दुहीचा फायदा घेतला, व आपलें बोट पंजाबच्या कारभारांत शिरकवलें. शीख सरदारांतील तेजसिंह व राजे लालसिंह यांना आपल्या बाजूला वळवून घेऊन बाकीच्या शीखांचा इंग्रजांनीं पराभव केला. ज्याप्रमाणें मिरजाफर आपली सेना घेऊन क्लाइव्हला मिळाला व सिराजउद्दौल्याचा पराभव करून प्लासीची इतिहास प्रसिद्ध लढाई इंग्रजांनीं जिंकिली, तोच प्रकार शीखांच्या बाबतींत सोब्राहन येथें घडून आला. त्या लढाईनंतर झालेल्या तहामुळें सतलज व रावी नदीमधील प्रांत इंग्रजांच्या खास अमलाखालीं आला आणि लढाईच्या खास खर्चाकरितां म्हणून दीडकोट रुपयांची खंडणी पंजाबवर बसविण्यांत आली. महाराज रणजितसिंह वारले तेव्हां खजिन्यांत बारा कोटी रुपये शिल्लक होते; परंतु त्यांच्यामागें शीख सरदारांची व नामधारी राजांची जी आपसांत यादवी सुरू झाली होती, तींत हा सर्व खजिना उधळला गेला व तह झाला त्यावेळीं सरकारी खजिन्यांत फक्त पन्नास लक्ष रुपये शिल्लक होते. ते रुपये तर इंग्रजांनीं घेतलेच, परंतु उरलेल्या एक कोट रुपयांसाठीं रणजितसिंहाचे प्रियमित्र व जम्मूचे मांडलीक राजे गुलाबसिंह यांना काश्मीर प्रांत विकण्यांत आला. गुलाबसिंहापासून खंडणीचे एक कोट रुपये इंग्रजांनीं वसूल केले, आणि हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवावें त्याप्रमाणें महाराज रणजितसिंहाच्या राज्यांतील काश्मीरप्रांताचें उदक राजा गुलाबसिंहाच्या हातावर सोडण्यांत आलें. राजा गुलाबसिंहाचा विलक्षण फायदा झाला व यामुळें

इंग्रजांचा तो मित्र झाला व पंजाबदरबारीं असलेली त्याची पूर्वीची मैत्री साहजीकच संपुष्टांत आली. लालसिंह वगैरे पंजाबांतील शीख सरदारांना ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं. महाराज रणजितसिंहाच्या राज्यांतील एका सुंदर प्रांताचें इंग्रजांनीं परभारें राजा गुलाबसिंहाच्या हातावर उदक सोडावें, व पंजाबची शक्ति कमी करावी ही गोष्ट त्यांना आवडली नाहीं. त्यावेळचा काश्मीरचा सुभा इमामुद्दीन याला, लाहोर दरबारच्या मंत्रीमंडळातर्फे सरदार लालसिंहानें काश्मीरचा कब्जा राजा गुलाबसिंहाला न देण्याविषयीं फर्माविलें. परंतु इंग्रजांच्या पाठबळामुळें व त्यांच्या झालेल्या ससैन्य कुमकेमुळें राजा गुलाबसिंहाला काश्मीरचा कब्जा अखेर मिळालाच. तहाच्या अटी मोडल्याबद्दल लालसिंहाची एका कमिशन मार्फत चौकशी झाली. विश्वासघातकी व बंडखोर असा छाप त्याच्यावर मारयांत आला आणि पेन्शन देऊन राजकैद्याप्रमाणें लालसिंहाला आग्रा येथें पाठविण्यांत आलें.

मंत्रीपदावरून लालसिंहाची हकालपट्टी झाल्यावर, इंग्रजांनीं आपल्या पक्षाच्या शीख सरदारांची एक पालक कमिटी (Council of Regency) नेमली, व आपला एक रेसिडेंन्ट लाहोर येथें नेमून त्याला त्या कमेटीचा अध्यक्ष केलें. गादीचे मालक महाराज दिलीपसिंह अज्ञान असल्यामुळें, शीख सरदारांत उत्पन्न झालेली बंडाळी मोडण्याकरितां व राज्याची नीट व्यवस्था करण्याकरितां म्हणून ही नवी योजना अमलांत आणली गेली. रणजितसिंहाचे जुने व नेकीचे मित्र म्हणून इंग्रजांनीं आपला रेसिडेन्ट तेथें नेमला व त्याला त्या कमिटीचें अध्यक्षस्थान देऊन पंजाबचा राज्यकारभार अज्ञानाचे वतीनें आपले शिरावर घेतला. इंग्रजांचें असें म्हणणें होतें कीं, आमचे परमप्रिय दोस्त महाराज रणजितसिंह यांच्या स्नेहाखातर त्यांच्या एकुलत्या एका मुलाच्या रक्षणासाठीं आम्हीं पंजाबांत आलों, आणि त्याच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याकरितां तो सज्ञान होईपर्यंत त्याच्या राज्याचा भार आमच्या शिरावर घेतला. परंतु इंग्रजांची ही मैत्री सतलजरावीमधील पंजाबचा प्रांत आपल्या राज्यांत सामील करून घेऊन आणि काश्मीरप्रांत आपला दोस्त राजा गुलाबसिंह याला देऊन, नंतरच महाराज दिलीपसिंहाच्या उपयोगीं पडली. पंजाबचे दोन सुपीक प्रांत महाराज दिलीपसिंहाच्या शासनाखालून नाहींसे झाले व राजा गुलाबसिंहासारखा पूर्वापार मित्र स्वार्थामुळें व इंग्रजी कपटनीतीमुळें पारखा झाला. इंग्रजी रेसिडेन्टच्या अध्यक्षतेखालीं अज्ञानाचा राज्यकारभार चालूं लागला. पण अजूनही एक विघ्न होतें. राजा गुलाबसिंह लाहोरहून दूर झाला व इंग्रजांचा मित्र बनला, आणि सरदार लालसिंह बंडखोर म्हणून आग्रा येथें दूर ठेवण्यांत आला, परंतु

महाराज रणजितसिंहाची वीरपत्नी व महाराज दिलीपसिंहाची वीरमाता महाराणी जिंदा अजून तेथेंच होती. दिलीपसिंहानें इंग्रजांच्या हातांतील बाहुलें बनावें ही गोष्ट तिला आवडणें शक्य नव्हतें. रणजितसिंहाच्या पराक्रमाची तिला पूर्ण ओळख होती. पंजाबचें वैभव दिवसेंदिवस नष्ट होत चाललेलें बघून त्या मानिनीचें अंतःकरण दुभंग झालें. तिचें लक्ष पंजाबच्या यशोगौरवाकडे, तर इंग्रज रेसिडेन्टचें लक्ष इंग्रजांच्या हिताकडे; या दोहोंत मेळ कसा बसणार ? उत्तर दक्षिण ध्रुवाला एका ठिकाणीं कसें आणतां येईल ? महाराणी जिंदा दिलीपसिंहाची आईच होती, तेव्हां तिच्या उपदेशामुळें कुमार दिलीपसिंहाचें बालमन देखील प्रसंगविशेषीं उत्तेजित होई, व इंग्रजांच्या हातांतील बाहुलें होऊन बसण्याचें व त्यांच्या आज्ञेप्रमाणें अधिकाराचें नाटक करण्याचें व त्यांच्या तंत्रानें कागदावर सह्या करण्याचें त्यानें नाकारलें. प्रेसिडेंट व महाराणी यांच्यांत यामुळें वांकडें येऊं लागलें. या दोन्ही तरवारी एका म्यान्यांत राहाणें शक्य नव्हतें. महाराणीची वाटेल तशी बदनामी अधिकाऱ्यांच्या प्रेरणेनें होऊं लागली. अखेरीस, महाराज दिलीपसिंहाची कायद्यानें प्रस्थापन झालेली सत्ता व त्यांची पालक कमिटी आणि इंग्रजी रेसिडेन्ट, या सर्वांच्या विरुद्ध बंड करण्याचा आरोप महाराणीवर ठेवण्यांत आला; आणि तिला कैद करून शेखपुरा नांवाच्या मुसलमानी मोहल्यांत ठेवण्यांत आलें. महाराणीवर केलेला आरोप राजकीय व गुप्त स्वरूपाचा होता, त्यामुळें त्याची उघड चौकशी अर्थातच झाली नाहीं. आपल्या पुत्राच्या नांवानें आलेला बंदीचा हुकूम महाराणीनें शिरसामान्य केला व ती कैदखान्यांत राहावयास गेली. महाराज दिलीपसिंहाचें प्रेमाचें व हिताचें स्थान याप्रमाणें बालवयांतच असूनही नाहींसें झालें, आणि इंग्रजी रेसिडेन्टला मनमानेल तसें वागण्याची मुभा मिळाली.

त्या वेळीं मुलतानप्रांत हा देखील पंजाबचाच एक सुभा होता. मुलतानचा अधिकारी सुभेदार सरदार सावनमल याचा शत्रूंनीं खून केला, तेव्हां त्याचा मुलगा मूलराज हा तेथील मुख्य अधिकारी नेमण्यांत आला. लाहोर दरबार या वेळीं इंग्रज बनिया कंपनीनें नेमिलेल्या रेसिडेंटाच्या ताब्यांत होतें. कोणत्या तरी युक्तीनें पैसे वसूल करून खजिन्यांत भर टाकावयाची, आणि न्यायअन्यायाकडे फारसें लक्ष न देतां व्यापारांत नफा दाखवून कपनीच्या विलायतेंतील डायरेक्टरांना खूष करावयाचें, ही एकच गोष्ट त्या वेळचे हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकारी जाणत होते. कंपनीच्या भागीदारांना त्यांनीं घातलेल्या भांडवलावर चांगला नफा झाला म्हणजे कंपनीचे डायरेक्टर खूष होत, व आपल्या हाताखालच्या

अधिकाऱ्यांनीं हिंदुस्थानांत केलेल्या न्यायअन्यायाकडे फारसें लक्ष देत नसत. कंपनीच्या हातांतील तागडी जाऊन त्या जागीं राजदंड आला, तरी हें जुनें बनियागिरीचें धोरण सुटलें नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीच्या भागीदारांना सपाटून नफा मिळेल व ते खूष राहतील अशाच रीतीनें हिंदुस्थानचा राज्यकारभार करावयाचा, असें त्या वेळच्या इंग्रजी अधिकाऱ्यांचें धोरण असे. त्यामुळें प्रजेवर जुलूम झाला किंवा इतरांचे न्याय्य हक्क मारले गेले, तरी त्याची अधिकाऱ्यांना फारशी पर्वा वाटत नसे. अशा बनिया वृत्तीच्या इंग्रज रेसिडेंटचे हातीं लाहोर दरबारचीं त्या वेळीं सूत्रें होतीं. सावनमल्लाची जागा त्याचा मुलगा मूलराज याला देतांना त्याच्यापासून दरबारतर्फे तीस लाख रुपये नजराणा मागण्यांत आला. वास्तविक सावनमल्लानें दरबारचा खंड वेळच्यावेळीं भरून, मुलतानप्रांताची कालवे वगैरे काढून अतिशय भरभराट आपल्या दीर्घकालीन सुभेदारींत केली होती. त्यामुळें त्याची सुभेदारी त्याच्या मुलाला वहिवाटीप्रमाणें देतांना इतका जबर नजराणा मागणें रास्त नव्हतें. शिवाय सुभ्याची वार्षिक खंडणीही १८ लाखांवरून ३० लाखांवर नेऊन ठेवण्याचा रेसिडेंटचा विचार होता. ही कुणकुणही मूलराजाला लागली होती. परंतु हा अवास्तव नजराणा भरण्याचें सामर्थ्य मूलराजांत नव्हतें किंवा तो भरण्याची त्याची इच्छा नव्हती, किंवा दरबारनें सरकारी खंड वाढविल्यामुळें त्याला तो भरणें अशक्य झालें. कोणत्याही कारणामुळें कां असेना, त्यानें आपल्या जागेचा राजीनामा देण्याचें ठरविलें. दरबारनें ताबडतोब त्याचा राजीनामा मंजूर केला, व त्याच्या वंशपरंपरागत जागीं सरदार खानसिंहाची नवीन नेमणूक केली. रेसिडेंटच्या हुकमतींत वागणाऱ्या दरबारनें सरदार खानसिंहाला मिस्टर ॲग्नू व लेफ्टनेंट ॲंडरसन यांच्यासमवेत पांचशें शिपाई देऊन मुलतानकडे रवाना केलें. ही सर्व मंडळी मुलतानला पोंचली, तेव्हां मूलराजानें त्यांच्याशीं कोणत्याही प्रकारचा विरोध न दर्शवितां त्यांचा उत्तम प्रकारें आदरसत्कार केला. मूलराजानें त्यांना आपल्या किल्ल्यांत नेलें व सर्वांसमोर सरदार खानसिंहाच्या हवालीं सर्व अधिकार केले.

परंतु काय झालें असेल तें असो. मूलराजासारखा कर्तबगार व लोकप्रिय, आणि सर्व जन्म मुलतानमध्यें गेलेला सुभेदार जाऊन हा भुरटा चोर यावा हें तेथील लोकांना व प्रजेला रुचलें नसावें. या मंडळीवर मुलतानच्या फौजेनें एकाएकीं हल्ला केला व इंग्रज अधिकारी मारले गेले. ही बातमी लाहोरदरबारला समजतांच त्यांनीं मूलराजाला या अपराधाबद्दल दोषी ठरविलें व त्याच्यावर स्वारी करून

त्याला शिक्षा लावण्याचा निश्चय केला. त्या वेळचे लाहोर दरबार म्हणजे तेथील इंग्रज रेसिडंट सर फ्रेडरिक केरी हेच होते. कारण महाराजांच्या पालककमिटीचे ते अध्यक्ष असल्यामुळें त्यांची सत्ता अमर्याद होती. परंतु मूलराजाचा अपराध काय ? मुलतानमध्यें दोन इंग्रज मारले गेले हें खरें. सरदार सावनमल्लानंतर मूलराजाचा मुलतानाच्या सुभेदारीवर हक्क असतां, त्याला दरबारच्या व इंग्रजी रेसिडेंटाच्या अमर्याद नजराण्याच्या मागणीमुळें ती सोडावी लागली, व सरदार खानसिंह हा भुरटा इसम तेथें आला, हें पाहून मुलतानमधील कांहीं उतावळ्या इसमांचें पित्त भडकलें व त्यांनीं सरदार खानसिंह व त्यांचे दोन इंग्रज सहाय्यक यांच्यावर हल्ला केला. पण यांत मूलराजाचें अंग दिसत नाहीं. त्याच्या मनांत पाप आलें असतें, तर त्यानें नव्या सुभेदाराला व त्याच्या बरोबरच्या लोकांना किल्ल्यांत नेऊन सर्व अधिकार व लष्करी सामुग्री त्यांच्या स्वाधीन केलीच नसती. तो खात्रीनें इतका मूर्ख नव्हता. त्याच्या लोकप्रियतेमुळें, तो अधिकारभ्रष्ट झालेला पाहून लोक चवताळले व त्यांनीं खानसिंह व त्याचे दोन प्रमुख साथीदार यांच्यावर हल्ला केला; याबद्दल मूलराजाला कसा दोष देतां येणार ? उलट ते इंग्रज जखमी झालेले पाहून त्यानें त्यांना किल्ल्यांत नेलें व त्यांची शुश्रूषा केली. त्यांना झालेल्या जखमा भयंकर स्वरूपाच्या असल्यामुळें ते त्यांतून बरे झाले नाहींत; ही गोष्ट निराळी. मि. ॲग्नू व लेफ्टनंट ॲंडरसन् हे जेव्हां जखमी झाले, तेव्हां त्यांनीं मुलतानवरून सेनापति कोर्टलंड यांना मदतीसाठीं पत्र लिहिलें होतें. त्यांत देखील त्यांनीं झालेल्या प्रकाराबद्दल मूलराजाकडे दोष येत नाहीं असेंच लिहिलें होतें. हें पत्र बन्नू येथील किल्लेदार एडवर्डस याच्या हातीं लागलें. त्यानें रेसिडेंटकडे एकंदर वर्तमान लिहून पाठविलें व आपण मदतीकरितां मुलतानला जाण्यास निघाला. परंतु रस्त्यांतच ॲग्नू व ॲंडरसन् वारल्याची बातमी त्याला मिळाली. त्याबरोबर त्याचा संताप अनावर झाला, आणि मुलतानवर हल्ला करून मूलराजाला शिक्षा करण्याचा त्यानें निश्चय केला. रेसिडेंटसाहेबांनीं एडवर्डसचा पाठपुरावा केला. परंतु हिंदुस्थानचे सर सेनापती लार्ड गफ या गोष्टीला मंजूरी देईनात. तरी देखील सर फ्रेडरिक केरी यांचा निश्चय कायम झाला. मुख्य सेनापती लार्ड गफ यांची आज्ञा धाब्यावर बसवून, मूलराजाला शिक्षा लावण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यानें बंडखोर म्हणून मूलराजाची सर्व संपत्ति सरकारजमा केली, आणि मागल्या दहा वर्षांचा हिशोब त्याच्याजवळ मागितला. मूलराजानें सरळ उत्तर दिलें कीं, मी आपल्या वेळच्या हिशोबाची झडती देऊं शकेन. परंतु

वडिलांच्या वेळचा हिशोब मला देतां येणार नाहीं. कारण मध्यंतरीं झालेल्या धामधुमीमुळें ते कागद ठिकाणावर नाहींत.' अखेर त्यानें मोठ्या नम्रतेनें रसिडेंटला लिहिलें कीं 'मी सर्वस्वीं आपला ताबेदारच आहें.' नवीन सुभेदाराला बिचाऱ्यानें सर्व दिवाणीदप्तरें दिलीं इतकेंच नव्हे, तर सरळ मनानें तोफा, बंदुका व काडतुसेंही त्याच्या स्वाधीन केली. परंतु दोन इंग्रज सैनिक तेथें मारले गेले एवढयाच सबबीमुळें त्याचें म्हणणें कोणाला रुचेना व तोच गुन्हेगार ठरला. मग करणार काय? आपली अब्रू व आपल्या मानसन्मानाकरितां त्याला लढाईस सज्ज होणें भाग होतें. कारण सर सेनापतींची आज्ञा देखील खुशाल धुडकावून लावणारे रेसिडेंट केरी त्या वेळीं लाहोर दरबारचे सूत्रचालक होते.

पंजाबप्रांत कोणत्या तरी निमित्तानें आपल्या राज्याला जोडण्याचा इंग्रजांचा निश्चयच झाला होता असें दिसतें. ज्या वेळीं हिंदुस्थानांत इंग्रजांची सत्ता दृढ झाली नव्हती, त्या वेळीं त्यांना शीख लोकांच्या मैत्रीची फार जरूरी भासत होती. परंतु हिंदु व मुसलमान या दोघांवरही कुरघोडी करून इंग्रजांची सत्ता या सुमारास स्थिर झाली होती, आणि तिला कोणतीच भीति उरली नव्हती. अशा वेळीं शीख लोकांसारखे शूर, पराक्रमी व धार्मिक संघटनेनें एकवटलेलें राष्ट्र स्वतंत्र राहणें इंग्रजांना इष्ट वाटत नव्हतें. महाराज रणजितसिंहाच्या मृत्यूनंतर त्यांचे मित्र व महाराज दिलीपसिंहाचे पालक म्हणून त्यांनीं संधी साधून पंजाबांत पाऊल तर टाकलेंच. तेव्हां कोणत्या ना कोणत्या तरी सबबीवर, महाराज दिलीपसिंह वयांत येऊन आपला राज्यकारभार पाहूं लागावयाच्या पूर्वींच पंजाबप्रांत घशाखालीं उतरवण्याचा इंग्रजांचा बेत झाला होता असें दिसतें. लॉर्ड एलीनबरो व हार्डीज यांचा या प्रकरणासंबंधीं पत्रव्यवहार वाचून पहावा. एडवर्डस व कनिंगह्याम या दोघांही प्रसिद्ध लेखकांनीं पंजाब प्रकरणांतील इंग्रजांचा सावळा गोंधळ उघडकीस आणला आहे. इंग्रजांनीं शीख सरदार फितविले, व खालसा सैन्याला झोडपून काढलें. इंग्रजांची लष्करी तयारी पूर्ण होईतोंपर्यंत मात्र त्यांनीं मैत्रीचें नाटक चांगलें करून दाखविलें, व आपल्या गुप्त हस्तकांकरवीं तहनाम्याच्या शर्ती मोडवून तो दोष लाहोरच्या शीख दरबारवर टाकण्यास आपण वरपांगी नामानिराळे राहिले. "हिंदुस्थानच्या इंग्रजी राज्याची सतलज नदी ही लष्करी दृष्ट्या सीमा ठरूं शकत नाहीं. तेव्हां पेशावरची सरहद्द इंग्रजांना फार सोयीची पडेल," अशी भाषा एका पत्रांत वापरली आहे. कारण पंजाब व त्यांतील शूर शीख आपल्या हुकमतीखालीं एकदां आले म्हणजे आपली हिंदुस्थानांत

खरीखुरी सावभौम सत्ता स्थापन होईल, ही गोष्ट ते पूर्णपणें जाणून होते. म्हणून या आलेल्या संधीचा त्यांनीं फायदा घेण्याचा निश्चय केला. परंतु एवढें लहान कारण पुरेसें नव्हतें, त्यामुळें मनांत इच्छा असून देखील लार्ड डलहौसीला मुलतानाविरुद्ध स्वारी करण्याचा सल्ला रेसिडेंटाला देतां येईना. कारण मूलराजाशीं इंग्रजांचें वर्तन प्रामाणिकपणाचें कोठें झालें होतें? रेसिडेंटसाहेबांनीं सरसेनापतीप्रमाणेंच गवर्नर जनरलची आज्ञा देखील या बाबतींत गुंडाळून ठेवण्याचा निश्चय केला होता, ही गोष्ट निराळी.

रेसिडेंटसाहेबाला या सुमारास पंजाबमध्यें जिकडे तिकडे दरबारविरुद्ध कट दिसावयास लागले. या कटाचें मूळ महाराणी जिंदा असावें असें त्याच्या मनानें घेतलें. महाराणीचा एकनिष्ठ सेवक गंगाराम व इतर पांच सहा असामींना महाराज दिलीपसिंहाविरुद्ध बंड केल्याच्या आरोपावरून फाशी देण्यांत आलें, आणि आपल्या पुत्राविरुद्ध कट उभारल्याच्या आरोपावरून महाराणी जिंदालाही हद्दपार करण्याचें ठरलें. महाराणीची उघड चौकशी करण्याची जरूरच नव्हती. कारण सर फ्रेडरिक केरीचें ठाम मत बनलें होतें कीं, महाराणी जिंदा दरबारविरुद्ध शीख लोकांना व सरदारांना फूस देत असते. गव्हर्नर जनरलची संमति घेऊन तिला बनारस येथें एका इंग्रज अधिकाऱ्याच्या पहाऱ्यांत कैदी म्हणून ठेवण्यांत आलें, आणि तिच्या अपराधाबद्दल तिचें जडजवाहीर व खाजगी संपत्ति कंपनीच्या वहिवाटीप्रमाणें जप्त करण्यांत आली. तिला पूर्वी खर्चाकरितां तोडून दिलेली दीड लाख रुपयांची वार्षिक नेमणूक, दंडादाखल म्हणून कमी करण्यांत येऊन ती फक्त बारा हजारांवर आणून ठेवली गेली. मे १८४८मध्यें महाराणीला याप्रमाणें शिक्षा करण्यांत येऊन तिचा बंदोबस्त करण्यांत आला. महाराणी जिंदा रणजीतसिंहाची वीरपत्नी होती व पंजाबवर तिचें अतोनात प्रेम होतें. यामुळें देशांतील शीख लोकांचेंही तिच्यावर स्वाभाविकच अतोनात प्रेम होतें व तिला आपली माता समजून ते आपलीं सुखदुःखाचीं गाऱ्हाणीं तिच्याकडे नेत असत. शीख लोकांची तिच्या ठायीं असलेली निष्ठा पाहून तिला पंजाबांतून बाहेर घालवल्याशिवाय इंग्रजांचा जम तेथें बसणार नाहीं, हें सर फ्रेडरिक केरीला कळून चुकलें होतें. त्यामुळें तिच्याविरुद्ध हा कटाचा बागुलबोवा उभारण्यांत आला. टारेन्सनें आपल्या पुस्तकांत स्पष्टपणें असें म्हटलें आहे कीं राणीच्या वाड्याची झडती घेतली, तेव्हां तिचें कटांत आंग असल्याबद्दलचें एखादें चिटोरें किंवा इतर कोणताही पुरावा मिळाला नाहीं. स्वतः केरीला देखील असेंच म्हणावें लागलें कीं, महाराणीचे विरुद्ध जरी कोण-

-ताही पुरावा मिळाला नाहीं तरी ब्रिटिश सरकारचा मानमरातब राखण्यासाठी, तिला पंजाबांतून ताबडतोब दूर करणें जरूर आहे. 'तिचा न्याय करणें इष्ट नाहीं, व तिच्याविरुद्ध पुरावाही मिळूं शकणार नाहीं, परंतु आपली ब्रिटिशांची सत्ता स्थापन करतांना, केवढीही मोठी व्यक्ति आड आली तरी तिला शिक्षा करण्यास आपण कचरलें न पाहिजे,' हीं केरीचीं मुक्ताफळें Punjab Papers मध्यें पहावयास मिळतील. तिला एकदां दूर केलें म्हणजे दिलीपसिंहाला आपल्या हातांतील बाहुलें बनवून वाटेल तसें नाचवितां येईल व मन मानेल तसा कारभार करतां येईल असा केरीला भरंवसा वाटत होता. महाराज रणजितसिंहाच्या मैत्रीचा बदला याप्रमाणें इंग्रजांनीं त्याच्या विधवा राणीला पुरापुरा दिला, व तिला काशी येथें प्रतिबंधांत ठेवलें.

महाराणीच्या या अपमानामुळें शीख फौज अत्यंत संतप्त झाली आणि सर्वत्र शीख लोक इंग्रजांविरुद्ध चवताळले. परंतु महाराज दिलीपसिंहाच्या नांवानें इंग्रज लोक पंजाबचा राज्यकारभार करीत असल्यामुळें, दरबारविरुद्ध शीख लोकांना बंड करतां येईना. त्याच वेळेस आणखी एक घटना घडून आली. त्यामुळें इंग्रजांच्या प्रामाणिकपणाविषयीं सर्वांनाच संशय वाटूं लागला. महाराज दिलीपसिंहाचा हजाऱ्याचे सुभेदार सरदार छत्रसिंह यांच्या नातीशीं विवाह होण्याचें ठरलें होतें. परंतु तिथिनिश्चय होईना. कारण ब्रिटिश रेसिडेंट–जो पालक कमिटीचा अध्यक्ष होता—तो या गोष्टींत कोणताच पुढाकार घेईना. विवाहाचा दिवस लांबणीवर टाकण्याकडे त्याचा कल दिसूं लागला. हा विवाहसंबंध घडून यावा अशी केरीची मनांतून मुळींच इच्छा नव्हती. कारण सरदार छत्रसिंह अतिशय शूर होता व हजारा प्रांताचा तो सुभेदार होता, आणि त्याचा मुलगा सरदार शेरसिंह हा तर सर्व शीख फौजेचा मुख्य सेनापतीच होता. त्या तेजस्वी घराण्याशीं महाराज दिलीपसिंहाचा सोयरसंबंध घडून येणें इंग्रजांच्या दृष्टीनें इष्ट नव्हतें. कारण त्यामुळें शीखांचें संघटन होऊन महाराज दिलीपसिंहाचें सामर्थ्य वाढलें असतें, व मग इंग्रजी राज्याची मर्यादा सतलज नदीच्या पलीकडे कशी रेटली गेली असती! रेसिडेंटच्या या टाळाटाळीचें वर्तमान सरदार शेरसिंहानें आपल्या पित्याला लिहून कळविलें. महाराणी जिंदाच्या हद्दपारीमुळें छत्रसिंहाचें हृदय आधींच व्याकुळ झालें होतें, त्यांत या बातमीची भर पडली. त्यामुळें पंजाबच्या नाशाचीं स्वप्नें त्याला पडूं लागलीं. त्या वेळीं कॅप्टन ॲबट म्हणून एक हलकट मनुष्य केरीचा मदतनीस होता. पंजाबांतील मोठमोठे सरदार तो कस्पटा-

समान रेखीत असे. सरदार ज्वालासिंह व झंडासिंह यांचा त्यानें पूर्वी अपमान केलेला होता. आज तो सरदार छत्रसिंहाचाही अपमान करावयास तयार झाला. सर जॉन लॉरेन्सनें सुद्धां छत्रसिंहाच्या इमानदारीची व प्रामाणिकपणाची प्रशंसाच केली होती. परंतु ॲबटला छत्रसिंहाची वागणूक संशयास्पद दिसूं लागली. खरें पाहिलें तर छत्रसिंह हा हजाऱ्याचा सुभेदार होता, आणि ॲबट त्याच्या दिमतीस दिला होता. तेव्हां छत्रसिंहाच्या आज्ञेंत राहून त्याच्याशीं नम्रपणें वागणें त्याचें कर्तव्य होतें. परंतु तोच चढेल झाला, व सुभेदाराविरुद्ध हजारा येथील मुसलमान प्रजेला चिथावून बंड करण्यास प्रवृत्त करूं लागला. आगष्ट महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत ॲबट हजाऱ्याच्या जवळ जाऊन पोहोंचला व त्यानें तेथील मुसलमान नागरिकांना चिथावणी देऊन शीख फौजेचा रस्ता रोंकून धरण्यास सांगितलें. छत्रसिंहाची शीख फौज मुलतानकडे त्या वेळीं जात होती. हजाराच्या शीख फौजेचा मुख्य अधिकारी कानोरा नामक एक अमेरिकन होता. फौजेचा रस्ता बंडखोर मुसलमानांनीं रोंकलेला पाहून, छत्रसिंहानें त्यांना हटविण्याची कानोराला आज्ञा दिली. परंतु ॲबटच्या सह्याशिवाय छत्रसिंहाची आज्ञा मानण्याचें कानोरानें नाकारलें. वा रे युरोपियन नोकर व त्यांची शिस्त! काळ्या मालकाची आज्ञा पालन करणें त्यांच्या दृष्टीनें पातक होतें! परंतु फौजेंतील शीख शिपायांनीं कानोराचा हुकूम धाब्यावर बसवून छत्रसिंहाची आज्ञा पालन करण्याची तत्परता दाखविली. शिपायांच्या या बेदिलीमुळें कानोराचा संताप भडकला, व त्यानें त्या शिपायांना उलट तोफेच्या तोंडीं देण्याबद्दल गोलंदाजांना हुकूम केला. गोलंदाजही शीखच होते. त्यांनीं देखील कानोराची अयोग्य व बेइमानीची आज्ञा धाब्यावर बसविली. त्याबरोबर कानोरानें एका शीख शिपायाला तलवारीनें छाटून टाकलें व दुसऱ्या दोघांवर पिस्तुलानें गोळ्या झाडल्या. यामुळें शीख शिपाई चवताळले व त्यांनीं कानोराला तेथल्या तेथें ठार केलें. ॲबटनें या गोष्टीचा दोष छत्रसिंहावरच लादला; आणि या बंडखोरीबद्दल त्याला शिक्षा करावी अशी रेसिडेंट केरीकडे शिफारस केली. केरीनें प्रथम तर छत्रसिंहाकडे दोष नाहीं असेंच लिहिलें. आणि कोणीही असेंच कबूल करील; परंतु पुढें काय किल्ली फिरली असेल ती असो; कदाचित् इंग्रजांची लढाईची तयारी पूर्ण होऊन, पंजाब खालसा करण्याचें निमित्त उत्पन्न करण्याचें त्यांनीं ठरविलें असेल. सरदार छत्रसिंहाची आपल्या बंडखोर व बेइमान नोकराला शिक्षा करण्याच्या अपराधाबद्दल, सुभेदारीवरून हकालपट्टी झाली व त्याची जहागिर जप्त करण्यांत आली. छत्रसिंहानें आपली बाजू रेसिडेंटच्या समोर

खुलासेवार मांडली, आणि झाल्या प्रकाराचा दोष ॲबटच्या माथीं कसा येतो हें सिद्ध करून दाखविलें. कानोरा यानें आपल्या सुभेदाराची आज्ञा मानली नाहीं; येवढेंच नव्हे तर रागाच्या भरांत शीख लोकांवर हत्यार चालविलें. यामुळें तो शिपायांच्या वास्तविक कोपाला बळी पडला. परंतु या खुलाशानें रेसिडेंटचें समाधान झालें. नाहीं व छत्रसिंहाला कायमचें पदभ्रष्ट करण्यांत आलें.

सरदार शेरसिहाला आपल्या पित्याचा झालेला अपमान कळतांच तो अत्यंत संतप्त झाला. इंग्रजांच्या न्यायप्रियतेवर त्याचा फार विश्वास होता व त्यांच्याशीं तो सारखा एकनिष्ठतेनें वागत होता, अशी मेजर एडवर्डस यानें देखील कबूली दिली आहे. परंतु आपल्या पित्यावर झालेला हा अत्याचार त्याला सहन झाला नाहीं. इंग्रजांचे विरुद्ध त्यानेंही हत्यार उचललें आणि आपला जन्मदाता पिता, व मातेसमान मानलेली राजमाता जिंदा, यांच्या अपमानाची भरपाई करण्याकरितां त्यानें इंग्रजांशीं युद्ध पुकारलें. शीख शिपाई लढाई करण्यास सज्ज झाले. परंतु ही जर केवळ शीख व इंग्रज यांच्यामधील लढाई असती, तर शीखांचा पराभव होणें कठीण होतें. परंतु त्या वेळीं इंग्रज लोक लाहोरदरबारचे सूत्रचालक व महाराज दिलीपसिंह यांचे पालनकत होते. म्हणून सरदार छत्रसिंह, सरदार शेरसिंह व मूलराज हे बडखोर ठरून, शीख दरबार त्यांच्याशीं लढाई करण्यास उद्युक्त झाले. या विचित्र परिस्थितीमुळें, या शीख सरदारांचीं व त्यांच्या अनुयायांचीं अंतःकरणें, देशाभिमान व धर्माभिमान या भावनांनीं रसरसलेलीं होतीं, तरीदेखील ते बंडखोरच ठरले. इंग्रजांच्या बाजूनेंही अनेक शीख लढत होते. कारण लाहोर दरबारची महाराज दिलीपसिंहाच्या नांवानें बंडखोरांविरुद्ध चालून जाण्याची त्यांना आज्ञा झाली होती, आणि राजभक्तीनें प्रेरित होऊन ती त्यांनीं पाळली. लाहोर दरबाराकडून सुटणारे हुकूम जरी इंग्रज रेसिडेंटचे असत, तरी त्यांवर महाराज दिलीपसिंहाची राजमुद्रा करण्यांत येत असे. त्यामुळें आपल्या पूर्वापार समजुतीला अनुसरून, ते हुकूम शिरसामान्य करून अनेक शीख शिपाई व सरदार इंग्रजांच्या बाजूनेंच लढले. कारण आपण महाराजांचें संरक्षण बंडखोर सरदारांपासून करीत आहों, अशी त्यांची भावना असे, व इंग्रजांच्या पोटांतील कावा त्या भोळ्या जीवांना कळला नसल्यामुळें ते इंग्रजांना महाराजांचे मित्र व पालनकर्ते, आणि खरे हितचिंतक समजत. यामुळें इंग्रजांची फत्ते झाली. कारण इंग्रज लाहोरलाच शेवटपर्यंत होते, व दरबार आणि महाराज त्यांच्या हातांतच पालक या नात्यानें होते. १३ जानेवारी १८४९ रोजीं चिलियनवाला येथील लढाईंत शीखांनीं अत्यंत शौर्य

दाखल केलें. दोन्हीकडच्या फौजांची बरोबरीच राहिली. दोन्ही बाजूंचें पुष्कळच नुकसान झालें, परंतु विजयाचा कांटा शेरसिंहाच्या बाजूसच झुकत होता. इकडे २२ जानेवारी रोजीं मूलराजाचा पराभव होऊन मुलतानचा किल्ला इंग्रजांचे हातीं आला. त्यामुळें मुलतान येथील मोकळी झालेली सेनापती व्हीस याच्या हाताखालील इंग्रजी फौज, चिलियनवालाच्या लढाईतून वापस आलेल्या सरसेनापती लार्ड गफ यांच्या फौजेंत सामील झाली. या संयुक्त सेनेनें गुजराथच्या मैदानावर सरदार शेरसिंहाशीं सामना दिला. इंग्रजांना या वेळीं पूर्ण जय मिळाला आणि सरदार शेरसिंह व छत्रसिंह कैदी होऊन इंग्रजांच्या हातीं लागले. ही गुजराथची लढाई १२ फेब्रुआरी १८४९ रोजीं झाली.

लढाई समाप्त झाली तेव्हां गव्हर्नर जनरल लॉर्ड डलहौसीनें आपला प्रतिनिधी म्हणून मि. ईलियट यांस लाहोरला पाठविलें. या वेळीं सर फ्रेडरिक केरीच्या जागीं सर हेनरी लॉरेन्स हे लाहोरचे रेसिडेंट व अज्ञान–पालक–कमिटीचे अध्यक्ष होते. मि. इलियटनें ब्रिटिश रेसिडेंटला गव्हरनर जनरलची इच्छा काय होती ती सांगितली. २९ मार्च रोजीं स्वतंत्र पंजाबचा अखेरचा दरबार झाला. महाराज रणजितसिंहाच्या सिंहासनावर बसण्याचा दिलिपसिंहाचा हा शेवटचाच दिवस होय! ते आपल्या पित्याच्या सिंहासनावर बसले; भोंवतालीं इंग्रजी शिपाई आपलीं हत्यारें पाजळून तयार होते. त्या वेळीं लाहोरचे दिवाण दीनानाथ यांनीं ईलियट व लॉरेन्स यांच्यापुढें सर्व जुने तहनामे पेश केले; व महाराज रणजितसिंहाच्या त्यांच्याशीं असलेल्या मैत्रीची आठवण करून देऊन तिचें चीज करण्यास त्यांना सांगितलें. परंतु हें सर्व पालथ्या घड्यावर ओतलेल्या पाण्याप्रमाणें फुकट गेलें. पंजाबप्रांत ब्रिटिश राज्यांत सामील करण्यांत आला आहे, असें लॉर्ड डलहौसीचें आज्ञापत्र वाचून दाखविण्यांत आलें. किल्ल्यावरील शीखांचें निशाण उतरविण्यांत येऊन ब्रिटिशांचें यूनियन जॅक त्या जागीं फडकविण्यांत आलें. महाराज दिलीपसिंहाला सिंहासनावरून उतरविण्यांत आलें. रणजितसिंहाचा लाडका पंजाब इंग्रजांच्या आधीन झाला. महाराज दिलीपसिंह या वेळींही अज्ञानच होते, व पित्याचे मित्र म्हणून इंग्रज त्यांचे पालक होते. पंजाबांतील या शेवटच्या शीख लढाईत इंग्रजांचा पाय एक दिवस देखील लाहोरहून उखडला नाहीं; व दिलीपसिंहावरची त्यांची पालनकर्ती मिठी किंचितही सैल झाली नाहीं. त्या वेळीं महाराजांचें वय सरासरी १४ वर्षांचें होतें, व इंग्रज त्यांच्या राज्याचा कारभार पाहात होते; तरी देखील त्यांचें राज्य खालसा करण्यांत आलें.

३० मार्च रोजीं ही बातमी सर्व हिंदुस्थानभर पसरली. महाराज रणजितसिंहाची सर्व संपत्ति, त्यांचें प्रसिद्ध सिंहासन व मुगुटांतील कोहिनूर हिरा इंग्रजांच्या ताब्यांत आला. पंजाबचें सर्व राज्य व ही अफाट संपत्ति इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतली. महाराज दिलीपसिंहाला त्याबद्दल सालिना चार लाख रुपये पेनशन मंजूर झाली. केनें आपल्या बंडाच्या इतिहासांत या जखमेवर खालील डागण्या दिल्या आहेत. तो आपल्या इतिहासांत लिहितो, ' लॉर्ड डलहौसीच्या कृपेमुळें महाराज दिलीपसिंहाच्या मागची राज्यकारभाराची काळजी व चिंता दूर झाली, आणि त्याच्या खर्चाकरितांही पुरेशी नेमणूक करण्यांत आली आहे. यापुढील त्यांचें आयुष्य खात्रीनें सुखांत जाईल. " लॉर्ड डलहौसीच्या अन्यायाचें व अनीतीचें यापेक्षां अधिक निर्लज्जपणाचें समर्थन दुसरीकडे कोठें सांपडेल ? अहाहा ! महाराज दिलीपसिंहाचा काय विलक्षण फायदा हा ! पंजाबचें राज्य, शीखांसारख्या पराक्रमी व धर्मनिष्ठ लोकांचा पुढारीपणा आणि स्वातंत्र्य यांची विक्री, नव्हे या गोष्टी त्यांच्यापासून जबरीनें हरण करून त्यांना सालिना चार लाख रुपयांची नेमणूक मिळाली. महाराज दिलीपसिंहाच्या व शीख राष्ट्राच्या इच्छेविरुद्ध केलेला हा सवदा खरोखरच इंग्रजांना महाग पडला ! भोळे बिचारे इंग्रज या देवघेवींत खरेच फसले !

महाराज रणजितसिंहाच्या मैत्रीचा त्यांच्या पत्नीला व कुमाराला याप्रमाणें बदला मिळाला ! इंग्रजांचा पंजाबवर डोळा असून तो प्रांत कांहीं तरी खरेंखोटें निमित्त उभें करून घशांत घालावयाचा त्यांचा बेत होता, असें कोणीं म्हटलें तर हा इतिहास वाचून तें खोटें कसें ठरेल ? मूलराज व शेरसिंह इंग्रजांशीं लढले ते आपल्या मानापमानाच्या बदल्याकरितां लढले. मूलराज व शेरसिंहाशीं इंग्रजांचें वर्तनच मुळांत अन्यायाचें झालें होतें. त्यांच्यावर इंग्रजांनीं विश्वास ठेवला असता, तर असा प्रकार घडलाच नसता. छत्रसिंहासारख्या वृद्ध व सन्माननीय सरदाराचा पाणउतारा करून त्याचें मन इंग्रजांनीं दुखवलें, आणि राजमाता महाराणी जिंदा हिच्यावर पुराव्याशिवाय फितूरीचा आरोप लादून व चौकशीही न करतां तिला पंजाबांतून हद्दपार केलें; आणि त्यामुळें सर्व शीख लोकांचीं मनें इंग्रजांनीं दुखविलीं. महाराणी जिंदाला हद्दपार करण्याचा परिणाम चांगला होणार नाहीं ही गोष्ट सेनापती शेरसिंहानें इंग्रजांच्या नजरेस आणली होती. काबूलचे अमीर दोस्तमहंमद यांना देखील ही गोष्ट बरी वाटली नाहीं. त्यांनीं कॅप्टन ॲबटला स्पष्ट लिहिलें कीं, ' राजमाता महाराणी जिंदा हिला कैद करून हद्दपार केल्यामुळें

शीख लोकांचीं मनें बिथरून फिरलीं आहेत.' महाराज दिलीपसिंहाच्या विवाहांत सुद्धां इंग्रजांनीं खो घालण्याचा प्रयत्न केला. अशा परिस्थितींत शीख सरदारांनीं बंड केलें तर तो दोष त्यांचा नव्हे. तो दोष रेसिडेंट केरी व कॅप्टन ॲबट यांच्या निंद्य, दुष्ट व कपटी वर्तनालाच लागू होतो. बरें, हे सरदार दोषी होते असें धरून चाललें तरी त्यांना फार तर इंग्रजांनीं शिक्षा करावयाची होती. त्यांच्या बंडखोरीबद्दल महाराज दिलीपसिंहाला शासन काय म्हणून? महाराज दिलीपसिंह त्या वेळीं अज्ञान बालक होते आणि त्यांच्या पित्याच्या मैत्रीखातर इंग्रज आपखुशीनें त्यांचे पालक बनले होते. अशा स्थितींत राज्यांत झालेलीं बंडें मोडून अज्ञानाच्या हिताचें रक्षण करणें हें इंग्रजांचें पवित्र कर्तव्य होतें. परंतु कारकून माझें ऐकत नाहींत या सबबीवर पालकानें अज्ञानाची इस्टेट गट्ट करण्यासारखा हलकट प्रकार इंग्रजांनीं केला. इंग्रजांनीं महाराज दिलीपसिंहाच्या अज्ञानदशेंत राज्यकारभार पाहाण्याकरितां जी आठ जणांची कमिटी नेमिली होती, त्यांपैकीं सहा इसम अखेरपर्यंत आपल्या स्वामिभक्तीच्या व राजनिष्ठेच्या व्रताला जागून लाहोर दरबारशीं, व इंग्रज रेसिडेन्टाशीं एकनिष्ठ राहिले. या कमिटींतील एकच सभासद, सेनापती शेरसिंह काय तो इंग्रजांच्या विरुद्ध गेला. तो सुद्धां आगष्ट १८४८ पर्यंत दरबारशीं राजनिष्ठ होता, हें मेजर एडवर्डसच्या पत्रावरूनच दिसतें. कारण मूलराजावर चढाई करून जाण्याचा प्रश्न जेव्हां उद्भवला, तेव्हां बाकीच्या शीख सरदारांनीं मूलराजाविरुद्ध हत्यार उचलण्याचें नाकारलें. परंतु शेरसिंह मात्र आपली फौज घेऊन इंग्रजांच्या साह्याला निघून गेला. परंतु अशा वीर व प्रामाणिक पुरुषाला देखील, इंग्रजांनीं त्याच्या वृद्ध पित्याशीं जें विश्वासघाताचें व अन्यायाचें वर्तन केलें, त्यामुळें त्यांच्याविरुद्ध हत्यार उचलणें भाग पडलें. शेरसिंहानें बंड केलें, म्हणून वाटल्यास त्याची कोणतीही सबब न ऐकतां व त्याला बचावाची संधीही न देतां इंग्रजांनीं त्याला वाटेल ती शिक्षा करावयाची होती. त्याबद्दल महाराज दिलीपसिंहाचें राज्य हरण करणें म्हणजे चोराच्या अपराधाबद्दल संन्याशाला सुळीं देण्याचाच प्रकार होता. पालककमिटीचे बाकीचे सहा सभासद इंग्रजांशीं व दरबारशीं अव्वलपासून अखेरपर्यंत एकनिष्ठ होते. त्यांना लार्ड डलहौसीनें निरोप पाठविला कीं, दिलीपसिंहाला गादीवरून काढून टाकून पंजाब इंग्रजांच्या सुप्रत केल्याबद्दलच्या तहनाम्यावर तुम्ही सह्या करणार नाहीं तर तुमच्या जहागिरी जप्त केल्या जातील. याप्रमाणें त्यांच्या छातीवर शिक्षेचें पिस्तूल जय्यत धरून त्यांच्या सह्या व त्यांची संमती या अन्यायी वर्तनाबद्दल घेण्यांत आली. दिलीपसिंह अज्ञान व ब्रिटिश सरकार त्यांचे

अज्ञान-पालक ! आणि या पालकांनींच या अज्ञानाचा घात केला. त्याच्या पित्यानें मिळविलेलें राज्य त्याचेपासून हिसकून घेण्यांत आलें. झालेल्या प्रकारांत त्या बालकाकडे कोणता दोष येत होता ? या बाबतींत ड्यूक ऑफ अर्गाइलनें देखील अशी कबूली दिली आहे कीं, या शीख युद्धांत लाहोर दरबारचा व महाराज दिलीपसिंहाचा काडीमात्रही संबंध नव्हता.

हें युद्ध सुरू झालें तेव्हां लॉर्ड डलहौसीनें बरकपुरमध्यें अशी घोषणा केली कीं 'मला शांति अतिशय प्रिय आहे. परंतु जर हिंदुस्थानच्या शत्रूंना युद्धाची अपेक्षा असेल तर तेंही त्यांना मिळेल, आणि त्याबद्दल त्यांना भयंकर रीतीनें मोबदलाही पण मिळेल.' वा रे शांतिप्रियता ! आपल्या अन्यायाचा दोष दुसऱ्यावर ढकलावयाचा. आपल्या कृत्यांवर सफेती चढविण्याची कला इतर इंग्रज अधिकाऱ्यांप्रमाणें लॉर्ड डलहौसीलाही चांगलीच साधली होती. इंग्रजांनीं वाटेल तें करावें, वाटेल त्याचा मुलूख घ्यावा, वाटेल त्यांच्या जहागिऱ्या जप्त कराव्या, वाटेल ती फितुरी करावी, परंतु इतरांनीं त्यांच्याविरुद्ध हातदेखील उचलूं नये कारण इंग्रजांना या सर्व गोष्टी शांततेनें करण्याची इच्छा होती. लोकांनीं या गोष्टी निमूटपणें सहन केल्या असत्या तर इंग्रजांना लढाई करण्याची काय जरूरी होती ? गरीब बिचारे भोळे इंग्रज ! शीख लोकांनीं आपण होऊनच ही लढाई आपल्या देशावर ओढून घेतली ! या लढाईबद्दल केनें शीख लोकांवर उगीचच्या उगीच आग पाखडली आहे ! त्याच्या मतानें शीख लोक विश्वासघातकी व बेइमान ठरले, व त्यांनीं बंड केलें. आपल्या जातभाईंचें मुसळ मात्र त्याच्या डोळ्यांना अर्थातच दिसलें नाहीं !

परंतु सर्वच इतिहासकार केप्रमाणें पक्षपाती नाहींत. मेजर इव्हान्सबेल यासंबंधीं म्हणतोः—"लॉर्ड डलहौसीनें म्हटलें आहे, आम्हीं अज्ञान राजाच्या वतीनें मोठा विजय मिळविला. परंतु हा विजय नव्हे. हा केवळ विश्वासघात झाला. लॉर्ड डलहौसीनें तहनाम्याला कागदाचा कवडीमोल तुकडा लेखून त्याची अप्रतिष्ठा केली, आणि इतिहासांत ब्रिटिशांच्या नांवाला कलंक लावला." टारेन्सनें यासंबधीं असें लिहिलें आहेः—"दिलीपसिंहाला गादीवरून उतरवून पंजाबप्रांत इंग्रजी राज्यांत सामील करून घेणें याला नीतीच्या दृष्टीनें न्याय्य म्हणतां येणार नाहीं. दिलीपसिंह अज्ञान असल्यामुळें त्याला राज्यांतील कोणत्याही भानगडीबद्दल जबाबदार धरतां येत नाहीं. अज्ञानाच्या तर्फे राज्यकारभार करणाऱ्या प्रतिनिधी सभेचे अध्यक्ष इंग्रजी रेसिडेन्ट होते. खुद्द राजधानी लाहोर येथें

कोणत्याही तऱ्हेची गडबड झाली नाहीं; व सामान्य प्रजेनेंही कोणतीच बंडाळी केली नाहीं. महाराणी जिंदा पांच सातशें मैलांवर दूर इंग्रजांच्या कैदेंत होती. सरदार गुलाबसिंहाची इंग्रजांशीं मैत्रीच होती. फक्त मुलतानमध्येंच काय तो इंग्रजी फौजेला अडथळा झाला. परंतु अखेर तो किल्लादेखील सर होऊन बंडखोरांना शिक्षा मिळाली. लष्करी कायद्याप्रमाणें सर्व बंडखोर सरदारांच्या व इतरांच्याही जहागिरी, इनामें, व जमिनी जप्त करण्यांत आल्या असत्या, तरी त्याला कोणीं अन्याय म्हटलें नसतें. परंतु हें कांहीं एक न करतां पंजाबप्रांत खालसा करण्यांत आला, आणि म्हणूनच इतिहास या गोष्टीला इंग्रजांची डाकेगिरी हेंच नांव देईल. "

लडलोनें याबद्दल लिहिलें आहे—" दिलीपसिंह अज्ञान होता व त्याच्या राज्य-रक्षणाचा भार आम्हीं उघडपणें आपल्या शिरावर घेतला. त्यावेळीं आम्हीं अशी घोषणा केली कीं, लाहोर दरबारविरुद्ध जो शस्त्र उचलील त्याला वठणीस आण-ण्याकरितां आम्हीं पंजाबमध्यें मित्र म्हणून आलों आहों. परंतु ज्या अज्ञानाच्या पालनाचा भार आम्हीं आमच्या शिरावर घेतला, त्याचेंच राज्य आम्हीं गिळंकृत करून त्याला पेन्शनर बनविलें. त्याचा प्रसिद्ध कोहिनूर इंग्लंडच्या खजिन्यांत नेऊन टाकला. सारांश, आमच्या स्वाधीन असलेल्या लहान बालकाचा आम्हीं विश्वास दाखवून सर्वनाश केला.

"दिलीपसिंहाच्या रक्षणाचा भार एकदां पत्करल्यावर त्याच्या प्रजेच्या अपराधा-बद्दल त्याला शिक्षा देणें हा अत्यंत मोठा अन्याय होय! बंडखोरांना आम्हीं शिक्षा केली असती तर आमची प्रशंसाच झाली असती. परंतु तें कारण दाखवून दिली-पसिंहाला गादीवरून काढून टाकण्याचा आम्हांला कोणताही अधिकार नव्हता. एका विधवेच्या कांहीं नोकरांनीं पोलीस लोकांशीं मारामारी केली, तेव्हां पोलिसांनीं त्या बंडखोर नोकरांचा पराभव करून तिच्या इस्टेटीच्या रक्षणाचा भार आपल्या शिरावर घेतला. यानंतर पोलीस अधिकारी तिच्याजवळ जाऊन म्हणूं लागला, 'तूं आपलें घर, दार, इस्टेट सर्व कांहीं आमचे हवालीं कर. तुला खर्चाकरितां म्हणून मी थोडीशी रकम महिन्याला देत जाईन!' इतकें करूनच तो पोलीस अधिकारी राहिला नाहीं तर तिचे दागिनेसुद्धां त्यानें आपल्या गळ्यांत घातले. याहून अधिक अन्याय व नीचता दुसरी काय असूं शकेल!

" दुसऱ्यांचें राज्य कसें घ्यावें एवढेंच लार्ड डलहौसीला ठाऊक होतें. न्याय-अन्यायाकडे त्याचें लक्षच राहात नसे. परंतु न्याय-अन्यायानें असो अथवा

जबरदस्तीनें असो, त्यानें एखादें राज्य खालसा केलें म्हणजे त्याला ब्रिटिश पार्लमेंट, बोर्ड ऑफ डायरेक्टर्स, किंवा दुसरे अधिकारी, शिक्षा करण्याऐवजीं उलट त्याची प्रशंसाच करीत असत !" मग त्यानें बेफामपणें कां वागूं नये ?

याप्रमाणें पंजाबप्रांत ब्रिटिश अमलाखालीं आला. इंग्रजी सत्तेचा वाढता व्याप पाहून महाराज रणजितसिंह एकदा आपल्या सरदारांना सहज थट्टेनें म्हणाले होते कीं, तुम्ही गैरसावध राहिलांत तर माझ्यामागें पंजाब प्रांतावर देखील पाहतां पाहतां इंग्रजी लाल रंग चढेल. ते स्वतां अत्यंत सावध होते व इंग्रजांशीं त्यांनीं मुद्दाम मैत्री राखली, व आपल्यामागें मुलाच्या रक्षणाचा भार त्यांच्यावर सोंपविला. परंतु इतकी काळजी घेऊनही, अखेर त्यांचें भविष्य खरें झालें. पुढील कथा अत्यंत दुःखद आहे. परंतु हा इतिहास असल्यामुळें तिचा उल्लेख या ठिकाणीं केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. महाराज दिलीपसिंहाला पंजाबच्या बाहेर फत्तेगड येथें ठेवण्याचें ठरलें. त्यांची सर्व खासगी संपत्ति देखील जप्त करण्यांत आली. त्यांच्या दागिन्यांचा व कपड्यांचाही लिलांव करण्यांत आला. एखादें राज्य खालसा केल्यावर दागदागिन्यांचा व कपड्यालत्त्यांचा लिलांव पुकारून नक्त रक्कम उभी करण्याचा कंपनीचा सराव असे. मालमत्ता संस्थानिकाच्या खासगीची असली, व या लिलांवामुळें त्यांची मानहानि व अप्रतिष्ठा होत असली, तरी कंपनीला त्या गोष्टींची फिकीर वाटत नसे. लाहोरच्या लिलावाची किंमत अडीच लक्ष रुपये आली, परंतु इंग्रजसरकारनें त्याबद्दल दिलीपसिंहांना तीस हजार रुपयेच देऊं केले. त्याचा त्यांनीं अर्थातच स्वीकार केला नाहीं. महाराज दिलीपसिंहाची सालिना चार लाख रुपयांची नेमणूक करण्यांत आली होती. परंतु पहिलीं सात वर्षें त्यांना फक्त एक लाख वीस हजार रुपयेच देण्यांत आले. पुढें मात्र ही रकम दीड लक्ष करण्यांत आली. या रकमेंतूनही निरनिराळीं कारणें दाखवून वर्षाचे सत्तर हजार रुपये काढून घेण्यांत येऊन, फक्त ऐशीं हजार रुपयेच त्यांच्या हातांत पडत असत. गादीवरून काढल्यानंतर सर जॉन लाजिन नांवाच्या एका अध्यापकाच्या स्वाधीन त्यांना करण्यांत आलें. इ. सन १८५३ सालीं **ते अज्ञान असतांनाच त्यांना खिस्ती धर्माची दीक्षा देण्यांत आली,** आणि १८५४ सालीं त्यांना इंग्लंड येथें त्यांच्या इच्छेविरुद्ध नेण्यांत आलें. १८५७ सालीं त्यांना हिंदुस्थानांत परत येण्याची इच्छा झाली. परंतु त्यांना त्या वेळीं परत कोण येऊं देणार ! हिंदुस्थान देश त्यांची मातृभूमी खरी, परंतु ती त्यांना कायमचीच पारखी करण्यांत आली. त्यामुळें महाराणी जिंदाला आपल्या पुत्राला भेटण्याकरितां म्हातारपणीं इंग्लंडची

यात्रा करावी लागली. हातांतील सत्ता गेली, द्रव्याचें पाठबळ उरलें नाहीं, वृद्धत्वामुळें गात्रें विगलित झालीं, आणि डोळ्यांना दिसेनासें झालें. अशा स्थितींतही पुत्रप्रेमाला वश होऊन बिचारीनें इंग्लंडची सफर केली. कारण तिच्या पुत्राला या देशांत येण्याला कायमची बंदी झालेली होती. कारण न जाणों, दिलीपसिंहाला पाहतांच जुनी आठवण ताजी होऊन शीख शिपायांचें रक्त उसळावयाचें, व इंग्रजी सत्तेला न जुमानतां शूर शीख लोक त्यांचाच जयजयकार करूं लागावयाचे. तेव्हां त्यांना बाळपणींच ख्रिस्ती करून इंग्लंडांत कायमचें डांबून ठेवलें, व तेथेंच एका गोऱ्या कुमारिकेशीं त्यांचा विवाह लावण्यांत येऊन त्यांना हिंदुस्थान देशाला हिंदु संस्कृतीला, व शीख धर्माला कायमचे पारखे करण्यांत आलें. ही इंग्रजांची हुशारी असली तरी नीती मात्र खास नाहीं. महाराणीचा अखेर इंग्लंडमध्येंच अंत झाला. तिचें भाग्य थोर म्हणून पुत्राच्या मांडीवर डोकें ठेवून तिला मरण आलें. महाराज दिलीपसिंहाला म्हातारपणीं आपली मातृभूमी पाहाण्याची पुनः एकवार अत्यंत प्रबळ इच्छा झाली. त्यांनीं स्वदेशप्रीतीनें आतुर होऊन इंग्लंड सोडलें. परंतु एडनवरूनच त्यांना जबरीनें वापस लोटवण्यांत आलें. त्या वेळीं त्यांनीं आपल्या देशबंधूंना एक अत्यंत हृदयद्रावक पत्र पाठविलें होतें तें पत्र खालीं दिलें आहे.

" प्रिय पंजाबवासी बंधूंनो!

मी पुन्हा कोणत्या तोंडानें पंजाबमध्यें वापस येऊन राहूं? आपलें काळें तोंड पुन्हा तुम्हांला दाखवूं नये अशीच मला इच्छा होती. परंतु **वाहगुरु** सर्वांचे मालक आहेत. गुरुदेवांच्या प्रेरणेनेंच मला अशी इच्छा झाली आहे कीं, पुन्हां आपल्या जन्मभूमींत एखाद्या सामान्य दरिद्री इसमाप्रमाणें आपलें शेवटचें आयुष्य कंठावें म्हणून हिंदुस्थानांत मी येत आहें. वाहगुरूंची जी इच्छा असेल त्याप्रमाणें होईल. खालसा बंधूंनो, मी आपल्या दृष्टीनें नालायक आहें. मी आपल्या पूर्वजांच्या सनातन धर्माचा त्याग करून ख्रिस्ती बनलों. मला क्षमा करा. कारण ज्या वेळीं मला ख्रिस्ती करण्यांत आलें त्या वेळीं मी अज्ञान बालक होतों. मी कांहीच करूं शकत नव्हतों. मीं पश्चात्तापानें दग्ध होऊन पुन्हा आपला शीखधर्म स्वीकारला आहे. मी यापुढें **बाबा नानक**च्या नियमानुसार व **गुरु गोविंदसिंहा**च्या आज्ञेप्रमाणें चालेन. माझे प्रिय पंजाबचे भाऊ व खालसा बधू, यांच्या दर्शनासाठीं माझा जीव तडफडत आहे. परंतु मला पाप्याला कदाचित मायभूमीचें दर्शन होणारही नाहीं. मला कदाचित हिंदुस्थानांत वापस येऊं देणार नाहींत.

मी इंग्रजी राजनीतीवर विश्वास ठेवला होता त्याचें मला पुरें फळ मिळालें.
**वाहगुरूचा खालसा ! वाहगुरूकी फत्ते.**

आपल्याच रक्तमांसाचा बनलेला,

दिलीपसिंह "

म्हातारपणीं महाराज दिलीपसिंहानीं शीखधर्माचा स्वीकार केला, त्यामुळें त्यांच्या मनाला थोडीबहुत शांती लाभली असेल. परंतु त्यांना मायभूमीचें दर्शन अखेरपर्यंत झालें नाहीं. पंजाबच्या दर्शनासाठीं तळमळणारा हा साधाभोळा जीव इंग्लंडमध्येंच पेरी शहरीं मृत्यु पावला. दिलीपसिंहाच्या स्वभावाबद्दल लडलो म्हणतो, " जे दिलीपसिंह ख्रिस्ती होऊन इंग्लंडमध्यें आलेले आहेत त्यांचा भोळे-पणा व सरळ व दिलदार स्वभाव पाहून फार खेद होतो कीं, आम्हीं त्यांच्या लहानपणीं त्यांच्याशीं अतिशय अन्यायाचें व नीचतेचें वर्तन केलें. " या एका शितावरूनच रणजितसिंहाच्या या छाव्याच्या स्वभावाची कल्पना करतां येते.

याप्रमाणें पंजाबसारखा धनसंपन्न व पराक्रमी प्रांत इंग्रजांच्या स्वाधीन झाला. या प्रांताचें क्षेत्रफळ ५०००० चौरस मैल होतें, व तेथील लोकसंख्या त्या वेळीं निदानपक्षीं ४०००००० होती. लॉर्ड डलहौसीच्या अन्यायाचा हा दुसरा हल्ला होय ! गव्हर्नर जनरल होऊन हिंदुस्थानांत आल्यापासून एक वर्षाच्या आंतच त्यानें आपलें चारित्र्य लोकांच्या नजरेस आणलें. त्याच्या कुटिल राजनीतीचा हिंदुस्थानच्या पाठीवर ओढलेला हा दुसरा फटकारा होय !

---

## प्रकरण ४ थें

# 'अघोरी राजतृष्णा'



लार्ड डलहौसी हिंदुस्थानांत गवर्नर जनरल होऊन आला, तेव्हां इंग्रजांचा दरारा सर्वत्र स्थापन झाला होता. त्यांचें राज्यही विस्तीर्ण होतें, परंतु तें तुटक व अलग अलग होतें. ते सणंग करण्याचा त्याचा निश्चय झाला. वाटेल ती युक्ति योजून राज्यविस्तार करावयाचा हा त्याचा निश्चय झाला असल्यामुळें, त्याला नीति अनीतीची पर्वाच नव्हती. धर्माधर्म तो जाणत नव्हता. इंग्रजांचें एकसूत्री साम्राज्य हिंदुस्थानांत स्थापन करणें एवढी एकच गोष्ट त्याला ठाऊक होती, आणि हाच त्याचा धर्म होता. तो अतिशय बुद्धिवान् होता. पंचवीस वर्षें वयाच्या आंतच त्याचा इंग्लंडच्या पार्लमेंटांत प्रवेश झाला, आणि तो या देशांत गवर्नर जनरल होऊन आला तेव्हां त्याचें वय अवघें पसतीस वर्षांचें होतें. त्याची बुद्धिमत्ता इंग्रजांच्या राज्यप्रसाराच्या कामीं आली. एखादें राज्य खालसा करून इंग्रजी राज्यास जोडावयाचें त्यानें मनांत आणलें, म्हणजे आपल्या हेतूंच्या समर्थनार्थ तो बाडेंच्या बाडें लिहीत असे. **आपल्या अन्यायाला न्यायाचें व अनीतीला नीतीचें स्वरूप देणारा, त्याच्यासारखा बुद्धिवान् कलमबहाद्दर** इंग्रज मुत्सद्यांत दुसरा क्वचितच सांपडेल. हिंदुस्थानांतील संस्थानिकांशीं इंग्रजांचे निरनिराळ्या वेळीं जे तह झाले, त्यांतील भिन्न भिन्न कलमांचा अर्थ, अनेक सूक्ष्म भेद दाखवून तो तेव्हांच पालटवून घेत असे. आपल्या हेतूस अनुकूल असाच अर्थ त्याच्या सुपीक मेंदूंत उतरावयाचा, आणि मग त्यानें त्याप्रमाणें रंगवलेले खलिते विलायतेंतील कंपनीच्या बोर्ड आफ डायरेक्टर्सकडे जावयाचे. कंपनीचें राज्य कसें वाढेल या गोष्टीकडे त्यांचेंही लक्ष लागलें होतें. मग डलहौसीसारखा त्यांच्या मनांतील हेतू धडाकून तडीस नेणारा माणूस त्यांना मिळाल्यावर, त्याच्या राजनीतीचा पाठपुरावा त्यांनीं कां करूं नये? बोर्ड आफ डायरेक्टर्सकडून, तो ठरवील ती पूर्वदिशा व बोलेल तें वेदवाक्य, अशी स्थिती त्यावेळीं उत्पन्न झाली होती. याचा फायदा घेऊन त्यानें येथें खरोखरच नंगा नाच घातला. त्याचे हेतू इंग्लंडच्या दृष्टीनें अत्यंत स्वदेशाभिमानी व म्हणूनच उदात्त होते, यांत काडीमात्रही संशय नाहीं. इंग्लंडचें एकछत्री व एकसूत्री साम्राज्य हिंदुस्थानावर स्थापित व्हावें हाच त्याचा प्रधान हेतु होता. आपल्या मायभूमीचा यशोगौरव वाढावा हेंच त्याचें ध्येय होतें. या ध्येयानें प्रेरित झाल्यामुळेंच

त्याच्या हातून अनेक राज्यें गिळंकृत झालीं. त्यामुळें इंग्रजांनीं त्याच्यावर स्तुति-पुष्पें वाहावींत हें साहजिकच आहे. ज्यांच्या परिश्रमानें इंग्रजांचें साम्राज्य या देशांत स्थापित झालें, त्यांच्या ( क्लाईव्ह, हेस्टिंग्ज वगैरे ) अन्यायाकडे दुर्लक्ष करून व त्यांच्या अनीतीकडे कानाडोळा करून, इंग्रजांनीं त्यांची थोरवी व बडेजावी गावी व त्यांचा उदोउदो करावा हें स्वाभाविक आहे. परंतु त्यामुळें बंडाचा इतिहास लिहीत असतांना इतरांनींही हाच निर्बंध पाळावा असें म्हणणें रास्त होणार नाहीं. कारण त्याच्या स्वदेशाभिमानानें हिंदुस्थानांतील अनेक थोर राज-घराणीं आपल्या राज्यास व वैभवास कायमचीं मुकलीं !

संस्थानांतील प्रजेचा राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालत नसल्यामुळें संस्थानें खालसा केल्यास, प्रजा इंग्रजी अमलांत येऊन अधिक सुखी होईल असें कदाचित् त्याला वाटत असावें. परंतु त्यानें जीं राज्यें खालसा केलीं, तीं कांहीं सर्वच अव्यवस्थेच्या सबबीवर खालसा केलीं असें नाहीं. याशिवाय, त्यानें निरनि-राळ्या वेळीं निरनिराळीं राज्यें किंवा प्रांत खालसा करतांना जे तत्संबंधीं खलिते विलायतेला पाठविले आहेत, त्यांत आपल्या कृत्यांचें समर्थन करतांना त्यानें अशा कांहीं चमत्कारिक कोलांट उड्या मारल्या आहेत, कीं त्याचें त्यालाच पुष्कळ वेळां भान राहिलें नाहीं. अशा वेळीं मागें आपण काय लिहिलें व कसें लिहिलें, याचा त्याला विसर पडलेला दिसतो. त्याचे विद्वत्तापूर्ण खलिते वाचून पाहिले, तर त्याचा इंग्रजी राज्य वाढविण्याचा खरा उद्देश तेव्हांच नजरेस येतो. आणि म्हणूनच प्रजेच्या व गरीब संस्थानी रयतेच्या हिताची, त्यानें दाखविलेली कळकळ मान-भावीपणाची वाटते, आणि त्याचें ढोंग उघडकीस येतें, व त्यासंबंधी खलित्यांत तोडलेले तारे केवळ थापेबाजी वाटते. 'येन केन प्रकारेण' राज्यविस्तार करणें हाच त्याचा खरा हेतु होता. कधीं कांहींना कांहीं सबब उपस्थित करून, तर कधीं संस्थानिकांचे दत्तकपुत्र नामंजूर करून व त्यांचीं राज्यें निवारसी ठरवून, तर केव्हां संस्थानिकांच्या राज्यांत अव्यवस्था व घोंटाळा माजतो म्हणून राज्यें खालसा करण्याचा त्यानें सारखा सपाटा चालविला.

पंजाबप्रमाणें त्यानें ब्रह्मदेशाचा अर्धा भाग असेंच एक पुंडाईचें युद्ध उपस्थित करून इंग्रजी राज्यास जोडला. तो इतिहास वाचून तर कोणालाही लांडगा आणि कोंकरूं या जुन्या इसाब नीतींतील गोष्टीची आठवण होते. लांडग्याच्या मनांत एकदां कोंकराला मारावयाचें आलें म्हणजे मग त्याला कोणतीही सबब पुरी होते. ब्रम्ही युद्धाचें कारण असेंच मजेदार आहे. शेफर्ड नांवाच्या एका इंग्रज व्यापा-

ऱ्याच्य। हातूत एका ब्रम्ही खलाशाचा खून झाला, असें रंगूनच्या अधिकाऱ्यास समजलें. ब्रम्हदेशचे अधिकारी इंग्रजांस मुळांतच भीत होते. परंतु खुनासारखा घोर अपराध घडल्यामुळें आणि खून झालेल्या इसमाच्या भावानें त्यांच्याकडे त्यासंबंधीं तक्रार केल्यामुळें, त्यांना त्या प्रकरणाची चौकशी करून शेफर्डवर खटला करावा लागला. शेफर्डवर गुन्हा शाबीद झाला, परंतु इंग्रजी सत्तेच्या भीतीनें ब्रम्ही अधिकाऱ्यांनीं त्याला फक्त ९९९ रुपये दंड केला. इतरही इंग्रज व्यापारी तेथें असेच उद्दामपणानें वागत असत. त्या वेळीं इंग्रज कंपनी व इंग्रज व्यापारी यांना पैसा कसा मिळवावा एवढेंच फक्त कळत होतें. कंपनीचे विलायतेंतील अधिकारी नेहमीं असें लिहित कीं, 'राज्याचा बंदोबस्त शांतपणें व उत्तम रीतीनें होऊं द्या' परंतु इकडे पैसे मात्र भरपूर पाठवा. या कंपनीच्या आश्रयानें हिंदुस्थानांत व ब्रह्मदेशांत व्यापार करीत असलेले इंग्रज व्यापारी असेच द्रव्यलोभी बनले होते. ते ब्रम्ही लोकांना त्यांच्या देशांत जाऊनही जुमानीनात, आणि पैशासाठीं तेथें अनेक अत्याचार करूं लागले. तेव्हां त्यांच्यावरती तेथें खटले करण्यांत आले. इंग्रज व्यापाऱ्यांना अर्थात्‌च आपला हा मोठा अपमान झाला असें वाटलें व त्यांनीं गव्हरनर जनरलकडे त्या अन्यायाविरुद्ध तक्रार नेली. गव्हरनर जनरलनें दोन लढाऊ आगबोटी बरोबर देऊन लांबर्ट यास ताबडतोब तिकडे पाठविलें. कारण कंपनीच्या इभ्रतीवरच बर्मी लोकांनीं घाला घातला होता. कंपनीचे व्यापारी ब्रम्ह-देशांत गेले, व तेथें त्यांनीं एखादा गुन्हा केला, तरी त्यांचा न्याय करण्याचा ब्रम्ही लोकांना काय अधिकार ? इंग्रज व्यापारी वाटेल तेथें व्यापाराच्या निमित्तानें घुसतील, परंतु त्या देशाचे कायदे त्यांना लागू व्हावयाचे नाहींत, तेथील सरकारी कोर्टाला त्यांचे खटले चालवितां यावयाचे नाहींत, ही इंग्रजी वहिवाट आहे. त्या सरकारनें तसा प्रयत्न करतांच इंग्रज प्रजाजनांच्या संरक्षणार्थ म्हणून इंग्रजी सैन्य व आरमार तेथें थडकलेंच, म्हणून समजावें. परंतु तुमच्या इंग्रज व्यापाऱ्यांना तेथें आमंत्रण कोणीं दिलें होतें ? ब्रम्हदेशांत फायद्याकरितां जावयाचें तर तेथील कायद्यापुढें मान लववावी, नाहींपेक्षां आपल्या देशांत निमूटपणें परत यावें. पण हा साधा व सरळ न्याय लांडग्याला कोंकरानें कसा समजावून द्यावा ? इंग्रज व्यापाऱ्याला शिक्षा करूं पाहणाऱ्या उद्दाम ब्रम्ही गव्हर्नरला नोकरीवरून काढून टाका व आमच्या गरीब व्यापाऱ्यांची ९९४८ रुपये नुकसानभरपाई करून द्या, असा निरोप ब्रम्हदेशच्या राजाकडे पाठविण्यांत आला. बिचाऱ्यानें त्या दोन्ही अटी कबूल केल्या ! तेव्हां इंग्रज अधिकाऱ्यांना ब्रम्ही गवर्नरच्या मुलाखतीस जातांना

पंधरा मिनिटें उन्हांत रहावें लागलें, याबद्दल रंगूनच्या अधिकाऱ्यास काढून टाका आणि दहालाख रुपये दंड द्या, अशा नव्या अटी रंगूनच्या राजापुढें ठेवल्या गेल्या. राजानें या अटी मात्र सहजासहजीं मान्य केल्या नाहींत. कारण तो जरी इंग्रजांना अतोनात भीत होता, तरी इतका पैसा त्या वेळीं त्याच्याजवळ नव्हता. आणि त्यामुळें हें युद्ध सुरू झालें. इंग्रजांनीं दक्षिण ब्रम्हदेश जिंकून घेतला आणि तो आपल्या राज्यास जोडला, आणि खालीलप्रमाणें एक धमकीचें पत्र राजास लिहून पाठविलें. 'बळी तो कान पिळी' हाच न्याय येथें लागू करण्यांत आला.

" ब्रिटिश लोकांस त्रास दिल्याबद्दल नुकसान भरून मागत असतां तें राजानें न दिल्यामुळें आम्हांस शस्त्राच्या जोरावर तें भरून घ्यावें लागलें. आम्हीं अनेक शहरें व किल्ले काबीज केले. आणि सर्व ठिकाणीं ब्रम्ही फौजेचा पाडाव केला. पेगू प्रांत आतां आमच्या ताब्यांत आला आहे. वेळेवर जागें होण्याचा उपाय तुम्हीं फुकट घालविल्यामुळें, आमचें झालेलें सर्व नुकसान भरून येण्यासाठीं पेगू प्रांत यापुढें आमचेकडे राहील. येथील ब्रम्ही फौजेस हांकून देऊन आम्ही सर्व व्यवस्था करूं. पेगूच्या रयतेनें आमच्या न्यायी अमलाखालीं निर्भयपणें सामील व्हावें. जरूर तेवढें नुकसान भरून घेतल्यामुळें आतां जास्त मुलूख घेण्याची आमची इच्छा नाहीं. तथापि यापुढें आव्हाचें दरबार आमच्या विरुद्ध जाईल, तर त्याचा सूड उगविण्यास इंग्रज सरकार मागेंपुढें पाहणार नाहीं. "

या पत्रानें तहाचें सर्व काम भागलें. निराळा तहनामा करण्याइतकें महत्व लॉर्ड-डलहौसीच्या दृष्टीनें आव्हा येथील दरबारास नव्हतें. कारण तें सरकार निर्बळ होतें. दक्षिण ब्रम्हदेश जिंकून आपल्या राज्यास जोडल्यामुळें आव्हा दरबार खालून व वरून दोन्हीकडूनही इंग्रजांच्या पुऱ्या पकडींत सांपडलें. लॉर्ड डलहौसी ही गोष्ट पूर्णपणें जाणून होते, कीं आपण मनांत आणूं त्या दिवशीं चुटकीसरसें आव्हाचें राज्य धुळीस मिळवूं. त्यामुळें फक्त असा धमकीवजा खलिता पाठवून त्यानें आव्हा दरबारची बोळवण केली. इंग्रज व इंग्रज व्यापारी वाटेल तेथें जातील व वाटेल तें करतील. त्यांचा तो निसर्गदत्त हक्कच आहे. दरबारनें त्यांचा कोणत्याही तऱ्हेनें अपमान करूं नये व त्यांना कोणताही त्रास देऊं नये. दिल्यास त्यांचें पाठीराखें इंग्रज सरकार धावून येईल, व दरबारचा एका क्षणांत चुराडा करील. याला काय न्याय म्हणावा कीं नीति म्हणावी ! ब्रह्मदेशचे राजानें वाटेल तें करण्याची मुभा देऊन इंग्रज व्यापाऱ्यांना काय मुलाच्या मुंजीकरितां आपल्या राज्यांत आमंत्रण दिलें होतें ? त्यांनीं खुनासारखे भयंकर अपराध केले म्हणून

त्यांच्यावर खटले झाले, व इंग्रजांच्या भीतीनें त्यांना शिक्षा देखील सौम्य म्हणजे दंडाचीच देण्यांत आली. मग त्यांत अपमान कशाचा! बरें इतक्याउपर ब्रह्मदेशाचे कायदे इंग्रज व्यापाऱ्यांना रुचत नव्हते, तर त्यांनीं आपला गाशा गुंडाळून परत इंग्रजी हद्दींत जावयाचें होतें. त्यांना परत जाण्याची कोणीं आडकाठी केली होती ! परंतु त्याबद्दल दहा लाख रुपयांची मागणी करणें, आणि ती मागणी पुरविली नाहीं म्हणून अर्धाप्रांत जिंकून घेणें, हा केवळ **'बळी तो कान पिळी'** न्याय झाला.

काबडेननें यासंबंधी फार मजेदार हकीगत पार्लमेंटरी साक्षी पुराव्यांच्या ( १८५३ ) आधारें प्रसिद्ध केली आहे. " ब्रम्हदेशच्या राजानें इंग्रजांच्या पहिल्या अटी तर कबूल केल्याच होत्या, परंतु दहा लाख रुपये खंडणी हप्त्याहप्त्यानें देण्याचेंही बिचाऱ्यानें अखेर कबूल केलें. परंतु राजाचें उत्तर येई तोंपर्यंत डलहौसीनें धीर तर धरला पाहिजे. इतक्या दूर पत्र जाऊन त्याचें ताबडतोब उत्तर येण्याला त्या काळीं निदान ४२ दिवस लागत होते. परंतु लार्ड डलहौसीनें ३५ दिवसांनंतरच लढाईला सुरवात केली. त्यामुळें राजाचें पुढें आलेलें उत्तर निरुपयोगी ठरलें. त्यापूर्वी, या प्रकरणीं बोलाचाली करण्यास गेलेला लांबर्ट रंगून येथें इतका उद्दामपणें वागला कीं सांगतां सोय नाहीं. राजाचें जहाज खाडींत नांगरून स्वस्थ पडलें होतें, तें त्यानें गवर्नर जनरलची परवानगी न घेतां आपल्या ताब्यांत घेतलें. किनाऱ्यावरील लोकांनीं या गोष्टीला साहजिकच अडथळा केला, तेव्हां त्यांच्यावर इंग्रजी जहाजांवरून तोफांचा भडिमार करून हजारों लोकांना यमसदनीं पाठविण्यांत आलें. आणि इंग्रजांना खुश करण्याकरितां राजानें रंगूनचा जुना गवर्नर बदलून नवा पाठविला, तेव्हां अनाहूत व प्रथम भेटीची वेळ मुक्रर न करतां हा लांबर्ट तिकडे गेला. आलेल्या थोर पाहुण्यांचें योग्य स्वागत न झालें तर तिकडून ते रागावतील, तेव्हां स्वागताची तयारी करण्याकरितां गवर्नरला थोडा वेळ लागला. लागलीच लांबर्टचें पित्त खवळलें. इंग्रज कंपनीच्या अधिकाऱ्यांचा काय हा अपमान ! त्यांना पंधरा मिनिटें उन्हांत उभें रहावें लागलें. झालें ! एवढ्या निमित्तानें दहा हजार रुपयांची खंडणी दहा लाखांवर जाऊन पोहोंचली, आणि ती वाटाघाट होण्यापूर्वीच पेगू प्रांत जिंकून घेण्यांत आला. लढाईपेक्षां कत्तल हेंच नांव या युद्धाला शोभते. बिचाऱ्या ब्रम्ही लोकांजवळ धड हत्यारें देखील नव्हतीं. तोफांचा मारा करतांच त्यांची कत्तल उडाली.' कदाचित पेगू प्रांतांत सोन्याच्या खाणी आहेत, या वार्तेमुळें व तेथील नदीचें जुनें संस्कृत नांव सुवर्णरेखा असल्यामुळें या प्रा

मील[illegible]ष्टी मिळाल्यानें डलहौसीनें एवढी धडपड केली असावी, असा ?ेसन या [illegible] लेखकाचा तर्क आहे. तें कसेंही असो, ब्रम्हदेशावर लाल रंग फासण्यांत [illegible], व इंग्रजांचें वैभव वाढलें।

सिकीमच्या बाबतींतही हाच प्रकार घडून आला. सिकीमच्या हद्दींतील दार्जि-लिंग इंग्रजांना फार आवडलें, कारण तेथील हवा पाणी फारच उत्तम आहे. त्यामुळें तें ठिकाण त्यांनीं आपणाकडे घेतलें व त्याबद्दल सिकीमच्या राजाला सहा हजार रुपये सालीना देणगी देण्याचें ठरविलें. इंग्रजांचे व्यापारी तेथें घुसून तेथील जमिनीची लागवडीच्या दृष्टीनें पहाणी करूं लागले. राजाला हा प्रकार अर्थातच आवडला नाहीं. त्यानें व्यापाऱ्यांना तेथून निघून जावयास सांगितलें, परंतु त्यांनीं राजाची आज्ञा धाब्यावर बसविल्यामुळें त्यांना अटक करणें राजाला भाग पडलें. डलहौसीनें सिकीमच्या राजापासून, त्याला ह्या उद्दामपणाचें शासन घडावें म्हणून, त्याच्या राज्याचा कांहीं भाग जिंकून घेतला. या मुलखांत हल्लीं चहा कॉफीची उत्तम लागवड होत असते. नेपाळ व भूतान या दोन स्वतंत्र संस्थानां-मध्यें सिकीम वसलें आहे. सिकीममध्यें याप्रमाणें चंचुप्रवेश झाल्यामुळें शेजा-रच्या नेपाळ भूतानावर व हिमालयापलीकडील तिबेटवर नजर टाकणें इंग्रजांना सोपें झालें. सिकीमांतून हे तिन्ही प्रांत इंग्रजांच्या नजरेच्या टापूंत येऊं शकतात.

दक्षिणेंतील अर्काट हें मुसलमानी संस्थान गादीला वारस नाहीं, या सबबी-वर १८५५ मध्यें खालसा करण्यांत आलें. याच अर्काटच्या नवाबामुळें इंग्र-जांचा हिंदुस्थानांत प्रथम शिरकाव झाला. अर्काटच्या नबाबाच्या मदतीमुळें दक्षिणेंत इंग्रजांचें पाऊल फ्रेंचांच्या विरुद्ध पक्केपणें रोवलें गेलें. शंभर वर्षांच्या कार-कीर्दींत बिचाऱ्या कर्नाटकाच्या नबाबांचे हक्क उत्तरोत्तर कमी कमी होत गेले. अखेर महमद गऊसखां हा शेवटचा नबाब वारल्यामुळें इंग्रजांनीं तें राज्य खालसा केलें. त्याचा कायदेशीर वारस अजीमशहा याला नबाब ही पदवी देण्याचें इंग्रजांनीं नाकारलें. या नबाबाच्या पूर्वजांपासून वेळोवेळीं नवे तहनामे करून घेऊन, सर्व मद्रास प्रांताच्या सनदा इंग्रजांनीं पटकावल्या होत्या. नबाब त्या प्रांताचे खरे मालक व इंग्रज कारभारी असें दिखाऊ नातें १८५५ पर्यंत चाललें होतें. परंतु या दिखाऊ नबाबीचा शेवट करावा अशी महमंद गऊसखां मरतांच लार्ड हारि-सनें शिफारस केली व लार्ड डलहौसीनें ती ताबडतोब मंजूर केली.

शहाजी महाराजांनीं तंजावरमध्यें स्थापन केलेलें व पुढें मराठ्यांवरील अड-णीच्या काळीं छत्रपती राजारामाला आश्रयस्थान झालेलें मराठी राज्यही याच

कारकीर्दीत खालसा झालें. तंजावरचे शेवटचे शिवाजी महाराज १८५५ परलोकवासी झाले. त्यांना मुलगा नव्हता, परंतु मुलगी मात्र होती. त्यांच्या त्यांच्या मुलीला गादी मिळावी अशी तेथील रेसीडेंटानें शिफारसही केली आणि उदाहरणादाखल १७३५ सालीं गादीला कोणी पुरुष वारस नव्हता, त्या वेळच्या परलोकवासी महाराजांची विधवा राणी गादीवर बसली होती गोष्ट त्यांनीं मुद्दाम नमूद केली. परंतु हा दाखला व ही शिफारस लॉर्ड डलहौसीला कशी रुचावी ? मुलीला गादी देण्यासारखें स्त्रीदाक्षिण्याचें पाप त्याच्या हातून कसें होणार ? कर्नाटकप्रमाणेंच तंजावरचीही गति झाली. आक्टोबर १८५५ मध्यें, कर्नाटक व तंजावर हे दोन्ही प्रांत ब्रिटिश राज्यांत सामील झाले. महाराजांची विधवा राणी कामाक्षीबाई यांनीं कंपनीवर मद्रास हायकोर्टात यासंबंधी दावा लावला व कोर्टानें त्यांच्या बाजूनें निकालही दिला. परंतु कंपनीनें त्यावर विलायतेस प्रिव्ही कौन्सीलकडे अपील केलें. प्रिव्ही कौन्सीलनें खालच्या कोर्टाचा निवाडा–कंपनीचें कृत्य राजकीय ( an act of state ) असल्यामुळें तें रद्द करण्याचा अधिकार कोर्टाला नाहीं,–या सबबीवर उलटविला, व कामाक्षीबाई आपल्या वंशपरंपरागत राज्याला कायमच्या मुकल्या. मात्र प्रिव्ही कौन्सिलनें तंजावरचे एकंदर सर्व जुने कागदपत्र पाहून, कंपनीच्या कृत्याला तंजावरची लूट असें नांव देऊन त्याचा धिक्कार केला. कारण तंजावरचें राज्य फारच जुनें–शिवाजी महाराजांच्याही पूर्वीचें म्हणजे शहाजी राजांनीं मिळविलेलें व त्यांच्याकडून व्यंकोजीकडे आलें होतें. त्यामुळें तंजावरचा राजा कंपनीचा बरोबरीच्या नात्यानें स्नेही होता. तो कंपनीचा मांडलिक नव्हता किंवा कंपनीकडून त्याला ती मेहरबानीनें जहागीरही मिळाली नव्हती. त्यामुळें राजाला कोणी वारस नसला तरी कंपनीचा त्या राज्यावर कसा हक्क पोहोंचतो ? परंतु कंपनीच्या कृत्यावर अन्यायी व जुलमी असा शिक्का मारूनही, प्रिव्ही कौन्सीलनें खालच्या कोर्टाचा निर्णय एका क्षुल्लक बाबीवर जोर टाकून फिरविला, व कामाक्षीबाईचें राज्य अखेरीस गेलें तें गेलें. फार जुनें असें मराठ्यांचें दक्षिणेंतील हे चिमुकलें असलें तरी, अत्यंत अभिमानास्पद संस्थान खालसा होऊन इंग्रजी राज्याला जोडले गेलें. राजा बेवारशी होता ही सबब खोटी होती. दत्तक इंग्रजांना मंजूर करावयाचा नव्हता, तर राजाच्या मुलीकडे संस्थानची मालकी जावयास हवी होती. त्यावेळीं खुद्द इंग्लंडांत राजाला पुत्र नाहीं, आणि राजाच्या भावालाही पुत्र नाहीं, म्हणून मृत राजाची पुतणी विक्टोरिया गादीवर असतांना

शेवट[illegible] शिवाजी राजाची मुलगी मात्र तंजावरच्या गादीची वारस ठरूं शकली ना[illegible]हा दैवदुर्विपाक होय.

[illegible]यप्रदेशाच्या पूर्वेस असलेलें संबलपूरचें लहानसें संस्थान गादीला [illegible] नाहीं या सबबीवर इंग्रजी राज्यांत मिळविण्यांत आलें. राजा नारायणसिंह हे[illegible]थील शेवटचे राजे होत. बुंदेलखंडांतील जैतपूर संस्थानाचीही त्याच कारणानें तीच गत झाली. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें घेतलेला दत्तकपुत्र मानावयाचा नाहीं. कारण इंग्रज लोकांत दत्तक घेण्याची वहिवाट नाहीं. आणि मुलीला किंवा इतर निकटच्या गोत्रजाला इंग्रजी वहिवाटीप्रमाणें व धर्मानुसार वारस समजावयाचें नाहीं, कारण अख्रिस्ती लोकांना ख्रिस्ती कायदा लागू नाहीं, अशी या वारस प्रकरणाची कंपनीची मीमांसा आहे. माझें तें माझेंच व तुझें तेंही माझें, असाच हा न्यायाचा मासला होय.

सिंधमधील खैरपूर संस्थान हें देखील खालसा करण्यांत आलें. इंग्रजांनीं सिंध प्रांत जेव्हां जिंकिला तेव्हां खैरपूरच्या अमिराचा भाऊ अल्लीमुराद हा इंग्रजांना फितुर झाला आणि आपल्या भाईबंदांविरुद्ध लढला. खैरपूरचें लहानसें संस्थान अर्थातच इंग्रजांनीं त्याच्याकडे राहूं दिलें. परंतु अल्लीमुरादला आपल्या राज्याचा नीट बंदोबस्त ठेवतां येत नाहीं, आणि त्यामुळें सर्वत्र बंडाळी माजली या सबबीवर १८५३ सालीं त्याचेंही संस्थान खालसा करण्यांत आलें. एक लहानशी जाहागीर मात्र त्याचेकडे राहूं देण्यांत आली.

या लहान लहान प्रांतांशिवाय लार्ड डलहौसीनें जो सर्वांत मोठा डल्ला मारला तो मध्यप्रांत–वऱ्हाड या प्रांताचा होय. ह्या प्रांताचें क्षेत्रफळ विस्तृत असून उत्पन्नही दांडगें आहे, आणि लोकसंख्याही बरीच आहे. हा प्रांत इंग्रजी राज्याला जोडून लार्ड डलहौसीनें साम्राज्याचा विस्तार व शक्ती वाढविली. हे दोन्ही प्रांत पूर्वी विभक्त होते. मध्यप्रांत नागपूरच्या भोंसल्यांच्या ताब्यांत होता, आणि वऱ्हाड निजामचा एक सुभा होता. मध्यप्रांत मराठ्यांपासून इंग्रजांनीं उपटला तर वऱ्हाड मुसलमानांपासून बळकावला. हिंदु व मुसलमान यांच्यांत इंग्रज कोणताच भेदाभेद करीत नाहींत, दोघांनाही समान रीतीनें वागवतात याचें हें उत्तम उदाहरण आहे! गादीला वारस उरला नाहीं या सबबीवर मध्यप्रांत खालसा करण्यांत आला, तर राजाला राज्याची नीट व्यवस्था राखतां न आल्यामुळें कर्ज झालें, म्हणून त्या कर्जफेडीकरितां वऱ्हाड प्रांत इंग्रजी अमलाखालीं घेण्यांत आला.

इ. स. १८१८ सालीं पेशवाईचे बारा वाजले, तेव्हां सर्व मराठे स[illegible] रांना ही गोष्ट आवडली नाहीं. भोंसले, शिंदे व होळकर यांना पृथक् पृथक् गांठून इंग्रजांनी त्यांचा पराभव केला, व आपल्या तैनाती फौजेचें बिऱ्हा[illegible] पाठीवर पूर्वी लादलें होतें, तें अधिक पक्कें व जड केलें. आमची फौज तुमच्या राज्यांत तुमच्या राज्याच्या बंदोबस्ताकरितां राहूं द्या. फौज आमची, फौजेवरील अधिकारी आमचे, व हुकमतही आमची. फक्त फौजेचा खर्च सोसण्याची जबाबदारी मात्र तुम्हां संस्थानिकांची, अशा अपूर्व स्वरूपाची ही तैनाती फौजेची पद्धति मार्क्विस वेलस्लीच्या डोक्यांतून निघाली आणि ती त्यानें निरनिराळ्या तहांनीं हिंदी संस्थानिकांच्या माथीं मारली. निजाम ( १७९८ ) व बडोदें सरकार ( १८०१ ) यांनीं तैनाती फौज ठेवण्याचा करार केला, व उघड्या डोळ्यांनीं ते इंग्रजांचे मांडलिक बनले. शिंदे, होळकर व भोंसले यांची सत्ता व शक्ति त्या वेळीं फार मोठी होती. त्यांच्यावर तैनाती फौजेचें जोखड लादणें सहज नव्हतें. कारण मराठी साम्राज्यानें एकवटून इंग्रजांशीं युद्ध पुकारलें असतें, तर त्या वेळीं इंग्रजांची धडगत नव्हती. वेलस्लीनें त्यामुळें निराळाच पेंच लढविला. प्रसिद्ध मुत्सद्दी व राज्यकार्यधुरंधर नाना फडणवीस याच्या मृत्यूनंतर पुणें दरबारांत जी चौंचिंधी माजली तिचा फायदा घेऊन इंग्रजांनीं आपला हात तेथें शिरकावला, आणि बाजीराव पेशव्याला बगलेंत मारून १८०२ मध्यें त्याच्याशीं वसईचा तह केला, आणि तैनाती फौज त्याच्या माथीं मारली. मराठेशाहीचा मुख्य पेशवा, तो हातीं धरल्यामुळें इंग्रजांचें कार्य सोपें झालें. पेशव्याच्या नांवावर त्यांनीं इतर मराठे सरदारांशीं लढाया सुरू केल्या व तैनाती फौज त्यांच्याही माथीं मारली. 'तुमचा धनी पेशवा हा आमचा मित्र आहे. त्यानें आमच्याशीं स्वतंत्र तह करून आमची तैनाती फौज ठेवून घेतली, व आमचें मांडलिकत्व कबूल केलें. मग तुम्ही तर पेशव्यांचे मांडलीक, तेव्हां तुम्हांलाही आमची फौज ठेवून घेतली पाहिजे, नाहीं पेक्षां आमचा परम प्रिय मित्र पेशवा याच्या वतीनें तुम्हां बंडखोर सरदारांशीं लढाई पुकारणें आम्हाला भाग आहे. मालकाचें अनुकरण तुम्ही करणार नाहीं, व त्याच्या आज्ञा धाब्यावर बसवाल तर तुम्हाला बंडखोर म्हटलें पाहिजे,' या तर्कपद्धतीस अनुसरून १८०३ ते १८०५ पर्यंत शिंदे, भोंसले व होळकर या प्रमुख मराठे सरदारांवर तैनाती फौजेचे तह लादण्यांत आले. याप्रमाणें हिंदुस्थानांत आपलें सामर्थ्य व सत्ता वाढविण्याकरितां, या तैनाती फौजेच्या युक्तीनें इंग्रजांना ठिकठिकाणीं मातबर सैन्य बिना खर्चानें ठेवतां आलें. फौज इंग्रजांची पण

खर्च मात्र परभारें संस्थानिकांच्या शिरावर! कारण विलायतच्या नीया ईस्ट इंडिया कंपनीला राज्यविस्तार हवा असला तरी, भांडवलावर म हवा होता. तेव्हां अशीच कांहीं तरी युक्ती योजणें लार्ड वेलस्लीला भाग पडलें. त्याच्या सुपीक मेंदूतून ही कल्पना निघाली. हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य तर वाढावें, परंतु फौजेकरितां किंवा लढायांकरितां पैसे मात्र खर्च करण्यांत येऊं नयेत, कारण भागीदारांना सपाटून मिळणारा मुनाफा लवमात्र कमी होतां कामा नये. 'राज्य वाढवा, इंग्रजांची सत्ता वाढवा, जे संस्थानिक इंग्रजी सत्तेला जुमानणार नाहींत त्यांचा पराभव करा, राज्याचा बंदोबस्त चांगला ठेवा, परंतु पैसे मात्र खर्च करूं नका, तर उलट शक्य तितके पैसे इकडे रवाना करा व कंपनीच्या भागीदारांना संतुष्ट ठेवा,' हा असा उपदेश डायरेक्टरांच्या बोर्डाकडून हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांना वारंवार करण्यांत येत असे. या उपदेशानुसार अधिकारीही इकडे वर्तन ठेवीत असत. वेलस्लीच्या सुपीक मेंदूतून निघालेल्या या तैनाती फौजेच्या पद्धतीचें कोण कौतुक करणार नाहीं?

हा तैनाती फौजेच्या पद्धतीचा प्रचंड हत्ती पोसणें संस्थानिकांनाही जड होई. कारण आपल्या राज्याचा बंदोबस्त उत्तम रीतीनें ठेवावयास जावें, तर राज्यांतील वसूल कारभारांतच खर्च होई. त्यामुळें कर्ज काढूनच त्यांना हा हत्ती पोसावा लागे. बरें, कर्ज वाढलें तर इंग्रज डोळे वटारून बजावीत कीं, 'तुम्हांला राज्यकारभार चांगला करतां येत नसल्यामुळें संस्थानाचें कर्ज सारखें वाढत आहे. अशीच स्थिति चालू राहिली तर आम्हांला संस्थान तरी खालसा करणें भाग पडेल, किंवा कारभार तरी निदानाचा आपल्या हातीं घ्यावा लागेल.' तैनाती फौज व तिचा खर्च कमी होण्याची आशाच नव्हती. उलट ही फौज वाढविण्याबद्दल इंग्रजांचा सारखा आग्रह चालू असे. संस्थानिकांनीं स्वतांच्या हुकमतीखालीं असणारी फौज वाटल्यास कमी करावी पण तैनाती फौज वाढवावी, हें इंग्रजांचें व त्यांच्या रेसीडंटांचें धोरण असे. देशांत कुठें बंडाळी झाली कीं त्या गोष्टीचा फायदा घेऊन, तहाची उजळणी होऊन तैनाती फौज वाढलीच! एक संस्थानिक वारला व दुसरा गादीवर बसण्याची वेळ आली कीं पुन्हा तहाची उजळणी व तैनाती फौजेची वाढ! प्रसंगविशेषीं तर एखाद्या संस्थानिकाचा भाऊ, पुतण्या किंवा चुलता किंवा जांवई, इंग्रज रेसिडंटाशीं बोलणें करी कीं, मला गादीवर बसवाल तर मी हल्लींपेक्षां अधिक तैनाती फौज ठेवून घेईन, व तुमचे उपकार फेडीन. रेसिडंट अर्थातच संस्थानिकाला तंबी देई कीं, 'बोल, तूं अधिक तैनाती फौज ठेवून घेतोस

किंवा तुला गादीवरून काढून टाकून तुझ्या त्या नातलगाला गादीवर बसवूं. तो अधिक प्रामाणिक दिसतो. कारण तूं आहे ह्या लहान फौजेच्या खर्चाचीच सदा रड गातोस, पण त्याला तर अधिक फौज ठेवून घेण्याची हिंमत आहे.' आपल्याच भाऊबंदांनीं याप्रमाणें पेंचांत धरून गळा कापल्यावर बिचारा संस्थानिक तरी काय करतो ? वाढत्या तैनाती फौजेचें लचांड तो निमूटपणें कबूल करीत असे. बरें, एखादा संस्थानिक तसाच बाणेदार निघाला व इंग्रजांच्या अटी कबूल करण्याचें त्यानें नाकारलें तर त्याला गादीवरून ओढून त्याच्या भाऊबंदाला तख्तनशीन करण्यास इंग्रज तयारच असत. बिचाऱ्याचे हाल मग कुत्राही खात नसे. कारण अटी, नाकारल्यामुळें इंग्रजांचें शत्रुत्व, व केसानें गळा कापण्यास तयार झालेल्या नातलगाची भाऊबंदकी, या दुपाती कात्रींत सांपडून त्याचे व त्याच्या कुटुंबाच्या संसारसुखाचे वाभाडे निघत. या तैनाती फौजेच्या पायीं संस्थानिकांना सुखाची झोंप देखील येत नसे. तिचा वाढता खर्च कसा पुरवावा या विवंचनेंत ते गढून जात असत. या सदोदित वाढणाऱ्या ब्रम्हस्वामुळें त्यांनाही प्रजेपासून द्रव्य उकळावें लागे. राजापासून खालच्या अधिकाऱ्यापर्यंत सर्वांचीच दृष्टी राज्यकारभारापेक्षां किंवा प्रजेच्या सुखसोयीपेक्षां द्रव्यार्जनावरच खिळली असे. अशा वाहत्या गंगेंत खालचे अधिकारीही मनमुराद बुचकळ्या मारीत असत. यामुळें प्रजेपासून जेव्हां चार कोट रुपयांचा वसूल होई, तेव्हां राजाच्या खजीन्यांत कोट अर्धाकोटीचा भरणा होत असे. त्यामुळें प्रजा गांजली जाई व नको हा संस्थानी अंमल असें तिला होई. आणि इंग्रजांचें देणें वेळेवर दिलें, म्हणजे या सर्व अंदाधुंदीकडे त्यांच्याकडून सहजच दुर्लक्ष होई. कारण संस्थानच्या अंतर्गत कारभारांत हात घालण्याची इंग्रजांची आतांप्रमाणेंच तेव्हांही मुळीच इच्छा नव्हती. त्या वेळीं संस्थानी प्रजेवर जुलूम होत असे हें खरें; पण या जुलमाचें पाप अप्रत्यक्षपणें इंग्रजांच्या माथीं मारणें भाग आहे. त्यांच्या तैनाती फौजेच्या खर्चाचें लोढणें दिवसेंदिवस जड होऊन संस्थानिक अधिकाधिकच कर्जाच्या व त्यामुळें पापाच्या कर्दमांत रुतत चालले होते. ते खर्चाचे अजस्र पाश तोडण्याची त्यांची हिंमत नव्हती. कारण जो अधिक ओझें उचलील तोच संस्थानचा अधिपति होण्यास लायक समजला जात असे. सिराजउद्दवल्याच्या जागीं मीरजाफर, मीरजाफरच्या जागीं मीरकासीम व पुन्हां मीर कासीमच्या जागीं मीर जाफरची नबाब म्हणून स्थापना करण्यास इंग्रज तयारच होते. तैनाती फौजेचें वाढतें लोढणें सांभाळलें म्हणजे झालें. या अपूर्व पद्धतीमुळें इंग्रजांनी हिंदुस्थानांत इतक्या लढाया मारल्या व इतके प्रांत

जिंकून घेतले, पण खर्चाचा एक छदाम देखील इंग्लंडला पडला नाहीं. सर्व परभारें साधत होतें. ईस्ट इंडिया कंपनीला या सर्व भानगडींतून केवळ नफाच उरत असे. फौजेचा एरवींचा खर्च संस्थानिकांच्या माथीं, युद्धाचा खर्च त्यांच्याच माथीं, शिवाय नुकसानभरपाई, खंडणी व लूट कंपनीला मिळे ती निराळीच! कंपनीला हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापन करण्यासाठीं भरपूर फौज व द्रव्य हिंदुस्थाननेंच या संस्थानिकांच्या द्वारा पुरविलें! १८२४ सालीं मार्क्विस ऑफ हेस्टींग्जनें (Hyderabad papers) स्पष्ट म्हटलें कीं, "संस्थानिकापेक्षां या फौजेवर आमचीच मालकी खरोखर असते. परंतु उगीच न्यायाची कल्पना ताणून, आमच्या सत्तेला बळकटी आणणारें असें बिनखर्चाचें साधन सोडून देणें गैरमुत्सद्दीपणाचें होईल, व नीतीचा असा कीस काढणें हें शहाणपणाला व कंपनीनें आमच्यावर टाकलेल्या विश्वासाला शोभणार नाहीं." या तैनाती फौजेच्या पायीं निझामला आपल्या राज्याच्या बऱ्याच मोठ्या भागाला मुकावें लागलें. हा प्रचंड पांढरा हत्ती सांभाळतां सांभाळतां निजामाच्या नाकीं नऊ आले. तरी बिचाऱ्यानें १८०१ सालीं टिपूच्या राज्यांतलें वाटणीदाखल त्याला मिळालेलें कडप्पाकर्नूल, बल्लारी, व अनंतपूर हे जिल्हे इंग्रजांना देऊन टाकले. तैनाती फौजेच्या खर्चाचा बोजा वाढत चालला व संस्थानाला इंग्रजांचें अधिकाधिक कर्ज होऊं लागलें, म्हणजे त्याचा बराचसा मुलूख कर्जाप्रीत्यर्थ दडपण्याची इंग्रजांची त्या वेळेची राजनीति होती. हा बोजा संस्थानाला जड होत आहे, म्हणून कर्जाची सूट देण्याचा व वार्षिक बोजा कमी करण्याचा विचारच त्यांच्या मनांत येत नसे. तसा धर्मपर व उदार विचार त्यांनीं केला असता तर इंग्रजांचें राज्य इतक्या झपाट्यानें या देशांत वाढलेंच नसतें. इंग्रजांची दृष्टी व त्यांचें वर्तन एखाद्या लोभी शायलॉकला शोभण्यासारखेंच असे. तैनाती फौजेमुळें निजामला झालेलें कर्ज १८५१ सालीं ७८ लाख रुपये झालें. त्या वेळीं लार्ड डलहौसीनें निजामला लिहिलें कीं, 'आपण आपलें कर्ज लौकर फेडा, नाहींपेक्षां ६५,००,००० रु० वार्षिक उत्पन्नाचा मुलूख आमच्या हवालीं करा, म्हणजे आम्ही आपले रुपये जलदीनें वसूल करून घेऊं.' या कर्जामुळें निजामला अत्यंत घोर चिंता लागली. कर्ज फेडलें नाहीं तर राज्याचा बराच मोठा लचका तोडला जाण्याचा संभव दिसूं लागला. त्यानें अतिशय प्रयत्नानें कर्जापैकीं ४०,००,००० रु० भरणा ताबडतोब केला. आणि बाकीचें कर्ज लवकर फेडण्याचें कबूल केलें. परंतु हें तैनाती फौजेचें लोढणें गळ्यांत कायमचें अडकलें असल्यामुळें, कर्जाची रकम कमी होण्याऐवजीं वाढूंच लागली. दोन वर्षांच्या आंतच कर्जाची रकम परत ४५,००,००० रुपयांवर येऊन पोहोंचली.

त्यामुळें डलहौसीची तब्येत गरम झाली आणि या कर्जफेडीकरितां निजामचा वऱ्हाडप्रांत घेण्याचा त्यानें निश्चय केला. ' जी सार्वभौम सत्ता मनांत आणील तर तुम्हांस एका क्षणांत चुरडून टाकील, अशा ब्रिटिश सरकारला तुम्ही पैशाच्या बाबतींत झुलवीत असल्यामुळें तुमच्या राज्याला धोका येईल हें जाणून असा,' असा उद्दाम खलीता डलहौसीनें ६ जून १८५१ रोजीं निजामला लिहिला. रीतीप्रमाणें औपचारिक वाटाघाट सुरू झाली व अखेरीस कलकत्त्यास नवीन तहनामा करण्यांत येऊन तो इंग्रज रेसिडेंटाकडे निजामच्या सहीकरितां पाठविण्यांत आला.

त्या वेळीं नबाब नसिरुद्दौला हे निजाम होते. या अपमानामुळें त्यांना अत्यंत संताप आला व पराकाष्ठेचें दुःख झालें. त्यानें रेसिडेंटाला परोपरीनें समजाविलें कीं, 'माझ्यासारख्या जुन्या खानदानी व स्वतंत्र राजानें आपला प्रांत इंग्रजांच्या स्वाधीन करणें मला मरणाइतकीच दुःखद व अप्रिय वार्ता आहे. तुम्हां इंग्रजांना जमीनीचें कांहीं विशेष प्रेम वाटत नाहीं. कारण आपण विलायतेहून येथें येतां व पेन्शन घेऊन परत विलायतला चालते होतां. आपला या देशाशीं कोणताच जिव्हाळयाचा संबंध येत नाहीं. परंतु माझा जन्म येथेंच झाला आणि माझीं हाडेंही येथेंच पडणार आहेत. यामुळें मी आपखुषीनें व संतोषानें या तहनाम्यावर कधींही सही करणार नाहीं. या तहनाम्यावर सही करणें म्हणजे आपल्या अब्रूला तिलांजलि देणें असेंच मला वाटत आहे.' याप्रमाणें बिचाऱ्या निजामानें परोपरीच्या विनवण्या केल्या. परंतु निर्दय सावकाराचें मन द्रवलें नाहीं. एका हातानें डोळयांतील अश्रु पुशीत असतां दुसऱ्या हातानें निजामला या तहनाम्यावर सही करावी लागली. कारण त्यांची ताबडतोब सही घ्यावी असा डलहौसीचा हैद्राबाद येथील रेसिडेंटला निकडीचा हुकूम होता. बिचाऱ्या निजामाला दुसऱ्या कोणाची सल्लामसलत घेण्याला किंवा विचार करण्याला वेळ देखील मिळाला नाहीं. २१ मे १८५३ रोजीं निजामची या तहनाम्यावर सही झाली. त्यानतर लौकरच हिंदुस्थान सरकारनें आपला जाहिरनामा प्रसिद्ध केला. इंग्रज सरकारच्या तैनाती फौजेच्या खर्चाची निजामला वेळच्या वेळीं फेड करतां न आल्यामुळें, कर्जफेडीकरितां हा मुलूख निजामकडून त्याच्या हिताच्या दृष्टीनेंच घेण्यांत आला, असें जाहीर करण्यांत आलें. या तहनाम्यानें निजामचा अखेरीस फायदाच होणार आहे, असें जाहिरनाम्यांत जाहीर झालें. याप्रमाणें अतिशय उत्पन्नाचा व सुपीक असा वऱ्हाडप्रांत, अहमदनगरपासून सोलापूरपर्यंतचे ७६ कसबे, नंदिदुर्ग, व कृष्णा आणि तुंगभद्रा या नद्यांमधील रायचूर दुआब, हा सर्व मुलूख ४५,००,००० रुपयांच्या कर्जफेडीकरितां इंग्रजांच्या

इंग्रजांच्या ताब्यांत आला. बिचारा निजाम हळहळला व रडला देखील! परंतु त्याचा कांहींच उपाय चालण्यासारखा नव्हता. त्याला आपल्या राज्याच्या बऱ्याच मोठ्या भागाला मुकावें लागलें. अशा वेळीं निर्बलाला रडण्याशिवाय दुसरा कोणता आसरा आहे ?

[illegible] तैनाती फौजेच्या पद्धतीमुळेंच नागपूरकर भोंसल्यांच्या घरांत इंग्रजांचा [illegible] प्रथम शिरकला. इ. स. १८०३ सालीं इंग्रजांनीं भोंसल्याशीं देवगांव येथें तह [illegible]. या तहामुळें कटकप्रांत इंग्रजांना मिळाला, आणि त्यामुळें इंग्रजांचें बंगाल मद्रास हे इलाखे जोडले गेले, आणि इंग्रजांची तैनाती फौज भोंसल्यांनीं नागपूरास ठेवून घेतली. दुसरा रघोजी आणि त्याचा आंधळा व खुळा मुलगा परसोजी हे गादीवर असतांना गाडें ठीक चाललें. कारण इंग्रजांच्या तंत्रानेंच, त्यांच्या हातांतील बाहुलीं बनून ते आपल्या राज्याचा कारभार चालवीत असत. परंतु परसोजीचा खून झाल्यानंतर आपासाहेब भोंसले गादीवर बसले. आपासाहेब फार शूर, तडफदार व स्वतंत्र बाण्याचे होते. त्यामुळें त्यांचें इंग्रज रेसिडेंटाशीं सूत जमेना. १८१८ सालीं आपासाहेबांची व इंग्रजांची लढाई जुंपली. याच सालीं इंग्रज बाजीराव पेशव्याशीं लढत असून पेशवाई घेण्याच्या नादांत असल्यामुळें, पेशव्यांशीं मैत्री ठेवूं पाहणारा बाणेदार व राजनिष्ठ मराठा संस्थानिक त्यांच्या डोळ्यांत खुपूं लागला. कारण त्यावेळीं मराठा-मंडळाची एकी झाल्यास त्यांना ती गोष्ट इष्ट नव्हती. आपासाहेबांनीं इंग्रजांविरुद्ध लढण्याचें ठरविलें, परंतु तहाची वाटाघाट करण्याच्या निमित्तानें, त्यांना त्यांच्या दरबारी मंडळीनें विश्वास दाखवून इंग्रजांच्या छावणींत नेलें आणि तेथें इंग्रजांकडून कैद ठरविलें. नागपुराहून त्यांना अलाहाबाद येथें नेण्यांत येऊन, तेथील किल्ल्यांत कैदेंत ठेवण्यांत आलें. परंतु आपासाहेब फार दिवस कैदेंत राहिले नाहींत. तेथून त्यांनीं आपली सुटका करून घेतली, तरी त्यांना नागपूरची गादी पुनः प्राप्त करून घेतां आली नाहीं. प्रथम अशीरगढ, नंतर लाहोर व शेवटीं जोधपूर याप्रमाणें आश्रयासाठीं भटकतच त्यांना आपलें अखेरचें आयुष्य घालवावें लागलें.

इकडे इंग्रजांनीं आपला पित्तु नागपुरच्या गादीवर बसविला. भोंसल्यांच्या जवळच्या नात्यांतीलच एका लहान मुलाला गादीवर बसविण्यांत येऊन इंग्रज रेसिडेंटच्या आज्ञेप्रमाणें नागपूरचा राज्यकारभार चालूं लागला. गादीवर अज्ञान वारस असला म्हणजे कंपनीचें बस्तान छान जमे. कारण मग सर्व सत्ता रेसिडेंटच्या हातीं राहून त्याला मनमाने तसा कारभार करतां येई. दुसऱ्या रघोजीची बायको

बाकाबाई ही मोठी कर्तबगार, बाई होती. तिच्या मांडीवरच हा मुलगा दत्तक देण्यांत आल्यामुळें तीच अज्ञानाची पालक होती. या वेळीं जो नवीन तह, इंग्रजांच्या वहिवाटीनुसार परंतु कोणतेंही कारण नसतांना करण्यांत आला, त्यामुळें इंग्रजांना नर्मदा नदीच्या कांठचा प्रदेश मिळाला, व थोडासा मध्यप्रांत त्यांच्या हवालीं झाला. मध्यप्रांतांतील हा चंचुप्रवेश होय.

१८२६ सालीं हा मुलगा वयांत आला. हाच नागपूर प्रांताचा अखेरचा राजा, तिसरा रघोजी भोंसला होय! ११ डिसेंबर १८५३ रोजीं तिसऱ्या रघोजीचा अंत झाला. त्यांना औरस संतति नव्हती. त्यामुळें दत्तविधानाचा प्रश्न पडला. रघोजीच्या नातलगांपैकीं एक जवळचा संबंधी दत्तक घेण्याचें ठरलें. बाकाबाईनें रेसिडेंट साहेबांची संमति विचारली. परंतु गवर्नर जनरलच्या आज्ञेशिवाय दत्तविधानाला मी संमती देऊं शकत नाहीं, असें त्यानें सांगितलें. त्यामुळें राजवाड्यांतील मंडळींना फार पंचाईत पडली. परंतु त्यांनीं दत्तविधानाचा समारंभ उरकून घेतला, व दत्तकाचें नांव जानोजी असें ठेवण्यांत आलें. या दत्तकाचा जन्म १८३४ सालीं राजवाड्यांतच झालेला होता. या मुलावर तिसऱ्या रघोजीचें फार प्रेम होतें. आणि महाराजांना पुत्र न झाल्यास हाच गादीचा वारस होईल, असें सर्वांना वाटत होतें. कारण महाराजांनीं त्याचा पुत्राप्रमाणेंच सांभाळ केलेला होता; आणि युवराजाप्रमाणेंच त्याचा मानमरातब सर्वांकडून ठेवला जात असे. या सर्व गोष्टी, व दत्तविधानाच्या समारंभाची हकिगत रीतीप्रमाणें गव्हरनर जनरलकडे सादर करण्यांत आली. हिंदु धर्मशास्त्राला अनुसरून दत्तकपुत्र मृत महाराजांचा उत्तराधिकारी असल्यामुळें, त्याच्याकडेच त्यांच्या राज्याचा वारसाही येतो, ही गोष्ट निरनिराळे दाखले देऊन स्पष्ट करण्यांत आली. भोंसल्यांचा इंग्रजांशीं जो मैत्रीचा तह झाला होता, त्या तहानुसार जानोजींना गादीवर बसविण्यांत यावें, अशी नम्र प्रार्थना शेवटीं करण्यांत आली होती. नागपूर येथील इंग्रज रेसिडेंटानें महाराजांच्या मृत्यूनंतर तीन दिवसांनीं जो रिपोर्ट केला, त्यांत ही दत्तविधानाची हकीगत नमूद केलेली आहे. दत्तविधान मंजूर करण्याबद्दल केलेल्या या सर्व प्रार्थना, निष्फळ झाल्या. दत्तक नामंजूर करण्यांत आला आणि भोंसल्यांचें राज्य खालसा झाल्याचा जाहीरनामा २६ जानेवारी १८५४ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें दत्तक घेण्यांत आला असूनही, तो मृत महाराजांनीं स्वतः न घेतां त्यांच्या राणीनें घेतला, हा कदाचित् डलहौसीच्या मतानें दोष असेल. परंतु हिंदुधर्मशास्त्राच्या दृष्टीनें ही गोष्ट अगदीं कायदेशीर आहे. तिसरे रघोजी ११ डिसेंबरला वारले व १४ डिसेंबरच्या रेसिडेंटच्या रिपोर्टांत

दत्तविधानाची सर्व हकीगत आलेली आहे. त्यामुळें दत्तविधान १४ डिसेंबरच्या आंत झालें होतें हें खास. मग रघोजी महाराजांच्या मृत्यूनंतर सरासरी दीड महिन्यानें, तिसरे रघोजी निपुत्रिक वारल्यामुळें त्यांचें राज्य खालसा करण्यांत आलें, या जाहिरनाम्यांतील घोषणेचा अर्थच लागत नाहीं. बरें ! जर दत्तविधान डलहौसीला नामंजूर होतें आणि तें बेकायदेशीर झालें असें त्याचें प्रामाणिक मत बनलें होतें, तर त्यानें रघोजीच्या निकटच्या आप्तांपैकीं कोणालाही नागपूरची गादी द्यावयाची होती. रेसिडेंटनें आपल्या रिपोर्टांत यशवंतराव व जानोजी हे दोघेही मृत महाराजांचे निकटचे संबंधी लागतात असाच स्पष्ट उल्लेख केलेला आहे. डलहौसीच्या मनांत पाप नव्हतें, तर त्यानें रघोजीच्या नातलगांच्या हक्कांचा विचार करून, त्यांच्यापैकीं अधिक जवळच्यास राज्याधिकारी करावयाचें होतें. परंतु यांपैकीं त्यानें कांहींएक न करतां, एकदम सर्व राज्यच्या राज्य खालसा केलें. बरें जानोजीचें दत्तविधान बेकायदेशीर झालें असें म्हणावें तर भोंसल्यांची खासगी मिळकत जानोजीच्याच सुप्रत करण्यांत आली. जानोजीराजे भोंसले हे डलहौसीच्या मतानें नागपूर राज्याचे कायदेशीर वारस नव्हते, परंतु भोंसल्यांच्या खासगी मालमत्तेवर त्यांचा पूर्ण वारसा होता. रघोजीचे ते दत्तकपुत्र म्हणून खासगी मालमत्तेची मालकी त्यांच्याकडे आली, परंतु तेंच दत्तविधान नागपूरची गादी त्यांना मिळण्याच्या मार्गांत आडवें पडलें. वा रे कायदा ! या कायदेबाजी कोड्याचा उलगडाच होऊं शकत नाहीं. तिसऱ्या रघोजीच्या खासगी इस्टेटीवर ज्या दत्तविधानामुळें जानोजी भोसल्यांचा हक्क लागू झाला, त्यानेंच नागपूरच्या राज्यावरही त्यांचा हक्क लागू होता. त्यामुळें जानोजींना गादी न देतां भोसल्यांचें राज्य खालसा करण्यांत डलहौसीच्या हातून अत्यंत मोठा अन्याय झाला असेंच म्हणणें भाग आहे. नागपूर खालसा करण्याबद्दल डलहौसीनें आपल्या कृतीचें पुष्कळ समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तें सर्व समर्थन लंगडें पडतें. कारण राजाला मुलगा नसला आणि दत्तक कायदेशीर रीतीनें घेण्यांत आला नसला तरीदेखील राज्य खालसा करणें न्याय्य ठरणार नाहीं. जुन्या तहाच्या दृष्टीनें, रघोजीच्या नातलगांपैकीं सर्वांत जवळच्या नातलगाला गादीचा वारस समजून राज्यावर बसविणें हाच एक न्याय्य मार्ग त्याच्यापुढें होता. त्याचा त्यानें स्वीकार केला नसल्यामुळें त्यानें दाखविलेलीं नावारसाचीं कारणें लंगडीं वाटतात.

जनरल लोनें मात्र या खालसापद्धतीवर बरीच कडक टीका केली. परंतु विलायतेंतील कंपनीच्या डायरेक्टरांनीं डलहौसीच्या निकालाला मान तुकविली. डलहौसीनें आपल्या खलित्यांत "मेलेल्या तिसऱ्या रघोजींची तर खोटीनाटी

नालस्ती केली, दत्तक घेतलेला मुलगा जानोजी हा रघोजीचा जवळचा नातलग आहे हें रेसिडेंटच्या पत्रावरून स्पष्टपणें ठाऊक असतां, त्याचा 'एक परका' 'एक मराठा तरुण' (मेजर बेल—Empire in India, pages 43-44) जणूं काय तो अलबत्या गलबत्या होता असा खोटाच उल्लेख केला, आणि राजाचा दत्तविधानाचा हक्क सर रिचर्ड जेंकिन्स व कर्नल स्पायर्स यांच्या पत्रांनीं पूर्णपणें सिद्ध होत असतां जबरदस्ती खोटेंच उलट लिहिलें, आणि सरते शेवटीं राणीला किंवा बांकाबाईला कांहींही कधींही न विचारतां असें धडाकून लिहिलें कीं, 'त्यांना दत्तक मुलासंबंधी आस्था वाटणें शक्य नसल्यामुळें त्याच्याकडे राज्य चालावें ही गोष्ट त्यांना त्यांच्या हिताच्या विरुद्ध वाटेल, व स्वाभाविक मत्सरामुळें या गोष्टीला त्या राण्या विरोध करतील; तेव्हां अशा स्थितींत दत्तकांकडे यापुढें नागपूरचें राज्य चालविणें अमानुषपणाचें ठरेल." अशा विपर्यस्त खलित्यांनीं त्यानें आपली बाजू रंगविली व कंपनीच्या डायरेक्टरांचें वरपांगी समाधान केलें, तरी इतरांना तें कसें पटावें ? तेव्हां त्या सुमारास विलायतेस लार्ड हॅरिसच्या सन्मानार्थ खाना देण्यांत आला, त्या वेळीं 'नागपूरचा अन्याय रशियन जुलमालाही मागें टाकील,' अशी त्या प्रकरणावर सुलीवाननें केलेली टीका कंपनीला व डलहौसीला अतिशय झोंबली असली तरी ती रास्तच होती.

कलकत्ता रिव्ह्यूमध्यें १८६३ सालीं (pages 230-31) या प्रकरणावर (बहुधा सर रिचर्ड टेंपलचा) एक लेख आला त्यांत म्हटलें होतें, "नागपूरसारखें राज्य जिंकणें कठीण गेलें असतें. त्याऐवजीं एकदां तें खालसा केल्यावर आपल्या ताब्यांत ठेवणें सोपें व सोयीस्कर आहे. राजाच्या नोकरांना पगार चांगला मिळे, व ते त्याच्याशीं कृतज्ञतेनें वागत. त्यांना लुचपत देऊन वश करणें कठीण काम होतें, व त्यांनीं लढाईत फार अडथळा केला असता." नागपूर खालसा होण्याचें हें देखील कारण असूं शकेल. नागपूरचें राज्य घशांत टाकण्याची ही सोन्यासारखी संधी चालून आल्यावर, तिचा अव्हेर करणें शहाणपणाचें नव्हतें. राजाला दत्तविधानाचा हक्क नव्हता, हें कारण गिळंकृतीचें खास नाहीं.

डलहौसीनें आपल्या कृत्याचें समर्थन करतां करतां आपल्या मनांतील निरंतर घोळत असणारे विचार कांहीं ठिकाणीं प्रगट केले आहेत. तो म्हणतो, "नागपूर प्रांत अखेर ब्रिटिश अमलाखालीं आला. ८०००० चौरस मैल प्रांत व अर्धकोट रुपये उत्पन्नाचा मुलूख आमचे हातीं लागला. आमची प्रजाही अर्ध्या

कोटीनें वाढली. इंग्रजी अमलाखालीं येण्याची या लोकांना पुष्कळ दिवसांपासून उत्कंठा लागली होती. **नागपूर खालसा केल्यामुळें निजामाच्या चारी बाजूला इंग्रजांचें राज्य झालें आहे.** आणि आतां राज्यकारभारही सुलभ रीतीनें हांकतां येईल. नागपूर हातीं आल्यामुळें **कलकत्त्यापासून मुंबईपर्यंतचा सर्व रस्ता निर्विघ्न झाला आहे,** आणि तो सर्व आमचे हद्दींतून जात असल्यामुळें सैन्य व व्यापार या दोघांचीही शक्ति वाढेल ! ”

दुसऱ्या ठिकाणीं तो म्हणतो, “नागपूर खालसा करण्यांत नागपूर येथील लोकांवर उपकार करणें हाच एक माझा उद्देश होता. इंग्रजी अमलाखालीं आल्याशिवाय नागपूरच्या प्रजेचें कल्याण होणें शक्य नव्हतें. कारण ज्या मुलाला आम्हीं गादीवर बसविलें व ज्याला आम्हीं शिक्षण दिलें, ज्याच्या अज्ञान दशेंत आम्हीं राज्यकारभार स्वतः पाहून भरलेला खजीना व राज्यकारभाराचा सरळ चाललेला गाडा ज्याच्या स्वाधीन केला, तोच मोठा झाल्यावर लांचलुचपत घेऊन न्याय विकूं लागला, आणि दारू पिऊन तिच्या नशेंत दिवसरात्र भोगविलासांत निमग्न राहूं लागला.” [ डलहौसीनें तिसऱ्या रघोजीचें केलेलें हें वर्णन सपशेल खोटें आहे. त्या वेळचे इंग्रज रेसिडंट व इतर मराठे सरदार रघोजीची प्रशंसाच करतात.] “तेव्हां त्याच्यामागून दुसऱ्या एखाद्या पुरुषाला गादीवर बसविलें असतें, तर तो देखील असाच वाईट निघाला नसता याचा काय नेम आहे ? आणि त्यामुळें प्रजेचें कल्याण करण्याचा आलेला मोका मात्र आम्हीं व्यर्थ दवडून बसलों असतों.” प्रजेच्या कल्याणाची ही सबबही पोकळ आहे. कारण भोंसल्यांच्या कारकीर्दींत प्रजेवर अन्याय होत होता ही गोष्टच मूळांत खोटी आहे. सर जान लोनें स्पष्ट म्हटलें आहे कीं, नागपूर प्रांताच्या राज्यकारभारांत कोणताच घोंटाळा किंवा बंडाळी नव्हती हें सर्वांना माहीत आहे.

तिसऱ्या एका ठिकाणीं तो म्हणतो, “इंग्लंडच्या व्यापाराची भरभराट विशेषतः कच्च्या मालाच्या पुरवठ्यावर अवलंबून आहे. कापसाचा मुबलक पुरवठा झाला तरच इंग्लंडची चलती होईल, ही गोष्ट सर्व इंग्रज मुत्सद्यांना माहीत आहे. मी हिंदुस्थानांत यावयास निघालों तेव्हां म्यांचेस्टरच्या व्यापाऱ्यांनीं मला ही गोष्ट नीट समजावून सांगितली, व मुख्य प्रधान देखील मला हीच गोष्ट नेहमीं लिहून पाठवीत. त्यामुळें इंग्लंडला कापूस मुबलक कसा मिळेल याचीच चिंता मला लागली होती. कारण सदोदित कापसाचा पुरता पुरवठा झाला, तर इंग्लंडला दुसऱ्या देशाच्या

तोंडाकडे पहावें लागणार नाहीं." नार्टन साहेबांनीं लिहिल्याप्रमाणें ब्रिटिश न्याय-देवतेच्या कानांत वऱ्हाडी कापसाचे दट्टे बसल्यामुळें ती बहिरी झाली होती, आणि डोळ्यांत कापूस गेल्यामुळें ती आंधळीही बनली होती, हेंच अखेर खरें ठरतें; आणि या पांढऱ्या कापसापायींच मध्यप्रांत व वऱ्हाडला लाल रंग देण्यांत आला.

भोंसल्यांचें राज्य खालसा करूनच डलहौसीची शांति झाली नाहीं. राण्यांच्या पलंगाखालीं गाडलें असलेलें स्त्रीधनही उकरून जप्त करण्यांत आलें. लाखों रुपयांचें भोसल्यांचें जडजवाहीर जप्त करण्यांत येऊन त्याचा लिलांव पुकारण्यांत आला. राण्यांच्या अंगावरचे किंमती दागिने कलकत्त्याच्या बाजारांत विक्रीकरितां मांडले गेले, आणि कांहींनीं विलायतची वाट धरली. नागपूरच्या रेसिडंटनें याबद्दल गव्हर्नर जनरलला लिहिलें कीं, जवाहीर व खासगी दौलत ही भोंसले कुळाच्या खास मालकीची असल्यामुळें ती जप्त करणें न्याय्य होणार नाहीं. परंतु डलहौसीला रेसिडंटचा हा सल्ला मुळींच मानवला नाहीं. राजाच्या राण्या, दत्तक मुलगा आणि राजाचा इतर परिवार यांचा चरितार्थ मग इंग्रजांनीं कसा चालवावा? त्यांना खर्चाकरितां पैसे कोठून पुरवावेत? त्यांना कबूल केलेल्या नेमणुकांच्या रकमांचा भरणा मग इंग्रजांनीं कसा करावा? भोसल्यांचें संपन्न राज्य अन्यायानें खालसा करूनही, हे प्रश्न सोडविण्याचा मार्ग डलहौसीला एकच दिसला. आणि तो हा कीं भोसल्यांचें खासगी जवाहीर जप्त करून व त्याचा लिलांव पुकारून, उभी राहील त्या रकमेच्या व्याजांतून त्यांच्या कुटुंबीय माणसांना चरितार्थाकरितां नेमणूक करून द्यावयाची! नागपूरच्या राज्याच्या उत्पन्नांतून तो खर्च करण्याची डलहौसीची इच्छा नव्हती. त्याला तो लोण्याचा गोळा निवळ मुनाफा म्हणून हवा होता. डलहौसीच्या या युक्तिवादानें बिचाऱ्या राण्या नागवल्या गेल्या, आणि दानधर्माला म्हणून ठेवलेले त्यांचे रुपयेही त्यांना अनेकवार मागून देखील मिळाले नाहींत. डलहौसीच्या या अनिवार द्रव्यलालसेचें कोणीच समर्थन करूं शकलें नाहीं. के, टारेन्स, हामिल्टन वगैरे सर्वच लेखकांनीं डलहौसीचा याबद्दल निषेधच केला आहे, आणि राण्यांचें जवाहीर जप्त करून तें भरबाजारांत विकणें, हा इंग्रजी राज्यावरील कधींही पुसला न जाणारा कलंक होय अशी कबुली दिली आहे.

डलहौसीच्या या अघोरी तृष्णेमुळें इंग्रजी राज्याचा विस्तार झाला असला तरी, सर्व हिंदुस्थानभर इंग्रजांचें नांव बद्दू झालें आणि इंग्रजांची प्रत्येक करणी सरळ असली तरी ती लोकांना संशयास्पद वाटूं लागली. लोकांचा त्यांत फारसा

दोषही नव्हता. कारण त्यानें आपल्या कृत्यांचें जें ठिकठिकाणीं समर्थन केलें आहे तें वाचूनदेखील, इंग्रजी राज्य बनेल त्या उपायानें वाढवावयाचें आणि सर्व हिंदुस्थान एकसूत्री करावयाचें हा एक त्याचा पक्का निश्चय झाला होता, असें उघड दिसतें. इतरांचे हक्क आणि न्यायनीती याची त्याला फारशी पर्वा नव्हती. प्रथम कुत्र्याला गोळी घालून ठार मारावयाचें, आणि मग तो पिसाळलेला होता हें निरनिराळ्या प्रमाणांनीं सिद्ध करीत बसावयाचें, आणि आपल्या कृत्याचें त्यायोगें समर्थन करावयाचें ही त्याच्या राजनीतींतील गुरुकिल्ली होय.

---

## प्रकरण ५ वें.

# झांशीची राणी



छत्रसाल राजा बुंदेलखंडावर राज्य करीत असतांना माळव्याचा सुभेदार व अलाहाबादेचा नबाब महमदखान बंगष हा साठ हजार फौजेनिशीं त्याच्यावर चालून आला. तेव्हां छत्रसाल राजानें रणशूर थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांना सहाय्याकरतां बोलावलें. हिंदूंचें व हिंदू राजांचें रक्षण करण्याचें बाजीराव पेशव्याचें व्रतच होतें, व तें सर्वांना ठाऊक होतें. हिंदुपदपादशाहीचे ते पहिले, प्रमुख व कर्तबगार पुरस्कर्ते होते. त्यामुळें—

> “ जो गति ग्राह गजेंद्रकी सो गत भई है आज
> बाजी जात बुंदेलकी राखो बाजी लाज ॥ ”

अशा तऱ्हेचें शंभर दोह्यांचें छत्रसाल राजाकडून आलेलें विनंतिपत्र वाचून बाजीरावसाहेबांनीं बुंदेलखंडावर स्वारी करण्याचा निश्चय केला. दरकुच दर-मजल करीत करीत एकवीस दिवसांच्या आंतच ते बुंदेलखंडांत येऊन दाखल झाले. मराठ्यांच्या व महमदखान बंगष यांच्या बऱ्याच चकमकी झडल्या, आणि यवनसेनेची अगदीं दाणादाण उडाली. बंगषनें पळ काढला व छत्रसाल राजाचें संकट निवारण झालें. त्यामुळें छत्रसाल राजानें बाजीरावसाहेबांचें उत्तम प्रकारें आगतस्वागत करून व त्यांस आपला तिसरा पुत्र मानून, मृत्यु-समयीं आपल्या तीन कोटीच्या राज्यापैकीं एक कोटी उत्पन्नाचा मुलूख बक्षीस

करून दिला. या बक्षिस मिळालेल्या प्रांताचे श्रीमंत बाजीरावसाहेब यांनीं तीन भाग करून त्यावर तीन सुभे नेमले. पेशव्यांच्या पदरीं शागीर्दी करीत असलेला गोविंदा खेर नांवाचा एक कऱ्हाडे ब्राह्मणाचा मुलगा आपल्या आंगच्या शौर्यादि गुणांनीं पुढें उदयास आला, आणि बुंदेलखंडांतील एका सुभ्याचे जागीं त्याची नेमणूक झाल्यामुळें गोविंदपंत बुंदेले या नांवानें तो पुढें इतिहासांत प्रसिद्ध झाला. पानपतच्या लढाईंत नजीबखान रोहिल्यांचे हातून पेशव्यांचा मारला गेलेला सरदार हाच गोविंदपंत बुंदेले होय. पेशव्यांना अंतर्वेदींत राहून रसद पुरवावयाची; व छापे घालून अहमदशहा अबदालीची रसद मारावयाची, ही महत्त्वाची कामगिरी त्या लढाईंत याच्यावर सोंपविली होती. ती कामगिरी करीत असतांच तो लढाईंत मारला गेला, आणि त्यामुळें भाऊसाहेबांचे हातपाय जखडले गेले. या सुभ्याचे ताब्यांत सागर, गुलसराई, जालवण वगैरे मुलूख होता. हल्लींचे नामधारी गुलसराईचे व जबलपूर येथें रहात असलेले सागरचे राजे, हे त्यांचेच वंशज होत. बाजीरावाच्या सौंदर्यावर व त्यांच्या शौर्यादि अलौकिक गुणांवर मोहित होऊन जी त्यांची केवळ नाटकशाळा होऊन राहिली, त्या मस्तानीचा मुलगा समशेरबहाद्दर हा बुंदेलखंडांतील दुसरा सुभा होय! या सुभ्याच्या ताब्यांत बांदा, काल्पी वगैरे प्रांत होता. आणि बुंदेलखंडांतील उरलेला झांशी प्रांत हा नारोशंकर मोतीवाले यांच्या हवालीं करण्यांत आला. या झांशी प्रांताचें क्षेत्रफळ पांच हजार चौरस मैल असून लोकसंख्या जवळजवळ दहा लाख होती. नारो शंकरानंतर १७५६ सालीं एका गोसावी राजानें बंड करून झांशी प्रांत बळकाविला. ही गोष्ट पेशवे सरकारास कळली तेव्हां त्यांनीं **रघुनाथ हरी नेवाळकर** या शूर सरदारास तिकडे पाठविलें. त्यानें तेथें जाऊन गोसावी राजांचें बंड मोडून टाकलें, व पेशव्यांची सत्ता पूर्ववत् त्या प्रांतांत स्थापन केली. रघुनाथ हरीच्या या बहाद्दरीमुळें झांशीची सुभेदारी वंशपरंपरेनें त्यांचेकडे सोंपविण्यांत आली. रघुनाथरावांच्या पराक्रमामुळें, बुंदेलखंडांतील उरलेले सर्व लहानमोठे संस्थानिक पेशव्यांचे अंकित झाले, व मराठ्यांची सत्ता बुंदेलखंडांत पूर्णपणें स्थापन झाली. रघुनाथ हरी नेवाळकर हे अतिशय स्वधर्माभिमानी, तेजस्वी व पराक्रमी पुरुष होते. त्यांनीं चाळीस वर्षें झांशीची सुभेदारी केली आणि नंतर आपला वृद्धापकाळ झाला असें पाहून आपले कनिष्ठ बंधु शिवरावभाऊ यांस झांशीची सुभेदारी दिली, व राहिलेलें आयुष्य पारलौकिक कल्याणासाठीं ईश्वरचिंतनांत घालविण्याकरितां आपण काशीक्षेत्रीं गमन केलें. तेथें त्यांचा १७९६ मध्यें अंतकाळ झाला.

शिवरावभाऊ हेदेखील रघुनाथरावांप्रमाणेंच अतिशय शूर होते. झांशीची सुभेदारी जरी पेशव्यांनीं रघुनाथरावास वंशपरंपरेनें दिली होती, तरी त्यांना दरवर्षी जमाखर्चांच्या याद्या पुणें दरबारीं पाठवाव्या लागत. परंतु शेवटच्या रावबाजीच्या कारकीर्दीमध्यें पुण्यास अंदाधुंदी माजल्यामुळें, शिवरावभाऊ यांनीं सुभ्याच्या कारभाराच्या जमाखर्चाची यादी पाठविणें बंद केलें. पेशव्यांस ठराविक वार्षिक खंडणी देऊन त्यांच्या नांवानें राज्यकारभार करणारे ठिकठिकाणचे सुभेदार स्वतंत्र झाले. शिवरावभाऊ नेवाळकर यांच्या वर्चस्वाखालीं अनेक बुंदेले राजे मोठ्या बंदोबस्तानें राहात असल्यामुळें, इंग्रजसरकारचा बुंदेलखंडांत सहज प्रवेश होण्याची त्या वेळीं मुळींच आशा नव्हती. वसईच्या तहानें मराठी साम्राज्यांत इंग्रजांचा चंचुप्रवेश नुकताच झाला होता. शिंदे व होळकर आणि भोंसले, वगैरे रणशूर मराठे सरदारांबरोबर युक्तीनें कसल्या ना कसल्या कुरापती काढून वेलस्ली, लेक वगैरे मोठमोठे इंग्रज सेनापती बाह्यात्कारें पेशव्यांचा कैवार घेऊन लढत होते. लेकसाहेबांनीं बुंदेलखंडापर्यंत चाल केली. शिवरावभाऊ हे सर्व बुंदेलखंडाचे अग्रणी असल्यामुळें त्यांच्याशीं दोस्ती करण्याचा इंग्रजसरकारनें घाट घातला. १८०४ च्या फेब्रुवारीमध्यें शिवरावभाऊ व इंग्रजसरकार यांचा तह झाला, आणि केवळ त्यांच्या मदतीनें बुंदेलखंडावर इंग्रजांचें स्वामित्व जमलें. त्या वेळच्या गव्हरनर जनरलनें विलायतेंत बोर्डाला पाठविलेल्या खलित्यांत शिवरावभाऊंच्या मैत्रीची अतिशय प्रशंसा केली आहे. शिवरावभाऊंना कृष्णराव, रघुनाथराव व गंगाधरराव असे तीन पुत्र होते. पैकीं कृष्णराव हे त्यांच्या हयातींतच म्हणजे १८११ मध्यें कैलासवासी झाले. १८ वर्षें संस्थानचा राज्यकारभार उत्तम रीतीनें करून शिवरावभाऊंनीं कीर्ती संपादन केली, व १८१४ मध्यें आपला नातू म्हणजे कृष्णरावांचा मुलगा रामचंद्रराव यांस झांशीचे सुभेदार करून ते आपल्या वडील बंधूप्रमाणेंच देहाचें सार्थक करण्याकरितां श्रीक्षेत्र ब्रह्मावर्त येथें गेले. तेथें त्यांनीं रामनामाचा स्तव करीत गंगेंत पलंग टाकून त्यावर प्राणोत्क्रमण केलें.

रामचंद्रराव सुभेदार झाले, तेव्हां ते अल्पवयी असल्यामुळें संस्थानचा कारभार त्यांची मातोश्री सखूबाई व संस्थानचे जुने दिवाण गोपाळरावभाऊ हे पहात असत. यांच्या कारकीर्दीमध्यें रावबाजीच्या रंगेलपणामुळें, व आपापसांतील स्वार्थ व मत्सरामुळें पेशवाईची सत्ता इंग्रजसरकारचे हातांत हळुहळू जात होती. १३ जून १८१७ रोजीं पेशवे सरकारच्या वतीनें, पेशव्यांचे वकील मोरदीक्षित व बाळाजी

लक्ष्मण या दोघांनीं एलफिन्स्टन साहेबांच्या बंगल्यांत जो तह केला, त्याच्या तेराव्या कलमाप्रमाणें बुंदेलखंडाचें स्वामित्व इंग्रजसरकाराकडे आलें. शिवराव-भाऊशीं इंग्रजांनीं १८०४ मध्यें स्वतंत्र दोस्तीचा तह केला होता. परंतु त्यामुळें इंग्रजांचें पूर्ण समाधान न झाल्यामुळें पेशव्यांच्या मध्यस्थीनें झांशी दरबारवर ही त्यांनीं नवी कुरघोडी केली. झांशीचा जुना तह बदलून नवा करण्याला वास्तविक कांहींच कारण घडलें नव्हतें.

हा आपला हक्क स्थापन करण्याकरतां इंग्रजसरकारनें १७ नव्हेंबर १८१७ रोजीं झांशीचे सुभेदार रामचंद्रराव यांच्याशीं एक नवीन तह केला, त्यांत झांशी संस्थान रामचंद्ररावांकडे वंशपरंपरा चालविण्याचें इंग्रजांनीं कबूल केलें. रामचंद्रराव सुभेदार यांनीं इंग्रजसरकारास वेळोवेळीं साह्य केलें. १८२५ सालीं मध्यहिंदुस्थानांत पेंढारी लोकांनीं फार प्रळय मांडला होता, त्या वेळीं नाना पंडित नांवाच्या एका इसमानें इंग्रजांनीं उघड वैर मांडून त्यांच्या ताब्यांतील कित्येक प्रांत सर केले व काल्पी शहरावर हल्ला करून तेंही आपल्या ताब्यांत घेतलें. झांशीचे पोलिटिकल एजंट ॲन्स्लीसाहेबांनीं रामचंद्ररावांपाशीं मदत मागितली रामचंद्ररावांनीं तत्काळ आपले रिसाल्यांतील ४०० घोडेस्वार, १००० पायदळ व दोन तोफा इंग्रजांच्या मदतीस पाठविल्या. रामचंद्रराव नेवाळकरांच्या वेळेपासूनच झांशीचें सैन्य नेहमींच सज्ज व शस्त्रास्त्रांनीं भरदार असे. ही परंपरा अखेरपर्यंत चालू होती. झांशीच्या सैन्यांत बहादुरीबरोबर उत्तम शिस्त असे. या शूर सैन्यानें काल्पी येथें जाऊन बंडवाल्यांचा पूर्ण पराभव केला, आणि काल्पीशहर पूर्ववत इंग्रजांच्या ताब्यांत आलें. झांशीच्या सैन्याचा हा पराक्रम पाहून इंग्रज अधिकाऱ्यांस फार आनंद झाला. त्या वेळचे गवर्नर जनरल लार्ड विल्यम बेंटिक यांनीं १८३२ सालीं झांशी येथें मोठा दरबार भरवून, रामचंद्रराव सुभेदारांचे अत्यंत आभार मानले, व त्यांस 'महाराजाधिराज' व 'फिदवी बादशहा जानुजा इंग्लिस्तान' या पदव्या देऊन गौरविलें, आणि छत्र चामरें, मोर्चेलें, नगारा इत्यादि राजचिन्हें त्यांस अर्पण केलीं; उलटपक्षीं रामचंद्रराव सुभेदार यांनीं झांशीच्या किल्ल्यावर सार्वभौम सरकाराविषयीं आदर म्हणून युनियन जॅक फडकविण्याची परवानगी मागितली, व इंग्रजांनीं एक उत्तम युनियन जॅक त्यांच्या हवालीं करून त्यांच्या राजनिष्ठेचा गौरव केला.

रामचंद्रराव हे आजारी पडून सन १८३५ मध्यें मृत्यु पावले. त्यांस पुत्रसंतान मुळींच नव्हतें, म्हणून त्यांच्या पत्नीनें सागर प्रांतांतील मोरेश्वरराव खेर यांचा

मुलगा कृष्णराव यांस दत्तक घेतलें. परंतु हें दत्तविधान शास्त्रशुद्ध झालें नसल्यामुळें, गादीच्या वारसाचा प्रश्न इंग्रजसरकारपर्यंत जाऊन, शिवराव भाऊंचे दुसरे पुत्र आणि रामचंद्ररावांचे सख्खे चुलते रघुनाथराव यांना गादी मिळाली. हे रघुनाथराव दुर्व्यसनी असून त्यांचें राज्यकारभाराविषयींचें ज्ञानही पूज्य होतें. गादीवर बसतांच त्यांनीं चैन करण्यास प्रारंभ केला. अल्पावकाशांतच त्यांच्या भोंवतीं गवई व वारांगना यांचा गराडा पडला. राजेसाहेब अनंगरंगांत दंग झाल्यामुळें संस्थानचें उत्पन्न अठरा लाखांवरून तीन लाखांवर येऊन पोंहोंचलें, आणि संस्थानचें कर्ज मात्र सारखें वाढत चाललें. हें पाहून इंग्रजसरकारनें संस्थानची व्यवस्था १८३७ सालीं आपले हातीं घेतली. परंतु सुदैवानें रघुनाथराव १८३८ सालीं मरण पावले. त्यांना औरसपुत्र नव्हता, परंतु गजरा नांवाच्या नाटकशाळेपासून अल्लीबहाद्दर व समशेरबहाद्दर असे दोन पुत्र झाले होते. यांना अर्थातच गादीचे वारस समजणें शक्य नव्हतें. त्यामुळें रघुनाथरावांचे धाकटे बंधु आणि शिवराव भाऊंचे कनिष्ठ पुत्र गंगाधरराव यांस गादीवर बसविण्यांत आलें. झांशी संस्थानास झालेलें कर्ज फिटेपर्यंत संस्थानची व्यवस्था इंग्रजसरकारनें पहावी असें ठरविण्यांत आलें. त्याप्रमाणें सन १८३८ ते १८४२ पर्यंत इंग्रजसरकार मार्फत संस्थानचा कारभार चालला होता. त्या अवधींत झांशी संस्थानचें सर्व कर्ज फिटलें.

त्यानंतर गंगाधररावांच्या हातीं राज्यकारभार देण्यांत आला. परंतु यावेळीं मात्र इंग्रज कंपनीच्या वहिवाटीप्रमाणें झांशी संस्थानशीं नवीन तह करण्यांत येऊन, दोन लक्ष सत्तावीस हजार चारशें अठ्ठावन रुपये वसुलाचा मुलूख फौजेच्या खर्चाकरतां म्हणून झांशी संस्थानांतून कमी करण्यांत येऊन तो इंग्रजी राज्यांत सामील करण्यांत आला. या नव्या तहाचें वास्तविक कांहींच कारण नव्हतें. परंतु एक राजा जाऊन दुसरा गादीवर आला, म्हणजे कांहीं तरी निमित्तानें मुलूख लाटण्याची कंपनीची दडपगडप नीति होती. १८०४ व १८१७ सालीं झांशी संस्थानाशीं जे तह करण्यांत आले, त्यांत हें तैनाती फौजेचें लोढणें झांशी संस्थानच्या गळयांत अडकविण्यांत आलें नव्हतें. कारण त्या वेळीं इंग्रजांची सार्वभौम सत्ता हिंदुस्थानांत निर्वेधपणें स्थापन झाली नसल्यामुळें, बुंदेलखंडावर आपली हुकमत जमविण्याकरितां झांशीच्या शूर व पराक्रमी सरदारांच्या मैत्रीची इंग्रजांना आवश्यकता वाटत होती. व त्या मैत्रीचा बुंदेलखंडांतील विस्तीर्ण प्रदेशावर आपला ताबा बसवितांना इंग्रजांनीं शक्य तो फायदाही करून घेतला. परंतु १८४२ सालीं इंग्रजांची सार्वभौम सत्ता हिंदुस्थानांत स्थापन झाली असल्यामुळें झांशीसारख्या चिमुकल्या संस्थानची मैत्री इंग्रजांच्या

खिजगणतींतही उरली नव्हती. त्यामुळें गंगाधररावांना संस्थानची पूर्ण मुखत्यारी देतांना इंग्रजांनीं या लहानशा संस्थानांतून देखील फौजेच्या खर्चाकरितां म्हणून सव्वादोन लक्ष रुपये उत्पन्नाच्या मुलखाचा भला मोठा लचका तोडलाच! हा तह-नामा निमूटपणें मान्य करणें गंगाधररावांना भागच होतें. नाहींपेक्षां सगळें राज्यच हातचें निघून गेलें असतें.

संस्थानची कुलमुखत्यारी मिळण्यापूर्वी सरासरी सहा सात महिने अगोदर गंगाधररावांचा दुसरा विवाह झाला. त्यांची पहिली पत्नी रमाबाई त्या वेळीं निवर्तली होती. तिला मूलबाळ कांहीं नसल्यामुळें गंगाधररावांनीं दुसरें लग्न करणें साहजिकच होतें. त्या वेळीं ब्रम्हावर्तास श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे पेन्शन घेऊन हरी हरी करीत होते. त्यांच्या पदरीं असलेले आश्रित मोरोपंत तांबे यांची मुलगी मनुबाई ही वधू नेमस्त करण्यांत आली. मनुबाई दिसण्यांत सुंदर होतीच; परंतु त्याशिवाय त्या वेळच्या व तिच्या वयाच्या मानानें तिचें शिक्षणही बरेंच झालें होतें. मोरोपंत व त्यांची पत्नी हीं दोघेंही सुसंस्कृत व सालस असल्यामुळें मुलीला लहानपणीं चांगलें वळण लागलें. या मुलीचे लहानपणचे खेळगडी म्हणजे बाजी-रावसाहेबांचे दत्तक चिरंजीव नानासाहेब व नातू रावसाहेब हे होते. लहानपण-च्या या खेळगड्यांबरोबर घोड्यावर बसणें मनुबाईला सहजच आलें. तिचे ते पाणीदार व विशाल नेत्र, आणि गौरवर्ण मुख पाहून प्रत्येकास आनंद होत असे. या मनमोहक मुलीची चपळ व सतेज वृत्ति पाहून सर्वांनाच ती हवीशी वाटे; व श्रीमंतांपासून तों शागीर्दापर्यंत सर्वच मंडळी तिचें कौतुक करीत असत. या मुलीचा जन्म ११ नोव्हेंबर १८३५ रोजीं झाला होता. यामुळें लग्नसमयीं तिचें वय जवळ जवळ आठ वर्षांचें होतें. त्या वेळीं मुलीच्या लग्नाची हीच वयोमर्यादा ठरली होती. ती ओलांडण्याचें साहस कोणीच करीत नव्हता. परंतु या लहान वयांत देखील तिच्या स्वरूपाची व पाणीदारपणाची प्रशंसा सर्वजण करीत असत! बाजीराव साहेबांच्या हुशार व तेजस्वी मुलांच्या संगतीनेंच मनुबाईचें बालपण गेलें असल्यामुळें, तिचाही स्वभाव तेजस्वी, मानी व पराक्रमी झाला. सौंदर्य व शील मूळचेंच तिला अनुकूल होतें.

लग्नानंतर मनुबाई झांशीला गेल्या. तेथें त्यांचें जनरीतीप्रमाणें **लक्ष्मीबाई** असें सासरचें नांव ठेवण्यांत आलें. संस्थानच्या महाराणी झाल्यानंतर त्यांना पुन्हां ब्रह्मावर्तास जाण्याचा कधींच प्रसंग आला नाहीं. कारण महाराज गंगाधर-

रावांनीं मोरोपंत तांब्यांना झांशी येथें बोलावून नेलें, व ३०० रुपये दरमहाची नेमणूक करून देऊन त्यांना झांशी दरबारांतील एक सरदार केलें. मोरोपंतांचेंही पहिलें कुटुंब वारलें होतें. त्यामुळें महाराजांनीं गुलसराई संस्थानांतील वासुदेवराव खानवलकर यांच्या कन्येशीं मोरोपंतांचें लग्न जमवून दिलें. याप्रमाणें मनुबाई झांशीची राणी झाल्यावर तिचें माहेरही तिच्या मागोमाग झांशीसच आलें. या नव्या लग्नानंतर महाराजांना लौकरच राज्याधिकार मिळाला. त्यामुळें नवी नवरी अत्यंत शुभ पायगुणाची व भाग्यवान ठरली. रघुनाथरावांच्या कारकीर्दींत राज्यांत जी अंदाधुंदी माजली होती, व झांशीचें जें वैभव नष्ट झालें होतें, तें हळूहळू पुन्हा झांशींत येऊं लागलें. त्यामुळें राणी लक्ष्मीबाईच्या पायगुणानें संस्थानची गेलेली राजलक्ष्मी पुनः झांशींत प्रवेश करूं लागली, असें त्या वेळच्या भोळ्या, भाविक व सात्विक लोकांस वाटूं लागलें असल्यास नवल नाहीं. संस्थानच्या खजिन्याची स्थितीही उत्तम प्रकारें सुधारून रत्नभांडारांत पूर्वीच्या राज्यलक्ष्मीचें दिव्य तेज चमकूं लागलें. यामुळें राणीविषयीं लोकांची पूज्यबुद्धि वाढली व ते तिला देवतेप्रमाणें लेखूं लागले.

महाराजांनीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यापासून आपली कारकीर्द प्रजेला सुखावह होईल असेंच धोरण ठेवलें. दौलतीची व खाजगीची चांगली व्यवस्था करून सर्व खात्यांवर चतुर, कर्तव्यदक्ष, व प्रामाणिक लोकांची नेमणूक केली. संस्थानच्या दिवाणगिरीवर राघो रामचंद्र संत या हुशार गृहस्थास नेमून अदालतीवर नाना भोपटकरांची योजना केली. ठाकुर व बुंदेले लोकांच्या बंदोबस्ताकरतां, थोडेसें स्वतंत्र परंतु सुसज्ज असें सैन्य ठेवून प्रजेला निर्भय केलें. खुद्द संस्थानची व ठाकूर लोकांजवळची फौज पांच हजार असून, गोल पोलीस दोन हजार होते. याशिवाय पांचशें घोड्यांचा रिसाला निराळा असून, खासपागा शंभर होती; व तोफखाने चार होते. महाराजांना हत्ती व घोडे यांचा शौक असल्यामुळें त्यांनीं याशिवाय बावीस हत्ती बाळगिले होते. महाराजांच्या आमदानींत हत्तींचें सामान, घोड्यांचे अलंकार, अंबाऱ्या, हौदे व रथ, सुवर्णाचे किंवा चांदीचे करण्यांत आले. त्यांच्या खाशा स्वारीचा सिद्ध बकस नांवाचा एक अप्रतिम व सुंदर गज होता. त्याचे तर सर्वच अलंकार सुवर्ण-रत्नांचे केले होते. यावरून गंगाधररावांनीं आपल्या कारकीर्दींत झांशी संस्थान किती ऊर्जितावस्थेस आणलें, हें सिद्ध होतें. त्यांचा स्वभाव दयाळु असला तरी त्यांचा अंमल अतिशय करडा असे. नेमलेलीं कामें वक्तशीर होण्याबद्दल त्यांचा अतिशय कटाक्ष

असे. त्यांच्या स्वभावांत एक प्रकारचा तऱ्हेवाईकपणा मात्र होता. सर्व हिंदुस्थान इंग्रजांनीं संभाळलें असल्यामुळें व सर्व संस्थानिक तहांनीं जखडबंद झाले असल्या-मुळें पराक्रमाला वावच कोठें उरला नव्हता. तेव्हां आम्ही संस्थानिकांनीं हातांत बांगड्या भरणें आतां जरूर आहे, असें उपरोधिक बोलून ते एखादे वेळीं खरो-खरच कंकणें हातांत भरत असत. शरीर रोगट असल्यामुळें वृत्ती कधीं आनंदी, तर कधीं उदासीन, तर कधीं शीघ्रकोपी होत असे; त्यामुळें तिऱ्हाइतांना त्यांचें वर्तन छांदिष्ट भासे, व त्यांच्याविषयीं पराचा कावळा होऊन अनेक कंड्या लोकांत उठल्या होत्या. त्यांपैकीं कांहीं दक्षिणेंतील एका प्रमुख संस्थानिकाच्या प्रवास-वृत्तांत ग्रथित झाल्या असल्यामुळें, त्यांना उगीच निष्कारण महत्व आलें आहे. डलहौसीनें जें त्यांचें वेडें वाकडें वर्णन केलें आहे तें डलहौसीच्या आत्मसमर्थन-पर व परनिंदक स्वभावाला अनुसरून असल्यामुळें त्यांत सत्याचा अंश फार कमी आहे हें निराळें सांगावयास नको. साहेबलोकांशीं सतेजपणानें वागून ते आपला मोठेपणा संभाळून असत. बुंदेलखंडांतील इतर संस्थानिकांवर त्यांचें मोठें वजन असून ओरछा, दतिया, पन्ना, छत्रपूर वगैरे ठिकाणचे बुंदेले राजे त्यांना बहु-मानपुरःसर काका असे म्हणत असत.

१८५१ सालीं महाराणीसाहेबांस पुत्र-रत्न झालें. त्या वेळीं सर्व शहरभर साखर वांटण्यांत आली. झांशी येथें खूप धडाक्याचा समारंभ करण्यांत आला. परंतु अवघ्या तीन महिन्यांतच हें पुत्र-रत्न दुष्ट काळानें हरण करून नेलें. त्यामुळें महाराजांच्या मनाला अतोनात धक्का बसला. उतारवयांत झालेला पुत्र, व तोही लौकरच मृत्युमुखीं पडला. त्यामुळें त्यांच्या मानस धक्का बसणें साहजिक होतें. १८५३ सालीं, देवीचे नवरात्रांत धर्मपर नित्य कुलाचार करीत असतां महाराजांच्या प्रकृतीस थोडेसे अधिक श्रम होऊन त्यांस किंचित अस्वस्थता वाटूं लागली. परंतु विजयादशमीच्या दिवशीं सीमो-ल्लंघनसमारंभ व दरबारचा थाट नेहमींप्रमाणेंच करण्यांत आला. दसऱ्यानंतर मात्र महाराजांची प्रकृति दिवसेंदिवस खालावूं लागली. झांशी येथील अनेक नामांकित वैद्यांचे औषधोपचार चालू झाले. महाराजांचें लक्ष प्रजा संतुष्ट करण्याकडे सारखें असल्यामुळें त्यांची कारकीर्द रामराज्याप्रमाणें सर्वांना वाटत होती. त्यामुळें महा-राजांना बरें वाटावें म्हणून लोकांनीं अनुष्ठानें सुरू केलीं. परंतु संग्रहणीचा विकार बळावून महाराजांची प्रकृति आसन्न होऊन सर्व चिन्हें विपरीत भासूं लागलीं. तेव्हां संस्थानचे दिवाण नरसिंहराव व महाराजांचे सासरे मोरोपंत तांबे या

दोघांनीं महाराजांचे जवळ संस्थानचे भावि व्यवस्थेबद्दल गोष्ट काढली. त्या वेळीं त्यांनीं सांगितलें कीं माझ्या प्रकृतीबद्दल अद्याप माझी निराशा झाली नाहीं. तथापि हिंदुधर्मांप्रमाणें दत्तक घेण्याची माझी फार इच्छा आहे. याकरतां आमच्या घराण्यांतील वासुदेवराव नेवाळकर यांचे पुत्र आनंदराव यांना मी पसंत करतों. ते आमचे संबंधीच आहेत. तरी आतां विलंब न लावतां तयारी करावी; व हिंदुधर्मांप्रमाणें होमहवन करून दत्तविधान करावें आणि समारंभ उरकावा. आनंदरावांचें वय या वेळीं अवघें पांच वर्षांचें होतें. तरी ते फार हुशार व पाणीदार असल्यामुळें महाराणी लक्ष्मीबाई व खुद्द महाराज गंगाधरराव यांनीं त्यांसच दत्तक घेण्याचा निश्चय केला. महाराजांच्या इच्छेप्रमाणें दत्तविधान यथाशास्त्र करण्यांत आलें. त्या वेळीं झांशींतील सर्व प्रमुख मंडळी समारंभास हजर होती. झांशीचे पोलिटिकल असिस्टंट मेजर एलीस व लष्करी अधिकारी कॅप्टन मार्टिन यांना समारंभासाठीं राजवाड्यांत मुद्दाम पाचारण करण्यांत आलें. या सर्व मंडळीच्या समक्ष दत्तविधान होऊन आनंदरावांचें नांव **दामोदरराव गंगाधर** असें ठेवण्यांत आलें. महाराजांनीं मोठ्या आनंदानें आपल्या हातानें दामोदराच्या तोंडांत साखर घातली व रीतीप्रमाणें सर्वांना पानसुपारी व शेलेपागोटीं वांटण्यांत आलीं. दत्तविधानसमारंभ झाल्यानंतर महाराजांनीं दिवाणास कंपनी सरकारच्या नांवें खलिता लिहावयास सांगितलें. खलिता लिहून तयार होतांच महाराजांनीं तो स्वहस्तें एलिस साहेबांच्या स्वाधीन केला. त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें:—

"ब्रिटिश सरकारची राजसत्ता बुंदेलखंडामध्यें प्रस्थापित होण्याचे पूर्वींपासून माझे पूर्वज त्यांना कोणत्या प्रकारें मदत देत गेले हें युरोपखंडांत देखील सर्वांना माहीत झालें आहे. आणि मीही त्यांचाच कित्ता गिरवून ब्रिटिश सरकारशीं आज्ञाधारकपणानें वागत आलों आहें, हें येथें आजपर्यंत येऊन गेलेल्या अनेक पोलिटिकल एजंटांना पूर्णपणें माहित आहे. माझ्याबरोबरच आमच्या घराण्याचा शेवट होऊं नये म्हणून मी ब्रिटिश सरकारबरोबर झालेल्या तहनाम्यांतील दुसऱ्या कलमाप्रमाणें आनंदराव नांवाचा पांच वर्षांचा मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव दामोदर गंगाधरराव असें ठेविलें आहे. हा मुलगा माझ्या वंशांतलाच असून तो माझा नातू लागतो. जर या आजारांत माझें देहावसान झालें, तर आजपर्यंत मी सरकारशीं प्रामाणिकपणानें वागत आलों या गोष्टीचा विचार करून या मुलावर सरकारनें मेहेर नजर ठेवावी, व माझ्या पत्नीस ती हयात आहे तोंपर्यंत संस्थानची मालकीण व या दत्तक मुलाची मातोश्री समजून, संस्थानची व्यवस्था तिच्याकडे सोंपवावी. तिला कोणत्याही रीतीनें त्रास पोहोंचूं देऊं नये."

हा खलिता देतेवेळेस महाराजांचें अंतःकरण सद्गदित झालें होतें. त्यांनीं ज्या वेळेस मेजर एलीस यांच्या हातांत हा खलिता दिला व त्यांतील इच्छा परिपूर्ण करण्याबद्दल त्यास विनंति केली, त्यावेळीं मेजर एलीस यांचें अंतःकरणदेखील द्रवलें, व त्यांनींही ब्रिटिश सरकाराकडे आपला खलिता मी ताबडतोब पाठवितों, व माझ्याकडून होईल तितका प्रयत्न करितों, असें आश्वासन दिलें.

त्यानंतर महाराज गंगाधररावांची प्रकृति एकसारखी बिघडत चालली, आणि दत्तविधानाच्या दुसरेच दिवशीं, म्हणजे ता. २१ नोव्हेंबर रोजीं दुपारीं त्यांचा अंत झाला. मेजर एलीसला हें वर्तमान समजतांच तो महाराणी साहेबांस दुखवट्याची भेट देण्याकरितां राजवाड्यांत गेला. यावेळीं बाईसाहेब शोकसागरामध्यें अगदीं बुडून गेल्यामुळें, त्यांची स्थिति इतकी करुणास्पद झाली होती कीं, ती पाहून दगडालाही पाझर फुटावा. मेजर एलीस साहेबांचेंही अंतःकरण द्रवलें, व सर्व कांहीं तुमच्या हेतूप्रमाणें करूं असें सर्वांस आश्वासन देऊन, व राणीसाहेबांस कष्टी होऊं नये असें वारंवार शांतवनार्थ सांगून, तो राजवाड्यांतून खजिन्याचा बंदोबस्त करण्याकरितां किल्ल्यांत गेला. त्यानें तेथें जाऊन खजिन्यास मोहोरबंद कुलुपें घातलीं, व संस्थानच्या प्रमुख कारभारी मंडळीच्या भेटी घेऊन त्यांच्या सल्ल्यानें राज्याचा बंदोबस्त केला. आणि नंतर महाराजांच्या मृत्यूचें वर्तमान व त्याबरोबर दत्तविधानाची बातमी, आपले वरिष्ठ अधिकारी मेजर मालकम यांजकडे पाठविली. मेजर मालकम डलहौसीसाहेबांना चांगलाच ओळखत होता. हिंदुस्थान सरकारचा कल देशी संस्थानें खालसा करण्याकडे आहे असें पाहून मेजर मालकमनें तशीच हिंदुस्थान सरकारकडे शिफारस केली. झांशी संस्थान खालसा करण्यांत यावें, अशी एलीसच्या विरुद्ध मालकमची शिफारस होती. त्या वेळीं लॉर्ड डलहौसी अयोध्या प्रांतांत फिरावयास गेले असल्यामुळें, या खलित्याचा कांहींएक विचार न होतां बरेच दिवस झांशीचें प्रकरण तसेंच लोंबकळत पडलें होतें. पोलिटिकल एजंटच्या मार्फत झांशीची राज्यव्यवस्था चालली होती. महाराणी लक्ष्मीबाईसाहेब यांस मात्र फार आशा वाटत होती कीं, दामोदरराव यांचें महाराजांच्या अनुज्ञेनें व इच्छेनें झालेलें सशास्त्र दत्तविधान इंग्रज सरकार मंजूर करून दामोदररावांस झांशीच्या गादीवर बसवितील; म्हणून त्यांनीं स्वतः लॉर्ड डलहौसी साहेबांस एक खलिता लिहिला व तो झांशीचे पोलिटिकल एजंट मेजर एलीस यांच्या मार्फत रवाना केला. या खलित्याचा योग्य विचार होऊन दामोदररावांस राज्याभिषेक करण्यांत येईल अशी त्यांना खात्री वाटत होती. त्यांचा खलिता

खालीलप्रमाणें होता:—" आमचे श्वशुर शिवरावभाऊ यांनीं या प्रांतामध्यें ब्रिटिश सरकारचा अंमल होण्याचे पूर्वी त्यांस जी अमोल मदत दिली आहे, ती संस्थानचे कागदपत्रांत नमूद झालेली आहे. या मदतीबद्दल ब्रिटिशसरकारनें आमच्या घराण्यावर जी मेहेरबानगी दाखविली व आम्हांस जो आश्रय दिला, त्या योगानें आमचें कल्याणच झालें आहे. कर्नल स्लीमन यांनीं सन १८४२ मध्यें आमचे पति महाराज गंगाधरराव यांचे बरोबर जो तह केला आहे, त्या तहाच्या योगानें, पूर्वी सन १८१७ मध्यें राव रामचंद्रराव यांच्याशीं केलेल्या तहांतील सर्व कलमें पूर्ववत् पाळण्यांत येऊन, त्या योगानें प्राप्त होणारे सर्व फायदे झांशी सरकारास देण्यांत येतील असें आश्वासन मिळालें आहे.

शिवरावभाऊंचें सन्मान्य वर्तन, व ब्रिटिश सरकाराविषयींचें अंतःकरणपूर्वक असलेलें प्रेम यांकडे लक्ष देऊन, व त्यांनीं मृत्यूपूर्वी झांशी संस्थान वंशपरंपरा रामचंद्ररावांकडे चालावें अशी जी इच्छा प्रदर्शित केली होती, ती मान्य करूनच १८१७ चा तह करण्यांत आला. झांशी सरकारचा प्रेमभाव व विश्वासुपणा दृढ करण्याकरितां या तहाच्या योगानें असें ठरविण्यांत आलें कीं, रामचंद्रराव, त्यांचे पुत्र व **यांचे वारस** हे शिवरावभाऊंच्या प्रांताचे वंशपरंपरेनें मालक आहेत. त्यावरून असा उघड अर्थ होतो कीं, गादीचा वारसा औरस पुत्राशिवाय इतरांकडेही जाईल.

हिंदुधर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मृत पित्यास पिंडदान देण्याकरितां, किंवा त्याचे श्राद्धसंस्कारादि विधि करण्यास औरस मुलाप्रमाणें दत्तक मुलासही पूर्ण अधिकार असून, त्या योगानें मृताच्या आत्म्यास शांतता प्राप्त होते, आणि स्वर्गामध्यें मोक्षप्राप्तीचा मार्ग खुला होतो. म्हणून ही दत्तविधानाची चाल हिंदुस्थानांतील सर्व हिंदु लोकांत प्रचलित झाली आहे. या पूर्वापार चालीप्रमाणें आमच्या भ्रतारांनीं तारीख १९ नव्हेंबर रोजीं संध्याकाळीं, दिवाण नरसिंहराव आप्पा, लाला लाहोरीमल्ल, व लाला तट्टीचंद प्रभृति मुख्य मुख्य मुत्सद्दी व सावकार मंडळीस व मला जवळ बोलावून असें सागितलें कीं, माझी प्रकृति आतां अगदीं अस्वस्थ झाली आहे, व औषधांपासून कांहीं गुण येत नाहीं. याकरितां धर्मशास्त्राप्रमाणें गादीचा वारस होण्यास योग्य अशा आपल्या कुळांतील एकाद्या हुषार मुलास माझ्या मांडीवर दत्तक द्यावें. त्याप्रमाणें रामचंद्रबाबांस बोलावून आणून, आमच्या गोत्रांतील अनेक मुलांपैकीं वासुदेवरावांच्या **आनंदराव** नामक पांच वर्षांच्या

मुलास त्यांच्या शिफारशीवरून पसंत केलें. नंतर आमच्या भ्रतारांनीं शास्त्री मंडळीस बोलावून आणून त्यांच्या करवीं दत्तविधान करविलें. दुसरे दिवशीं सकाळीं पंडित विनायकराव यांनीं संकल्प सांगितला, व आनंदरावांचे वडील वासुदेवराव यांनीं यथाविधी पुत्रदान केलें. या मुलाचें नांव दामोदरराव गंगाधर असें ठेवण्यांत येऊन दत्तविधानविधि समाप्त करण्यांत आला.

कारभारी मंडळीनें महाराजांचे आज्ञेवरून मेजर एलीस व कॅप्टन मार्टिन यांना राजवाड्यांत दत्तविधानसमारंभास येण्याकरितां निमंत्रणपत्रिका पाठविल्या होत्या. त्याप्रमाणें ते दोघे अधिकारी तारीख २० रोजीं सकाळीं दहा वाजतां राजवाड्यांत आले होते. त्या वेळीं आमच्या भ्रतारांनीं दत्तविधानास सरकारची परवानगी मिळविण्याबद्दल एक खलिता दिला. एवढेंच नव्हे, तर तो खलिता महाराजांच्या समक्ष त्यांस वाचूनही दाखविण्यांत आला असून मेजर एलीस यांनीं हिंदुस्थान-सरकारास आपल्या इच्छेप्रमाणें सर्व हकीगत कळवितों असें अभिवचनही दिलें. दुसरे दिवशीं म्हणजे सोमवार तारीख २१ नव्हेंबर रोजीं आमच्या भ्रतारांस देवाज्ञा झाली व त्यांची सर्व उत्तरक्रिया औरस पुत्राप्रमाणें दामोदरराव गंगाधर यांनीं केली आहे.

आमच्या भ्रतारांनीं मृत्यूपूर्वीं या मुलास ब्रिटिश सरकाराचे पदरांत घातलें आहे. आतां त्याचें संरक्षण करणें व त्यावर मेहेरबानी ठेवणें हें सर्व त्यांचेकडेसच आहे. शेवटीं आमची अशी विनंति आहे कीं, ज्याप्रमाणें दतियाचा माजी राजा परीक्षित, किंवा जालवणचे संस्थानिक बाळाराव, अथवा ओर्च्छाचा राजा तेजसिंह यांनीं घेतलेले दत्तक सरकारनें मान्य केले आहेत, त्याप्रमाणें प्रस्तुतचें दत्तविधानही सरकारनें मान्य करावें. कारण झांशीच्या तहामध्यें ज्याप्रमाणें 'सतत' असा विशिष्ट शब्द घातला आहे, त्याप्रमाणें तो त्या त्या संस्थानिकांच्या तहनाम्यामध्यें नाहीं. आणि म्हणूनच उपरिनिर्दिष्ट केलेल्या संस्थानांपेक्षांही झांशी संस्थानास दत्तक घेण्याचा हक्क अधिक आहे."

महाराणी लक्ष्मीबाईसाहेब यांची ही योग्य व कायदेशीर विनंति मान्य करण्याबद्दल, झांशीचे पोलिटिकल एजंट मेजर एलीस यांनीं अतिशय जोराची शिफारस केली. 'झांशी संस्थान खालसा करणें व दत्तक घेण्याचा संस्थानचा हक्क नाकबूल करणें, ही गोष्ट कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्या २७ मार्च १८३९ रोजीं पाठविलेल्या १६ व १७ कलमांविरुद्ध आहे, व त्या योगानें त्यांच्या औदार्याचा व

नियमांचा भंग केल्यासारखें होईल असें माझें मत आहे,' अशी एलीससाहेबांकडून त्या खलित्यास पुष्टीच मिळाली. एलीससाहेबांनींच राणीसरकारच्या खलीत्याची शिफारस केली एवढेंच नव्हे, तर मेजर मालकम साहेबांनीं पूर्वी झांशी संस्थान खालसा करावें असा सल्ला दिला असूनही, या वेळीं राणीसाहेबांच्या म्हणण्याचा योग्य विचार व्हावा, व झांशीसंस्थानचा आजपर्यंत व्यक्त झालेला प्रामाणिकपणा व राजनिष्ठा, यांच्याकडे लक्ष पुरवून संस्थान कायम ठेवण्यांत यावें असा पाठपुरावा केला. परंतु लॉर्ड डलहौसीसाहेबांनीं दत्तविधान नामंजूर करून झांशीचें संस्थान खालसा करण्याचा हुकूम दिला. पूर्वी केलेले तहनामे मातीमोल ठरले. दतिया, जालवण व ओर्छा येथील उदाहरणें राणीसाहेबांनीं दिलीं होतीं, त्यांचाही कांहींच उपयोग झाला नाही. त्या संस्थानांत दत्तविधानांचे प्रसंग आले, त्या वेळीं त्यांच्या सुदैवानें लॉर्ड डलहौसीसारखे हांवरे गव्हरनर जनरल नव्हते. लॉर्ड डलहौसीसाहेबांनीं संस्थान खालसा करण्याकरितां जीं कारणें लढविलीं, तीं सत्याला व न्यायाला सोडून होतीं. मेजर बेल यांचे Empire in India व Prospects and retrospects of Indian policy यांतील २०२ ते २१४ व पान २२४ वाचावें; आणि इतकेंही करून झांशी संस्थान खालसा करण्यांत आमचा कांहींच फायदा नसून संस्थानांतील प्रजेचेंच अतिशय कल्याण साधणार आहे, अशी शेखी वर मिरविण्यांत आली होती. "The British Government with a view to confirm the fidelity and attachment of the Government of Jhansie, consents to acknowledge and hereby constitutes Row Ramchandra, his heirs and successors, hereditary rulers of the territory enjoyed by the late Row Sheo-Bhao at the period of commencement of the British Government." मूळ १८१७ च्या तहनाम्यांत हीं वाक्यें असतां, आम्ही झांशीचें राज्य देणगी म्हणून रामचंद्ररावांना व त्यांच्या औरस पुत्रांना दिलें, ही डलहौसीची मल्लीनाथी कोण विश्वसनीय मानील? इंग्रजांच्या राज्याच्या सुरवातीसच शिवराव भाऊ राज्य करीत होते असें यांत स्वच्छ म्हटलें आहे, व **वंशज आणि वारस** या दोघांनाही तें राज्य वंशपरंपरेनें चालवावयाचें आहे असें यांत स्पष्ट आहे. १३ मार्च १८५४ रोजीं गव्हरनर जनरल साहेबांच्या हुकुमाप्रमाणें मालकमनें खालील जाहीरनामा प्रसिद्ध केला.

"झांशीचे महाराज गंगाधरराव हे तारीख २१ नव्हेंबर सन १८५३ रोजीं कैलासवासी झाले. त्यांनीं मरणापूर्वी दामोदरराव यांस दत्तक घेतलें आहे. परंतु नामदार गव्हरनर जनरल यांनी तें दत्तविधान नामंजूर केल्यामुळें, हिंदुस्थानसरकारचे सेक्रेटरी यांच्याकडून ता. ७ मार्च सन १८५४ चा हुकूम आल्याप्रमाणें झांशीसंस्थान ब्रिटिशसरकारच्या अमलांत सामील करण्यांत आलें आहे. त्याप्रमाणें या जाहीरनाम्याच्या द्वारें तमाम लोकांस कळविण्यांत येत आहे कीं, झांशीप्रांत तूर्त बुंदेलखंडचे पोलिटिकल एजंट एलीस यांच्या ताब्यांत दिला आहे. याकरितां झांशीप्रांतांतील सर्व प्रजेनें आपण ब्रिटिशसरकारचे अमलाखालीं आह्मों असें समजून मेजर एलीस साहेबांस वसूल देत जावा, आणि सुखी व संतुष्ट असावें."

झांशी संस्थानांतील प्रजेनें सुखी व संतुष्ट असावें अशी लॉर्ड डलहौसी साहेबांनीं इच्छा दर्शविली, तरी ती फलद्रूप झाली नाहीं. झांशी येथील इतिहासप्रसिद्ध शिवरावभाऊंच्या घराण्याची राज्यसत्ता हिरावून घेण्यांत येऊन तें नामांकित घराणें नष्ट झालें, व बुंदेलखंडांतील फडकत असलेलें मराठ्यांचें भगवें निशाण खालीं पडलें, हें पाहून स्वराज्यसुखाची गोडी चाखणाऱ्या सर्व प्रजाजनांना अत्यंत खेद झाला. संस्थानाची सेवा करण्यांत ज्यांनी आपलें बहुतेक आयुष्य वेंचलें होतें, अशा स्वामिनिष्ठ व स्वराज्यहितचिंतक मुत्सद्दी मंडळींना अतिशय दुःख झालें. ५० वर्षांच्या मैत्रीचा व अतुलनीय राजनिष्ठेचा असा मोबदला मिळेल हें कोणाच्याही स्वप्नीं आलें नव्हतें. डलहौसी साहेबांनी म्हटल्याप्रमाणें, झांशीसंस्थानांतील लोकांच्या हिताकरतांच तें संस्थान खालसा केलेलें असतांना देखील तेथील प्रजेला अतोनात दुःख झालें, ही आश्चर्याची गोष्ट होय !

संस्थान खालसा केल्याबद्दलचा जाहीरनामा प्रसिद्ध करून मेजर एलीससाहेब सरकारचा खलिता राणीसाहेबांस देण्याकरितां राजवाड्यांत गेले. दरबारमहालांत रीतीप्रमाणें चिकाच्या पडद्यांतून त्यांची राणीसाहेबांशीं भेट झाली. एलिससाहेबांनीं गव्हर्नर जनरलचा ठराव राणीसाहेबांस वाचून दाखविला, व झांशी संस्थान खालसा करण्यांत आलें आहे असें जाहीर केलें. दामोदररावांच्या दत्तविधानाची मंजुरी येईल व त्यांना राज्याभिषेक करण्याचा प्रचंड समारंभ होईल, तेव्हां आपण उत्तम प्रकारें राज्यकारभार अज्ञानातर्फे चालवून दाखवूं, अशा आशेंत

गुंतलेल्या राणीसाहेबांना संस्थान खालसा केल्याचें दुःसह वृत्त कानीं पडतांच किती विलक्षण शोक झाला असेल हें कल्पनेवरच सोडणें बरें. त्यांच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या, आणि कंठ दाटून येऊन '**मेरी झांशी नही दूंगी**' असे अभिमानास्पद करुणोद्गार त्यांच्या मुखांतून निघाले. राणीच्या या चारच शब्दांत झांशीवर असलेलें त्यांचें अवर्णनीय प्रेम दिसत होतें. परंतु पडद्यांत राहाणाऱ्या वीर स्त्रीच्या आक्रंदनाला कोण भीक घालणार ! पुनः एकवार झांशी संस्थान खालसा केलें आहे असें राणीसाहेबांस जाहीर करून व बजावून एलीसनें त्यांचा निरोप घतला.

मालकमसाहेबांनीं हिंदुस्थान सरकारला पाठविलेल्या खलित्यांत झांशीच्या राणीच्या उच्च शीलाची व अनुपम चारित्र्याची मुक्त कंठानें प्रशंसा केली होती. झांशींतील प्रत्येक मनुष्य त्यांना अतिशय पूज्य मानतो असें त्यानें आपल्या खलित्यांत वस्तुस्थितीचें वर्णन लिहिलें होतें. त्यामुळें लॉर्ड डलहौसीसाहेबांनीं अतोनात औदार्य दाखवून त्यांना पांच हजार रुपये महिना तहाहयात पेनशन दिली, व शहरांतील राजवाडा त्यांना राहाण्याकरितां त्यांच्या हवालीं केला. राज्य खालसा केलें तरी निदानपक्षीं संस्थानचें सर्व जडजवाहीर व महाराज गंगाधररावांची खासगी शिल्लक राणीसाहेबांस देण्यांत यावी अशी मालकमसाहेबांची शिफारस होती. परंतु डलहौसीसाहेबांनीं ती नामंजूर केली. कारण संस्थानचें जवाहीर व सर्व खासगी मिळकत यावरील मालकी हक्क, महाराज गंगाधरराव यांनीं दत्तक घेतलेल्या मुलाचा असल्यामुळें, ती मिळकत राणीसाहेबांस कायदेशीरपणें देतां येणार नाहीं असें त्यांचें म्हणणें पडलें. दत्तकपुत्र दामोदरराव यांच्या नांवानें ती रक्कम इंग्रजी खजिन्यांत अनामत ठेवण्यांत यावी व ते वयांत आल्यावर त्यांना देण्यांत यावी, असा त्यांनीं हुकूम दिला. डलहौसीसाहेबांची विचित्र राज्यनीती यावरून चांगली उघडकीस येते. कारण दत्तक नामंजूर करून झांशी संस्थान खालसा करण्यांत आलें. परंतु महाराज गंगाधररावांची खासगी इष्टेट राणीसाहेबांना न देतां ती ठेव, तेवढ्यापुरती दत्तक मंजूर करून त्याच्या नांवानें अनामत म्हणून कंपनीच्या खजिन्यांत ठेवण्यांत आली. आणि त्या इस्टेटीवर जर राणीचा हक्क काडीमात्र नसून अज्ञान दत्तकाचा होता, तर मग पुढें राणीनें बंड केलें या सबबीवर ती कोणत्या कायद्यानें जप्त करण्यांत आली, व दामोदररावांना कंगाल करण्यांत आलें ? कारण बंडाचे वेळीं दामोदरराव अगदींच लहान होते. त्यामुळें त्यांच्यावर बंडाचा आरोप लादतां येतच नाहीं.

पोलिटिकल एजंटच्या आज्ञेप्रमाणें राणीला झांशीचा किल्ला व तेथील राजवाडा खाली करून देऊन, शहरांतील राजवाड्यांत आपल्या सामानसुमानासह यावें लागलें. इंग्रजांनीं आपल्या पलटणी आणून झांशीच्या किल्ल्याचा कडेकोट बंदोबस्त केला; व संस्थानांतील प्रजेनें आपलें दुःख मनांतल्या मनांत ठेवावें व नवीन राज्यव्यवस्थेविरुद्ध 'ब्र' देखील उच्चारूं नये म्हणून कडेकोट बंदोबस्त केला. महाराणीला अजूनही इंग्रजांकडून न्याय मिळेल असें वाटत होतें. म्हणून त्यांनीं ही लहानशी अपमानास्पद पेन्शन घेण्याचें नाकारलें, व झांशी संस्थानासंबंधानें जो अन्याय करण्यांत आला त्यावर विलायतेंत बोर्डाकडे अपील केलें. त्यांनीं उमेशचंद्र बानर्जीस साठ हजार रुपये देऊन आपल्या तर्फे वकिली करण्यास विलायतेंत पाठविलें. त्यांच्याबरोबर त्यांनीं जो खलिता पाठविला, त्यांत डलहौसी साहेबांच्या ठरावांतील असत्य व अप्रामाणिकपणा उघड करून दाखविला होता. त्यांतील मुख्य मुद्यांचा सारांश खालीलप्रमाणें होता.

"पूर्वी रामचंद्ररावांनीं घेतलेला दत्तक इंग्रजसरकारांनीं मंजूर केला नाहीं सबब हल्लीं गंगाधरराव यांनीं घेतलेला दत्तकही इंग्रजसरकारास मंजूर करतां येत नाहीं, असें गव्हरनर जनरल म्हणतात. परंतु हा वस्तुस्थितीचा धडधडीत विपर्यास होय. कारण रामचंद्ररावांनीं नव्हे–त्यांच्या पत्नीनें जेव्हां दत्तक घेतला, त्या वेळीं त्यांचे सख्खे चुलते रघुनाथराव व गंगाधरराव हे गादीचे निकटचे वारस हयात होते, व त्यांच्याच तक्रारीवरून रामचंद्ररावांनीं परगोत्रांतील घेतलेला दत्तक इंग्रजसरकारनें त्या वेळीं नामंजूर केला. परंतु ही सबब गंगाधररावांनीं घेतलेल्या दत्तकास मुळींच लागू पडत नाहीं. गंगाधररावांस जवळचे वारस दुसरें कोणी नाहीं. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें दत्तक घेण्याचा त्यांना पूर्ण अधिकार असून त्यांनीं आपल्या गोत्रांतील व कुळांतील आप्तसंबंधी मुलगा दत्तक घेतला आहे. त्याअर्थी तो मान्य करणें सरकारला भाग आहे. हिंदुस्थान सरकारनें कांही तरी कारणें दाखवून अन्यायानें खालसा केलेलें आमचें संस्थान दत्तक मुलाचे नांवानें पूर्ववत् चालविण्याचा हुकूम देण्यांत यावा. दुसरी गोष्ट, झांशी संस्थान आम्हांस मेहेरबानी-दाखल व्यक्तिशः मिळालें होतें, असें हिंदुस्थान सरकारनें म्हटलें आहे. परंतु तें सपशेल खोटें आहे. झांशी संस्थान आम्हांस इंग्रजांनीं दिलें नाहीं. आमच्या पूर्वजांनीं पेशवे सरकारचे वेळीं मोठमोठीं पराक्रमाचीं कामें केलीं असल्यामुळें, त्यांच्या बहादुरीबद्दल त्यांना तें मिळालें आहे; किंबहुना त्यांनीं आपल्या पराक्रमाच्या

जोरावर तें जिंकून घेतलें आहे. आमच्या पूर्वजांनीं स्वपराक्रमानें संपादन केलेलें हें संस्थान खालसा करण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारास पोहोंचत नाहीं."

हा खलिता कितीही मुद्देसूद व न्यायी असला तरी विलायतेस त्याचा निकाल ठरल्याप्रमाणेंच लागला. हिंदुस्थानच्या नकाशावर शक्य तितका आपला तांबडा रंग फासण्याच्या डलहौसीच्या नीतीला बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचा पूर्ण पाठिंबा होता. इंग्रजी मुलखाच्या मध्यभागीं संस्थानांचें लचांड असणें डलहौसीला पसंत नव्हतें. कारण त्यामुळें राज्यकारभाराच्या कामीं नसती अडचण उत्पन्न होते, असें त्याचें प्रामाणिक मत होतें! झांशी खालसा केल्यानें बुंदेलखंडांतील कारभार सुरळीत व एकतंत्री होणार असल्यामुळें, प्रजेच्या व राज्यकर्त्यांच्या हिताच्या दृष्टीनें झांशी संस्थान खालसा करण्याची आलेली संधि दवडूं नये, असें डलहौसीप्रमाणेंच विलायतेंतील बोर्डाचें मत पडलें. आणि २ आगष्ट १८५४ रोजीं बोर्डानें झांशी संस्थान खालसा केल्याबद्दल डलहौसीची पाठ थोपटली, व या अन्यायावर आपलें कायदेशीर शिक्कामोर्तब केलें. राणीची विलायतेंत न्याय मिळेल ही आशा खुंटली.

राणीसाहेबांनीं आपल्या आयुष्याचे उरलेले दुर्दिन ईश्वरचिंतनामध्यें घालविण्यास प्रारंभ केला. पुराण, जप, पार्थिव पूजा, रामनामलेखन, व महालक्ष्मीचें दर्शन यांत त्यांचा वेळ जाऊं लागला. महालक्ष्मीची त्यांना फार भक्ति असल्यामुळें दर शुक्रवारीं त्या निरशन करीत असत. संस्थान खालसा झाल्यामुळें सर्व दरबारी लोकांस रजा देण्यांत आली होती. राजवाड्यांतील पूर्वीचें सर्व वैभव नष्ट झालें होतें. राणीसाहेबांचा खासगी कारभार त्यांचे वडील मोरोपंत तांबे व लक्ष्मणराव बांडे हे दोन पोक्त गृहस्थ पहात असत. दरबारी लोकांना रजा देण्यांत आली असली, तरी आश्रितांचा त्याग राणीसारख्या दयाशील रमणीला कसा करतां येणार? पूर्वींपासून चालत आलेल्या शेंकडों आश्रितांचा भार राणीसाहेबांवर असल्यामुळें पांच हजार रुपयांची भिकारडी पेन्शन त्यांना खर्चाला कशी पुरावी? त्यांचें आयुष्य त्यामुळें दैन्यावस्थेंतच चाललें होतें. इंग्रजांच्या अन्यायामुळें त्यांच्या मनाला अतोनात वेदना होत असल्या, तरी ईश्वरचिंतनांत मग्न होऊन आलेल्या भोगाला त्या सादर झाल्या होत्या. पतिनिधनानंतर ब्राह्मणकुटुंबांतील विधवेच्या कपाळीं ईश्वरचिंतनाशिवाय दुसरें कशाचें सुख लिहिलेलें असणार? दत्तकपुत्र दामोदरराव यांच्याकडे पाहून दिवस कंठावे, व त्याच्या

न्याय्य हक्कांपासून तो वंचित झाला म्हणून त्याला पोटाशीं धरून अश्रू ढाळावे, याशिवाय त्यांना दुसरें कोणतें समाधान होतें? पतिनिधनामुळें शून्य झालेलें आयुष्य प्रजापालनांत घालवूं व प्रजेच्या सुखाकरितां देह झिजवून देवी श्री-अहिल्याबाईप्रमाणें, या लोकींच नव्हे तर परलोकीं देखील सुखाचें साधन करूं, अशी राणीसाहेबांची बहुधा सात्विक महत्वाकांक्षा असेल. परंतु इंग्रजांच्या राज्यलालसेमुळें त्यांची ती सात्विक इच्छा जागच्या जागींच करपून गेली, आणि दैन्य व अपमान त्यांच्या नशीबीं आले. त्यांची वंशपरंपरेची इंग्रजसरकारशीं असलेली मैत्री झिटकारण्यांत आली, आणि त्यांची राजनिष्ठा तुच्छ ठरविण्यांत आली. अशा स्थितींत राणीच्या हृदयांत जो कल्लोळ माजला असेल, त्याची कल्पना लेखणीला तरी योग्य शब्दांत करतां येत नाहीं.

---

## प्रकरण ६ वें.

# बंडखोर पेशवे.



पानपतच्या लढाईनंतर पेशवाई वांचणार नाहीं असेंच पुष्कळांना वाटत होतें. कारण पानपतच्या युद्धांत 'दोन मोतीं गळालीं सत्तावीस मोहरा हरपल्या आणि रुपये व खुर्दा इतका नष्ट झाला कीं त्यामुळें दक्षिणेंतील मराठा स्त्रियांची नऊ लाख बांगडी वाढवली गेली.' परंतु थोरले माधवराव ऊर्फ रावसाहेब पेशवे यांनीं राज्यकारभाराची विसकटलेली घडी इतक्या व्यवस्थित रीतीनें पुन्हां बसविली कीं, पानपतचा पराभव लोक विसरून गेले. माधवराव गादीवर बसले तेव्हां त्यांचें वय केवळ सोळा वर्षांचें होतें. परंतु त्यांची बुद्धि अत्यंत तीव्र व सरळ होती. मराठेशाहीचें पुढील धोरण ठरविण्याचें शहाणपण त्यांचे आंगीं होतें. पेशवाईवर वांकडी नजर ठेवणारा त्यांचा शूर चुलता राघोबादादा, यांचा त्यांस प्रथमदर्शनीं बंदोबस्त करावा लागला. रघुनाथराव शूर असला तरी स्वभावानें चंचल व बाईलबुद्धया होता. त्यामुळें पुतण्याला बाजूस सारून पेशवाई बळकाविण्याची दुष्ट व स्वार्थी वासना त्याच्या मनांत उत्पन्न झाली होती. परंतु माधवरावांच्या शहाणपणामुळें त्याचा डाव त्यावेळीं साधला नाहीं, आणि त्याला माधवरावांच्या नजरकैदेंत अखेरीस राहाणें भाग पडलें. माधवराव पेशव्यांनीं

शिंद्यांच्या पानपतामुळें बेवारस झालेल्या दौलतीवर अनौरस महादजी शिंद्यांची स्थापना केली, आणि आपल्याला राज्यलालसा नाहीं अशी मराठे सरदारांची खात्री करून दिली. त्याचप्रमाणें १७६५ सालीं मल्हारराव होळकर मरण पावल्यानंतर तेथील कारभार त्यांची सून अहल्याबाई हिच्याकडे सोंपविला; आणि अहल्याबाईंचा पुत्र मालेराव हा वारल्यानंतर तुकोजीस वारस ठरविण्याची बाईस त्यांनीं परवानगी दिली. नागपूरकर भोंसल्यांशीं तह करून त्यांना संतुष्ट केलें. कोणत्याही सरदाराच्या दौलतीचा लोभ त्यांनीं धरला नाहीं. सरदार राज्याचे आधारस्तंभ असल्यामुळें ते संतुष्ट राहिले तरच राज्याची आब राहते ही गोष्ट ते जाणून होते. ज्यांनीं स्वपराक्रमानें राज्यें कमावलीं, व पेशव्यांशीं अखेरपर्यंत स्वामिनिष्ठा दाखविली, त्यांचीं राज्यें प्रथम दत्तक नामंजूर करून व मग तीं बेवारशी ठरवून, खालसा करून गडप करण्याचें धोरण त्यांच्या राजनीतीला मंजूर नव्हतें. त्यांचें अंतःकरण अतिशय उदार असल्यामुळें त्यांनीं सर्वांची मैत्री संपादन करून, मराठी राज्य एकट्या पेशव्यांचें नसून सर्व सरदारांचें आहे अशी त्यांची समजूत घातली. नाना फडणवीस यांस फडणविशीचीं वस्त्रें देऊन राज्यकारभाराची व निरनिराळ्या खात्यांची सुव्यवस्था लावून दिली. हरीपंततात्या फडके या होतकरू, पराक्रमी व धाडशी पुरुषास लष्करचा मुख्य अधिकार दिला, आणि दक्षिणमहाराष्ट्रांत पटवर्धन मंडळींची स्थापना करून निजामवर व म्हैसूर प्रांतातील हैदरअल्लीवर वचक बसविला. पानपतानंतर सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांना तुच्छ लेखण्याची प्रवृत्ति सर्वत्र पसरली होती. पानपतच्या लढाईत मराठे हरले असले तरी मोडले नाहींत, हें त्यांनीं लवकरच आपल्या पराक्रमानें सर्वांना दाखवून दिलें. सन १७६३ सालीं राक्षसभुवन येथें या पेशव्यानें निजामाचा पराभव केला. या लढाईत निजामाचा प्रसिद्ध दिवाण विठ्ठल सुंदर मारला गेला. निजामाचा याप्रमाणें पुरता बंदोबस्त केल्यानंतर, कर्नाटक प्रांतांत स्वाऱ्या करून त्यांनीं तिकडचा बराचसा मुलूख जिंकून घेतला, आणि हैदरअल्लीच्या वाढत्या पराक्रमाला व महत्वाकांक्षेला चांगलाच आळा घातला. सन १७६५ सालीं उत्तरेस स्वारी करून रजपूत व जाठ यांचा पराभव करून त्यांच्यापासून आपले पुरातन हक्क वसूल केले. यानंतर चार वर्षांनीं उत्तर हिंदुस्थानावर दुसरी मोठी स्वारी करून, शिंदे, होळकर व रामचंद्र गणेश कानडे या थोर व पराक्रमी सरदारांमार्फत रोहिलखंड जिंकून नजीबखानाचा सूड उगविला; आणि दिल्ली काबीज करून वृद्ध शहा अलम बादशाहास घोर संकटांतून सोडवून तेथें परत तख्तावर बसविलें.

पानपतावर हरपलेली कांहीं लूट यावेळीं मराठ्यांनीं परत पुण्यास आणली. यानंतर दिल्लीची बादशाही मराठ्यांच्या ओंजळीनेंच पाणी पीत होती.

माधवराव पेशवे अत्यंत निःपक्षपाती होते. राजकारणांत ते कोणाचीच भीडभाड ठेवीत नसत. स्वभावानें तापट असल्यामुळें त्यांची जरब विलक्षण होती. परंतु त्यांच्या न्यायी व पवित्र वर्तनानें त्यांनीं प्रजेचा आदर व प्रेम संपादन केलें. त्यांनीं नवीन नियम व कायदे करून राज्याची व्यवस्था बांधून दिली. त्यांच्या दरबारीं रामशास्त्री प्रभुणे हे मुख्य न्यायाधिशाच्या कामावर होते. रामशास्त्रींचा न्याय इतका कांटेतोल होता कीं, महाराष्ट्रांत अजूनही त्यांच्याविषयीं अत्यंत पूज्यभाव वसत आहे. नाना फडणवीस, रामशास्त्री प्रभुणे, हरीपंत फडके, पटवर्धन, महादजी शिंदे, अहल्याबाई होळकर, अशी थोर थोर मंडळी त्यांच्या कारकीर्दींत उदयास आली. यामुळें पानपतास गेलेली मराठ्यांची अब्रू, पुनः उज्वल झाली. परंतु अकरा वर्षांच्या कारकीर्दीनंतर वयाच्या केवळ अठ्ठाविसाव्या वर्षी हा थोर मनाचा व विलक्षण कर्तबगारीचा पेशवा क्षयरोगानें **थेऊर** येथें मरण पावला. त्यांच्याबरोबर त्यांची बायको साध्वी रमाबाई ही लहान वयांतच सती गेली. पानपतासारखा जबरदस्त घाला पडला असतांनाही ज्यानें वयाच्या सोळाव्या वर्षी पेशवाईचा कारभार हातीं घेऊन दहा वर्षांच्या आंतच सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचा वचक बसविला, त्याची कर्तबगारी किती विलक्षण असली पाहिजे ! त्यांच्या अकाली मृत्युमुळें मराठी राज्याचें जितकें नुकसान झालें तितकें पानपताच्या अरिष्टानेंही झालें नाहीं. माधवरावांच्या मृत्यूनंतर त्यांना मूलबाळ नसल्यामुळें त्यांचा धाकटा भाऊ नारायणराव हा पेशवा झाला. हा मनमिळाऊ व हुशार नसून हेकड होता. यामुळें थोड्याच दिवसांत त्यानें सर्व दूर शत्रु उत्पन्न केले राजवाड्यांतील स्त्रियांचीं कारस्थानें चालू झालीं. दहा महिन्यांच्या आंतच राघोबादादा व त्यांची पत्नी आनंदीबाई या दोघांनीं आपल्या पुतण्याचा खून करून पेशवाई बळकाविली. माधवरावांच्या कारकीर्दींत न साधलेला डाव या वेळीं राघोबांनीं साधून घेतला. राघोबा आपले हात खुनाच्या रक्तानें विटाळून पेशवा झाला खरा, परंतु ही गोष्ट दौलतीला आधारभूत असणाऱ्या सरदारांना आवडली नाहीं. नारायणराव मारला गेला त्या वेळीं त्यांची पत्नी गंगाबाई ही गरोदर होती. तेव्हां या सरदार मंडळींनीं गर्भांत असलेल्या तिच्या पुत्राच्या नांवानें पेशवाईची द्वाही फिरवून राज्यकारभार आपले हातीं घेतला. सरदार मंडळींच्या या कारस्थानास **बारभाईचें** कारस्थान असें म्हणतात. राघोबा अर्थातच या बारभाईवर अतीशय संतापला. परंतु त्याचें कांहींच

चालेना ! इकडे गंगाबाई प्रसूत होऊन सुदैवानें तिला मुलगा झाला. त्याचें सवाई माधवराव असें नांव ठेवून त्यांच्या नांवानें कारभारी मंडळीनें निश्चिंत होऊन राज्यकारभार चालविला. या मंडळींत नाना फडणवीस हा प्रमुख मुत्सद्दी अग्रगण्य होता.

यानंतर राघोबानें सुरतेस इंग्रजांकडे जाऊन पेशवाई परत मिळविण्याकरितां त्यांची मदत मागितली. मराठेशाहींत आपलें बोट शिरकविण्याची संधि इंग्रज कित्येक दिवसांपासून पहातच होते. त्यांना हें राघोबाचें निमित्त बरें सांपडलें. राघोबा व सवाईमाधवराव पेशवे यांच्यामधील हें भांडण वास्तविक खासगी स्वरूपाचें होतें. कारण सर्व मराठे सरदार मंडळींनीं सवाई माधवराव यांस पेशवे म्हणून कबूल केलें होतें. त्यामुळें या भानगडींत पडण्याचें इंग्रजांना कांहीं एक कारण नव्हतें. परंतु मराठ्यांवर कोणत्यानाकोणत्या तरी निमित्तानें कुरघोडी करण्याची संधि इंग्रजांना हवी असल्यामुळें, राघोबाचा पक्ष त्यांनीं ताबडतोब घेऊन पुणें दरबारशीं लढाईची सुरवात केली. नाना फडणविसांनीं हैदरअल्ली याच्याशीं त्यावेळीं तात्पुरतें सख्य जोडून इंग्रजांशीं टक्कर देण्याची तयारी केली. परंतु लढाईच्या वेळीं पेशव्यांचा सरदार फत्तेसिंग गायकवाड हा इंग्रजांना मिळाला, व भोसल्यांनीं इंग्रजांपासून सोळा लाख रुपये नजराणा ऊर्फ लुचपत घेऊन युद्धांतून आपलें आंग काढून घेतलें. यामुळें सात वर्षेपर्यंत (१७७५ ते १७८२) हें इंग्रजमराठ्यांचें पहिलें युद्ध चालून अखेर शिंद्यांच्या मार्फतीनें सालबाईचा तह ठरला. या युद्धांत इंग्रजांना साष्टी बेट मिळालें व गायकवाडाशीं त्यांची थोडीशी दोस्ती झाली. राघोबाला मात्र तीन लाख रुपये सालिना पेन्शन घेऊन कोपरगांव येथें स्वस्त 'हरिहरि' करीत बसावें लागलें. या युद्धानें मराठ्यांची सत्ता बरीच कमी झाली, तरी मराठे-शाहींत इंग्रजांचा फारसा शिरकाव झाला नाहीं. युक्ती योजल्यास मराठामंडळाची फळी फुटूं शकते हें मात्र या युद्धानें इंग्रजांना कळून आलें. या ज्ञानाचा त्यांनीं पुढें लवकरच फायदा करून घेतला.

सवाई माधवरावांची पुढील कारकीर्द यानंतर बरी गेली. परंतु पेशवा लहान असल्यामुळें नाना फडणवीस व माहादजी शिंदे यांच्याच वैयक्तिक कर्तबगारीमुळें पेशव्यांची ठाकूरकी थोडे दिवस कायम राहिली. 'फोडा आणि झोडा' या इंग्रजी कुटिल नीतीला पेशवे, शिंदे, भोंसले, निजाम हे सर्वच बळी पडले. इंग्रज हिंदुस्थानांत दिवसेंदिवस प्रबल होत चालले आहेत, ही गोष्ट कोणीच लक्षांत घेतली

नाहीं. त्यामुळें म्हैसुरच्या टिपुसुलतानाचा पराभव करण्याकरतां पेशवे, निजाम व भोंसले इंग्रजांना जाऊन मिळाले. मराठेशाहींतील निरनिराळ्या सरदारांची एक जूट कशीबशी १७०५ पर्यंत टिकली; त्या वेळीं निजामाचा पराभव करण्याकरितां पेशव्यांच्या निशाणाखालीं सर्व मराठे सरदार एकत्र झाले होते. मराठेशाहीच्या वैभवाचें व सामर्थ्याचें शेवटचें प्रदर्शन खर्ड्यांच्या लढाईंत झालें. यानंतर सवाईमाधवराव पेशवे मृत्यु पावले, आणि मराठी साम्राज्यांत भाऊबंदकी सुरू झाली. दुर्दैवानें सवाईमाधवरावांच्या कारकीर्दीच्या अखेरीअखेरीस महादजी शिंदे, हरीपंत फडके व अहल्याबाई होळकर हीं अत्यंत कर्तबगार माणसें मरण पावलीं. तुकोजीराव होळकर, नाना फडणवीस व परशुरामभाऊ पटवर्धन हे थोडे दिवस पुढें जिवंत होते. परंतु त्यांच्या मृत्यूनंतर मराठेशाहींत चौचिंधी माजली आणि शेवटीं त्यामुळें मराठ्यांची सत्ता रसातळाला गेली.

सवाईमाधवरावांच्या मृत्यूनंतर घरभेद्या व राष्ट्रघातकी राघोबादादाच्या व आनंदीबाईच्या पुत्राला पेशवेपद देऊं नये असें नानांच्या मनांत होतें. परंतु शिंद्यांच्या मदतीनें बाजीराव पेशवा झाला. बाजीरावाच्या नालायकीमुळें व स्वार्थामुळें मराठे सरदारांत भांडणें माजलीं. स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान पार लोपून त्यांची जागा स्वार्थानें घेतली. शिवछत्रपतींची हिंदवी स्वराज्याची किंवा पेशव्यांची हिंदुपदपादशाहीची, या दोन्ही कल्पना मराठे सरदार पार विसरले, व प्रत्येक जण आपल्या पोळीवर तूप ओतण्याचा प्रयत्न करूं लागला. परके आपल्यांतील दुहीचा फायदा घेऊन मातबर होतील, व आपल्यांत फूट पाडून एकेकाला क्रमाक्रमानें संधी साधून ठेंचतील, ही गोष्ट कोणींच मनांत आणली नाहीं. या भांडणांत सलोखा करण्याचें प्रमुखाचें कर्तव्य बाजीरावास करतां आलें नाहीं. शिंदे व होळकर यांच्या तंट्यांत शिंद्यांचा पक्ष बाजीरावानें घेतला असल्यामुळें, संधि सांपडतांच यशवंतराव होळकरानें पुण्यावर स्वारी केली. यशवंतरावाच्या भावाला बाजीरावानें बंडाच्या आरोपाबद्दल हत्तीच्या पायाशीं दिलें होतें. त्याचा सूड घेण्याकरितां त्या वेळीं यशवंतरावानें पुणें शहर लुटलें आणि राघोबादादाचा दत्तक मुलगा अमृतराव याची पेशवाईवर स्थापना केली. बाजीराव पळून वसईस इंग्रजांकडे गेला. तेथें बाजीराव व इंग्रज यांचा ३१ डिसेंबर सन १८०२ रोजीं तह ठरला. या तहाप्रमाणें इंग्रजांनीं आपली दहा हजार फौज बाजीरावाचे संरक्षणाकरितां कायमची पुणें दरबारीं ठेवावी, व तिच्या खर्चासाठीं छत्तीस लक्ष रुपये उत्पन्नाचा आपला मुलुख बाजीरावानें इंग्रजांस

कायमचा तोडून द्यावा असें ठरलें. या तहानें इंग्रजांच्या परवानगीशिवाय हिंदुस्थानांतील राजेराजवाड्यांशीं तह किंवा युद्ध करण्याची बाजीरावास मनाई झाली. राघोबादादांच्या बंडाच्या वेळीं इंग्रजांची मसलत नाना व महादजी यांच्या चातुर्यामुळें साधली नव्हती. ते दोघेही थोर पुरुष या वेळीं हयात नव्हते, आणि त्यामुळें इंग्रजांचें तट्टू पेशवाईत कायमचे घुसलें. अशा प्रकारचा अपमानास्पद तह करून इंग्रजांच्या मदतीनें बाजीरावानें पुण्यांत प्रवेश केला, व असलें अपमानाचें जिणें घेऊन हा दिवट्या आईबापांचा नालायक व नेभळा चिरंजीव पुण्याचा पेशवा झाला.

वसईच्या तहामुळें पेशव्यांचेंच नव्हे तर इतर मराठे सरदारांचेंही स्वातंत्र्य नष्ट झालें. गायकवाडानें पूर्वीच इंग्रजांशीं तह करून आपलें स्वातंत्र्य गमावलें होतें. १७७५ सालींच गायकवाडानें आपल्या इंग्रजभक्तीची चुणुक दाखविली होती. पेशव्यापेक्षां इंग्रज त्याला अधिक निकटचे वाटूं लागले होते. रुपयांचा पुरा खुराक मिळतांच भोसले इंग्रजांच्या गळ्यांत पडूं लागले होते. शिंदे-होळकर स्वार्थी असले तरी अजूनपर्यंत मात्र स्वतंत्र होते. परंतु पेशव्यांबरोबर तेही इंग्रजांचे अंकित झाले. मराठे सरदारांना अर्थातच ही गोष्ट आवडली नाहीं. वसईचा तह त्यांच्या अनुमतीनें झाला नसल्यामुळें त्यांनीं तो नाकबूल केला. पेशव्यांच्या वतीनें इंग्रजांनीं अर्थातच या सरदारांना बंडखोर ठरवून त्यांच्याशीं युद्ध पुकारलें. हे सरदार पेशव्यांचे अंकित असल्यामुळें वसईचा तह त्यांच्यावर बंधक आहे, या सबबीवर इंग्रजांनीं १८०३ ते १८०५ च्या दरम्यान शिंदे, होळकर, व भोंसले यांना एकेकटें गांठून त्यांचा निरनिराळ्या लढायांत पराभव केला, आणि त्या सर्वांवर आपल्या तैनाती फौजेचें लोढणें रेसिडेंटासह लादलें, आणि त्यांचा बराच प्रांत लाटला. इंग्रजांच्या संमतीशिवाय कोणीही दुसऱ्याशीं तह किंवा युद्ध करूं नये, अशी अट या सर्वांवर लादण्यांत आली. या अटीमुळें मराठी साम्राज्याचीं स्वतंत्र लहान लहान छकलें होऊन त्यांच्यापैकीं प्रत्येकावर इंग्रजांचा शह लागू झाला. एवढेंच नव्हे, तर या सर्व मराठी संस्थानांना आपसांत एकी करून मराठ्यांचा दरारा व वैभव हिंदुस्थानभर वाढविण्याचीही बंदी करण्यांत आली. गेलीं ३० वर्षें शिंद्यांच्या तंत्रानें चालणारे दिल्लीच्या बादशहाचें बाहुलें, या तहामुळें इंग्रजांच्या हातीं आलें, आणि इंग्रजांची सत्ता हिंदुस्थानांत सार्वभौम स्वरूपाची झाली.

याप्रमाणें मराठ्यांचें दुसरें युद्ध समाप्त झालें. बाजीरावाला आतां इंग्रजांकडून फारसा मान मिळेनासा झाला. कारण त्यांच्या दृष्टीनें त्याचा दर्जा आतां फक्त एका सामान्य संस्थानिकाइतकाच काय तो उरला. १८०२ सालीं शिंदे, होळकर, भोंसले, व गायकवाड हे सर्व सरदार पेशव्यांचे अंकित आहेत असें इंग्रज तोंडानें बोलून दाखवीत होते, व पेशव्यांच्या वतीनेंच त्या बंडखोरांना शिक्षा लावण्याकरितां त्यांनीं त्यांच्याशीं युद्ध केलें. परंतु १८०५ नंतर शिंदे, होळकर, भोंसले, गायकवाड हे सर्व आपापल्या परी स्वतंत्र राजे असून, पेशव्यांशीं त्यांचा काडीचाही संबंध नाहीं असें इंग्रजांतर्फे ठरविण्यांत आलें. आणि पेशव्यांनीं त्यांच्याशीं कोणतेंही खलबत करूं नये अशी पेशव्यांना तंबी देण्यांत आली. मराठी साम्राज्याचे प्रमुख सूत्रचालक हा पेशव्यांचा दर्जा नष्ट होऊन त्यांना एका सामान्य संस्थानिकाची किंमत आली. वसईस मूर्खपणानें केलेल्या तहाचा परिणाम असा विपरीत झालेला पाहून पेशव्यांस चैन पडेनासें झालें. निजाम किंवा दुसरे स्वतंत्र मुसलमान संस्थानिक एवढयापुरतेच, इंग्रजांचे परवानगी-शिवाय स्वतंत्र तह किंवा युद्ध न करण्याचें कलम लागू पडतें, असें पुणें दरबारचें मत होतें. पेशवाई अमलाखालीं असणाऱ्या मराठी सरदारांच्या बाबतींत देखील हें कलम लागू करणें अन्यायाचें व विपर्यासाचें आहे, असें पेशव्यांचें म्हणणें पडलें. कारण, इंग्रज व पेशवे यांत झालेला तह पेशव्यांच्या अंतर्गत कारभाराला लागू पडत नाहीं आणि मराठी संस्थानिक पेशवाईंतच मोडतात, असें पेशव्यांचें मत होतें. परंतु तहनाम्यांतील कलमाचा हा सरळ अर्थ इंग्रजांना साहजिकच पटला नाहीं. कारण मराठी साम्राज्याचीं छकलें होऊन त्यांची परस्परांतील एकी व सहानुभूति नष्ट होणें इंग्रजांना इष्ट होतें. तसें झाल्याशिवाय सार्वभौम सत्ता त्यांच्या हातीं येणें शक्यच नव्हतें. त्यामुळें या भाऊबंदकीवर इंग्रजांनीं जोर दिला आणि आपल्या मध्यस्थीशिवाय मराठे सरदारांशीं पत्रव्यवहार करण्याची पेशव्याला बंदी केली. इंग्रजांचा हा जाच असह्य झाल्यामुळें, व या अपमानास्पद तहाच्या अटीनें मराठेशाहीचें वैभवच नष्टप्राय झालें हें पाहून, पेशव्यानें इंग्रजांशीं विरोध सुरू करून त्यांच्याशीं अखेरीस लढाई पुकारली. परंतु आपापसांतील भांडणांनीं कमजोर झालेल्या, व स्वतांच्या गाढवपणामुळें आपल्या पायावर धोंडा पाडून घेतलेल्या, स्वार्थानें बुजबुजलेल्या व देशाभिमानशून्य बनलेल्या अनुयायांच्या जोरावर बाजीरावाला इंग्रजांसारख्या हुशार, कावेबाज, धोरणी व पराक्रमी शत्रूवर विजय कसा मिळवितां येणार? त्याच वेळीं सातारच्या प्रतापसिंह महाराजांचा

अचानक इंग्रजांना कळवळा आला, आणि पेशव्यांचा पराभव करून छत्रपतीला त्यांच्या कैदेंतून इंग्रजांनीं मुक्त केलें. पेशवाईराज्य १८१८ सालीं या तिसऱ्या इंग्रज-मराठी युद्धानंतर इंग्रजांच्या हातीं आलें. इंग्रजांनीं प्रतापसिंहास साताऱ्या-सभोंवतालचा फक्त जेमतेम चौदा लक्षांचा मुलूख देऊन बाकीचें पेशव्याचें सर्व राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. बाजीरावास सालिना आठ लाखांची नक्त नेमणूक करून देऊन, उत्तर हिंदुस्थानांत कानपुराजवळ बिठुर उर्फ ब्रम्हावर्त येथें नेऊन ठेविलें. याप्रमाणें १७१४ सालीं स्थापन झालेली पेशवाई जवळ जवळ शंभर वर्षांनीं नामशेष झाली, आणि शेवटचा बाजीराव पेशवा इंग्रजांची पेन्शन खात राज्यकारभार सोडून ब्रम्हावर्त येथें स्नानसंध्या व पूजा करण्यांत दंग झाला.

बाजीरावाला आयुष्यमात्र बरेंच लाभलें होतें. इतर पेशव्यांच्या मानानें या अभाग्याला मार्कंडेयाचेच आयुष्य मिळालें होतें असें म्हटलें पाहिजे. पूर्वीच्या कर्तबगार पेशव्यांच्या वाट्यास जें दीर्घायुष्य आलें नाहीं, तें या ना-लायकाला लाभलें. इंग्रजांची पेन्शन खात, १८५१ म्हणजे पेशवाई घाल-विल्यानंतर ३३ वर्षें पर्यंत, त्यानें आपलें आयुष्य ब्रम्हावर्तांत काढलें. पंजाबच्या लढाईच्या वेळीं बाजीरावानें तशाही स्थितींत इंग्रजांना थोडी बहुत मदत केली. अफगाणिस्थानच्या लढाईच्या वेळींही इंग्रजांना त्यानें पांच लाख रुपये कर्जाऊ देऊन त्यांचा बोज राखिला. आपलें राज्य गेलें तरी त्याबद्दल राग न मानतां इंग्रजांना वेळोवेळीं मदत करण्यांत त्याला धन्यताच वाटत असे. बरीचशी पेनशनीची रकम हा धर्मादायांत खर्च करीत असे, आणि आपलें राज्य घेणाऱ्या इंग्रजांना त्यांच्या अडी अडचणीच्या वेळीं पैशाची मदत करणें, ही गोष्ट त्याच्या धर्मादायाच्या अपूर्व कल्पनांतच मोडत होती ! ब्रम्हावर्तास गेल्यावर बाजीरावला फक्त तीन कन्या झाल्या. पुत्ररत्न झालें नाहीं. तेव्हां त्यानें जणूं ईश्वरावर कडी कर-ण्याकरितां म्हणून एकामागून एक तीन दत्तक घेतले. नानासाहेब, दादासाहेब व बाळासाहेब हे तीन बाजीरावांचे दत्तक पुत्र होते. त्यांपैकीं दादासाहेब बाजीरा-वांच्या हयातींतच वारले, परंतु त्यांची पत्नी रोहिणीबाई यांनीं रावसाहेब नांवाचा एक दत्तक घेतला. या तिघांपैकीं नानासाहेब फार शूर, रुबाबदार आणि दिलदार होते. त्यामुळें बाजीरावांची त्यांच्यावर विशेष ममता होती, आणि आपल्यामागें तोच पेशवाईचा मुख्य वारस होणार असें ते लोकांजवळ व भेटीस प्रसंगोपात येणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांजवळही बोलून दाखवीत. बाजीरावानें धोंडोपंत ऊर्फ नानासाहेब या आपल्या प्रमुख दत्तक पुत्राला आपला उत्तर अधिकारी नेमिलें होतें. माझ्या-

मागें या मुलाला माझी **पेशवा** ही पदवी, व मला मिळत असलेली पेन्शन मिळावी, अशी बाजीरावानें इंग्रजसरकाराकडे विनंति केली होती. या गोष्टींचा विचार करण्याची आज कांहींच घाई नसल्यामुळें, आपल्या मृत्यूनंतर या प्रश्नाचा नीट रीतीनें विचार होऊन, योग्य निर्णय दिला जाईल, असें बाजीरावाला कंपनीचें मोघम व अतोनात सावधगिरीचें उत्तरही आलें होतें. २८ जानेवारी १८५१ रोजीं बाजीरावाचा अंत झाला. त्या वेळीं नानासाहेबांचें वय सरासरी २७ वर्षांचें होतें. १८५१ ते १८५६ च्या दरम्यान नानासाहेबांच्या सरळ स्वभावाची, मधुर भाषणाची व सच्छीलाची इंग्रज लेखकांनींही अतोनात स्तुति केली आहे. इंग्रजी अधिकाऱ्यांची सल्ला विचारूनच ते प्रथम प्रथम आपला कारभार करीत असत. बाजीरावाच्या मृत्यूनंतर सरासरी २८ लाख रुपयांची इस्टेट त्यांच्या हातीं लागली. त्यांपैकीं कांहीं प्रामीसरी नोटा होत्या, कांहीं नगद रकम होती, व कांहीं जडजवाहीर होतें. बाजीरावाबरोबर दक्षिणेंतून ब्रह्मवर्तास आलेलीं अनेक दक्षिणी कुटुंबें त्यांच्या आश्रयानेंच आपला उदरनिर्वाह चालवीत असत. बाजीरावाच्या मृत्यूनंतर त्यांच्या पालनपोषणाचा भार साहजिकच नानासाहेबांवर पडला. तेव्हां पित्याला मिळत असलेली नेमणूक आपणाकडे चालू ठेवावी, अशी त्यांनीं इंग्रजसरकारकडे विनंति केली. परंतु त्यांच्या विनंतीला कंपनीकडून नकार मिळाला. लॉर्ड डलहौसीनें लिहिलें, " बाजीराव पेशव्यानें भरपूर तेहतीस वर्षें सरकारची नेमणूक खाल्ली." [ बाजीरावाचें दीर्घायुष्य दरसाल द्याव्या लागणाऱ्या आठ लाखांच्या नक्त नेमणुकीमुळें इंग्रजांच्या डोळ्यांत फारच सलत होतें. ] " इतकीं वर्षें वांचल्यामुळें अडीच कोटींहूनही अधिक रकम कंपनीकडून त्यांच्या पदरांत पडली. मृत्यूसमयीं त्यांनीं अठ्ठावीस लक्षांची इस्टेट आपल्या नातलगांकरतां ठेविली आहे. सरकारी कायद्याप्रमाणें या नातलगांचा त्यांना मिळत असलेल्या नेमणुकीवर कोणत्याही प्रकारचा हक्क पोहोंचत नाहीं. पेशव्यांनीं जी रक्कम ठेविली आहे ती नातलगांच्या खर्चाकरितां अगदीं पुरेशी आहे. कदाचित् ही इस्टेट अठ्ठावीस लाखांपेक्षां देखील जास्त असण्याचा संभव आहे. "

लॉर्ड डलहौसीच्या या उत्तरानें नानासाहेबांची अतिशय निराशा झाली. पेन्शन बंद झाल्यामुळें आश्रितांचें रक्षण कसें करतां येईल ही चिंता त्यांचेमागें लागली. गव्हरनर जनरलच्या निकालावर विलायतेस अपील करण्याचें त्यांनीं ठरविलें. नानासाहेबांनीं आपल्या अपीलांत लिहिलें कीं, " पेशव्यांनीं जेव्हां इंग्रजांचे हातीं आपलें राज्य सोंपविलें, तेव्हां आपल्या स्वतःच्या व आपल्या

परिवाराच्या निर्वाहाकरितां व इतर खर्चांकरितां नक्त नेमणूक ठरवून घेतली. ते मृत्यु पावले असले तरी त्यांचा परिवार आज कायमच आहे. त्यांच्या उत्तर-अधिकारी पुत्राचा व इतर नातलगांचा परिवारांत समावेश होत नाहीं, असें म्हणणें चुकीचें आहे. त्यामुळें ते वारले असले, तरी त्यांना मिळत असलेली नेमणूक बंद करणें अन्यायाचें होईल. बाजीरावांच्या परिवाराच्या खर्चाची जबाबदारी त्यांचें राज्य घेतांना इंग्रजांनीं आपल्या शिरावर घेतली होती. ती पार पाडणें त्यांचें कर्तव्य आहे. पेशव्यांचें राज्य जर इंग्रजांना कायमचें मिळालें, तर त्याच्या बदल्यांत मिळणारी नेमणूकही कायम स्वरूपाचीच असली पाहिजे. इतर राजवंशांशीं कंपनीची वागणूक बऱ्याच निराळ्या प्रकारची झाली आहे. म्हैसूरच्या लढायांत इंग्रजांना जय मिळवून देणाऱ्या मित्रांत पेशव्यांचें नांव अग्रभागीं आहे. टिपुसुलतानाच्या पराभवानंतर त्याच्या पुत्रपौत्रांच्या खर्चाकरितां कंपनीनें वार्षिक नेमणूक सुरू केली. मोंगल बादशहाच्या वंशजांची नेमणूक अजूनही चालू आहे. त्याचप्रमाणें पेशव्यांचे पन्नास लाख रुपये उत्पन्नाचें राज्य घेऊन, त्याच्याबदला पेशव्यांच्या व त्यांच्या वंशजांच्या पालनपोषणाचा भार कंपनीनें आपल्या शिरावर घेतला. अशी स्थिति असतांना म्हैसूर व दिल्ली येथील न्याय पेशव्यांच्या वंशजांना कां लागू करण्यांत येऊं नये ? पेशव्यांनीं आजपर्यंत फितुरी केली नाहीं एवढेंच नव्हे, तर त्यांनीं इंग्रजांना वेळप्रसंगीं साहाय्यच केलें आहे. मग त्यांच्या वंशजांची पेन्शन कां बंद करण्यांत आली ? कैलासवासी बाजीरावपेशवे सत्तावीस अठ्ठावीस लक्षांची इस्टेट मागें सोडून गेले, हा मुद्दा मुळांतच गैर लागू आहे. ब्रिटिशसरकारानें केलेल्या तहानुसार पेशवे व त्यांचा परिवार यांच्या खर्चाकरितां सालिना आठ लाख रुपये देण्याचा करार होता. पेशव्यांनीं त्यांपैकीं किती रुपये खर्च करावे व किती शिल्लक टाकावे, हें ठरलें नव्हतें. अशा तऱ्हेचे हिशोब दाखविण्याचाही पेशव्यांचा वायदा नव्हता; आणि सरकारनेंही आजपर्यंत त्यांचेजवळ जमाखर्चाच्या चोपड्या मागितल्या नाहींत. हिंदुस्थानांत ज्यांना ज्यांना सरकाराकडून पेन्शन मिळत असतें, त्यांच्या शिलकेची चौकशी कंपनीसरकार कधीं तरी करतें काय ? व करण्याची सरकारची इच्छा असल्यास त्यांना तसा अधिकार तरी पोहोंचेल काय ? एखाद्या माणसानें मिळत असणाऱ्या ठरींव नेमणुकींतून थोडीशी शिल्लक टाकली, तर त्याची नेमणूक बंद करणें हा कुठला न्याय आला ! हिंदुस्थानांतील एका राज्याचे स्वामी व एका इतिहासप्रसिद्ध घराण्यांतील वंशज, जे आजपर्यंत

सरकारचे न्यायपरायणतेवर विश्वास ठेवीत आले, त्यांना झिडकारून टाकणें सरकारला शोभत नाहीं. पेशव्यांना आठ लाख रुपयांची जरी नेमणूक असली, तरी त्यांचे वंशज, त्यांचे नातलग, त्यांचे विश्वासू सेवक, व इतर आश्रित मंडळी, यांचा बराच मोठा परिवार त्या नेमणुकीवर अवलंबून होता. त्यामुळें नेमणुकीची जवळ जवळ सर्व रकम खर्चच होत असे. आज जी शिल्लक उरली आहे तिचें सालिना व्याज फक्त ऐशीं हजार रुपये येऊं शकतें. पेशव्यांची नेमणूक यापुढें बंद केली तर एवढया लहानशा रकमेंत या सर्व परिवाराचा खर्च कसा चालावा? हात राखून खर्च करणें हें पाप का आहे? कीं केवळ मितव्ययामुळें पेशव्यांच्या परिवाराची पेन्शन जप्त व्हावी?"

नानासाहेबांनीं केलेल्या अशा मुद्देसूद व सरळ अपिलाचा विलायतेंतील बोर्डावर कांहींच परिणाम झाला नाहीं. नानासाहेबांनीं आपली बाजू विलायतेंत मांडण्याकरितां, अजीमुल्लाखां नांवाचा एक मूळचा हलक्या घराण्यांतील परंतु कर्तबगार व चलता पुर्जा असलेला, इंग्रजांच्या घरीं बॉयची नोकरी ( Boy ) करून इंग्रजी शिकलेला, दिसण्यांत सुंदर व बोलण्यांत मिठास असा इसम आपल्या तर्फे वकील म्हणून विलायतेंत पाठविला. परंतु त्यांच्या पदरांत कांहींच फळ पडलें नाहीं. कारण राज्यलोभाप्रमाणें डलहौसीचा द्रव्यलोभही विलक्षण होता. तेव्हां पेशव्यांची आठ लाख रुपये सालची नेमणूक बंद करण्याची आलेली उत्कृष्ट संधि तो कशी दवडणार! त्यानें एकंदर प्रकरण आपल्या नेहमींच्या पद्धतीनें सजवून विलायतेस पाठविलें. बोर्ड ऑफ डायरेक्टर्सनीं असा निकाल दिला कीं, " बाजीरावाचा दत्तक पुत्र व त्यांचा इतर परिवार यांचा पेशव्यांच्या नेमणूकीवर कोणताच हक्क पोहोंचत नाहीं, ही गव्हरनर जनरलची शिफारस आम्हांला पूर्णपणें मंजूर आहे. स्वर्गवासी बाजिराव पेशवे यांनीं **भरपूर तेहतीस साल** आमची पेन्शन खाल्ली. त्यामुळें त्यांनीं आपल्या वारसासाठीं मागें ठेवलेली संपत्ति पुरेशी आहे असें आमचें मत आहे." भांडवलावर व्याज सुटावें या दृष्टीनें राज्यकारभार करूं पाहणाऱ्या कंपनीच्या हातून एवढी सुवर्णसंधि कशी सोडवेल? डलहौसीपेक्षां कंपनी अधिकच द्रव्यलोभी होती. डायरेक्टरलोकांनीं या प्रकरणाचा पूर्वीच नकारात्मक निकाल दिला असल्यामुळें त्यांनीं हिंदुस्थान सरकारला नानासाहेबांच्या अपिलाबद्दल लिहिलें कीं, " अर्जदाराला कळवा कीं पेशव्यांची पेन्शन त्यांचेपुरतीच होती, वंशपरंपरागत नव्हती. त्यामुळें त्यांच्या मृत्युनंतर ती बंद करण्यांत आली आहे. सबब अपील नामंजूर."

तह्नाचा अर्थ यापेक्षां अधिक उदारतेनें करावयास हवा होता, असें अनेक इंग्रज इतिहासकारांचेंही म्हणणें आहे. पेशव्यांचें सबंध राज्य आपल्या ताब्यांत घेऊन त्यांच्या वंशजांना यत्किंचित देखील नेमणूक नाकारणें, हें कायद्याच्या कांटेतोल दृष्टीनें नसलें तरी नीतीच्या दृष्टीनें कृतघ्नपणाचें ठरतें. नानासाहेबांच्या अपीलांतील मुद्यांना सरळ रीतीनें खोडून काढणें अशक्य आहे. आमच्या तह्नाचा तसा अर्थ होत नाहीं, एवढें एकच धरसोडीचें उत्तर त्या अपील अर्जावर देण्यासारखें होतें, व तेंच इंग्रजसरकारनें दिलें. सरसकट दत्तविधानें नामंजूर करून व दत्तक पुत्रांचे गादीवरील न्याय्य हक्क बुडवून, राज्येंच्या राज्यें खालसा करणारा डलहौसी, बाजीराव पेशव्याच्या दत्तक पुत्राला त्यांची नेमणूक थोडीच चालू ठेवणार! डलहौसीला इंग्रजी साम्राज्याचा विस्तार तर करावयाचा होताच. परंतु त्याबरोबरच कंपनीच्या जुन्या तह्नाम्यांना गुंडाळून, हिंदुस्थानांत खर्ची पडणाऱ्या बऱ्याचशा रकमांना छाट देऊन कंपनीच्या भागीदारांना भरपूर मुनाफा मिळवून द्यावयाचा होता. त्यामुळें नानासाहेबांची नेमणूक मिळण्याची आशा नष्ट झाली.

डलहौसीच्या द्रव्यलोभाचें आणखी एक मजेदार उदाहरण देण्यासारखें आहे. हें उदाहरण देखील पेशव्यांच्याच एका अप्रसिद्ध शाखेचें आहे. **तिरोहा** ऊर्फ किरवी हें लहानसें संस्थान बांद्यापासून ४५ आणि प्रयागपासून ७० मैलांवर आहे. येथील संस्थानिकांना **राव** अशी पदवी असून ते पेशव्यांचेच गोत्रज व त्यांच्याच वंशांतील होते. पेशवाईच्या अखेरीस राघोबाचा दत्तक पुत्र अमृतराव याला हें संस्थान देण्यांत आलें होतें. कारण अमृतरावाला दत्तक घेतल्यानंतर राघोबाला बाजीराव हा मुलगा झाला, व पुढें तोच पेशवाईचा मालक झाला. तेव्हां दत्तकपुत्राला हें बुंदेलखंडांतील लहानसें संस्थान देण्यांत येऊन त्याचा बोज ठेवण्यांत आला. १८२७ सालीं तेथील संस्थानिक अमृतराव पेशवे यांनीं सहा टक्के व्याजाच्या कबुलीनें दोन लक्ष रुपये इंग्रजांच्या स्वाधीन केले, आणि त्या व्याजांतून काशी क्षेत्रीं त्यांनीं बांधलेल्या देवळाचा व सदावर्ताचा खर्च नेहमीं करितां चालावा अशी योजना केली. संस्थानच्या पुढील वारसांनीं जरी यदा कदाचित देवळाला साह्य केलें नाहीं, तरी धर्मादायाला खंड पडूं नये, या उद्देशानें त्यांनीं ही व्यवस्था केली होती. त्याप्रमाणें बनारसचीं पेशव्यांचीं धार्मिक संस्थानें निरंतर त्या रकमेच्या व्याजांतून आपल्या तर्फे चालविण्याचा इंग्रजांनीं कररही केला होता. परंतु अमृतरावांच्या

मृत्यूनंतर १८३७ सालीं त्या रकमेवरील व्याजाचा दर सहा टक्यांवरून चार टक्यांवर एकाएकीं आणला गेला. संस्थानिक बिचारा चकितच झाला. परंतु सार्वभौम सत्तेविरुद्ध ब्र काढण्याची त्याची थोडीच हिंमत होती? त्या वेळीं अमृतरावाचे चिरंजीव विनायकराव पेशवे हे तिरोहाचे संस्थानिक होते. त्यांनीं निमूटपणें संस्थानच्या खजिन्यांतून तीन लक्ष रुपयांची जादा रक्कम इंग्रज सरकारच्या हवालीं केली आणि चार टक्यांप्रमाणेंच कां होईना, पण पूर्वीच्या दोन व हल्लींच्या तीन अशा पांच लाखांच्या संयुक्त रकमेवरील व्याजाच्या उत्पन्नांतून काशी येथील धार्मिक संस्थानें चालविण्याची कंपनीमार्फत नवी व्यवस्था करून आपली पितृभक्ति दाखविली व पितृऋणाची फेड केली. विनायकरावांचे हयातींत ही व्याजाची रक्कम काशी येथील धार्मिक संस्थानांच्या खर्चा-करितां नियमितपणें देण्यांत आली. विनाकरावांच्या मृत्यूनंतर त्यांचा दत्तकपुत्र माधवराव हा तेथील गादीवर बसला. संस्थानिक अज्ञान असल्यामुळें कंपनीनें राज्यकारभार आपल्या हातीं घेतला, व कलकत्त्याहून नव्या कारभाऱ्याची नेम-णूक झाली. परंतु माधवरावांचें वय त्या वेळीं केवळ चार वर्षांचें असल्यामुळें संस्था-नचा कारभार रामचंद्रराव पेणसे हे इंग्रजातर्फे अज्ञान-पालक म्हणून पहात असत. रामचंद्ररावांचें पेशव्यांशीं नातें होतें, आणि इंग्रज सरकारचीही त्यांचेवर कृपादृष्टी व विश्वास असल्यामुळें त्यांनांच माधवरावांचे पालनकर्ते नेमण्यांत आलें. थोड्याच दिवसांत हिंदुस्थान सरकारकडून काशी येथील देवस्थानाच्या वार्षिक खर्चाकरितां देण्यांत येणारी व्याजाची रकम बंद करण्यांत आली. माधवरावांचें वय त्यावेळीं केवळ सात वर्षांचें होतें. त्याला लार्ड डलहौसीविरुद्ध तक्रार करणें शक्यच नव्हतें. तेव्हां संस्थानच्या उत्पन्नांतून देवस्थानचा खर्च पुढें चालविणें, ही एकच वाट मोकळी राहिली. परंतु डलहौसीच्या या विश्वासघातामुळें किरवी येथील सदाचरणी व धार्मिक वृत्तीचे हिंदुलोक अतिशय संतापले. त्यांच्या संतापण्याचा कांहींच उपयोग होण्या-सारखा नव्हता. त्यांच्या धर्मभावना अत्यंत दुखावल्या गेल्या. काशी येथील देवस्थानच्या नित्याच्या खर्चाकरितां माधवरावांच्या बाप व आजांनीं मोठ्या विश्वासानें इंग्रजांच्या स्वाधीन केलेली पांच लक्ष रुपयांची रक्कम डलहौसीच्या द्रव्यतृष्णेंत गडप झाली. धर्मकृत्यांकरतां राखून ठेवलेला पैसा गडप केल्याचें पाप धर्मनिष्ठ हिंदूंना अक्षम्य वाटलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं. ही बातमी सर्व दूर पसरली आणि सार्वभौम सरकारावर कोणताही विश्वास ठेवणें धोक्याचें आहे, अशी सर्वांची खात्री झाली. पेशवे कुळांतील दोन्ही शाखांना डलहौसीचा

द्रव्यलोभ याप्रमाणें चांगलाच भोंवला. पेशव्यांच्या वंशांत या दोनच शाखा त्या वेळीं अस्तित्वांत होत्या, आणि दोघींचेंही द्रव्यबल याप्रमाणें तोडण्यांत आलें. त्यांचे राजकीय सामर्थ्य पूर्वींच नष्ट झालें होतें.

---

## प्रकरण ७ वें.

# मावळती बादशाही



अवरंगजेब बादशाहाचे वेळीं मोंगल बादशाहीच्या उत्कर्षाचा कळस झाला होता. परंतु अवरंगजेबाच्या कारकीर्दींतच भावी ऱ्हासाचीं कारणें बीजरूपानें पेरलीं गेली होतीं. त्याच्या भयंकर धर्मवेडामुळें उत्तरेस शीख लोकांचें बंड झालें, आणि दक्षिणेस मराठ्यांनीं त्याच्या सत्तेला पायबंध घातला. त्याच्या धर्मच्छलामुळें वंश-परंपरेचे रजपूत मित्र मोगलांचे कट्टे शत्रु बनले. अवरंगजेबाच्या भीतीमुळें व मोंगल सत्तेच्या अद्वितीय बलामुळें, त्यांनीं उघड शत्रुत्व मांडलें नाहीं एवढेंच काय तें. विरोधी बनलेल्या रजपुतांना दाबांत ठेवण्यांत आणि शिखांचें बंड मोडण्यांत त्याची बरीच सत्ता खर्ची पडली. परंतु मराठेशाहीचा नायनाट मात्र त्याला आपल्या इच्छेप्रमाणें करतां आला नाहीं. मराठ्यांना कबजांत आणण्याकरितां त्यानें नानाप्रकारचे उपाय योजून पाहिले. साम, दाम, दंड, भेद या चारी मात्रा निष्फळ झाल्या. श्री शिवछत्रपतीसारख्या तेजस्वी महापुरुषापुढें त्याला हारच खावी लागली. शिवाजी माहाराजांच्या मृत्यूनंतर मात्र मराठ्यांना नामशेष करण्याचा त्यानें निश्चय केला, व त्या कार्याकरितां औरंगाबादेस कायमचें ठाणें दिलें. १६८९ सालीं संभाजी-महाराजांस पकडून, त्यानें अत्यंत क्रूरतेनें हालहाल करून ठार मारलें आणि संभाजी-महाराजांची पत्नी साध्वी येसूबाई व तिचा पुत्र बालछत्रपति शाहु यास पकडून आपल्या कैदेंत ओलीस म्हणून ठेवलें. मराठे नष्टप्राय झाले, असें बादशाहाला क्षणभर वाटलें. परंतु स्वधर्म व स्वदेश यांच्या प्रेमामुळें, महाराष्ट्रांतील मराठे सरदारांनीं गनिमी काव्याची पद्धती स्वीकारून बादशाही फौजेस सळो का पळो करून सोडलें. मराठ्यांना चुरडून टाकण्याची बादशाहाची अतोनात इच्छा होती. परंतु मराठे त्याच्यासमोर युद्धाला उभे राहातील तर शपथ! अखेर मराठ्यांचा नाश करण्याची इच्छा मनांतल्या मनांतच राहून इ. स. १७०७ मध्यें त्याचा अंत झाला.

अवरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोंगल सत्तेला उघड उघड उतरती कळा लागली. गादीबद्दल अवरंगजेबाच्या मुलांत तंटे सुरू झाले, आणि अवरंगजेबाचीं मुलेंही त्याच्याप्रमाणें पराक्रमी नसल्यामुळें निरनिराळ्या सरदारांचें चांगलेंच फावलें. अवरंगजेबाचा मुलगा बहादूरशाहा याच्या मृत्यूनंतर दिल्लीचा कारभार, स्वार्थापुढें बादशहाला व बादशहातीला न जुमानणाऱ्या मुसलमान सरदारांच्या हातीं गेला; आणि राजकीय वर्चस्वासाठीं या सरदारांची वारंवार आपापसांत यादवी होत असल्यामुळें बिचाऱ्या बादशहाचें मरण ओढवत असे. एका बादशहास पदच्युत करून दुसऱ्यास गादीवर बसविणें एवढेंच नव्हे, तर प्रसंगविशेषीं बादशहास ठार मारून आपल्या हस्तकास बादशहा बनविणें, ही गोष्ट या सरदारांच्या हाताचा मळ बनून राहिली. १७३९ सालीं महंमदशहाच्या कारकीर्दींत नादिरशहाची हिंदुस्थानावर स्वारी झाल्यामुळें चालू मोंगल बादशाहीचीं हाडें अगदींच खिळखिळीं झालीं. दिल्लीच्या बेबंदशाहीमुळें मध्यवर्ती सत्ता मोडकळीला येऊन मोगल बादशाहातीचे ठिकठिकाणचे सुभे स्वतंत्रपणें आपला राज्यकारभार पाहूं लागून, बादशाहापासून विभक्त झाले. उत्तरेस औंध, रोहिलखंड व बंगाल या प्रांतांत स्वतंत्र मुसलमानी राज्यें स्थापन झालीं, आणि दक्षिणेंत निजामनें आपलें स्वातंत्र्य पुकारलें. राजपुतान्यांतील रजपूत राजांनीं दिल्लीची सार्वभौम सत्ता झुगारून दिली व भरतपूर येथें शूर जाट लोकांचें नवीन राज्य अस्तित्वांत आलें. पंजाबप्रांत नादिरशहानें मोंगल बादशाहापासून जिंकून घेऊन आपल्या राज्यास जोडला. परंतु शीख लोकांनीं मुसलमानी सत्तेविरुद्ध पुनः जोराची उचल केली. या निरनिराळ्या प्रांतांतील मुसलमान सरदारांचे, आपले जहागीरदारी स्वतंत्र सुभे संभाळून, शिवाय दिल्लीची वजिरी मिळविण्याकरितां आपापसांत चुरशीचे मत्सरी प्रयत्न चालू असत, व आपला डाव साधण्याकरितां वाटेल त्याची मदत घेण्यासही ते तयार होत. दिल्लीश्वर मोगल बादशाहाचे नांवांतच इतकी जादू भरली होती कीं, एखाद्या प्रांताचें स्वतंत्र राज्य संपादन करून तेथील नबाबी भोगण्यापेक्षां, दिल्लीच्या वजिरीचा मोह बादशहाच्या निरनिराळ्या सुभेदारांना अधिक पडत असे. या मोहानेंच त्यांनीं प्रथम नादिरशहास व नंतर अहमदशहा अबदालीस हिंदुस्थानावर स्वारी करण्याकरितां पाचारण केलें.

इकडे औरंगजेबाच्या मृत्युनंतर शाहूमहाराजांची कैदेंतून सुटका झाली. आणि बाळाजी विश्वनाथ भट यांच्यासारखा अत्यंत बुद्धिवान व पराक्रमी पुरुष त्यांना पेशव्यांच्या जागीं लाभल्यामुळें मराठ्यांनीं जोराची उचल केली. मोगल सत्ता दिवसें-

दिवस सारखी विस्कळीत होत असल्यामुळें, मराठ्यांना आपले हातपाय पसरण्याला चांगलाच अवसर मिळाला. १७१४ सालापासून सातारकर छत्रपतींच्या नांवानें मराठी सत्तेचें पुढारीपण मूळ कोंकणच्या परंतु पुण्यास येऊन राहिलेल्या पेशव्यां-कडेच आलें होतें. बाळाजी विश्वनाथ व त्यांचे शूर पुत्र बाजीराव व चिमाजीआप्पा यांनीं मराठ्यांची सत्ता अत्यंत विस्तृत केली. दक्षिण हिंदुस्थान मराठ्यांनीं आप-ल्या सत्तेखालीं घेतलें, व दक्षिणेंतील निजामाचा अनेक वेळां पराभव करून त्याच्यापासून खंडणी वसूल केली, व दक्षिणेंत आपलें सामर्थ्य जाहीर केलें. लवकरच हल्लींचा मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थान व गुजराथ हे तीन बादशाही प्रांत मराठी अमलांत नांदूं लागले, आणि मराठ्यांच्या ढाला दिल्ली आग्र्यापर्यंत जाऊन थडकूं लागल्या. बाजीरावाचा मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासासाहेब यांच्या कारकीर्दींत वाढत्या मराठी सत्तेचें दृढीकरण झालें. बादशाहाचे उत्तर हिंदुस्थानांतील निरनिराळे मुसलमान सरदार व सुभेदार, दिल्लीची वजिरात हस्त-गत करण्याकरितां मराठ्यांच्या साहाय्याची याचना करूं लागले. मराठ्यांनीं आपलें साह्य या वजिरीवर डोळा ठेवणाऱ्या सरदारांना देऊन व त्यांची दिल्लीस स्थापना करून, बाद्शाही मुलखाच्या चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मोबदल्यांत संपादन केले. या काळांत मराठ्यांच्या तलवारीचें पाणी फक्त मुसलमानांसच चाखावयास मिळालें असें नाहीं, तर राजपुतान्यांतील शूर म्हणविणाऱ्या व मोगल बादशाहीच्या संबधी रजपुतांनीं मराठ्यांच्या हातून ठिकठिकाणीं मार खाल्ला. रजपूत राजांनीं खंडणी देऊन मराठ्यांना प्रसन्न करून घेतलें, आणि त्यांच्या सामर्थ्यापुढें आपली मान वांक-विली. मराठ्यांचें सामर्थ्य याप्रमाणें जसजसें वाढूं लागलें, तसतशी मोंगल बादशाहीची सत्ता कमी कमी होऊं लागली. १७१४ पासून १७६१ पर्यंत तीन पेशव्यांच्या कारकीर्दींत मराठ्यांचें सामर्थ्य अतोनात वाढलें, व ते दिल्लीचे प्रत्यक्ष बादशाहा होतात कीं काय अशी सर्वांना भीति वाटूं लागली. सदाशिवराव भाऊ या पेश-व्यांच्या प्रधान सेनापतीनें तर फौजेसह कांहीं दिवस दिल्लीसच आपलें ठाणें दिलें. परंतु मराठ्यांच्या या वाढत्या वैभवामुळें उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान सरदार एकवटले व त्यांनीं अफगाणिस्थानांतून अहमदशहा अबदालीला आपल्या साहा-य्यासाठीं व मराठ्यांचा पराभव करण्याकरितां बोलाविलें.

१७६१ सालीं पानपत येथें मराठ्यांचा पराभव झाला, आणि त्यांचें अतोनात नुकसान झालें. मुसलमान लोक जिंकले खरे परंतु त्यांचेंही नुकसान कांहीं कमी झालें नाहीं. पानपतच्या लढाईनंतर अबदाली आपल्या देशास परत निघन गेला

पानपतची लढाई त्यानें जिंकली तरी त्यांत त्याचें इतकें नुकसान झालें कीं, पुन्हां हिंदुस्थानवर स्वारी करण्याची त्याच्यांत हिंमतच उरली नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान नबाबांनीं मराठ्यांच्या तरवारीचें पाणी अनेकवार भरपूर चाखलें असल्यामुळें पानपतची लढाई जिंकूनही, मराठी सत्तेच्या वाढीला ते प्रतिबंध करूं शकले नाहींत. दिल्लीची बादशाही नाममात्र उरली होती. स्वतःच्या रक्षणाकरितां तीच दुसऱ्याचा आश्रय शोधीत होती. अशा स्थितींत तिला वाढत्या मराठी सत्तेला पायबंद कसा घालतां येणार ? इकडे नानासाहेबांच्या मृत्युनंतर थोरले माधवराव ऊर्फ रावसाहेब पेशवे हे अल्पवयी परंतु अत्यंत कर्तबगार पुरुष मराठी साम्राज्याचे मुख्य सूत्रचालक झाले. त्यांनीं आपल्या परीक्षेनें उत्तम उत्तम माणसें निवडून काढून त्यांच्या हातीं राज्यकारभार सोंपविला. त्यामुळें पानपतासारखा भयंकर पराभव सोसूनही मराठेशाहीला फारसा धक्का लागला नाहीं. मराठ्यांचें उठावाचें व चढाईचें धोरण पुनः पूर्ववत् सुरू झालें, आणि १७७० मध्यें मराठ्यांनीं थाटानें दिल्ली शहरांत पुन्हां प्रवेश केला. त्या वेळीं त्यांनीं वृद्ध शहाअलम बादशहास तक्तावर बसवून बादशाही सत्ता आपल्या हातीं घेतली. यानंतर दिल्लीचें राजकारण सर्वस्वी मराठ्यांच्या तंत्रानें चाललें होतें. मराठी सत्तेचा आश्रय घेऊनच दिल्लीचा नामधारी बादशहा हिंदुस्थानच्या सार्वभौमपदाचा अधिकार चालवीत होता. मराठे प्रत्यक्ष बादशाहा नसले तरी बादशाही वजीर खास होते. महादजी शिंद्यांनीं पुढें पेशव्यांकरितां बादशाही वजीरातीचीं महावस्त्रें खरोखरच मागून घेतलीं, व मोठ्या थाटानें तीं पेशव्यास पुणें दरबारीं सादर केलीं. मध्यंतरीं राघोबादादानें पेशवाईंत भाऊबंदकी सुरू केल्यामुळें, मराठ्यांना घरच्या बंदोबस्ताकरितां दिल्लीच्या राजकारणांतून तात्पुरतें अंग काढून घ्यावें लागलें. परंतु तेवढ्या अवधींत गुलाम कादर नांवाच्या रोहिले सरदारानें शहाअलमचे डोळे फोडून, त्याची व त्याच्या बायकापोरांची अतोनात विटंबना केली. परंतु इंग्रजांनीं कांहींएक कारण नसतांना आपल्या चोंबड बोचक स्वभावाप्रमाणें राघोबाचा पक्ष घेऊन पेशवाईंत लुडबूड सुरू केल्यामुळें, जराशी लांबलेली पेशवाईंतील भाऊबंदकी संपतांच महादजी शिंद्यानें गुलाम कादरच्या हातून शहाअलमची सुटका करून, त्याची पुनः दिल्लीच्या तक्तावर स्थापना केली. तेव्हांपासून मराठ्यांच्या छायाछत्राखालीं शहाअलम बादशहा दिल्लीच्या बादशाहीचा शांतपणें उपभोग घेत होता. मराठ्यांनीं याप्रमाणें दिल्लीवर आपलें स्वामित्व पूर्णपणें बसविलें.



शेवटचे मोंगल बादशहा
**बहादूरशहा.**



**बेगम झिन्नतमहाल.**



**लॉर्ड कॅनिंग.**



**सर हेन्री हॅवेलॉक.**



लॉर्ड डलहौसी.



सर हेन्री लॉरेन्स.



सर कॉलिन कँपबेल



सर जेम्स आउट्रॅम

दिल्लीश्वर मोंगल बादशाहा सत्ताहीन झाले असले, तरी त्यांच्या नांवांत विलक्षण जादू भरली होती. दिल्लीचे बादशाहा हे प्रसिद्ध तैमूरलंगाच्या घराण्यांतले होते, आणि १५२६ पासून हिंदुस्थानावर त्यांचें एकसारख अधिराज्य चालू होतें. बाबर, हुमायून, अकबर, जहांगीर, शाहाजहान व अवरंगजेब, असे एकामागून एक सहा विख्यात व पराक्रमी पुरुष त्या घराण्यांत होऊन गेले. त्यामुळें बादशाहाच्या नांवाचा लोकांत विलक्षण दरारा होता. निरनिराळे प्रबळ व कर्तबगार मुसलमान सुभेदार, शक्तिशून्य बनलेल्या बादशाहातीची वजिरात करण्यांतच स्वतःला भूषण मानीत. सर्व सत्ता या मुसलमान सरदारांच्या हातीं आली असली, तरी बादशाहाचे नांवानें आपल्या प्रांतांत ते राज्यकारभार चालवीत असत, व बादशहाच्या नांवानेंच निरनिराळ्या लोकांना निरनिराळ्या सनदा व पदव्या देत असत. बादशाही पराक्रमशून्य झाली असली, तरी तिचें रक्षण करण्यांतच त्यांना भूषण वाटत असे. बादशाहाचे हातीं काडीचीही सत्ता नसली तरी, उघड्या दरबारांत त्याची विलक्षण बडेजाव ठेवली जात असे. मुसलमानी सरदारांनंतर दिल्लीची सत्ता मराठ्यांच्या हातीं आलीं. त्यांनीं देखील पूर्वीचाच कित्ता गिरविला, व जुन्या वहिवाटींत काडीमात्र अंतर पडूं दिलें नाहीं. मराठी अमलांतही बादशाहाच्या मानमरातबांत यत्किंचितही कमतरता पडली नाहीं. या निर्माल्यवत् बनलेल्या बादशाहाच्या हातूनच, महादजी शिंद्यांनीं मराठी साम्राज्याचे प्रमुख सूत्रचालक पेशवे, यांच्यासाठीं वजिरातीच्या सनदा घेतल्या व त्या पेशव्यांना मोठ्या थाटामाटानें समारंभ करुन पुण्यास अर्पण केल्या. त्या वेळीं हिंदुस्थानभर मराठ्यांची सत्ता पसरली असतांना देखील, त्यांनीं वजिरातीच्या सनदांचा स्वीकार करून या नामधारी व निष्प्रभ बादशहाचा, लोकमताला मान देऊन दरबारी बडेजाव कायम ठेवला. कारभार करणारे सत्ताधारी मराठे व मुसलमान सरदार, बादशाहापुढें दरबारांत येण्यापूर्वी जोडे काढून ठेवून, त्याला पाठ न दाखवितां जात असत, व गुडघे टेकून मोठ्या नम्रतेनें कुर्निसात करीत असत.

१८०२ सालीं बाजीरावाशीं झालेल्या वसईच्या तहामुळें इंग्रजांना मराठेशाहींत ढवळाढवळ करण्यास पूर्ण संधि सांपडली. १८०३ सालीं इंग्रजांनीं सुर्जी अंजनगांव येथें शिंद्यांशीं तह केला. त्या तहामुळें दिल्ली येथील मोंगल बादशाहीचें पालकत्व शिंद्यांच्या हातून इंग्रजांच्याकडे आलें. दिल्लीचा बादशाहा इंग्रजांचा यानंतर पेन्शनर बनला आणि इंग्रज रेसिडेंट दिल्ली येथील राज्यकारभार पाहूं लागला. हिंदुस्थानच्या पातशाहीचीं सूत्रें इंग्रजसरकारच्या हातीं आल्यामुळें, त्यांचा

सर्वत्र बोलबाला होऊं लागला. आंधळ्या शहाअलम बादशहाला दिल्लीहून उचलून मोंगीर येथें नेऊन ठेवावें, असा विचारदेखील एकदां गव्हर्नर जनरलनें केला होता. परंतु बादशहा या गोष्टीला कांहीं केल्या कबूल होईना. तेव्हां तो बेत तसाच तहकूब करण्यांत आला. १८०६ सालीं आंधळा शहाअलम मरण पावला व त्याचे जागीं अकबरशहा गादीवर बसला. त्याच्या पित्याची पेन्शन त्याला मिळूं लागली खरी, परंतु या नव्या बादशहाचा मानमरातब दिवसेंदिवस कमी ठेवण्यांत येऊं लागला. बादशहाच्या समोर जातांना पूर्वी रेसिडेंट मोठ्या अदबीनें जात असे, आणि आपले जोडे बाहेर काढून ठेऊन बादशहाची भेट घेत असे. दुसऱ्या कोणत्याही देशावर स्वारी करण्यापूर्वी बादशहाची प्रथम कंपनीला नामधारी कां होईना, परंतु परवानगी मागावी लागे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत कोणताही फेरबदल करावयाचा असल्यास कंपनीला तो बादशहाचे नांवानें जाहीर करावा लागत असे. पूर्वी प्रत्येक गव्हरनर जनरल बादशहाच्या मुख्य बेगमेच्या आणि वडील शहाजाद्याच्या भेटीकरितां जात असे. परंतु १८२२ सालीं हा प्रघात बंद करण्यांत आला. १८२७ सालीं कोणत्याही राजकारणाच्या बाबतींत बादशहाची सल्ला घेणें बंद करण्यांत आलें; व १८३५ सालीं तर बादशाही शिक्याचें नाणें एकदम बंद करण्यांत येऊन कंपनीच्या नांवाचा नवा रुपाया हिंदुस्थानभर जारी करण्यांत आला. १८३५ सालीं झालेल्या या फेरफारानें बादशाही सत्ता हिंदुस्थानांतून कायमची नष्ट झाली, असेंच समजलें पाहिजे. बादशाहाच्या आश्रयानें राजवाड्यांत राहाणाऱ्या लोकांची संख्या फार मोठी असल्यामुळें, कंपनीकडून खर्चाकरितां मिळणारी पेन्शन बादशाहास पुरी पडत नसे. पेन्शनीची मिळणारी रकम खाजगी खर्चाला पुरत नाहीं, अशी हिंदुस्थानांतील सर्वच पेन्शनर संस्थानिक हाकाटी करीत, त्याचें कंपनीला फार आश्चर्य वाटे. परंतु इंग्रज माणूस धनाढ्य असला तरी फटींग वृत्तीचा असतो, आणि थोर हिंदी लोकांच्या भोंवतीं हजारों गरीब आश्रितांचा तांडा उभा असून त्यांच्या पालनपोषणाचा भार त्याच्यावर पडतो, हा फरक कंपनीच्या लक्षांत येत नसे. पेनशन वाढविण्याबद्दल अकबरशाहानें पुष्कळ खटपट केली, परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं. बादशाहाचे हातीं पदव्या देण्याचा अजूनही अधिकार होता. त्याप्रमाणें राममोहनराय या प्रसिद्ध विद्वान पुरुषास **राजा** ही पदवी देऊन बादशाहानें आपल्या तर्फे शिष्टाई करण्याकरितां विलायतेस रवाना केलें. बादशाहा आपले सर्व उरलेले अधिकार व मानसन्मान सोडून द्यावयास तयार असेल, तर त्यास सालीना तीन लक्ष रुपये अधिक पेन्शन मोबदल्यांत देण्यांत येईल

असें कंपनीनें त्याला उत्तरादाखल कळविलें. परंतु अकबरशाहा कसाही झाल तरी प्रसिद्ध बाबरच्या वंशांतला होता. तीन लाख रुपयांच्या लोभानें उरल्य सुरल्या बादशाही अधिकारांवर तिलांजली देण्याचें त्यानें नाकारलें व अडचण सोसूनही आपला मान राखून घेतला.

१८३७ सालीं अकबरशहा वारला, आणि युवराज अबूजाफर हा 'अबुल मुजफर, सिराज उद्दीन, महमद **बहादुरशहा**, पातशहा ईगाझि,' अशी पदवी धारण करून सिंहासनावर बसला. त्या वेळीं त्याचें वय पन्नाशीच्या वर गेलें होतें. परंतु त्याची शरीरप्रकृति उत्तम होती. त्याचा स्वभाव शांत व सत्वशील असून कवितेची त्याला अतोनात गोडी होती. गादीवर बसल्यावर त्यानेंही पेन्शन वाढविण्याबद्दल खटपट करून पाहिली. 'सर्व हिंदी राजे रजवाड्यांचा मित्र असलेला, उदारधी व न्यायप्रिय असा प्रसिद्ध इंग्रज मुत्सद्दी वक्ता जॉर्ज थॉमसन, यास बादशहानें आपल्या तर्फे वकीली करण्यास नेमलें. परंतु राजा राममोहनरायच्या प्रमाणेंच त्याच्याही प्रयत्नाला यश आलें नाहीं. बादशहा आपले अधिकार सोडील तरच त्याची पेन्शन वाढविण्यांत येईल, असा गव्हरनरनें खासगी सल्ला दिला. परंतु बहादुरशहा या गोष्टीला राजी झाला नाहीं. १८४३ सालीं लॉर्ड एलेंबरोच्या कारकीर्दींत बादशहाला नजर देण्याची दरबारी पद्धत मोडून टाकण्यांत आली. बादशहाच्या वैभवाचें प्रदर्शन याप्रमाणें संपुष्टांत येत चाललें. बादशहाचा मानमरातब व बडेजाव दिवसेंदिवस फारच कमी होऊं लागला. बादशहाची अशी अवहेलना करण्याला कंपनीला कांहीं कारण सांपडलें होतें, अशांतला भाग नाहीं. कंपनीचा तो एक मामूली डाव होता. मोंगल बादशाही नामशेष करण्याचा तो राजमार्ग होता. एकधर्मीय मुसलमान सुभेदार व सरदार, आणि परधर्मीय मराठे, यांना जी गोष्ट करण्याची भीति वाटत होती, ती गोष्ट कंपनीच्या इंग्रज नोकरांनीं हां हां म्हणतां अमलांत आणली. दिल्लीच्या बादशाहीचा मराठ्यांनीं अपमान केला, या वरपांगीच्या पोकळ कारणासाठीं ऐन पानपतच्या कठीण प्रसंगांत, परस्थ मुसलमान अबदालीच्या तोंडांत मराठ्यांना सोडून चालते झालेले हिंदुधर्माभिमानशून्य जाट व रजपूत, कंपनीनें बादशाहीचे वाटेल तसे धिंडवडे काढले तरी शांत बसले होते. त्यांना हिंदु मराठ्यांचा संताप आला व मुसलमान बादशाहीची कींव वाटली. परंतु परस्थ इंग्रजांवर मात्र ते बालंबाल खुश राहिले! या वेळीं त्यांच्या भावना मुळींच दुखावल्या नाहींत! कंपनीनें चालविलेला प्रकार ते उघड्या डोळ्यांनीं कौतुकानें पहात होते!! या पुढची पायरी म्हणजे तैमूरच्या वंशांतून बादशाहा

ही पदवी काढून टाकणें, आणि त्यांना दिल्लीच्या बाहेर दुसरीकडे कोठेंतरी रहावयास पाठविणें, एवढीच उरली होती. कारण बादशाहा या नांवांत अझूनही जादु भरली होती. बादशाहा हें नांव ऐकतांच हिंदुस्थानांतील सर्व धर्मांचे व जातींचे लोक पूर्वपरंपरेच्या आणि संवयीच्या जोरावर शीर नमवीत असत. युधिष्ठिराच्या वेळेपासून दिल्ली ही हिंदुस्थानच्या सम्राटांची राजधानी होती. दिल्लीच्या बादशाही किल्ल्यांत राहाणारा, आणि पूर्व-प्रसिद्ध दिवाण-ई-आम् व दिवाण-ई-खास येथें वेळोवेळीं चिमुकले कां होईना, पण दरबार भरविणारा पुरुष शक्तिशून्य व पराक्रमहीन झाला असला, तरी लोकांच्या डोळ्यांला तो मोठाच दिसत असे. त्यानें दिलेल्या पदव्या हिंदी लोक मोठ्या अभिमानानें धारण करीत, व बादशाहाला त्याबद्दल नजराणाही अर्पण करीत. त्यामुळें या प्रसिद्ध मोंगल वंशांतील पुरुषांना लोकांच्या दृष्टीनेंही निर्माल्यवत् करून टाकण्याचा कंपनीनें बेत केला. कारण कंपनीच्या सार्वभौम सत्तेच्या आड तें बुजगावणें येत होतें. आपल्याशिवाय दुसऱ्या कोणालाही स्वप्नांत किंवा थट्टेंत देखील लोकांनीं सार्वभौम मानूं नये, अशी कंपनीची साहजिकच इच्छा होती, आणि म्हणून हा नामधारी बादशाही खेळ बंद करण्याचा तिनें निश्चय केला. बादशाहाला दिल्ली बाहेर कोठें तरी नेऊन टाकलें व त्याची **बादशाहा** ही पदवी रद्द केली, म्हणजे हें काम साधणार होतें. त्याचप्रमाणें बादशाहाला देण्यांत येणारी बारा लाख रुपये सालाची नेमणूक देखील तशीच अव्याहत चालू देणें, कंपनीच्या जिवावर आलें होतें. अशा स्थितींत बादशाहाची शेवटची वाट लावण्याबद्दल सर्वांचें एक चित्त झालें असल्यास त्यांत नवल नाहीं. कंपनीचा निष्कारण होणारा हा खर्च बंद करणें जरूर होतें. कारण हल्लीं कंपनीचें राज्य हिंदुस्थानांत निष्कंठक सुरू झालें होतें.

इ. स. १८४९ सालीं बादशाहाचा थोरला मुलगा दाराबक्त हा एकाएकीं मरण पावला. बादशाहाचें वय या वेळीं ७० वर्षांच्या वर होतें. त्यामुळें बादशाहा केव्हां मरेल याचा नेमच राहिला नव्हता. लॉर्ड डलहौसी बादशाहीच्या मुळावर टपून बसलेलाच होता. त्यामुळें त्याला या प्रकरणाचा कायमचा निकाल करून टाकण्याची वेळ आली असें वाटलें. बादशाहाची आवडती बेगम झीनतमहाल, हिच्या मनांतून आपल्या मुलाला, तो वयानें सर्व शाहाजाद्यांत लहान होता तरी, बादशाहाच्या मागें सिंहासन द्यावें असें होतें. तरुण व सुंदर झीनतमहालच्या मुठींतच त्या वेळीं बादशाहा बहादुरशहा हा सर्वस्वी गेलेला होता. कारण त्याची

म्हातारपणची ती तरुण व सुंदर बेगम होती. बेगमच्या सांगण्यावरूनच बादशहानें तिचा मुलगा जवानबक्त यास आपल्या मागें गादी देण्यांत यावी, अशी इंग्रजांना शिफारस केली. परंतु दाराबक्त याच्या मृत्यूमुळें बादशाहीवर युवराज फकिरुद्दीनचा वारसा पोहोंचत होता. कारण बादशहाच्या उरलेल्या सर्व पुत्रांत तोच वडील होता. बादशाहाच्या घराण्यांत हे अंतःकलह सुरू झालेले पाहून डलहौसीला मनांतून बरें वाटलें. त्यानें फकिरुद्दीनचा गादीवरील हक्क कबूल करून त्याच्याशीं एक गुप्त तहनामा केला. त्या तहनाम्याप्रमाणें फकीरुद्दीननें बाहादुरशाहाच्या मरणानंतर दिल्लीचा किल्ला इंग्रजांच्या हवालीं करून, दिल्लीपासून पांच कोसांवर असलेल्या कुतुबमिनारजवळ रहावयास जावें असें ठरलें. परंतु बहादुरशाहाच्या मृत्यूपर्यंतदेखील उगीच वाट पाहात स्वस्थ बसणें डलहौसीला बरें वाटलें नाहीं. कारण बादशाहाचें आयुष्य दीर्घ कालपर्यंत वाढल्यास, बादशाहीवर शेवटचा घाव घातल्याचें यश डलहौसीच्या पदरांत पडलें नसतें. आणि बादशाहा वयानें म्हातारा झाला असला, तरी प्रकृतीनें फार चिवट दिसत होता. त्यानें जिवंतपणींच बादशाहाची दिल्लीहून कुतुबमिनारला उचल बांगडी व्हावी याबद्दल नक्की योजना तयार करून, ती विलायतला मंजुरीकरितां पाठविली. परंतु बादशहाची या उतार वयांत जबरदस्तीनें दिल्लीच्या राजवाड्यांतून उचलबांगडी करण्याची कल्पना, विलायतेंतील बऱ्याच अधिकारी मुत्सद्दी मंडळीला रुचली नाहीं. इकडे युवराज फकीरुद्दीनची **सुन्ता झालेली असल्यामुळें**, त्याला घराण्याच्या रिवाजाप्रमाणें बादशाहा होतां येणें शक्य नाहीं, अशी झीनतमहालनें व तिच्या पक्षाच्या मंडळीनें सारखी ओरड सुरू केली. अकबर बादशाहाच्या वेळेपासून, या प्रसिद्ध मोगल घराण्यांतील पुरुषांची ते मुसलमान असूनही सुन्ता करण्यांत येत नसे, ही गोष्ट अगदीं खरी होती. परंतु केवळ सुन्ता झाली येवढया एका क्षुल्लक गोष्टीमुळें फकिरुद्दीन गादीवर बसण्याला नालायक ठरूं शकत नव्हता. हुमायून बादशहा पठाणांकरवीं गादीवरून काढला जाऊन रानावनांत भटकत असतांनाच, अकबराचा जन्म झाला होता. यामुळें मुसलमानी धर्मांप्रमाणें अकबराची सुंता त्या वनवासांत होऊं शकली नाहीं. पुढें हुमायूननें परत बादशाही मिळविली, तरी तो सर्वत्र पूर्णपणें स्थिरस्थावर होण्यापूर्वीच मरण पावला. त्याचा पुत्र अकबर हा १४ वर्षांचा लहान बालक असतांनाच दिल्लीचा बादशहा झाला, आणि एकदां मागें पडलेला त्याच्या सुंतेचा विधी तसाच राहून गेला. बरें, पुढें तो मोठा झाला तेव्हां मुसलमानी धर्मांतील कर्मकांडावरील त्याची श्रद्धा पार उडून जाऊन तो

उदारमतवादी बनला होता. त्यानें हिंदु राण्यांशीं लग्न लावलें व पुढें आपल्या पुत्रांचेंही रजपूत कुमारीशीं लग्न लावून दिलें. या अर्धवट हिंदुत्वामुळें त्यानें आपल्या पुत्राचीही सुंता केली नाहीं. पुढें जहांगिरनें व नंतर शहाजहाननें आपल्या पुत्रांच्या बाबतींतही त्या विधीला फाटाच दिला. ह्या सर्व बादशहांना—म्हणजे अकबर, जहांगीर व शहाजहान यांना भरपूर आयुष्य लाभलें असल्यामुळें, ते गादीवर असतांनाचा त्यांना मुलें बाळें व नातू झाले. परंतु स्वतांची सुंता झाली नसल्यामुळें त्यांनीं आपल्या मुलानातवांच्या त्या धार्मिक विधीकडे लक्ष पुरविले नाहीं. लहान वयांत जे विधी व्हावयाचे ते असे लांबणीवर पडले म्हणजे अजीबात गळतात! यामुळें त्या घराण्यांत सुंता न करण्याचा जणूं प्रघातच पडला होता. बिचाऱ्या फकीरुद्दीनची कांहीं नाजूक बीमारीमुळें सुंता करणें भाग पडलें होतें. परंतु या उपरी कारणाचा फायदा घेऊन, त्याचा गादीवरील वारसा उडवून देण्याचा झिन्नतमहाल बेगम पराकाष्ठेचा प्रयत्न करीत होती. झिन्नतमहाल बेगमेचें असें म्हणणें पडलें कीं, 'आमच्या बादशाही घराण्यांत सुंता करण्याची चाल नाहीं. अकबर बादशाहाच्या वेळेपासून कोणाचीही सुंता आमच्या कुलांत झाली नाहीं. ज्या अर्थी फकीरुद्दीनची सुंता झालेली आहे, त्याअर्थी आमच्या कुळाचाराप्रमाणें तो गादीवर बसण्यास नालायक ठरतो.' उलट फकीरुद्दीननें लिहिलें कीं, 'मुसलमानी धर्माप्रमाणें सुंता हा धार्मिक विधी आहे, व तो न होणें ही अपवादात्मक गोष्ट आहे. अकबर बादशाहाची मुसलमानी धर्मावर फारशी निष्ठा नसल्यामुळें सुंतेची चाल आमच्या घराण्यांतून उडाली हें खरें. माझीदेखील इतरांप्रमाणें सुंता झाली नसती, परंतु कांहीं आजारामुळें ती करावी लागली; परंतु त्यामुळें मी गादीला नालायक ठरूं शकत नाहीं. उलट मुसलमानी धर्माचें माझ्या हातून योग्य पालन झाल्यामुळें मीच गादीला खरा लायक ठरतों.' गवर्नर जनरलनें मुसलमान मौलवींकडून या प्रकरणाची चौकशी करविली, तेहां फकीरुद्दीनचें म्हणणें खरें आहे, असें त्यास आढळून आलें. परंतु त्यांतल्या त्यांत डाव टाकून व या घरगुती भांडणाचा फायदा घेऊन, त्यानें बादशाहा या पदवीवर हक्क सोडल्याचा व दिल्ली सोडून दुसरीकडे रहावयास जाण्याच्या संमतीचा करारनामा फकीरुद्दीनकडून लिहून घेतला. अडला नारायण काय करणार नाहीं?

यामुळेंच फकीरुद्दीन इंग्रजांना शरण गेला व त्यानें तो अपमानास्पद करारनामा त्यांना लिहून दिला. परंतु त्याला त्याबद्दल मनांतून सारखा पश्चात्ताप होत होता.

परंतु एकाएकीं १८५६ सालीं तो मरण पावला. त्याला विष देण्यांत आलें असावें, असा पुष्कळांचा तर्क आहे. परंतु त्याबद्दल कांहीं पुरावा मात्र नाहीं. तें एक रंगमहाल रहस्य आहे. बादशाही महालांत अशा अनेक आकस्मिक गोष्टी घडत असत, त्यांपैकींच ती एक. त्याच्या मृत्यूच्या दुसऱ्या दिवशीं बहादुरशहानें झिन्नत-महालचा मुलगा जवानबक्त, याला आपल्यामागें वारस करण्यांत यावें याबद्दलचा दुसरा एक खलीता इंग्रजांना लिहिला. बादशाहाच्या बऱ्याच मुलांनीं, 'जवानबक्त हा अतिशय शहाणा व चतुर असल्यामुळें त्यालाच बादशाही देण्यांत यावी, आम्हीं पुढें तिजवर आमचा वारसा सांगणार नाहीं,' अशा अर्थाचें कबूलीपत्रक आपापल्या सह्या करून बहादुरशहाजवळ दिलें होतें. तेंही त्यानें सोबत इंग्रजांकडे पाठविलें होतें. परंतु बादशाहाच्या उरलेल्या पुत्रांतील सर्वांत वडील पुत्र, मिरजा-महमद कुरेश यानें मात्र त्या कबूलीपत्रकावर सही न करतां इंग्रजांशीं स्वतंत्रपणें बोलणें सुरू केलें. त्यानें गव्हरनर जनरलला लिहिलें कीं, 'बादशाहाच्या व झिन्नत-महाल बेगमच्या भीतीमुळें इतर राजपुत्रांनीं जवानबक्ताच्या बादशाहीच्या वारस हक्काबद्दल कबुलायत दिली. परंतु ती खरी मानण्यांत येऊं नये. बादशाहाचा मी सर्वांत वडील पुत्र असल्यामुळें बादशाहीवर माझाच वारसा पोहोंचतो.' या वेळीं लॉर्ड डलहौसी इंग्लंडला जाऊन त्याच्या जागीं लॉर्ड क्यानिंग नुकताच आलेला होता. त्यानें डलहौसीच्या वेळच सर्व जुना पत्रव्यवहार काळजीपूर्वक वाचून पाहिला, व १८०४ सालीं वेलस्लेनें आंधळ्या शाहाआलम बादशाहाला दिलेलें वचन पाळण्याची यापुढें कांहीं जरूरी उरली नाहीं, असें आपल्या मनाशीं ठरविलें. दिल्लीची बादशाही वंशपरंपरेनें तैमूरच्या घराण्यांत चालविण्याचें वेलस्लेनें शाहा-अलमला दिलेलें वचन कंपनीनें तीन पिढ्यांपर्यंत पाळलें, व हाच त्या घराण्यावर कंपनीचा मोटा उपकार झाला, असें त्याच्या मनाला वाटूं लागलें. शहाअलम, अकबरशाहा, व बहादुरशहा या तिघांनीं बादशाहीचा मनमुराद उपभोग घेतला तेवढा पुरे, असें त्यानें ठरविलें. इंग्रजांची हिंदुस्थानांत सार्वभौम सत्ता स्थापन झाल्यानंतर हें मोंगल बादशाहीचें नाटक चालू ठेवण्यांत कोणताच अर्थ उरला नाहीं, असेंच त्याचेंही मत पडलें. त्यानें विलायतेस लिहिलें कीं, "बादशाही वैभवाचा बडेजाव आपण सारखा कमीच करीत आलेले आहों. बादशाहाला नजर देण्याची चाल मागेंच बंद करण्यांत आली. बादशाहाच्या नांवाचें नाणें पाडणेंही बंद करण्यांत आलें आहे. गव्हरनर जनरलच्या शिक्का मोर्तबांतील '**बादशाहाचे अंकित**' हे शब्द केव्हांच कोणाला न समजतां युक्तीनें नाहींसे करण्यांत आले, व

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राजेरजवाड्यांनाही, दिल्लीच्या बादशाहाचे अंकित यापुढें केव्हांही म्हणवून न घेण्याबद्दल सक्त सूचना देण्यांत आल्या. या जुन्या राजनीतीला अनुसरून मी असा ठराव करतों कीं, बादशहाच्या मागें मिरजा महमद कुरेश यांस फक्त शहाजादा ही पदवी वापरण्याचा अधिकार असावा, आणि त्यानें दिल्लीचा किल्ला आमच्या हवालीं करून कुतुबमिनारजवळ रहावयास जावें. म्हणजे त्यास तेथें खर्चाकरितां पंधरा हजार रुपये महिना पेन्शन दिली जाईल." युवराज फकीरुद्दीन व मिरजा महमद कुरेश यांचीं इंग्रजांशीं चाललेलीं कारस्थानें जरी गुप्तपणें होत होतीं, तरी बेगम झिन्नतमहालला त्यांचा सुगावा लागला. जवानबक्ताच्या तर्फेनें आतां निराळ्या दिशेनें तिनें निराळीच कारवाई चालू केली. इराणच्या शहाशीं दिल्लीच्या राजवाड्यांतून पत्रव्यवहार सुरू झाला. त्या पत्रव्यवहारांत खुद्द बादशाहाचें अंग कितपत होतें हें सांगतां येत नाहीं, किंवा दिल्लीहून पाठविलेलीं पत्रें इराणला जाऊन पोहोंचलीं, असेंही निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. परंतु इंग्रजांच्या राजनीतीमुळें आपलें उरलेंसुरलें ऐश्वर्यही नष्ट होणार, आणि आपल्या पूर्वजांचा दिल्लीचा इतिहासप्रसिद्ध महाल आपल्याला सोडणें भाग पडून, कोठेंतरी बाजूला सामान्य माणसाप्रमाणें आयुष्य कंठावें लागणार, या कल्पनेनें बेगम व तिचा मुलगा संतापानें लाल होऊन इंग्रजांचा तेव्हांपासून अतोनात द्वेष करूं लागले, ही गोष्ट मात्र अगदीं खरी. दिल्ली येथील इतर मुसलमान रहिवाशी देखील या इंग्रजद्वेषाचे थोड्याबहुत प्रमाणांत वांटेकरी झाले. कारण दिल्लीचे बादशहा पराक्रमशून्य बनले असले, तरी त्यांच्या पराक्रमी पूर्वजांची आठवण अजूनही लोक विसरले नव्हते. बाबरपासून अवरंगजेबापर्यंतच्या सहा पराक्रमी व कर्तृत्ववान मोंगल सम्राटांचा इतिहास लोकांना अवगत होता. यामुळें बादशहाच्या विपन्नावस्थेनें लोकांचें अंतःकरण भरून येई, आणि त्यांची अशी दशा करणाऱ्या व पुढें याहूनही वाईट करूं पाहणाऱ्या इंग्रजांविषयीं त्यांच्या मनांत द्वेष बाणूं लागे. बादशहाच्या नोकराचाकरांत देखील, इराणचा शहा हिंदुस्थानावर स्वारी करणार व मोंगल बादशाहीला पूर्वीच्या वैभवाचे दिवस प्राप्त करून देणार, अशी चर्चा चालू झाली. बाजारांत, मशीदींत व राजवाड्यांत हाच विषय ज्याच्या त्याच्या तोंडीं झाला होता. इंग्रज रेसिडेंटच्या कानापर्यंतही ही गोष्ट गेली. परंतु इंग्रजांना आपल्या सत्तेचा व पराक्रमाचा अतोनात गर्व वाटत असल्यामुळें त्यांनीं ती तुच्छच लेखली; आणि खरोखर ती गोष्ट असंभाव्य कोटींतलीच होती. परंतु सामान्य लोकांना एवढा सारासार विचार कोठें असतो?

सारांश, तैमूरलंगाच्या प्रसिद्ध घराण्याला क्षुद्र व निर्माल्यवत् करण्याची लॉर्ड डलहौसीची इच्छा, विलायतेंतील कंपनीच्या कांहीं अधिकाऱ्यांच्या हट्टामुळें अपुरी राहिली होती, ती लॉर्ड कॅनिंगच्या हातून याप्रमाणें शेवटास जाण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. लॉर्ड कॅनिंगला याबद्दल फारसें जबाबदार धरतां येत नाहीं. कारण तो हिंदुस्थानांत नवीनच आला होता. लॉर्ड डलहौसीच्या वेळीं जो एकंदर पत्रव्यवहार झाला होता तो वाचून व कौन्सीलर्सचा सल्ला घेऊनच त्यानें आपलें मत बनविलें. लॉर्ड डलहौसी लेखणीचा अत्यंत फर्डा होता. त्याचे खलीते कुटिल स्वरूपाचे असले तरी अत्यंत जोरदार व वक्तृत्वपूर्ण असत. ते वाचूनच तैमूरलंगाच्या घराण्यांतून बादशाही पदवी हरण करण्याचा, व दिल्लींतून त्या घराण्याला हद्दपार करण्याचा निश्चय लॉर्ड कॅनिंगनें ठरविला, व त्याप्रमाणें दिल्ली येथील रेसिडेंटला आपलें म्हणणें कळविलें. हा निकाल कायम स्वरूपाचा असला तरी बहादुरशहाच्या हयातींत तो गुप्त ठेवला जावा, अशी लॉर्ड कॅनिंगनें मुद्दाम रेसिडेंटला सूचना दिली होती, परंतु ही बातमी गुप्त राहिली नाहीं. कंपनीची पन्नास वर्षांची राजनीति पाहतां, व लॉर्ड कॅनिंगच्या बहादुरशहाचा वारसा नक्की करण्याच्या चालढकलीवरून, राजवाड्यांतील मंडळींना भविष्याचा अंदाज बांधणें कठीण नव्हतें. इराणच्या शहाला खूष करण्याकरतां वृद्ध मोगल बादशानें सुनी पंथाचा त्याग करून शिया पंथाची दीक्षा घेतली. बहादूरशहाचा मुख्यहकीम हसनउल्ला यानें ही हकीगत आपल्या साक्षींत शपथेवर सांगितली आहे. इराणच्या शहाला रशीयाचा झार मदत करणार, आणि इंग्रजांचा दोस्त असलेला अफगणिस्थानचा अमीर दोस्त महंमद, हादेखील अखेर इंग्रजांना दगा देऊन व शहाला मिळून, सर्वजण मोंगल बादशाहीची पुन्हा दिल्लीस प्राणप्रतिष्ठा करणार व मुसलमानी धर्माचें महत्त्व वाढविणार, अशी बातमी सर्वत्र पसरली होती. राजवाड्यांतील नौकरचाकर दिल्ली शहरांतील इतर मुसलमानांशी ह्या गोष्टींची दिवसरात्र सारखी चर्चा करीत होते. १८५७ सालच्या वसंत ऋतूंत इंग्रजांची इराणशीं लढाई चालली होती, तेव्हां मोहामारा येथें इराणी राजपुत्राच्या तंबूंत हिंदुस्थानांतील सर्व मुसलमानांना—वृद्धतरुण, लहान मोठे, विद्वान व अडाणी, शिपाई व रयत, या सर्वांना उद्देशून फिरंग्यांच्या विरुद्ध लढण्यास उत्तेजन देणारा जाहीरनामा सांपडला, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे या व्यवहारास ईश्वरी साहाय्य मिळावें म्हणून, बादशाहाचा प्रमुख धर्मोपदेशक मौलवी हसन अस्कारी यानें दररोज संध्याकाळीं दीडतास ईश्वराची विशिष्ट आराधना चालविली होती. बादशाही वैभवापासून

तैमूरचें घराणें च्युत न होतां अधिक उज्वल व्हावें अशीच सर्व मुसलमानांची इच्छा होती, आणि कंपनीकडून त्या घराण्यावर शेवटचा सफाईचा वार होण्याची घटका अगदीं जवळ आल्यामुळें, ही इच्छा अत्यंत तीव्र स्वरूपांत प्रकट होऊन इंग्रजांविषयींचा द्वेष व सुडाची भावना तिच्या पोटांत रसरसलेली होती. मूर्ख जवानबक्त तारुण्याच्या रक्त अंगांत सळसळत असल्यामुळें, प्रसंगविशेषीं इंग्रजांसमोर देखील निर्भीडपणें आपल्या मनांतील विचार बोलून दाखवीत असे. मिर्झा महमद कुरेश वयानें वडील असल्यामुळें त्याला अधिक सारासार विचार होता. आपल्याकडून कोणताही अपराध न घडतां, व आपण शेवटपर्यंत कंपनीशीं प्रामाणिकपणें वागत असतां आपली बादशाही काढून घेतली जाणार, दिल्लीच्या भव्य प्रासादांतून आपल्याला हद्दपार करण्यांत येणार, व शिवाय पेनशनची रकमही कमी केली जाणार, हा अन्याय त्याला कल्पनेंतही सहन होईनासा झाला. शिवाय राजवाड्यांतील बेगमेच्या कारस्थानें तो वडील पुत्र असूनही, त्याचा वारसहक्क उडवून देऊं पहात होतीं. तेव्हां स्वपराक्रमावर मदार ठेवण्याशिवाय शहाजाद्यांना अन्य मार्ग उरला नाहीं. कारण कंपनी सरकारच्या हातांतलें खेळणें होऊन देखील, कोणत्याही कारणांशिवाय बादशाहीचे पंख गेल्या पन्नास वर्षांत हळुहळु उपटण्यांत आले होते, आणि आतां तर बादशाहीची मुंडी कायमची पिरगळून टाकण्याचा कंपनीचा विचार ठरला होता. मोंगल बादशाही घराण्यानें इंग्रजांच्या प्रत्येक म्हणण्याला मान तुकवून, बैल गाभण तरी तेरावा महिना असें नम्रपणाचें उत्तर दिलें. परंतु या विश्वासाची अखेर बादशाहीच्या नाशांत होण्याचें ठरलें. अशा परिस्थितींत बादशहानें व त्याच्या बेगमा आणि शहाजाद्यांनीं स्वातंत्र्याकरितां व पूर्ववैभवाकरितां एक अखेरचा निकराचा प्रयत्न करून पाहण्याचें ठरवावें, हें मनुष्यस्वभावाला अनुसरूनच होणें. एर्वीतेर्वी सर्व नाश होतोच आहे, मग प्रयत्नांची शिकस्त तरी कां न करा ? वाघ म्हटलें तरी कंपनी खाणार, आणि वाघोबा म्हणून गौरविलें तरी कंपनी बादशाही खाणार ? अशा कचाटींत सांपडल्यावर स्वाभिमान माणसाला काय करण्यास प्रवृत्त करील ? मांजर देखील अडचणींत सांपडलें, तर गुरगुरून अंगावर येतें, मग बहादुरशहा वृद्ध झाला असला तरी तो तैमूरलंगचा वंशज होता. त्यानें स्वातंत्र्याकरितां शेवटचा निराशेचा प्रयत्न कां करूं नये ?

---

## प्रकरण ८ वें.

# औधचे नबाब.



दिल्लीची मोंगल पातशाही कमजोर होऊन विलयाच्या मार्गाला लागली, त्या वेळीं हिंदुस्थानांत जीं स्वतंत्र मुसलमानी राज्यें निर्माण झालीं त्यांपैकीं हैद्राबाद व अयोध्या हीं दोन प्रमुख होत. त्यांचें क्षेत्रफळ विस्तृत होतें, व उत्पन्नही भलें दांडगें होतें. त्यांच्यावर कंपनीचा फार दिवसांपासून डोळा होता. राबर्ट नाईटनें स्टेट-सूमन पत्रांत लिहिलें आहे, “The two great Musalman states–Hyderabad and Oudh–were marked down for annexation, and the process of undermining them **as the Blue books tell us,** was only delayed by the wars in the Punjab Burmah. When the time for business came, Oudh was annexed. Hyderabad was pushed on the road to ruin; and Lord Dalhousie waited for the **crash**.” औध व हैद्राबाद हीं दोन प्रमुख मुसलमानी संस्थानें खालसा करण्याकरितां पूर्वीपासूनच नियोजित केलीं होतीं, आणि पार्लमेंटरी ब्लू बुकांवरून दिसून येतें कीं केवळ पजाब व ब्रम्हदेश येथील लढायांमुळें, त्यांना पोखरून त्यांचा नाश करण्याचें काम जरा लांबणीवर पडलें. जेव्हां कार्याची वेळ आली तेव्हां औध खालसा करण्यांत आलें, व हैदराबादला विनाशमार्गावर ढकलण्यांत आलें, आणि लार्ड डलहौसी शेवटचा बार उडण्याची वाट पाहात होता. हैदराबादच्या जिवावरील संकट वऱ्हाडच्या शेपटावरच निभावलें, याला कारण हैद्राबादचे दिवाण सर सालरजंग यांच्या मुत्सद्देगिरीसच दिलें पहिजे. त्यांनीं ओळखलें कीं संस्थानांचा ग्रास करणारा राहू जोंपर्यंत हिंदुस्थानचा गव्हरनर जनरल आहे, तोंपर्यंत त्याला संस्थानाच्या भानगडींत पडण्याची संधीच देतां कामा नये. सर सालरजंगाच्या बुद्धिमत्तेमुळें हैदराबादचा त्या वेळीं बचाव झाला. परंतु औधला तसा कोणी चतुर प्रधान न मिळाल्यामुळें औधची डलहौसीच्या यज्ञांत अखेरीस पूर्णपणें आहुती पडली. येथील नबाब मोंगल पातशाहीचे सुभे असले तरी ते नांवापुरतेच पातशहाचे अंकित होते. त्यांचा सर्व कारभार स्वतंत्रपणेंच चालला होता. मराठ्यांचें हिंदुस्थानावर एकछत्री साम्राज्य स्थापन करण्याआड, उत्तरेस अयोध्येचे नबाब व दक्षिणेस हैद्राबादचे

निजाम हे दोन प्रबळ व महत्वाकांक्षी प्रतिस्पर्धीच बरेच त्रासदायक झाले. मराठ्यांशीं या मुसलमान नबाबांचा सारखा विरोध चालला होता. त्यामुळें मराठ्यांचा पराभव करण्याकरतां ते इंग्रजांचे मित्र बनले. त्यांनीं इंग्रजांना घरांत घेतल्यामुळें प्रथम मराठ्यांचें व नंतर त्यांचेंही स्वातंत्र्य हरण झालें. यांपैकीं उत्तरेकडील अयोध्येचें राज्य अत्यंत संपन्न होतें. गंगा-यमुनाकांठचा उत्तर हिंदुस्थानांतील प्रदेश सुपीकतेबद्दल पूर्वीपासूनच फार प्रसिद्ध आहे. त्यामुळें या देशांत द्रव्याचा ओघ नद्याप्रमाणेंच सारखा वाहात होता. येथील नबाब अत्यंत श्रीमंत होते, प्रजाही सुखी व समाधानी होती. अयोध्येच्या राजाचें सामर्थ्य त्यामुळें अतिशय वाढलें होतें. सादतखान, सफदरजंग व सुजाउद्दवला, हे तिन्ही नबाब शूर असून राज्यकारभारांत अत्यंत कुशल होते. त्यांच्या राज्यांत हिंदु व मुसलमान हा भेदभाव करण्यांत येत नसे. नबाबाच्या राज्यांत अनेक मराठे व इतर हिंदु गृहस्थ मोठमोठ्या अधिकारावर नेमले गेले होते. कारण नबाबांचें मराठी सत्तेशीं वैर असलें, तरी व्यक्तिशः त्यांच्या मनांत मराठ्यांबद्दल आदर वसत होता. अनेक हिंदु घराणीं या नबाबांच्या कारकीर्दींत तिकडे उदयास आलीं.

१७६१ सालीं मराठ्यांचें व अबदल्लीचें युद्ध झालें. त्या वेळीं सुजाउद्दवला हा अयोध्येचा नबाब होता. अशा पराक्रमी नबाबाला आपल्याकडे वळवून घेण्याचा मराठ्यांनीं अतिशय प्रयत्न केला, पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. सुजाउद्दवला अबदल्लीला जाऊन मिळाला व अखेर मराठ्यांचा पानपत येथें सपशेल पराभव झाला. अहमदशहा अबदाली परत आपल्या देशीं येथून गेल्यानंतर, थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दींत मराठ्यांनीं पुन्हां डोकें वर काढलें, आणि पूर्वींच्या गोष्टी लक्षांत ठेवून सुजाउद्दवल्याचें पारिपत्य करण्याचें त्यांनीं योजिलें. तेव्हां सुजाउद्दवल्यानें इंग्रजांशीं स्नेह जोडला. या स्नेहामुळें इंग्रजांचा एक वकील लखनौ येथें येऊन राहिला. इंग्रजी सैन्य आपल्या मुलखांत ठेवून घेऊन त्याच्या खर्चाकरितां दोन लक्ष दहा हजार रुपये महिना इंग्रजांना देण्याचें त्यानें कबूल केलें. इंग्रजांच्या साह्यामुळें सुजाउद्दवल्यानें रोहिलखंडाच्या नबाबाचा पराभव केला, आणि मराठ्यांच्या वाढत्या सत्तेलाही अटक केली. यामुळें नबाबाचा तर फायदा झालाच परंतु इंग्रजांचेंही चांगलेंच फावलें. अयोध्येच्या राज्यांत इंग्रजांचा हा जो शिरकाव झाला, त्यामुळें त्यांच्या राज्यविस्ताराला अतोनात मदत झाली. कारण अयोध्येचें राज्य अत्यंत धनसंपन्न होतें; आणि इंग्रजांची दृष्टीही पूर्वीं केवळ बनियेगिरीची होती.

इ. स. १७७५ सालीं सुजाउद्दवला मृत्यु पावला व त्याचा वडील मुलगा मिरजाअमानी हा असफउद्दवला हें नांव धारण करून गादीवर बसला. कंपनीनें ही संधी साधून सुजाउद्दवल्याशीं केलेला जुना तह कारणाशिवाय रद्द केला व नवीन नबाबावर नवा तह लादला. या तहाप्रमाणें बनारस, जौनपूर, गाझीपूर, आणि चेतसिंह राजाच्या ताब्यांतील सर्व मुलूख, असा तेवीस लक्षांचा प्रांत दोस्तीखातर कंपनीला देणें नबाबास भाग पडलें. इंग्रजांना हिंदुस्थानांत मुलुखगिरी करून राज्यविस्तार करावयाकरितां अधिक फौजेची जरूरी होती. त्या फौजेचा खर्च करावयास कंपनीला नेहमींच टाळाटाळ करावीशी वाटे. फौजेचा खर्च परभारें पार पडला म्हणजे कंपनीचा नफा अबाधित चालू राही. त्या धोरणानें नबाबाच्या राज्यांतील इंग्रजी फौज वाढविण्यांत आली, आणि त्या फौजेच्या खर्चाकरितां नबाबाकडून मासिक दोन लाख साठ हजार रुपये वसूल करावे असें ठरलें. सुजाउद्दवल्याची बायको भाऊबेगम हिला संस्थानची सर्व संपत्ति देण्यांत आली, आणि फैजाबाद व अयोध्येच्या आसमंतात असणाऱ्या भागाची स्वतंत्र जहागीरही तिला तोडून देण्यांत आली. या बेगमेला छळून तिच्यापासून गव्हरनर जनरल वारन हेस्टिंग्स यानें कशा पाशवी शक्तीनें द्रव्य वसूल केलें, ही हकीकत वारनहेस्टिंग्स वरील खटल्यामुळें सर्वांना माहीत झालेलीच आहे. कदाचित् ही द्रव्यदृष्टी ठेवूनच इंग्रजांनीं सुजाउद्दवल्याच्या मृत्यूनंतर मातापुत्रांची ही निराळी व्यवस्था लावून दिली असावी.

असफउद्दवल्यानें लखनौ ही आपली राजधानी केली, व राज्यकारभार सुरळीत रीतीनें चालविण्याचा यत्न केला. परंतु नबाबाच्या लष्करामध्यें महागऱ्या, जुलमी व अडेलतट्टू युरोपियन अधिकाऱ्यांचा फार भरणा करून व मन मानेल त्याप्रमाणें नबाबाच्या सैन्यांत ढवळाढवळ करून, इंग्रज रेसिडेंटानें अयोध्येंत एकसारखा गोंधळ उडवून दिल्यामुळें तेथें कोणत्याही प्रकारची शिस्त राहिली नाहीं. रेसिडेंटच्या शिफारशीनें अनेक इंग्रजांचीं तट्टें वशिला लावून नबाबाच्या दिवाणी कारभारांतही शिरलीं. या स्वेच्छाचारी युरोपियन लोकांनीं जमिनदार लोकांकडून वाटेल तसा पैसा घेतला, आपला व्यापार सुरू केला आणि जकातीचा वसूलही आपणच करूं लागले. यांपैकीं कर्नल हेने नामक एक इसम गोंडा व गोरखपूर येथील जमाबंदीच्या कामावर अधिकारी होता. १७७८ पासून १७८१ पर्यंत तीन वर्षांच्या अवधींतच हा पठ्ठा तीस लाख रुपये निवळ मुनाफ्याचे खिशांत घालून विलायतेस चालता झाला. राज्यांत वसुलाच्या कामावर नेमले गेलेले युरोपियन अधिकारी प्रांताचा वसूल

नबाबाच्या खजिन्यांत न पाठवितां स्वतःच्या खिशांत भरून आपलाच तळीराम गार करूं लागले. यामुळें नबाबाची फारच त्रेधा उडाली. त्यांस स्वतःच्या नोकर लोकांस पगार देण्यास किंवा नातेवाईक लोकांस ठरवलेल्या तैनाती पोंचत्या करण्यासही पैसा मिळेनासा झाला. राजवाड्यांतील स्त्रियांना उपासमार होऊं लागली. वेळच्या वेळीं व पुरेसा पगार मिळत नसल्यामुळें नबाबाचें सैन्य बेदील होऊन त्यानें बंड केलें. इंग्रजांचें देणें मात्र बम्हस्वाप्रमाणें सारखें वाढत चाललें. अतिशय प्रयत्न करूनही नबाबाला त्यांच्याकडे फक्त सत्तर लक्ष रुपये पोंचते करतां आले.

यानंतर द्रव्य वसूल करण्याची वारन हेस्टिंग्सनें दुसरी युक्ति योजिली. वारन हेस्टिंग्सनें काशीच्या चेतसिंग राजाशीं अतिशय जुलमाचें वर्तन केल्यामुळें, काशी येथें १७८९ सालीं आगष्ट महिन्यांत बंड झालें. या बंडामध्यें अयोध्येच्या बेगमांचें अंग आहे असा सपशेल खोटा पुरावा वारन हेस्टिंग्सनें, आपला मित्र व त्यावेळचा हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याचा मुख्य न्यायाधीश सर इलाइजा इंपे, याच्या मदतीनें तयार केला व बंडांत सामील झाल्याबद्दल बेगमांच्या जहागिरी व संपत्ति जप्त करण्याचें काम सुरू केलें. बेगमांची जहागीर वार्षिक तीस लक्ष रुपये उत्पन्नाची होती. ती जप्त केली असतां कंपनीस पुष्कळ फायदा होईल, अशा पापबुद्धीनें ती असफउद्दवल्याकडून जप्त करविण्याचा त्यानें निश्चय केला. या सर्व गोष्टीस नबाबाची तर संमती नव्हतीच, परंतु खुद्द इंग्रजांचा लखनौ येथील रेसिडेंट मिडलटन याला देखील ही गोष्ट आवडली नाहीं. परंतु वारन हेस्टिंग्सच्या दुराग्रहामुळें त्याला हें नीच कृत्य करणें भाग पडलें. अयोध्येच्या जहागिरी अन्यायानें नबाबाच्या इच्छेविरुद्ध जप्त केल्या गेल्या, म्हणून नबाबाचें मन उदास झालें, व त्याची शरीरप्रकृति अगदीं क्षीण झाली, असें रेसिडेंटनें हेस्टिंग्सला एका पत्रांत लिहिलें आहे. असफउद्दवल्यानें अखेरपर्यंत बेगमांच्या जहागिरीची व संपत्तीची जप्ती करण्याचा हुकूम देण्याचें नाकारलें. शेवटीं रेसिडेंट मिडलटननें लष्करी लोकांनिशीं फैजाबादेवर हल्ला चढविला; आणि गोमती नदीचे कांठीं आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस सुखानें क्रमित असलेल्या दोन राजस्त्रियांवर द्रव्यप्राप्तीस्तव त्यानें सक्ति केली. त्यास मदत करण्यास वारन हेस्टिंग्सच्या मर्जीतला व त्याच्याच कृपेनें अयोध्येचा मुख्य प्रधान झालेला सरदार हैदरबेगखान हा तत्पर झाला. नंतर त्या उभयतांनीं त्या पडदानशीन बेगमांवर व त्यांच्या वृद्ध द्वारसंरक्षकांवर अतिशय जुलूम करून, त्यांच्याकडून शहात्तर

लक्ष रुपये पिळून काढले. त्या बेगमांचे क्लेश, त्यांचा मानभंग, व त्यांची विटंबना आणि बेगमांच्या वृद्ध व प्रामाणिक नौकरांचा झालेला छळ प्रत्येक सहृदयाच्या नेत्रांतून अश्रुधारा काढील. या कृत्यानें ब्रिटिश लोकांच्या कीर्तीस अखंड कलंक लागला, ही गोष्ट मिल व मांटगामरे या इतिहासकारांनीं प्रांजलपणें कबूल केली आहे. बर्क व शेरिडन या दोन प्रसिद्ध आंग्ल वक्त्यांनीं हेस्टिंग्सवर दोषारोप करतांना राक्षसाचीच उपमा त्यास दिली आहे.

इ. स. १७७४ सालीं जो अयोध्याप्रांत अतिशय भरभराटींत होता, तोच १७८३ सालीं उध्वस्त व उच्छिन्न बनला. या नऊ वर्षांत असफउद्दवल्यानें अशा विचित्र परिस्थितींतही दोन कोटी तीस लक्ष रुपये कंपनीच्या लष्करी खर्चांबद्दल दिले. परंतु कंपनीचा व तिच्या इंग्रज नोकरांचा आहार सारखा वाढूं लागला. यामुळें अयोध्या संस्थानच्या शिरावर चौऱ्यायशीं लक्ष रुपयांची वार्षिक धोंड आणखी येऊन पडली. १७८८ सालीं लॉर्ड कार्नवालीसला नबाबानें आपली सर्व दुःस्थिति निवेदन केली, आणि हल्लींच्या राज्यपद्धतींत हें ओझें संस्थानला झेपणें शक्य नाहीं, अशी त्यानें गव्हर्नर जनरलची खात्री करून दिली. यावेळीं मग एका नव्या तहनाम्यानें नबाबानें इंग्रजी फौजेच्या खर्चाकरितां सालीना पन्नास लक्ष रुपये द्यावे, व ब्रिटिश रेसिडेंटानें संस्थानच्या अंतर्गत राज्यकारभारांत बिलकुल हात घालूं नये असें ठरलें. अयोध्या प्रांतांत रेसिडेंटच्या वशिल्याचीं शिरलेलीं इंग्रजी तट्टें अर्थातच नोकरीवरून काढलीं गेलीं, आणि अंतर्गत राज्यकारभारांत स्वातंत्र्य मिळाल्यामुळें असफउद्दवल्यानें राज्याची स्थिति हां हां म्हणतां सुधारली. महाराज टिकायतराय नांवाच्या एका चतुर मुत्सद्याला त्यानें दिवाण नेमलें; झबलाल नांवाचा दुसरा एक हिंदु मुत्सदी कोशाध्यक्ष नेमला गेला. यानंतर त्यानें इंग्रजांचें देणें नेमानें देऊन लखनौ शहरास भूषणभूत असलेले अनेक राजवाडे बांधले. दौलत खानी, रुमाई दरवाजा, हसनबाग, बिबियापुरकोठी, ऐषबाग, चारबाग व इमामवाडा हीं सुंदर राजमंदिरें व उद्यानभूमिका त्याची थोरवी अजूनही गातात. यांपैकीं इमामवाडा व रुमाइ दरवाजा या दोन प्रचंड इमारती त्यानें अयोध्या प्रांतांत दुष्काळ पडला असतांना, दरिद्री लोकांच्या केवळ उदरपोषणाकरितां बांधिल्या. अयोध्येचें वैभव पुन्हा वाढूं लागलें. नबाबाचा पुत्र वजीर अल्ली याच्या लग्नांत बाराशें शृंगारलेले हत्ती वरातीपुढें चालत होते. आणि लग्नसमारंभाकरितां १२० फूट लांब व ६० फूट रुंदीचे व तितकेच उंच असे दोन भरगच्ची कापडाचे व अप्रतिम कलाकुसरीचे तंबू उभारण्यांत

आले होते. स्वतःच्या डामडौलाबरोबर दानशूरत्वांतही त्याचा कर्णाप्रमाणें लौकिक होता. त्यामुळें लोकांत "जिसको न दे मौला उसको दे असफोद्दवला." ज्याला ईश्वर देत नाहीं त्याला असफउद्दवला देतो अशा अर्थाची म्हण पडली आहे. परंतु १७९५ सालीं लार्ड कार्नवालिस जाऊन सर जॉन शोअर हे हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल होऊन आले. त्यांनीं राज्याच्या बंदोबस्ताकरितां इंग्रज सैन्याचीं दोन जादा पलटणें अयोध्येस ठेविलीं, व त्या सैन्याच्या सालीना खर्चाबद्दल साडेपांच लाख रुपयांचा जादा बोजा अयोध्येवर लादला. याशिवाय तफजुलहुसेन नांवाचा आपला पित्तु तेथें मुख्य प्रधान नेमला. असफउद्दवल्याच्या इच्छेविरुद्ध या दोन्ही गोष्टी घडल्यामुळें त्याच्या मनास धक्का बसला व त्यामुळें तो आजारी पडला या दुखण्यांत त्यानें औषधपाणी घेतलें नाहीं, आणि १७९७ सालीं तो इंग्रजाच्या कांचणीनें झुरणीस लागून मरण पावला. औध प्रांताचा राज्यकारभार सुधारण्याच्या त्याच्या प्रयत्नांवर याप्रमाणें बोळ फिरविण्यांत आला. असफउद्दवल्याच्या मृत्यूनंतर त्याचा औरसपुत्र वजीरअल्ली हा गादीचा खरा वारस असल्यामुळें त्यास गादी मिळणें रास्त होतें. त्याप्रमाणें हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल सर जान शोअर यांनीं त्यास गादीवर बसविण्याची परवानगी दिली व त्याप्रमाणें त्यास राज्याभिषेकही झाला. परंतु असफउद्दवल्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस गव्हरनर जनरलच्या मेहेरबानगीनें अयोध्येच्या प्रधानपदावर आरूढ झालेला तफजुलहुसेन यास ही गोष्ट पसंत पडली नाहीं. तो सुजाउद्दवल्याचा दुसरा मुलगा सादतअल्ली याचा पुष्कळ दिवस शिक्षक असल्यामुळें, त्याचा मनोदय आपल्या शिष्यास अयोध्येचें राज्यपद देऊन आपण त्याच्या वतीनें स्वतंत्रपणें राज्यकारभार चालवावा असा होता. तेव्हां त्यानें वजीरअल्लीवर नानाप्रकारचे असत्य आरोप आणून त्याजविषयीं गव्हरनर जनरलचें मन कलुषित केलें. गव्हरनर जनरलला ही गोष्ट इष्टच होती. कारण सादतअल्लीचा गादीवर वारसा नसल्यामुळें त्याला राज्य दिल्यास तो इंग्रजांच्या उपकाराच्या भारानें वांकून जाईल, आणि इंग्रजांस अधिक मुलुख व खंडणी कबूल करील, अशी त्यांना खात्री वाटत होती. त्यामुळें ते लखनौ येथें गेले. वजीरअल्ली हा अस्सल पुत्र नसून तो व्यसनी व उधळ्या आहे, आणि त्याचें मन इंग्रजांविषयीं अराजनिष्ठ आहे, असें गव्हरनर जनरल व तफजुलहुसेन यांचें चौकशीअंतीं मत पडलें. त्यामुळें त्यास पदच्युत करून सादतअल्लीस राज्याभिषेक करण्यांत आला. या राज्यक्रांतीमुळें लखनौ येथें बरीच धामधूम उडाली; कारण लोकांना हा ढळढळीत अन्याय वाटला. परंतु सर

जानशोअर यानें लोकांना जरबेंत ठेवून आपला हेतु तडीस नेला. वजीरअल्लीस काशी येथें ठेवण्यांत आलें. त्याला अन्यायानें पदच्युत केलें असल्यामुळें त्याचें मन अत्यंत संतप्त झालें आणि त्या संतापाच्या भरांत त्यानें १७९९मध्यें इंग्रजांच्या विरुद्ध बंड केलें. या बंडांत काशीचे इंग्रज अधिकारी चेरी हे मारले गेले. परंतु भाबड्या वजीरअल्लीचा लवकरच पराभव होऊन तो इंग्रजांच्या हातीं सांपडला. इंग्रजांनीं त्यास कलकत्ता येथील किल्ल्यामध्यें प्रथम सक्त कैदेंत ठेवलें. तेथें तो बरेच दिवस होता. नंतर पुढें त्यास वेलोर येथें टिपूसुलतानाच्या पुत्राकरतां बांधलेल्या राजकीय कारागृहामध्यें नेलें. तेथें तो हतभागी राजपुत्र १८१७ मध्यें मरण पावला. त्याच्या लग्नाकरितां असफउद्दवल्यानें तीस लक्ष रुपये खर्च केले होते. परंतु तो मरण पावला तेव्हां त्याच्या दफनास अवघा सत्तर रुपये खर्च इंग्रजांना आला. बंगालच्या मीरजाफर–मीरकासीम प्रकरणाइतकीच ही उचलबांगडी तिरस्करणीय असूनही सामान्य जनतेस हा इतिहास माहीत नाहीं. इंग्रजांच्या अपेक्षेप्रमाणें वारस नसलेल्या सादतअल्लीस अयोध्येची नबाबी दिल्यामुळें, त्यांचा अतोनात फायदा झाला. १७९८ सालीं सादतअल्ली व इंग्रज यांचा नवीन तह ठरला. अयोध्येच्या घराण्याशीं कंपनीसरकारची पूर्वीपासून जी दोस्ती होती, ती पुढें चालविण्याकरतांच हा नवा तह करण्यांत आला. या तहाप्रमाणें इंग्रजांची अयोध्येंतील फौज आणखी वाढली, व त्या फौजेच्या खर्चाकरतां शहात्तर लक्ष, तेहतीस हजार, तीनशें एकुणचाळीस रुपये, पांच आणे, चार पै इंग्रजांना दरमहाचे दरमहा देण्याचें ठरलें. इंग्रजांना अयोध्या प्रांतांत चांगले किल्ले नसल्यामुळें, अलाहाबाद व फतेगड किल्ले सरंजामासुद्धां व भोंतालची घांटमैदान जमीन धरून देण्यांत आले. आणि या इंग्रजांच्या ताब्यांत गेलेल्या किल्ल्यांच्या डागडुजीकरितां अकरा लक्ष रुपये, व गादी मिळवून दिल्याबद्दल बक्षीस म्हणून शिवाय बारा लक्ष रुपये, अशा रकमा इंग्रजांना नक्त नजर म्हणून देण्यांत आल्या. याप्रमाणें इंग्रजांचा पुष्कळ फायदा झाला, तरी त्यांची भूक मात्र शमली नाहीं. दोन वर्षांनंतरच अधिक फौज ठेऊन घेण्याबद्दल नवे गव्हरनर जनरल लॉर्ड वेल्सली यांनीं नबाबाकडे बोलणें लाविलें. सादतअल्लीनें लखनौचे रेसिडेंट कर्नल स्कॉट यांचे मार्फत गव्हरनर जनरल यास एक विस्तृत पत्र पाठवून, पूर्वीच्या तहाप्रमाणें पाहातां अयोध्येवर आणखी ब्रिटिश सैन्य लादणें अन्यायाचें आहे, असें फार लीनतेनें व स्नेहभावानें दर्शविलें. परंतु हा मजकूर लॉर्ड वेल्सली यांना अप्रिय वाटून त्यांनीं आपला हेतू पूर्ण करण्याचा हट्ट धरला. यावर जादा ब्रिटिश सैन्याचा खर्च देण्याचें आपणास सामर्थ्य नाहीं

असें सादतअल्लीनें त्यांस नम्रपणें कळविलें. गव्हरनर जनरलच्या दृष्टीनें या नकारामुळें सादतअल्ली राज्यकारभार करण्यासच नालायक ठरले. कारण एवढा धनाढय प्रांत व त्यांत राहणारे श्रीमंत प्रजाजन ताब्यांत असतां, पैसे नाहीं म्हणून नबाबानें उत्तर देणें, ही त्याच्या नालायकीची खूण ठरली. पैसे नसले तर लोकांवर कर लादून किंवा अन्य उपायानें पैसा उभा करावा, व इंग्रजांच्या मागण्या पुरवाव्यात! २२ जानेवारी १८०१ रोजीं लॉर्ड वेलसली यांनीं सादतअल्लीनें गादीवरून दूर तरी व्हावें किंवा नवीन तह करून आमचें म्हणणें कबूल करावें, असा निर्वाणीचा खलिता पाठविला. सादतअल्लीनें पुष्कळ आढेवेढे घेतले, परोपरीनें विनवणी केली आणि आपली बाजू न्यायदृष्टया किती बळकट आहे हें नीट रीतीनें मांडून दाखविलें. परंतु सार्वभौम सत्तेच्या हट्टापुढें नमतें घेणें त्याला अखेरीस भाग पडलें. गादीवर बसविल्यापासून तीन वर्षांच्या आंतच इंग्रजांनीं त्याच्याशीं दुसरा तह केला. या नव्या दोस्तीच्या तहाप्रमाणें सैन्याच्या खर्चाकरितां म्हणून फरूकाबाद, मैनापुरी, इटावा, कानपूर, फत्तेगड, अलाहाबाद, अजिमगड, बासती, गोरखपूर हा जवळ जवळ दीडकोट रुपये वसुलाचा प्रांत ईस्ट इंडिया कंपनीकडे सर्व हक्कांसह आला. इतःपर नबाबास सैन्याचा खर्च कंपनीला रोकडी रकमेंत निराळा द्यावा लागणार नाहीं, व उरलेला मुलूख त्याच्याकडे वंशपरंपरा चालविण्यांत येईल असें औदार्यपूर्वक ठरविण्यांत आलें! अयोध्येचें अर्धें राज्य ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरांत पडलें आणि सादतअल्ली या फौजी खर्चाच्या जाचांतून एकदांचा मुक्त झाला.

यानंतर सादतअल्लीनें अयोध्येच्या राज्यकारभाराकडे लक्ष पुरवून आपली कारकीर्द प्रजेस सुखावह होईल असा यत्न केला. त्यानें चांगले चांगले मुत्सद्दी व शहाणे लोक आपल्या दरबारांत ठेवले, व प्रथमतः सर्व प्रांताची पाहाणी करून जमीन महसुलाची सुरळीत व्यवस्था लावली. न्यायपद्धतींतही सुधारणा करून प्रजेस योग्य न्याय मिळेल असा बंदोबस्त केला. कर्नल अँड्रोनें सादतअल्लीविषयीं असें लिहिलें आहे कीं, त्याच्या एकंदर राज्यव्यवस्थेमुळें लोक फार सुखी व संतुष्ट झाले. राज्यांतील पडित जमिनीची लागवड झाली. रयतेचा मित्र अशी कीर्ति मिळवून देखील राज्याचा खजिना त्यानें पूर्णपणें भरून ठेविला. त्याला कोणत्याही प्रकारचें व्यसन नव्हतें, आणि त्याचा खासगी खर्च बेताचाच होता. कर्नल स्लीमननें देखील त्याच्या शहाणपणाची अतोनात तारीफ केली आहे. तो म्हणतो, "सादतअल्ली चांगला कर्तृत्ववान् पुरुष होता. राज्यांतील लोकांचा स्वभाव,

त्यांची समाजघटना व त्यांच्या गरजा, यांची त्याला पूर्ण माहिती होती. मनुष्याच्या गुणांची पारख करण्यांत त्याचा हातखंडा असून, योग्य स्थानीं योग्य माणूस नेमून त्यावर उत्तम प्रकारें देखरेख करण्याची हातोटी त्यास उत्तम प्रकारें साधली होती. त्याचे नोकर लोक त्याच्यावर खुष असून आपलें काम इमानें इतबारें बजावीत असत. मनोबरउद्दवला, हकीममेहेंदी व दयाशंकर हे तिघे थोर लोक त्याचे मुख्य सल्लागार होते." ज्या सादतअल्लीस लॉर्ड वेलस्ली यांनीं १८०१ मध्यें राज्य करण्यास नालायक ठरवून गादीवरून काढण्याचा निश्चय केला होता, तोच सादतअल्ली राज्यकारभारांतील ब्रिटिश सरकारचीं व त्यांच्या रेसिडेंटची लुडबूड आणि तैनाती फौजेच्या खर्चाचें वाढतें जोखड बंद झाल्यामुळें उत्तम राज्यकर्ता ठरला. त्याच्या शहाणपणाला व कर्तबगारीला स्वतंत्र वाव मिळाल्यामुळें, त्यानें आपल्या कारकीर्दीत दिलाराम, दिलखुष, मुसाबाग, नूरबक्षकोठी, खासबाजार, हजरतआबासचा दर्गा, वगैरे अनेक सुंदर इमारती बांधल्या. प्रजेकडून वाहवा म्हणवून घेऊन देखील, तो १८१४ सालीं वारला तेव्हां अयोध्येच्या खजिन्यांत चौदाकोट रुपये शिल्लक होते.

सादतअल्लीच्या मृत्युनंतर त्याचा मुलगा गाजीउद्दीन हैदर हा गादीवर बसला. याच्या कारकीर्दीत संस्थानच्या राज्यव्यवस्थेंत फेरफार करण्यास ब्रिटिशसरकारास कोणतेंच कारण नव्हतें. यानें इंग्रजसरकारला वेळोवेळीं द्रव्याची मदत केली. नेपाळच्या लढाईच्या वेळीं त्यानें इंग्रजांना दोन कोट रुपये उधार दिले, व ब्रह्मदेशच्या लढाईच्या वेळीं दीडकोट रुपयांची आणखी रकम दिली. त्यामुळें गाजीउद्दीनच्या मैत्रीची इंग्रजसरकारनें अतिशय प्रशंसा केली. बिशप हिबरनें, १८२४ सालीं तो लखनौस गेला असतांना खालीलप्रमाणें तेथील वर्णन लिहिलें आहे. "अयोध्येची राज्यव्यवस्था चांगली नसून सर्व प्रदेश निर्जन झाला आहे म्हणून आम्ही ऐकलें होतें. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. शेतकरी लोक लढाऊ जातीचे असल्यामुळें हत्यारें बाळगून होते, तरी ते शांत व नम्र आढळून आले. त्याचप्रमाणें खेडेगांवांत देखील दुकानें व्यवस्थित व टापटिपीचीं असून सर्व लोक सुखी व भरभराटींत आहेत असें दिसलें. एकंदरींत सर्व प्रांत लागवड केलेला होता, असें पाहून मला साश्चर्य आनंद वाटला." संस्थानाचा कारभार कितीही चांगला चालला असला तरी त्याची बदनामी करणें, ही गोष्ट कंपनीच्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या आंगवळणीं पडली होती. कारण

संस्थानांतील अंदाधुंदीचा खोटा गाजावाजा केल्याशिवाय व तेथील बेबंदशाही जुलमाचा जगभर डंका पिटविल्याशिवाय आपला पाय आंत घालणें लोकदृष्टीनें तरी वाईट दिसेल, हें इंग्रजलोक जाणून होते.

गाजीउद्दीन हैदर १८२७ सालीं मृत्यु पावला, त्या वेळीं त्याचा मुलगा नासिरुद्दीन हा गादीवर बसला. हा स्वभावत: निरुपद्रवी व उदार वृत्तीचा होता. परंतु इंग्रजांचें अनुकरण करण्याकडे त्याचा फार कल असे. यानें स्वत: मिस वाल्टर्स नामक एका युरोपियन स्त्रीचा अंगिकार करून तिला मुकंदरा अवलिया असें नांव दिलें होतें. युरोपियन लोकांचा सत्कार करण्याविषयीं तो फार तत्पर असे. लॉर्ड कांबरमियर यानें त्याच्या आदरातिथ्याची तारीफ करून त्याच्या वैभवाचें वर्णन केलें आहे. नबाबानें त्यास बहुमूल्य रत्नांनीं जडलेली, व मोत्यांच्या आणि पाचेच्या सरांनीं भरलेली, आपली सुशोभित केलेली तसबीर नजर केली होती. यानें तीन लक्ष रुपये ब्रिटिश रेसिडेंटाच्या ताब्यांत ठेवून, त्याचें जें व्याज येईल त्याचा विनियोग अनाथ आंधळ्या-लंगड्यांना दानधर्म करण्यांत यावा, अशी तजवीज केली होती. याशिवाय त्यानें जागजागीं दवाखाने स्थापन करून गरीब लोकांकरितां अन्नछत्रें घातलीं होतीं.

नबाबाचे हे गुण इंग्रज अधिकाऱ्यांनीं लिहून ठेवलेले आहेत. त्यामुळें त्याच्या कारभारांत अतिशय अन्याय होत असेल व प्रजा अतोनात गांजली गेली असेल असें वाटत नाहीं. कारण त्याच्या कारकीर्दींतही अयोध्या प्रांतांत असलेल्या अनेक परस्थ लोकांनीं अयोध्येच्या श्रीमंतीचें व प्रजेच्या भरभराटीचें वर्णन केलें आहे. नासिरुद्दीनचा मुख्य दोष म्हणजे त्याची अत्यंत विषयलोलुपता हा होय ! त्याच्या जनान्यांत अनेक सुंदर ताजमहालसारख्या बेगमा असूनही, त्यानें एक युरोपियन स्त्री ठेविली होती. तिच्या वर्चस्वामुळें अनेक हलकट युरोपियन नासिरुद्दीनच्या दरबारांत घुसले होते. यांमध्यें पांच प्रमुख होते. या आंग्लपंचायतनाच्याच नादानें नबाब वागत असे. या पंचायतनानें आपली तुंबडी भरण्याकरितां प्रजेवर वाटेल तसे अत्याचार केले. त्याचा दोष अर्थातच नबाबाच्या माथीं मारला गेला. यापैकीं डीरसेट नांवाच्या युरोपियन न्हाव्यावर नबाबसाहेब इतके खुष झाले होते कीं, त्यांनीं त्याला **सरफ्राजखां** ही पदवी देऊन दरबारांतील प्रधान मंत्री नेमिलें. ह्या न्हाव्याच्या वर्तनावर वर्तमानपत्रांतून सडकून टीका येत असे. त्या टीकांना उत्तर देण्याकरितां शंभर रुपये पगारावर एक इसम सरफ्राजखांनें नेमिला होता. त्यानें थोड्याच अवधींत नबाबाजवळून चोवीस लक्ष रुपयांची

संपत्ति मिळविली. अशा नीच व हलकट लोकांच्या संगतीमुळें त्याचे उत्तमोत्तम गुण मातीमोल झाले व त्याचें कुटुंबांतील मंडळीशीं देखील वांकडें आलें. त्यानें प्रत्यक्ष आपला पुत्र मुन्नाजान याचा गादीवरील वारसा काढून टाकून त्यास राजवाड्यांतून हाकलून दिलें. परंतु त्याची आजी-गाजीउद्दीन हैदर याची बायको पातशहा बेगम हिनें मुन्नाजानला आपल्या ताब्यांत घेऊन त्याचें संरक्षण केलें. ही राज्यकारभारांतील बंडाळी मोडण्याचा सरळ उपाय म्हणजे डीरसेट प्रभृति इंग्रज बेरडांना लखनौहून हांकून देणें हाच होता. परंतु हा सरळ मार्ग स्वीकारून त्यांना हांकलून देण्याच्या ऐवजीं, नासिरुद्दीन हैदर यास पदच्युत करून दुसऱ्या योग्य माणसास गादीवर बसवावें, व सर्व राज्यव्यवस्था आपल्या ताब्यांत घ्यावी, असा रेसिडेंटनें विचार चालविला. परंतु हा विचार अमलांत येण्यापूर्वीच नासिरुद्दीन हैदर हा विषप्रयोग होऊन एकाएकीं मरण पावला.

नासिरुद्दीनाच्या मृत्युनंतर पातशाहा बेगम हिनें त्याचा औरस मुलगा मुन्नाजान यास गादीवर बसविलें. परंतु मुन्नाजानवर नासिरुद्दीनचें मुळींच प्रेम नव्हतें. दोलारी नामक वारांगनेवर मोहित होऊन तिचा मुलगा खानजहां यास आपल्या पश्चात् गादी देण्याविषयीं नासिरुद्दीननें रेसिडेंटास कळविलें होतें. परंतु रेसिडेंटच्या मनांत तिसराच विचार घोळत होता. आपल्या परवानगीशिवाय नासिरुद्दीनची आई पातशहा बेगम हिनें मुन्नाजानला गादीवर बसविलें हें पाहून रेसिडेंट संतापला, व बेगमेवर त्यानें सैन्य पाठविलें. पातशहा बेगम ही शूर व हिंमतबाज स्त्री असल्यामुळें तिनें रेसिडेंटच्या बेकायदेशीर लुडबुडीला न जुमानतां, त्याच्या सैन्याबरोबर युद्ध करण्याचें ठरविलें. परंतु तिचें सैन्य फारच थोडें व तेंही अव्यवस्थित असल्यामुळें तिचा पराभव झाला, आणि तिला व तिच्या नातवाला कैद करून चुनार येथें पाठविण्यांत आलें. तेथें त्यांना मरेतोंपर्यंत चोवीसशें रुपये दरमहा पेनशन मिळत होती. याप्रमाणें रेसिडेंट कर्नल लोनें नासिरुद्दीनच्या औरस पुत्राला चुनारला कैदेंत पाठवून व त्याच्या आवडत्या पण अनौरस खानजहांलाही धाब्यावर बसवून, नासिरुद्दीनचा चुलता महमद अलीशहा यास ‘आपण सांगाल त्याप्रमाणें नवा तह करण्यास मी तयार आहें’ असें त्याजकडून लिखाण घेऊन गादीवर बसविलें. या तहाप्रमाणें रिसाल्याच्या दोन पलटणी, पायदळाच्या पांच पलटणी आणि गोलंदाजाच्या दोन पलटणी नबाबानें नवीन ठेवून घेऊन त्यांची व्यवस्था ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं करावी व फौजेच्या खर्चाकरितां सालिना सोळा लक्ष रुपये नबाबानें द्यावेत असें ठरलें. याच तहामध्यें आणखी असें एक कलम

घालण्यांत आलें कीं, नबाबानें रेसिडेंटच्या अनुमतीनें राज्यकारभार चालवावा–परंतु राज्यामध्यें अंदाधुंदी, जुलूम किंवा अव्यवस्था झाली तर नबाबाच्या राज्यांत हात घालण्यास व त्याची योग्य ती व्यवस्था करण्यास ब्रिटिश सरकारास हक्क आहे. बोर्ड आफ डायरेक्टर्सनीं हा तह मंजुर केला नाहीं. परंतु ही गोष्ट नबाबाला मात्र कळविण्यांत आली नाहीं. महंमद अलीशहाच्या कारकीर्दीत लखनौची भरभराटच झाली. १८३९ सालीं गव्हर्नर जनरल लॉर्ड ऑकलंड यांनीं अयोध्येच्या राज्यपद्धतींत चांगली सुधारणा केल्याबद्दल महमदअलीशहाचें अभिनंदन केलें, व त्याच्यावर नवीन तहाप्रमाणें बसविलेला जादा लष्करी खर्च कमी करण्याचें अभिवचन दिलें. यावरून नवीन झालेला तह बोर्डाकडून मंजूर झाला असावा असाही संशय येतो. कारण जर हा तह मंजूर झाला नसता तर नबाबावर जादा लष्करी खर्च बसविणें कायदेशीर झालें नसतें. कारण, गवर्नर जनरल लार्ड आकलंड यांच्या पत्रावरून असें दिसतें कीं, महंमदअल्ली १८३७ मध्यें गादीवर बसला तेव्हांपासून या नव्या तहाच्या जोरावर इंग्रजांच्या फौजी खर्चाकरितां सालिना सोळा लाख रुपये निदान १८३९ पर्यंत वसूल केले गेले होते. त्याशिवाय हा खर्च माफ करूं, या औदार्यांत अर्थच उरणार नाहीं. त्या वेळचे बोर्डाचे अध्यक्ष लॉर्ड ब्राउटन यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे, " या तहाचा फक्त एक भाग, म्हणजे लष्करी खर्चाबद्दलचा तेवढा नामंजूर करण्यांत आला होता. परंतु बाकीचा तह मंजूर करण्यांत आला होता अशी माझी पूर्ण खात्री आहे." हा तह खरोखरच मंजूर झाला नसला तर नबाबावर फौजेचा जादा खर्च लादण्याला हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांचा विलक्षण द्रव्यलोभच कारणीभूत झाला असें म्हणावें लागतें. महंमदअल्लीशहा हा शहाणा, मितव्ययी, सभ्य आणि कर्तव्यतत्पर असल्यामुळें त्याच्या कारकीर्दीत प्रजेला तर सुख झालेंच. शिवाय लखनौ येथें कांहीं चांगल्या इमारती बांधण्यांत आल्या. नासिरुद्दीनच्या दरबारांतील बदमाष खुशमस्कऱ्यांना रजा मिळाली, आणि प्रामाणिक व कर्तबगार दिवाणांच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें त्यानें सोंपविलीं. परंतु १८४२ सालीं तो मृत्यु पावला. तो पांचच वर्षें नबाब असल्यामुळें त्याच्या कर्तबगारीचा व सद्गुणांचा लाभ प्रजेला फारसा मिळाला नाहीं. त्याच्या मृत्यूनंतर अयोध्येच्या गादीवर त्याचा मुलगा अमजत अल्लीशहा व त्याच्यानंतर महमद अल्लीशहाचा नातू वाजीद अल्लीशहा हे गादीवर बसले. हे दोघेही स्वभावानें दुष्ट नसले तरी अतिशय विषयलोलुप, मूर्ख, आचरट व आळशी होते. त्यामुळें हलकट लोकांचें अतोनात फावलें, आणि प्रजेवर जुलूम होऊं लागला. विशेषतः अजमद

अल्लीशहा १८४७ साली वारल्यानंतर, त्याचा तरुण पुत्र वाजीद अल्लीशहा याच्या कारकीर्दीत राज्यकारभाराची घडी अतोनात विसकटली. वाजीदअल्लीशहा गादीवर बसला तेव्हां तो २५ वर्षांचा होता. तरुण वयांतच अनपेक्षित अधिकारप्राप्ती, दुर्व्यसनी व हलकट लोकांची संगति, आणि स्वतःची शृंगार-लोलुपता, या तीन गोष्टींच्या मिलाफामुळें वाजीदअल्लीशहाच्या कारकीर्दीची कोणालाही कल्पना करितां येईल. अल्लीनकीखान नांवाच्या एका नीच मनुष्यास त्यानें लखनौचा दिवाण नेमलें. स्वतः नबाबाला सुंदर व मनमोहक स्त्रिया, गायनवादनपटु व विनोदकुशल गवई, आणि हरहुन्नरी व हजरजबाबी खुष-मस्करे यांच्याशिवाय दुसरें कांहींच प्रिय वाटेनासें झालें. नाच, रंग, तमाशे यांत तो गढून गेला. भर दरबारांतच काय परंतु प्रसंगीं राजधानीच्या रस्त्यांवरूनही अचकट विचकट लावण्या म्हणत व ढोल तंबोरे वाजवणाऱ्या साजिंद्या व वेश्यांसह नबाबाची स्वारी मिरवीत जाऊं लागली. १८४९ सालीं कर्नल स्लीमन नांवाचा एक चांगला अनुभवी रेसिडेंट तेथें गेला. त्यानें लखनौच्या शहाण्या व सभ्य लोकांचें कौन्सिल नेमून राज्यकारभार चालविण्याचा प्रयत्न केला. परंतु नबाबाच्या मूर्खपणामुळें तो फलद्रूप होईना. त्यामुळें अखेर कर्नल स्लीमननें, कंपनीनें लखनौचा कारभार आपल्या हातीं घ्यावा, व राज्याचा नीट बंदोबस्त करावा असें गव्हर्नर जनरलला सुचविलें. नबाबाला निर्माल्यवत लेखून कारभार चालविल्यानें प्रजेलाही सुख लागेल व नबाबही कदाचित् अधिकारभ्रष्टतेमुळें शुद्धीवर येईल असा हिताचा सल्ला स्लीमननें दिला. पण सर्व राज्यांचा अपहार करणाऱ्या लार्ड डलहौसीला असला पुळचट सल्ला मान्य होणें शक्य नव्हतें. त्यानें लखनौचें राज्यच खालसा करण्याचा विचार योजला. स्लीमनला ही गोष्ट आवडली नाहीं. त्यानें डलहौसीला १८५२ मध्यें साफ लिहिलें कीं, “औध राज्य, किंवा राज्याचा कांहीं भाग खालसा केला तरी आपली चोहोंकडे बदनामी होईल. औधसारखे दहा प्रांत मिळत असले तरी त्यांच्या मोबदल्यांत आपला नांवलौकिक गमावणें इष्ट होणार नाहीं.” परंतु डलहौसीनें तिकडे लक्षच पुरविलें नाहीं. तेव्हां त्यानें आपल्या मित्राला एका खासगी पत्रांत लिहिलें कीं, “लार्ड डलहौसीनें माझें म्हणणें मान्य केलें नाहीं तर मी राजीनामा देऊन चालता होईन व हें बेकायदेशीर कृत्य करण्याचें नाकारीन. प्रजेच्या कल्याणाकरितां व राज्याच्या व्यवस्थेकरितां राज्यकारभार नबाबाकडून काढून कंपनीला तो आपल्या हातीं घेणें जरूर आहे, व तसें केलें तर आपल्याला कोणी दोषही

देणार नाहीं. परंतु औधचें राज्य गडप करणें ही बेइमानी ठरेल." स्लीमनचें भविष्य अखेरीस खरें ठरलें. साताऱ्याचीच पुनरावृत्ति येथेंही झाली. स्लीमनला लखनौ सोडून लवकरच जावें लागलें, आणि डलहौसीच्या इच्छेला मान तुकविणारा जनरल आउट्रम लखनौ येथें नवीन रेसिडंट नेमण्यांत आला. नव्हेंबर १८५४ मध्यें आउट्रमची नेमणूक झाली, व १८५५ सालीं १८ जूनला लार्ड डलहौसीनें औध खालसा करण्याबद्दलचा खलिता लिहिला. विलायतेहून बोर्डाची डलहौसीच्या योजनेला संमती मिळाली; मग औधचें राज्य खालसा करण्यास काय उशीर लागणार ? आउट्रम फौज घेऊन लखनौस दाखल झाला, आणि डलहौसीची आज्ञा नबाबाला निवेदन केली. नबाबाच्या आईनें आपल्या पुत्राचे अपराध एक वेळ माफ करण्याबद्दल रेसिडेंटाची विनवणी केली. परंतु ती वेळ मागेंच निघून गेली असें उद्दामपणाचें उत्तर तिला मिळालें. नबाबानें आपल्या डोक्यावरील पगडी उतरून ती रेसिडेंटच्या हातीं दिली, आणि औध सरकारच्या, कंपनीशीं अनेक पिढ्या चालत असलेल्या पूर्वापार प्रेमसंबंधाकडे लक्ष पुरविण्यास विनंति केली. परंतु त्या नम्र विनंतीचा कांहींही उपयोग न होतां ४ फेब्रुवारी १८५६ रोजीं लखनौचें प्राचीन व अत्यंत संपन्न राज्य कंपनीच्या घशांत पडलें. तीस हजार चौरस मैलाचा प्रदेश, अर्धा कोटी लोकसंख्या व जवळ जवळ दीड कोटीच्या उत्पन्नाचा अचानक लाभ डलहौसीच्या या पराक्रमानें कंपनीच्या पदरांत पडला ! नबाबाची खासगी संपत्ती, जडजवाहीर, कपडेलत्ते, गाड्याघोडे, ग्रंथालयांतील मौल्यवान ग्रंथ, फार काय पण बेगमांचें स्त्रीधन देखील जप्त करण्यांत आलें. शंभर वर्षांच्या मैत्रीचा बदला याप्रमाणें नबाबाला चुकविण्यांत आला !

नबाब वाजीदअली व त्याचा बाप अजमदअली हे दुर्व्यसनी व भयंकर रंगेल होते हें खरें. राज्यकारभार करण्याची अक्कल त्यांच्या ठिकाणीं नव्हती, व त्यांच्याभोंवतीं व्यसनी आणि स्वार्थसाधु, व दुष्ट अशा लोकांचा सदोदित गराडा पडलेला असे हें अगदीं खरें आहे. त्यांच्या कामलोलुपतेमुळें संस्थानांत अनाचार घडत होते हें देखील तितकेंच खरें आहे. पण त्यामुळें त्यचे राज्य कां खालसा केलें जावें ? कंपनीनें नबाबाला बाजूस सारून राज्यकारभार आपल्या हातीं घेणें रास्त झालें असतें. फार तर नबाबाला पदच्युत करून त्याच्या वंशांतील दुसरा एखादा लहानसा मुलगा गादीवर बसवून, कंपनीनें त्याच्या पालकत्वाचा भार आपल्या शिरावर घेऊन राज्यकारभार

करावयाचा होता. कांहीं संस्थानांत कंपनीनें मागें अशा गोष्टी केलेल्या होत्या. हें सार्वभौम सरकारचें कर्तव्यच आहे आणि कर्तव्यपालनाबद्दल कंपनीला कोणींही दोष दिला नसता. परंतु राज्याचा अपहार करणें ही शुद्ध दरोडेगिरी झाली. शिवाय औधचे नवाब कंपनीशीं अत्यंत राजनिष्ठेनें वागले. नवाबांच्या मदतीनेंच कंपनीला उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांना पायबंद घालतां आला. अफगाणिस्थान, ब्रम्हदेश व नेपाळ यांच्याशीं कंपनीच्या ज्या लढाया झाल्या, त्यांत नबाबांनीं कंपनीला द्रव्यसाहाय्य तर केलेंच, परंतु अनेक हत्ती व फौजफांटा देऊन कंपनीची वेळोवेळच्या युद्धप्रसंगांत आब राखली. परंतु राज्यकारभारांत अंदाधुंदी माजली एवढया सबबीवर त्यांचें सर्व राज्य खालसा करण्यांत आलें! कंपनीला आपल्या सोयीकरतां वाटेल त्या औरस पुत्राचे हक्क बुडवून इतराला गादीवर बसवून त्याच्याशीं फायदेशीर तह करतां येई. परंतु या वेळीं मात्र अंतर्गत कारभारांत हात घालण्याचें, व राज्यकारभाराची नबाबातर्फे जबाबदारी घेण्याचें कंपनीला व लार्ड डलहौसीला जड वाटूं लागलें. म्हणून नबाबाचें सर्व राज्यच खालसा करण्यांत आलें!

आणि कारण काय तर अंदाधुंदीचा राज्यकारभार! औधमध्यें १८५६ सालीं बेबंदशाही चालू होती तर खास इंग्रजांच्या अमलाखालील प्रांतांत तरी अशी कोणती सुंदर व न्यायबद्ध राज्यघटना होती कीं, त्यांनीं नबाबाचें राज्य खालसा करण्यास प्रवृत्त व्हावें? इंग्रजी अमलांतील प्रांतांत देखील कारभार यथातथाच स्वरूपाचा त्यावेळीं चालत होता. हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्ययंत्र त्यावेळीं आजच्याप्रमाणें नियमबद्ध चालू नव्हतें. त्यांच्या खास अमलांतही अंदाधुंदी चालूच होती. त्या वेळीं बंगाल प्रांत तर खास इंग्रजांच्या ताब्यांत होता. परंतु डिसेंबर १८५६ मध्यें मिशनरी लोकांनीं बंगालच्या राज्यकारभारासंबंधी जें प्रार्थनापत्रक सरकारकडे पाठविलें, त्याच्याशीं व डलहौसीनें आपल्या खलित्यांत वर्णिलेल्या औधमधील बेबंदशाहीशीं तुलना केली असतां फार मौज दृष्टीस पडते.

मग औधनें काय पाप केलें? त्या वेळीं सर्व हिंदुस्थानभरच राज्याचा बंदोबस्त ढिल्या स्वरूपाचा होता. औधचें राज्य या सामान्य नियमाला अपवाद नव्हतें! तेथेंही तसेंच चालू होतें. नबाबांच्या विषयलोलुपतेमुळें अनाचार माजून व्यक्तिशः कोणावर प्रसंग गुदरत असेल, व त्याचें आणि त्याच्या कुटुंबाच्या अब्रूचें खोबरें होत असेल. त्याचप्रमाणें नबाबाच्या लाडक्या कारभाऱ्यातर्फे व्यक्तिशः कांहीं

| डलहौसीनें केलेलें औधचें १८५६ सालचें वर्णन. | मिशनरी लोकांनीं केलेलें १८५६ मधील बंगालचें वर्णन. |
|---|---|
| १. डाकू लोकांच्या त्रासामुळें प्रजेला शांति मिळत नाहीं. | १. दरोडेखोरांचा बंदोबस्त करण्याची पोलीसांत ताकद नाहीं. |
| २. लोकांना न्याय व कायदा यांची ओळख नाहीं. | २. दुर्बलावर सदोदित अत्याचार होत असतो. द्रव्य हीच प्रमुख शक्ति होऊन बसली आहे. |
| ३. खून, डाके ही तर रोजची गोष्ट झाली आहे. | ३. भयंकर व मन व्यग्र करणारे डाके व तंटे ही मामूली गोष्ट आहे. |
| ४. जीव व द्रव्य यांचा एक घंट्याचा देखील भरंवसा देतां येत नाहीं. | ४. बंगालच्या बहुतेक भागांत वित्त व प्राण यांना धोका वाटतो. |

इसमांवर द्रव्यासाठीं किंवा सौंदर्यप्राप्तीसाठीं जुलूम जबरदस्तीही होत असेल यांत संशय नाहीं. परंतु त्यामुळें सर्व राज्य खालसा करण्याइतकी सर्वत्र अंदाधुंदी माजली होती असें मात्र म्हणतां येत नाहीं. संस्थानिकांचे इष्काचे अत्याचार फक्त औधमध्येंच, व तेही १८४२ ते १८५६ या दरम्यान होत होते, इतरत्र कोठेंही व केव्हांही होत नव्हते, असें म्हणणें खरें नाहीं, व प्रामाणिकपणाचें तर नाहींच नाहीं!

त्या वेळच्या औधमधील राज्यकारभाराची एकंदर कल्पना खालील आंकड्यावरून करतां येते. क्याप्टन बानबरीनें लिहिलें आहे कीं, १८४८ ते १८५४ च्या दरम्यान सहा वर्षांमध्यें औधमध्यें लहान गुन्हे १६०० व मोठे २०० घडले. परंतु औधच्या एक पंचमांश असलेल्या अलाहाबाद व एक षष्ठांश असलेल्या बनारस जिल्ह्यांत, सन १८५५ सालीं १४५२ व ८००३ लहानमोठे गुन्हे घडून आले. बंगालची वस्ती औधच्या आठपट होती, परंतु गुन्ह्यांची संख्या मात्र जवळजवळ पसतीस पट होती. बंगालप्रांतांत १८५० ते १८५३ च्या दरम्यान ५५२५१, ९४९६३, ९२११५ व ९२६२९ याप्रमाणें गुन्हेगारांचे आंकडे होते. जनरल आउट्रॅमनें औधच्या सरहद्दीवरील अनेक ब्रिटिश जिल्हा माजिस्ट्रेटांना पत्रें लिहून विचारलें कीं, औधच्या सरहद्दीवर गुन्ह्यांचें प्रमाण वाढलें आहे काय व वाढलें असल्यास गुन्हेगारांना औधच्या राज्यांत आश्रय मिळतो कीं काय? या प्रश्नांचीं म्याजिस्ट्रेट लोकांकडून आलेलीं उत्तरें वाचण्यालायक

आहेत. जौनपूरचे म्याजिस्ट्रेट जबाब देतात—‘ मागल्या बऱ्याच वर्षांत दरवडे कमी पडले. नबाबाचे सुलतानपूर येथील पोलीस अधिकारी हुशारीनें काम करीत असल्यामुळें गुन्हेगारांना उत्तेजन मुळींच मिळत नाहीं.’ गोरखपूर येथील म्याजिस्ट्रेटनें लिहिलें कीं, ‘ गुन्ह्यांची संख्या दिवसेंदिवस कमी होत आहे.’ फरुखाबाद येथील म्याजिस्ट्रेट लिहितात कीं, ‘ गुन्हेगार औधमध्यें पळून जातात ही गोष्ट खरी, व तेथें त्यांना चोरीचा माल लपवितां येतो हेंही तितकेंच खरें, परंतु औधचे पोलीस कप्तान अपराध्यांना पकडून शिक्षा देण्यांत अतिशय दक्ष आहेत.’ कानपूरच्या म्याजिस्ट्रेटनें लिहिलें कीं, ‘ या जिल्ह्यांत चोरी केलेले लोक औध पोलीसनें पकडले व आमच्या स्वाधीन केले. गुन्ह्यांची संख्या कमजास्त न होतां तितकीच्या तितकीच आहे. १८५४ सालीं झालेले गुन्हे करणारे लोक मात्र ग्वालेरच्या बाजूनें आले होते.’

परंतु औधचें राज्य अंधाधुंदीबद्दल खालसा करण्यांत आलें. इंग्रजी मुलखाची व औधची साधारण स्थिति त्या वेळीं सारखीच होती. कोणीच कोणाला हसण्याचें कारण नव्हतें. इंग्रजी मुलखापेक्षां, नबाबाच्या इष्काचे अत्याचार व अनाचार व त्याच्या भोंतालच्या बदमाषांच्या लीला औधमध्यें घडत होत्या हेंच विशेष होतें. परंतु हे प्रकार साहजिकच वैयक्तिक स्वरूपाचे असत. यामुळें कांहीं व्यक्तींना त्रास व जुलूम सहन करावा लागे, परंतु सर्व राज्यभर बेबंदशाही माजली होती हें खोटें. औधच्या अनाचारांना राज्य खालसा न करितांही इंग्रजांना थांबवितां आलें असतें. परंतु औधचें श्रीमंत राज्य खालसा करण्याचा आपमतलबी मार्ग इंग्रजांनीं पसंत केला. कारण औधच्या श्रीमंत प्रांतावर त्यांचा कैक दिवसांपासून डोळा होता. औधच्या बाबतींत अन्याय झाला हें स्लीमनचें एकट्याचेंच मत नव्हतें. औधच्या गिळंकृतीला Dacoity in Excelsis हें नांव एका प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकारानें देऊन आपला तद्विषयक ‘अप्रतिम दरोडेगिरी’ हा ग्रंथ प्रसिद्ध केला. अयोध्येच्या नबाबाला त्याचें राज्य परत मिळण्यासंबंधी व झालेला अन्याय दूर करण्याकरितां मेजर बर्ड, मेंझेस, माल्कम वगैरे सदसद्विवेकबुद्धी न विकलेल्या अनेक इंग्रजांनीं खटपट केली, परंतु विलायतेंतही त्या खटपटीला इतरांप्रमाणेंच यश आलें नाहीं.

वार्षिक बारा लक्ष रुपये पेन्शन घेऊन औधचें राज्य कंपनीच्या स्वाधीन केल्याबद्दलच्या तहनाम्यावर नबाबानें सही करण्याचें नाकारलें. असा फायदेशीर तह नाकारणाऱ्या मूर्ख नबाबाला ७ फेब्रुवारी १८५६ रोजीं इंग्रजांनीं

अर्थातच पदच्युत केलें, व त्याची उचलबांगडी करून त्यास कलकत्ता येथील फोर्ट वुइल्यम किल्ल्यांत कैदेंत ठेवण्यांत आलें. कंपनी सरकारचा उदार तहनामा नाकबूल करणाऱ्या नबाबाला याहून अधिक काय सवलत द्यावयाची ? त्याची कलकत्त्यास रवानगी झाली तेव्हां सर्व प्रजेला अतोनात दुःख झालें, व नबाबाच्या शेवटच्या दर्शनासाठीं लाखों लोक गोळा होऊन त्यांनीं साश्रु नयनांनीं 'बादशाह सलामत,' 'बादशाहात फिर बने रहे,' 'लंडनसे हुकूम आ जावे,' असे प्रेमपूर्वक आशीर्वाद देऊन नबाबाला निरोप दिला. हें वर्णन इंग्रजच लिहितात, आणि नबाबाचें राज्य अत्यंत जुलमी होतें या बातमीवर आम्ही विश्वास ठेवावा असें बजावतात ! जुलमी राजा गेला, तर बरी पीडा टळली म्हणून प्रजेला आनंद व्हावयाचा, दुःख कसें होईल ?

औधची बेबंदशाही नबाबी टळून कंपनीची सुखावह कारकीर्द सुरू झाली. परंतु एक वर्षाच्या आंतच त्या कारकीर्दीला लोक इतके कंटाळले कीं, इंग्रजांचें राज्य कसें टळेल असें लोकांना झालें. पदच्युत नबाब व राजवाड्यांतील बेगमा यांच्याविषयीं लोकांची विलक्षण सहानुभूती होती, असें इंग्रज अधिकाऱ्यांना व इतिहासलेखकांना कबूल करणें भाग पडलें. तरी पण नबाबाच्या राज्यांत बेबंदशाही माजल्यामुळेंच बिचाऱ्या डलहौसीला अयोध्या प्रांत नाइलाजास्तव खालसा करावा लागला, असें सर्व जण आम्हांला बजावतात. डलहौसीचा हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांवर हा शेवटचा वार होय. हिंदुस्थानांत आल्याबरोबर त्यानें पहिला वार सातारा प्रांतावर केला व जाण्यापूर्वी शेवटचा वार त्यानें अयोध्येवर करून आपली हौस पुरी करून घेतली. या दरम्यान त्यानें केलेले अनेक राजनीति-कौटिल्याचे पराक्रम या ग्रथांत यथामती वर्णन केले आहेतच. औधचें राज्य खालसा केल्यानंतर थोड्याच दिवसांनीं डलहौसीनें हिंदुस्थानला रामराम ठोकला, व इंग्रजी इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेवलें. औधचें राज्य खालसा केल्याबद्दल डलहौसीनें जीं कारणें दिलीं आहेत, त्यांच्यावर सर वुइल्यम नेपीयरनें फार कुचेष्टेची परंतु अर्थपूर्ण टीका केली आहे. " जेव्हां डलहौसीचा बाप हिंदुस्थानांत सेनापती होता, तेव्हां तो औधच्या नबाबाला एकदां भेटावयास गेला. त्या प्रसंगीं त्यानें आपल्या पत्नीलाही बरोबर दरबारांत नेलें व इंग्रजी एटिकेटप्रमाणें तिची नबाबाशीं ओळख करून दिली. नबाबाला हा युरोपीयन व्यवहार समजेना. त्याला वाटलें कीं सेनापतीसाहेब आपली बेगम मला विकूं पहात आहेत. तेव्हां एका हुजऱ्याकडे वळून नबाब म्हणाले, 'अरे हिला बाहेर

घेऊन जा, पुरे हिचें प्रदर्शन !’ नबाबाला इंग्रजी रीतिरिवाज मुळींच ठाऊक नसल्यामुळें व एवढया बड्या लार्डाची बायको पडदा न घेतां पुरुषांत भर दरबारांत आल्यामुळें त्याची अशी गैरसमजूत झाली, आणि इंग्रज पैशाकरितां वाटेल ते करतील असा त्यांचा त्या वेळीं हिंदुस्थानभर लौकिक पसरला असल्यामुळें तो असें बोलला.” सर चार्लस नेपीयरनें ८ आक्टोबर १८५० रोजीं लिहिलेल्या पत्रांतील या गमतीदार प्रकरणावर टीका करून त्याचा भाऊ म्हणतो कीं, “ औध खालसा करण्याच्या अनेकविध कारणांत हें एक कारण घुसडून दिलें असतें, तर लोकांना तें बरेंच पटलें असतें; कारण खलित्यांत दिलेल्या कारणांपैकीं एकही इतकें जोरदार व अन्वर्थक नाहीं. ”

१८४५ सालीं कलकत्ता रिव्हूमध्यें सर हेनरी लॉरेन्सच्या लेखांतील खालील अवतरण या प्रकरणावर उत्तम प्रकाश पाडील: “ We are among those unfashionable people who consider that politics and morals can never be safely separated; that an honest private individual must necessarily be an honest official, and *vice versa:* but we confess that we have been staggered by a study of Oudh transactions. Most assuredly Warren Hastings, Lord Teignmouth, Lord Wellesley, Lord Hastings and Lord Auckland would never have acted in private life, as they did in the capacity of Governors towards prostrate Oudh....

Oudh affords but a discreditable chapter in our Indian annals, and furnishes a fearful warning of the lengths to which a statesman may be carried, when he once substitutes expediency and his own view of public advantage for the simple rule of right and wrong.” राजकारण व नीति यांची विभागणी करणें रास्त नव्हे, व एखादा खाजगी नीतिमान गृहस्थ प्रामाणिक अधिकारी खास होईल, व उत्तम प्रामाणिक अधिकारी खासगी बाबतींतही तसाच आढळेल, असे लोक समजतात. परंतु औध प्रकरणामुळें आम्हाला जबरदस्त धक्का बसला, हें आम्ही कबूल करतों. गव्हर्नर या नात्यानें वॉरन हेस्टिंग्ज, लार्ड टेनमाउथ, लार्ड वेलीसली, लार्ड

हेस्टिंग्ज व लार्ड आकलंड हे शरणागत औधशीं ज्याप्रमाणें वागले, तसें खासगी वर्तन त्यांनीं खास केलें नसतें.....हिंदी राजकारणांत औधचा इतिहास आम्हांला लांछनास्पद आहे, आणि न्यायान्यायाच्या जागीं सोय व लोककल्याणाची खासगी दृष्टी एखादा मुत्सद्दी राजकारणांत लावतो, तेव्हां तो किती भयंकर अन्याय करतो याचें हें एक उत्तम उदाहरण आहे. सर्व प्रमुख इंग्रज गव्हर्नर जनरलवर, एका प्रमुख इंग्रजी मुत्सद्यानें केलेली औध टीका काय सांगते ?

औधचें राज्य खालसा व्हावें, ही गोष्ट तेथील लोकांना इतकी नापसंत होती कीं, भावी संकटाची ती बातमी पसरतांच, " १८ आगष्ट १८५५ रोजीं तेथील प्रमुख लोकांची एक खासगी सभा भरून, सालीना पंधरा लक्ष पौंड इंग्रज अधिकाऱ्यांना लुचपत देण्यांत व इतर चळवळ करण्यांत खर्च करावे, व सर्वांनी या फंडाला हातभार लावून औधचें राज्य वांचवावें असा ठराव सभेंत पास झाला. सभेंत कासीम नांवाचा पुढारी म्हणाला, "इंग्रजांना सोन्याची व आम्हाला स्वातंत्र्याची चटक आहे. तेव्हां सरकारी खजिन्यांत आपण आपल्या खासगीची भर घालून इंग्रजांना सोनें देऊं, व आपलें स्वातंत्र्य रक्षण करूं." [ Ludlow's British India, Vol. II, page 208. ]

लोकांची ही मनोभूमिका असल्यामुळें ५६ सालीं औध खालसा होतांच, सर्वत्र अग्नि धुमसूं लागून लोकांत अशांतता पसरली, व गुप्त कट सुरू झाले.

---

## प्रकरण ९ वें.

# देशी फौजेचा इतिहास.

इंग्रज लोक एखादे वेळीं अशी घमेंड मारतात कीं हिंदुस्थान देश आम्ही तरवारीनें जिंकला, व तरवारीनेंच तो राखूं. या घमेंडींत फारसें सत्य नाहीं. हिंदुस्थान देशाचा इतिहास वरवर चाळला तरीदेखील असें आढळून येईल कीं, मुख्यतः भेदनीतीच्या उपाययोजनेनें इंग्रजांनीं या देशावर आपलें स्वामित्व बसविलें. हिंदु-मुसलमानांतील भांडणाचा, निरनिराळया सरदारांच्या स्वार्थी व स्वाभिमानशून्य महत्वाकांक्षेचा व देशाभिमानशून्यतेचा, युक्तीनें फायदा घेऊन इंग्रजांनीं या देशावर आपली सत्ता स्थापन केली. प्रसंगविशेषीं इंग्रजांनीं हत्यारांचा उपयोग केला, हें खरें आहे. परंतु त्याही प्रसंगीं हिंदुस्थानांतील देशी फौजच इंग्रजांच्या उपयोगीं

पडली. हिंदुस्थानच्या लोकांनाच आपल्या पदरीं शिपाई म्हणून बाळगून व त्यांना लष्करी हडेलहप्पीचें शिक्षण देऊन, त्यांच्याकडूनच त्यांच्या जातभाईंचा इंग्रजांनीं पराभव करविला. या हिंदी शिपायांना पदरीं बाळगूनच इंग्रज हिंदुस्थानचे स्वामी बनले. इंग्रजांनीं या हिंदी शिपायांकडूनच हिंदुस्थान देश जिंकवून घेतला. विलायतेंतून येणारी इंग्रजांची संख्या अत्यंत अल्प होती. परंतु त्यांनीं हिंदी शिपायांचीं पलटणें उभारून, व त्यांच्याच पराक्रमावर भिस्त ठेऊन हळूहळू या देशाचें स्वामित्व कमावलें. ही विद्या मूळची इंग्रज लोकांची नव्हती. ही त्यांनीं फ्रेंच लोकांकडून उचलली, व आपल्या राष्ट्रीय स्वभावाप्रमाणें पूर्णावस्थेस नेली. कोणतीही गोष्ट एकदां हातांत घेतली म्हणजे तिचा नेटानें पिच्छा पुरवून, ती तडीस जाईपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं हा इंग्रजी राष्ट्राचा स्वाभाविक गुण आहे. व या श्रेष्ठ गुणांमुळेंच जगभर आज त्यांचें साम्राज्य पसरलें आहे !

हिंदी लोकांना स्वदेशाभिमान फारसा नाहीं, आणि एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेची तर त्यांना मुळींच ओळख नाहीं; ही गोष्ट प्रथम ड्युप्लेनें ओळखली. हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे, ही कल्पनाच तेव्हां अस्तित्वांत नव्हती. हिंदी लोकांचा स्वाभिमान आपापल्या जातीपुरता, व लहानशा प्रांतीय टापूपुरताच मर्यादित असे. ड्युप्लेनें हिंदी लोक आपल्या लष्करांत भरती करून, त्यांना आपल्या फ्रेंच अधिकाऱ्यांकडून उत्तम प्रकारचें लष्करी शिक्षण दिलें, आणि याप्रमाणें तयार झालेल्या हिंदी शिपायांचीं स्वतंत्र पलटणें उभारलीं. कर्नाटक प्रांतांत आपापलें वर्चस्व बसविण्याकरितां जेव्हां इंग्रज व फ्रेंच लोकांत लढाया सुरू झाल्या, तेव्हां या देशी फौजेच्या जोरावर ड्युप्लेनें इंग्रजांचा पराभव करून, २१ सप्टेंबर १७४६ रोजीं मद्रास शहर काबीज केलें. नबाबाला असें वाटलें कीं ड्युप्ले इंग्रजांपासून घेतलेलें हें शहर आपले हवालीं करील. परंतु ड्युप्लेचा मनोदय तसा दिसेना. त्यामुळें नबाबानें आपला मुलगा माफुसखां याला दहा हजार फौजेनिशीं ड्युप्लेवर चालून जाऊन, त्याचा पराभव करण्यास आज्ञा केली. ड्युप्लेजवळ त्या वेळीं २३० फ्रेंच लोक व त्यांच्या हाताखालीं शिकून तयार झालेले ७०० देशी शिपाई होते. या लहानशा फौजेचें आधिपत्य प्यारेडिस नांवाच्या एका फ्रेंच इसमाकडे होतें. तो आपल्या लहानशा फौजेनिशीं नबाबाच्या फौजेवर धडाक्यानें चालून गेला. या कवायती फौजेच्या चढाईच्या हल्ल्यामुळें नबाबाच्या सैन्याची फळी फुटली, व नबाबी फौजेची दाणादाण झाली. अशा स्थितींत फ्रेंच लोकांनीं त्या सैन्याचा तांतडीनें पाठलाग करून त्याचा पुरा फडशा पाडला. नोव्हेंबर १७४६ मध्यें ही प्रसिद्ध

सेंट थोम येथील लढाई झाली. या लढाईचे परिणाम फार दूरवर पोंचले. कारण हिंदी लोकांची आपल्या फौजेंत भरती करून त्यांना युरोपियन अधिकाऱ्यांकडून योग्य तऱ्हेनें लष्करी शिक्षण दिलें, म्हणजे तयार होणारी देशी कवायती फौज हिंदुस्थानांतील कोणत्याही राजाच्या फौजेला भारी होते, असा सिद्धांत या लढाईनें प्रस्थापित केला. ड्यूप्लेनें देशी शिपाई तयार करण्याचा जो प्रयोग करून पाहिला तो पूर्णपणें यशस्वी झाला.

ड्युप्लेची युक्ति इंग्रजांनीं ताबडतोब उचलली. इंग्रजांनींही देशी शिपाई पदरीं ठेऊन त्यांना लष्करी शिक्षण देण्याचा उपक्रम सुरू केला. प्रथम ड्युप्लेनें व नंतर क्लाईव्हनें हा प्रयोग दक्षिण हिंदुस्थानांत सुरू केला. या दोन्ही युरोपियन राष्ट्रांनीं प्रथम मद्रास इलाख्यांत देशी पलटणी उभारल्या. मद्रास इलाख्यांतील हिंदी लोक याप्रमाणें युरोपियनांचे अंकित होऊन, आपलाच देश जिंकण्यास व आपल्याच राजेरजवाड्यांचा पराभव करण्यास व पर्यायानें सर्व देश युरोपीयनांच्या ताब्यांत देण्यास सिद्ध झाले. ड्युप्लेचा हा अचुक गुणकारी उपाय, क्लाइव्हनें मोठ्या प्रमाणावर अमलांत आणला, आणि फ्रेंच लोकांनीं शोधून काढलेल्या युक्तीनेंच त्यांचा पराभव केला.

बंगाल प्रांतांत जेव्हां नबाव सुराजउद्दवल्यानें इंग्रजांशीं लढाई सुरू केली, व कलकत्ता शहर इंग्रजांच्या हातून हिसकून घेतलें, त्या वेळीं क्लाइव्हला मद्रासेहून उत्तर हिंदुस्थानांत जावें लागलें. त्या वेळीं क्लाईव्हबरोबर फक्त ९०० इंग्रज शिपाई, आणि इंग्रजी पद्धतीचें लष्करी शिक्षण घेतलेले १२०० मद्राशी शिपाई होते. या देशी शिपायांवरील अधिकारी अर्थातच इंग्रज लोक होते. या शिपायांच्या साह्यानेंच क्लाईव्हनें नबाबाचा १७५७ सालीं प्लासी येथील प्रसिद्ध लढाईंत पराभव केला. या शिपायांच्या साह्यानेंच कंपनीला परत आपलें कलकत्ता शहरच नव्हे, तर त्याच्याबरोबरच थोडासा बंगालचा प्रांतही काबीज करतां आला. मद्रास इलाख्यांतील प्रयोग यानंतर बंगाल येथेंही सुरू करण्यांत आला. कलकत्ता येथेंही उत्तर हिंदुस्थानांतील लोकांतून देशी शिपायांचीं पलटणें उभारण्यांत आलीं. बंगाल प्रांतांतलें जें इंग्रजी कंपनीचें देशी सैन्य होतें त्याचें नांव Bengal army असं असलें, तरी त्यांत बिनडोक्याच्या व धर्मनिष्ठ कडव्या पुरभय्यांचाच मुख्यतः भरणा असे. मद्राशी व पुरभय्ये हेच कंपनीचे देशी शिपाई! यांच्या सहाय्यानेंच कंपनीनें हिंदुस्तान जिंकलें. कंपनीचें राज्य हिंदुस्थानांत पक्कें झाल्यानंतर मराठे, शीख व गुरखे यांचा इंग्रजी फौजेंत प्रवेश

झाला. १८१८ पर्यंत मराठ्यांना, व १८४९ पर्यंत शीखांना व गुरख्यांना आपापल्या रियासतींतील फौजेंतच कर्तबगारीला भरपूर वाव असल्यामुळें कंपनीच्या फौजेंत ते शिरले नाहींत, व त्यामुळें हिंदुस्तान हिंदी लोकांकडून जिंकून घेण्याचा अपूर्व पराक्रम त्यांच्या हातून घडला नाहीं ! उत्तर हिंदुस्थानांतील विशेषतः बनारस, अलाहाबाद, लखनौ, अयोध्या या टापूंतील पुरभय्ये आणि मुसलमान इंग्रजी सैन्यांत शिरले, व या नवीन तयार केलेल्या सैन्याच्या जोरावरच इंग्रजांचें उत्तर हिंदुस्थानांतील चढाईचें धोरण सुरू झालें. त्यामुळें हिंदुस्थान देश आम्हीं तरवारीचे जोरावर जिंकिला अशी बढाई मारणाऱ्या इंग्रजांना, असें बजवावें लागतें, कीं ज्या तरवारीच्या जोरावर तुम्हीं हिंदुस्थान देश जिंकला असें म्हणतां, त्या मुख्यतः हिंदी लोकांच्या होत्या; आणि म्हणूनच हिंदी लोकांना व शिपायांना नाखूष करून, तुमचें राज्य येथें केवळ तुमच्या हातांतील तरवारींच्या जोरावर फारसें टिकावयाचेंही नाहीं !

मद्रास इलाख्यांतील काय किंवा उत्तर हिंदुस्थानांतील काय, हिंदुस्थानांतील हिंदु, मुसलमान, अशा सर्वच हिंदी लोकांना राष्ट्राभिमान मुळींच नव्हता. हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे ही भावनाच त्या वेळीं फारशी उत्पन्न झाली नव्हती. हिंदी लोकांना धर्माभिमान होता, व त्याच्या खालोखाल प्रांताभिमानही होता. परंतु ही प्रांताभिमानाची कल्पना इतक्या आकुंचित स्वरूपाची होती कीं, बंगाल मधील शिपायांना विहारवर चालून जाण्याचें, किंवा बनारसच्या लोकांना प्रयागवर इंग्रजातर्फे स्वारी करण्यांत, तें कांहीं पाप आहे असे वाटत नव्हतें. हिंदी लोकांच्या आंगीं राष्ट्राभिमान व प्रांताभिमान यांच्यापेक्षां निराळीच भावना उज्ज्वल स्वरूपानें वसत होती. हिंदी लोकांची स्वामिनिष्ठा अत्यंत जबरी होती. " ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी", ही म्हण ते अक्षरशः आचरणांत आणीत असत. ज्याच्या पदरीं एकदां नोकरी पतकरली व ज्याला एकदां आपण धनी म्हटलें, त्याच्यासाठीं आपल्या जातभाईवर, आपल्या धर्मबंधूवर, फार काय पण आपल्या इष्टमित्रांवर देखील हत्यार उचलण्यास ते एक पायावर तयार असत. स्वामिभक्ति हा अत्यंत उज्ज्वल गुण असला तरी तो एका मर्यादेपर्यंतच ठेवला पाहिजे. देशभक्ति व धर्मप्रीति यांच्या आड तो येतां कामां नये, अशा तऱ्हेचा उपदेश हिंदी लोकांना महाराष्ट्र सोडून फारसा कोठें झाला नव्हता. महाराष्ट्रांत देखील मराठ्यांचें राज्य स्थापन करतांना, शिवाजी महाराजांना दक्षिणेंतील मुसलमानी बादशाहीच्या पिढीजाद निमकहलाल

मराठे सरदारांची स्वामिनिष्ठा वेळोवेळीं कशी आडवी आली, याचे महाराष्ट्राच्या इतिहासांत ठिकठिकाणीं दाखले सांपडतील. स्वामिनिष्ठा हा उत्तम गुण असला तरी देशभक्तीच्या व धर्मप्रेमाच्या तो आड येतांच त्याला तिलांजली दिली पाहिजे, असलें अमोल तत्व त्या वेळीं हिंदी लोकांना कळलेलें नव्हतें. फक्त स्वामिनिष्ठेलाच ते हृदयाशीं कवटाळून बसलेले होते. हिंदी लोकांसारखी अपूर्व स्वामिभक्ति जगांतील इतर कोणत्याही लोकांच्या आंगीं आढळणार नाहीं; कारण त्यांच्या स्वामिभक्तीला कोणतेंच बंधन नव्हतें. स्वामिकार्यापुढें ते जीवित तृणवत् मानीत. योग्य मार्गानें नेणारा धनी मिळाला, म्हणजे त्यांच्या हातून अपूर्व कार्य होई. हिंदी लोकांच्या या अलौकिक स्वामिभक्तीमुळें, इंग्रजाच्या आज्ञेनें त्यांनीं आपल्याच राजेरजवाड्यांचा पराभव केला, व आपलाच देश जिंकून तो या परकीय इंग्रजांच्या हवालीं केला. हिंदी लोकांनीं इंग्रजांसाठीं हिंदुस्थान देश जिंकिला, हा जगांतील अश्रुतपूर्व चमत्कार हिंदी लोकांच्या उज्ज्वल स्वामिभक्तीमुळेंच घडून आला. हिंदी लोकांची स्वामिभक्ति इंग्रजांच्या कामीं आली व तिचा त्यांनीं मोठ्या चतुराईनें आपल्या फायद्याकरतां उपयोगही करून घेतला. हिंदुस्थानांतील स्वराज्य मात्र त्यामुळें लोपलें!

हिंदी शिपायांनीं इंग्रजांच्या हाताखालीं नौकरी पतकरून त्यांना एकदां आपले धनि म्हटलें. त्यानंतर या शिपायांनीं जवळ जवळ ११० वर्षेंपर्यंत इंग्रजांशीं अतिशय निष्ठापूर्वक वर्तन केलें. आपल्या धन्याच्या बऱ्याकरितां वाटेल तो त्रास सोसण्यास ते सदोदित तयार असत. १७५१ सालीं अर्काटच्या वेढयांत इंग्रजी फौज सांपडली असतां तिच्यावर उपासमारीचा प्रसंग आला. फौजेंतील इंग्रज सैन्याचे उपासमारीनें होत असलेले हाल पाहून, हिंदी सैन्यानें त्या वेळीं नुसती पेज पिऊन दिवस काढले व भात इंग्रज सैन्यास दिला. पोटाला याप्रमाणें चिमटा घेऊन, इमानेंइतबारें आपल्या धन्याची नोकरी बजावून आपल्याच जातभाईशीं लढणारे हिंदी शिपाई, इंग्रजांची सदासर्वदा सर्व संकटांत साथ करीत असत. १७६६ सालीं, हिंदुस्थानांतील गोऱ्या इंग्रज पलटणींनीं व फौजेंतील इंग्रज अधिकाऱ्यांनीं कंपनीविरुद्ध बंड पुकारलें. परंतु हिंदुस्थानांतील देशी शिपाई आपल्या इमानापासून चळले नाहींत. या देशी शिपायांच्या मदतीनेंच व त्यांच्या राजनिष्ठेमुळें क्लाइव्हला त्यावेळीं इंग्रज शिपायांचें बंड मोडतां आलें. हिंदी काळया शिपायांची उज्ज्वल राजनिष्ठा याप्रमाणें अनेक वेळां कसाला लागली. परंतु हे शिपाई राजद्रोही होण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे, इंग्रजांचें त्यांच्याशीं बदललेलें वर्तन हेंच होय! पूर्वी

इंग्रजांचा शब्द त्यांना वेदवाक्याप्रमाणें प्रमाण वाटत असे. इंग्रज लोक दिलेलें वचन मोडणार नाहींत अशी त्यांची खात्री होती, आणि यामुळें इंग्रजांसाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास ते तयार असत. परंतु पुढें ही त्यांची भावना राहिली नाहीं. इंग्रज लोकांची हिंदुस्थानावर सत्ता दृढ होईतोंपर्यंत, देशी शिपायांचा ते मोठा मानमरातब राखीत, व त्यांच्या चालीरीतींना व धार्मिक समजुतींना किंचितही दुखावीत नसत. पलटणीवरील गोरे अधिकारी वृद्ध शिपायांना मान देत, आणि पलटणींतील इतर देशी शिपायांबरोबर गप्पासप्पा मारण्यांत आणि खेळण्यांत आपला वेळ दवडीत असत. त्यामुळें इंग्रज फौजी अधिकारी शिपायांना आपल्यापैकींच एक वाटत असे.

परंतु इंग्रजांची हिंदुस्थानांत सार्वभौम सत्ता स्थापन झाली व त्यांना कोणीही प्रबल प्रतिस्पर्धी उरला नाहीं, तेव्हां हें सर्व गाडें उलटलें. इंग्रज अधिकारी देशी शिपायांना तुच्छतापूर्वक लेखूं लागले, आणि वृद्ध लोकांच्या धार्मिक समजुतींचा टर उडवूं लागले. फौजेंतील इंग्रज अधिकाऱ्यांना देशी शिपायांच्या गप्पा कंटाळवाण्या वाटूं लागल्या. देशी शिपायांचे खेळ व विनोद त्यांना आवडेनासे झाले. फौजेंतील इंग्रज अधिकारी आपल्या फुरसतीचा वेळ आतां क्लबांत घालवूं लागले, व मुलकी खात्यांतील इंग्रज अधिकारी व त्यांच्या मडमा यांच्याबरोबर वार्तालाप करण्यांत गुंग होऊं लागले. इंग्रजी सत्ता हिंदुस्थानांत दृढ झाली, तशी हिंदुस्थानांतील इंग्रजांची फटिंगवृत्ति नाहींशी झाली, आणि मुलकी व लष्करी अधिकारी आपला संसार थाटून छानछान बंगल्यांत मौजेनें नांदूं लागले. या वाढत्या कौटुंबिक पाशामुळें आणि अस्सल युरोपियन क्लबांतील समानशील तरुणतरुणींच्या सुखकर सहवासामुळें, अविवाहित लष्करी अधिकाऱ्यांचें सुद्धां आपल्या पलटणींतील शिपायांशीं फारसें संघटण उरलें नाहीं. शिपायांच्या धर्मपर भावनांचा, चालीरीतींचा व त्यांच्या आवडीनिवडींचा विचार होण्याऐवजीं, शिस्तीचा बडेजाव माजत चालला. शिस्तीच्या सबबीवर नवे नवे हुकूम सुटूं लागले, व नव्या नव्या चाली अमलांत येऊं लागल्या. देशी पलटणींत प्रथम इंग्रजी पद्धतीचीं, कानापासून खालीं फक्त दाढीची हजामत करण्याचा प्रघात सुरू झाला; यानंतर कानांत बाळया घालण्याची शिपायांना मनाई झाली, व नंतर त्यांचे कपाळावर गंध लावणें बंद झालें. आणि या सर्वांवर, जुन्या पगडीच्या जागीं नवीन इंग्रजी टोपी येऊन मात झाली. त्या वेळीं देशी शिपायांत परदेशी ब्राह्मण, कायस्थ, पुरभय्ये वगैरे उच्च जातीय परंतु आडमुठ्या व धर्मबंधनांत जखडलेल्या हिंदूंचा

विशेषतः भरणा असे. त्यामुळें त्या लोकांना शिस्तीच्या नांवाखालीं झालेल्या या नव्या सुधारणा आवडल्या नाहींत. मद्राशांची धर्मपरंपरेची आवड आजलाही कमी झाली नाहीं. नवे विचार आजही त्यांना पटत नाहींत. टिपू सुलतानाचा राज्यभ्रष्ट झालेला पेन्शनर मुलगा शिपायांना भडकवण्यास तयारच होता. त्यामुळें वेलोर येथें १८०६ सालीं शिपायांचें बंड झालें, परंतु तें लवकरच दबलें गेलें. टिपूच्या मुलानें इंग्रजांना शरण येऊन त्यांची माफी मागितली व बंडखोरांना कडक शिक्षा देण्यांत आल्या. या बंडांत १४ गोरे अधिकारी व ९९ गोरे शिपाई मारले गेले होते. त्यामुळें बऱ्याच बंडखोरांना फांशी देण्यांत आलें, व त्यांच्या साहाय्यकांना नोकरींतून वजा केलें. मात्र त्यावरोबरच शिपायांच्या धार्मिक समजुतींना दुखावणारे शिस्तीचे नियम रद्द करण्यांत आले. हिंदी शिपायांचा इंग्रजांवरील विश्वास उडूं लागल्याचा हा पहिला पुरावा होता.

इंग्रजांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर त्यांची राज्यतृष्णा सारखी वाढूं लागली. एकामागून एक प्रांत प्रत्यक्षपणें इंग्रजी राज्यांत सामील होऊं लागला. शिपायांना ही गोष्ट विषासारखी कडू वाटूं लागली. कारण सर्व हिंदुस्थान इंग्रजांनीं पादाक्रांत केलें, म्हणजे शिपायांच्या कर्तृत्वाला वावच उरणार नाहीं अशी त्यांची वेडी समजूत झाली होती. याच आचरट समजुतीवर नजीबखानाला होळकरानें मराठ्यांच्या हातून अनेक वेळां सोडविलें. 'उत्तरेंतील एवढा एकच प्रबळ शत्रू मारला गेला, म्हणजे पेशव्यांना सरदारांची जरुरी वाटणार नाहीं. ते ढालाईत पाठवून करवसूली करतील,' असें होळकरांचें म्हणणें प्रसिद्धच आहे. मग अडाणी शिपायांना कां दोष द्यावा? शिपायांचीं मनें किती भडकलीं होतीं, हें अर्काटच्या छावणींत १८२२ सालीं सांपडलेल्या एका कागदावरून सहज समजण्यासारखें आहे. त्या कागदांत लिहिलें होतें:—" मुसलमानांनीं इंग्रजांसाठीं अनेक प्रकारची गुलामगिरी स्वीकारली, त्यामुळें त्यांची प्रार्थना ईश्वराच्या घरीं रुजू होऊं शकत नाहीं. मुसलमानांच्या दास्यवृत्तीमुळें ईश्वराचा त्यांच्यावर कोप झाला असून, त्यापायीं शेंकडों इसम पटकीनें मरत आहेत. या वेळीं सर्वांनीं आपल्या धर्माच्या रक्षणासाठीं प्राणावर उदार होऊन यत्न केला पाहिजे. दिल्ली व अर्काटमध्यें असंख्य हिंदु व मुसलमान आहेत. इंग्रजांची संख्या त्यांच्या खिजगणतींत नाहीं. सर्वांनीं मिळून यत्न केल्यास ते चुटकीसरसे मारले जातील. इंग्रजांनीं या देशांतील सर्व जहागीरदारांच्या व जमीनदारांच्या जमिनी हिसकून घेतल्या आहेत. सहा महिन्यांच्या आंतच विलायतेहून नवीन इंग्रजी फौज येणार असून, देशी

शिपायांचीं हत्यारें काढून घेण्यांत येतील व त्यांना बडतर्फी मिळेल. यामुळें सर्व सुभेदार, जमादार व दफेदारांनीं आपापसांत सल्ला करून ठरलेल्या दिवशीं इशाऱ्याबरोबर बंड करावें. १० देशी शिपायांनीं इंग्रज अधिकाऱ्याचे बंगल्यावर जाऊन त्याला तेथल्या तेथेंच खतम करावें. यानंतर सुभेदार लोकांना कर्नल बनविण्यांत येऊन आणि जे दुसरे शिपाई या बंडांत उत्साहानें सामील होतील त्यांनाही अधिकाऱ्यांच्या जागा देण्यांत येतील."

यानतर थोड्याच दिवसांनीं मद्रासचे गव्हरनर सर टामस मनरो यांच्याही हातीं एक असेंच चमत्कारिक पत्र लागलें. त्यांत लिहिलें होतें:—"सर्व धन व मान हा फक्त गोऱ्या शिपायांना मिळत असतो. श्रम व संकटांशिवाय हिंदुस्थानी फौजेच्या हातीं दुसरी कोणतीच गोष्ट लागत नाहीं. हिंदुस्थानी फौजेनें पराक्रम करून तरवारीच्या जोरावर मुलूख जिंकावा, व त्यांत पोटभरू गोऱ्या लोकांनीं राज्य करावें व श्रमाशिवाय श्रीमंत व्हावें, अशी स्थिति आली आहे. हिंदुस्थानी शिपायांनीं जन्मभर नोकरी केली, तरी त्यांचा पगार पांच रुपायांच्या वर वाढत नाहीं. मुसलमानी अमलांत ही स्थिति फार निराळी होती. एखादें राज्य फौजेनें जिंकून घेतलें, म्हणजे शिपायांना जमिनी व विशेष पराक्रम करणाऱ्या सुभेदारांना जहागिरी देण्यांत येत असत, व त्यांची मोठमोठ्या अधिकारांच्या जागेवर नेमणूक होत असे. कंपनीच्या राज्यांत मात्र, फक्त गोऱ्या लोकांनाच काय तें इनाम मिळतें." या अशा हस्तपत्रकांनीं त्या वेळीं जरी बंड झालें नाहीं, तरी हिंदी शिपायांचीं मनें इंग्रजांविरुद्ध किती क्रुद्ध झालीं होतीं हें दिसून येतें. कर्नल, कॅप्टन, लेफ्टनेंट वगैरे अधिकारांच्या जागांवर, हिंदी शिपायांनीं कितीही शौर्य दाखविलें, व केवढीही मर्दुमकी केली, तरी त्यांची नेमणूक होऊं शकत नाहीं, ही गोष्ट तेव्हांपासूनच शिपायांच्या डोळ्यांत सलत होती. इंग्रज अधिकाऱ्यांनीं खोऱ्यांनीं पैसे ओढावेत, व हिंदी शिपायाचे नशिबीं पोटापुरते चिंचोके यावेत ही विषम परिस्थिति त्यांना कळून आली, व डोळे उघडल्यामुळें ही विषमता त्यांना सहन होईनाशी झाली होती. शिपायांतील असंतोष आणि इंग्रजांवरील अविश्वास गुप्तपणें पसरत असला, तरी इंग्रजांना त्याचा मुळींच सुगावा लागला नव्हता असें मात्र नाहीं. त्यांच्या कानावर वर उल्लेखलेल्या प्रकारांनीं शिपायांतील असंतोष आला. परंतु बेपर्वाईनें त्यांनीं त्यावर कोणतीच उपाययोजना केली नाहीं.

इंग्रज अधिकाऱ्यांना त्या वेळीं सत्तेचा व निष्कंटक प्रभुत्वाचा नशा चढला होता. त्यांची देशी शिपायांशीं वागणूक उद्दामपणाची होई. देशी शिपायांना पोटापुरता पगारदेखील मिळत नसे. देशी शिपायांना गोठ्यासारख्या बराकी, व इंग्रजांना सर्व सुखसोयीचीं साधनें उपलब्ध होतीं. त्यामुळें शिपाई अत्यंत असंतुष्ट झाले होते.

शिपायांतील असंतोषाला १८२४ सालीं बराकपूर येथें वाचा फुटली. त्या वेळचा हिंदुस्थानचा गव्हरनर जनरल लार्ड आमरेस्ट यानें ब्रह्मदेशाशीं युद्ध पुकारलें. ब्रह्मदेश जिंकून घेण्याकरितां देशी शिपायांची तिकडे रवानगी करण्याचें ठरलें. हिंदी लोकांची सैन्यांत जेव्हां भरती करण्यांत येत असे, तेव्हां हिंदुस्थानाबाहेर लढण्याकरितां त्यांना बाहेर पाठविण्यांत येणार नाहीं, अशी शर्त नोकरीच्या करारनाम्यांत घातलेली असे. कारण समुद्रयात्रा केल्यानें मनुष्य धर्मभ्रष्ट होतो, अशी त्या वेळीं शिपायांची कडवी धर्मभावना होती. परंतु सत्तेच्या मदानें अंध झालेल्या इंग्रजी अधिकाऱ्यांना शिपायांच्या धार्मिक मनोवृत्तींची किंवा केलेल्या करारमदारांची काडीमात्रही पर्वा वाटत नव्हती. इंग्रजांनीं देशी पलटणींना ब्रह्मदेशास जाण्याची आज्ञा केली. बराकपूर येथील शिपायांनीं अर्थातच बंडाचा बावटा उभारला. आपल्या तोफखान्याच्या जोरावर इंग्रजांनीं लवकरच हें बंड मोडून काढलें. परंतु देशी शिपायांचा मात्र या दिवसापासून इंग्रजांवरील विश्वास अधिकच कमी झाला.

ब्रह्मदेशच्या लढाईत जे देशी शिपाई सामील झाले होते, ते तिकडे अतिशय शौर्यानें लढले. त्याचप्रमाणें अफगाणिस्थानाशीं जेव्हां इंग्रजांचें युद्ध सुरू झालें, तेव्हां देशी शिपाई काबूलपर्यंत चाल करून गेले. आणि ज्या वेळीं अफगाण लोकांनीं डोकें उचललें आणि इंग्रज लोकांना काबुलाहून पीछेहाट करावी लागली, त्या वेळीं देखील देशी शिपायांनीं इंग्रजांच्या बरोबरीनें हालअपेष्टा सहन केल्या. हिंवाळयाच्या कडक थंडीनें, प्रवासाच्या दगदगीनें, उपासमारीनें, आणि पाठलाग करणाऱ्या अफगाण लोकांच्या गोळ्यांनीं व इतर शस्त्रांच्या आघातानें कंपनीच्या फौजेचे अतोनात हाल झाले. एकंदर १७००० लोक काबुलाहून जलालाबादेस जाण्याकरितां निघाले होते. परंतु वाटेंतील सर्व खिंडी अफगाण लोकांनीं बंद करून टाकल्यामुळें, त्यांतून अफगाण लोकांच्या माऱ्याखालीं वाट काढतांना त्या १७००० शिपायांपैकीं बहुतेक सर्व लोक मृत्युमुखीं पडले. जलालाबादेपर्यंत फक्त ३ च इसम परत येऊं शकले. त्यांपैकींही दोन अफगाणांच्या तरवारीस बळी पडले व तिसऱ्याच्या पायावर तरवारीचा फटका बसला. कंपनीच्या सैन्याची झालेली हालअपेष्टा

सांगण्याकरितां एकटा डॉ. ब्रायडन याप्रमाणें लंगडा होऊन परत आला. असा भयंकर कल्पनातीत अनर्थ घडून आला असतांही, देशी शिपायांचें धैर्य गळलें नाहीं. देशी शिपाई लढतांना जिवाची मुळींच पर्वा करीत नसतो. लवकरच कंपनीची फौज या पराभवाचा वचपा काढण्याकरितां काबूलवर चालून गेली. आणि १८४२ सालच्या सप्टेंबर महिन्यांत काबूल शहर त्यांनीं पुन्हा काबीज केलें. त्यानंतर १८४३ सालीं, या देशी फौजेनें सिंधप्रांत जिंकून घेतला. याप्रमाणें देशी फौज आपली कर्तबगारी दाखवीत असतां तिचें इंग्रजांकडून कोणत्याही प्रकारें चीज होईना. कंपनीची सत्ता हिंदुस्थानभर पसरली असल्यामुळें, ती आपल्या गुर्मीतच असे. कंपनीच्या राज्याच्या सरहद्दीपलीकडील प्रांतांत फौज लढावयास गेली, म्हणजे तिला जादा भत्ता देण्यांत येत असे. शिपायांना फौजेंत भरती करतेवेळेसच हे करार करण्यांत येत असत. कारण भत्त्याचें प्रलोभन नसलें, तर बंगाल किंवा बनारस प्रांतांतील देशी फौज पंजाब, ब्रम्हदेश, सिंध व अफगाणिस्थान अशा दूरदूरच्या व अपरिचित हवेच्या ठिकाणीं, वर्षानुवर्ष झुंज घेत बसली नसती. शिपाई आपल्या टापूंतच नोकरी करीत असले म्हणजे त्यांना बायकापोरांना जवळ बाळगून संसार करतां येत असे, व त्यामुळें नेहमीं मिळत असणाऱ्या अल्प वेतनांतही ते आपला गुजारा करून कसेबसे संतुष्ट राहात असत. परंतु आपलीं बायकामुलें व घरदार सोडून, दूरदूरच्या प्रांतांत जेव्हां त्यांना लढाईकरितां जावें लागे, तेव्हां त्यांना जादा भत्ता मिळत असे. जिवावर उदार होऊन लढणाऱ्या व कंपनीचें यश वाढविणाऱ्या या देशी शिपायांना देण्यांत येणारा हा भत्तादेखील कंपनीच्या डोळयांत खुपूं लागला. कंपनीची स्थिति एखाद्या लोभी सावकाराप्रमाणें झाली होती. कंपनी पूर्वीप्रमाणें व्यापारी स्वरूपाची राहिली नसून तिला हिंदुस्थानांतील सार्वभौम सत्तेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. एकामागून एक प्रांत आपल्या घशांत टाकून कंपनी आपलें हिंदुस्थानांतील साम्राज्य वाढवीत होती. परंतु "आधीं होता ग्रामजोशी आणि राज्यपद आलें त्याशीं" म्हणजे त्या इसमाचें पंचांग ज्याप्रमाणें सुटत नाहीं, त्याचप्रमाणें साम्राज्य संपादन करूनही या कंपनीची बनियेगिरी बंद झाली नाहीं. कंपनीला आपलें राज्य वाढविण्याची इच्छा होती, परंतु पैसे खर्च करण्याचें मात्र तिच्या जिवावर येत असे. यामुळें शिपायांना मिळत असलेला भत्ता बंद करण्याचें कंपनीनें ठरविलें.

शिपाई लोक अर्थातच नाराज झाले. आपल्या घरापासून फार दूर असलेल्या सिंधसारख्या रुक्ष वाळवंटाच्या प्रदेशांत, जादा भत्ता मिळाल्याशिवाय

काम करण्याचें त्यांनीं नाकारिलें. आम्हांला फौजेंत भरती करते वेळीं कंपनीनें आमच्याशीं जो करार केला आहे त्याप्रमाणें कंपनीनें आमच्याशीं वागावें, व जादा भत्ता आम्हांला द्यावा अशी रास्त मागणी शिपायांनीं केली. शिपायांतील असंतोष सारखा वाढत चाललेला पाहून आणि शिपायांच्या मागणींतील सत्य पटल्यामुळें मुख्य सेनापतीनें शिपायांना जादा भत्ता देण्याचें ठरविलें. परंतु गव्हर्नर जनरलला ही गोष्ट आवडली नाहीं. सिंधप्रांत कंपनीच्या राज्याच्या सीमेबाहेर १८४२ पर्यंत होता हें खरें ! परंतु देशी फौजेनें आपल्या पराक्रमानें तो प्रांत १८४२-४३ सालीं जिंकून घेतल्यानंतर तो साहाजिकच कंपनीचे राज्यांत मोडूं लागला. आणि ज्या अर्थी सिंधप्रांत कंपनीच्या राज्यांत मोडत आहे, त्या अर्थी तेथें बंदोबस्ताकरितां ठेवलेल्या देशी शिपायांना जादा भत्ता देण्याचें कांहीं कारण नाहीं, असे विलक्षण तारे गव्हर्नर जनरलनें तोडले ! म्हणजे शिपायांनीं सिंधप्रांत जिंकून घेतला ही मोठी चूकच केली, असें म्हणण्यासारखें होतें ! त्यांनीं तो प्रांत जिंकून कंपनीच्या राज्यांत सामील केला नसता, तर त्यांचा जादा भत्ता चालू राहिला असता. शिपायांनीं आपल्या कामाची कुचराई केली असती, व लढाईत त्यांना अपयश आलें असतें तर त्यांचा भत्ता चालू राहिला असता. परंतु त्यांनीं पराक्रमाची शर्थ करून सिंधप्रांत जिंकून घेतला, म्हणून त्यांचा भत्ता बंद करण्यांत आला ! कंपनीच्या ताब्यांत प्रांत जिंकून दिला, ही मोठी चूक केली असे शिपायांना कां वाटूं नये ? गव्हर्नर जनरलच्या या तर्कशास्त्रामुळें मुख्य सेनापतींत व त्यांच्यांत विरोध आला. देशी फौजेनें १८४९ सालीं पराक्रमाची शर्थ करून व अतिशय निकराच्या लढाया मारून पंजाबप्रांत जिंकून इंग्रजी राज्यास जोडून दिला. शीख लोकांशीं झालेल्या लढायांत, हिंदुस्थानांतील फौजेनें खरोखरच पाण्याप्रमाणें रक्त ओतलें. परंतु गव्हर्नर जनरलच्या तर्कशास्त्राप्रमाणें नवीन जिंकिलेल्या पंजाबप्रांतांत बंदोबस्त राखण्याकरितां ठेवलेल्या फौजेस जादा भत्ता मिळण्याचें बंद झालें. या निकराच्या लढाया मारण्यापूर्वी सतलज नदी ओलांडली कीं शिपायांना जादा भत्ता मिळणें सुरू होत असे. परंतु त्यांनीं पंजाब प्रांत जिंकला व त्यांचें हें वेतन बंद झालें. नवीन जिंकिलेल्या प्रांतांत बंदोबस्ताकरितां ठेवलेल्या शिपायांचीं मनें प्रसन्न राखणें जरूर आहे, ही गोष्ट मुख्य सेनापती जाणून होते. त्यामुळें त्यांना ही गोष्ट आवडली नाहीं. त्यांनीं शिपायांना भत्ता दिलाच पाहिजे असा हट्ट धरिला; परंतु त्या वेळीं डलहौसीसारखा सोटेशाही अरेराव हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल

असल्यामुळें बिचाऱ्या सेनापतीला हार खावी लागली, आणि त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. मुख्य सेनापती सर चार्लस नेपियर हे याप्रमाणें राजीनामा देऊन इंग्लंडला गेल्यावर लार्ड डलहौसीनें शिपायांचा भत्ता अजिबात बंद केला. व भत्त्याबद्दल चळवळ करणाऱ्या दोन तीन छावणींतील शिपायांच्या पुढाऱ्यांस लष्करी कायद्याप्रमाणें बेशिस्तीबद्दल दहा दहा वर्षांच्या सक्त मजुरीच्या व कांहींना काळ्या पाण्याच्या शिक्षा दिल्या !

कंपनीच्या या विश्वासघातकी वर्तनामुळें सर्व देशी फौज नाराज झाली व मनांतून इंग्रजांवर दांत ओठ खाऊं लागली. परंतु लष्करी शिस्तीखालीं होणाऱ्या कडक शिक्षेच्या धाकामुळें त्यांना आपला संताप मनांतल्या मनांतच ठेवावा लागे, व इच्छा नसतांनाही अनेक वेळां अधिकाऱ्यांचे हुकूम निमूटपणें पाळावे लागत. तरी देखील ब्रह्मदेशच्या दुसऱ्या लढाईच्या वेळीं ३८ नंबरच्या पलटणीनें समुद्राची सफर करण्याचें सपशेल नाकारलें. आपल्या करारांत समुद्रयात्रा करावी लागणार नाहीं असें स्पष्ट कलम असल्यामुळें, आपण कंपनीच्या आज्ञेप्रमाणें ब्रह्मदेशास जाण्यास मुळींच बांधले गेलों नाहीं, असे त्या पलटणीनें लॉर्ड डलहौसीला चक्क उत्तर दिलें. त्या पलटणीची उद्दाम वृत्ति पाहून लॉर्ड डलहौसीचें खंबीर मन देखील थोडेंसें चरकलें, व त्याला त्या पलटणीपुढें हार खावी लागली. कंपनीच्या असल्या अविश्वासी व सहानुभूतिशून्य वर्तनामुळें देशी फौज बिथरली. धन्याला देव मानणारे आणि इंग्रजांना भात देऊन आपण पेजेवर संतुष्ट राहाणारे देशी शिपाई, इंग्रजांविरुद्ध बंड पुकारून त्यांच्याशीं लढण्यास व त्यांना ठार मारण्यास सिद्ध झाले. त्यांच्या मनांत इंग्रजांविषयीं अतोनात अविश्वास उत्पन्न झाला असल्यामुळें त्यांना इंग्रजांची प्रत्येक गोष्ट वांकडी दिसूं लागली. गेलीं ५० वर्षें इंग्रजांचें त्यांच्याशीं जें वर्तन झालें होतें व चालू होतें तें पाहातां, त्यांचा अविश्वास अस्थानीं व अकारण नव्हता असेंच म्हणावें लागेल. त्यांच्या मनाची स्थिति पिंजऱ्यांत सांपडलेल्या वाघासारखी झाली होती. इंग्रजांचा त्यांना अतोनात संताप आला होता, परंतु इंग्रजी सत्तेविरुद्ध डोकें उचलण्याची त्यांच्यांत हिंमत नव्हती. इंग्रजांच्या इभ्रतीसाठीं त्यांनीं लढाया मारल्या आणि एकामागून एक प्रांत काबीज करून इंग्रजी राज्याला जोडले. त्यांच्या आजापणजांचें, त्यांच्या भावाबंदाचें व त्यांच्या स्वतःचें रक्त इंग्रजांसाठीं खर्ची पडलें. परंतु त्यांचा कंपनीच्या राज्यांत व कंपनीच्या फौजेंत दर्जा काडीचाही वाढला नाहीं. उलट त्यांना प्रसंगविशेषीं मिळत असलेला जादा भत्ता, इंग्रजी राज्याची हद्द वाढल्यामुळें

बंद झाला. इंग्रजांना शत्रु व प्रतिस्पर्धी म्हणून कोणीही हिंदुस्थानांत उरले नसल्यामुळें, देशी फौजेची मातबरी इंग्रजांना वाटेनाशी झाली, व देशी शिपायांना इंग्रज अधिकारी तुच्छतेनें कस्पटासमान लेखूं लागले. फारसा पगार नाहीं, अधिकाराची जागा नाहीं, कवायतींत थोडीशी चूक झाली तर तरण्याबांड इंग्रज जवानांचीं बोलणीं व शिव्या सोसावयाच्या, पराक्रमाबद्दल जहागिरी, सरदारी किंवा जमिनी मिळावयाच्या नाहींत, हुकमाची तामिली करण्यांत कुचराई केली किंवा जादा पगार व भत्ता मागितला, अथवा कराराकडे बोट दाखवून परदेशीं जाऊन धर्म बाटवून घेण्यास तयार नाहीं असें सांगितलें, तर कोर्ट मार्शल होण्याची भीती ! अशा पेंचांत देशी शिपाई त्या वेळीं सांपडले होते.

याप्रमाणें परदेशांत नोकरीवर असतांना त्यांचा अपमान होत असला, तरी सुट्टी घेऊन किंवा म्हातारपणीं पेन्शन घेतल्यावर ते आपापल्या घरीं आले म्हणजे त्यांचा बडेजाव होत असे. सार्वभौम कंपनी सरकारचे शिपायी म्हणून त्यांचा मानसन्मान होत असे. कारण राजेरजवाड्यांचें व त्यांच्या संस्थानांचें संरक्षण करण्याची हमी कंपनी सरकारनें आपल्या शिरावर घेतली असल्यामुळें, संस्थानांतील लोक कंपनीच्या शिपायांना संरक्षक या नात्यानें लेखून योग्य मान देत असत. परंतु कंपनीची सर्वभक्षक नीति सुरू झाल्यामुळें हे संरक्षकच भक्षक बनले. कारण यांच्या बळावरच एकामागून एक संस्थानें खालसा होऊं लागलीं. कंपनीचा खादाडपणा इतका प्रसिद्ध झाला होता कीं, १८३० सालीं बर्निस नांवाचा इंग्रज वकील कांहीं घोडे नजराण्यादाखल रणजीतसिंहाकडे घेऊन जात असतां, तो सिंध प्रांतांतून गेला. त्या वेळीं सिंधमधील एक बलुची गृहस्थ म्हणाला, 'हाय हाय ! सिंधचा घात झाला ! कारण आमचा देश इंग्रजांच्या दृष्टीस पडला. आतां आमची धडगत नाहीं.' आणि झालेंही तसेंच. कांहींतरी वडाची साल पिंपळाला लावून सिंध प्रांत बारा वर्षांच्या आंतच इंग्रजी अमलांत सामील झाला. रणजितसिंगाला एकजण हिंदुस्थानचा नकाशा दाखवीत असतां, लवकरच सर्व देश कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें लाल होईल, असें दूरदर्शी परंतु इंग्रजांच्या नेहमींच्या वर्तणुकीमुळें वस्तुस्थितिदर्शक भविष्य त्यानें वर्तविलें होतें. कंपनीच्या ह्या अन्यायी राजनीतीमुळें, हिंदुस्थानांतील लोक देशी शिपायांना परक्यांचे बंदे गुलाम व घरच्या म्हातारीचे काळ लेखू लागले. देशी शिपाई एकदां कंपनीच्या फौजेंत दाखल झाले म्हणजे त्यांना त्यांच्या देशाचा व धर्माचा अभिमान राहात नाहीं, अशी लोकांची साहजिकच समजूत झाली. कारण हे शिपाई आपलाच प्रांत

जिंकून घेत, आपल्याच लोकांशीं युद्ध करीत, आपल्या धर्माच्या राजेरजवाड्यांना गादीवरून खालीं ओढीत आणि फिरंगी कंपनीच्या राज्याची तेथें स्थापना करीत. यामुळें सामान्य लोक कंपनीच्या शिपायांना हलकट समजूं लागले, आणि त्यांना पूर्वीप्रमाणें मान देण्याच्या ऐवजीं तुच्छतेनें लेखूं लागले. औध प्रांत खालसा केल्यावर तर शिपायांची अब्रूच उरली नाहीं. कारण कंपनीच्या उत्तरेंतील फौजेंत औध मधूनच बहुतेक भरती होत असे. आपल्या राहाण्याच्या घरावर विस्तव ठेवण्यास प्रवृत्त झालेल्या शिपायांना कोण मान देईल ? याप्रमाणें कंपनीच्या नीतीमुळें घरीं व दारीं अपमानित झालेल्या शिपायांच्या हृदयांत इंग्रजांविषयीं किती तीव्र अग्नी पेटला होता याची जाणीव लवकरच इंग्रजांना झाली. परंतु त्या वेळीं आपल्या गुर्मींत दंग असलेल्या इंग्रजांनीं या गोष्टीची पर्वाही केली नाहीं. कंपनीच्या मद्राशी शिपायांना हें घरचें व दारचें अपमानास्पद जिणें सोसावें लागलें नसल्यामुळें ५७ सालीं ते भडकले नाहींत, व त्यांच्या पलटणी उत्तरेंतील पुरभय्या व मुसलमान शिपायांचें बंड मोडण्यास धावून गेल्या. मद्राशी शिपायांची राजनिष्ठा याप्रमाणें शिपायांच्या बंडांतही तावून सुलाखून निघाली !

याशिवाय लॉर्ड डलहौसीच्या कारकीर्दीत इंग्रजी राज्याचा विस्तार अतोनात वाढला. परंतु त्या मानानें हिंदुस्थानांतील गोऱ्या फौजेची संख्या मात्र वाढली नाहीं. राज्याचा विस्तार वाढला, आणि कांहीं प्रांत इंग्रजी राज्यांत नव्यानेंच सामील झाले असल्यामुळें तेथें बंदोबस्ताकरितां अधिक फौजेची गरज भासत होती. परंतु देशी फौज वाढवूनच ही गरज भागविण्यांत आली. कारण त्या वेळीं इंग्लंड युरोपांतील क्रिमियन युद्धांत सामील झालें असल्यामुळें गोऱ्या फौजेची रशियांत अधिक जरूरी होती. यामुळें हिंदुस्थानांत नवी गोरी फौज पाठविणें इंग्लंडला शक्य नव्हतें. १८५२ सालीं मुंबई, मद्रास व बंगाल हे तिन्ही फौजी इलाखे मिळून फक्त २८,००० गोरी फौज हिंदुस्थानांत होती. परंतु यापैकीं कांहीं सुट्टीवर तर कांहीं पेन्शनीवर गेली, आणि त्यांच्या जागीं विलायतेहून नवी फौज आली नाहीं. यामुळें लॉर्ड डलहौसीनें १८५६ सालीं हिंदुस्थान सोडलें त्या वेळीं फक्त २३,००० गोरी फौज काय ती हिंदुस्थानांत राहिली होती. गोऱ्या काळ्या शिपायांच्या या वाढत्या विषमतेमुळें, काळ्या शिपायांच्या बंडाचा वणवा एकदां पेटल्यावर त्याला अधिकच तीव्र स्वरूप आलें, आणि तें शमविणें तितकें अधिक कठीण झालें.

---

## प्रकरण १० वें.

# बंडाचीं सामान्य कारणें.

१७९८ सालापूर्वी कंपनीचें लक्ष विशेषतः व्यापारावर खिळलें होतें. हिंदी राजेरजवाड्यांशीं गोडीगुलाबीनें वागून व त्यामुळें आपला व्यापार वाढवून नफा कमवावा एवढाच कंपनीचा हेतु असे. कंपनीचे हिंदुस्थानांत जे नोकर येत असत, त्यांना इकडील परिस्थिति पाहून प्रसंगविशेषीं हिंदुस्थानांत इंग्रजांचें स्वामित्व स्थापन करण्याची अनिवार लालसा होई. हिंदुस्थानांत इंग्रजांचें प्रचंड साम्राज्य स्थापन झाल्याचीं स्वप्नेंही त्यांना मधूनमधून पडत असत. फ्रेंच सेनापती व मुत्सद्दी ड्युप्ले याच्याकडे बघून तर त्यांची राज्यलालसा अधिकच दृढतर होई. त्यामुळें हिंदुस्थानांतील कंपनीच्या नोकरांना तो मोह आवरत नसे. ते हिंदी राजेरजवाड्यांच्या भानगडींत पडून कंपनी-साठीं मुलुख संपादन करण्याच्या प्रयत्नाला लागत. ही बातमी विलायतेस समजली म्हणजे कंपनीचे अधिकारी गरम होत, व राजेरजवाड्यांच्या भांडणांत पडण्याची व युद्धाची आपत्ति आणि युद्धांचा खर्च अंगावर ओढवून घेण्याची आपल्या हिंदुस्थानांतील नोकरांना मनाई करीत, आणि त्यांना चांगले दांटीत असत. युरोपांत इंग्रज व फ्रेंच लोकांचें युद्ध जुंपलें या गोष्टीचा फायदा घेऊन हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्तेला पायबंद घालण्याच्या निमित्तानें, कंपनीच्या कांहीं इंग्रज अधिकाऱ्यांनीं हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या घरांत आपले घोडें दामटून थोडाबहुत मुलूख कंपनीसाठीं मिळविला. अशा प्रसंगीं राष्ट्रीय अभिमानामुळें फ्रेंचांचा पाडाव करूं पाहणाऱ्या हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांचा कंपनीकडून पाठपुरावा होई, व नाइलाज म्हणून पदरीं पडलेला मुलुख सांभाळण्यास कंपनी तयार होई. परंतु एरव्हीं नवा मुलुख संपादन करण्याच्या विरुद्ध कंपनीचें धोरण असे. येथील राजेलोकांशीं गोडीनें वागावें व आपला व्यापार वाढवून कंपनीला अतोनात नफा मिळवून द्यावा, असाच उपदेश कंपनी हिंदुस्थानांतील आपल्या नोकरांना करीत असे. परंतु कंपनीचे हिंदुस्थानांतील नोकर, विलायतेंतील कधींही हिंदुस्थान न पाहिलेल्या कंपनीच्या डायरेक्टर मंडळीपेक्षां अधिक हुशार व धूर्त होते. त्यांना येथील परिस्थिति पाहून तिचा फायदा करून घ्यावा व आपल्या जातभाईंचें हिंदुस्थानांत प्रचंड साम्राज्य स्थापन करावें, अशी साहजिक इच्छा होई. राज्य गोडीगुलाबीनें स्थापन होत नसतें. 'मला राज्याचा व राजसत्तेचा

कंटाळा आला आहे; त्यामुळें तुमच्यासारख्या चलाख व कर्तबगार अधिकाऱ्याला मी आपलें राज्य प्रेमानें अर्पण करून निर्वाहापुरती पेनशन घेऊन गंगाकिनारीं तपश्चर्या करीत स्वस्थ बसतों,' असें एखाद्या राजानें हिंदुस्थानांतील गव्हर्नर जनरलला आपखुषीनें कधीं काळीं सांगणें शक्य नव्हतें. राज्य संपादन करण्याकरितां अनेक युक्त्या प्रयुक्त्या योजाव्या लागतात. लोकांत फूट पाडावी लागते, निरनिराळ्या राजेरजवाड्यांत भांडणें लावून त्यांना आपापसांत लढून खची होऊं द्यावें लागतें, राजाच्या नातलगाला किंवा सेनापतीला राज्याची लालुच दाखवावी लागते, राजाचा बंधु राजाविरुद्ध लढवावा लागतो, बंड किंवा राजद्रोह अशी खोटीच आरोळी ठोकून संस्थानिकांचें द्रव्य अन्यायानें जप्त करावें लागतें, आणि प्रचलित शासनपद्धतीचा दुर्लौकिक मुक्तकंठानें जाहीर करून प्रजेचें मन राजाविषयीं कलुषित करावें लागतें, आणि सरते शेवटीं अगदीं जरूरीपुरतेंच रक्त वाहवावें लागतें! इंग्रजांचें राज्य स्थापन करण्यास उत्सुक झालेल्या कंपनीच्या अधिकाऱ्यांनीं प्रसंगानुरूप या सर्व गोष्टी केल्या. परंतु कंपनीचें धोरण राज्यस्थापनेच्या विरुद्ध असल्यामुळें, वारन हेस्टिंग्जसारख्या कर्तबगार व साम्राज्यप्रेमी गवर्नर जनरलला विलायतेस गेल्यावर हिंदुस्थानांतील आपल्या केलेल्या कृत्यांचा जबाब द्यावा लागला, आणि त्यांत त्याचा बराच छळ झाला.

परंतु लॉर्ड वेलस्ली गव्हर्नर जनरल झाल्यापासून कंपनीचें सर्वसामान्य धोरण बदललें. तो गव्हर्नर जनरल होऊन आला, तेव्हां उत्तर हिंदुस्थानांतील प्रसिद्ध कारस्थानी मुत्सद्दी व कर्तबगार शूर सेनापती—महादजी शिंदे परलोकवासी झाले होते. अहिल्याबाई होळकर व तिचा दत्तक पुत्र तुकोजाराव दोघेही मृत झाले असून राज्यांत भाऊबंदकी माजली होती. मध्यवर्ती पुणें दरबारांत नालायक बाजीराव पेशवे राज्य-पदावर आरूढ झाल्यामुळें कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नव्हता. दिल्लीचा बादशाहा शिंद्यांचे हातांतील बाहुलें बनला होता. उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान नबाब एकमेकांना पाण्यांत पहात होते. मोंगल बादशाहाची मध्यवर्ती सत्ता केव्हांच नष्ट झाली होती, परंतु त्या जागीं स्थापन झालेली पेशवाई मध्यवर्ती सत्तादेखील पूर्णपणें विस्कळीत होऊन, मराठे सरदार आपापल्या परी स्वतंत्र होऊन भाऊबंदकींत गुंतले होते. लॉर्ड वेलस्लीनें हिंदुस्थानांतील परिस्थितीचें पूर्ण आकलन केलें, व **'झोडा आणि फोडा'** या राजनीतीचा उघडपणें स्वीकार केला. त्यानें प्रथम लहानलहान संस्थानांशीं स्वतंत्र तह करून आपल्या तैनाती फौजेचें लोढणें त्यांच्या गळ्यांत अडकवण्यास सुरवात केली. दुसऱ्याच्या

खर्चानें आपलें सैन्य पोसण्याची ही टूम अपूर्व होती यांत शंका नाहीं. या फौजेच्या खर्चाकरितां संस्थानिकांकडून नगद पैसे किंवा बराचसा मुलुख तोडून घेण्यांत येत असे. या संस्थानिकांच्या संरक्षणाचा बोजा कंपनी आपल्या शिरावर घेई. मात्र इंग्रजांच्या परवानगीशिवाय संस्थानिकांनीं इतर कोणत्याही संस्थानिकांशीं तह करूं नये असें बंधन त्यांच्यावर लादण्यांत येई. याप्रमाणें इंग्रजांची सार्वभौम सत्ता 'सार्वभौम' या शब्दाचा प्रकट उच्चार न करतां सर्वत्र स्थापन करण्याचा वेलस्लीचा डाव होता. त्यानें आपल्या खऱ्या हेतूचा मागमूसदेखील कोणाला लागूं दिला नाहीं. वेलस्लीच्या जाळ्यांत आमचे रणशूर रजपूत राजे ताबडतोब अडकले ! इंग्रजांशीं नवीन तह करून त्यांनीं इंग्रजांचें मांडलिकत्व ताबडतोब कबूल केलें, आणि त्यांची तैनाती फौज स्वसंरक्षणाकरितां ठेवून घेतली. रजपूत राजांना प्रथम मुसलमानांनीं व नंतर मराठ्यांनीं खरपूस चोप दिला असल्यामुळें, मनांतून ते मराठे व मुसलमान या दोघांचाही सारखाच द्वेष करीत असत. त्यामुळें हा नवीन इंग्रज यजमान त्यांना आवडला. रजपूत राजांना कोणाच्या तरी आश्रयानें नांदून आपलें लहानसें संस्थान संभाळण्याचा सराव होता. त्यांना आपल्या कुलाचा व आपल्या संस्थानाचा अतोनात अभिमान असतो, व त्याकरितां ते स्वार्थत्यागही करीत. परंतु मुसलमानांची बादशाही नजर किंवा मराठ्यांची हिंदवी स्वराज्याची व्यापक दृष्टी त्यांना केव्हांच लाभली नव्हती. त्यांनीं प्रथम दिल्लीच्या सुलतानांना, नंतर मोंगल बादशाहांना, नंतर मराठ्यांना व सरतेशेवटीं इंग्रजांना मुजरे करूनच आपलीं संस्थानें टिकविलीं. त्यामुळें त्यांनीं इंग्रजांची सार्वभौम सत्ता ताबडतोब कबूल केली व पुढेंही ते इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिले.

लहान लहान संस्थानें प्रथम आपल्या पंजाखालीं घेतल्यानंतर वेलस्लीनें आपली दृष्टी मोठ्या संस्थानांकडे वळविली. गायकवाड, निजाम व पेशवे यांच्यावर वेलस्लीसाहेबांनीं अनुक्रमानें आपला तैनाती फौजेचा तह लादला. पेशवे एकदां फाशांत सांपडल्यावर त्यांचे सरदार म्हणविणारे शिंदे, होळकर, भोसले वगैरे मातबर सरदारांवरही तैनाती फौजेचें लचांड येऊन पडलें. वेलस्लीनें यांच्याशीं एकएकट्याला गांठून युद्ध केलें, व आपलें सार्वभौमत्व त्यांच्याकडून मान्य करविलें. दिल्लीच्या मोगल बादशहाच्या संरक्षणाचा भार शिंद्याकडून काढून घेऊन त्यानें तो आपल्याकडे घेतला. हिंदुस्थानांत त्या वेळीं दोनच मध्यवर्ती सत्ता समजण्यांत येत होत्या. दिल्लीची नामधारी बादशाही व पुण्याची पेशवाई; या

दोन्ही सत्ता त्यानें आपल्या तैनाती फौजेच्या तहाचें लोढणें त्यांच्या गळ्यांत अडकवून निष्प्रभ करून टाकल्या. याप्रमाणें इंग्रजांची सार्वभौम सत्ता हिंदुस्थानांत स्थापन झाली. वेल्स्लीनंतर आलेल्या गव्हर्नर जनरलांनीं, इंग्रजी सार्वभौम सत्तेला अनुरूप असलेलें साम्राज्य संपादन करण्याचा मार्ग सहजच चोखाळला. येन केन प्रकारेण एकेक प्रांत इंग्रजांच्या अमलाखालीं येऊं लागला. मार्क्विस हेस्टींग्जच्या कारकीर्दींत इंग्रजांचें येथील राज्य बरेंच मोठें झालें. हिंदुस्थानांतील इंग्रजांचें राज्य वाढत होतेंच, पण शिवाय इंग्रजांना हिंदुस्थानांत कोणीच शत्रू उरला नसल्यामुळें हिंदुस्थानच्या शेजारीं असणाऱ्या अफगाणिस्थान, बलुचिस्थान, इराण, ब्रह्मदेश वगैरे सीमांतर प्रदेशांवरही इंग्रजांची नजर पोहोंचूं लागली. सार्वभौम सत्तेच्या प्रत्यक्ष स्वामित्वाखालीं अखिल हिंदुस्थान यावें, या महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊनच कंपनीचे पुढील गव्हर्नर जनरल आपला राज्यशकट चालवूं लागले. संस्थानिकांचे हक्क, अधिकार व प्रांत संधी सांपडतांच संपुष्टांत येऊं लागले. कोणत्या तरी निमित्तानें एकेक प्रांत इंग्रजी अमलांत सामील होऊं लागला, आणि लॉर्ड डलहौसीनें आपल्या आठ वर्षांच्या कारकीर्दींत बरेचसे संस्थानिक नाहींसे केले, आणि त्यांचीं संस्थानें इंग्रजी राज्यांत सामील केलीं. लार्ड डलहौसी आणखी कांहीं वर्षें येथें गव्हर्नर जनरल म्हणून राहिला असता, तर उरल्या सुरल्या सर्व संस्थानांवर इंग्रजी लाल रंगाचा कुंचला फिरला जाण्याचा बराच संभव होता. कारण संस्थान खालसा करण्याला फारसें मोठें निमित्त त्याला लागत नव्हतें. संस्थानिक निपुत्रिक असला कीं त्याच्या जवळच्या वारसाला गादीवर बसवावयाचें नाहीं, आणि हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें त्यानें दत्तक घेण्याची परवानगी मागितली तर ती द्यावयाची नाहीं, आणि घेतलेला दत्तक नामंजूर करावयाचा, या युक्तीनें कोणतेंही संस्थान बेवारसी ठरून इंग्रजी मुलखांत सामील होत असे. खराब राज्यव्यवस्था हें देखील संस्थान खालसा करण्याचें राखींव हत्यार होतें. शिवाय प्रजेच्या कल्याणाकरितां आणि राज्यकारभाराच्या सोयीकरितां संस्थानें खालसा करणें त्याच्या दृष्टीनें पुण्यकृत्यच होतें. एकछत्री अमलाखालीं सलंग प्रांत असला म्हणजे सुधारणा करणें सोपें जातें. त्या सणंगांत मध्यें मध्यें संस्थानांचीं लहान लहान ठिगळें लागलेलीं असलीं, तर सुधारणा करणें खर्चाचें व जिकिरीचें होतें. लार्ड डलहौसीची विचारमालिका व तर्कपद्धती असल्या प्रकारची असल्यामुळें त्यानें आपल्या कारकीर्दींत इंग्रजी राज्याचा पुष्कळच विस्तार केला.

इंग्रजी साम्राज्याचा विस्तार लॉर्ड डलहौसीच्या कारकीर्दींत झाला असला, तरी राजेरजवाड्यांचीं मनें कंपनीविषयीं त्याच्या कारकीर्दींतच अतोनात कलुषित

झाली. त्यांनीं कंपनीचें मांडलिकत्व पत्करून कंपनीच्या फौजेकरितां मुलूखही तोडून दिला होता. इतर संस्थानिकाशीं कंपनीच्या परवानगीशिवाय तहनामे करण्याची त्यांना मनाई असली, तरी अंतर्गत कारभारांत त्यांना पूर्ण स्वातंत्र्य होतें. गादीच्या वारसाचा प्रश्न त्यांच्या धर्मशास्त्राप्रमाणेंच निश्चित होणें जरूर होतें. संस्थानिकांच्या दृष्टीनें तरी तहनाम्यांचा हाच अर्थ होता. परंतु कंपनी त्या तहनाम्यांचा अर्थ हिंदी लोकांच्या धर्माला व पूर्वापार चालत आलेल्या परंपरेला लाथाडून आपल्या मनाप्रमाणें लावूं लागली. संस्थानिकांनीं आपलें म्हणणें व्यवस्थेशीर रीतीनें मांडलें तरी तें ऐकणार कोण ? संस्थानिक म्हणजे निर्बल मांडलिक व कंपनी सत्ताधीश सार्वभौम—या दोघांच्या कागदी झटापटींत कंपनीचाच अर्थात वरचष्मा होत असे. कारण कंपनीनें केलेल्या तहनाम्याच्या अर्थाला फौजेचें व तोफांच्या दणदणाटाचें पाठबळ होतें. यामुळें संस्थानिकांच्या दृष्टीनें घस सोसून केलेले जुने तहनामे वाण्याच्या दुकानांत साखर बांधण्याला उपयोगी पडणारे कागदाचे कपटे ठरले ! राज्य खालसा करतांना तुम्हाला भरपूर पेनशन देऊं, तुमचा इंतजाम राखूं, तुम्हाला यात्रा करवूं अशी शाब्दिक साखर कंपनीकडून भरपूर पेरण्यांत येई, परंतु देतांना कंपनी हातीं नरोटीच देई. संस्थानिकाना या उदाहरणांनीं कंपनीचा भरंवसा वाटेनासा झाला. आपलें देखील राज्य केव्हां व कोणत्या निमित्तानें खालसा केलें जाईल, याचा त्यांना अंदाजच राहिला नाहीं. डलहौसीच्या कारकीर्दीत खालसा झालेला मुलूख एवढा मोठा व डोळ्यांत सहज भरण्यासारखा होता कीं, तो विलायतेस गेल्यावर हिंदुस्थानांतील उरलेल्या संस्थानिकांना हायसें वाटलें ! मोगल अमलाप्रमाणेंच कंपनीच्या राज्यांतही संस्थानांची शाश्वती उरली नाहीं. परंतु त्या वेळीं संस्थानिक फौजबंद असल्यामुळें त्यांना आपापल्या संस्थानांचें निदान संरक्षण तरी करण्यास सांपडे, व त्यामुळें प्रसंगविशेषीं संस्थान खालसा करण्यास सार्वभौम बादशाहा कचरत असत ! कारण संस्थान खालसा करूं पाहणें, म्हणजे स्वतांवर युद्धाची आपत्ती ओढवून घेणें होय ही गोष्ट ते जाणून होते, आणि एखादा संस्थानिक लहान असला तरी तो जीवावर उदार झाला म्हणजे आटोपण्यास बादशाही फौजेलाही जड पडत असे. परंतु हल्लींचे हे संस्थानिक दांत व नखें काढून घेतलेल्या वाघाप्रमाणें निःशस्त्र बनले होते, आणि त्यांचीं संस्थानें तरवारीच्या खणखणाटाऐवजीं शाब्दिक अवडंबरांत आणि तहनाम्यांतील कलमांच्या कायदेशीर पाडलेल्या किसांत सांपडून नष्ट होत होतीं, आणि उघड्या डोळ्यानें ही नागवणूक निमूटपणें त्यांना सहन करावी लागे.

संस्थानिकांप्रमाणें सामान्य जनताही इंग्रजांवर नाराज झाली होती. इंग्रजांच्या राज्यांत लोकांच्या कर्तबगारीला वावच उरला नव्हता. कारकून, चपराशी किंवा फार तर एखाद्या साहेबाचा मदतनीस होणें ही मुलकींतील कमाल मर्यादा, आणि साध्या तरण्याबांड लेफ्टनंटच्या हाताखालीं कंबरेपर्यंत लवणारी जमादारी-सुभेदारी ही फौजेंतील कमाल मर्यादा, स्वराज्यांत मर्दूमकी गाजवून सरदारी प्राप्त करून घेणाऱ्या लोकांचें समाधान करूं शकत नसे! एकामागून एक स्वराज्यें नष्ट होऊन फिरंगी सत्तेखालीं हिंदुस्थानचा कोनाकोपरा देखील जाऊं लागला, हें पाहून लोकांचें मन दुःखित झालें. आपसाआपसांतील तक्रारी व भांडणें, परस्परांचा मत्सर आणि विद्रोह आणि लोकांची स्वाभिमानशून्यता यांचा इंग्रजांनीं पुरा फायदा घेऊन सर्व देश पंजाखालीं घातला, याची पुसट जाणीव लोकांना होऊं लागली. परंतु त्या जाणीवेच्यामागें एकराष्ट्रीयत्व, स्वदेशाभिमान, बंधुप्रीति अशा उदात्त भावना नसून, इंग्रजी आमदानींत वैयक्तिक स्वार्थाला आळा बसला, आणि महत्त्वाकांक्षेला बांध घातला गेला याचेंच दुःख जागृत होतें. लोकांच्या या मनोवृत्तीमुळें लार्ड डलहौसीनें केलेल्या अनेक सुधारणा त्यांच्या डोळयांत भरल्या नाहींत; इतकेंच नाहीं, तर त्या त्यांना कुधारणा वाटूं लागल्या. आगगाड्या व तारायंत्रें हीं हिंदुस्थानच्या भोंवतीं पसरलेलीं परकी सत्तेची मजबूत जाळीं वाटूं लागलीं. हिंदुस्थान इंग्रजांच्या पंजांतून कदापि निसटूं नये, म्हणून हे भरभक्कम पाश त्याच्यावर टाकण्यांत आले असें लोकांना वाटूं लागलें. विधवाविवाह कायदेशीर ठरविणारा कायदा पास झाल्यामुळें धर्मांत व परंपरागत रूढींत ढवळाढवळ करण्याची कंपनीची इच्छा आहे असें लोकांना वाटलें. ख्रिस्ती झालेल्या इसमांचा वारसहक्क नष्ट होऊं नये, हा कायदा केल्यानें ख्रिस्ती धर्मप्रसाराची कंपनीला इच्छा झाली आहे, अशी त्यांची खात्री झाली. पुष्कळ वेळां आपल्या वडिलोपार्जित इस्टेटीवरील हक्क नाहींसा होईल या भीतीनें धर्मांतराला आळा बसत असे; कारण मनुष्यप्राणी स्वभावतः स्वार्थी असतो. परंतु हा कायदा पास झाल्यानें चचल मनाच्या लोकांवरील दडपण नाहींसें होऊन ख्रिस्ती धर्मप्रसाराचें कार्य सुलभ झालें. या बाबतींत तरी लोकांची शंका अनाठायीं नव्हती. हे दोन्ही कायदे १८५६ सालीं पसार झाले. याप्रमाणें सामान्य प्रजेला देखील हिंदुस्थानदेश ख्रिस्ती करण्याची कंपनीसरकारची इच्छा आहे असें वाटूं लागलें. त्यामुळें तुरुंगांतील कैद्यांना खासगी घरचे लोटे वापरण्याची बंदी होऊन सरकारी टिनपात्रें त्यांच्या नशीबीं आलीं, या शिस्तीच्या साध्या नियमांतही लोकांना धर्मछलाचा वास येऊं लागला.

लोकांच्या या कल्पनेला डलहौसीच्या कारकीर्दीत वाढलेल्या शिक्षणप्रसारानें दुजोरा दिला. इंग्रजी विद्या शिकल्यानें त्वरित अनुभवाला येणारे व्यावहारिक फायदे बरेच होते. थोडेंबहुत इंग्रजी येणाऱ्या इसमाचा कंपनीच्या नोकरींत सहज प्रवेश होत असे. सार्वभौम कंपनी सरकारची कनिष्ठ नोकरी म्हणजे पैसा मिळविण्याचें व लोकांवर सत्ता गाजविण्याचें प्रमुख साधन होतें. खुद्द कंपनी सरकारला द्रव्याची अतोनात हांव होती; कारण भागीदारांना भरपूर मुनाफा दिला म्हणजे ते खूष राहून कंपनीच्या राज्यकारभारावर टीका करीत नसत. कंपनीचे अनेक भागीदार पार्लमेंटचे सभासद असत, व पार्लमेंटची कंपनीच्या कारभारावर निगराणी असे. तेव्हां भरपूर व्याज व मुनाफा वांटून या सभासदांचीं तोंडें एकदां बंद केलीं, म्हणजे कंपनीच्या सावळ्या गोंधळावर पार्लमेंटांत फारशी टीका होण्याची धास्ती नसे. तेव्हां कंपनीचें लक्ष द्रव्यावर असे. कंपनीचे येथील अंमलदारही त्यामुळें पैशावरच लक्ष ठेवीत आणि त्यांचे हिंदी मदतनीस तरी मग पैशाला कां देव मानणार नाहींत ? खुद्द इंग्रजी अधिकाऱ्यांत देखील लांचलुचपत व नजराणे घेणें सररास चालू होतें. नवें राज्य व नवा मुलूख जिंकतांना शिपायांना व त्यांच्या अधिकाऱ्यांना लुटीची पूर्ण मुभा असे. त्यांचे हिंदी मदतनीसही आपल्या वरिष्ठांना खूष ठेवून स्वतांची तुंबडी भरीत असत. प्रजेवर थोडाफार जुलूम झाला तरी त्याची फारशी कोणी पर्वा करीत नसे. महत्वाकांक्षी तरुणांना त्यामुळें इंग्रजी विद्या साहजिकच एखाद्या कामधेनूप्रमाणें वाटूं लागली. बुद्धिमान् तरुणांचें लक्ष जुन्या संस्कृत व आरबी विद्येवरून उडून इंग्रजीवर बसलें. ह्या तरुणांचा पोशाख व आचारविचार इंग्रजी पद्धतीवर गेला, आणि स्वधर्माविषयीं त्यांच्या मनांत तिटकारा बाणून ख्रिस्ती धर्माविषयीं त्यांना प्रेम वाटूं लागलें. जुन्या चालीरीती व रूढी त्यांना तिरस्करणीय वाटून इंग्रजी चालीरीती समाजांत रूढ करण्याची ते खटपट करूं लागले. इंग्रजी शिक्षणाच्या हळदीनें झटपट पिवळे बनलेल्या या थोड्याशा तरुणांचा बाकीचा हिंदी समाज द्वेष करूं लागला, आणि हे मूठभर सुशिक्षित लोकही आपणाला शहाणे समजून सामान्य जनतेपासून फटकून वागूं लागले. या इंग्रजी सुशिक्षितांनीं **ब्राह्मसमाज** हा एकेश्वरी पंथ काढला. सामान्य लोकांना तें ख्रिस्ती धर्माचेंच एक स्वरूप वाटत असे. कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ होतात, आणि ज्याअर्थी इंग्रजी शिक्षण संपादन केलेले हिंदी तरुण कुऱ्हाडीचे दांडे बनून स्वधर्मांवर व स्वजनावर तटून पडूं लागले. त्या अर्थी इंग्रजी विद्येचा सामान्य लोकांना तिटकारा

वाटूं लागला, आणि हिंदुस्थान देश सुलभ रीतीनें ख्रिस्ती बनविण्यासाठीं शाळांचें जाळें परण्याची योजना कंपनी सरकारनें केली अशी त्यांची खात्री झाली.

यांपैकीं कांहीं शाळा ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं चालविलेल्या होत्या. त्यांना सरकारकडून मदत मिळत असे. या शाळांत शिकणारे कांहीं हिंदी तरुण खरोखरच बाटून ख्रिस्ती झाले. मिशनऱ्यांचे दवाखाने, शाळा व मिशनगृहें ठिकठिकाणीं स्थापन होऊं लागलीं. या सर्व संस्थांतून हिंदी लोकांत बायबलाचा प्रसार करून त्यांना ख्रिस्ती करण्याचें काम चालू झालें. ह्या संस्था सरकारी नसून खासगी होत्या हें खरें, परंतु मिशनरी लोक धर्मानें व रंगानें राज्यकर्त्यांच्या जातीचे होते. मिशनरी लोकांचें व कंपनीच्या अधिकाऱ्यांचें खासगी दळणवळण व सामाजिक संघटन चालू असे. यामुळें सामान्य जनतेला असें वाटलें कीं, लोकांना परभारें मिशनऱ्यांकडून बाटवून आपण वरपांगी नामानिराळे राहण्यांत, लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचा केवळ कंपनीचा हा एक डाव आहे. सर्वच मिशनऱ्यांचें वर्तन व काम करण्याच्या रीती शुद्ध स्वरूपाच्या नसत. नोकरीचें, द्रव्याचें किंवा लग्नाचें आमिष उल्लू तरुणांना दाखवून ते त्यांना ख्रिस्ताच्या जाळ्यांत ओढीत असत, तर कांहींना अडचणींत गांठून त्यांच्या भांबावलेल्या मनःस्थितीचा फायदा घेऊन त्यांना ख्रिस्ती करण्यांत येई. पुष्कळ मिशनरी सरळ धोपट मार्गानें वागत, व भूतदयेच्या दृष्टीनें हिंदी लोकांची सेवा करीत, व त्यांची स्थिती सुधारण्याकरितां त्यांना फुकट औषधोपचार करीत व ज्ञानदान देत असत, ही गोष्ट प्रांजलपणें कबूल केली पाहिजे. परंतु कांहीं मिशनरी बाजारांत किंवा दुसऱ्या चवाठ्यांच्या जागीं उभे राहून, हिंदी लोकांना ऐकवणार नाहींत अशा बीभत्स व ग्राम्य शिव्या कृष्णाला किंवा महंमद पैगंबराला देत असत, व हिंदु मुसलमानांच्या धर्मांची विलक्षण निंदा व टवाळी करीत असत. मग संशयाची कावीळ झालेल्या डोळ्यांना त्यांच्या सरळ वर्तनांतही एखादा गुप्त कावा दिसला असल्यास त्यांत नवल नाहीं.

संस्थानिक व सामान्य लोक, त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील मध्यम, कुलीन व घरंदाज लोकांचीं मनें कंपनीविषयीं क्षुब्ध झालीं होतीं. याला मुख्य कारण म्हटलें म्हणजे, थामसन साहेबांनीं सुरू केलेली जमीनीच्या बंदोबस्ताची नवीन पद्धती हें होय. हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून शेतकरी लोक व सरकार यांचा प्रत्यक्ष संबंध कधींच येत नसे. खेड्यांत शेतकरी लोकांची संघटना असे, आणि खेड्यांतील तंटेभांडणें ते आपल्या पंचांमार्फत तोडीत. जमीनीचे वारसदारी हक्क, शेतांचे

बांध व सडका, खेड्यांतील साफसफाई व चराईची जागा, गांवठाण व देवळें, वगैरे सर्व महत्वाच्या बाबींचा निकाल या पंचायतींतच होत असे. राज्य कोणाचेंही असो व कोणतीही सत्ता सार्वभौम असो, प्रत्येक खेडें आपल्या कारभारापुरतें स्वराज्य भोगीत असे. ग्रामपंचायतीमार्फत खेड्यांतील सर्व राज्यकारभार चालत असे, व पंचायतीच्या निवाड्यावर सर्वांचा विश्वास असे व सर्वजण तो निवाडा मानीत असत. कारण पंचांची गांवकऱ्याकडून निवड होत असे, आणि अनुभवी व सचोटीचे म्हणून ज्यांचा गांवांत बोलबाला असे, असे इसम पंच म्हणून निवडले जात. पांचामुखीं परमेश्वर बोलत असतो ही लोकांची कल्पना असल्यामुळें पंचावर सर्वांचा विश्वास असे, व पंचांनाही गांवांतच आपले आयुष्य काढावयाचे असल्यामुळें वाकडा निकाल देण्याची त्यांची प्राज्ञा नसे. सर्व खेड्यांवर मिळून जें सरकार-देणें बसत असे त्याची व्यक्तिशः वांटणी या पंचायतीकडूनच होत असे, आणि एकंदर शेतकऱ्यांकडून सरकारी देण्याची वसूली करून सर्व रकमेची सरकारांत वेळच्यावेळीं पटणी करण्याचा अधिकार सरपंचाचा असे. यामुळें खेड्यांतील शेतकरी वर्गाचा सरकारशीं मुळींच संबंध येत नसे, आणि सरकारी अधिकाऱ्यांनीं खेड्याच्या कारभारांत एखादे वेळीं ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न केला, तर सर्व शेतकरी एक जुटीनें त्या गोष्टीला विरोध करीत. एखाद्याच्या शेतांत एखाद्या वर्षीं नापिकी झाली, किंवा लग्नकार्यें अथवा घरांत मृत्यु होऊन एखादें कुटुंब खालावलें, म्हणजे तेवढ्यापुरतें त्या घरावर पंच मंडळी सरकारपट्टीचा हिस्सा बसवीतच नसत, व सरकार देण्याची कुलरकम बाकीच्या इसमांकडूनच वसूल करीत. अशी सूट मिळाल्यामुळें त्या घराण्याला संकटांतून सांवरण्याला संधी मिळत असे. त्याचप्रमाणें घरांतला कर्ता पुरुष मरण पावला व मुलें लहान असलीं तर त्यांच्या जमीनीची व्यवस्था पंचायतीकडूनच होत असे. यामुळें खेड्यांतील लोकांत बंधुभाव वसत असून एकमेकांसाठीं स्वार्थत्याग करण्यांत ते सदोदित तत्पर असत. विपत्तींत सांपडलेल्या कुटुंबासाठीं आज आपण घस सोसली, तर उद्यां दुर्दैवानें आपणावर प्रसंग आला तर इतर ग्रामबंधू आपल्या मदतीस धांवून येतील, ही त्यांची गोड व प्रेमळ भावना असे.

खेड्यांतील स्वराज्य व ग्रामपंचायत ही पूर्वापार चालत आलेली संस्था होती. हिंदूंचें राज्य जाऊन त्या जागीं मुसलमानांचें राज्य झालें तरी देखील या संस्थेला धक्का लागला नाहीं. महाप्रतापी व थोर अकबर बादशहानें जमीनमहसुलाचा नवीन बदोबस्त केला, तरी देखील या धोरणांत त्यानें फरक केला नाहीं.

पुढें देखील हिंदू व मुसलमान यांच्यांत वैर व स्पर्धा माजली तर ती शहरांत माजे. खेड्यांतील हिंदू व मुसलमान शेतकरी गुण्यागोविंदानें व बंधुभावानेंच शेजारीं शेजारीं राहात असत. कारण खेड्यांतील जमीन खेड्यांत राहणाऱ्या व शेतीवर मेहनत करून उदरनिर्वाह करणाऱ्या शेतकऱ्यांची, ही भावना सर्वांत असे. कशीही विपत्ति ओढवली तरी आपल्या बायकामुलांना पंचायत उपाशीं मरूं देणार नाहीं अशी सर्वांची खात्री असे, आणि म्हणूनच तेथें एकजूट असे. कधीं भांडण झालेंच तर तें पंचायतीपुढें जात असे, आणि शाब्दिक कायद्यापेक्षां भूतदया, माणुसकी व समानता यांचा विचार होऊनच तें तुटत असे. दुःखानें व दारिद्र्यानें गांजलेल्या कुटुंबापासून, पूर्वी दिलेली कर्जाऊ रक्कम व्याजासुद्धां पैनपै चोपून घेऊन त्या कुटुंबाला देशोधडीस लावून त्याची जमीन हिसकावून घेणें, या पद्धतींत शक्यच नव्हतें. उलट सुबत्तेचा काळ आला तर आजापणजांचें ऋणदेखील नातू पणतू मुदत टळल्याची सबब न सांगतां फेडण्यास तयार असत. या लहानशा स्वराज्याला सरकारदेणें मात्र द्यावें लागे, आणि त्याची भरपाई सरपंचांमार्फत होत असे. निरनिराळ्या टापूकरितां सरकारदेण्याची जबाबदारी पत्करलेले तालुकदार, जमीनदार, किंवा मालगुजार असत. त्यांच्याजवळ सरपंच रकमेची भरपाई करीत, आणि हे बडे अधिकारी लोक आपापल्या हद्दींतील ठरींव सरकारदेणें सरकारी खजिन्यांत पोंचतें करीत व उरलेलें स्वतःकरितां राखून ठेवीत. सरकार व सामान्य रयत यांच्यामध्यें पंचायत व तालुकदार असे दोन प्रबळ मध्यस्थ असल्यामुळें, सामान्य शेतकरी लोक राज्यक्रांति घडून एकाच्या ऐवजीं दुसऱ्याचें राज्य प्रांतावर चालू झालें तरी निर्धास्त असत. त्यांना त्याची पर्वाच नसे. कारण त्यांचें स्वराज्य लोकशाही स्वरूपाचें असे. राज्यक्रांति झाली तरी तिची मिजास शहरांत! त्यांची ग्रामपंचायत कायमच असे.

परंतु ही प्राचीन व्यवस्था मोडण्याचें कंपनीनें ठरविलें. सरकारचा व रयतेचा प्रत्यक्ष संबंध येईल अशी नवी योजना थामसन साहेबानें बसविली व ती एकामागून एक प्रांतांत लागू करण्यांत येऊं लागली. ही व्यवस्था अमलांत आणणें म्हणजे पंचायती व तालुकदार हे दोन मध्यस्थ नाहींसे करणें भाग होतें. त्यांपैकीं पंचायतीचीं मध्यस्थी सरकारला फारशी नडत नव्हती. कारण खेड्यांतील शेतकऱ्यांपासून सारा वसूली करण्याकरितां एखादा गांवकामदार कंपनीला एवींतेवीं नेमावा लागणारच. तेंच काम सरपचानें केलें म्हणजे झालें. मात्र सरपंचाला पूर्वी पुष्कळ अधिकार होते. कंपनीनें नवे नवे नियम तयार करून, त्याबरहुकूम त्यानें

वागावें व थोडासा मुशाहरा घेऊन कंपनीची नोकरी बजवावी असें ठरविण्यांत आलें. सरपंचाला मुशाहराचें मधाचें बोट लावल्यामुळें जो पूर्वी लोकाभिमुख होता तो आतां सरकाराभिमुख बनला. याप्रमाणें हळुहळू ग्रामपंचायती मोडून हल्लींचा पाटीलपटवारी—कोतवाल वर्ग अस्तित्वांत आला. खेड्यांतील अभंग चालणारें जुनें स्वराज्य नाहींसें होऊन, त्याच्या जागीं सरकारच्या गुमास्त्यांचा अंमल चालू झाला. शहराप्रमाणें ग्रामसंस्थाही नोकरशाहीच्या ताब्यांत गेल्या. ही सर्व क्रांति एकदम घडून आली असें नाहीं. तिला बराच काळ लागला.

याप्रमाणें एक मध्यस्थ नष्ट झाला, तरी तालुकदार व जमीनदार यांचा वर्ग मोडणें तितकें सोपें नव्हतें. तालुकदार व जमीनदार यांचीं वतनें वंशपरंपरेनें चालू असल्यामुळें ते श्रीमंत व प्रबल बनले होते. पदरीं थोडी फार फौज ते बाळगून असत, आणि त्या फौजेच्या मदतीनें आपल्या इलाख्यांतील बंदोबस्त ठेवीत. चोराचिलटांचा उपद्रव नाहींसा करून आपल्या इलाख्यांत शांतता राखणें त्यांचें कर्तव्य होतें. त्यामुळें ते स्वतांला आपल्या इलाख्याचे लहानसे राजेच समजत असत, आणि त्यांचा इलाख्यांतील लोक योग्य मानही ठेवीत असत. अशा प्रबल लोकांना नष्ट करणें व त्यांचे वंशपरंपरागत अधिकार नाहींसे करणें सहज काम नव्हतें. परंतु कोणत्या ना कोणत्या निमित्तानें राज्येंच्या राज्यें खालसा करून राजेरजवाड्यांना पेन्शनर बनविणाऱ्या कंपनीला ही गोष्ट सुलभ वाटली. संस्थानिकांच्या रोषाची ज्यांनीं पर्वा केली नाहीं ते इंग्रज या भुसकुट्या जमीनदारांच्या असंतोषाकडे थोडेंच लक्ष देणार होते ? त्यांनीं जमीनदाराचे अधिकार व कार्यक्षेत्र भराभर मर्यादित करण्याचा उपक्रम सुरू केला, आणि नव्या बंदोबस्ताच्या कायद्याखालीं नांदावयास त्यांना भाग पाडलें. निमित्तांना कंपनीजवळ केव्हांही तोटा नव्हता. कोणी जमीनदार कर्जबाजारी झाले, कोणाची वागणूक उच्छृंखलपणाची होती, कोणी व्यसनाधीन होते, कोणाला आपल्या टापूंत नीट बंदोबस्त ठेवतां येत नव्हता, तर कोणी सरकारदेणें वेळच्या वेळीं देत नव्हते, अशा नाना प्रकारच्या बयादी उभ्या करून जमीनदाराच्या ताब्यांत असलेलीं गांवें कमी करण्यात येऊं लागलीं. कंपनीच्या नव्या जमीनमहसुलाच्या कायद्यांची अंमलबजावणी अतिशय कडक निर्दयतेनें, अर्थापेक्षां शब्दांकडे अधिक लक्ष पुरविण्यांत येऊन होऊं लागली, व त्यांचीं वतनें जप्तींत निघालीं. बलाढय व धनाढय जमीनदार या नव्या बंदोबस्तानें कर्जबाजारी झाले. कारण जुनी बसलेली घडी विसकटली व नवी जमेना. एकाच म्यानात कंपनीचे अधिकारी व

जमीनदार ह्या दोन तलवारी नांदणें शक्य नव्हतें. कंपनीची तरवार जड व तीक्ष्ण असल्यामुळें जमीनदारी तलवारी त्या खणखणाटांत मोडून त्यांचे विळे कोयते बनूं लागले ! तांब्याचें भांडें व मडकें एकमेकांवर आदळलें तर परिणाम काय होणार ? कंपनीचें रोजचें वर्तन व नीती पाहून शेतकरीवर्गानें कंपनीला मालक समजून मुजरा केला. नव्या राज्यकारभाराचें धोरण पाहून शेतकरीवर्ग कंपनीच्या अधिकाऱ्यांशीं नमतें घेऊन गोडीगुलाबीनें वागूं लागला, आणि त्या भरवंशावर जमीनदारांना व त्यांच्या मुनीमांना धाब्यावर बसवूं लागला. बरें, एखादा खटला कंपनीच्या न्यायासनासमोर गेला, तर त्याचा निकाल शेतकऱ्याप्रमाणें हटकून होत असे. कारण जमीनदारांच्या गुलामींतून शेतकऱ्यांची सोडवणूक करून त्यांना स्वतंत्र केलें पाहिजे या भावनेनें कंपनीचे न्यायाधीश प्रेरित झाले होते. त्यामुळें नव्या योजनेच्या अंमलबजावणींत जमीनदारवर्ग भरडला जाऊं लागला. त्यांची सत्ता नष्ट करण्यांत आली, परंतु सरकार देणें भरण्याची त्यांची जबाबदारी प्रथम तरी कायमच राखली गेली.

थामसन साहेबांच्या या पद्धतीला धांगडधिंगा घालण्यास बंगाल इलाख्यांत फारसा वाव नव्हता, कारण त्या ठिकाणीं लार्ड कार्नवालिसच्या वेळेपासून कायम धारा-पद्धती प्रचारांत होती. परंतु बिहार, ओरिसा, काशी, प्रयाग, लखनौ, बुंदेलखंड, सागर व जबलपूर या प्रांतांत ही नवी पद्धति चालू करण्यांत आली; त्यामुळें ह्या सर्व टापूमधील जमीनदार चुरडले गेल्यामुळें ते इंग्रजांचे शत्रु बनले. हिंदु व मुसलमान या दोन्ही धर्मांचे जमीनदार व तालुकदार याप्रमाणें दुखावले गेल्यामुळें इंग्रजांचा द्वेष करूं लागले. हीं त्यांचीं वतनें पिढोजात असल्यामुळें त्यांच्यावर त्यांचें साहजिकच अतोनात प्रेम होतें, व वतनाच्या रक्षणार्थ प्राण देण्याचीही त्यांची तयारी असे. हीं वतनें म्हणजे जमीनदारांच्या पूर्वजांच्या वैभवाचीं व पराक्रमाचीं स्मारकेंच होतीं. ह्या वतनांत त्यांच्या घराण्याचा इतिहास व गौरव सांठला होता. कारण त्यांच्या पूर्वजांनीं आपल्या गुणांवर व पराक्रमांवर तीं कमावलीं होतीं. परंतु हीं वतनें तुमच्याकडे कशीं आलीं, ह्याच्या सनदा पेश करा, नाहींपेक्षां हीं तुमचीं नव्हेत असा निकाल करून आम्ही तीं जप्त करूं, असा कंपनीच्या अधिकाऱ्यांनीं जमीनदारांना धाक घातला. जुन्या सनदांचा पुढें असा उपयोग लागेल ही गोष्ट कोणाच्या स्वप्नींही नसल्यामुळें पुष्कळ सनदापत्रे हरवलीं होतीं, अनेक कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडलीं होतीं, कित्येक अंदाधुंदींत व लुटांत नाहींशीं झालीं होतीं किंवा जळलीं होतीं व बरींच चोरीस गेलीं होतीं. यामुळें जमीनदार

लोकांना आपल्या ताब्यांत असलेल्या वतनासंबंधीं फारच थोडीं सनदापत्रें पेश करतां आलीं. बरेच वेळां राजेलोक किंवा नबाब खुश झाले म्हणजे तोंडींच हुकूम देऊन एखादें लहानस वतन एखाद्याला बहाल करीत असत, आणि तें त्या इसमाकडे वंशपरंपरेनें चालत असे. परंतु शेंपन्नास वर्षांनंतर त्याच्या वंशजानें त्यासंबधी लेखी सनद कशी व कोठून पेश करावी ? कित्येक जमीनदारांच्या पूर्वजांनीं आपल्या तलवारीच्या जोरावर आपल्या गांवाभोंतालचा थोडासा मुलूख कबजांत घेऊन आपल्या पराक्रमानें वतन संपादन केलेलें असे, व तें त्यांच्या वंशाकडे चालत असे. त्या वंशजांनीं लेखी सनदापत्रें पेश करून वतनावरील आपला हक्क कसा शाबीत करावा ? अनेक जमीनदारांनीं आपल्या तलवारीच वतनाच्या सनदा म्हणून कंपनीच्या अधिकाऱ्यांपुढें पेश केल्या, आणि याच तीक्ष्ण सनदांच्या जोरावर आमच्या पूर्वजांनीं वतनें संपादन केलीं व आपल्या वंशांत टिकविलीं अशीं निर्भीड व बाणेदार उत्तरें दिलीं. परंतु ह्या बाणेदारपणाचें कौतुक करण्याची कंपनीची इच्छा थोडीच होती ?

जमीनदार लोकांनीं आपल्या हक्कांचें परोपरीनें समर्थन करून पाहिलें, परंतु तें अरण्यरुदन ठरलें. ज्याअर्थीं वतनें जमीनदारांच्या ताब्यांत होतीं व ते त्यांचा उपभोग घेत होते, त्याअर्थीं त्यांना कायदेशीर मालक समजणें जरूर व रास्त होते. ते मालक नाहींत हें सिद्ध करण्याची जबाबदारी कंपनीच्या अधिकाऱ्यावर होती. परंतु न्यायाचें हें सामान्य व सर्वमान्य तत्व आपल्या स्वार्थाकरितां कंपनीनें डोळ्यांआड केलें, आणि आज तुमच्या ताब्यांत असलेलें वतन तुमच्या पूर्वजांनीं अन्यायानें संपादन केलें नाहीं, ही गोष्ट लेखी सनदापत्रें पुराव्यांत पेश करून सिद्ध करा, असें अन्यायाचें व जुलमी आव्हान कंपनीनें जमीनदारांना केलें. एखाद्या माणसाला तुझ्या ताब्यांत असलेली संपत्ती तूं किंवा तुझ्या पूर्वजांनीं चोरी करून मिळविली नाहीं, हें सप्रमाण सिद्ध कर नाहींपेक्षां आम्ही ती जप्त करूं, असें म्हणण्यांतलाच हा प्रकार होता. परंतु न्यायान्यायाची पर्वा न करतां, जमीनदारांचा मालकी हक्क उघड दिसत असतांही कंपनी सरकारनें पुराव्याचा बोजा जमीनदारांच्या माथीं मारला, आणि ज्या मुलखाबद्दल किंवा गांवाबद्दल त्यांना सनदा पेश करतां आल्या नाहींत, तीं सर्व वतनें अन्यायानें संपादन करण्यांत आलीं असावींत असें ठरविण्यांत येऊन जप्त करण्यांत आलीं. या न्यायपद्धतीनें जमीनदार कसे नागवले गेले असतील याची कोणालाही सहज कल्पना करतां येईल. मैनपुरीच्या जमीनदारींत दोनशें गांव मोडत होते, त्यांपैकीं एकशें

एकुणपन्नास गांव जप्त करण्यांत आले. चटगांव जिल्ह्यांतील सर्वच जमीनदार आपल्या पूर्वापार वतनांना मुकून भिकारी बनले; अशीं उदाहरणें हजारों देतां येतील. परंतु एक नमूनेदार उदाहरण देऊनच वाचकांची जिज्ञासा पुरी करण्याचा आमचा विचार आहे.

नरसिंगपूर जवळील दिल्हेरी येथील गोंड राजा इंग्रजांशीं सदोदित राजनिष्ठ असे. वास्तविक तो एक मोठा जमीनदारच होता, परंतु त्याच्या जमीनदारीच्या विस्तारामुळें त्याला राजा या पदवीनें संबोधण्यांत येई. १८४२-४३ सालच्या धामधुमींत देखील त्यानें इंग्रजी अधिकाऱ्यांना परोपरोची मदत केली. अफगाण युद्धाची बसलेली थप्पड व नंतर उपस्थित झालेलें शिंद्याशीं युद्ध, यामुळें भोंवतालचा प्रदेश उत्तेजित झाला असतांही राजानें आपली इमानदारी व मैत्री सोडली नाहीं. याबद्दल त्याला कंपनीकडून सन्मानार्थ एक सुवर्णपदक देण्यांत आलें होतें. राजाचा खासगी खर्च अवाढव्य असल्यामुळें जमीनदारीवर बरेंच कर्ज झालें होतें. परंतु त्या कर्जाच्या निमित्तानें आपल्या जमीनदारीवर इंग्रजांची झडप पडणार हें दिसून येतांच त्यानें आपला खासगी खर्च एकदम कमी केला, व जमीनदारीचा बंदोबस्त नीट करून आणि कारभार स्वतां पाहून झालेलें कर्ज त्यानें ताबडतोब फेडून टाकलें. त्यानंतर सागर व नर्मदा प्रांतांतील जिल्हे राज्यकारभाराच्या सोयीकरितां संयुक्त प्रांताला जोडण्यांत आले. थामसन साहेबांना कंपनीच्या राज्यांत एवढा मोठा जमीनदार राहणें कसें आवडावें ! इंग्रजी राजनीती प्रकट झाली, आणि नरसिंगपूरचे इंग्रज अधिकारी क्याप्टन टर्नान यांना थामसन साहेबाकडून असा खलिता आला कीं, 'ज्याअर्थी दिलेरीच्या राजाला आपली इस्टेट नीट पाहतां येत नाहीं, त्याअर्थी त्याच्या नालायकीबद्दल त्याची राजा ही पदवी काढून घेण्यांत येऊन त्याची जमीनदारी जप्त करण्यांत येत आहे, असा निरोप राजेसाहेबांस कळवावा.' थामसनसाहेबांनीं मोठ्या औदार्यानें थोडीशी नक्त नेमणूक राजेसाहेबाकरितां त्या खलित्यांत मंजूर करून त्यांनीं भीक मागूं नये अशी योजना केली होती ! या अन्यायाबद्दल टर्नान साहेबानें पुष्कळ ओरड केली, परंतु थामसन साहेबांच्या कचेरींतून एकदां सुटलेला हुकूम परत कसा घेतला जाणार ? राजेसाहेबांना जेव्हां ही अन्याय्य घटना कळली, तेव्हां त्यांनीं कंपनीनें त्यांना पूर्वी गौरवार्थ दिलेलें सुवर्ण-पदक टर्नानपुढें फेकलें, व माझ्या प्रजाजनांत आणि माझ्या जातभाई समोर तुम्ही माझी अशी अप्रतिष्ठा व मानखंडना करतां, तेव्हां तुमच्या मैत्रीला व देऊं केलेल्या नेमणुकीला

धिक्कार असो, असें बाणेदार उत्तर दिलें. टर्नाननें त्याला शांत केलें, परंतु त्या प्रदेशांत राहणाऱ्या सर्व इसमांना इंग्रजांची अतोनात चीड आली. टर्नानला आपल्या इच्छेविरुद्ध वरिष्ठांच्या या अन्यायी व झोटिंगशाही हुकमाची अंमलबजावणी करावी लागली. त्या घराण्याचा सपशेल नाश होऊं नये म्हणून त्यानें आपल्याकडून शक्य तेवढी राजाला सवलत दिली, परंतु तो तरी काय करूं शकणार ? थामसनसाहेबांची ही कुटिल बंदोबस्ताची नीति अनेक इंग्रज अधिकाऱ्यांना आवडली नाहीं, व त्या नीतीमुळें ठिकठिकाणीं घडणाऱ्या अन्यायाविषयीं त्यांनीं ओरडही केली. परंतु हिंदुस्थान सरकारला व कंपनीला थामसन साहेबांची न्यायपद्धती पूर्णपणें आवडली होती. कारण त्यामुळें कंपनीचें उत्पन्न सारखें वाढत होतें, व मोठमोठे जमीनदार नष्ट होऊन दुबळ्या शेतकऱ्यांशींच कंपनीचा संबंध पुढें येणार होता. जमीनदाराला चुरडण्यापेक्षां दुबल शेतकरी केव्हांही चुटकीसरसा चुरडला जाऊं शकतो. म्हणूनच शेतकऱ्यांची कड घेऊन व त्यांच्या संरक्षणाचा पुकारा करून जमीनदारांवर थामसननें प्रथम हत्यार चालविलें होतें. त्यामुळें इंग्रजी राज्यकारभारांतील कडक शिस्तीप्रमाणें निरनिराळ्या इंग्रज अधिकाऱ्यांना वरिष्ठांच्या हुकमाची तामिली करून हजारों अन्याय करावे लागले.

थामसनसाहेबांनीं उत्तर हिंदुस्थानांत जो गोंधळ घातला त्याचा हुबेहुब कित्ता मुंबई इलाख्यांत इनाम कमीशननें गिरविला. दोघांची काम करण्याची पद्धती व विचारपरंपरा आणि न्यायाची दृष्टि एकाच कायम ठशाची होती. 'सनदा पेश करा व वतनावर हक्क सिद्ध करा, नाहींपेक्षां त्यांना मुकण्यास सिद्ध व्हा,' हाच त्यांचा महामंत्र होता. बरें, ज्या सनदा पेश होत त्या इंग्रजी भाषेंत व इंग्रजी कायद्याच्या शाब्दिक सांचांत नीट बसतील अशा कल्पनेनें थोड्याच पूर्वी लिहिल्या जात असत. त्या सनदांचा अर्थ करणारे न्यायाधीश देशी भाषांशीं, धर्मांशीं, व हिंदी परंपरेशी अपरिचित असे असत. शिवाय सार्वभौम सरकारचें धोरण सामान्यतः जमीनदारांविरुद्ध असल्यामुळें त्यांना फूस मिळाली होती. ह्या अधिकाऱ्यांनीं पेश झालेल्या सनदांचे अर्थ करतांना विद्वत्तेचे जे तारे तोडले व तर्कशास्त्राच्या ज्या कोट्या लढविल्या, त्या पाहून मूळ सनदा देणारे राजे व महाराजे देखील स्वर्गांत कंपित होऊन, त्यांचें आसन डळमळावयास लागलें असेल. 'वंशपरंपरा' या शब्दाचा अर्थ कित्येक शहाण्यांनीं वंश-परं-परा असे छेद पाडून केवळ 'तीन पिढयांकरितां' मर्यादित केला. 'आम्ही व आमचे वंशज गादीवर आहोंत तोंपर्यंत या वतनांना

हात लावण्यांत येऊं नये' अशी ज्या सनदांत आणभाक घातलेली होती तीं वतनें, सनदा देणाऱ्यांचीं राज्येंच मुळीं कंपनीच्या राज्यांत लोपलीं असल्यामुळें खालसा करण्यास हरकत नाहीं असें कांहीं ठिकाणीं ठरविण्यांत आलें. एखाद्या राजोपाध्यायाला दिलेली जहागीर, तो इनामदार मूळ मालकाच्या जागीं स्थानापन्न झालेल्या कंपनी सरकारची उपाध्येगिरी बजावीत नसल्यामुळें जप्त करण्यास प्रत्यवाय नाहीं असें तर्कशास्त्र लढविण्यांत आलें. 'यावच्चंद्रदिवाकरौ' टिकणाऱ्या जहागिरी अमावास्येच्या रात्रीं चंद्रसूर्य दोन्ही नसतांना जप्त करण्यास हरकत नाहीं, असा अर्थ कंपनीच्या दुर्दैवानें अधिकाऱ्यांना सुचलाच नाहीं, नाहींपेक्षां त्या जहागिरी वेळ येतांच जप्त करण्याची संधी कंपनीनें दवडली नसती. याप्रमाणें इंग्रजी शाब्दिक कायद्याच्या व विलायती तर्कप्रामाण्याच्या कचाट्यांत सांपडून अनेक पेश झालेल्या सनदा मातीमोल ठरल्या. निदान वतन देणारे व वतन घेणारे यांच्या दृष्टीनें त्या सनदांचा जो साधा व सरळ अर्थ होत होता, तो इनाम कमीशनला अनेक वेळां अग्राह्य वाटला. हिंदुस्थानांतील तालुकदार, जमीनदार व जहागीरदार यांची सत्ता व श्रीमंती, त्यांचा मुलूख व त्यांचें वैभव याप्रमाणें खच्ची करण्यांत आलें !

कंपनीच्या या नीतीमुळें राजेरजवाडे, मध्यम वर्गांतील लोक, सामान्य प्रजाजन आणि शिपाई यांपैकीं कोणाचाच कंपनीवर विश्वास राहिला नाहीं. ज्या मार्गानें कंपनीनें राज्य संपादन केलें, त्याच मार्गानें कंपनी आपला धर्म हिंदी लोकांवर लादणार असा लोकांचा समज झाला. कंपनी सरकारचे रस्ते, आगगाड्या व तारायंत्रें हीच गोष्ट सुचवूं लागले. शाळा, दवाखाने व मिशनें हीच वार्ता पसरूं लागल्या. सामाजिक सुधारणेचे कायदे हीच गोष्ट सिद्ध करूं लागले. तरुणांच्या मर्यादित झालेल्या महत्त्वाकांक्षा व शिपायांची अधिकारावर खिळलेली परंतु सदासर्वदा अतृप्त असणारी नजर, इंग्रजांकडे संशयास्पद नजरेनें पाहूं लागली. आम्हीं कितीही पराक्रम केले तरी सुभेदारीच्या वरच्या जागेवर आमची नेमणूक कां होत नाहीं, असा प्रश्न शिपाई विचारीत. आमच्या जहागिरी कां जप्त झाल्या, असें मध्यम स्थितींतील सुखवस्तु लोक विचारूं लागले. आमचीं वैभवसंपन्न राज्यें जाऊन आम्ही क्षुद्र पेन्शनर कसे बनलों, हा प्रश्न राजेरजवाडे पुढें करूं लागले! भाकरी कां करपली, पानें का वाळलींत वगैरे प्रश्नांना 'न फिरविल्यानें' असें एकच उत्तर जुन्या सुभाषित दंतकथांत दिलें आहे; त्याप्रमाणेंच इंग्रजांची कुटिल व स्वार्थी नीति-हेंच या तिन्ही प्रश्नांचें एकच उत्तर होतें. लोकांचा

इंग्रजांवरील विश्वास याप्रमाणें अजिबात उडाला असल्यामुळें राज्यप्रसारानंतर धर्मप्रसाराचें कार्य इंग्रज कंपनी हातीं घेईल असें सर्वांना सहजगत्या वाटलें. कारण त्याशिवाय आपली कर्तबगारी व पराक्रम गाजविण्याला कंपनीला दुसरा मार्गच लोकांच्या मतें उरला नव्हता. सर्व हिंदुस्थानभर कंपनीचें राज्य स्थापन झालें. कंपनीनें अतिशय कुटिलतेनें तें राज्य मिळविलें होतें. पूर्वापार इतिहासाच्या पानापानांत कंपनीची कुटिल नीति व्यक्त होत होती. क्लाईव्ह–हेस्टिंगज यांनीं या राजनीतीचा पाया घातला, मधल्या गव्हर्नर जनरलांनीं इमला उठविला व डलहौसीनें शेवटचा कळस चढविला, परंतु त्या कंपनीच्या राजनीतीच्या स्वरूपांत अणूरेणू-इतकाही फरक झाल्याचें लोकांना दिसलें नाहीं. डलहौसीनें नवा पायंडा पाडला अशांतला भाग नाहीं. त्यानें जुनेंच धोरण पण जोरकस रीतीनें पुढें चालविलें. कंपनीच्या एकंदर राजनीतीचें वर जें विस्तृत आलोचन केलें आहे, तें हीच गोष्ट स्पष्ट करण्याकरितां! डलहौसीनें नवीन कांहींच केलें नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रारंभापासूनच्या राजनीतीचा तो केवळ उठावदार दिसणारा कळस होय. त्याच्या अन्यायाची फोड व मीमांसा कंपनीच्या पूर्वेतिहास–परीक्षणानेंच होणार. तेव्हां साम्राज्य स्थापन झाल्यानंतर एवढी पराक्रमी व कुटिल कंपनी पुढें करणार काय, हा प्रश्न उपस्थित झाला. ही हातपाय जोडून स्वस्थ राहील हें लोकांना संभवनीय वाटेना. ती ख्रिस्ती धर्मप्रसारांत आपलें सामर्थ्य वेंचणार असें लोकांना वाटूं लागलें. तिची कुटिल नीति व वांकडी चाल लोकांच्या पूर्ण परिचयाची झाली होती. तोच मार्ग धर्मप्रसारार्थ ती अवलंबणार असें लोकांना वाटूं लागलें. लोकांच्या दृष्टीनें त्याचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं होतीं. अशा मनस्थितींत चरबीनें माखलेल्या नव्या काडतुसानें या दारूच्या कोठारास आग लागली, तर त्यांत नवल तें कोणतें ?

---

## प्रकरण ११ वें.

# वादळाचीं पूर्वचिन्हें

२९ फेब्रुआरी १८५६ रोजीं लॉर्ड डलहौसीनें हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रें लॉर्ड कॅनिंगचे हातीं दिलीं. लॉर्ड कॅनिंगचें इटन व ऑक्सफर्ड येथें शिक्षण झालें असून तो ग्लॅडस्टनचा सहाध्यायी होता. कॅनिंगचा स्वभाव शांत, विनयी

व नम्र होता. त्याची बुद्धिमत्ता तीक्ष्ण होती व स्वभाव दयाळू होता. दुसऱ्याला तोडून टाकण्याची विद्या त्याला येत नव्हती. त्याचा बाप एका काळीं इंग्लंडचा मुख्य प्रधान होता. कॉलेज मधल्या अभ्यासक्रमांत गणित व भाषा या विषयांत त्यानें प्राविण्य मिळविलें. हा उच्चकुळांतील असल्यामुळें २४ वर्षांच्या वयांतच पार्लमेंटचा सभासद म्हणून निवडून आला. परंतु दुसऱ्या वर्षी त्याची आई वारली, व तिची पदवी, तिला दुसरा कोणी वारस नसल्यामुळें याच्याकडे आल्यानें, हा व्हाय-काउंट क्यानिंग या नांवानें उमरावांच्या सभेचा कायमचा सभासद झाला. सर राबर्टपीलच्या मंत्रिमंडळांत परराष्ट्रीय खात्याचा दुय्यम सेक्रेटरी म्हणून त्याची नेमणूक सन १८४१ सालीं झाली. या जागेवर तो १८४६ पर्यंत होता. पुढें कांहीं दिवस जंगलखात्याचा कमिशनर म्हणून त्यानें काम केलें. १८५३ सालीं अर्ल ऑफ अवर्डीन याच्या मंत्रिमंडळांत पोष्टमास्तर जनरलचा हुद्दा याला मिळाला. या खात्याचा कारभार पहात असतांना निरलसपणें व दक्षतेनें काम करण्याविषयींची त्याच्या अंगची पात्रता दिसून आली. इतकेंच नव्हे तर सबंध पोष्टखात्यांत सुधारणा घडवून आणण्याबद्दलची त्याच्या मनांतील कळकळही सर्वांच्या प्रत्ययास आली. १८५५ पर्यंत कॅनिंग या जागेवर काम करीत होता. १८५५ च्या डिसेंबर महिन्यांत हा विलायतेहून निघाला आणि १८५६ सालीं हिंदुस्थानांतील गव्हर्नर जनरलचे जागेवर रुजू झाला. असा बुद्धिवान, अनुभवी, व शांत स्वभावाचा गव्हर्नर जनरल या वेळीं हिंदुस्थानास लाभला, हें हिंदुस्थानचें व इंग्रजांचें भाग्यच समजलें पाहिजे. नाहीं तर वेळ कठीण आली होती.

डलहौसीच्या मतानें, आपण हिंदुस्थान अतिशय उत्तम स्थितींत व भरभराटींत सोडून जात आहों, असेंच त्याला वाटत होतें. परंतु डलहौसीच्या चढाऊ स्वरूपाच्या व कुटिल राजनीतीमुळें लोकांत अशांति उत्पन्न झाली ही गोष्ट बऱ्याच मुत्सद्यांना कळली होती. खुद्द लॉर्ड कॅनिंग विलायतेहून निघतांना म्हणाले होते कीं, हिंदुस्थानांतील आकाश वरपांगीं शांत दिसत असलें तरी तेथें क्षितिजावर एक लहानसा काळा ढग दिसत आहे. आणि तो ढग वाढूं नये अशी त्यांनीं ईश्वराला सहजगत्या प्रार्थनाही केली. हिंदुस्थानांत डलहौसीच्या वर्तनानें खळबळ उडाली हें कॅनिंगला ठाऊक असलें, तरी ती खळबळ इतक्या तीव्र स्वरूपाची असेल अशी त्याला कल्पनाही नव्हती. तो हिंदुस्थानांत आला तेव्हां सर्वत्र खरोखरच शांतता नांदत होती. आंत चालत असलेली गुप्त खळबळ त्याला दिसणें शक्यच नव्हतें. हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यावर थोड्याच दिवसांनीं, डलहौसीच्या हातून अर्धवट राहिलेल्या दिल्लीच्या

मोंगल बादशाहीच्या प्रकरणाचा त्याला निकाल लावावा लागला. १८५६ सालच्या अखेरीस त्यानें दिल्ली प्रकरणासंबंधीं आपला निर्णय तेथील रेसिडेंटला कळविला. बाकी ५६ सालांत दुसरी कोणतीच नवीन गोष्ट घडली नाहीं, व लॉर्ड कॅनिंगनें दुसरी कोणतीच नवीन रीत जारी केली नाहीं. डलहौसीच्या राज्यकारभाराचा त्या वेळीं विलायतेंत सर्वत्र बोलबाला झाला होता, आणि विलायतेंतील मुत्सद्दी मंडळी डलहौसीची मुक्त कंठानें प्रशंसा करीत होती. यामुळें लॉर्ड कॅनिंगनें देखील डलहौसीच्या पावलांवर पावलें टाकून राज्यकारभार चालविण्याचें धोरण मुकर केले होतें. कोणताही नवा मुत्सद्दी दुसरें काय करूं शकणार ? अशा स्थितींत १८५६ साल संपलें; व १८५७ साल उजाडलें. पुढें येणाऱ्या भयंकर वादळाची लॉर्ड कॅनिंगला किंवा कलकत्त्यांतील त्याच्या मंत्री मंडळीला यत्किंचित्‌ही कल्पना नव्हती.

कलकत्त्याहून आठ मैलांवर दमदम नांवाची एक लष्करी छावणी आहे. येथें फौजेचा मुख्य तोफखाना ठेवला जात असे. हा तोफखाना पुढें मीरत येथील छावणींत पाठविण्यांत आला. त्यामुळें शिपायांच्या ज्या बराकी व फौजी अधिकाऱ्यांचे बंगले खाली झाले, तेथें नवीन काडतुसें तयार करण्याचा कारखाना उघडण्यांत आला. त्यावेळीं इंग्रज फौजेंतील शिपायी ब्राउनबेस नांवाची बंदुक वापरीत असत. या बंदुकींत काडतूस भरतांना तें दातांनीं तोडून आंत भरावें लागे. ब्राउनबेसच्या जागीं दुसरी अधिक पल्लेदार बंदुक शिपायांना देण्याचें कंपनीनें ठरविलें होतें, व या नव्या बंदुकीसाठीं दमदम येथील कारखान्यांत काडतुसें तयार होत होतीं. या नव्या बंदुकांचा उपयोग कसा करावा हें शिपायांना शिकविण्याची सोय दमदम येथें करण्यांत आली होती. त्यामुळें दमदमला एक दोन पलटणी शिकण्याकरितां नेहमीं येऊन जाऊन असत. आणि कारखान्यांतील इतर अधिकारी व मजूर व कांहीं लष्करी शिक्षक तेथें कायमचेच राहात असत.

जानेवारी महिन्यांत एक दिवस काडतुसाच्या कारखान्यांतील एक मजूर एका शिपायाकडे सहजगत्या आला व म्हणाला, 'महाराज मला फार तहान लागली आहे. जरा आपला लोटा पाणी प्यावयास द्याल तर बरें होईल ! मी थोडेंसें पाणी पितों.' शिपायी उच्चवर्णीय ब्राह्मण असल्यामुळें त्यानें त्या मजुराला, आपला लोटा देण्याचें नाकारलें. आणि 'मी ब्राम्हण आहें हें तुला दिसत नाहीं का ?" म्हणून त्याला उलट दटावलें.

हें ऐकून तो मजूर हंसत हंसत म्हणाला, ‘ वा ! खूप ब्राह्मण आहांत ! असेच सोवळे पुढेंही पण रहा मात्र ! हे साहेब लोक पाहतां पाहतां युक्तीप्रयुक्तीनें सर्वांना एकजात ख्रिस्ती करून टाकतील !’

शिपायी घाबरून म्हणाला, ‘ अरे’ म्हणतोस तरी काय ? ’

मजुरानें उत्तर दिलें, ‘ महाराज, हल्लीं आमच्या कारखान्यांत एक नवीन तऱ्हेचें काडतूस तयार होत आहे. त्याला गाईची व डुकराची चरबी चोपडली जाते. आतां तुम्हांला हींच काडतुसें दांतांनीं तोडून बंदुकींत भरावीं लागतील. यापुढें सर्व शिपायांची जात नष्ट झालीच असें खात्रीनें समजा. ’

याप्रमाणें शिपायाची त्याच्या सोवळ्याबद्दल कुचेष्टा करून तो मजूर आपल्या कामाला चालता झाला. त्या शिपायाची मात्र आश्चर्यानें वाचा बंद झाली. तो मनांतल्यामनांत अतिशय घाबरला. आपला धर्म व जात खरोखर नष्ट होते कीं काय, अशी त्याला भीती पडली. त्यानें मनांतल्यामनांत विचार केला कीं, ‘ अशा युक्तीनेंच सर्वांना ख्रिस्ती बनविण्याचा इंग्रजांचा विचार ठरला असेल. हिंदुस्थानांतील सर्व लोक ख्रिस्ती झाले म्हणजे साहेबलोकांना बरें वाटेल ! त्यांचें राज्य मग सुरळित चालेल. एवढ्याच करितां ख्रिस्ती झालेला माणूस थोडासा शिकला, तरी त्याला मोठ्या पगाराची नोकरी मिळते. कारण तो मग कंपनीच्या जातीचा होऊन विश्वासास पात्र होतो. मुलकी लोकांना ही पैशाची लालूच, व फौजेंतील शिपायांना काडतूस !’’

ही गोष्ट हळूहळू सर्व शिपायांत पसरली. इंग्रजांच्या देशीपलटणींत औधच्या शिपायांचाच विशेष भरणा असे. औधप्रांत खालसा केल्यामुळें ते लोक इंग्रजांवर मूळचेच रुष्ट झाले होते. त्यांनीं मनाशीं विचार केला कीं, ‘प्रथम विश्वासघातानें इंग्रजांनीं आपल्या नबाबसाहेबाला कैद करून त्याचें राज्य बळकाविलें, आणि आतां हिंदु व मुसलमान या दोघांनाही बाटवून, त्यांना ख्रिस्ती करण्याचा बेत इंग्रजांनीं योजला आहे. सर्व हिंदुस्थान देश ख्रिस्ती झाला म्हणजे इंग्रजांना बरें वाटेल. हिंदु व मुसलमानी धर्म नष्ट करण्याकरतांच कंपनीनें प्रथम न्याय अन्याय न पहातां पटापट राज्यें खालसा केलीं. कारण त्यामुळें लोकांना ख्रिस्ती करण्याचें काम सोपें झालें आहे. स्वराज्यांत नबाबाची लहर फिरली म्हणजे घरादारावर नांगर फिरे, परंतु नबाब खुश झाले म्हणजे घराचीं कौलें सोन्याचीं होत. औरंगजेब जबरीनें लोकांना बाटवी, तर कंपनीचा विचार न समजूं देतां केसानें गळा

कापण्याचा आहे. हा बेत स्वराज्यांत साधावयाचा नाहीं, म्हणून प्रथम स्वराज्य कंपनीनें मोडलें.' याप्रमाणें लॉर्ड डलहौसीनें पेरलेल्या बीजांना अंकुर फुटूं लागले. आपला धर्म बुडवूं पाहाणाऱ्या इंग्रजांविषयीं शिपायांच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला. डलहौसीच्या राजनीतीनें दुखावले गेलेले लोक या द्वेषाग्नीला फुंकर घालून भडकावण्याचें काम यथाक्रम करीत होते. त्यांचें कार्य गुप्तपणें व संथपणें चाललें होतें. त्यामुळें हा द्वेषाग्नी हळूहळू सर्वत्र पसरूं लागला.

दमदम येथील नव्या चरबीवाल्या काडतुसांची बातमी बराकपूर येथील लष्करी छावणींत जाऊन पोहोंचली. बराकपूर येथील ३४ नंबरची पलटण या बातमीनें अतिशय संतप्त झाली. परंतु मनांतला राग मनांतच गिळून ठेवणें शिपायांना भाग होतें, कारण कोर्ट मार्शलची भीति! रात्रीच्या वेळीं मात्र छावणीमध्यें धर्मावर आलेलें संकट कसें दूर करावें, याबद्दल चर्चा चालू असे. एका पलटणीकडून दुसऱ्या पलटणीला ही बातमी पोहोंचत असे. इंग्रज आपला धर्मनाश करणार अशी सर्वत्रांची खात्री झाली. गेल्या ५० वर्षांत इंग्रजांचें हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांशीं व इतर लोकांशीं जें वर्तन घडलें होतें, त्यामुळें इंग्रजांवर शिपायांचा मुळींच विश्वास उरला नव्हता. कारण इंग्रजांनीं प्रथम राजे बुडविले, नंतर जहागीरदार व जमीनदार भरडले. तेव्हां सामान्य लोकांची पाळी अखेरीस आली असेंच सर्वांना वाटलें. या अविश्वासामुळेंच इंग्रजी अधिकाऱ्यांनीं जीव तोडतोडून सांगितलें, तरी शिपायांचा त्यांच्यावर विश्वास बसेना. नव्या काडतुसांत गाईची व डुकराची चरबी वापरलेली आहे ही कल्पना दृढमूल होऊन बसली होती. बराकपूरहून ही बातमी बऱ्हामपूरला जाऊन पोंचली. तेथें त्या वेळीं १९ नंबरची देशी पलटण होती. आपण ख्रिस्ती होऊन आपली जात बाटणार, या भीतीनें बऱ्हामपूर येथील पलटणीनें एक दिवस लष्करी परेड करण्याचें व नवीन काडतुसें घेऊन चांदमारी करण्याचें नाकारलें. पलटणीचे मुख्य अधिकारी कर्नल मिचल हे शिपायांच्या हट्टामुळें अतिशय संतापले, व त्यांना धमकावणी देऊन नवीन काडतुसें वापरण्याची सक्ति करूं लागले. त्यामुळें काडतुसांत अपवित्र पदार्थ आहे, म्हणूनच तीं वापरण्याची अधिकारी आपणांवर जबरदस्ती करतात अशी शिपायांची अधिकच दृढ समजूत झाली. हुकमाची तामिली न केल्याच्या गुन्ह्याबद्दल त्यांना शिक्षा द्यावयाचें ठरलें. परंतु तेथें मुळींच गोरी फौज नसल्यामुळें आणि गोरी फौज असल्याशिवाय शिक्षा अमलांत आणण्याचें अधिकाऱ्यांना धैर्य नसल्यामुळें, त्यांना बराकपूर येथें जाण्याचा हुकूम झाला.

इकडे बराकपूरमध्येंही जनरल हियरसेनें आपल्या शिपायांना परोपरीनें समजाविणें सुरू केलें. 'तुम्हीं लोक व्यर्थ संशय धरूं नका. हीं नवीन काडतुसें पूर्वीप्रमाणेंच शुद्ध आहेत. तुम्हांला बाटविण्याचा सरकारचा मुळींच उद्देश नाहीं. तुम्ही जर शांतपणें आपलें काम करणार नाहीं तर परिणाम अतिशय वाईट होईल. १९ नंबरच्या पलटणीला ज्याप्रमाणें शिक्षा करण्याचें ठरलें आहे, त्याप्रमाणें तुमचीही गति होईल. जनरल हियरसेचें भाषण ऐकून शिपायांनीं वरपांगीं पुष्कळ शांति दाखविली. परंतु आंतल्याआंत ते जळून खाक झाले! सेनापतीच्या शब्दांवर त्यांचा मुळींच विश्वास बसला नाहीं. कारण सर्वत्र खालील अफवा पसरली होती. राणी व गवर्नर जनरल यांचा झालेला काल्पनिक पत्रव्यवहार सर्व शिपायांना पाठ झाला होता. राणीसरकारला गव्हर्नर जनरलनें लिहून पाठविलें कीं, 'सर्व हिंदुस्थानदेश ख्रिस्ती करावयाचा ही गोष्ट विलायत सरकारनें नक्की ठरविली असेल, तर तीन लाख ब्राह्मण व मौलवी यांची प्रथम कत्तल उडवावी लागेल; कारण हे लोक विलक्षण हट्टी असल्यामुळें सहज रीतीनें परधर्म स्वीकारणार नाहींत, आणि बहुजनसमाजांत यांचेंच वजन असल्यामुळें, त्यांचा निकाल प्रथम लावल्याखेरीज देश ख्रिस्ती होणार नाहीं.' त्यावर राणीसरकारनें उत्तर दिलें कीं, 'तीन लाख लोकांची कत्तल उडाली तरी बेहत्तर परंतु लोकांना बाटवल्याशिवाय सोडूं नका, आणि बाटविण्याचा प्रारंभ शिपायांपासून करा, नाहींपेक्षां त्यांच्या हातीं हत्यारें असल्यामुळें ते बंड करण्याचा फार संभव आहे.' त्यामुळें हीं अपवित्र काडतुसें शिपायांना वांटलीं जात आहेत. त्यांचा एकदां कांटा काढला म्हणजे बाकीच्या लोकांना बाटविणें फार सोपें. त्यामुळें धर्मरक्षणासाठीं हीं अपवित्र काडतुसें नाकारणें भाग आहे. ठरलेल्या निश्चयाप्रमाणें हीं अपवित्र काडतुसें उपयोगांत आणण्याचें नाकारल्यावरून १९ नंबरच्या पलटणीला शिक्षा होणार हें ऐकून त्यांना फार संताप आला. आपणही तोच गुन्हा केला आहे, व धर्मरक्षणासाठीं आणखी देखील तो करूं, असा त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चय केला.

कर्नल मिचलही आपली १९ नंबरची पलटण घेऊन बराकपुरला येऊन पोंचले. त्याबरोबर अशीही एक बातमी आली कीं, बरेचसे गोरे शिपाई जहाजांतून कलकत्ता येथें उतरले असून बराकपुरच्या वाटेला लागले आहेत. या बातमीमुळें शिपायांत आणखी खळबळ उडाली. आपल्याला शिक्षा देण्याकरितांच ही गोरी पलटण बोलाविण्यांत आली असावी असा त्यांनीं अंदाज केला. तो दिवस रविवारचा होता. दुपारच्या प्रहरीं सर्व इंग्रज अधिकारी व सेनापति आपापल्या

ठिकाणीं विश्रांति घेत होते. शिपाई लोकांत किती खळबळ माजली आहे याची त्यांना बरोबर कल्पनाही नव्हती.

**मंगलपांडे** नांवाचा एक धट्टाकट्टा व शूर शिपायी त्या पलटणींत होता. तो कट्टा धर्मनिष्ठ होता. त्यानें जेव्हां ऐकलें कीं आपल्या पलटणीला शिक्षा देण्याकरितां बरेचसे गोरे शिपायी बोलाविण्यांत आले आहेत, तेव्हां त्यानें भोलानाथाचे नांवानें भांगेचा एक मोटासा लोटा आपल्या पोटांत रिचविला आणि मग एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत भरलेलें पिस्तुल घेऊन व आपला जामानिमा चढवून, तो घराच्या बाहेर पडला. रस्त्यांत त्याला जे जे शिपायी भेटले त्यांना त्यांना त्यानें सांगितलें कीं, इंग्रज लोक आमचा धर्म नष्ट करूं पहात आहेत, सबब त्यांनीं दिलेली काडतुसें तुम्ही आपल्या हातांत धरूं नका. कारण त्यांना गाईची चरबी माखलेली आहे. रस्त्यांत त्याला एक बिगुलवालाही मिळाला. मंगलपांडेनें त्याला बिगुल जोरानें फुंकून सर्व शिपायांना एकत्र करण्यास सांगितलें. बिगुलवाल्यानें त्याचें बोलणें मनावर घेतलें नाहीं, परंतु त्या तरुण शिपायाचा आवेश बिलकुल कमी झाला नाहीं. इंग्रजांना शिक्षा करण्याच्याच उद्देशानें तो घराबाहेर पडला होता. यामुळें एखाद्या उन्मत्ताप्रमाणें तो तशाच थाटानें इंग्रजांच्या राहात्या जागेकडे धांवत जाऊं लागला. इतक्यांत त्याला समोर एक इंग्रज अधिकारी उभा असलेला दिसला. त्याबरोबर मंगलपांड्यानें त्याच्यावर गोळी झाडली. परंतु ती गोळी सुदैवानें त्या अधिकाऱ्याला लागली नाहीं.

जवळच ३४ नंबरच्या पलटणींतील बरेचसे शिपायी उभे होते. परंतु त्यांनीं मंगलपांड्याला साथ दिली नाहीं. त्यांनीं इंग्रजाविरुद्ध त्या क्षणीं युद्ध पुकारलें नाहीं, तसेंच मंगलपांड्याच्या हातांतून हत्यार हिसकून घेऊन त्याला पकडण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यांच्यांतील एका हवालदारानें मात्र गोऱ्या अडजूटंटच्या बंगल्यावर जाऊन मंगलपांडे भ्रमिष्ट झाल्याची बातमी त्याला कळविली. लेफ्टनेंट बग त्या वेळीं अडजुटंट होता. तो सार्जंट मेजर हडसनला बरोबर घेऊन मंगलपांड्याचा दंगा चालला होता, त्या परेडच्या मैदानावर आला. त्यांना आलेले पाहातांच मंगलपांड्यानें तेथें पडलेल्या एका तोफेच्या आडून त्यांच्यावर गोळी झाडली. परंतु ती गोळी बगला न लागतां त्याच्या घोड्याला लागली. घोडा जायबंदी होऊन खालीं पडला; त्याबरोबर तोही जमिनीवर पडला. परंतु मोठ्या चलाखीनें

आपल्याला ताबडतोब सावरून घेऊन बगनें मंगलपांड्यावर गोळी झाडली. त्याचाही नेम चुकला, तेव्हां तो तलवार घेऊन पांड्यावर चालून गेला हें पाहून मंगलपांडेही आवेशानें तलवार घेऊन त्याच्याशीं सामना देण्यास गेला. इकडे हडसन बगच्या मदतीस धांवला. परंतु मंगलपांडे तलवार फिरविण्यांत अतिशय पटाईत होता. त्यामुळें तो एकटाच बग व हडसन या दोघांना पुरून उरला. त्या दोघांना अनेक ठिकाणीं वार होऊन रक्तानें ते न्हाऊन निघाले. त्या वेळीं भोंवतालीं जवळ जवळ ४०० शिपाई एकत्र जमा होऊन ही युद्धाची गंमत पहात होते, परंतु त्यांनीं त्या दंगलींत मुळींच भाग घेतला नाहीं. आपल्या अधिकाऱ्यांना वांचविण्याचा त्यांनीं कोणताच प्रयत्न केला नाहीं, परंतु त्यांच्यावर बाकीच्या शिपायांनीं हत्यारही उचलेलें नाहीं. लेफ्टनेंट बगला मारण्याकरितां मंगलपांड्यानें तलवार उचलली. त्या वेळीं स्वतांचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य बग व हडसन या दोघांतही उरलें नाहीं असें पाहून, शेख पलटू नांवाचा एक मुसलमान सैनिक त्यांच्या मदतीला धांवून गेला. त्यांनें मंगलपांड्याचा हात मागल्यामागें गच्च धरून ठेविला. तरवारीचा वार त्याच्या हाताला चाटून लागला, तरी त्यानें मंगलपांड्याला सोडलें नाहीं. शेख पलटूच्या या साहसामुळें त्या दोघां इंग्रज अधिकाऱ्यांचे जीव बचावले, व ते दोघेही आपला जीव घेऊन आपल्या बंगल्याकडे पळत चालते झाले. शेख पलटूनें हें साहस केलें नसतें, तर त्या दोघांनाही मंगलपांड्याच्या हातून तेथल्या तेथेंच त्या दिवशीं मोक्ष मिळाला असता !

लेफ्टनेंट बगचा स्वभाव तुसडा व उद्दाम होता. शिपायांचें त्याच्यावर मुळींच प्रेम नव्हतें. तो तेथून निघून गेल्यावर बाकीच्या शिपायांनीं मंगलपांड्याला सोडून देण्याविषयीं शेखपलटूला सांगितलें. दोघांच्या भांडणांत लुडबुड केल्याबद्दल पलटूवर सर्व शिपायी गरम झाले होते. पलटूनें एकंदर प्रसंग पाहून मंगलपांड्याला सोडून दिलें. सर्वस्वी राजनिष्ठ व आपल्या अधिकाऱ्याची आज्ञा मानण्यास सदैव तत्पर असलेल्या शिपायांपैकीं एकही शिपायी, अधिकाऱ्यांच्या जिवावर प्राणांतिक संकट बेतलें असतांदेखील, त्यांच्या मदतीस धांवून गेला नाहीं. पलटू हा त्या ४०० लोकांत एक अपवादच निघाला. आपल्या धर्माचा व जातीचा नाश करूं पाहणाऱ्या इंग्रजांचा ते कट्टा द्वेष करूं लागले होते, हेंच या चमत्काराचें कारण होय ! चर्बीचीं काडतुसें हा बाटवण्याचा एक मार्ग होता. त्याचा वेळेवर प्रतिकार न केला, तर कंपनी ठरल्या निश्चयाप्रमाणें हरप्रकारें लोकांना राणीच्या काल्पनिक आज्ञेनुसार बाटवील, अशी शिपायांची मनांतून खात्री झाली होती.

ही बातमी ऐकून जनरल हियरसे ताबडतोब तेथें येऊन दाखल झाले. त्यांच्या बरोबर त्यांचे दोघे पुत्र होते. तिघांनींही आपला लष्करी पोषाख चढविला असून तिघांच्याही हातांत भरलेलीं पिस्तुलें होतीं. त्यांनीं आल्याबरोबर तेथील हिंदी अंमलदारांना रुबाबानें विचारलें कीं, ' तुम्हीं त्या डोकें फिरलेल्या मंगलपांड्याला पकडलें कां नाहीं ? त्याला तुम्हीं अटकाव कां केला नाहीं ?' 'फौजी शिपायांनीं आमची आज्ञा ऐकली नाहीं,' असें हिंदी अधिकाऱ्यांनीं उत्तर दिलें; हें ऐकतांच ते रागानें लाल होऊन म्हणाले, 'माझी आज्ञा कोण ऐकत नाहीं हें मी पाहातों. जो आतां माझ्याबरोबर पुढें होणार नाहीं त्याला या आज्ञाभंगाचा, आपला जीव गमावूनच जाब द्यावा लागेल.' एवढें बोलून त्यांनीं आपला घोडा मंगलपांड्याच्या अंगावर घातला. त्यांचा रुबाब पाहून त्यांच्याबरोबर कांहीं जमादार व थोडेसे शिपायीही मंगलपांड्याला गिरफतार करण्याकरितां पुढें झाले. मंगलपांडेही शिपायांना 'धर्मरक्षणाकरितां माझ्या मदतीला या' म्हणून बोलावूं लागला. त्याला समोर येतांना पाहून जनरलनें आपल्या एक मुलाला म्हटलें, ' जॉन, जर त्याची गोळी लागून मी ठार झालों, तर त्याचा पुरता बदला घेतल्याशिवाय तूं कधीं राहूं नको. यानंतर ते मागून येणाऱ्या हिंदी जमादार व शिपायांकडे वळून म्हणाले, ' जर माझी आज्ञा कोणी पाळणार नाहीं तर मीं येथल्या येथें या पिस्तुलानें प्रथम त्याचा मुर्दा पाडीन. जनरलचा रुबाब व धाडसी शौर्य पाहून शिपाई नरमले व मंगलपांड्याला कोणींच साह्य केलें नाहीं.'

आपले सर्व भाईबंद साहेबाला सामील होऊन आपल्यावरच उलटले, हें पाहून मंगलपांड्यानें आपल्या स्वतःच्या छातीवर पिस्तूल रोखून तें उडविलें. पिस्तुलाची गोळी त्याच्या शरिरांत घुसली व रक्तबंबाळ होऊन तो जमिनीवर पडला. परंतु त्या गोळीनें तो मेला नसून फक्त जखमी व बेशुद्ध झाला होता. हें पाहून त्याला दवाखान्यांत औषधोपचाराकरितां पाठविण्यांत आलें. ही अद्भुत घटना रविवार ता. २९ मार्च १८५७ रोजीं घडून आली. मंगलपांड्याची प्रकृति थोडी-बहुत सुधारल्यानंतर त्याच्यावर लष्करी कायद्यान्वयें खटला भरण्यांत येऊन त्याला फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली. ८ एप्रील रोजीं सर्व पलटणीच्या समोर त्याला फांशी देण्यांत आलें. पण त्यामुळें शिपायांच्या दृष्टीनें मंगलपांडे हा हुतात्मा ठरला. त्याचीं जीं संध्या करण्याचीं भांडीं असत, त्यांची बाकीचे शिपाई पूजाअर्चा करूं लागले. ज्या तळ्याच्या कांठीं त्याला फांसावर दिलें ती जागा शिपायांना पवित्र

वाढूं लागली. ज्या जमादारानें इंग्रज अधिकाऱ्याचा हुकूम प्रथम अमान्य केला होता, तोही २१ एप्रील रोजीं फांसावर लटकावला गेला. १९ नंबरच्या पलटणींतील शिपायांचीं हत्यारें पूर्वी ठरल्याप्रमाणें काढून घेण्यांत येऊन, त्या पलटणींतील सर्व शिपायांना फौजेंतून बडतर्फ करण्यांत आलें. ३४ नंबरच्या पलटणींतले शिपायीही १९ नंबरच्या इतकेच, जवळ जवळ सारखेच गुन्हेगार होते. परंतु त्यांना शिक्षा करण्यांत आली नाहीं. लष्करी शिस्तीच्या दृष्टीनें त्यांच्यावर त्या वेळीं दाखविली गेलेली दया अस्थानीं होती, असें अनेक लष्करी अधिकाऱ्यांचें मत आहे. खरें पाहूं गेलें असतां १९ नंबरच्या पलटणीचा अपराध त्या मानानें फारसा तीव्र स्वरूपाचा नव्हता. त्यांनीं बऱ्हामपूर येथें काडतुसें घेण्याचें नाकारलें, व त्यांचा मुख्य अधिकारी कर्नल मिचल यानें बोलतांना आपली जीभ ताब्यांत न ठेवल्यामुळें शिपायी क्रोधानें उत्तेजित झाले, व अधिकाऱ्यांचा हुकूम त्यांनीं अमान्य केला इतकेंच. त्यांनीं कोणाला मारहाण केली नाहीं. परंतु ३४ नंबरच्या पलटणीनें तर आपल्या अधिकाऱ्यावर हल्ला होत असतांना त्याला काडीचीही मदत केली नाहीं, आणि उलट त्या पलटणींतील सर्व लोक ती गंमत पहात मुकाट्यानें उभे होते. त्यामुळें त्यांनादेखील तशीच किंबहुना अधिक कडक शिक्षा द्यावयास पाहिजे होती. परंतु फक्त १९ नंबरच्या पलटणीलाच जबाबदार धरण्यांत आलें, व ती पलटण मोडून टाकण्यांत आली.

हिंदुस्थान सरकारचें धोरण या बाबतींत चुकण्याला आणखीहीं एक कारण होतें. २२ जानेवारी रोजीं दमदम येथें ब्राह्मण शिपायी व कारखान्यांतील मजूर यांच्यामध्यें नवीन काडतुसाच्या चरबीबद्दल जें कांहीं बोलणें चालणें झालें, त्याचा इत्थंभूत रिपोर्ट गव्हर्नर जनरलच्या कानापर्यंत गेला होता. नव्या काडतुसांमुळें शिपायांत जी बेदिली उत्पन्न झाली होती, ती नाहींशी करण्याकरितां जनरल हियरसेनें हिंदुस्थान सरकारला अशी शिफारस केली की, शिपायांना वापरण्याकरतां चरबी न लावलेली काडतुसें देण्यांत यावीं, आणि त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांनी मेण किंवा आपल्या पसंतीची चरबी लावून काडतुसांचा उपयोग करावा अशी त्यांना सवलत देण्यांत यावी. लॉर्ड कॅनिंगला ही शिफारस मानवली आणि त्याप्रमाणें जनरल हियरसेच्या सूचनेला ताबडतोब त्यानें आपली मंजुरी दिली. ह्या वेळपर्यंत दमदमच्या कारखान्यांतून चरबी लावलेलें एकही काडतूस शिपायांना वांटण्यांत आलें नव्हतें. गव्हर्नर जनरलनें त्याप्रमाणें मीरत येथें राहणाऱ्या सैन्याच्या मुख्य अडजुटंटला तारेनें हुकूमही पाठविला कीं, निरनिराळ्या छावण्यांतील

कोठारांत चर्बी न लावलेलींच काडतुसें पाठविण्यांत यावीं, आणि शिपायांना आपल्याजवळची चर्बी किंवा मेण काडतुसासाठीं वापरण्याची परवानगी द्यावी. परंतु मुख्य अडजुटंटला ही गोष्ट आवडली नाहीं. त्यानें गव्हर्नर जनरलला उलट तारेनें असें कळविलें कीं, 'यामुळें शिपायांचा संशय दबण्याऐवजीं अधिकच बळावेल. बकऱ्याची चर्बी व मेण यांपेक्षां दुसऱ्या कशाचाच उपयोग दमदम येथील कारखान्यांत होत नसल्यामुळें, आपण एकंदर सैन्यांतील शिस्तीच्या दृष्टीनें हा नवीन दिलेला हुकूम परत घ्यावा, व पूर्वीचीच वहिवाट चालू द्यावी.' अडजुटंटचा हा मूर्खपणाचा सल्ला हिंदुस्थान सरकारच्या लष्करी सेक्रेटरीला मानवला, व त्यामुळें लॉर्ड कॅनिंगनें एकदां दिलेला हुकूम परत घेतला. कारण लॉर्ड कॅनिंग हा हुशार व कर्तबगार असला, तरी ज्यांचे हिंदुस्थानांत काळयाचे पांढरे केंस झाले होते, त्यांच्याच सल्ल्यानें चालणें त्याला इष्ट वाटलें. कलकत्ता येथील जुन्या मुरब्बीखोडांच्या खोडकर सल्लेमुळें प्रारंभीं त्याच्या हातून बऱ्याच चुका झाल्या, व त्यामुळें बंडाची भीषणता वाढली. परंतु बंडानें भीषण रूप प्रगट करतांच तो गांगरला नाहीं; एवढेंच नव्हे, तर कलकत्ता येथील जुन्या अधिकाऱ्यांच्या नोकरशाही जाळ्यांतून तडफीनें मुक्त होऊन तो प्रयाग येथें आला व सर्व सूत्रें आपल्या हातीं घेऊन तेथून स्वतांच्या हिंमतीवर हुकूम सोडूं लागला. लॉर्ड क्यानिंगची थोरवी व बुद्धिमत्ता त्या संकटांतच प्रकट झाली. झालेली चूक त्याची नसून कलकत्ता येथील नोकरशाही यंत्रावरच तिचें खापर फोडलें पाहिजे.

त्या वेळची लष्करी व्यवस्थाही विचित्र पद्धतीची होती. हिंदुस्थानचे मुख्य सेनापति जनरल ॲनसन हे सरहद्दीवरील प्रांतांत किंवा पंजाबांत किंवा सिमल्यास रहात असत. फौजेचा मुख्य ॲडजुटंट हा मीरत येथें राहात असे. आणि गव्हर्नर जनरल व त्यांचे सर्व सेक्रेटरी—लष्करी सेक्रेटरीसुद्धां—कलकत्त्यास रहात असत. त्यामुळें कोणत्याही गोष्टीबद्दल विनाकारण पत्रव्यवहार लांबून अखेर निकाल लागावयास विलक्षण दिरंगाई होत असे. या त्रिस्थळी यात्रेमुळें हिंदुस्थानांतील देशी सैन्यांत जो असंतोष भडकत चालला होता, त्याची कोणालाच नीटशी कल्पना झाली नाहीं. दोन तीन ठिकाणच्या लष्करी अधिकाऱ्यांनीं शिपायांच्या बेदिलीबद्दल रिपोर्ट केले होते, परंतु तिकडे कोणींच लक्ष दिलें नाहीं. मार्च महिन्यांत महाराज शिंदे सरकार कलकत्त्यास आले होते. त्यावेळीं हुगळी नदीच्या कांठीं असलेल्या सरकारी बगीच्यांत १० तारखेस त्यांच्या सन्मानार्थ एक मोठी पार्टी होणार होती. सर्व लष्करी अधिकारी त्या समारंभांत गुंतले

आहेत असें पाहून, शहरांत धामधूम मचवून किल्ला आपल्या ताब्यांत घ्यावयाचा, असा बेत कांहीं बंडवाल्यांनीं केला होता. परंतु एकाएकीं १० तारखेला सकाळीं बराच पाऊस पडल्यामुळें समारंभाचा बेत रहित झाला. तरी पण समारंभ रहित झाल्याची बातमी शहराचे मुख्य अधिकारी मेजर क्याव्हेनाग यांना कळली नव्हती. त्यामुळें ते ठरलेल्या वेळीं घाटावर गेले, आणि तेथें पार्टी रहित झाल्याचें ऐकून ताबडतोब परत आले. मेजर क्याव्हेनाग एकदम परत आलेले पाहून कटवाले घाबरले, व आपला व्यूह ढांसळला आणि सर्व गुप्त बातम्या इंग्रजांच्या कानावर गेल्या असें त्यांना वाटलें. यामुळें बाकीच्या शिपायांनीं घाबरून आपल्या कानावर हात ठेवले व कटांतील पुढाऱ्यांना अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केलें. या पुढाऱ्यांवर लष्करी खटला करण्यांत येऊन त्यांना चौदा चौदा वर्षांची सक्त मजुरीची सजा देण्यांत आली, आणि कंपनीच्या कलकत्ता या राजधानीवरील संकट थोडक्यांत टळलें !

कांहीं कांहीं लष्करी छावण्यांत मधून मधून आगीही लागत होत्या. शिपायांचीं रात्ररात्र खलबतें चालू असल्याबद्दलचे रिपोर्टही हिंदुस्थान सरकारकडे कोठून कोठून येऊन धडकले होते. परंतु अशा स्थितींतही फक्त १९ नंबरच्या पलटणीं-तच बंडाळी झाली असें ठरविण्यांत येऊन ती पलटण मोडून टाकण्यांत आली. बरें, त्या पलटणींतील शिपायांचीं हत्यारें काढून घेण्यांत आलीं खरीं, परंतु त्यांना त्यांचा लष्करी पोषाख ठेवून घेण्याची परवानगी देण्यांत आली. हे सर्व शिपायी अयोध्या प्रांतांतील राहाणारे होते. आधींच बेदील झालेले हे शिपायी गायीच्या व डुकराच्या चरबीनें माखलेल्या नव्या काडतुसांची गोष्ट वाटेनें सांगत सांगत आपल्या मुलखास परत गेले. शिपायांची जात बाटविण्याची कंपनीची इच्छा नाहीं हें सिद्ध करण्याकरितां, या शिपायांना, तीर्थयात्रा करून हातून पाप घडले असा संशय आला असल्यास, तें नष्ट करण्याचा मार्ग इंग्रज सेनापतीनें सुचविला, व त्यांना यात्रेसाठीं द्रव्यही देऊं केलें. परंतु शिपाई तीर्थयात्रेला न जातां दुसऱ्या छावण्यांत रात्रीं बेरात्रीं मुक्काम ठोकून काडतुसांची कथा तिखट मीठ लावून सांगूं लागले, व धर्मासाठीं लढण्यास तयार व्हा, असा मंत्र सर्वांना देऊं लागले. सामान्य लोकांच्या व कंपनीच्या फौजेपैकीं इतर देशी पलटणींतील शिपायांच्या दृष्टीनें, हे सर्व शिपाई स्वार्थत्यागी, देशभक्त व धर्मवीर ठरले. कारण केवळ धर्मरक्षणासाठीं त्यांनीं आपल्या नोकरीवर लाथ मारली होती. या शिपायांच्या एकाएकीं कलकत्त्याहून निघून जाण्यामुळें जुन्या वदंतेला अधिकच जोर चढला व सर्वांना ती सत्य वाटूं

लागली. इंग्रजांच्या मनांत हिंदु-मुसलमानांचा धर्मनाश करावयाचा आहे, म्हणून धर्मरक्षणासाठीं १९ नंबरच्या पलटणीचाच कित्ता आपण गिरविला पाहिजे, फारतर काय त्याच्याही पुढें दोन पावलें गेलें पाहिजे, असें इतर पलटणींतील शिपायांना वाटूं लागलें, व एकमेकांत तशी निरोपानिरोपी सुरू झाली. शिपाई फकीरांच्या वेषांत हिंडूं लागले. कारण तो वेष एकदां अंगावर चढविला, म्हणजे वाटेल तिकडे जाण्यास व वाटेल तिथें राहण्यास, निदान हिंदुस्थानांत तरी मुक्तद्वार असतें. 'आम्ही धर्म सोडला असता तर आमचा पगार वाढला असता, व आम्हाला मोठा हुद्दाही मिळाला असता. परंतु धर्माकरितां आम्ही नोकरीवर लाथ मारून फकीरी घेतली. आमच्यापैकीं कांहींना फटके मिळाले, कांहीं कैदेंत गेले व कांहीं तर फांसावर लटकले. परंतु धर्माकरितां कंपनीशीं सामना घेण्याचा आमचा निश्चय झाला आहे,' असे निरोप निरनिराळ्या छावणींतील शिपायांना या फकीरांमार्फत कळूं लागले. इंग्रज अधिकाऱ्यांना या विमुक्त फकीरांचा संशय कसा यावा ?

जनरल हियरसेनें शेख पलटूच्या साहसाबद्दल व राजनिष्ठेबद्दल त्याला एकदम हवालदाराची जागा दिली. जनरल हियरसेचें करणें योग्य होतें असेंच कोणींही म्हणेल. परंतु याबद्दल त्याला वरिष्ठाकडून थप्पड मिळाली. ३४ नंबरच्या पलटणीचें काय करावें याबद्दल चौकशी चालू झाली. ती चौकशी कांहीं केल्या संपेना. हिंदुस्थानांतील फौजेची एकंदर परिस्थिती हिंदुस्थान सरकारच्या लक्षांत आली नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. इकडे १९ व्या पलटणींतले शिपाई लखनौला गेल्यापासून, तेथेंही फौजेंतील बेदिली वाढूं लागली होती. लखनौला त्या वेळीं सर हेनरी लॉरेन्स हा शूर सेनापती व कर्तबगार मुत्सद्दी अधिकारावर होता. त्यानें लखनौ येथील फौजेंतील परिस्थिती लॉर्ड कॅनिंगला कळविली. त्याला लॉर्ड कॅनिंगनें ४८ नंबरची पलटण लखनौहून मीरत येथें पाठविण्याचा हुकूम दिला. ७ नंबरच्या पलटणींतील शिपायांचें आपल्या अधिकाऱ्याशीं होत असलेलें उद्दाम वर्तन पाहून सर हेनली लॉरेन्सला अतोनात चीड आली, व तोफांचें मोर्चे बांधून आणि गोरें पायदळ समोर सज्ज ठेवून त्यानें त्या पलटणीला ताबडतोब वठणीवर आणलें. त्यांचीं हत्यारें व लष्करी पोषाख हिसकून घेतले व पलटणींतील पुढाऱ्यांना कैदेंत टाकलें. ही बातमी त्यानें तारेनें ४ मे रोजींच लॉर्ड कॅनिंगला कळविली. तेव्हां मात्र बराकपूर येथील ३४ वी पलटण अखेरीस तोडण्याचें लॉर्ड कॅनिंगनें ठरविलें. ६ मे रोजीं ही पलटण तोडण्यांत आली, व पलटणींतील सर्व शिपाई धर्मवीर म्हणून मिरवत औधच्या रस्त्याला

लागले. सर्व देशांत उत्पन्न झालेली बेदिली व बंडाळी या मोकळया झालेल्या शिपायांमुळें अधिकच फैलावेल ही गोष्ट कोणाच्याच लक्षांत आली नाहीं. सर्व देशांत जिकडे तिकडे शांतता व आबादीआबाद असून या मधून मधून घडलेल्या गोष्टी तुटक स्वरूपाच्या आहेत, अशीच खुद्द गव्हर्नर जनरलपासून तों खालच्या अधिकाऱ्यापर्यंत सर्वांची समजूत झालेली होती. डलहौसीच्या राजकीय धोरणामुळें ठिकठिकाणीं इंग्रजांचे कट्टे शत्रू उत्पन्न झाले आहेत व ते प्रबळ आणि वजनदार असल्यामुळें अराजकतेचीं केंद्रें त्यांनीं उत्पन्न केलीं आहेत, ही गोष्ट कोणाच्या ध्यानांतही आली नाहीं. निदान आली असली तरी आपल्या शक्तीच्या घमेंडींत कोणी तिकडे लक्ष पोहोंचविलें नाही. अयोध्येचें राज्य इंग्रजांनीं खालसा केल्यामुळें सर्व देशी शिपाई नाराज झाले ही गोष्ट सर्वच विसरले. गादीवरून ओढून काढलेला अयोध्येचा दुर्दैवी नबाब आपल्या बऱ्याच मोठ्या परिवारासह खास कलकत्त्यास इंग्रजांच्या नजर कैदेंत आपल्या वैभवशून्य आयुष्याचे शेवटचे दिवस कंठीत होता, आणि शिपायांत बेदिली उत्पन्न करण्याचा त्यानें स्वतः कांहींच प्रयत्न केला नसला, तरी त्याला पाहून अयोध्येच्या बाबतींत कंपनीनें जें अन्यायाचें वर्तन केलें त्याची स्मृति देशी पलटणींतील शिपायांच्या—कारण ते नबाबाचे प्रजाजनच होते—हृदयांत आपोआप जागृत होत असे, ही गोष्ट कोणीच मनावर घेतली नाहीं. यामुळें झालेल्या गोष्टी यापुढें उद्भवणाऱ्या भीषण, सर्वव्यापी व सूत्रबद्ध अनर्थांपाताचीं पूर्वचिन्हें होत, असें कोणासच वाटलें नाहीं, आणि त्यामुळें त्यावर योजले गेलेले उपाय अपुरे, पोकळ, वरपंगीचे व अविचारीपणाचे ठरले!

---

## प्रकरण १२ वें.

# मीरतला आग लागली!



१८५७ सालीं हल्लीं सारखें हिंदुस्थानांत रेलवेचें जाळें पसरलें नव्हतें. रेलवे व तारायंत्राची नुकतीच कोठें उभारणी झाली होती, व त्यांची वाढही संथपणानें होत होती. यामुळें एका ठिकाणाहून दुसरीकडे फौज पाठविणें हल्लींसारखें सुलभ व त्वरित होऊं शकत नव्हतें. बैलगाड्या, घोडे, किंवा उंट हींच त्यावेळीं प्रवासाचीं मुख्य साधनें होतीं. परंतु आगगाड्या व तारायंत्रें नसतांही शिपायांत उत्पन्न झालेली बेदिली फार त्वरेनें प्रवास करीत होती. एकाच्या तोंडून दुसऱ्याला, व दुसऱ्या-

कडून तिसऱ्याला याप्रमाणें बातमी सारखी फैलावत होती. व्यापारी, शेतकरी व प्रवासी हे सर्वजण फौजेंतील शिपायांच्या धर्मावर आलेल्या संकटाची बातमी आपापल्या ठिकाणीं कलकत्त्याहून नेत होते. शिपायी लोकही आपल्या नातलगांना व इष्टमित्रांना ही धर्मावरील आपत्ती लिहून कळवीत होते. डमडम येथें शिपायी व मजूर यांच्या संवादांत प्रगट झालेली काडतुसाच्या चरबीची गोष्ट, ८-१५ दिवसांच्या आंतच कलकत्त्यापासून पेशावरापर्यंत सर्वत्रदूर पसरली. नव्या काडतुसांना गाईची व डुकराची चरबी लावलेली असते, व त्यांचा उपयोग केला तर आपली जात बाटेल व आपण स्वधर्माला मुकूं, असें सर्व ठिकाणचे शिपायी म्हणूं लागले. कंपनीचें राज्य सर्वत्र पसरल्यामुळें, व संस्थानें बहुतांशीं नष्ट आणि कांहीं प्रसंगीं कंपनीचीं दबेल बनल्यामुळें मुलुखगिरीला वाव नाहींसा झाला. मुलुखगिरीच्या संधीमुळें, शिपायांना पगार थोडा असला तरी, वर पूर्वी मोठी मिळकत असे, व मान तर असेच असे. त्यामुळें एकाच्या नात्यानें, ओळखीनें किंवा इतर वशिल्यानें दुसरा शिपाई फौजेंत भरती होत असे. शिपायांतील या बंधुभावनेमुळें आलेल्या नव्या संकटाची बातमी ताबडतोब पसरली. बराकपूरप्रमाणेंच अंबाला येथेंही शिपायांना नवी बंदूक वापरण्याचें शिक्षण देण्यांत येत असे. तेथेंही शिपायांनीं नवीं काडतुसें घेण्याचें नाकारलें. परंतु मुख्य सेनापती जनरल ॲनसन यांनीं त्यांची परोपरीनें समजूत घातली कीं शिपायांना बाटविण्याची कंपनीची मुळींच इच्छा नाहीं. तात्पुरती ती गोष्ट शिपायांनीं मान्य केली, परंतु त्यांच्या मनांतील संदेह मात्र दूर झाला नाहीं. नवीन काडतुसें शुद्ध आहेत अशी त्यांची खात्री होईना. अधिकाऱ्यांचा हुकूम अमान्य करावा व काडतुसें वापरण्याचें नाकारावें, तर लष्करी कायद्याप्रमाणें कडक शिक्षा व्हावयाची. बरें तीं काडतुसे वापरलीं तर आपले जातभाई आपल्याला वाळीत टाकतील व आपल्याशीं कोणताही संबंध ठेवणार नाहींत, ही भीति त्यांच्यासमोर दत्त म्हणून उभी राही. दिवसा सर्व सामसूम असलें, तरी त्यांच्यांत उत्पन्न झालेल्या अशांतीचें स्वरूप, छावणींतील घरांना कारणाशिवाय मधून मधून रात्रीं बेरात्रीं लागणाऱ्या आगीच्या रूपानें प्रगट होत असे. बरींच घरें जळलीं तरी आगी लावणाराचा पत्ता लागला नाहीं. जनरल ॲनसननें ही हकीगत गव्हर्नर जनरलला कळविली खरी, परंतु स्वतः त्यांना तिचें फारसें महत्व वाटलें नाहीं असें दिसतें. कारण ते नित्याप्रमाणें उन्हाळ्याची थंड हवा खाण्याकरितां सिमला येथें चालते झाले.

शिपायी आपलें हृद्गत निरनिराळ्या प्रकारानीं इतर शिपायांना कळवीत असत. सांकेतिक बातमी पोंचविण्याकरितां, कोणाला संशय येऊं नये म्हणून रोजच्या खाण्यांतील चपात्यांचा उपयोग करण्यांत येई. या चपात्या ( पोळ्या ) एका छावणींतून दुसऱ्या छावणींत पोंचविल्या जात; एवढेंच नव्हे, तर खेड्यापाड्यांतूनही त्या हातोहात वांटल्या जात होत्या. धर्मरक्षणाकरितां शिपाई आपल्या जिवावर उदार होऊन इंग्रजांविरुद्ध उठण्याचा दिवस जवळ आला आहे, सबब खेड्यांपाड्यांतील सर्व लोकांनीं सावध असावें अशी सूचना देण्याकरितां या चपात्या वांटल्या जात असत. बराकपूरच्या छावणींत घडलेल्या दंग्याची हकीकत लखनौ येथील अधिकाऱ्यांना कळण्यापूर्वीच तेथील देशी शिपायांना ती कळलेली होती. प्रत्येक छावणींत घडणारी लहान मोठी महत्त्वाची गोष्ट ताबडतोब सर्व दूर प्रसृत होत असे, आणि मग रात्रीच्या वेळीं प्रत्येक पलटणींत तिची चर्चा होत असे. शिपायांच्या बराकी म्हणजे त्यांचें स्वतंत्र राज्यच असे. त्यांच्या वरिष्ठ इंग्रजी अधिकाऱ्यांना तेथें कोणत्याही निमित्तानें केव्हांही येण्याची प्राज्ञा नव्हती. कारण तेथें त्यांचा स्वयंपाकाचा चौका असे. शिवाय कांहीं शिपाई आपल्या कुटुंबासह तेथें रहात असल्यामुळें त्यांचा गोषा पवित्र राखणें जरूर होतें. उत्तर हिंदुस्थानी लोकाचा चौका व पडदा सोवळा राखण्याचा फार आग्रह ! त्याच्यावर परक्या इंग्रजांची—मग ते वरिष्ठ लष्करी अधिकारी असले तरी—नजर पडलेली त्यांना कशी सहन व्हावी ? परेड संपली म्हणजे शिपाई लष्करी पोषाख काढून फेकीत, व साध्या कपड्यांनीं समोरच्या आंगणांत बसून पुढचे बेत आंखीत असत. पांच ते सात रुपये पगार देणाऱ्या अधिकाऱ्यांची मिजास ते ठेवीनासे झाले होते. कारण वरप्राप्ति असतांना हा पगार पुरत असला तरी मुलुखगिरी बंद झाल्यावर तो पुरणें शक्यच नव्हतें. शिपायी लोक आपल्या धर्माकरितां लढणार असल्यामुळें त्यांच्याविषयीं सर्वांची सहानुभूती होती. ज्या इंग्रज कंपनीनें मोठमोठ्या हिंदु राजेरजवाड्यांशीं व मुसलमान नबाबांशीं आणाशपथा घेऊन दिलेलें इमान न राखतां, त्यांचीं राज्येंच्या राज्यें खालसा केलीं, ती कंपनी भोळ्याभाबड्या शिपायांशीं बेइमान होऊन त्यांची जात व त्यांचा धर्म बाटविण्यास तयार झाली तर त्यांत नवल तें कोणतें ? असेंच सर्वांना वाटे. इंग्रज अधिकारी तऱ्हेतऱ्हेनें शिपायांना समजावून सांगत कीं,'आम्हीं तलवारीच्या जोरावर मुसलमानांप्रमाणें धर्म प्रसार करीत नाहीं, व आमच्या धर्माचा तसा प्रसार करण्याची आमची इच्छाही नाहीं. जे लोक आपखुशीनें आमचे धर्मांत येतील त्यांनाच

आम्ही आमच्या धर्माची दीक्षा देऊं, तेव्हां शिपायांनीं बाटण्याची धास्ती बाळगण्याचें कोणतेंच कारण नाहीं.' परंतु इंग्रज अधिकाऱ्यांचा हा उपदेश पालथ्या घड्यावर पाणी ओतल्याप्रमाणें फुकट जाई. या उपदेशांतील पहिला भाग, म्हणजे मुसलमानांप्रमाणें इंग्रजांना तरवारीच्या जोरावर धर्मप्रसार करावयाचा नाहीं ही गोष्ट शिपायांना पटत असे. पण त्यामुळें ते उलट असा निष्कर्ष काढीत कीं, काडतुसाला गाईची व डुकराची चर्बी फांसून तीं काडतुसें आमच्याकडून दांतांनीं तोडवून वापरावयाचीं, व या युक्तीनें आम्हांला खिस्ती करावयाचें, अशी लबाडीची युक्ति कावेबाज इंग्रजांनीं शोधून काढली आहे. काडतुसें नेहमींप्रमाणें दातांनीं न तोडतां हातांनीं तोडण्याविषयींची परवानगी, अनेक इंग्रज अधिकाऱ्यांनीं आपल्या शिपायांना दिली. परंतु या परवानगीनें देखील त्या शिपायांचा संशय दूर झाला नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील शिपायी अशिक्षित व जड बुद्धीचे असल्यामुळें त्यांच्या मनांत एकदां रुजलेलें संशयाचें बीं कांहीं केल्या निघेना. कावीळ झालेल्या माणसाप्रमाणें संशयित झालेल्या डोळ्यांनीं ते कंपनीच्या पूर्व इतिहासाकडे पाहूं लागले. कंपनीच्या सर्व वागणुकींत त्यांना बेइमानी दिसूं लागली. इंग्रज कितीही सत्ताधारी व प्रबल असले तरी धर्मरक्षणाकरितां त्यांच्याशीं टक्कर द्यावयाची असा त्यांचा निश्चय झाला होता. हिंदुस्थानांत फिरत असणाऱ्या असंख्य साधु संत बैराग्यांची सहानुभूति अर्थातच या वेळीं शिपायांकडे वळली, आणि त्यांनीं प्रेमानें शिपायांचे निरोप पोंचविण्याचें काम पतकरलें. या बैरागी व फकीर लोकांच्या झालेल्या साह्यामुळें, एका छावणींतील शिपायांना दुसऱ्या छावणींतील शिपायांशीं सुलभतेनें संघटन ठेवतां आलें. हिंदुस्थानांत ही फुकट्या भटक्या संतांची संख्या किती मोठी आहे हें सर्वांना ठाऊक आहे. या अस्सल संतमंडळांत इंग्रजांनीं आपल्या पलटणींतून काढून दिलेले नकली लढाऊ संतही सामील झाले, व बंडाचा निरोप सर्वत्र पोहोंचूं लागला !

१८४२ सालीं अफगाणिस्थानावर केलेल्या स्वारींत इंग्रजांना जो खरपूस मार मिळाला, ती गोष्ट शिपायी विसरले नव्हते. काबूल येथें असलेल्या १५००० लोकांपैकीं फक्त एकटा डॉक्टर ब्रायडन हा त्यावेळीं हिंदुस्थानांत परत आला व तोही अपंग होऊन ! तोंपर्यंत इंग्रज लोक जिकडे जिकडे जात व ज्या ज्या हिंदी मुसलमान राजेरजवाड्यांशीं युद्ध करीत, तिकडे तिकडे त्यांना यशच येत होतें; व त्यांचा अखेरीस जयच होत होता. परंतु अफगाणिस्थानावरील स्वारींत आजन्मांत कधींही न खाल्लेला असा खरपूस मार इंग्रजांनीं खाल्ला होता. त्यानंतर

इंग्रजांनीं पंजाबांत जरी तलवार गाजविली होती, तरी नेटानें प्रयत्न केल्यास देशी लोकांच्या हातूनही इंग्रज लोकांचा पराजय होऊं शकतो ही गोष्ट शिपायांच्या मनांत पुरतेपणीं ठसली होती. इंग्रज लोक अजिंक्य देवदूत नसून आपल्यासारखींच साधीं माणसें आहेत हें त्यांना कळलें होतें. आपण नेटानें प्रयत्न केला व सर्वजण एकवटून इंग्रजांशीं जोराची लढाई दिली तर त्यांचा पराभव होऊन आपल्या धर्माचें खात्रीनें रक्षण होईल, असा भरंवसा त्यांना वाटूं लागला होता. प्राण गेला तरी बेहत्तर, परंतु जात बाटविणारीं नवीं काडतुसें वापरावयाचीं नाहींत असें त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चित केलें होतें.

मनाच्या अशा स्थितींत असतांना मीरत येथें बाजारांत मिळणाऱ्या कणकेंत हाडांची पूड मिळविलेली असते, अशी एक बातमी उठली. या बातमींत कांहींच अर्थ नव्हता, आणि इंग्रजांशीं तिचा संबंध जोडणेंही असमंजसपणाचें होतें. काडतुसांच्या बाबतींत शिपायांनीं आपल्या समजुतीप्रमाणें इंग्रजांना दोषी धरणें न्याय्य होतें. कारण काडतुसें इंग्रजांच्या कारखान्यांत तयार होत होतीं. जुन्या काडतुसांपेक्षां त्यांचें रंगरूप निराळें होतें. या नवीन काडतुसांसाठीं वापरण्यांत येणारा कागदही निराळ्या तऱ्हेचा होता, आणि या काडतुसांना चर्बीही माखलेली होती. ही चर्बी बकऱ्याचीच होती असें मुख्य अडजुटंटनें निक्षून सांगितलेलें असलें, तरी प्रसंग विशेषीं किंमतींत स्वस्त पडणारी बैलाची चर्बी वापरण्याचा मोह अधिकाऱ्यांना झालाच नसेल असेही म्हणतां येणार नाहीं. वूलविच येथील सरकारी रसायनशाळेंतील तज्ज्ञ क्याप्टन बाक्सर यांनीं त्या काडतुसांचें परिक्षण करून असें जाहीर केलें कीं, काडतुसांना लावण्यांत येणारी चर्बी कोणत्या जनावराची होती हें ओळखतां येणें अशक्य आहे, परंतु ती डुकराची नव्हती हें खास.' म्हणजे गाईबद्दल हे तज्ज्ञ मुग्धच आहेत. लार्ड राबर्टस हे 'हिंदुस्थानांतील चाळीस वर्षें' या आपल्या ग्रंथांत, शिपायांचा तर्क अगदींच निराधार नव्हता व विशेष काळजी न घेतांना आणि जनावरांची निवडानिवड न करतांच काडतुसांना चर्बी माखण्यांत येत असे, अशी कबूली देतात. फारेस्ट साहेबांनींही सरकारी कागदपत्रांच्या द्वारें हेंच सिद्ध केलें आहे. पूर्वीप्रमाणेंच इंग्रजांना देशी शिपायांच्या धर्मभावनांबद्दल आदर असता, व त्या न दुखविण्याची त्यांची इच्छा असती, तर अशा महत्वाच्या बाबतींत त्यांच्या हातून असा निष्काळजीपणा झाला नसता. अन्नावर एखाद्याची सावली पडली तरी विटाळ मानून दिवसभर उपास करणारे हिंदु-ब्राम्हण शिपाई चरबीनें माखलेलीं काडतुसें तोंडांत घालून दांतानें कशीं तोडतील, याचा इंग्रजांनीं विचार

करावयास हवा होता. आणि ती चरबी गाईची आहे असा एकदां त्यांना संशय आल्यावर, ते बेफाम झाले म्हणून त्यांना दोष कसा देतां येणार ? कारण काडतुसांना लावण्यांत येणारी चरबी गाईची नव्हतीच असें इंग्रजही छातीला हात लावून ठाम सांगूं शकत नाहींत. शिपायांबद्दल इंग्रजांना बेफिकीरी वाटत असली, हिंदुस्थानांत त्यांची घडी उत्तम जमल्यामुळें शिपायांची त्यांना पर्वा वाटत नसली, व वीस वर्षांचीं गोरीं पोरें अधिकारी झाले म्हणजे वयोवृद्ध हिंदी शिपायांना तुच्छतेनें ' निगर ' म्हणून संबोधीत असले, तरी शिपायांना बाटविण्याचा कंपनीचा मुळींच इरादा नव्हता हें स्पष्टपणें कबूल केलें पाहिजे. काडतुसांना गाईची किंवा डुकराची चरबी हिंदु-मुसलमानांना बाटविण्याच्या उद्देशानें खास लावण्यांत आली नाहीं; बेफिकीरी व निष्काळजीपणामुळें कदाचित् दुसऱ्या चर्बीत त्यांत ती चुकून मिसळली गेली असेल किंवा नसेलही.

बैलाच्या हाडांचा कोळसा अगदीं अलीकडेपर्यंत साखर शुद्ध करण्याकरितां वापरला जात असे ही गोष्ट माहीत असणाऱ्यांना, ७० वर्षांपूर्वीच्या उत्तरहिंदुस्थानांतील अशिक्षित परंतु धर्मनिष्ठ शिपायांना नव्या काडतुसांच्या अपवित्रतेबद्दल आलेला संशय खोटा असला तरी मूर्खपणाचा खास म्हणतां येणार नाहीं. त्यांच्या संशयाला वरपांगीच्या दृष्टीनें तरी भरभक्कम कारणें होतीं. परंतु बाजारांत विकत मिळणाऱ्या कणकेंत गाईच्या हाडांची पूड मिळविली असली तरी त्याचा दोष इंग्रजांच्या माथीं कसा मारतां येणार ? कारण काडतुसें इंग्रजांच्या कारखान्यांत तयार होत होतीं, व तीं वापरण्याबद्दल इंग्रज अधिकाऱ्यांचा शिपायांना सारखा आग्रह चालू होता. त्याबद्दल इंग्रजांना शिपायांनीं दोष देणें रास्त ठरेल. परंतु इंग्रज अधिकारी कणकेचा व्यापार खास करीत नव्हते. कणीक वाईट असली, व तींत हाडांची पूड मिसळलेली असली, तरी त्याबद्दल बाजारांतील बदमाष व्यापाऱ्यांना दोषी ठरवावयास हवें होतें. शिवाय ही गोष्टही अगदीं असंभवनीय कोटींतील होती. परंतु एकदां संशयाचा काळा चष्मा लावल्यावर त्यांना प्रत्येक गोष्ट काळी दिसूं लागली. बाजारांत विकत मिळणाऱ्या तुपांत चर्बी मिसळलेली असते, ही बातमीदेखील बंडाला उत्तेजक झाली, व त्याचेंही पाप इंग्रजांच्या माथीं फोडण्यांत येऊं लागलें. विचार करतो कोण ? आपल्या धर्मावर हें दुसरीकडूनच संकट उद्भवलें अशी त्यांची भावना झाली. त्यांनीं अतिशय चिकित्सा करून स्वयंपाकपाण्याकरितां त्या दिवशीं बाजारांतून सामुग्री खरेदी केली, व त्यांचा स्वयंपाकही बराच लांबला. परंतु तेवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं.

मीरत येथील लष्करी छावणी बरीच मोठी होती. पायदळ व घोडेस्वार अशा दोन्ही प्रकारच्या पलटणी तेथें होत्या. शिवाय तेथील तोफखानाही बराच मोठा होता. एकंदर छावणीची लांबी–रुंदी २ मैल होती. युरोपियन व देशी पलटणींच्या राहाण्याच्या जागेमध्यें एक लहानशी नदी वहात जात होती. नदीच्या एका बाजूला युरोपियन शिपाई व दुसऱ्या बाजूस देशी शिपाई राहात असत. एकंदर छावणींत जवळ जवळ १८५० गोरे शिपाई आणि ३००० काळे शिपाई त्यावेळीं राहात असत. गोऱ्यांची संख्या काळयांच्या तुलनेनें या ठिकाणीं बरीच मोठी असल्यामुळें, येथें देशी शिपायांच्या पलटणी फितुर होण्याचा फारच कमी संभव होता. मीरतची छावणी अतिशय मोक्याचर होती. गंगा व यमुना या दोन नद्यांमधील दुआबाच्या मध्यभागीं मीरत शहर असून दिल्लीपासून तें फक्त ३६ मैलांवर होतें. दिल्लीच्या बादशाही राजधानीवर नजर ठेवण्याकरतांच या लष्करी छावणीची योजना करण्यांत आली होती. परंतु याच ठिकाणीं बंडाच्या ज्वालेनें प्रथम पेट घेतला, व सेनापती, तोफखाना आणि गोऱ्या पलटणी असूनही पहिली आग येथेंच लागली.

६ मे रोजीं सकाळीं ३ नंबरच्या घोडेस्वारांच्या पलटणीची परेड होती. आदल्या दिवशीं संध्याकाळीं त्यांच्यापैकीं बऱ्याच जणांनीं काडतुसें स्वीकारण्याचें नाकारलें होतें. त्यांच्या अधिकाऱ्यानें त्यांना पुष्कळ सांगून पाहिलें, धाकही घातला परंतु कांहींच उपयोग झाला नाहीं. लष्करी कायद्याप्रमाणें असलें बेशिस्तीचें वर्तन अगदीं अक्षम्य होतें. त्यामुळें ६ मे रोजीं त्या पलटणीची जेव्हां परेड घेण्यांत आली, तेव्हां तेथील सर्व युरोपियन पलटणी व तोफखाना सज्ज ठेवण्यांत आला होता. परेडच्या वेळीं पलटणींतील ८५ इसमांनीं, आम्हीं या नव्या काडतुसांना प्राण गेला तरी शिवणार नाहीं असें शपथेवर सांगितलें. त्या सर्वांना पकडण्यांत आलें आणि त्यांच्यावर लष्करी कायद्याप्रमाणें खटले करण्यांत आले. त्यांच्यावरील खटल्यांचा लवकरच निकाल लागून त्या सर्वांना ६ वर्षांपासून १० वर्षांपर्यंतच्या मुदतीची सक्त मजुरीची सजा देण्यांत आली; आणि हातकड्या व पायबेड्यांचे अलंकार त्यांचेवर चढविले जाऊन त्यांची मीरत येथील तुरुंगांत रवानगी करण्यांत आली. तुरुंगवास म्हणजे प्रत्यक्ष धर्मावर घालाच आला, असें त्यावेळीं वाटत असे. कारण पूर्वीं कैद्यांना तुरुंगांत आपल्या घरचा लोटा पाणी पिण्याकरितां व थाळी जेवणाकरितां नेऊं देत असत. त्यामुळें त्यांची जात बाटत नसे. परंतु शिस्तीसाठीं ही चाल कंपनीनें अलीकडे मोडली होती, व सर्व कैद्यांच्या नशीबीं

सरकारी टिनपाटें आलीं. त्यांचा पूर्वी कोणी उपयोग केला असेल हें एक ईश्वरासच ठाऊक. यामुळें महार कैद्यानें एकदां वापरलेलें भांडें ब्राम्हणाच्या उपयोगांत येऊं लागलें. स्वयंपाकाच्या बाबतींतही पूर्वीच्या सवलती कैद्यांना मिळेनाशा झाल्या. शनिवारीं त्या ८५ शिपायांना खटल्याच्या निकालाप्रमाणें तुरुंगांत रवाना करण्यांत आलें. पलटणींतील बाकीच्या लोकांना या गोष्टीबद्दल अतोनात दुःख झालें. कारण धर्म बाटविण्याच्या कंपनीच्या युक्त्यांत तुरुंगवासाचीही गणना होऊं लागली होती. कळूं तर द्यावयाचें नाहीं, पण अवचित धर्मांतर घडवून आणण्याचा निश्चय केलेल्या कंपनीनें असेच चोरटे हल्ले धर्मावर करावे, हें शिपायांना साहजिक खरें वाटे. शिवाय त्या ८५ इसमांनीं केवळ आपल्या धर्मासाठीं अपमान सहन करून, अपमानास्पद व अधार्मिक असा तुरुंगवास पतकरला अशी त्यांची खात्री झाली होती. जी गोष्ट करण्याला आपलेंही मन आपल्याला सांगत आहे तीच गोष्ट त्या शिपायांनीं केली. आपल्या सर्वांच्या मनांत घोळत असलेले विचार त्या शूर लोकांनीं सर्वांपुढें स्पष्टपणें बोलून दाखविले. त्यांच्या धैर्याबद्दल जर आपण त्यांना अशी शिक्षा भोगूं दिली, तर आपल्या भ्याडपणाचा सर्व हिंदुस्थानभर डांगोरा पिटला जाईल व आपल्या नांवाला कायमची काळोखी लागेल. ते ८५ इसम आपल्या धर्मासाठीं जिवावर उदार होऊन, निधड्या छातीनें तुरुंगाकडे चालत गेले. आणि आतां जर आपण त्यांच्या मागोमाग गेलों नाहीं, तर आपलें सर्व जगांत हंसें होईल. शनिवारचा दिवस व रात्र त्यांनीं अशाच प्रकारच्या विचारांत घालविली, व दुसऱ्या दिवशीं आपल्या बांधवांना कैदेंतून सोडवावयाचें असा त्यांचा शेवटीं निश्चय ठरला. रविवारीं संध्याकाळीं चर्चमध्यें साहेबलोक प्रार्थनेकरितां जमतील ती वेळ आपल्या कार्याला सोयीस्कर पडेल असें त्यांनीं ठरविलें. कारण आपण जर सकाळीं बंडाचें निशाण उभारलें तर साहेबलोकांना तें मोडण्याची तयारी करावयास वेळ सांपडेल, व ते कदाचित् आपल्याला वाटेंत अडवतील. परंतु संध्याकाळीं बंडाचा बावटा उभारल्यास रात्रीच्या अंधारांत आपण त्यांच्या हातांवर सहज तुरी देऊं शकूं. याप्रमाणें विचार होऊन त्यांचा निश्चय कायम झाला. ११ नंबरची पायदळ पलटण बंडांत सामील होण्यास तयार नव्हती. परंतु त्या ८५ लोकांप्रमाणेंच सर्व देशी शिपायांची तुरुंगांत रवानगी करण्याचा गोऱ्या शिपायांचा व त्यांच्या अधिकाऱ्यांचा नक्की विचार ठरला आहे, अशी बातमी एकानें सांगितली. त्याबरोबर तुरुंगांत जाऊन कुत्र्याच्या मोतेनें सडत पडून मरण्यापेक्षां, धर्मरक्षणासाठीं प्रसंग पडल्यास रणांगणावर प्राण देणें फार उत्तम, असा मनाशीं विचार

करून तीही पलटण बंडवाल्यांना सामील झाली. गोऱ्या शिपायांना तयारी करण्यास वेळ मिळूं देणें घातकीपणाचें ठरेल, म्हणून 'शुभस्य शीघ्रम्' या न्यायानें उठावणीसाठीं दुसराच दिवस नक्की करण्यांत आला.

रविवार १० मे रोजीं संध्याकाळीं चर्चेची घंटा वाजते न वाजते तोंच, तिसऱ्या घोडदळाचे सर्व शिपायी आपल्या घोड्यांवर स्वार होऊन तुरुंगाकडे दवडत गेले. तुरुंगावरील शिपायी व पहारेकरी बंडवाल्यांना मिळाले. त्यामुळें तुरुंगाचीं दारें तोडून शिपायांना बंधमुक्त करण्यास फारसा वेळ लागला नाहीं. लोहारांकडून त्या शिपायांच्या बेड्या तोडविण्यांत आल्या. आणि त्यांना घोड्यांवर बसवून घेऊन ती सर्व पलटण आपल्या छावणीकडे झोकांत परत आली. परंतु तेवढ्या वेळांत ११ व २० नंबरच्या पलटणींतील शिपायांनीं दंगा उडवून देऊन आपल्या वरिष्ठ युरोपियन अधिकाऱ्यांना गोळ्या घालून ठार मारलें होतें. या शिपायांनीं शहरांतील बऱ्याचशा युरोपियन लोकांच्या बंगल्यांत आगी लावल्या, आणि मिळेल तेवढी लूट करून दिल्लीचा रस्ता धरला.

मीरत येथील मुख्य सेनापति ह्यूवेट हे अतिशय भांबावले व काय करावें हें त्यांना सुचेना. त्यांनीं एकंदर आपली सर्व गोरी फौज परेडग्राउंडवर जमा केली. परंतु बंडवाले तेथें नव्हतेच. बंडवाल्यांच्या मागून फौज पाठवून त्यांचा दिल्लीचा रस्ता रोंखणें फारसें कठीण नव्हतें. परंतु ती गोष्ट सेनापतिसाहेबांना सुचलीच नाहीं. कॅपटन रोसरनें आपण होऊन बंडवाल्यांचा पाठलाग करण्याची उत्सुकता दर्शविली. परंतु त्याची विनंति मान्य करण्यांत आली नाहीं. सेनापतिसाहेब व इतरही इंग्रज अधिकारी झालेल्या दंगलीमुळें इतके घाबरले होते कीं, ती सारी रात्र त्यांनीं परेडच्या मैदानावर जागून काढली. शहरामध्यें आपल्या जातभाईंच्या रक्षणाकरितां देखील फौज पाठविण्याची बुद्धि त्यांना झाली नाहीं. त्यामुळें शहरांत राहाणाऱ्या मुलकी खात्यांतील युरोपियन व युरेशियन रहिवाशांचे अत्यंत हाल झाले. बंडाच्या धामधुमीमुळें, ३ नंबरच्या पलटणींतील ८५ शिपायांबरोबर तुरुंगांतील इतरही कैदी मुक्त झाले होते. त्यांची संख्या जवळ जवळ १००० होती. पापकर्मांत निर्ढावलेल्या या बदमाष व बेरड डाकूंनीं आणि त्यांच्या बरोबर गांवांतील इतर हलकट गुंडांनीं रात्रभर शहरांत प्रळय केला. त्यांनीं अनेक घरें जाळलीं, सांपडेल ती लूट केली, आणि लूट करतां येणें शक्य नव्हतें त्या सामानाची नासधूस केली. त्यांच्या हातून पुरुष, बायका, व मुलें मारलीं गेलीं. जनरल ह्यूवेटमध्यें थोडेंसें अधिक धैर्य व धाडस असतें, तर यांपैकीं बराचसा अनर्थ टळला

असता. आणि मीरत येथील बंडखोर फौजही दिल्लीला पोहोंचूं शकली नसती. परंतु या आकस्मिक उद्भवलेल्या संकटानें त्याचा मेंदू लुला पडला होता, आणि योग्य विचार करून उपाय योजण्याचें सामर्थ्य त्याच्या आंगीं उरलें नव्हतें. त्याला एकट्यालाच दोष देणें मात्र योग्य होणार नाहीं. मीरत येथील सर्वच युरोपियन अधिकाऱ्यांची जवळ जवळ तीच स्थिती झाली होती. शिपायी दिल्लीच्या रस्त्याला लागले हें कळल्यानंतर देखील त्यांचा पाठलाग करण्यांत आला नाहीं. जर शिपायांचा ताबडतोब पाठलाग करण्यांत आला असता, तर ३ नंबरची घोडदळाची पलटण कदाचित् यमुना पार होऊन हातांतून निसटली असती, परंतु ११ व २० नंबरचीं पायदळ पलटणें हातीं लागण्याचा बराच संभव होता. परंतु सेनापतिसाहेबांनीं बंडवाल्यांचा पाठलागही केला नाहीं आणि २००० सशस्त्र गोरी फौज व जय्यत तोफखाना हाताशीं असतां शहराचेंही रक्षण केलें नाहीं. शहरांत रात्रभर तुरुंगांतील मुक्त झालेल्या कैद्यांकडून व त्यांच्याच गुंड भाईबंदांकडून घोर अनाचार चालू होते.

ही अत्याचारांची संख्या आणखीही वाढली असती, परंतु पुष्कळशा साहेब लोकांचे काळे नोकर इमानाला जागल्यामुळें त्यांचे प्राण बचावले. खुद्द कमिशनर साहेबांचे व त्यांच्या कुटुंबाचे एका नोकरानें अतिशय शर्तीनें जीव वांचविले. दंगेखोरांना दुसरीकडच्या लुटीचें आमिष दाखवून त्यांचा माळी गुलाबसिंग यानें आपल्या मालकाचे जीव व अब्रू वांचविली. बंगल्याला आग लागली तेव्हां कमीशनरसाहेब व त्यांच्या कुटुंबांतील सर्व मंडळी वरच्या माळयावर प्राणरक्षणासाठीं जाऊन लपली होती; दंगेखोरांनीं सर्व बंगला धुंडाळला व आंतील चीजवस्त सर्व लुटून फस्त केली; परंतु बंगल्याच्या माळयावर अडगळींत लपलेले साहेबलोक त्यांना सांपडले नाहींत. याप्रमाणें त्यांचा तात्पुरता बचाव झाला असला तरी आगींत होरपळून मरण्याचें त्यांच्या नशीबीं आलें असतें. बंडवाल्यांनीं आग लावल्यामुळें बंगला चारी बाजूंनीं पेटला, त्यामुळें माळयावरून खालीं उतरणें जरूर होतें. परंतु सभोंवतीं दंगेखोरांचा जमाव असल्यामुळें खालीं उतरणें म्हणजे आगींतून निघून फुफाट्यांत पडणें होतें. कारण दंगेखोर पक्के बेरड असल्यामुळें त्यांना दयामाया व माणुसकी हे शब्द माहीत नव्हते. बायका मुलें देखील त्यांच्या दृष्टीनें अवध्य नव्हतीं. आपल्या मालकावरील आलेला दुर्धर प्रसंग पाहून गुलाबसिंगानें दंगेखोरांना लूट दाखविण्याची लालूच दाखवून दुसऱ्या बंगल्याकडे नेलें, व ते दुसरीकडे गेल्यानंतर मालकाला व त्याच्या घरच्या मंडळींना लपवून

सुरक्षितपणें इंग्रजी छावणीकडे पोहोंचविलें. इतर साहेब लोकांचेही सदा न कदा तुच्छ लेखले गेलेले काळे नोकर अत्यंत स्वामिनिष्ठ राहिले, व त्यांनीं आपल्या मालकांचे जीव वांचविण्याचे शिकस्तीचे प्रयत्न केले. कित्येक वेळां त्यांना अपयश आलें व दंगेखोरांच्या तलवारीला त्यांचे धनी वाटेंत ओळखले जाऊन बळी पडले, ही गोष्ट निराळी. परंतु या काळ्या नोकरांच्या स्वामिनिष्ठेमुळें मीरत येथील दहा तारखेच्या रात्रीं घडलेल्या भीषण कांडांत गोऱ्या लोकांची सरसहा कत्तल झाली नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. घरची गरीबी असल्यामुळें लुटीचा मोह बाजूस सारणें सोपे नव्हतें. धर्मरक्षणाच्या नांवानें देशबंधूंनीं मारलेल्या हाकांना 'ओ' न देणें पराकाष्ठेचें कठिण कर्म होतें. परंतु हे दोन्ही मोह बाजूस सारून देशी नोकर स्वामिनिष्ठ राहिले, यांतच त्यांच्या स्वामिभक्तीची परमावधी झाली !

अकरा नंबरची पलटण बंडांत सामील होण्यास प्रथमपासूनच फारशी खुश नव्हती. बरोबरच्या पलटणींच्या आग्रहामुळें व कदाचित् आपणांस इंग्रज लोक कैद करतील या निष्कारण वाटणाऱ्या भीतीमुळें तिनें बंड पुकारलें होतें. परंतु दिल्लीचा रस्ता धरण्यापूर्वी त्या पलटणींतील शिपायांनीं शहरांत राहणाऱ्या आपल्या अधिकाऱ्यांना व त्यांच्या कुटुंबांतील मंडळींना इंग्रजी बराकींत सुखरूप पोहोंचविलें. मीरत शहरांतील सामान्य हिंदी नागरिकांना घराबाहेर पडणें धोक्याचें वाटत असल्यामुळें इंग्रज रहिवाशांना त्यांचा फारसा उपयोग झाला नाहीं, ही गोष्ट खरी, परंतु त्यामुळें ते बंडवाल्यांशीं सहानुभूती बाळगून होते ही कल्पना करणें चुकीचें ठरेल. गांवांत उसळलेल्या दंग्यामुळें इंग्रजांप्रमाणेंच त्यांच्या जीवाची व वित्ताची त्यांनाही शाश्वती वाटत नव्हती. कारण रात्रभर धुंडावा माजवणाऱ्या लोकांत तुरुंगांतून अवचित मुक्त झालेल्या कैदी, चोर व खुनी यांचाच भरणा होता. अशा स्थितींत सामान्य नागरिकांनीं आपलें घर सांभाळून राहणें मनुष्यस्वभावाला धरूनच झालें. तरी त्यांच्यापैकीं अनेक शूर व धाडसी इसमांनीं इंग्रजांना आपल्या घरीं आश्रय दिला. इंग्रजी बायकामुलांना आपल्या घरांत लपवून ठेवून त्यांचें रक्षण केलें व दंगेखोरांच्या क्रोधाची पर्वा केली नाहीं. या उदाहरणावरून हिंदी लोकांची माणुसकी त्यावेळीं सर्वस्वी नष्ट झाली होती, असें म्हणणें केवळ हट्टाचें व दुराग्रहाचें ठरेल. मिसेस ग्रीथेड, मिसेस क्रगी वगैरे इंग्रज स्त्रियांचें व त्यांच्या वित्ताचें देखील रक्षण केवळ हिंदी लोकांच्या मदतीनेंच झालें.

दुसरे दिवशीं सकाळीं कत्तल झालेल्या इंग्रजांचीं प्रेतें नाटकगृहांत जमा करण्यांत आलीं. हिंदी लोकांच्या मदतीनें वांचलेले अनेक इंग्रज स्त्रीपुरुष हळूहळू छावणींत येऊन पोहोंचले. रात्रभर गांवांत अत्याचार होत असतां परेडच्या मैदानांत गुपचूप विश्रांती घेत पडलेल्या इंग्रज शिपायांना व त्यांच्या अधिकाऱ्यांना, रात्रीं शहरांत उडालेली होळी व हत्या पाहून सकाळीं त्वेष चढला, व बदला घेण्यास ते सज्ज झाले. परंतु बदला घ्यावयाचा कोणावर? बंडवाले शिपाई केव्हांच दिल्लीच्या वाटेला लागले होते. आणि त्यांच्यापैकीं घोडदळाच्या पलटणीनें आतांपर्यंत दिल्ली जवळ केली होती. तुरुंगांतील सुटलेल्या ज्या चोर दरवडेखोरांनीं हे अत्याचार केले होते ते केव्हांच नाहींसे झाले होते. परंतु त्वेषानें भडकलेले इंग्रज शिपाई मीरत येथील निरपराधी रयतेवर सूड उगवूं इच्छीत होते. कारण तेच बिचारे त्यांच्या तावडींत सांपडण्यासारखे होते. त्यांच्यावर सूड उगवून इंग्रजांचा वचक व दरारा बसविण्याच्या उद्योगाला इंग्रज शिपाई व अधिकारी लागले. दोन चार इसम झटपट न्यायाच्या चौकशींतून पार पडून फांसावरही लटकले. परंतु सेनापती ह्यूवेट याला ही गोष्ट पसंत न पडल्यामुळें त्यानें असला नामर्दाईचा व अन्यायी सूड घेण्याची शिपायांना सक्त मनाई केली. सेनापतीच्या न्यायपरायणते-मुळें मीरतचे सामान्य लोक या प्राणसंकटांतून बचावले.

प्रकरण १३ वें.

## दिल्लीवरील हल्ला !



शिपायांमधील अस्वस्थता जानेवारी १८५७ पासून सारखी वाढत होती. धर्मरक्षणासाठीं इंग्रजांशीं झुंज घेणें भाग आहे असें सर्वांचें ठाम मत बनलें होतें. या वाढत्या अस्वस्थतेकडे इंग्रज अधिकारी तुच्छतेनें पहात होते. कारण इंग्रजांना आपल्या सामर्थ्याची इतकी घमेंड चढली होती कीं हिंदी शिपायांची नाराजी त्यांच्या कदरेंत नव्हती. परंतु शिपायांच्या वाढत्या अस्वस्थतेवर उत्तर हिंदु-स्थानांतील कांहीं प्रसिद्ध व कर्तबगार पुरुषांची बारीक नजर होती. शिपायांच्या धर्म-भावना इंग्रजांविरुद्ध प्रज्वलित झाल्या हें पाहून यांना आनंद वाटूं लागला. शिपा-यांना आलेला सात्विक क्रोध कदाचित् क्षणभंगुर स्वरूपाचा असेल, अशी प्रारंभीं

यांना भीति वाटत असल्यामुळें, हे दुरूनच परिस्थितीचें निरीक्षण करीत होते. परंतु शिपायांचा इंग्रजावरील विश्वास साफ उडून गेला आहे, हें लवकरच यांच्या लक्षांत आलें. इंग्रजांनीं हिंदी लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून व त्यांच्या आपसांतील फुटीचा फायदा घेऊन, ज्या शिताफीनें व अक्कलहुशारीनें पाहतां पाहतां हिंदुस्थानचें प्रचंड साम्राज्य मिळविलें, त्याच शिताफीनें व हुशारीनें अनेक कपट युक्त्या योजून हिंदी लोकांचा धर्मही पाहतां पाहतां ते नष्ट करतील, व सर्व हिंदुस्थान ख्रिस्ती करतील अशी शिपायांची पक्की मनोभावना झाली होती. केवळ कागदी घोडे नाचवून लॉर्ड डलहौसीनें राज्येंच्या राज्यें कशीं खालसा केलीं हा ताजा अनुभव त्यांना आला होता. अशा हुशार व कारस्थानपटू लोकांना हिंदी लोकांना बाटविण्यासाठीं परोपरीच्या युक्त्या सुचावयास व त्या योजावयास फारसा वेळ लागणार नाहीं, ही गोष्ट ते जाणून होते. इंग्रज लोकांचें चातुर्य व त्यांची यशस्वी राजनीती यांचा त्यांना पुरता अनुभव आला असल्यामुळें, त्यांचा काडीमात्र भरवंसा शिपायांना वाटेना. इंग्रजांच्या प्रत्येक शब्दाकडे व कृतीकडे-ती साधी व सरळ असली तरी-ते संशयानें पाहूं लागले. काडतुसाचा कागद थोडासा कमजास्त जाड असला, किंवा रंगांत फरक असला, किंवा त्यांच्या बोलण्यांत थोडासा फरक झाला, तरी शिपाई कावरेबावरे होत व आपला धर्म तर या गोष्टीनें जाणार नाहींना, या भावनेनें त्या फरकाकडे पहात असत. दुधानें तोंड एकदां भाजलें असल्यामुळें ताकदेखील पितांना ते फुंकूं लागले.

शिपायांच्या मनाची एकदां पक्की ओळख पटल्यावर या कर्तबगार व महत्त्वाकांक्षी व्यक्ती, त्यांच्या शौर्याचा व त्यांचा फायदा कसा करून घेतां येईल या गोष्टीचा विचार करूं लागल्या. या सर्व व्यक्ती इंग्रजांच्या हातून दुखावल्या गेल्या होत्या. पेशवाई जाऊन त्या बदल्यांत मिळत असलेली पेनशन जप्त झाल्यामुळें संतप्त झालेले नानासाहेब व त्यांची प्रमुख सल्लागार आणि आश्रितमंडळी, झांशीचें राज्य बेकायदा हिसकावून घेतल्यामुळें 'हरि हरि' म्हणत स्वस्थ बसलेली मानिनी राणी लक्ष्मीबाई, उपटसुंभ असे गैरव्यवस्थेचें भूत उभें करून अन्यायानें औधचें राज्य दडपल्यामुळें क्रुद्ध झालेल्या लखनौ येथील बेगमचा प्रमुख सल्लागार फैजाबादचा मौलवी लिआकत हुसेन, दिल्लीची मावळती बादशाही पुरतेपणीं विझविण्याचा घाट घातल्यामुळें जिवावर निराशेनें उदार झालेली वृद्ध बहादूरशहाची बेगम झीनतमहाल व तिचा तरुण मुलगा, इंग्रजी जमीनधारापद्धतीनें श्रीमान व शक्तिमान जमीनदारीवरून चौपदरीवर येऊं पहाणारा बिहारचा कुंवरसिंह, या सर्व थोर

व्यक्ती डोळ्यांत तेल घालून गेलेली सत्ता परत मिळविण्यासाठीं योग्य संधीची वाट पहात होत्या. शिपायांच्या मनाचा अंदाज पुरतेपणीं लागल्यावर त्यांनीं या संधीचा फायदा घेणें ओघानेंच प्राप्त झालें. नानासाहेब पेशवे १८५७ सालच्या सुरवातीस फिरतीवर निघाले. लखनौ, दिल्ली, काल्पी या ठिकाणांना त्यांनीं भेट दिली. फौजेंतील शिपायांचा सूर कसा वहात आहे ही गोष्ट ते अजमावून पहात होते. त्याबरोबरच या राज्यक्रांतीच्या उठावाला आणखी कोणा-कोणाचें साहाय्य मिळेल, याचाही त्यांनीं अंदाज घेतला. थामसनसाहेबांच्या पद्धतीमुळें त्रस्त व संतप्त बनलेले आणि नागवले गेलेले जमीनदार आपणांस सहाय्य करतील असा त्यांना भरंवसा आला. दक्षिणेंत इनाम कमीशनच्या गांजणुकीमुळें नाराज झालेले सरदारही असल्या संधीची वाट पहात आहेत, असें त्यांनीं कर्णोपकर्णीं ऐकलें होतें. सांगलीकर पटवर्धनांशीं तर त्यांची सोयरीकच होती. फैजा-बादचा प्रसिद्ध मौलवी देखील दौऱ्यावर निघाला. कलकत्त्यापासून कानपूरपर्यंतचीं सर्व प्रमुख स्थानें त्यानें स्वतः जाऊन पाहिलीं. ह्या निरनिराळ्या प्रमुख व्यक्तींच्या आपापसांत मुलाखती झाल्या व सल्लामसलतही त्या मुलाखतींत झाली असावी. शिपायांना धर्मनाशाची आलेली शंका दूर करणें त्यांना अर्थातच इष्ट नव्हतें. उलट शिपायांच्या मनाचा ओघ एकदां समजल्यावर तो प्रबल करण्याचा त्यांचा प्रयत्न सुरू झाला. धर्मरक्षणासाठीं जिवावर उदार होण्याचा उपदेश चोहोंकडून शिपायांच्या कानांवर येऊं लागला. हिंदी लोकांना बाटविण्याकरितां इंग्रजांनीं कोणकोणते उपाय मनांत योजून ठेवले आहेत, याबद्दल तऱ्हेतऱ्हेच्या अफवा उठविण्यांत येऊं लागल्या, आणि कावीळ झालेल्या रोग्याप्रमाणें भोळ्याभावड्या हिंदी शिपायांचा त्या सर्व अफवांवर विश्वासही बसूं लागला. 'इंग्रज लोक हिंदी शिपायांचा धर्म व जात प्रथम बाटवून त्यांना ख्रिस्ती करणार, आणि ते एकदां बाटून ख्रिस्ती झाले म्हणजे त्यांच्या मदतीनें सर्व हिंदुस्थानांतील रयत बाटवून सर्व देश ख्रिस्तमय करून सोडणार! हिंदी शिपायांवर इंग्रजांची सर्व भिस्त असल्यामुळें त्यांच्यावर धर्मांतराचा हा पहिला प्रयोग केला जाणार. कारण शिपाई एकदां बाटले म्हणजे बाकीचें हिंदुस्थान बाटावयास उशीर लागणार नाहीं. शिपायांचें साहाय्य असल्यावर इंग्रजाना कोणती गोष्ट अशक्य आहे? शिपायांच्या साहाय्यानेंच इंग्रजांनीं एवढालीं मोठमोठीं हिंदुमुसलमान राजेरज-वाड्यांचीं प्रचंड राज्यें जिंकून घेतलीं, राजेरजवाड्यांना मातीमोल बनविलें व इंग्रजी सुलतानत स्थापन केली. मग हिंदी शिपायांच्या मदतीनें हिंदुस्थान देश

ख्रिस्ती बनविण्यास कितीसा वेळ लागणार?' कानावर नित्य येणारी ही विचारसरणी शिपायांना शब्दशः खरी वाटूं लागली. कारण त्यांच्या पूर्व अनुभवाला या गोष्टी पटत असत, आणि त्यांची मूळची दृष्टी फिरल्यामुळें विधवाविवाहाचा किंवा धर्मांतरित वारसानीचा कायदा, आगगाड्या व तारायंत्रें, शाळा आणि दवाखाने या इंग्रजी राज्यांतील सुधारणादेखील त्यांना धर्मावर मारा करणाऱ्या गुप्त कट्यारीप्रमाणें भासूं लागल्या! कारण पैशाचा, नोकरीचा किंवा गोऱ्यागोमट्या मुलीचा लोभ दाखवून, हिंदू लोकांना आपल्या जाळयांत ओढतांना त्यांनीं मिशनऱ्यांना पाहिलें होतें. शिकलेले लोक बाटगे बनतात व इंग्रजांचें अंध अनुकरण करून आपल्याच लोकांना हंसतात, हा अनुभव त्यांना अनेकवार आला होता. आगगाडींत विटाळ लोपत होता, हें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें. मग या बातम्यांवर त्यांचा भरंवसा कां न बसावा?

शिपाई याप्रमाणें दिवसेंदिवस अधिकच बिथरत चालले. कारण त्यांच्या मनांत उत्पन्न झालेल्या संशयज्वालांवर तुपाच्या आहुती ओतून त्या भडकविण्याचा प्रयत्न भिन्न भिन्न परंतु इंग्रजी राजनीतीमुळें दुखावल्या गेलेल्या प्रमुख पुरुषांकडून होत होता. सर्व दूर अशी बातमी उठली होतीं कीं इंग्रजांचें राज्य १८५७ सालीं नष्ट होणार. १७५७ सालीं प्लासीची लढाई जिंकल्यामुळें इंग्रजांची सत्ता हिंदुस्थानांत प्रथम बंगाल प्रांतांत स्थापन झाली. त्या लढाईला बरोबर १०० वर्षे झालीं असल्यामुळें इंग्रजांचें राज्य नष्ट होणार व पुन्हा देशी राज्याची स्थापना होणार, अशीं भविष्यें वर्तविण्यांत येऊं लागलीं. हिंदु ज्योतिषी व मुसलमान रमलवाले हे दोघेही आपापले ग्रंथ उलगडून हेंच फलित वर्तवूं लागले. या भाकितावर शिपायांचा पूर्ण विश्वास बसला. शिपायांची मनस्थिती त्या वेळीं अशी बनली होती कीं, इंग्रजाविरुद्ध वाटेल त्या बातमीवर त्यांचा विश्वास सहजगत्या बसत असे. लालतोंड्या फिरंग्यांचें राज्य हिंदुस्थानवर १०० वर्षेपर्यंत टिकेल व नंतर पैगंबराच्या अनुयायांचें राज्य पूर्ववत् हिंदुस्थानवर चालू होईल, असें भविष्य अनेक मौलवी आपल्या धार्मिक पोथ्यांवरून लोकांना खात्रीपूर्वक सांगत होते. शिवाय धर्मकार्यासाठीं हें युद्ध पुकारलें जावयाचें असल्यामुळें ईश्वराचा आपल्याला पाठिंबा मिळेल, व त्याच्या कृपाप्रसादामुळें आपण विजयी होऊं, असा शिपायांना भरंवसा वाटत होता. हिंदुस्थानांतील सामान्य भोळ्या जनतेचा देखील या भविष्यवाणीवर विश्वास जडला होता. समाजाचें मन उत्तेजित करण्याकरितां एखादी सामान्य वार्ताही पुरे होते. व्यक्ति व समाज यांची मनोरचना भिन्न

प्रकारची असते. एखाद्या भाकिताचें व्यक्तीला कांहींच महत्त्व वाटणार नाहीं. परंतु सर्व समाजांत चेतना उत्पन्न करण्याची शक्ति त्या भाकिताचे ठायीं असते. याशिवाय क्रिमियन युद्धांत इंग्रजांचा अतोनात पराभव झाला, त्यांचे लाखों शिपायी हाल हाल होऊन मरण पावले, आणि खुद्द विलायतेंतच त्यांना आपलें आसन संभाळणें जड झालें आहे, अशा विकृत व अनधिकृत बातम्या हिंदुस्थानांत येऊन थडकल्या होत्या. युरोपांतून क्रिमियन युद्धाच्या बातम्या हिंदुस्थानांत येतां येतां अतिशयोक्तिपूर्ण स्वरूपाच्या बनल्या होत्या. क्रिमियन युद्धांत जखमी शिपायांची फार आबाळ झाली व त्यांची नीट शुश्रूषा प्रथमारंभीं तरी होऊं न शकल्यामुळें, रणांगणापेक्षां दवाखान्यांतच अधिक शिपायी प्राणास मुकले. वर्तमानपत्रांत या गोष्टीची अहोरात्र अतोनात चर्चा चालू असल्यामुळें हा 'का'चा कावळा झाला होता. परंतु शिपायांचा त्या वार्तावर पूर्ण विश्वास बसला होता. क्रिमियन युद्धाची गोष्ट सोडून दिली तरी, १८५६ सालीं इराणविरुद्ध इंग्रजांनीं जी छोटीशी मोहिम सुरू केली होती, तिच्यांत देखील इंग्रजांचा पराभव होऊन इराणचा शहा विजयी झाला; आणि दिल्लीच्या हतप्रभ झालेल्या मोंगल बादशहास हिंदुस्थानच्या सिंहासनावर बसविण्याकरितां तो लवकरच उलट हिंदुस्थानावर स्वारी करणार, अशी सपशेल खोटी बातमी सर्वत्र पसरली होती. ह्या बातम्या खोट्या असल्या तरी सामान्य जनतेचा त्यांच्यावर तेव्हांच विश्वास जडत असे. सामान्य जनांचीं मनें इंग्रजांविषयीं पूर्णपणें अविश्वासी बनलीं होतीं. त्यामुळें इंग्रजांचें अनहित झालेलें ऐकून लोकांना आनंद वाटत असे. आपल्या मनाला रुचतील व पटतील अशाच बाजारगप्पांवर विश्वास ठेवण्याची माणसाची साहजिक प्रवृत्ति असते. अत्यंत शूर अशा स्कॉटलंडमधील हायलंडर शिपायांच्या पलटणी पाहून तर सर्वत्र अशी गप्पा उडाली कीं, रशीया व इराणमध्यें सर्व इंग्रज पुरुष मारले गेल्यामुळें, इंग्रज बायकांच्या नव्या पलटणी बनवून त्या हिंदुस्थानांत हल्लीं धाडण्यांत येत आहेत. हायलंडर लोकांच्या कंबरेभोंवतीं एक लहानसें फडकें गुंडाळीत असल्यामुळें त्या पलटणीला घागरेवाली ( लहंगे नेसणारी ) पलटण असें लोक संबोधूं लागले. अशा धामधुमीच्या काळांत कोणत्या अचाट गप्पा उठतील व लोक त्यांच्यावर विश्वास टाकतील याचा नेमच उरत नाहीं. शहाणेसुर्ते लोकदेखील या गप्पा खऱ्या मानतात, मग अडाण्यांची गोष्टच बोलावयास नको !

हिंदुस्थानांतील सामान्य शिपायी या सर्वसाधारण नियमाला अपवाद होण्याइतके सुशिक्षित नव्हते; उलट या बाजार बातम्यांना पूर्णपणें सत्य मानून धर्मासाठीं केव्हां

एकदां युद्ध पुकारतों, असें त्यांना झालें होतें. कारण १८५७ हा इंग्रजांच्या पराजयाचा व राज्यनाशाचा मुहूर्त ठरला असल्यामुळें तो साधणें जरूर होतें. या बातम्या उठविणारे लोक कुशाग्र बुद्धीचे होते यांत संशय नाहीं. शिपायांच्या मनाचा पुरा ठाव घेऊनच, त्यांना सहज पटतील अशा बातम्या या चतुर नायकांनीं हळूच वाऱ्यावर सोडून दिल्या होत्या. उत्तर हिंदुस्थानांतील सर्व वातावरण या बातम्यांनीं भरून गेलें होतें. अधिकाऱ्यांच्या कानावरही या गटारगप्पा मधून मधून जात असत. परंतु त्यांचा उगम कोठें आहे हें मात्र त्यांना कळेना! एखादे वेळीं त्यांना असा संशय येत असे कीं, इंग्रजी राजनीतीनें सत्ताहीन झालेल्या, थोर घराण्यांतील पुरुषांच्या राजमहालांतूनच या बातम्यांचा उगम झाला असेल. परंतु इंग्रज अधिकारी आपल्या सत्तेच्या व वैभवाच्या मदांत धुंद असल्यामुळें त्यांनीं या गोष्टींचा फारसा विचार केला नाहीं. त्यांनीं या गोष्टी एका कानानें ऐकल्या व दुसऱ्या कानानें सोडून दिल्या. परंतु इंग्रज अधिकाऱ्यांनीं या बातम्यांची पर्वा केली नाहीं, तरी त्या शिपायांच्या मनांत इंग्रजांविषयीं अनिवार द्वेष उत्पन्न करण्यास चुकल्या नाहींत. शिपायांचीं मनें भडकून गेलीं आणि त्यांना दिवसें दिवस शांत ठेवणें पराकाष्ठेचें कठीण झालें. या पुढारी कटवाल्यांच्या मनांत, सर्व तयारी पूर्ण झाली म्हणजे हिंदुस्थानभर एकसमयावच्छेदेंकरून बंडाचा बावटा उभारावा असें होतें. सर्व हिंदुस्थानभर एकाच दिवशीं कल्लोळ उडाला तर इंग्रजांना ती आग विझवितां येणार नाहीं, अशी त्यांना खात्री वाटत होती. हिंदुस्थानांत खास गोऱ्या लोकांचें लष्कर त्या वेळीं फार थोडें होतें. हिंदुस्थानांतील एकंदर गोऱ्या शिपायांची संख्या जवळ जवळ २३००० होती. सर्व देशभर एकाच दिवशीं जर आगीचा डोंबाळा उठला, तर इंग्रज सरकार तो विझविण्याकरितां आपली गोरी फौज पाठवितील तरी कोठें कोठें! असा पोक्त विचार बंडांतील नायकांनीं केलेला होता. त्यांची तयारी चालू होती; आणि जमल्यास ३१ मे १८५७ रोजीं मध्यरात्रीं हिंदुस्थानभर बंडाचा बावटा उभारून इंग्रजांशीं निकराची झुंज द्यावयाची, असा विचार त्यांनीं ठरविला होता. ३१ मे रोजीं, रविवार असल्यामुळें त्या दिवशीं गोरे शिपायी व लष्करी अधिकारी सुट्टीच्या धुंदींत व विश्रांतीच्या चैनींत गैरसावध राहाण्याचा संभव अधिक! हें जाणून बंडवाल्यांनीं हा दिवस बंडाच्या उठावणीसाठीं योजिला होता. मे व जून महिन्यांतील हिंदुस्थानांतील प्रखर उन्हाळा गोऱ्या शिपायांना मानवत नसल्यामुळें, त्यांच्यांतील बरेच शिपायी त्या वेळीं व नंतरच्या धामधुमींतही आजारी पडण्याचा संभव होता, व

पुढें लौकरच पावसाळा लागत असल्यामुळें बंडाळी मोडण्याकरितां सैन्याच्या तड-फीनें हालचाली करणेंही इंग्रजांना कठीण जाणार होतें. या सर्व गोष्टींचा नीट विचार करूनच बंडवाल्यांनीं उठावाचा दिवस नक्की केला होता, व त्यांत त्यांची चतुरताही व्यक्त झाली, यांत संशय नाहीं.

परंतु शिपायांचीं मनें एकदां भडकवल्यानंतर बंडाचा दिवस उजाडेपर्यंत तीं तशींच ताब्यांत ठेवणें महाकठीण कर्म होतें. विस्तवाची ठिणगी आपल्या काबूत कोणालाही ठेवतां येईल ? परंतु गवताच्या गंजींत एकदां ती टाकल्यानंतर गंजीचा भडका केव्हां उडेल याचा काडीमात्र नेम नसतो. धर्मावर आलेल्या घाल्या-मुळें शिपायांचीं मनें बेहोष झालीं होतीं. अशा स्थितींत मनांतला जळजळणारा संताप मनांतच ठेवून, ठरलेला दिवस एकदांचा उजाडेपर्यंत धर्म व जात भ्रष्ट करणाऱ्या अपवित्र काडतुसांचा त्यांनीं प्रत्यहीं वरून प्रसन्न दिसणाऱ्या मुद्रेनें स्वीकार करावा, व शांतपणें त्यांचा उपयोग करावा, व ठरलेला दिवस येतांच आपलें खरें स्वरूप प्रगट करावें, ही युक्ति एखाद्या महामुत्सद्यालाच फार तर साधेल. परंतु हुडेलहप्पी स्वभा-वाच्या शिपायांना ती साधणें शक्य नाहीं. मनांतील क्रोध व सुडाची भावना अनिवार झाली असतांनाही, ठरलेली घटका भरेपर्यंत स्मित मुखानें शांतीचें आचरण करणें हें फक्त एखाद्या तपस्व्यालाच शक्य आहे. सामान्य शिपायांना ती गोष्ट साधाव-याची नाहीं. त्यामुळें बंडाची तयारी पूर्ण होईपर्यंत शिपायांना आवरून धरणें अशक्य झालें. ठिकठिकाणीं अत्यंत धर्मनिष्ठ व सरळ स्वभावाच्या शिपायांनीं काडतुसांचा उघडपणें धिक्कार केला, आणि कांहीं सुलभ भावनावश तरुणांनीं वधस्तंभाचा व तुरुंगाचा मार्ग आपण होऊन पतकरला. यामुळें इंग्रजांना पुढील वादळाच्या आगाऊ सूचना मिळाल्या, व बंडाचा आकस्मिकपणा बराचसा कमी झाला. नाहीपेक्षां मीरत येथील लष्करी अधिकाऱ्यांप्रमाणेंच बंडाचा पहिला बार सर्वदूर उडतांच ठिकठिकाणचे गोरे अधिकारी भांबावून किंकर्तव्यमूढ बनण्याचा संभव होता, आणि असें झालें असतें तर बंडवाल्यांना यश येण्याचा बराच संभव होता.

मंगल पांड्याला फांशी दिल्यानंतर बराकपूर येथील पलटणींतील शिपायी संतप्त झाले खरे, परंतु भावी कालाकडे, पुढाऱ्यांच्या सूचनांकडे, आणि यशाच्या संभवनीयतेकडे लक्ष देऊन त्यांनीं आपला क्रोध तसाच आवरून धरला. परंतु मीरत येथें पलटणींतील ८५ इसमांना, हातापायांत बेड्या ठोकून क्रूरपणानें दिलेल्या पांचपांच दहादहा वर्षांच्या लांब मुदतीच्या सक्त मजुरीच्या शिक्षांनीं,

आणि त्यांची सर्व शिपायांसमोर भर परेडग्राऊंडवर केलेली अप्रतिष्ठा पाहून बाकीच्या शिपायांचा क्रोध इतका भडकला कीं, त्यांना तो दाबून ठेवणें अशक्य झालें. त्या संतापाच्या भरांत परिणामाची पर्वा न करितां त्यांनीं १० तारखेला रात्रींच बंडाचा बावटा उभारला. मीरत येथें दोन हजार गोरी फौज व प्रचंड तोफखाना जय्यत तयार असल्यामुळें, या शिपायांचा पुढें तेथें राहून निभाव लागण्यासारखा नव्हता. बंडखोर शिपायी तेथें राहिले असते तर ताबडतोब चुरडले गेले असते. मीरतच्या अधिकाऱ्यांचीं डोकीं ताळ्यावर असतीं, तर रात्रीच्या रात्रींच त्यांचा फडशा उडाला असता. परंतु सेनापतीचें शौर्य अवचित गारठल्यामुळें गोरे शिपाई व त्यांचा तोफखाना परेडग्राऊंडवर रात्रभर खडा पहारा देत स्वस्थ उभे होते. त्यामुळें, शिपायांनीं आपल्या दोस्तांची प्रथम तुरुंगांतून सुटका केली, व रातोरात दिल्लीचा मार्ग धरला. शिपायांच्या मनांत धर्मरक्षणासाठीं इंग्रजांशीं शेवटपर्यंत लढावयाचें होतें. त्यांचें बंड अतिशय सात्विक परंतु दिशाभूल झालेल्या मनोवृत्तींवर व संशयाच्या वाळूवर उभारलें गेलें होतें. राजकारणाचे डावपेंच, मुलुखगिरीची आशा, परराज्य नष्ट करून त्या जागीं स्वराज्य स्थापन करण्याची महत्वाकांक्षा, यांपैकीं कोणतीच गोष्ट शिपायांच्या मनाला स्पर्श करूं शकली नाहीं. हे व्यावहारिक व महत्वाकांक्षी विचार बंडांतील सूत्रचालकांच्या डोक्यांत अर्थातच घोळत होते आणि त्यांच्या धोरणाच्या पुस्तीकरतांच चालत आलेल्या परिस्थितीचा फायदा घेण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. परंतु शिपायांना फक्त एकच गोष्ट माहीत होती; ती ही कीं इंग्रजलोक आपल्याला बाटवून ख्रिस्ती करणार—म्हणून त्यांचा नाश केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. बंडांत लढणाऱ्या शिपायांची मनोवृत्ति याप्रमाणें प्रारंभाला तरी सात्विक स्वरूपाची होती; आणि त्यांच्या पुढाऱ्यांना परकीय फिरंग्यांना हिंदुस्थानांतून हांकून देऊन आपलें गेलेलें स्वराज्य त्या जागीं स्थापन करावयाचें होतें. बंडांतील पुढारी या राजस मनोवृत्तीनें प्रेरित झाले होते. शिपायांच्या व पुढाऱ्यांच्या या सात्विक व राजस मनोवृत्ती पुढें तशाच शुद्ध स्वरूपांत टिकल्या नाहींत हें कबूल केलें पाहिजे. कदाचित् पुढें निराशेचा पगडा त्यांच्यावर बसून त्यांच्या वृत्ति काळवंडल्या असतील; कदाचित् इंग्रज जो सुडाला सुडाचा अहेर करीत त्यांचा मोड करण्याकरितां चाल करून येऊं लागले, त्याचा परिणाम त्यांच्यावर झाला असेल. कदाचित् लुटीच्या मोहानें त्यांना ग्रासलें असण्याचा संभव आहे. याशिवाय देशांत जो चोर, डाकू, बदमाष लोकांचा नेहमींच एक लहानसा परंतु बेडर वर्ग असतो, त्यांतील लोक स्वतःची

तुमडी भरण्याकरितां आणि आपल्या दुष्ट वासना तृप्त करून घेण्याकरितांच या बंडाळींत सामील झाले होते. पाशवी स्वार्थ साधण्याशिवाय दुसरें कोणतेंच ध्येय यांना माहीत नव्हतें. या तमोगुणी वृत्तीच्या लोकांनींच बंडांत ठिकठिकाणीं माणुसकीला न शोभणारे पशुतुल्य अत्याचार व अनाचार केले. देशांत उत्पन्न झालेल्या बंडाळीमुळें ठिकठिकाणच्या तुरुंगाचे दरवाजे सताड मोकळे झाले, व तुरुंगांतील अवचित मुदतीपूर्वी बंधमुक्त झालेल्या बदमाष व डाकूंचा वर्ग बंडाळीचा फायदा घेऊन, वाटेल तसे अत्याचार करावयास मोकळा झाला. मीरत येथील १० तारखेला रात्रीं घडलेला अत्याचार असल्याच बेरडांनीं केला. एकट्या मीरतच्या तुरुंगांतून जवळ जवळ १२०० बिलंदर सोदे त्या रात्रीं बाहेर पडले होते. या नीच लोकांच्या दुष्कृत्यांमुळें हिंदी शिपायांची व बंडांत सामील झालेल्या थोर व कुलीन व्यक्तींचीं नांवें इंग्रजी इतिहासलेखकांच्या दृष्टीनें बद्द झालीं. शिपायांनीं इंग्रजांची हत्या केली असली, तरी ती धर्माभिमानानें प्रेरित होऊन उघडपणें युद्ध पुकारून केली होती. हत्या तामस व क्रूर असली तरी तिला स्वधर्माभिमानी भावनांचा पाठिंबा होता. ती निमकहरामी असली, तरी ती सदिच्छु होती. आणि बंडांतील प्रमुख पुढाऱ्यांनीं आपलें वंशपरंपरागत हक्काचें राज्य व गतवैभव परत प्राप्त करून घेण्याकरितां इंग्रजांशीं उघड उघड युद्ध पुकारलें होतें. शिपायांच्या विद्रोही मनस्थितीचा फायदा घेणें, हें युद्धनिपुण सेनापतींचें कर्तव्यच आहे. आपल्या शत्रूविषयीं लोकांच्या मनांत उत्पन्न झालेला गैरसमज तसाच राहूं देऊन त्यायोगें आपला फायदा करून घेणें, ही गोष्ट युद्धांतच नव्हे तर मामुली राजकीय व्यवहारांतही क्षम्य समजली जाते. त्यामुळें जरी इंग्रजाच्या दृष्टीनें या मंडळीवर कंपनीचें राज्य उलथून पाडण्यासाठीं कट केल्याचा व राज्यद्रोहाचा गुन्हा लागू होत होता, तरी हिंदुस्थान आपला देश आहे व इंग्रज परके आहेत या भावनेनें आपलें गेलेलें राज्य संधी साधून परत मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला असल्यामुळें, ते इंग्रजी कोर्टांत गुन्हेगार ठरले तरी जगाच्या कोर्टांत गुन्हेगार ठरूं शकत नाहींत.

परंतु मीरत येथील शिपायांनीं मनोभावना अनिवार झाल्यामुळें ठरलेल्या तारखेच्या पूर्वी ३ आठवडे हा जीहाद पुकारला; इंग्रजांची नेहमींची धडाडी पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें बंडखोर शिपायांनीं दिल्लीच्या रस्त्यानें झपाट्यानें कूच केलें. यमुना नदी ओलांडण्याच्या पूर्वी इंग्रजांच्या पलटणींनीं आपणांस वाटेंत गांठलें, तर आपली धडगत नाहीं ही गोष्ट बंडवाले ओळखून होते. आपण

दिल्लीस पोहोंचण्यापूर्वी बंडाची बातमी तेथें पोहोंचली, तर दिल्ली येथील इंग्रज सावध होऊन आपणांस जोराचा अटकाव करतील व आपणांस नदी ओलांडूं देणार नाहींत; आणि नेहमींच्या धडाडीप्रमाणें मीरत येथील गोरी फौज आपल्या मागावर आली तर या दोन्ही फौजांच्यामध्यें, सांपळयांत सांपडलेल्या उंदराप्रमाणें आपली दामटी वळेल ही गोष्ट बंडखोर शिपायी ओळखून होते. बंडाची बातमी दिल्लीस सहजासहजीं पोहोंचूं नये म्हणून त्यांनीं तारायंत्राची तार जातांना वाटेंत तोडून टाकण्याची खबरदारी घेतली, व रातोरात दिल्लीची मजल मारली. ११ तारखेला सकाळीं बंडखोरांपैकीं घोडदळाची तुकडी ३६ मैलांचा एकबारी पल्ला मारून दिल्लीजवळ येऊन थडकली. खरें पाहिलें तर बंडखोरांना इतक्या तांतडीनें कूच करण्याची मुळींच जरूर नव्हती. कारण मीरत येथील गोरी फौज घडलेल्या अकल्पित प्रकारानें भांबावून जाऊन परेडच्या मैदानावरच, रात्रभर माशा मारीत स्वस्थ बसली होती. परंतु बंडखोरांना अर्थातच ही गोष्ट माहीत नव्हती, कारण ती अनपेक्षित होती. इंग्रजांचा धाडसी व तडफी स्वभाव त्यांच्या परिचयाचा होता. यामुळें त्यांनीं रातोरात कूच केलें, व दुसरे दिवशीं सकाळीं दिल्ली शहर गांठलें. ११ तारखेला सकाळीं बंडखोरांची आघाडी ३६ मैलांची मजल मारून दिल्लीस येऊन थडकली. यावरून १० तारखेला रात्रभर मीरत येथें चाललेल्या अत्याचारांत शिपायांचें मुळींच आंग नव्हतें हें उघड आहे.

११ तारखेला सकाळीं, दिल्ली व मीरतमधील तारेचा संबंध तुटल्याचें तेथील अधिकारी मि. टॉड यांच्या लक्षांत आलें. त्यामुळें चौकशी करण्याकरितां व तारेची लाईन पाहाण्याकरितां म्हणून ते सकाळींच यमुनेच्या पुलाकडे गेले, आणि आयतेच मीरतहून आलेल्या बंडवाल्यांच्या तावडींत सांपडले. टॉडसाहेबांना स्वर्गलोकचा रस्ता ताबडतोब धरावा लागला. शिपायांनीं यमुना नदीवरील नावेचा पूल ओलांडला आणि पुलाच्या दोन्ही बाजूला आपले चौकी पहारे बसवून पुलावर आपला कबजा केला. यानंतर शिपायी किल्ल्याचे जवळ आले व मोंगल बादशहाचा जयजयकार करूं लागले. ते म्हणाले, 'आम्ही मीरत येथें या फिरंगी लोकांशीं उघड उघड युद्ध पुकारलें आहे. मीरत येथील बऱ्याचशा इंग्रजांची कत्तल करून आम्ही येथें आलों आहों. यापुढें आम्हांला बादशहानें आज्ञा करावी, व आपल्या पदरीं राबवावें.'

शिपायांचा रणकल्लोळ ऐकून बादशहानें, राजमहालाच्या रक्षणाकरितां ठेवलेल्या शिपायांचे प्रमुख अधिकारी कॅपटन डगलस नांना बोलावणें पाठविलें. दिल्लीस

असलेला राजमहाल म्हणजे यमुनेच्या तीरावर असलेला, लाल रंगाच्या भिंतींनीं परिवेष्टित असा सुंदर किल्लाच होय ? डगलसनें त्या किल्ल्यांतील प्रसिद्ध दिवाण-ई-आममध्यें बादशहाची भेट घेतली. एकंदर हकीगत ऐकून त्यानें बादशहाला सांगितलें कीं, मी खालीं जाऊन शिपायांना वापस जाण्यास हुकूम करतों. बादशहानें त्याला खालीं जाण्याची मनाई केली. कारण बेफाम झालेल्या शिपायांच्या हातून त्याच्या जिवाला कांहीं तरी अपाय होईल अशी बादशहाला साहजिकच भीति वाटली. त्यावेळीं ३८ नंबरची पलटण किल्ल्याच्या पाहाऱ्यावर होती. त्यांना राजनिष्ठ राहाण्याविषयीं त्यांच्या अधिकाऱ्यानें पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु आपलेच भाऊबंद शिपायी धर्मासाठीं लढण्यास तयार झालेले पाहून त्यांची सहानुभूति बंडवाल्यांकडेच वळली, व राजघाट दरवाजावरील पहारेकऱ्यांनीं किल्ल्याचा दरवाजा बंडखोरांना उघडून दिला. अंगावर खून चढलेले शिपाई दीन दीन करीत किल्ल्यांत घुसले, आणि समोर येईल त्या इंग्रजाची कत्तल करूं लागले. दिल्ली येथील दिवाण-ई-आम व दिवाण-ई-खास मध्यें, मीरतहून आलेल्या बंडखोर शिपायांनीं आपलें चंबूगबाळें ठेवून दिलें. शिपाई लोक वृद्ध बाहादुरशहाच्या नांवाचा वारंवार जयजयकार करीत होते, परंतु वृद्ध बहादुरशहा त्या वेळीं आपल्या जिवाच्या भीतीनें आपल्या खोलींतच पुढें काय घडून येतें याची वाट पहात स्वस्थ बसला होता.

त्या वेळीं दिल्लींत ३८, ५४, व ७४ या तीन नंबरच्या पलटणी होत्या. तिन्हीं पलटणी मिळून जवळ जवळ ३५०० शिपाई होते. याशिवाय एक गोलंदाजांची स्वतंत्र पलटण असून तिच्यामध्यें १६० गोलंदाज होते. याशिवाय दिल्लींत रणसामग्रीचें फारच मोठें भांडार होतें. बादशाही महालापासून थोड्याशा अंतरावर अस्त्रागाराची मजबूत परंतु लहानशीच किल्लेवजा इमारत होती. लेफ्टनेंट जार्ज विलोबी, हा या अस्त्रागारावरील प्रमुख अधिकारी होता. हें अस्त्रागार बंडखोर शिपायांच्या हातीं लागलें असतें तर त्यांची शक्ति बरीच वाढली असती. कारण आसपासच्या प्रदेशांतील लष्करी छावण्यांना रणसाहित्य येथूनच पुरविलें जात असे. इतकें तें अस्त्रागार प्रचंड होतें.

राजमहालामधील डगलस फ्रेजर, जेनिंग्स, हट्‌किन्सन आणि त्यांच्या येथील कांहीं बायका यांची शिपायांनीं ताबडतोब कत्तल केली. शहरांतील तुरुंग सत्ताड उघडण्यांत आला. दिल्ली येथील बँक लुटली गेली, आणि चर्चचीही तीच वाट लागली. शिपायांनीं दिवाण-ई-आममध्यें थोडीशी विश्रांति घेतली, व मग ते शहरावर कबजा करावयास निघाले. दिल्ली येथील इंग्रज अधिकाऱ्यांचा आपल्या

पलटणीवर अजूनही विश्वास होता. बंडवाल्यांना मीरतची गोरी फौज येथें येऊन पोंहोंचेपर्यंत आपण सहज थोपवून धरूं, अशी त्यांना उमेद होती. परंतु जेव्हां त्यांनी बंडखोरांवर गोळ्या झाडण्याचा आपल्या पलटणींतील शिपायांना हुकूम केला, तेव्हां कांहीं शिपायांनीं हवेंत गोळ्या उडविल्या, तर कांहींनीं आपलेच अधिकारी गोळ्या घालून ठार केले. संध्याकाळपर्यंत तिन्ही पलटणींतील बहुतेक शिपायी बंडखोरांना जाऊन मिळाले. बंडखोरांनीं यानंतर दिल्ली येथील प्रसिद्ध अस्त्रागार काबीज करण्याचा निश्चय केला. लेफ्टनेंट विलोबी यानें शक्यतोंपर्यंत अस्त्रागाराचें रक्षण केलें. परंतु बंडखोरांच्या प्रचंड संख्येपुढें त्याचें कांहींच चालेना. सरतेशेवटीं अशी उपयुक्त व मौल्यवान प्रचंड रणसामग्री बंडवाल्यांच्या हातीं लागूं देण्यापेक्षां ती नष्ट करून टाकण्याचें त्यानें ठरविलें. त्याच्या हाताखालील स्कली नांवाच्या शूर रणबहाद्दरानें दारूच्या कोठाराला कांकडा लावून सबंध अस्त्रागार उडवून देण्याची कामगिरी पतकरली. या उडालेल्या प्रचंड भडक्यामुळें स्कली व त्याचे दुसरे चार सोवती नामशेष झाले. त्यांच्या शरिरांचे ओळखतां न येण्यासारखे तुकडे तुकडे होऊन त्यांची रक्षा झाली. परंतु इंग्रज शिपायांच्या कमालीच्या बेफिकिरी धाडसाची आणि उज्ज्वल शौर्याची ओळख त्यांनीं सर्व बंडखोरांना पटवून दिली. या उडालेल्या भडक्यामुळें जवळ जवळ एक हजार बंडवाले ठार झाले असावेत, असा अंदाज आहे. अस्त्रागारांतील बंदुकीच्या गोळ्या व तोफांचे गोळे दूरपर्यंत उडून पडले. या धडाक्यामुळें शहरांतील इतरही चार पांचशें माणसें दगावलीं गेलीं. या धडाक्यामुळें सर्व दिल्ली शहर भूकंप झाल्याप्रमाणें हादरलें, आवाजानें लोकांच्या कानठळ्या बसल्या, आणि ज्वाळा पर्वताप्रमाणें उंच होऊन खरोखरच गगनाला जाऊन भिडल्या. अस्त्रागारावर बंडवाल्यांचा अखेर कबजा झाला खरा, परंतु त्यांचा मूळ हेतु मुळींच साधला नाहीं. इंग्रजांच्या या विलक्षण धाडसामुळें बंडवाल्यांची अर्धी शक्ति आपोआपच कमी झाली. कारण शिपाई कितीही शूर असले, तरी द्रव्यबल व भरपूर दारुगोळा यांशिवाय रणांगणांत ते विजय मिळवूं शकत नाहींत.

इकडे काश्मीर दरवाजापाशींही बंडवाल्यांशीं सामना देण्याचा इंग्रजांनीं जोराचा प्रयत्न केला. परंतु ५४ नंबरची पलटण बिथरून बंडवाल्यांना मिळाली व त्या पलटणीवरील सर्व इंग्रज अधिकारी मारले गेले. ३८ नंबरच्या पलटणीचीही तीच गत झाली. काश्मीर दरवाजाच्या आंत असलेल्या मेनगार्ड

नांवाच्या लहानशा इमारतींत उरलेसुरले इंग्रज जमून बंडवाल्यांशीं निकरानें लढून आपला बचाव करीत होते. बंडवाल्यांची संख्या असंख्य असतांनाही या मूठभर इंग्रजांनीं संध्याकाळपर्यंत आपला हिमतीनें बचाव केला. परंतु अस्त्रागाराचा भडका उडाल्यामुळें शिपायांचा लोंढा तिकडून त्यांच्याकडे लोटला, आणि त्या लहानशा इमारतीचा बचाव करणें अशक्य झालें. तेव्हां तेथील इंग्रज शिपाई बायकामुलांना घेऊन अतिशय कष्टानें जवळ जवळ ३० फूट खोल असलेल्या शेजारच्या खंदकांत उतरले, आणि खंदक युक्तीनें पार करून त्यांनीं जंगलाचा रस्ता धरला. खंदकांत उतरणें सोपें होतें. परंतु वर चढतांना मात्र त्यांना अतोनात त्रास झाला. इंग्रज शिपायांनीं तेव्हां आपले कमरबंद एकत्र करून त्यांचा दोर बनवला, व त्या रश्यांच्या आधारावर बायकांना व मुलांना सुरक्षित पलीकडे नेलें. झेंडाघरावरील (flag-tower) इंग्रजांनाही तें घर लवकर सोडून देऊन जंगलाचा रस्ता धरावा लागला. याप्रमाणें वांचलेली मंडळी रात्रीं बेरात्रीं जंगलांतून लपत छपत व नद्यानाल्यांतून वाट काढीत कोणी मीरतला, तर कोणी कर्नूलला, तर कांहीं अंबाल्याला जाऊन पोहोंचले. त्यांपैकीं कांहीं अतिश्रमानें व कांहीं आजारानें रस्त्यांतच मरण पावले. स्त्रियांनीं देखील या विपत्तींत अतिशय धैर्य दाखवून तहान भुकेला जुमानलें नाहीं. स्त्रियांची सहनशीलता पाहून पुरुषांची हिंमत वाढली, व ते सुरक्षित निरनिराळ्या इंग्रजी छावण्यांत जाऊन पोहोंचले. सर्व देशभर बंडाचा धुमाकूळ चालू असतांना देखील, अनेक दयाळु हिंदु मुसलमानांनीं दिल्लींतून पळालेल्या या इंग्रजलोकांना वाटेनें खाणेंपिणें दिल्यामुळें त्यांचे जीव बचावणें शक्य झालें, ही गोष्ट खुद्द इंग्रजांनींच नमूद करून ठेवलेली आहे. या लोकांवर वाटेंत कोणीं अत्याचारही केले नाहींत, व बंडवाल्यांच्या रागाची पर्वा न करतांना लोकांनीं त्यांच्या विपत्तींनीं द्रवून त्यांना शक्य ती मदतच केली.

११ मे रोजीं रात्रीं उरलेले सर्व शिपाई मनाचा पक्का धडा करून बंडवाल्यांना जाऊन मिळाले. त्यामुळें १२ तारखेपासून किल्ल्यासकट सर्व दिल्ली शहर बंडवाल्यांच्या हातीं आलें. इंग्रजांबरोबर दिल्लींत असलेल्या ख्रिस्ती व युरोपियन लोकांनाही बंडवाल्यांच्या क्रोधास बळी पडावें लागलें. अस्सल इंग्रज, युरेशियन व काळा साहेब यांत भेदाभेद करण्याची विवेकबुद्धि बंडवाल्या शिपायांत नव्हती. ते सर्व ख्रिस्ती असल्यामुळें त्यांच्या लेखीं शत्रू होते, आणि त्यामुळें त्यांना बंडवाल्यांचा सपाटा सहन करावा लागला. दरियागंजांत राहाणारीं सरासरी ५०

ख्रिस्ती माणसें बंडवाल्यांच्या हातीं लागलीं. त्यांना प्रथम किल्ल्यांत कैदेंत ठेवण्यांत आलें. परंतु पुढें दिल्लीच्या बादशाहाविरुद्ध लढण्याच्या आरोपाबद्दल त्यांची कत्तल करण्यांत आली. १६ मे नंतर दिल्ली शहरांत एकही ख्रिस्ती मनुष्य उरला नाहीं. ख्रिस्ती लोकांचा ओढा इंग्रजाकडे असणें स्वाभाविक होतें, व बादशहाबद्दल त्यांना पान्हा फुटणें शक्य नव्हतें. या काळ्या ख्रिस्ती लोकांना हिंदी लोक परके वाटत व साहेब जवळचे नातलग भासत. हिंदुस्थानापेक्षां विलायतेबद्दल त्यांना अधिक प्रेम व कळकळ वाटे. परंतु त्यामुळें त्यांना देण्यांत आलेल्या कठोर शिक्षेचें समर्थन होऊं शकत नाहीं.

बंडवाल्यांनीं वृद्ध बाहादुरशहाची दिल्लीच्या तक्तावर स्थापना केली, व सर्व शहरभर त्याच्या नांवाची द्वाही फिरविली. वृद्ध बाहादुरशहा याप्रमाणें दिल्लीच्या तक्तावर बसून हिंदुस्थानचा सार्वभौम बादशहा पूर्ववत् बनला. त्याच्या मनांत नसलें तरी त्याला ती जबाबदारी उचलावीच लागली. कारण त्याची आवडती बेगम झीनतमहाल ही पूर्वीपासूनच या कारस्थानांत गुरफटली होती. इंग्रजांशीं कितीही राजनिष्ठा दाखविली, तरी दिल्लीची नामधारी बादशाही देखील बुडविण्याचा त्यांचा निश्चय झाला होता. झीनतमहालचा मुलगा जवानबक्त याचा हक्क कबूल करण्यास कंपनी मुळींच तयार नव्हती. इंग्रजांची मैत्री करून कांहींच साधण्यासारखें नव्हतें. उलट जें थोडेंबहुत होतें तेंही त्यांच्यापासून हिसकावून घेण्याचा कंपनीचा बेत कायम झाला होता. मग इंग्रजांशीं शत्रुत्व करून आपल्या नशिबाचा फासा कसा पडतो, हें अजमावून पाहाण्याचा सल्ला बेगमेनें व बादशाही महालांतील इतर लोकांनीं बादशहाला दिला, तर त्यांत नवल नाहीं. बंडवाले मीरत येथील गोऱ्या फौजेची आपण कत्तल केली अशी बढाई मारीत होते, व दिल्ली शहर तर बादशहाचे डोळ्यांसमोरच बंडवाल्यांनीं इंग्रजांच्या हातून हिसकून, आपल्या ताब्यांत घेतलें होतें. हिंदु व मुसलमान या दोघांनाही ख्रिस्ती करण्याचा इंग्रजांचा बेत असल्यामुळें सर्वच देशी फौज इंग्रजांविरुद्ध बिथरली आहे, असें बंडवाले सांगत होते. वृद्ध बहादुरशहानें ही बातमी पूर्वीच ऐकली होती, व दिल्लींतील शिपायांचें वर्तन पाहून त्याला ती खरीही वाटली. या सर्व गोष्टींचा विचार करूनच बाहादुरशहानें ध्यानीं, मनीं, स्वप्नीं नसलेली आणि याप्रमाणें अवचित आंगावर येऊन पडलेली बादशाही जबाबदारी पतकरली. सर्व शहरभर व किल्ल्यांत बंडवाल्यांचाच अंमल बसला असल्यामुळें, त्याला त्या योजनेला मनांत असलें तरी देखील नकार देणें शक्य नव्हतें.

याप्रमाणें बंडवाल्यांना हवा होता तो पुढारी मिळाला. प्रसिद्ध तैमूर-लंगाचा वंशज, बाबर, अकबर, अवरंगजेब अशा थोर पूर्वजांच्या घराण्यांत वाढलेला वृद्ध व अनुभवी बहादुरशहा–याच्याशिवाय अधिक लायक पुढारी बंडवाल्यांना मिळणें शक्य नव्हतें. बहादुरशहाजवळ द्रव्य नव्हतें व सत्ताही नव्हती. परंतु त्याच्या नांवांतच जादू भरली होती. तो नामधारी असला तरी हिंदुस्थानचा बादशहा म्हणविला जात होता. खुद्द इंग्रज कंपनी देखील त्याला बादशाहा म्हणून ओळखीत होती. हिंदुस्थानच्या पुराणप्रसिद्ध राजधानींतील बादशाही महालांत तो राहात होता; आणि बहादुरशहाची दिल्लीच्या गादीवर शिपायांनीं पुन्हा प्राणप्रतिष्ठा केल्यावर सामान्य लोकांच्या दृष्टीनें तोच हिंदुस्थानचा खरा बादशहा बनला, व त्याची सत्ता न मानणारी इंग्रज कंपनी बंडखोर ठरली. दिल्लीच्या राजवाड्यांतून निरनिराळे बादशाही परवाने सुटूं लागले, व जे लोक ते शिरसा वंद्य मानणार नाहींत त्यांना बंडखोर लेखण्यांत येऊन कडक शिक्षा दिल्या जातील, असे जाहीरनामेही प्रसिद्ध झाले. या बादशाही जाहीरनाम्यांत ते त्याच्या नांवानें निघाले असले, तरी खुद्द त्याचें आंग कितपत होतें याबद्दल शंकाच आहे. कारण तो अतिशय वृद्ध झाला होता, व ही जबाबदारी बळेंच त्याच्या गळयांत येऊन पडली होती. तिच्यांतून सुटकेचा मार्ग त्याला नव्हता. बादशाही सहीचे हे नवे जाहीरनामे पाहून प्रजेंत विलक्षण खळबळ उडाली. दिल्लीच्या बादशाहाची आज्ञा मानणें ही पूर्वापार आंगवळणीं पडलेली गोष्ट होती. त्यामुळें दिल्लीच्या बादशहाला न जुमानतां त्याच्याशीं लढूं पाहाणारी परधर्मीय व साता समुद्रापलीकडून आलेली परदेशी इंग्रज कंपनी आणि तिचे अधिकारी हेच लोकांच्या दृष्टीनें बंडखोर ठरले. वृद्ध बहादुरशहा आपल्या पराक्रमी पूर्वजांच्या सिंहासनावर बसून हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहूं लागला, ही गोष्ट वणव्याप्रमाणें दूरवर पसरली.

---

## प्रकरण १४ वें.

# लॉर्ड क्यानिंगचे उपाय.



मीरत व दिल्ली येथील बंडाची हकीगत कलकत्ता येथें तावडतोब जाऊन पोहोंचली. मीरतच्या फौजेनें बंड करून दिल्लीस कूच केलें, व वृद्ध बहादुरशहाची दिल्लीच्या गादीवर पुनश्च स्थापना करून त्याच्या नांवानें बादशाहीची सर्व दूर

द्राही फिरविली. ही बातमी ऐकून बंड मोडण्याकरितां प्रथम दिल्ली शहरावर स्वारी करून तें शहर आपल्या कबज्यांत घेणें अत्यावश्यक आहे ही गोष्ट लार्ड क्यानिंगच्या पूर्णपणें लक्षांत आली. दिल्ली ही जुन्या मोंगलबादशहाची राजधानी असल्यामुळें आणि नामधारी बादशहा तेथें त्या वेळींही राहात असल्यामुळें, तें शहर बंडवाल्यांच्या ताब्यांत फार दिवस राहाणें इष्ट नाहीं, असें लार्ड कॅनिंगला वाटलें. कारण दिल्लीचा बादशहा बंडवाल्यांचा पुढारी झाल्यामुळें इतर ठिकाणच्या शिपायांनाही बंडांत सामील होण्यास उत्तेजन मिळेल, व मग त्यायोगें कंपनीच्या राज्यावर कठीण प्रसंग कोसळेल, ही गोष्ट लार्ड कॅनिंग पूर्णपणें जाणून होता. हिंदुस्थानांतील लोक सत्ताधारी कंपनीपेक्षां दिल्लीच्या मावळलेल्या व हतप्रभ बादशाहीला अधिक मान देत असल्यामुळें, दिल्लीच्या बादशहाच्या आज्ञेवरून सामान्य प्रजा देखील कंपनीच्या विरुद्ध जाईल, आणि मीरत व दिल्ली या दोन ठिकाणीं लागलेली आग सर्व दूर भडकत चालली तर इंग्रजांना आपल्या सत्तेची पगडी संभाळतां संभाळतां नाकीं नऊ येतील, ही गोष्ट लार्ड कॅनिंग ओळखून होता. त्यामुळें लार्ड कॅनिंगनें मुख्य सेनापतीला, मीरत येथील गोरी फौज व इतर ठिकाणची मिळेल तितकी फौज मदतीला घेऊन, दिल्लीवर स्वारी करून तें शहर ताबडतोब आपल्या ताब्यांत घेण्याचा हुकूम केला. मीरत व दिल्ली येथें कहर उसळला, त्या वेळीं हिंदुस्थानचे मुख्य सेनापति ॲनसनसाहेब सिमल्याची थंड हवा खात स्वस्थ बसले होते. लार्ड कॅनिंगनें, मुंबई इलाख्याचे गव्हर्नर लार्ड एलफिन्स्टन यांना, इराणच्या स्वारीवरून मुंबईस परत आलेली फौज उत्तर हिंदुस्थानांत ताबडतोब पाठवून देण्याविषयीं तार केली. पंजाब येथील त्या वेळचे चीफ कमिशनर सर जॉन लारेन्स, यांना पंजाबप्रांताचा बंदोबस्त ठेवण्याची आणि प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागण्याची कुल मुखत्यारी दिली. ब्रह्मदेशांतून कलकत्त्यास बदलीं आलेली ८४ नंबरची गोरी पलटण क्यानिंगनें रंगून येथें परत जाऊं न देतां तेथेंच ठेवून घेतली, इतकेंच नव्हे तर ब्रह्मदेशांतून दुसरी एक गोरी पलटण त्यानें बोलावली. त्याचप्रमाणें मद्रासचे गव्हर्नर लार्ड हॅरीस यांच्याकडून २ पलटणींची निकडीची कुमक बोलावली. याशिवाय विलायतेहून चीनदेशाकडे एक लष्करी व आरमारी तुकडी रवाना व्हावयाची आहे ह्या गोष्टीचें स्मरण ठेवून, त्यानें ती फौज हिंदुस्थानांतच अर्ध्या वाटेंत उतरवून घेण्याची व्यवस्था केली. लार्ड कॅनिंगनें १५ मे रोजींच बंडाची पूर्ण हकीगत कळल्याबरोबर ताबडतोब ही उपाययोजना केली. त्यावरून त्याचा शांतपणा व

कर्तृत्वशक्ति कोणाच्याही डोळ्यांत सहज भरेल. आलेल्या संकटानें तो मुळींच घाबरून गेला नाहीं.

हळू हळू कानपूर, लखनौ, अलाहाबाद, आग्रा वगैरे निरनिराळ्या ठिकाणांहून हिंदी शिपायांतील वाढत्या बेदिलीची बातमी त्याच्या कानावर येऊं लागली. त्यावेळीं कलकत्ता व त्याच्या आसपास ५३ व ८४ नंबरच्या गोऱ्या पलटणी होत्या. दानापूरला १० नंबरची, लखनौला ३२ नंबरची आणि आग्रा येथें ३ नंबरची अशा पांच गोऱ्या पलटणी काय त्या त्याच्या हाताशीं त्या वेळीं होत्या. प्रयाग, काशी, कानपूर, अलीगढ, बरेली, मुरादाबाद या मुख्य मुख्य शहरीं असलेले युरोपियन शिपाई, देशी पलटणीच्या मानानें अगदींच अल्प प्रमाणांत होते. सर्व ठिकाणच्या देशी शिपायांचीं मनें बिथरलेलीं असून ते केव्हां उघड उघड बंडाचें निशाण उभारतील याचा भरंवसा उरलेला नव्हता. त्यामुळें तेथील गोरी फौज हालविणें शक्यच नव्हतें. औध प्रांतांत प्रजाही नाराज असल्यामुळें बंडखोरीची आग अतिशय पेटण्याचा संभव आहे, असें तेथील चीफ कमिशनर सर हेनरी लारेन्स यांनीं कळविलें असल्यामुळें, लखनौ व आग्रा येथील ३२ व ३ नंबरच्या पलटणी हालविणें शक्यच नव्हतें. कलकत्ता हें कंपनी सरकारचें राजधानीचें शहर असून तेथील वस्ती जवळ जवळ पांच लाख होती. त्यामुळें एखादी तरी पलटण बंदोबस्ताकरतां तेथें ठेवणें जरूर होतें. उरलेल्या दोन पलटणींच्या जोरावर कलकत्त्यापासून मीरतपर्यंतचा जवळ जवळ ७०० मैलांचा टापू, नवीन कुमक येईतोंपर्यंत रक्षण करण्याची जबाबदारी लार्ड कॅनिंगवर येऊन पडली होती. कारण बंडवाल्यांवर चालून जाण्याचा रस्ता सुरक्षित ठेवल्याशिवाय, व कलकत्ता येथून रवाना केलेल्या फौजेला भरपूर रसद पुरविल्याशिवाय यश कसें मिळणार ? त्यामुळें हा रस्ता शाबूत ठेवणें जरूरीचें होतें. परंतु तो मुळींच घाबरला नाहीं, व डगमगलाही नाहीं. त्यानें आपले सर्व व्यवहार नेहमींप्रमाणेंच शांतपणें चालविले होते. २० मे रोजीं लॉर्ड कॅनिंगनें एक जाहिरपत्रक काढलें, आणि लोक पाणी पीत असलेल्या तलावांत किंवा इतरत्र गोमांस किंवा डुकराचें मांस टाकून लोकांचा धर्म बाटविण्याचा कंपनी सरकारचा विचार आहे, अशा तऱ्हेतऱ्हेच्या विचित्र अफवा गांवांत उठल्या होत्या त्यांचा या जाहिरपत्रकांत गंभीरपणें इनकार केला. लोकांनीं पूर्वीप्रमाणें कंपनी सरकारवर विश्वास टाकून शांत व निश्चिंत रहावें व बंडखोरांपासून कंपनी आपल्या प्रजाजनांचें जीव व वित्त संरक्षण करील असें त्यांत अभिवचन दिलें होतें. गांवांत उठलेल्या खोट्या अफवांवर लोकांनीं

विश्वास टाकूं नये असा त्यांना उपदेश केला होता. यानंतर २५ मे रोजीं पडणारा राणीचा जन्मदिवस हिंदुस्थानांत जणूं कांहीं विशेष घडलेंच नाहीं, अशा निर्भय वृत्तीनें त्यानें नेहमींप्रमाणें साजरा केला. त्याचे जे देशी शरीरसंरक्षक होते त्यांना अशा बंडाळीच्या प्रसंगीं कामावरून काढून टाकण्याचा सल्ला, अनेक इंग्रज अधिकाऱ्यांनीं त्याला दिला. परंतु त्यानें तो मुळींच न मानतां त्यांच्यावर पूर्वीसारखाच विश्वास ठेवला. बराकपूर शहरांत देशी शिपायांच्या त्या वेळीं ३ पलटणी होत्या. त्या जर बिथरल्या तर राजधानीला धोका पोहोंचेल असा युक्तिवाद करून, त्या पलटणींचीं हत्यारें काढून घेण्याची सल्ला त्याला देण्यांत आली. परंतु शिपायांनीं जोंपर्यंत बंडखोरीचीं चिन्हें दाखविलीं नाहींत, तोंपर्यंत त्यांना बंडखोर लेखून कोणतीही शिक्षा करण्याचें त्यानें नाकारलें. त्याचा सर्व विश्वास, पंजाब व औध प्रांताचे बुद्धिमान्, शूर व कर्तव्यदक्ष अधिपती असलेले लारेन्सबंधु यांच्यावर होता, व त्याप्रमाणें त्यानें त्यांना आपापल्या प्रांतापुरते सर्व अधिकार ताबडतोब दिले. कलकत्त्यांतील त्याच्या इतर सल्लागारांचें असें म्हणणें पडलें कीं, दिल्ली येथील बंडखोर पुढें काय करतात हें प्रथम पहावें, व त्यांच्या हालचालीप्रमाणें मग आपल्या मोहिमेची योजना करावी. तोंपर्यंत मुंबई व मद्रास येथील कुमक येईल व इंग्लंडांतून बोलावलेली फौजही येऊन कलकत्त्यास दाखल होईल. परंतु ही सल्ला लॉर्ड कॅनिंगला पटली नाहीं. दिल्लीशहर बंडवाल्यांच्या हातीं फार दिवस राहाणें, ही कंपनी सरकारची नाचक्की होय, व कंपनीच्या सत्तेचा एकदां बोज उडाला, म्हणजे सर्व हिंदुस्थानभर भडका उडून कंपनीचें राज्य रसातळास जाईल असें त्याचें मत पडलें. आणि म्हणूनच हातीं येईल तेवढी गोरी फौज व तोफखाना एकवटून, सैन्याच्या हानीची कांटेतोल मोजमाप न करतां दिल्ली शहर धडाक्यासरसें कबजांत घेण्याचा सल्ला त्यानें मुख्य सेनापतीला दिला. दिल्ली शहर बंडवाल्यांच्या हातून गेलें म्हणजे बंडाचें कबरडेंच मोडेल, आणि बंडवाल्यांनीं दिल्लीच्या बादशहाचें मेलेलें भूत उभें केलें होतें तेंही नाहींसें होऊन बंडवाल्यांचा लौकिक पाठिंबाही तुटेल, आणि कंपनी सरकार हे हिंदुस्थानचे खरे राज्यकर्ते व शिपाई बंडखोर, हीच भावना सर्वांच्या मनास पटेल, असा मुत्सद्देगिरीचा कयास बांधून त्यानें ॲन्सनला दिल्ली घेण्याचा ताबडतोब हुकूम केला.

कलकत्त्यांत राहात असलेल्या इंग्रज लोकांना मात्र लार्ड कॅनिंगचा शहाणपणा व शांतपणा रुचला नाहीं. त्या लोकांनीं आपली स्वतंत्र पलटण उभारून

कलकत्त्याचें रक्षण करण्याचा प्रस्ताव केला. या व्यापारी इंग्रज लोकांच्या मतानें ठिक-ठिकाणच्या देशी शिपायांचीं हत्यारें काढून घेणें, संशयित लोकांची झटपट चौकशी करून त्यांना फांशीची शिक्षा सुनावणें, व सर्वांच्या नजरेस भरेल अशा रीतीनें ती ताबडतोब अमलांत आणणें, हाच एक बंडाची वावटळ अधिक फैलावूं न देण्याच उपाय होता. दिल्ली व मीरत येथील बंडखोरांनीं केलेल्या क्रूर कत्तलीच्या बातम्या फुगवून वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत होत्या. इंग्रजी स्त्रियांचा प्राण घेण्या-पूर्वीं बंडवाल्यांनीं त्यांच्यांवर अवर्णनीय असे पाशवी अत्याचार केल्याच्या सप-शेल खोट्या बातम्या सर्व दूर पसरल्या होत्या. या खोट्या बातम्या प्रसिद्ध करून लोकांत प्रसृत करण्याचें पापकर्म इंग्रजी वर्तमानपत्रें व त्यांच्या पुढ्यांतील बेभरवं-शाचे बातमीदार करीत होते. हेतू हा कीं, त्या बातम्या वाचून गोऱ्या शिपायांनीं भडकून जावें, व मन मानेल तसे अत्याचार करून हिंदी लोकांवर जरब बसवावी. कारण अशी जरब बसविल्याशिवाय बंड मोडणार नाहीं, असें त्यांना वाटत होतें. ह्या अत्याचारी भडक बातम्या वाचून इंग्रज लोकांचीं अंतःकरणें संतापानें साह-जिकच भडकून गेलीं होतीं, व झालेल्या प्रकाराचा सूड उगविण्यासाठीं त्यांचे हात सारखे सळसळत होते. कलकत्त्यांतील इंग्रजांची ही मनोरचना पाहून लॉर्ड कॅनिंगनें त्यांची पलटण बनविण्याचें प्रथम नाकारलें. शिपायांच्या बंडाची व्याप्ती त्याला कळून चुकली होती, व तें मोडण्याचाही त्याचा निश्चय झाला होता. परंतु सुडाच्या भावनेनें बेहोष होऊन हिंदी लोकांची निवळ संशयावरून देखील सरसहा कत्तल करणें किंवा त्यांना सरास शिक्षा देणें, त्याला पसंत नव्हतें.

लार्ड क्यानिंगचें वर्तन हिंदुस्थानांतील विशेषतः कलकत्ता शहरांतील युरोपी-यन लोकांना मुळींच रुचलें नाहीं. भित्रा व दुर्बल हृदयी, बायकी, कोमल, अशीं विशेषणें त्याला लावण्यांत येऊं लागलीं. त्यानें सर्वत्र लष्करी कायदा पुकारावा व यच्चयावत इंग्रजांना मन मानेल तें करण्याची मुभा द्यावी अशी सर्वांची अपेक्षा होती. एका प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकाराच्या मतानें, **न्याय गुंडाळून ठेवणें यालाच लष्करी कायदा हें नांव** लज्जारक्षणाकरितां **दिलें जातें**. कारण कितीही अन्यायी कृत्यें केलीं तरी लष्करी कायद्याच्या बुरख्याखालीं तीं झांकलीं जातात. त्यामुळें हा आडमुठा कायदा पुकारण्याचा विचार लॉर्ड क्यानिंग यास प्रथमदर्शनीं पसंत पडेना. दिल्लीवर इंग्रजी फौजेनें एकवटून हल्ला करावा व तें शहर ताबडतोब काबीज करावें, म्हणजे बंडाची लाट फारशी पसरणार नाहीं असें त्याला वाटत होतें, आणि त्या दृष्टीनें त्याचे प्रयत्न चालू होते. मुख्य सेनापतीला दिल्लीवर

चालून जाण्याकरितां एक महिना अवकाश लागेल, आणि दिल्ली हातीं येण्याकरितां इंग्रजी फौजेला बंडखोरांशीं कित्येक महिने झुंज खेळावी लागेल, अशी आरंभीं त्याला मुळींच कल्पना नव्हती. त्याची कल्पना अशी होती कीं, मे महीना संपण्याच्या आंतच मुख्य सेनापती दिल्ली शहर सर करून बंडाचा बीमोड करतील. त्यामुळें कलकत्ता येथील इंग्रजांनीं सुचविलेले जाज्वल्य उपाय योजण्याचें त्यानें नाकारलें. तो भित्रा नव्हता किंवा इंग्रज ग्रंथकारांनीं म्हटल्याप्रमाणें फाजील दयाळूही नव्हता. उलट, औध प्रांतांत लागू करण्यासाठीं त्यानें पुढें जो जाहीरनामा काढला, त्याच्या तीव्र व कडक स्वरूपाचा सर जेम्स आउट्रॅम व लॉर्ड एलेनबरो या दोघांनींही निषेधच केला, व बंडवाल्यांच्या बाबतींत अधिक दयामय धोरण सरकारनें स्वीकारावें, असा आग्रह धरला. सारांश, लॉर्ड क्यानिंग फाजील दयाळू होता, ही समजूत भ्रामक आहे. तो निश्चयी व मनानें कठोर होता, परंतु त्याच्या निष्ठुर कर्तव्यांत सुडाचा समावेश होत नव्हता. तो डोक्याचा शांत व धीम्या प्रकृतीचा मनुष्य होता. त्याची कर्तबगारी विजेप्रमाणें चमकणारी नसली तरी धीरगंभीर स्वरूपाची होती. एक पाय जमिनीवर पक्का रोंवल्यानंतरच दुसरा उचलण्याची त्याला संवय जडली होती. त्यामुळें प्रथमारंभीं जरी बंडाचा बीमोड त्याच्या हातून होईल किंवा नाहीं ही शंका पुष्कळांना आली, तरी पुढें त्याच्या चारित्र्याची व पराक्रमाची सर्वांना ओळख पटली, आणि या शांत व धीम्या प्रकृतीच्या परंतु कर्तव्यनिष्ठ माणसामुळेंच इंग्रजी सत्तेला सत्तावनच्या धामधुमींत फारसा धक्का बसला नाहीं अशी सर्वांची खात्री झाली. मुख्य सेनापती ॲनसन याच्या कर्तबगारीविषयीं त्यानें बांधलेला अंदाज खोटा ठरला, आणि दिल्ली येथील बंडवाल्यांचें बलही त्याला नीट अजमावतां आलें नाहीं. कलकत्ता येथील सल्लागारांवर प्रारंभीं विसंबून राहिल्यामुळें त्याचे बरेच अंदाज चुकले. परंतु त्याबद्दल तो एकटाच दोषी ठरत नाहीं. बंडवाल्यांच्या बलाची पूर्ण कल्पना लष्करी अधिकाऱ्यांना देखील झाली नाहीं. यामुळें प्रथम अर्धकच्चे उपाय प्रसंगीं योजण्यांत आले, व ते साहाजिकच अपुरे ठरले. त्यामुळें मे महिना संपावयाच्या आंत दिल्ली शहर काबीज करतां येईल ही त्याची अटकळ चुकली, पण हें लक्षांत येतांच त्यानें ३० मे रोजीं लष्करी स्वरूपाचा एक कायदा तयार केला व ८ जून रोजीं तो उत्तरहिंदुस्थानांत सर्वत्र लागू केला. कलकत्ता येथील युरोपियन लोकांचें स्वयंसैनिक दल तयार करण्यासही त्यानें नंतर मंजुरी दिली. कलकत्ता येथें बराच मोठा खजिना होता. जवळच लष्करी युद्धोपयोगी सामान करण्याचे

कारखाने होते. आणि कंपनीच्या कचेऱ्या व कंपनीची मुख्य राजधानीही तेथेंच होती. कलकत्ता येथें बंड होऊन तें शहर बंडखोरांच्या हातीं लागलें असतें तर कंपनीचें अत्यंत मोठें नुकसान होऊन शिवाय कंपनी सरकारचा बोज व दबदबा नष्ट होऊन, बंडखोरांना विलक्षण उत्तेजन मिळालें असतें. ही गोष्ट लक्षांत ठेवून त्यानें तेथें उत्तम बंदोबस्त राखला व दिल्लीवर लक्ष वेधलें, आणि सेनापतीच्या मागें तें शहर ताबडतोब कबजांत घेण्याविषयीं निकड लावली.

मुख्य सेनापती ॲनसनला १२ मे रोजीं मीरत व दिल्ली येथील बंडाची हकीगत कळली. त्याबरोबर त्यांनीं मसुरीला एक मनुष्य पाठवून ७५ नंबरच्या पलटणीला ताबडतोब अंबाला येथें जाण्याचा हुकूम दिला, आणि सिरपूर येथील गुरखा पलटणीला मीरत येथें जाण्याची आज्ञा केली; आणि ते स्वतः १४ तारखेला अंबाला येथें येऊन पोंहोंचले. अंबाला येथील देशी शिपायांत बेदिली उत्पन्न झालेली होती. त्यांचीं हत्यारें काढून घेण्यांत येऊन पलटणींना निशस्त्र करण्याचा सल्ला सर जॉन लॉरेन्सनें मुख्य सेनापतीला दिला. परंतु मुख्य सेनापतीनें ही गोष्ट थोडी लांबणीवर टाकली, व त्यामुळें शिपायांना आपल्या अधिकाऱ्याविरुद्ध उठण्याला सवड सांपडली. परंतु सतलज प्रांताचे मुख्य कमिशनर जॉर्ज बारनेस यानें त्यावेळेस अतिशय समयसूचकता दाखवून सेनापतीला मदत केली. प्रथम त्यांनीं अंबाला शहराच्या रक्षणाकरितां शीख पोलिसांची जादा पलटण उभारली, व नंतर सतलजपासून यमुनेपर्यंत पसरलेल्या विस्तृत प्रदेशाच्या रक्षणाचा भार आपल्या शिरावर घेतला. निरनिराळ्या शीख जमीनदारांना व राजांना पत्रें लिहून त्यानें त्यांची मदत मागितली. पतियाला व झिंद येथील राजांनीं ताबडतोब आपल्या पलटणी कंपनीच्या सहाय्यार्थ रवाना केल्या. कर्नाल येथील नबाबानें रुपये व फौजी शिपाई पाठविण्याचें कबूल केलें. यमुनेच्या पुलावर पहारा बसवून व दळणवळणाचा मार्ग रोखून सर्व प्रदेशाचा त्यानें योग्य बंदोबस्त केला; आणि दिल्ली येथील बातमीनें लोकांच्या मनाची चलबिचल झाली होती ती शांत केली. बारनेस साहेबानें आपल्या हिमतीवर सैन्यासाठीं सर्व सामग्री पुरविली, तरीसुद्धां दिल्लीवर तांतडीनें स्वारी करण्याची मुख्य सेनापतीला हिंमत होईना. दिल्ली शहर मोंगल बादशाहाच्या ताब्यांत गेल्यामुळें बंडवाल्यांना जोर चढला होता व त्यांची सर्वदूर उठावणी सुरू होती. ही उठावणी बंद करण्याला दिल्ली शहरावर निकराचा हल्ला करून तें शहर काबीज करणें हा एकच उपाय होता. परंतु सेनापतीला आपल्या हाताशीं असलेल्या फौजेच्या जोरावर

दिल्लीवरील चढाई यशस्वी करून दाखवितां येणार नाहीं, अशी शंका वाटत होती. त्यामुळें सैन्याची अधिक जुळवाजुळव झाल्याशिवाय ते स्वारीवर निघण्याला तयार नव्हते. परंतु लॉर्ड कॅनिंग व सर जॉन लॉरेन्स यांनीं निकड लावल्यामुळें, २५ मे रोजीं मनांत नसतांही त्यांनीं अखेर दिल्लीच्या रस्त्यानें कूच सुरू केलें.

रस्त्यांतच कॉलऱ्याची बीमारी झाल्यामुळें कर्नाळ मुक्कामीं सेनापतीसाहेब मरण पावले. त्यांच्या मृत्यूमुळें मोहिमेचें आधिपत्य सर हेनरी बर्नार्ड यांच्याकडे आलें. हा अत्यंत शूर व तडफदार माणूस होता. ऍनसन साहेबाला वेळेवर कालरा होऊन याच्याकडे अधिपत्य आलें म्हणून बरें झालें. नाहीं तर दिल्लीच्या मोहीमेस किती विलंब झाला असता, कोण जाणे. त्यानें रस्त्यानें जातां जातां सर्व टापूभर लष्करी कायदा पुकारला व ज्या ज्या इसमांचा त्याला संशय आला, किंवा ज्यांनीं ज्यांनीं इंग्रजी फौजेला मदत करण्याची कुचराई केली असें त्याला वाटलें, त्यांना पकडून त्यांची झटपट चौकशी केली व त्यांना फांसावर लटकावलें. लोकांवर दबाव बसविण्याकरितां या गोष्टी केल्या जात होत्या. बंडखोर शिपायांना आश्रय देणें किंवा सामग्री पुरविणें यांबद्दल लोकांना फांशीची शिक्षा दिली जाते हें एकदां जाहीर झालें, म्हणजे बंडवाल्यांचा आधार तुटेल वसामान्य लोकांत उत्पन्न झालेला असंतोष जागचे जागीं दबून जाईल व त्याला तोंड आणि हातपाय फुटणार नाहींत, असें सेनापतीला वाटत होतें, आणि थोडेंबहुत तें खरेंही होतें. अशा बंडाळींत न्यायाचा निवळ फार्सच उडत असतो. लोकांनीं डोकें वर काढूं नये म्हणून न्यायाच्या नांवाखालीं या कडक शिक्षा दिल्या जात असतात. म्हणून अशा वेळीं कोणी कोणास हसूं नये हें बरें. परंतु त्याबरोबरच आपल्या अन्यायाचे लष्करी कायद्याच्या नांवानें समर्थन करण्याचा प्रयत्नही करूं नये.

मीरतपासून ६० मैलांवर गंगेच्या कांठीं रुडकी नांवाचें एक लहानसें गांव आहे. तेथील इंजिनिअरिंग कॉलेज हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. मीरत येथील दंग्याची हकीगत कळल्यानंतर मि. फ्रेजर हे ५०० लोकांना घेऊन मीरत येथील फौजेच्या मदतीकरतां धांवून गेले. मीरतला पोहोंचल्यावर त्यांनीं बरोबरचा दारुगोळा एका मजबूत घरांत इंग्रजांच्या पाहाऱ्यांत ठेवून दिला, आणि आपण पलटणीची व्यवस्था लावूं लागले. इतक्यांत त्यांच्या बरोबरच्या शिपायांनीं बंड पुकारून साहेबांना गोळी घातली, व आपण दिल्लीच्या वाटेला लागले. मीरत येथील गोऱ्या सैन्यानें त्यांचा पाठलाग केला, परंतु केवळ ५० लोकच त्यांच्या हातीं लागले. त्यांना इंग्रजांनीं ताबडतोब तोफेच्या तोंडीं दिलें. रुडकी

व सहारणपूर येथील व्यवस्था बेअर्ड स्मिथ व राबर्ट स्यांकी यांनीं अतिशय उत्तम ठेविली. आणि बंडाची लाट मीरतच्या पलीकडे जाऊं दिली नाहीं. बेअर्ड स्मिथनें आपल्या ठिकाणचा उत्तम बंदोबस्त ठेवला इतकेंच नव्हे, तर पुढें तो दिल्लीस इंग्रजी फौजेंत जाऊन मिळाला, आणि त्याच्या सल्ल्यानेंच पुढें दिल्लीच्या वेढ्याचें काम मुख्यत्वेंकरून चाललें होतें.

मीरत येथील गोऱ्या पलटणी मात्र तेथें स्वस्थ बसून होत्या. मीरतच्या आसपासच्या टापूंत त्यामुळें अशी समजूत पसरली कीं, १० तारखेच्या दंगलींत तेथील सर्व युरोपियन फौज कापली गेली. बदमाष लोकांनीं व भुरट्या चोरांनीं यामुळें आसमंतात धुमाकूळ घालण्यास सुरवात केली. तरी देखील मीरतच्या गोऱ्या पलटणी आपल्या ठिकाणीं स्वस्थच होत्या. ठिकठिकाणचे सैनिक बंडाचा बावटा उभारून दिल्लीच्या रस्त्याला लागले होते. त्यांना गांठून वाटेंतच खरपूस चोप देण्याचें कामदेखील या फौजेच्या हातून होईना. त्यांनीं थोडी सावधगिरी राखली असती, तर दिल्लीकडे जाणाऱ्या बंडखोरांच्या लहान लहान टोळ्यांना वाटेंत अडचणींत गांठून, त्यांचा फडशा या गोऱ्यांना पाडतां आला असता, व त्यामुळें दिल्लीकडे जाणाऱ्या बंडखोरांना चांगलाच वचक बसला असता, आणि दिल्ली येथील बंडवाल्यांची संख्या अशी फुगलीही नसती. परंतु १० तारखेला उसळलेल्या बंडाच्या दंगलीनें या फौजेच्या पोटांत जी एकदा धडकी भरली होती, ती कांहीं केल्या कमी होईना. अखेर २७ तारखेला अंबाल्याहून दिल्लीवर चालून जाणाऱ्या फौजेला मिळण्याचा, तेथील सैन्याला मुख्य सेनापतीचा हुकूम मिळाला. तेव्हां ही फौज तेथून निघाली. ३ दिवसांनीं हिंदन नांवाच्या लहानशा नदीच्या कांठीं असलेल्या गाजीउद्दीन नगर येथें बंडखोर शिपायांनीं त्यांना अडविलें. झालेल्या लढाईत बंडवाले मागें हटले, परंतु त्यांचा पाठलाग या फौजेला करतां आला नाहीं. परंतु १ जूनला मेजर रीडच्या हाताखालील ५०० गुरखे येऊन मिळाल्यामुळें या फौजेला हिंमत आली. फिलावर येथून निघालेला तोफखानाही ठरल्याप्रमाणे येऊन मिळाला. ३ तारखेला मीरतची फौज बागपताच्या रोखानें कूच करूं लागली, आणि ७ तारखेला अंबाल्याहून आलेल्या बर्नार्डच्या फौजेशीं तिची मुलाखत झाली.

दिल्लीच्या उत्तरेस ६ मैलांवर बादलीकी सराई या ठिकाणीं बंडखोरांनीं आपली छावणी उभारली होती. बर्नार्डनें समोरून तोफखाना चालवून बंडखोरांच्या डाव्या बाजूवर आणि पिछाडीवर हल्ले केले. बंडखोरांचा पुरा पराभव झाला, व ते

चौफेर उधळले. मिळालेल्या विजयाचा फायदा घेऊन बर्नार्ड पुढें सरकला व त्यानें दिल्लीजवळील टेंकाड आपल्या ताब्यांत घेतलें व बंडखोरांना शहरांत पिटाळून लावलें. या लढाईत बंडखोरांच्या २६ तोफा बर्नार्डच्या हातीं लागल्या. इंग्रजांचीं या लढाईंत १३७ माणसें कामास आलीं. परंतु हा मिळालेला विजय त्या मानानें फार महत्वाचा होता. कारण बंडखोर शहराच्या आंत कोंडले गेले, व चढाईचा डाव इंग्रजांच्या हातीं आला. लार्ड क्यानिंगच्या इच्छेप्रमाणें इंग्रजी फौज दिल्ली-पुढें येऊन थडकली. परंतु ती तेथें पोंहोंचण्यासच सरासरी एक महिना लागला. तोंपर्यंत बंडवाले दिल्लीस निर्धोर होते आणि तेथें त्यांचा जमही चांगला बसला होता. त्यांचें तेथें राज्य चालू झालें होतें. बादशाहीचा नगारा सर्वत्र वाजत होता. इंग्रजी फौज दिल्ली येथें येऊन थडकली, परंतु दिल्लीस बादशाही स्थापन झाल्या-नंतर सरासरी एक महिन्यानें ती तेथें आली. तोंपर्यंत बंडवाल्यांचा जयजयकारच होत असल्यामुळें इतरत्र बेदिली शिपायांना उत्तेजन मिळालें, व बंडाचा वणवा चौफेर पेटला. हा वणवा चौफेर पेटूं नये, म्हणूनच लार्ड क्यानिंगनें दिल्लीवर चढाई करण्याचा इतका नेट लावला होता, परंतु मुख्य सेनापतीच्या दिरंगाईनें व घाबरटपणानें क्यानिंगची योजना सिद्धीस गेली नाहीं. बरें, जवळ असलेल्या फौजेच्या जोरावर दिल्ली शहरावर नेटाचा हल्ला करून तें शहर काबीज करण्यास इंग्रजांना आतां संधी मिळाली खरी, परंतु ती गोष्ट पूर्वी वाटली तितकी सोपी नाहीं, हें सर्वांना लवकरच कळून आलें. कारण या एक महिन्यांत बंडवाल्यांचें बळ फार वाढलें होतें. क्यानिं-गच्या इच्छेप्रमाणें २० मेच्या आंत जर इंग्रजी फौज दिल्लीपुढें येऊन थडकली असती, तर धडाक्यासरशी दिल्ली त्यांना काबीज करतां आली असती. कारण बंड-वाल्यांचा तेव्हां जम बसला नव्हता. परंतु या एक महिन्याच्या अक्षम्य दिरंगाईमुळें बंडवाल्यांचे पाय तेथें पक्के रोंवले जावून, त्यांनीं दिल्लीच्या बंदोबस्ताची योजना पुरती केली. त्यांचें संख्याबलही विलक्षण वाढलें होतें.

---

## प्रकरण १५ वें

# वणवा पेटला !



मीरत येथील बंडाची बातमी ऐकून ज्याप्रमाणें कंपनीचे अधिकारी चकित झाले, तसेच किंबहुना त्याहीपेक्षां अधिक ठिकठिकाणच्या बंडखोर पलटणी व

बंडाचे हितचिंतक आश्चर्यांत निमग्न झाले. इंग्रज लोक गैरसावध असतांना ३१ मे रोजीं एकसमयावच्छेदेंकरून बंडाचा हिंदुस्थानभर उठाव व्हावयाचा होता. त्याकरितां ठिकठिकाणच्या देशी पलटणींत ३-४ प्रमुख इसमांच्या कमेट्या नेमण्यांत आल्या होत्या, आणि शिपायांनीं त्यांच्या आज्ञेनुसार वर्तन करावें असें ठरलें होतें. शिपायांना ठरलेल्या तारखेच्यापूर्वी शांत ठेवण्याचा हे सभासद आपल्याकडून कसून प्रयत्न करीत होते. कारण एकाच दिवशीं सर्व हिंदुस्थानभर बंड झालें तर इंग्रज गैरसावध असल्यामुळें चेचले जातील व जे उरतील ते इतके भांबावतील कीं त्यांना काय करावें हें सुचणारच नाहीं, असा बंडवाल्यांचा अंदाज होता, व तो एका अर्थी खराही होता. इंग्रजांसारख्या धाडशी, पराक्रमी व चिकाटीच्या लोकांविरुद्ध जय संपादन करावयाचा हाच एक मार्ग होता. हा मूळ बेत जर अमलांत आला असता, तर मीरत येथील इंग्रज पलटणीप्रमाणें ठिकठिकाणच्या गोऱ्या पलटणी व गोरे अधिकारी भांबावून जाऊन कर्तव्यशून्य व संज्ञाहीन बनण्याचा संभव होता. प्रधान सेनापती ऐन्सनप्रमाणें बाकीचेही अधिकारी बुचकळ्यांत पडले असते, आणि मग कदाचित् बंडवाल्यांना जय मिळून त्यांच्या इच्छेप्रमाणें हिंदुमुसलमानांचें राज्य पूर्ववत् या देशांत स्थापन झालें असतें, व इंग्रजांची येथून कायमची हकालपट्टी झाली असती. परंतु शिपायांना चेतविणें जितकें सोपें होतें, तितकेंच ते एकदां भडकल्यानंतर त्यांना काबूंत ठेवणें कठीण होतें. मीरत येथील ८४ सैनिकांना नवीं काडतुसें घेण्याचें नाकारल्याच्या आरोपावरून शिक्षा झाली. त्यामुळें तेथील एकंदर देशी शिपाई बंडवाल्या पुढाऱ्यांच्या कह्याबाहेर गेले, आणि ठरलेल्या तारखेच्या पूर्वी ३ आठवडे बंडास सुरवात झाली. या अवचित झालेल्या बंडाळीमुळें इंग्रजांचा एकंदरीनें फायदाच झाला. कारण यापूर्वी ठिकठिकाणच्या युरोपियन अधिकाऱ्यांना देशी शिपायांत असंतोष पसरला आहे हें माहीत झालें होतें; तो असंतोष भडका उडून इंग्रजांची आहुती घेण्याइतका तीव्र आहे, अशी त्यांची कल्पना नव्हती. मीरत येथें झालेल्या प्रकारानें ते सावध झाले. यापूर्वीही निरनिराळ्या ठिकाणच्या लष्करी छावण्यांत शिपायांकडून थोडेंबहुत गैरशिस्त वर्तन झालें होतें. आपण लवकरच पराक्रम गाजवून इंग्रजांची सत्ता धुडकावून देणार, ही खात्री कटांत सामील असलेल्या सर्व शिपायांना असल्यामुळें ते आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं पूर्वीप्रमाणें नम्रतेनें वागेनासे झाले. अधिकाऱ्यांना मधून मधून उद्दाम उत्तरें मिळूं लागलीं. बराकींतील भजनाला तर इतका

रंग रात्रीं चढत असे कीं, इंग्रज अधिकाऱ्यांची हटकून झोंपमोड व्हावी. फौजेंतील शिपायांचें वर्तन पाहून साहेबांचे खासगी नोकरही बेफामपणें वागूं लागले होते. तेही धर्माच्या नांवानें भजन करून एखाद्या मालकाचा बंगला रात्रीं डोक्यावर घेत. परिस्थितींतील हा फरक अनेक इंग्रज अधिकाऱ्यांच्या लक्षांत आला होता. परंतु ह्या गोष्टी सहजगत्या घडलेल्या व तुटक स्वरूपाच्या वाटल्यामुळें, अधिकाऱ्यांनीं त्यांचा तेवढ्यापुरता बंदोबस्त करण्यापलीकडे अधिक लक्ष पोंचविलें नाहीं. परंतु मीरत येथील बंडाळीनें त्यांच्या डोळ्यांवरील धुंदी साफ निघाली. सर्व हिंदुस्थानभर बंडाचा मोठा थोरला कट झाला असून, त्या कटाच्या जाळ्याचे धागेदोरे प्रत्येक छावणींत येऊन पोहोंचले आहेत अशी त्यांची पूर्ण खात्री झाली. त्यामुळें ठिकठिकाणचे इंग्रज अधिकारी सावध झाले, व पुढें उद्भवणाऱ्या आपत्तीला तोंड देण्यासाठीं बचावाचे मार्ग योजूं लागले. बंडाची उभारणी झालीच तर त्याचा तात्काळ कसा बींमोड करावा, व छावणींत असलेल्या मुलकी व लष्करी इंग्रज अधिकाऱ्यांचा व त्यांच्या कुटुंबांचा बचाव करण्याच्या योजना अधिकाऱ्यांनीं आंखून ठेवल्या. इतकेंच नव्हे, तर उत्पन्न होणाऱ्या बंडाचा बींमोड करण्याकरितां कराव्या लागणाऱ्या फौजेच्या हालचाली व लढाईचे डावपेंच हेदेखील त्यांनीं निश्चित करून टाकले. मीरत येथील बंडामुळें इंग्रजांना ही जी सावधगिरीची सूचना मिळाली तिचा त्यांनीं फारच उत्तम तऱ्हेनें फायदा करून घेतला. निरनिराळ्या छावण्यांच्या अधिकाऱ्यांनीं मोठ्या कुशलतेनें व युक्तिप्रयुक्तीनें माऱ्याच्या जागा, प्रमुख बचावाचीं ठिकाणें, शस्त्रागारें व खजिने यांच्यावरील देशी शिपायांचे पाहारे उठवून, त्यांच्या जागीं गोऱ्या फौजेचे पाहारे व चौक्या बसविल्या. छावणींत असलेल्या देशी फौजेचा बिलकूल विश्वास धरावयाचा नाहीं अशा धोरणानेंच ते वागूं लागले, व यामुळें पुढें प्रसंग आला तेव्हां बंडवाल्यांना तोंड देणें व कुमक येईतोंपर्यंत आपलें ठाणें सांभाळून राहाणें त्यांना सोपें गेलें. मीरत येथील बंडवाल्यांची घिसाडघाई इंग्रजांना अखेरीस यश मिळण्याच्या दृष्टीनें अत्यंत फायदेशीर झाली यांत शंकाच नाहीं.

एकाच वेळीं बंडाची उठवणी केली तर पदरांत यश पडल्यावांचून राहाणार नाहीं हा बंडवाल्यांचा अंदाज, मीरत व दिल्ली येथें त्यांना जें धडाक्यानें यश मिळालें त्यावरून खरा ठरतो. दिल्लीला फारशी युरोपियन फौज नसली तरी दिल्लीचा किल्ला लढविण्यासारखा होता; व मीरत येथें तर बरेंच गोरें सैन्य होतें. परंतु मेच्या १० तारखेला संध्याकाळीं मीरत येथें बंड पुकारून, ११ तारखेला

बंडवाल्यांनीं दिल्ली शहर आपल्या कबजांत घेतलें, व दिल्लीच्या बादशाहाच्या नांवानें सर्व दूर द्वाही देखील फिरविली. दिल्लीचा बादशाहा हिंदुस्थानचा खरा मालक असून कंपनी त्याच्या नांवानें फक्त राज्याची वहिवाट करीत होती. त्या परधर्मी, बेइमान व शिरजोर फिरंगी गुमास्त्याला नोकरीवरून खारीज केल्याबद्दल बादशाही फर्मान निघालें; व यापुढें हिंदुस्थानांतील सर्व हिंदुमुसलमानांनीं कंपनीची आज्ञा पालन न करतां, बादशाहाच्या व त्यांच्या सरदारांच्या आज्ञेनुसार लोकांनीं चालावें असे हुकूम सोडण्यांत आले. मीरत व दिल्ली येथील बंडाळीमुळें, आणि तिजमुळें होऊं घातलेल्या राज्यक्रांतीनें कंपनीचे इंग्रज अधिकारी क्षणभर भांबावलेच. फक्त महामुत्सद्दी व धोरणी लॉर्ड कॅनिंग याचें डोकें शांत असून ठिकाणावर होतें. दिल्ली शहराला ताबडतोब शह देऊन तें शहर ताब्यांत घेतल्याशिवाय बंडाळीला आलेलें राज्यक्रांतीचें स्वरूप नाहींसें होणार नाहीं, ही गोष्ट त्यानें पुरतेपणीं ओळखली व त्याप्रमाणें त्यानें दिल्लीवर ताबडतोब चालून जाण्याचा मुख्य सेनापतीला हुकूम दिला. परंतु दिल्ली शहर बंडवाल्यांच्या हातीं ११ मे रोजीं लागलें, व १५ मेला वृद्ध बहादुरशहाच्या नांवानें सर्व दूर जाहीरनामे प्रसिद्ध होऊन, औटघटकाच पुढें टिकली असली तरी, खरी खरी मोंगल बादशाही दिल्लीस सुरू झाली. तथापि मुख्य सेनापतीला दिल्लीच्या स्वारीची जुळवाजुळव करतां येईना. लॉर्ड कॅनिंगकडून अनेक निकडीचे खलिते व तारा गेल्यानंतर दिल्लीवर स्वारी करण्याकरितां २५ मे रोजीं अंबाल्याहून एकदांची इंग्रजी फौज निघाली, व ती मजल दरमजल करीत ७ जून रोजीं दिल्लीच्या पुढयांत येऊन ठेपली. ११ मेपासून ७ जूनपर्यंत दिल्लीस मोंगल बादशाहाचें निष्कंटक राज्य सुरू होतें. या गोष्टीचा बंडवाल्यांनीं चांगलाच फायदा करून घेतला. ठरलेल्या तारखेपूर्वी बंडाचा झेंडा उभारण्याच्या ढोबळ चुकीचें परिमार्जन दिल्ली येथील विजयामुळें घडून आलें. कारण दिल्लीस मोंगल बादशहाची सत्ता पुन्हा स्थापन झाली हें पाहून, व बादशाही फर्मानें वाचून ठिकठिकाणच्या बंडखोर पलटणींना उत्तेजन मिळालें. मीरत येथील बंडामुळें ठिकठिकाणचे इंग्रज अधिकारी सावध झाले हें पाहून, आपला व्यूह ढांसळला, आपला बंडाचा गुप्त कट उघडकीस आला, या भीतीनें गांगरून गेलेल्या शिपायांना दिल्लीहून निघणाऱ्या बादशाही फर्मानामुळें पुन्हां उत्साह चढला. आणि कंपनीसरकारविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून लष्करी चौकशी होऊन कुत्र्याच्या मोतीनें मरण्यापेक्षां, उघड बंड उभारून बादशाही फर्मानाप्रमाणें दिल्लीस जाण्याचा व बादशाहीच्या संरक्षणासाठीं लढण्याचा

त्यांनीं निश्चय केला. दिल्लीवर चालून जाण्याची इंग्रजांची दिरंगाई आणि दिल्लीच्या वाटेंतील मीरत येथील गोऱ्या पलटणीची धास्ती, बंडवाल्यांच्या चांगलीच पथ्या-वर पडली. या मुदतींत हिंदुस्थानभर ठिकठिकाणीं बंडाचा कल्लोळ उसळला, व दंगा सुरू झाला. कोणत्याही पलटणीनें बंड पुकारलें म्हणजे ती तडक दिल्लीस चालती व्हावयाची. राजधानीखेरीज निरनिराळ्या ठिकाणीं नाकेबंदी करावी लागते व शत्रूंना पायबंद घालावा लागतो तेव्हां मुख्य राजधानीचें रक्षण होतें, ही गोष्ट बंडवाले साफ विसरले. ठिकठिकाणीं आपल्या वतीचे चौकीपहारे बसवून जुन्यांची बोळवण केल्या-शिवाय आपला जम राज्यांत बसणार नाहीं, ही साधी गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नाहीं. ते सर्वच्या सर्व निरनिराळ्या ठिकाणांहून क्षणभरदेखील विचार न करतां दिल्लीस चालते झाले. त्यामुळें दिल्ली येथें बंडवाले प्रबल झाले खरे, परंतु देश त्यांच्या कबजांत आला नाहीं, व दळणवळणाचे मार्ग इंग्रजांना मोकळे राहिले. चोहोंबाजूंनीं सुरू झालेली ही दिल्लीची धांव, कटाचे धागेदोरे केवळ शिपायांपुरते मर्यादित नसून फार खोलवर रुजले होते, असें दर्शवितें.

दिल्लीस नव्या बादशाहीची स्थापना झाल्याची वार्ता ऐकतांच मुसलमान शिपा-यांना विशेष उत्तेजन मिळालें. आपल्या नशीबाची परीक्षा पाहाण्याकरितां ते उत्सुक झाले. त्यांच्या वाडवडिलांनीं लहानपणीं सांगितलेल्या जुन्या बादशाही राजवटींतील गोष्टी व आख्यायिका आतां त्यांना आठवूं लागल्या, आणि जुनें मुलुखगिरीचें वैभव पुन्हां लाभण्याचीं सुखस्वप्नें त्यांना पडूं लागलीं. औंध प्रांतांत मुसलमान नबाबी नांदत असलेली पहाणारेच नव्हे, तर नबाबी स्वतः अधिकारानें नांदवणारे देखील या वेळीं जिवंत होते. कारण औंध प्रांत खालसा होऊन तर एकच वर्ष लोटलें होतें. त्यामुळें औंध प्रांतांत, विशेषतः नबाबाच्या राजधानींत बंडाची ज्वाळा जोरानें पेटूं लागली. मुसलमानांप्रमाणें इंग्रजांच्या फौजेंतील हिंदी शिपायांनाही बादशाही अमलाखालीं पराक्रम करून जहागिरी व बक्षीसें संपादन करण्याची, आणि त्यांच्या दृष्टीनें उपरी व भामट्या असणाऱ्या कंपनीला पळवून लावण्याची इच्छा झाली. कारण बऱ्याच देशी पलटणींतील हिंदी शिपाई औंध प्रांताचे रहिवाशी होते व नबाबी-बद्दल त्यांना आपलेपणा वाटत होता.

कंपनीच्या देशी फौजेंत अयोध्या-कानपूर-प्रयाग-काशी टापूंतील पुरभय्यांचा बराच मोठा भरणा होता. हे हाडापेरानें मजबूत व बेपर्वा वृत्तीचे लोक मारा-मारीस व दंडेलीस सहज प्रवृत्त होतात, व त्यामुळें फौजेंत त्यांची भरती करण्यास इंग्रज लष्करी अधिकारी खूष असत. डोकें मात्र या लोकांस जरा कमी व शिक्षण

तर त्यावेळीं नव्हतेंच. त्यांचा कडवा परंतु आंधळा धर्माभिमान अजूनही प्रसिद्ध आहे. आठ पुरभय्यांना स्वयंपाकाकरितां नऊ चुली लागतात, इतकें कडक सोंवळें त्यांच्यांत आजही आहे. तेव्हां ५७ सालीं काडतुसांना गाईची चरबी लावली आहे हें ऐकून त्यांचें पित्त कसें भडकलें असेल त्याची कल्पनाच करावी. मुलांचें संस्कृत विद्येवरील लक्ष उडून इंग्रजी विद्येवर प्रेम जडलेलें पाहून त्यांना काय वाटलें असेल ? ख्रिस्ती मिशनांच्या मार्फत घडून येत असलेली एकटदुकट धर्मांतरांचीं उदाहरणें पाहून त्यांनीं काय अंदाज बांधला असेल ? जनावरावांचून धांवणाऱ्या आगगाडीबद्दल त्यांची काय कल्पना झाली असावी ? दूर अंतरावर एका निमिषांत बातम्या पाठविणाऱ्या तारायंत्राचें कर्णपिशाच इंग्रजांना साहाय्य करीत असलेलें पाहून ते कसे क्रोधित झाले असतील ? आणि पुढें बंडाच्या वावटळींत तारायंत्र व एंजिनें यांच्यावर बंडवाल्यांची फार करडी नजर असल्याचें प्रत्ययास आलें. तारायंत्राचा समूळ विध्वंस ते करीत असत. इंग्रजांच्या बातम्या लवकर इकडून तिकडे जाऊं नयेत, हा त्यांचा कदाचित् उद्देश असेल. परंतु एंजीनवर देखील तोफा चालवून त्याचा चक्काचूर केल्याशिवाय त्यांचें समाधान होत नसे. इंग्रज येनकेन प्रकारेण आपली जात बाटवून आपल्याला ख्रिस्ती करणार हा दृढ विश्वास झाल्यामुळें, धर्मासाठीं मरेतोंपयत लढण्याचा त्यांचा निश्चय कायम झाला होता. या पुरभय्यांच्या पलटणी बहार, मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थानांतील संस्थानें, संयुक्त प्रांत, वायव्य प्रांत, पंजाब अशा सर्व उत्तर हिंदुस्थानभर पसरल्या होत्या. धर्मावर होऊं घातलेल्या हल्ल्याच्या रोज नव्या गटारगप्पा पसरत होत्या. आणि प्रत्येक कानीं पडणाऱ्या अफवेमुळें पुरभय्ये अधिकच बेफाम होत चालले होते. यांच्यामुळें बंडाचा वणवा फारच लवकर पसरला, व त्याला तीव्र धर्मयुद्धाचें स्वरूप आलें.

पंजाबप्रांत खालसा करून लॉर्ड डलहौसीनें शीख लोकांचीं मनें फार दुखावलीं होतीं. परंतु लारेन्ससाहेबांची कारकीर्द शीखांना सुखावह झाली असल्यामुळें जुन्या अन्यायाचा त्यांना विसर पडत चालला होता. शीखांचे अधिपती महाराज दिलीपसिंहजी यांना बालवयांतच ख्रिस्ती धर्माची दीक्षा देऊन कंपनीसरकारनें मोठ्या शिताफीनें विलायतेस नेऊन ठेवलें होतें. त्यामुळें बंड कोणासाठीं व कशासाठीं करावयाचें, हेंच शूर शीखांना समजेनासें झालें. शिवाय शीख लोकांचें शौर्य ओळखून पंजाबप्रांत खालसा केल्यानंतरही शीख लोकांची आपल्या सैन्यांत भरती करून त्यांच्या पराक्रमाला व कर्तबगारीला वाव देण्याचा इंग्रजांचा प्रयत्न अव्याहत चालू होता. त्यामुळें शीख लोक इंग्रजांवर थोडेबहुत खूष झाले होते.

इंग्रज लोक एवढे वाईट नाहींत; केवळ पंजाबांतील बेबंदशाही मोडून तेथें शांतता प्रस्थापित करण्याकरितांच त्यांनीं पंजाब जिंकला, व म्हणूनच त्यांनीं आपली लष्करांत भरती करून आपला गौरव केला, असें त्यांच्या भाबड्या मनाला वाटत असे. तरीसुद्धां ते कदाचित् बंडांत सामील झाले असते, व आरंभीं इंग्रजांना त्यांची धास्तीही वाटत होती. परंतु दिल्ली येथें जुन्या मुसलमानी मोंगल बादशाहीची स्थापना झालेली ऐकतांच बंडखोरांविषयीं त्यांचीं मनें विटलीं, आणि त्यांच्या धर्मांत ढवळाढवळ न करणाऱ्या व त्यांना फौजेंत शिपाइगिरीची नोकरी बहाल करणाऱ्या कंपनीकडे, त्यांच्या मनाचा कांटा झुकला. कारण मुसलमानांचें व शीखांचें हाडवैर प्रसिद्धच आहे. दिल्लीच्या मोंगल बादशहांनीं व त्यांच्या सुभेदारांनीं हजारों शीखांना धर्मासाठीं हालहाल करून मारलें होतें. प्रत्यक्ष शीख लोकांचे थोर गुरु गोविंदसिंह व त्यांचे अनेक सच्छिष्य मोंगल बादशहांच्या कडव्या धर्माभिमानाला बळी पडले होते. त्यांच्या हालअपेष्टा शीख लोक विसरले नव्हते. त्यामुळें मोंगलबादशाहीचें व पर्यायानें मुसलमानी सत्तेचें पुनरुज्जीवन करूं पाहणाऱ्या बंडखोरांविरुद्ध शीखांनींही त्वेषानें आपली तलवार उपसली. मोंगलांच्या अत्याचारांचा सूड म्हणून दिल्ली शहर काबीज करून, त्या शहराची लूट करण्याची शीखांची फार दिवसांची इच्छा होती, व तशीं स्वप्नेंही मधून मधून त्यांना पडत असत. इंग्रजांच्या साहाय्यानें त्यांचें स्वप्न खरें करण्याची वेळ आली. तेव्हां आपल्या जुन्या प्रतिज्ञेच्या पूर्तीकरितां त्यांनीं इंग्रजांतर्फे आपली तलवार उपसली. हिमालयाच्या उतरणीवर रहात असलेले कडवे गुरखे शिपाई देखील, या उपटसुंभ मुसलमान बादशाहीवर तुटून पडले. कारण गुरखे हे फार कडवे हिंदु धर्माभिमानी व शंकराचे उपासक आहेत. पशुपतेश्वराचे उपासक मूर्तिभंजक मोंगलबादशहाला कसें साहाय्य देतील? शिवाय औध प्रांतावर गुरख्यांचा डोळा होता. कारण तेथील नबाबांनीं पूर्वी इंग्रजांना गुरख्यांविरुद्ध माणसांची व द्रव्याची मदत दिली होती. शीख व गुरखे या कडव्या व अत्यंत शूर शिपायांच्या मदतीमुळेंच इंग्रजांना हें बंड इतक्या सुलभ रीतीनें व इतक्या थोड्या वेळांत मोडतां आलें. किंबहुना इंग्रजांना यांची मदत न होती तर त्यांची अवस्था कठीणच होती.

रजपूत लोक देखील बंडांत सामील झाले नाहींत. त्यांची मोंगलबादशाहीशीं मुळींच सहानुभूति नव्हती. मोंगल बादशाहीच्या चालत्या काळांत ते बादशाहीचे एकनिष्ठ पुरस्कर्ते व साहाय्यक होते. मराठ्यांच्या चालत्या काळांत त्यांनीं मराठ्यांना

आपल्या मुलखांत चाथाई व सरदेशमुखी वसूल करूं दिली, आणि मराठ्यांना स्वतः खंडणीही पोहोंचविली. इंग्रजांच्या चालत्या काळांत ते इंग्रजांचे एकनिष्ठ भक्त बनले. त्यांचें शौर्य आपापसांत चुरशीचे सामने निकरानें लढण्यांत खर्च होत होतें. स्वातंत्र्याची व हिंदुस्थानाची त्यांना काडीचीही फिकीर नव्हती. त्यांचें वंशपरंपरागत चालत आलेलें प्राचीन परंतु चिमकुलें राज्य त्यांच्या ताब्यांत असलें म्हणजे ते आनंद मानीत, व त्याकरितां मांडलिक म्हणून वाटेल त्याला मुजरा करीत. त्यांच्या प्रांतांत अफू मुबलक पिके व अफू, गांजा, भांग, चरस, माजूम यांच्या कैफांत ते आनंद मानीत होते. त्यांना मुसलमान मोंगलबादशाहा किंवा हिंदु पेशवे, यांपैकीं कोणाविषयींच आपलेपणा वाटत नव्हता; कोणाविषयीं देखील त्यांना मनांतून सहानुभूति वाटत नव्हती. त्यामुळें अवचित आलेल्या या अमोल संधीचा फायदा घेऊन' स्वातंत्र्याच्या या वहात्या गंगेंत हात धुवून घेण्याचें त्यांनीं साहजिकच नाकारलें. बंडाळीचा फायदा स्वातंत्र्यसंपादनासाठीं त्यांनीं घेतला नाहीं. नवीन लाभलेल्या इंग्रज कंपनीप्रभूशीं ते राजनिष्ठ राहिले व आपल्या पूर्वापार चालत आलेल्या राजनिष्ठेच्या लौकिकाचें त्यांनीं स्वतांच्या उदाहरणानें समर्थन करून दाखविलें!

उत्तर हिंदुस्थानांतच बंडाची आग पेटली व तेथेंच भडकली. उत्तर हिंदुस्थान हें कांहीं मराठ्यांचें घर नव्हे. परंतु मराठेशाहीच्या उत्तरार्धांत म्हणजे हिंदु साम्राज्य स्थापूं पाहणाऱ्या पेशवाईंत, मराठ्यांनीं महाराष्ट्राच्या चतुःसीमा ओलांडल्या व आपल्या पराक्रमानें उत्तर हिंदुस्थानांत मराठी राज्यें स्थापन केलीं. आपले हातपाय पसरतांना मराठ्यांना दिल्लीच्या मोंगल बादशाहाशीं व त्याच्या मुसलमान सुभेदारांशीं, आणि प्रसंगविशेषीं मुसलमान बादशाहीच्या आश्रित व अभिमानी रजपुतांशीं लढावें लागलें. त्यामुळें मोंगल बादशाहीची स्थापना करूं पाहणाऱ्या या बंडाळीशीं उत्तर हिंदुस्थानांतील मराठे संस्थानिकांना मुळींच सहानुभूति वाटत नव्हती. उलट बंडखोरांना ते आपले शत्रूच लेखीत होते. परंतु पुण्याचे पेन्शनर पेशवे कानपूरजवळ ब्रम्हावर्त येथें रहात होते. बाजीराव पेशव्यांच्या मृत्यूनंतर पेन्शनेंर पेशव्यांच्या दत्तक पुत्राची नेमणूक अन्यायानें बंद करण्यांत आली. त्यामुळें त्या पूर्वीं इंग्रजांचे मित्र म्हणून प्रसिद्ध असलेले, बिठूरचे महाराज या नांवानें ओळखले जाणारे, हौशी व खेळाडू वृत्तीचे, आदरसत्कार करण्यांत निपुण असलेले, दिलदार, मनमोकळ्या व उदार स्वभावाचे ( बंडापूर्वीं निरनिराळ्या इंग्रज

अधिकाऱ्यांनीं नानासाहेबांच्या स्वभावाचें, त्यांच्या घरच्या मेजवान्या झोडून असें गोड वर्णन केलें आहे.) श्रीमंत नानासाहेब पेशवे इंग्रजांचे कट्टे शत्रु बनले व बंडाचे नेते झाले. बाजीराव पेशव्यांचे व पुण्याच्या पेशवाईचे वारसदार नानासाहेब असल्यामुळें त्यांच्याकडे महाराष्ट्रीयांचें पुढारीपण स्वाभाविकच आलें होतें. मराठासंघाचे पेशवे हे अग्रणी होते, आणि आपल्या बाबतींत झालेल्या अन्यायानें संतापून त्यांनीं बंडाचें निशाण उभारतांच उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांचीं व मराठे सरदारांचीं मनें क्षणभर चलबिचल झालीं तर त्यांत नवल कोणतें ? पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांना देखील बंडाळींत उडी घ्यावी असें वाटलें. परंतु उत्तर हिंदुस्थानांत मराठे इतके अल्पसंख्याक आहेत कीं, त्यांच्या साहाय्याचा बंडावर फारसा परिणाम होणें शक्य नव्हतें. शिवाय मराठ्यांची नानासाहेब पेशव्याविषयीं सहानुभूति असली, तरी दिल्लीच्या मोंगल बादशाहीविषयीं त्यांच्या मनांत लवमात्र प्रेम नव्हतें. त्यामुळें इकडे आड व तिकडे विहीर अशी त्यांची स्थिति झाली. परंतु मराठ्यांची व्यवहारनिपुण म्हणून पूर्वींपासून प्रसिद्धी आहे. भावनेपेक्षां सारासार विचारालाच ते चटकन् वश होतात. विकारापेक्षां विचारांचेंच प्राबल्य त्यांच्या मनांवर चटकन् बसतें. हृदयापेक्षां मेंदूकडेच त्यांचा ओढा अधिक ! तेव्हां मुसलमानांकडे नेतृत्व असलेल्या बंडांत सामील झाल्यानें, फायद्यापेक्षां तोटाच अधिक असें जाणून ते बंडाळीपासून अलिप्त राहिले. उत्तर हिंदुस्थानांतील मराठे संस्थानिकांना कंपनीविषयीं प्रेमाचा पान्हा फुटला होता, अशांतला भाग नाहीं. कंपनीची सत्ता केवढी प्रचंड आहे, ही गोष्ट ते जाणून असल्यामुळें कंपनीशीं राजनिष्ठ राहिल्यानेंच आपल्या संस्थानांचें रक्षण कदाचित् होईल; नाहींपेक्षां निमित्ताला टेकलेली कंपनी आपलीं राज्यें केव्हांच खालसा करील, या भीतीनेंच ते कंपनीशीं ५७ सालीं पूर्णपणें राजनिष्ठ राहिले. परंतु ‘हम करेसो कायदा’ या न्यायानें ज्यांचें सर्वस्व इंग्रजांनीं जुलमानें नष्ट केलें, असे झांशीच्या राणीसारखे मराठे सरदार व संस्थानिक बंडांत सामील झाले. कारण इंग्रजांशीं राजनिष्ठ राहून देखील त्यांचीं संस्थानें पेनाच्या फटकाऱ्यानें गडप करण्यांत आलीं होतीं. पिढयानपिढया चाललेल्या राजनिष्ठेचें असें अपूर्व बक्षिस मिळाल्यामुळें, गेलेलें स्वराज्य परत मिळविण्याकरितां त्यांनीं हा बंडाचा अखेरचा फांसा टाकून पाहिला. रणांत स्वत्वासाठीं मृत्यु आला तर मोक्ष मिळेल, आणि यदाकदाचित् जय मिळाला तर इंग्रजांनीं अन्यायानें घशांत घातलेलें राज्य, हिंदुधर्माप्रमाणें दत्तक घेतलेला मुलगा हा मुलगाच नव्हे असें बेशरमपणानें

ठरवून, 'बेवारस' या पोकळ व फुसक्या सबबीखालीं खालसा केलेलें राज्य परत मिळेल, या भावनेनें झांशीच्या राणीनें बंडांत उडी घेतली !

सारांश, उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र या बंडाचा वणवा पेटला. तरी पण त्यांत भेदाभेद होताच. पंजाब, बहार, वायव्यप्रांत व मध्य हिंदुस्थानांतील संस्थानी प्रदेश, येथें इंग्रजांच्या देशी फौजेंतील शिपाई बिथरून त्यांनीं बंड केलें. मुसलमान व पुरभय्ये शिपाईच विशेषतः या बंडाळींत सामील झाले. सामान्य लोकांचें त्यांना मुळींच साहाय्य नव्हतें. त्यामुळें बंडखोरांना, आपल्या वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्यांचे हुकूम अमान्य करून त्यांच्यापैकीं सांपडतील तेवढयांचा बळी घेणें, तुरुंग मोकळे करून आंतील खुनी बेरडांना गांवांत लूटमार व अत्याचार करण्याची मुभा देणें, आणि प्रसंगविशेषीं आपण त्यांत सामील होणें, गांवांतील सरकारी खजिना लुटणें व त्याची वांटणी करून इंग्रजांची फौज आल्याची बाजारगप्प ऐकतांक्षणींच पलायनाचा अवलंब करणें, एवढेंच साध्य झालें. सामान्य जनतेच्या सहानुभूतीच्या अभावीं त्यांना अधिक कांहींच करतां येत नसे. योग्य नेता न लाभल्यामुळें त्यांना इंग्रजांना सुसंघटित विरोधही करतां आला नाहीं. राज्यक्रांतीचें ध्येयही त्यांच्या डोळयांपुढें नव्हतें. त्यामुळें आपण कां व कोणासाठीं लढावें हंदेखील त्यांना कळत नसे. इंग्रज आपली जात बाटविणार अशी अंधुक कल्पना असल्यामुळें, इंग्रजांना ठार करणें व खजिना लुटून आपला खिसा गरम करणें एवढेंच त्यांना ठाऊक होतें. त्यामुळें बंडखोरांनीं आठपंधरा दिवस धुमाकूळ घातला, तरी इंग्रजांनीं लीलेनें त्यांचा पराभव करून व त्यांना कडक शिक्षा देऊन पुन्हां लवकरच सर्वत्र स्थीरस्थावर केलें. थोड्याशा इंग्रजांचा व ख्रिस्ती धर्मानुयायी हिंदी लोकांचा मृत्यु, दारूगोळा व बंदुका यांचा नाश किंवा चोरी, शिलकी खजिन्याची लूट, आणि थोडीशी अस्वस्थता व काळजी, एवढीच काय ती कळ उत्तर हिंदुस्थांनातील बऱ्याच मोठ्या टापूंत इंग्रजांना सोसावी लागली. फारसे श्रम न करतांच थोड्या फार वेळांत इंग्रजांची सुसंघटित सत्ता पुनरपि तेथें स्थापन झाली. उत्तर हिंदुस्थानांतील बऱ्याच मोठ्या टापूंत झालेलें बंड केवळ इंग्रजांच्या फौजेंतील देशी शिपायांचेंच बंड होतें. गैरसमज, अनुकरण व अज्ञान हीं त्याचीं प्रमुख कारणें होतीं. त्यांतल्या त्यांत इंग्रजी राज्यांत दुर्लभ झालेली लूटमारीची संधीही त्यांना मिळाली. त्यांच्या गैरसमजाला अगदींच आधार नव्हता असें मात्र नाहीं. पिकल्याशिवाय विकत नाहीं हें खरें, परंतु पराचा कावळा झाला होता हेंदेखील तितकेंच खरें. आणि बंडखोरांना योग्य नेता न मिळाल्यामुळें व सामान्य जनता

बंडखोरांविषयीं उदासीनच नव्हे तर थोडीबहुत विरुद्ध असल्यामुळें, बंडाचा फारच सुलभतेनें मोड झाला. बंडाच्या पहिल्या धुमश्चक्रींत देखील हिंदी प्रजेच्या दयाळूपणानें व हिंदी नोकरांच्या स्वामिभक्तीमुळें अनेक इंग्रजांचे प्राण वांचले, व इंग्रजांची सत्ता पुनरपि प्रस्थापित होईतोंपर्यंत त्यांना व त्यांच्या बायकामुलांना लपून बसण्यास आसरा मिळाला, व केव्हां केव्हां स्थानांतर करून इंग्रजी फौजेचा आश्रयही घेतां आला.

परंतु दिल्ली, लखनौ, कानपूर व झांशी येथें इंग्रजांचें जुनें पाप आडवें आलें. दिल्लीचा बादशहा, औधचा नबाब, नानासाहेब पेशवे व राणी लक्ष्मीबाई यांच्याविषयीं इंग्रजांनीं जो अन्याय केला त्याचें प्रायश्चित्त त्यांना घ्यावें लागलें. दिल्ली, कानपूर, झांशी व लखनौ या टापूंत प्रजेची थोडीफार सहानुभूति बंडखोरांकडे वळली होती. शिपायांच्या बेदिलीचा पूर्ण फायदा करून घेणारे नेते बंडखोरांना मिळाले, किंबहुना शिपायांतील असंतोष त्यांनीं मूळ उत्पन्न केला नसला, तरी भडकविला खास होता. आपलें गेलेलें राज्य व वैभव परत मिळविण्याकरितां 'मारूं किंवा मरूं' या भावनेनें जिवावर उदार झालेले थोर पुरुष या प्रांतांत बंडखोरांना सामील झाले होते. त्यामुळें या टापूंत शिपायांच्या बंडाला उघड उघड राज्यक्रांतीचें स्वरूप प्राप्त झालें व इंग्रजांना त्याचा परिणाम भोगावा लागला. लॉर्ड डलहौसी साहेबांची गिळंकृत नीति लोक मुळींच विसरले नव्हते, आणि इंग्रजांच्या राजनीतिशास्त्रांत न्यायाचा आधार कितपत घेतला जातो हें लोक समजून चुकले होते. तेव्हां या टापूंत बंडाची आग भयंकर स्वरूपांत भडकली, आणि ती शमविण्याकरितां इंग्रजांना एक वर्षापेक्षां अधिक दिवस कां खर्च करावे लागले ही गोष्ट सहज समजून येण्यासारखी आहे. कारण हें शिपायांचें बंड नसून, ही या मर्यादित प्रदेशापुरती तरी राज्यक्रांति होती.

---

## प्रकरण १६ वें.

# बंडाच्या चतुःसीमा.

—:०:—

बंडाचा वणवा पेटला खरा, परंतु त्यांतही डावे उजवे प्रकार होतेच. दिल्ली शहर, कानपूर–लखनौचा सर्व टापू व झांशी आणि सभोंवतालचा बुंदेलखंड, या प्रांतांत बंडाला राज्यक्रांतीचें स्वरूप प्राप्त झालें. कारण कंपनीचें अन्यायी वर्तन

त्या टापूंतच विशेष प्रत्ययास आलें होतें. शिवाय नानासाहेब पेशवे व औधच्या बेगमेचा मुख्य सल्लागार मौलवी लिआकत हुसेन, हे दोन धोरणी व पराक्रमी नेते बंडवाल्यांना मिळाल्यामुळें त्यांची संघटना झाली, व इंग्रजांशीं त्यांना नेटानें तोंड देतां आलें. शिपायांच्या झालेल्या उत्तेजित मनोभावना यांना पुष्कळ दिवसांपासून ठाऊक झाल्या असून, त्यांनीं तो गैरसमज शांत न करतां वाढविलाच होता, व बंडखोर शिपायांना आंतील खुबी कळूं न देतां आपल्या कार्यास ओढून घेतलें. परधर्मी लोकांची एकनिष्ठपणें नोकरी करून अखेरीस स्वधर्मास मुकण्यापेक्षां, नबाबी व पेशवाई स्थापन होऊन आपण त्यांचे इमानदार सेवक व आधार बनणें अधिक इष्ट होय, असें शिपायांनाही वाटलें. याप्रमाणें दोघांचीही परभारें समजूत झाली, व दोघांनाही घडलेला प्रकार इष्टच वाटला. कंपनीच्या राज्यनीतीचें नागडें स्वरूप डलहौसीच्या कारकीर्दीत परिणतावस्थेस गेल्यामुळें, लोकांना तें पूर्णपणें कळून चुकलें. डलहौसीनें कंपनीच्या क्लाईवहेस्टिंग्जनें आंखलेल्या धोरणानुसारच राज्यकारभार केला. न्यायाच्या कल्पना विलायतेस पेटींत बंद करून ठेवूनच कंपनीचे अधिकारी हिंदुस्थानांत येत असत, व त्यामुळें देशी राज्यें कोणत्या तरी सबबीखालीं गट्ट करून हिंदुस्थानाला तांबडा रंग फासणें त्यांना शक्य होई. पूर्वी या गोष्टी पचल्या, व कंपनीचें वर्तन सावधगिरीचें असल्यामुळें झालेले अन्याय लोकांच्या डोळयांवर फारसे येत नसत. परंतु पायंडा जुना असला तरी डलहौसीचा कुंचला इतक्या जोरानें फिरला कीं, हिंदी लोक झोंपेंतून खाडकन् जागे झाले, व सभोंवतीं पाहूं लागले. इंग्रजांच्या सुदैवानें ही जागृती फारच अल्प प्रमाणांत व मर्यादित स्वरूपाची होती. कारण पंजाब व सातारा या राज्यांवर डलहौसीनें जे वार केले, त्यांची चर्चा उत्तर हिंदुस्थानांत चालू झाली. आज जो प्रसंग त्यांच्यावर आला तोच उद्यां दुर्दैवानें आपल्यावर येईल, असें लोकांना वाटूं लागलें. इंग्रजांच्या सुदैवानें पंजाब व सातारा प्रांतांत इतर अनेक कारणांनीं–ज्यांचा वेळोवेळीं वर उल्लेख केला आहे-या वेळीं म्हणण्यासारखें बंड झालें नाहीं हें खरें. परंतु त्यामुळें तेथील लोकांना या अन्यायाची चीड आली नाहीं असा युक्तिवाद करणें चुकीचें ठरेल. औध खालसा झाल्यावर तेथील रहिवाशी व जमीनदार, पंजाब, सातारा, झांशी, नागपूर इकडे घडलेल्या स्थित्यंतराचा विचार करूं लागले, तेव्हां इंग्रजांचा अन्याय त्यांना अधिकच हिडिस दिसूं लागला. त्यामुळें इंग्रजांवर कोणाचाच विश्वास उरला नाहीं. ते कोणत्या वेळीं काय करतील असें सर्वांना भय पडलें. केच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, ( Vol. V, page 282 ) The real cause of

the mutiny may Be expressed in a condensed form in two words 'Bad faith'. बंडाचें मूळ कारण म्हणजे इंग्रजांवरील लोकांचा विश्वास साफ उडाला होता हें होय.

त्यामुळें इंग्रजांच्या जाहीरनाम्यांवर व आणाशपथांवर कोणाचा विश्वास बसेना. तुम्हाला बाटवावयाचा आमचा विचार नाहीं, असें इंग्रजांनीं जीव तोडून सांगितलें तरी लोक तें खरें मानीनात. 'लांडगा आला रे आला' असें खोटेंच ओरडणाऱ्या शेतकऱ्याच्या पोरासारखीच इंग्रजांची स्थिति झाली, व ते खरें बोलले तरी लोकांना त्यांत कपट दिसूं लागलें. यामुळें स्वधर्मासाठीं लढणाऱ्या शिपायाबद्दल व स्वराज्यासाठीं यज्ञांत उडी घालणाऱ्या नेत्यांबद्दल लोकांना सहानुभूति वाटूं लागली. या उसळलेल्या लाटेंतच दिल्ली येथें शिपायांच्या प्रेरणेनें व त्यांच्या मदतीनें बादशाही स्थापन झाली, परंतु झांशीच्या राणीनें आपल्या पराक्रमानें झांशीचें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें, व बुंदेलखंडांत पूर्ववत् स्वराज्य स्थापून राज्यक्रांति घडवून आणली. दिल्लीची बादशाही औट महिने टिकली असली, तरी बुंदेलखंडांतील छोटेंसें स्वराज्य इंग्रजी सत्तेला न जुमानतां एक वर्षभर सुरळीत चाललें होतें.

उत्तरहिंदुस्थानांत या वेळीं इतरत्रही बंडाळी माजली, व इंग्रजांच्या फौजेंतील देशी शिपाई त्यांत सामील झाले. परंतु बंडवाल्यांना मुत्सद्दी व राजकारणी नेते मिळाले नाहींत. त्यामुळें पहिल्या धडाक्यांत दहा पांच इंग्रज ठार मारून व उरलेल्यांना पळवून बंडवाल्या शिपायांनीं लूटमार करून कचेऱ्या व खजिने आपल्या ताब्यांत घेतले असले, तरी ती बंडाळीच ठरली; आणि कित्येक ठिकाणीं ताबडतोब, तर कित्येक ठिकाणीं थोड्या काळानें—राज्यक्रांतीचा मोड करून इंग्रजी फौज मोकळी होऊन तेथें येतांच—स्थीरस्थावर होऊन इंग्रजी राज्य पुन्हां पूर्ववत् चालू झालें. बंगाल, पंजाब, बिहार, बनारस या टापूंतील अधिकारी चतुर व कर्तबगार असल्यामुळें आणि फौजेची कुमक योग्य वेळीं त्यांना झाल्यामुळें व पुढेंही वाटेल तितकी अधिक फौज तेथें जरूर लागल्यास धांवून येण्याचा उघड संभव दिसत असल्यामुळें, बंडाळी झाली, आणि ती मोडली, व बंडखोर शिपायांची पांगापांग होऊन ते दिल्ली किंवा लखनौस निघून गेले. इतर कांहीं टापूंत नरसिंगपूर, सागर, महू वगैरे मुख्य मुख्य ठाणीं कंपनीच्या हातीं होतीं, व बंडवाल्यांचें तेथें कांहीं चालेना. ते तेथें आले म्हणजे तेथील मूठभर इंग्रजांच्या हातून

त्यांना खरपूस मार खाऊन पळावें लागे, व भोंवतालच्या खेड्यापाड्यांत मग ते आपलें शौर्य गाजवीत व राज्य चालवीत. आपलीं ठाणीं सोडून त्यांचा पाठलाग करण्याची व त्यांचें समूळ निर्दालन करण्याची शक्ति त्या मोजक्या मूठभर इंग्रजांत नसे. यामुळें राज्य कंपनीचें परंतु त्यांत बंडवाल्यांचें लुटारू पेंढार मोकळें सुटलेलें, अशी दुहाती राज्यपद्धतीचीअव्यवस्था या टापूंत माजली होती. कारण या अधिकाऱ्यांना बरेच दिवस आपल्या अल्प बळावरच वेळ निभवावी लागली. इंग्रजी फौज दुसऱ्या महत्वाच्या कामांत गुंतली असल्यामुळें त्यांना सात आठ महीने दुसरीकडून कुमक येऊं शकली नाहीं. परंतु या बहादूरांनीं तशा प्रतिकूल परिस्थितींत न डगमगतां आपलें आसन धैर्यानें स्थिर ठेवलें, व बंडाची लाट दक्षिणेंत जाऊं दिली नाहीं. कंपनीच्या सर्वभक्षक राजनीतीला न जुमानतां देखोल उत्तरहिंदुस्थानांत बरींच संस्थानें उरलेलीं होतीं. मध्यहिंदुस्थान व राजपुताना या टापूंतील विस्तीर्ण संस्थानी मुलुख प्रायः इंग्रजांशीं राजनिष्ठच राहिला. यांपैकीं बऱ्याच संस्थानांत, कंपनीची तैनाती फौज होती. त्या फौजेचा खर्च संस्थानांच्या माथीं असला, तरी हुकमत कंपनीची होती, व फौजेवरील अधिकारी इंग्रज होते. या तैनाती फौजेंतील देशी शिपायांच्या पलटणी बिथरून, त्यांनीं बंडाळी आरंभिली. परंतु संस्थानिक स्वतां इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिल्यामुळें, या फौजेच्या हातून बंडाळी माजविण्यापलीकडे अधिक कार्यभाग झाला नाहीं. खुद्द संस्थानिकांची जी खासगी फौज होती, तिच्या मनांत पुष्कळ वेळां बंडवाल्या शिपायांशीं सहानुभूति असे. परंतु आपल्या राजाविरुद्ध हत्यार उचलण्यास ती तयार नसे. त्यामुळें राजेरजवाड्यांचें साहाय्य कंपनीला लाभलें व कंपनीची तैनाती फौज उलटली तरी खासगी संस्थानी फौज इंग्रजांच्या कामीं पडली, व आपल्या मालकांच्या हुकमाान्वयें कंपनीतर्फेनें या फौजेनें बंडवाल्यांशीं सामना दिला, व त्यांचा मोड केला. कांहीं ठिकाणीं संस्थानी फौज केवळ तटस्थ राहिली. तिनें बंडवाल्यांना साहाय्य केलें नसलें, तरी कंपनीलाही साहाय्य केलें नाहीं. यामुळें कंपनीच्या राज्याला या संस्थानी प्रदेशानें फारच मोठा पाठिंबा दिला. उत्तर व दक्षिण हिंदुस्थान यामध्यें हा संस्थानी तटस्थ किंवा सहाय्यक बांध असल्यामुळें, बंडाची लाट दक्षिणेस जाऊं शकली नाहीं. औंध व बुंदेलखंडांतील लहान लहान जमीनदार मात्र बंडांत सामील झाले. कारण थामसनसाहेबांच्या बंदोबस्ती अमलानें त्यांच्या जहागिरीवरच धाड आणली होती. बाणपूरचा राजा, जगदीशपूरचा कुंअरसिंह, अमेथीचे माधवसिंग, वगैरे राजे म्हणविणारे जमीनदार या बंडांत सामील झाले होते. बांद्याचे नबाब

प्रथम इंग्रजांना अनुकूल होते. परंतु पुढें त्यांची फौज उलटली, व त्यांचीच फौजेवर हुकमत चालेना, तेव्हां निरुपायानें ते बंडवाल्यांना सामील झाले. कदाचित्, 'दही खाऊं कीं मही खाऊं' असें दुटप्पी धोरण त्यांनीं ठेवलें असेल किंवा तसा त्यांचा विचार असेल. बंडवाले यदा कदाचित् जिंकले तर आपण आपली फौज त्यांच्या मदतीला दिली होती, म्हणून यशाचे वांटेकरी होण्यास तयार! बरें कंपनीनें बंडवाल्यांचा अपेक्षेप्रमाणें मोड केला, तर आपली फौज बिथरलीअसून देखील त्या कठीण प्रसंगांत जीवावर उदार होऊन आपण कंपनीशीं राजनिष्ठ राहिलों, अशी प्रौढी मारावयास हरकत नाहीं. चित्रकूटच्या बाळराजावर तर केवळ लुटीच्या लोभानें बंडांत सामील झाल्याचा आळ आणला गेला. संस्थानिकांच्या या अनुपम राजनिष्ठेमुळें, खास कंपनीच्या अमलांतील प्रदेशापेक्षां या विस्तीर्ण संस्थानी टापूंत बंडवाल्या शिपायांनीं दंगल केली तरी ती फारच सौम्य स्वरूपाची ठरली.

विंध्याद्री व नर्मदा उतरून खालीं आल्यावर मात्र सर्वत्र शांत होतें. त्या वेळीं रेलवेचें जाळें पसरलें नसल्यामुळें विंध्याद्रीचा कोट व नर्मदेचा खंदक या नैसर्गिक साधनांनीं दक्षिणचें रक्षण झालें, व बंडवाले खालीं येऊं शकले नाहींत. हैद्राबादेस एक दिवस, नागपूर, चांदा येथें एक दोन दिवस, बेळगांव, कोल्हापूर, सोलापूर, व नरगुंद येथें दोन चार दिवस, नाहीं म्हणावयास पांचपन्नास लोकांनीं दंगल केली, नाहीं असें नाहीं. इंग्रज इतिहासकारांनीं व दक्षिणेंतील इंग्रज अधिकाऱ्यांनीं आपल्या पराक्रमाला खुलावट देण्याकरितां त्या दंगलीचें फुगावट वर्णन केलें आहे. परंतु दक्षिणेंत झालेल्या या गलक्याला ' क्रांति, बंड ' असलें भपकेदार नांव देण्यापेक्षां, दंगा हें साधें नांव देणें अधिक शोभेल. असले लहानमोठे दंगे प्रसंगविशेषीं कांहीं तरी निमित्तानें होतातच. दक्षिणेंत जर खरेंच बंड उद्भवलें असतें, तर मुंबई व मद्रास इलाख्यांतील बहुतेक सर्व पलटणी उत्तरेस बंड मोडण्याकरितां कशा जाऊं शकल्या असत्या? मद्रास इलाख्यांतील फौज प्रथम कलकत्त्यास जाऊन, नतर तेथून काशी-प्रयाग मार्गानें कानपूर-लखनौवर चालून गेली, आणि मुंबई इलाख्यांतील फौज प्रथम औरंगाबादमार्गें महूस जाऊन, नंतर तेथून सागर-झांशी-काल्पीवर चालून गेली. याप्रमाणें मुंबई व मद्रास इलाख्यांतील फौजा उत्तरेकडील बंड मोडावयास उपयोगी पडल्या. याचें कारण एकच—दक्षिण शांत व थंड होती.

बंडाची व्याप्ति व बंडाचें त्रिविध स्वरूप लक्षांत घेतल्यानंतर, कालानुक्रमाचा विचार करूं. मंगलपांडेचें धाडस सोडून दिलें, तर बंडाला खरी सुरवात मीरत येथें ता. १० मे १८५७ रोजीं झाली, व मीरत येथील बंडखोरांनीं स्वतांच ही लाट ता. ११ मे रोजीं दिल्लीस पोहोंचविली. बंडखोरांनीं ही घिसाडघाई केली खरी, व ठरलेली ३१ मे उजाडूं दिली नाहीं. परंतु त्यामुळें दिल्ली शहर अचानक बंडवाल्यांच्या हातीं पडलें, व मोंगल बादशाहीची तेथें पुन्हां स्थापना झाली. हें ऐकून निरनिराळ्या छावण्यांतील शिपाई बंडांत सामील होऊं लागले. पूर्वीं ठरल्याप्रमाणें ३१ मेपर्यंत वाट पाहण्याची आवश्यकता त्यांना अर्थातच उरली नाहीं. बंडाच्या फैलावाचा कालानुक्रम खालीं दिला आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| फिरोजपूर | १३ मे | फैजाबाद | ७ जून |
| मुजफरनगर | ,, ,, | जालंदर | ,, ,, |
| मुरादाबाद | १९ ,, | लुधियाना | ८ ,, |
| अलीगड | २० ,, | फिलुर | ,, ,, |
| नौशाहरा | २१ ,, | ललितपूर | १२ ,, |
| बुलंदशायर | २१ ,, | बांदा | १४ ,, |
| मैनपुरी | २२ ,, | ग्वालेर | ,, ,, |
| इटावा | २३ ,, | फतेगड | १८ ,, |
| नशीराबाद | २८ ,, | इंदूर | १ जुलै |
| लखनौ | ३० ,, | मह्व | ,, |
| मथुरा | ३० ,, | सागर | ,, |
| बरेली | ३१ ,, | धार | ,, |
| शहाजहानपूर | ३१ ,, | आग्रा | ४ ,, |
| बुडाऊन | १ जून | झेलम | ७ ,, |
| अझमगड | ३ ,, | सिआलकोट | ९ ,, |
| नीमच | ,, ,, | दानापूर | २५ ,, |
| शहारहानपूर | ३ ,, | रांची | ३१ ,, |
| सीतापूर | ,, ,, | नसीराबाद | १० आगष्ट |
| बनारस | ४ ,, | नागोड | २७ ,, |
| कानपूर | ,, ,, | जबलपूर | १८ सप्टेंबर |
| जौनपूर | ५ ,, | कोटा | १५ आक्टोबर |
| अलाहाबाद | ६ ,, | जलपैगुरी | ५ डिसेंबर |
| झांशी | ,, ,, | | |

वर दिलेल्या कालानुक्रमावरून असें दिसून येईल कीं १८५७ साल संपेपर्यंत ाव्या नव्या ठिकाणीं बंडाची आग पसरत होती. परंतु १६ जुलै रोजींच नाना-ाहेब पेशव्यांचा पराभव करून इंग्रजांनीं कानपूर शहर आपल्या ताब्यांत ातलें होतें. सप्टेंबर २० तारखेला दिल्ली इंग्रजांच्या हातीं लागली, आणि पुढें ोंगल बादशहाही त्यांचा कैदी झाला; आणि लखनौ शहर इंग्रजांच्या हातीं १८५७ ाल अखेर आलें नसलें, तरी २५ सप्टेंबर रोजीं हावेलाकनें बंडवाल्यांची मोठ्या शौर्यानें फळी फोडून, लखनौच्या वेढ्यांत सांपडलेल्या इंग्रजांना कुमक पोहोंचविली होती. नव्हेंबर महिन्यांत तर सर कालिन क्यांबेलनें लखनौ येथील अलमबागेंत आपलें ठाणें स्थापन करून बंडवाल्यांची कंबरच मोडली. १८५७ सालाची अखेर होण्यापूर्वी इंग्रजांच्या व बंडवाल्यांच्या खालील महत्वाच्या लढाया झाल्या होत्या.

| | | | |
|---|---|---|---|
| हींडन नदी | ३० मे | जगदीशपुर | १२ आगष्ट |
| गाझीउद्दीन नगर | ३१ मे | ब्रम्हावर्त | १६ ,, |
| बादली की सराई | ८ जून | नजफगड | २५ ,, |
| ससीया | ५ जुलै | मंगळवार | २१ सप्टेंबर |
| त्रिमू घाट | ११ ,, | आग्रा | १० आक्टोबर |
| फतेपूर | १२ ,, | धार | २२ ,, |
| पांडू नदी | १५ ,, | काजवा | १ नव्हेंबर |
| कानपूर | १६ ,, | कर्नूल | १६ ,, |
| उनाव | २९ ,, | कानपूर | २७ ,, |
| आरा | ३ आगष्ट | ,, | ६ डिसेंबर |
| बशीरतगंज | ४ व १२,, | करोली | २७ ,, |

याप्रमाणें बंडाची आग एकीकडे पसरत असतां, इंग्रज बंडाचीं मुख्य केंद्रें भरडून काढीत होते. त्यामुळें बंडाची हकीगत देतांना कालानुक्रम पाळला तर सुसंगती नीट लागणार नाहीं, व वाचकांचा घोटाळा उडेल. कारण एकाच महिन्यांत अनेक प्रांतांत आग भडकलेली असे, व कोठें इंग्रजांचा जय तर कोठें बंडाला नवीन सुरवात अशी स्थिती दृष्टीस पडे. तेव्हां प्रांतवार उडालेल्या बंडाळीची कथा एकत्र गुंफून ती वाचकांच्या पुढें ठेवली आहे. **बंडवाल्या शिपायांनीं आपले गोरे अधिकारी कत्तल केले, व तुरुंग मोकळे करून कैदी**

**सोडले. खजीना लुटला व इंग्रजांनीं सावध होऊन पाठलाग सुरू करतांच दिल्लीची वाट धरली, किंवा रानोमाळ भटकत पळाले.** हीच कायम ठशाची कहाणी सर्वत्र वाचावयास मिळेल. प्रांतवार उडालेल्या बंडाळीचा थोडक्यांत विचार करून, कानपूर, लखनौ, व झांशी हीं प्रकरणें पुढें विस्तारानें लिहिलीं आहेत. मीरतला बंडाची पहिली ठिणगी पडली असली, तरी खरी आग दिल्लीपासूनच पुढें भडकली. यामुळें दिल्लीचें प्रकरण यापूर्वीच आलें आहे. प्रांतवार बंडाळीचा प्रथम विचार केल्यानंतर परत दिल्लीस जावें लागेल. कारण दिल्ली शहर इंग्रजांनीं काबीज केल्यानंतरच मोंगलबादशाही कायमची मोडली, व बंडवाल्यांचा आधार तुटून त्यांची पांगापांग झाली व पुढें त्यांचा मोड झाला. कानपूर ( कानपूर दिल्लीपूर्वी इंग्रजांच्या हातीं लागलें असलें तरी तें परत बंडवाल्यांच्या हातीं गेलें होतें. ) दुसऱ्यांदा दिल्लीनंतरच इंग्रजांच्या हातीं लागलें. लखनौ व झांशीचा मोड त्यानंतर झाला. त्यांतल्या त्यांत लखनौ व झांशी हीं दोन्ही ठिकाणें इंग्रजांच्या हातीं लागावयास **१८५८ साल उजाडून कांहीं दिवस लोटावे लागले.** महाराष्ट्राच्या दृष्टीनें कानपूर व झांशी या दोन्ही रणक्षेत्रांचें विशेष महत्व आहे. कारण येथील बडाचे पुढारी महाराष्ट्रीयच होते. झांशी पडली तरी बंडाचा मोड झाला नाहीं, कारण झांशीची रणशूर राणी जीवंत होती. ग्वालेरच्या रणांगणांत राणीनें आपल्या प्राणांचें विसर्जन केल्यानंतरच ( ता. १८ जून १८५८ ) बंडाचा प्राणदीप मालवला. तरी पण त्यानंतरही जगदीशपूरचा कुवरसिंह व कानपूरच्या तात्या टोपी, गनीमी काव्याचा अंगिकार करून सहा महिन्यांपेक्षां अधिक दिवस इंग्रजांना झुलवीत होते. ७ एप्रील १८५९ रोजीं तात्या टोपीला इंग्रजांनीं पकडलें, तेव्हांच बंडाचा खरा शेवट झाला असें म्हणतां येईल.

८ एप्रील १८५७ रोजीं मंगलपांडे फाशीं गेला व ७ एप्रील १८५९ रोजीं तात्या टोपी इंग्रजांना सांपडला. बंडाची ही कमाल कालमर्यादा दोन वर्षांची होते. परंतु बंडाची खरी धामधूम १० मे १८५७ ला मीरतच्या दंग्यापासून तों १८ जून १८५८ रोजीं ग्वालेर येथें बंडवाल्यांचा पूर्ण पराभव होऊन झांशीच्या राणीच्या मृत्यूपर्यंतच चालली. हिंदुस्थानांतील बंडाची ही रूपरेषा लक्षांत ठेवूनच पुढील प्रकरणांचे विभाग पाडले आहेत. प्रत्येक प्रांताची हकीगत देतांना तात्पुरता थोडासा कालानुक्रम सुटेल, परंतु मध्यवर्ती कथेचें अनुसंधान सुटणार नाहीं. उत्तरहिंदुस्थानातील बहुसंख्याक प्रजाजन महाराष्ट्रीय

नसतांनाही, बंडाचें पुढारीपण महाराष्ट्रीय शूर व्यक्तींकडे आलें होतें, व त्यांच्या शर्थीच्या पराक्रमामुळें बंडाचा शेवट लवकर लागला नाहीं. त्यामुळें ह्या बंडाचा खरा इतिहास जाणण्याविषयीं महाराष्ट्रीयांत-प्रत्यक्ष महाराष्ट्रांत त्या वेळीं बंडाच्या ज्वाळा न पेटतांही-कुतूहल आहे, आणि मराठी वाचकांची ही सहजोद्भव इच्छा तृप्त करण्याकरितां शक्य तितक्या सुसंगत रीतीनें, उत्तर हिंदुस्थानभर पसरलेल्या या बंडाची हकीगत—प्रसंगीं कालानुक्रमाकडे थोडेंसें तात्पुरतें दुर्लक्ष करून—दिली आहे. परंतु हा सांधा संधी येतांच पुन्हां जोडून घेतला असल्यामुळें वाचकांचा कालानुक्रम चुकणार नाहीं, व एकंदर बंडाची सुत्रसंबद्ध उठावणी त्यांच्या ध्यानांत येईल, अशी उमेद आहे.

---

प्रकरण १७ वें.

## पंजाब प्रकरण.



त्या वेळीं इंग्रजी सत्तेचा नायनाट व्हावा असें सर्वांना वाटत होतें. त्याकरितां बहुतेकांचें रक्त उसळत होतें. गमाविलेली स्वतंत्रता पुन्हा प्राप्त व्हावी म्हणून प्रत्येकजण उत्साहित झाला होता. बहुधा प्रत्येक ठिकाणीं इंग्रजांविरुद्ध बंड करण्याची प्रवृत्ति दिसून येत होती, आणि बंडाच्या गटारगप्पांनीं त्यांना उत्तेजन मिळत होतें. पण पंजाबांत मात्र शांतता नांदत होती. पंजाबांतले नाणावलेले शूर शीख अगदीं गप्प बसले होते. त्यांची इच्छा पुन्हा मुसलमानी अंमल सुरू व्हावा अशी नव्हती. कारण मुसलमान बादशहांनीं केलेला त्यांचा छळ ते विसरले नव्हते आणि बंडखोर तर बहादुरशहाला दिल्लीच्या तख्तावर बसविण्याची खटपट करीत होते. त्यामुळें बंडखोरांशीं शिखांचें पटणें शक्य नव्हतें. पंजाबांतल्या उत्तर भागांत राहणाऱ्या अफगाणांचेंही शिखांशीं सूत नव्हतें. पण त्यांना आपसांतील भांडणामुळें दुसरीकडे लक्ष द्यावयाला फावतच नव्हतें. कित्येक शीख शिपायांचीं हत्यारें काढून घेण्यांत आलीं होतीं, पण यामुळें त्यांना आनंदच झाला. बरेच दिवस पडीत असलेल्या जमिनीची मशागत करून चांगलीं पिकें काढण्याच्या खटपटींत ते मग्न होते. यामुळें त्यांना दुसरीकडे कोठें काय चाललें आहे याची पर्वा वाटत नव्हती.

त्या वेळीं लाहोरच्या किल्ल्यांत एक गोरी पलटण व एक देशी पलटण असे. किल्ल्यापासून सहा मैल अंतरावर फौजेची मुख्य छावणी होती. तेथें देशी पायदळाच्या तीन तुकड्या, घोडदळाची एक तुकडी, गोऱ्या शिपायांची एक तुकडी व कांहीं गोलंदाज इतकें सैन्य होतें. या फौजेंत काळ्या गोऱ्यांचें प्रमाण एका गोऱ्या शिपायाला चार काळे असें होतें. देशी शिपायांत मुसलमान व पुरभय्यांचा मुख्य भरणा होता. पंजाबांत त्या वेळीं चीफ कमिशनर रहात असे. बंडाच्या धामधुमीच्या काळांत सर जॉन लारेन्स हा पंजाबचा चीफ कमिशनर होता. पण तो तेव्हां लाहोरास रहात नसून रावळपिंडीस असे. त्याच्या गैर-हजेरींत राबर्ट मांटगामरी साहेब त्याचें काम पाही.

मे महिन्याच्या अकरा तारखेला मीरतच्या बातम्या तेथें हळुहळू येऊं लागल्या. यानंतर लवकरच दिल्लीच्या दुर्घटनांनीं पंजाबांतील गोऱ्या लोकांचीं अंतःकरणें हालवून सोडिलीं. दिल्लीला बंडखोरांनीं गोऱ्या लोकांवर अनेक अत्याचार केले. त्यांचीं फुगवलेलीं वर्णनें ऐकून सर जॉन लारेन्स अगदीं चिडून गेला. यावेळीं बंड-खोरांच्या प्रतिकाराकरितां कांहींतरी करावयाला हवें म्हणून तो अनारकली मुक्कामीं आला, आणि तेथें प्रांतांतल्या निरनिराळ्या अधिकाऱ्यांना एकत्र बोलावून त्यांच्याशीं प्रस्तुत प्रश्नाची वाटाघाट करूं लागला. या अधिकाऱ्यांच्या बैठकींत असें ठरलें कीं काळ्या शिपायांचीं हत्यारें काढून घ्यावीं, व लाहोरच्या किल्ल्यांतील गोऱ्या सैनिकांची संख्या वाढवावी. हा ठराव एकमतानें पास झाला असल्यामुळें, मांटगामरी साहेब स्वतः एका फौजेंतील अधिकाऱ्याला बरोबर घेऊन मियामा-रच्या छावणींत गेला. पण त्याच वेळीं त्याला एका भयंकर कटाचा पत्ता लागला.

किल्ल्यावर ज्या शिपायांचा पहारा असे, त्या शिपायांची पाळी १५ तारखेपर्यंत होती. पंधरा तारखेला नवी तुकडी किल्ल्यावर पहारा करावयाला येणार होती. या दोन्ही तुकड्यांच्या शिपायांनीं असा कट केला होता कीं, पहारा बदलते वेळीं दोन्ही तुकड्यांनीं एकत्र होऊन इंग्रजांवर तुटून पडावयाचें आणि खजीना व दारू-गोळा लुटावयाचा. त्यानंतर तुरुंग तोडून कैद्यांना मोकळे सोडावयाचें आणि सर्वांनीं मिळून इंग्रजांना कापून काढावयाचें. शिपायांच्या या कटाची ठिणगी धुमसत धुमसत फिरोजपूर, फिलोर, जालंदर अशी जातांजातां अमृतसरापर्यंत पोहोंचली. या कटाचा सुगावा दोघा इंग्रज शिपायांना लागला. त्यांनीं त्याची जाणीव अधिकाऱ्यांना करून दिली. परंतु अधिकाऱ्यांना ही गोष्ट खरी वाटेना. त्यांना वाटे कीं आतांपर्यंत

प्रत्येक लढाईत हेच शिपाई आमच्या तर्फे इमानें इतबारें लढले, यांच्याच मदतीनें हिंदु, मुसलमान, शीख इत्यादिकांना आम्हीं लोळविलें आणि हे सर्व जण एकाएकीं असे कसे बिथरतील ? त्यांना बिथरावयाला कांहीं विशेष कारणही झालेलें नाहीं. बंडाच्या मीरत, दिल्ली इत्यादि ठिकाणांहून येत असलेल्या बातम्यांमुळें कांहीं शिपाई फार तर अस्वस्थ झाले असतील. होतां होतां ही बातमी मांटगामरी साहेबाच्या कानावर गेली. त्यानें ब्रिगेडियरचा सल्ला घेतला आणि असें ठरविलें कीं सर्व हिंदी शिपायांना एकदम निःशस्त्र करावें. ता. १३ ला सर्व शिपायांना परेडवर हजर राहण्याचा हुकूम सुटला. तारीख १२ ला रात्रीं सर्व साहेब एका ठिकाणीं जमले आणि त्यांचे तेथें नेहमींप्रमाणें खानपान, नाच इत्यादि सर्व प्रकार यथास्थितपणें आणि मोठ्या थाटानें झाले. देशी शिपाई हे सर्व प्रकार मुकाट्यानें पहात होते. त्यांनीं कटच केला होता, तर त्यांनीं इंग्रजांचा हा नाचरंग चालू असतांच त्यांच्यावर तुटून पडावयाला हवें होतें. मग त्यांनीं तसें कां केलें नाहीं ? तसें करण्याचें धैर्य त्यांना नव्हतें, का कटवाल्या पुढाऱ्यांचा तसा त्यांना हुकूम नव्हता ? काय कारण होतें तें त्यांचें त्यांनाच ठाऊक. त्यांनीं त्या दिवशीं इंग्रजांच्या रंगाचा भंग केला नाहीं एवढें मात्र खरें.

ता. १३ मे रोजीं सकाळीं हुकुमाप्रमाणें सर्व शिपाई परेडवर हजर झाले. त्या वेळीं त्यांच्यापुढें बंदुकी भरून सज्ज असलेले गोरे शिपाई उभे राहिले, आणि तोफांचे मोर्चे बांधले गेले. नंतर त्यांना शस्त्रें खालीं ठेवण्याचा हुकूम झाला. देशी सैनिकांनीं त्याप्रमाणें आपापलीं हत्यारें खालीं ठेविलीं. याप्रमाणें नुसत्या सहाशें गोऱ्या शिपायांनीं २५०० देशी सैनिकांना क्षणभरांत निःशस्त्र केलें. शिपाई नंतर हिरमुसले होऊन आपापल्या घरीं परत गेले.

किल्ल्याच्या पहाऱ्यावर त्या वेळीं २६ वी देशी पलटण होती. तिचा पहारा पंधरा मेला संपत होता. तिला कोणत्याही प्रकारची गडबड करावयाला वाव मिळूं नये म्हणून, ता. १४ ला सकाळीं ८१ व्या गोऱ्या पलटणीचे शिपाई किल्ल्यांत एकाएकीं आले. हें आहे तरी काय ? असें आश्चर्य करीत देशी शिपाई ताडकन उभे राहिले. तोंच कर्नल स्मिथनें हुकूम दिला कीं तुम्ही शस्त्रें खालीं ठेवा. देशी शिपायांना निमूटपणें हुकुमाप्रमाणें वागण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. कारण थोडीही गडबड केली तरी प्राण घ्यावयाला ८१ वी पलटण शस्त्र

उगारून तयारच होती. याप्रमाणें मांटगामरीच्या कुशलतेनें लाहोरला कांहींएक गडबड न होतां शिपाई निःशस्त्र झाले आणि पुनः पूर्ववत् शांतता झाली.

मांटगामरी साहेबानें अमृतसरच्या अधिकाऱ्याला कळविलें कीं, प्रसंग बिकट आहे; म्हणून तुम्ही मुकाट्यानें देशी शिपायांवर सक्त नजर ठेवा. तेथील डेप्युटी कमिशनर कूपर या आज्ञेबरहुकूम वागूं लागला. इतक्यांत शहरांत अशी गप्पा उठली कीं लाहोरास निःशस्त्र बनविलेले शिपाई मोठ्या जमावानें अमृतसराकडे येत आहेत, आणि त्यांचा विचार गोविंदगडावर चाल करण्याचा आहे. असें ऐकतांच कूपरसाहेब आपल्या अत्यंत विश्वासांतल्या कांहीं शीख शिपायांना बरोबर घेऊन स्वतः किल्ल्याच्या दरवाजावर पहारा करूं लागला. इकडे त्यांचा सहकारी दुय्यम कमिशनर मेकिनटनसाहेब जवळपासच्या गांवगल्ल्यांतून हिंडून लोकांना परिस्थितीची जाणीव करून देऊं लागला. त्याच्या प्रोत्साहनानें लोक काठ्या, लाठ्या, भाला, बर्ची इत्यादि हत्यारें घेऊन तयार झाले आणि मॅकिन-टनसाहेबाबरोबर अमृतसरचा रस्ता रोखून उभे राहिले. परंतु ही बंडखोरांविष-यींची भीति फोल ठरली. कारण बंडखोर तर आले नाहींतच, परंतु त्यांच्या ऐवजीं लाहोराहून पाठविलेलें गोरें दळ मात्र अमृतसरकरांच्या मदतीला आलें. पुढें अमृतसरला पळून आलेल्या शिपायांची कूपरनें कशी भयंकर दुर्दशा केली, याचें भीषण चित्र अत्याचार-कांडांत रेखाटलें आहे.

या दोन स्थानांशिवाय इतर ठिकाणींही शांतताभंग होण्याचा संभव होता. विशेषतः फिरोजपूर आणि फिलोर येथील अधिकाऱ्यांना आपल्या शिपायांचा जबर संशय आला होता. म्हणून ते शांतताभंग न होऊं देण्याकरितां काय करावें काय न करावें, अशा विवंचनेंत होते. अकरा मेच्या रात्रीं फिरोजपुरला एक जासूद आला. त्यानें मीरत आणि दिल्लीच्या बातम्या आणल्या होत्या. येतांना तो लाहोरा-वरून आला असल्यानें तेथील हालचालीचीही त्याला थोडी फार कल्पना होती. फिरोजपूरचा अधिकारी ब्रिगेडियर ईनसन यानें जेव्हां दिल्ली आणि मीर-तची वार्ता ऐकली आणि नंतर लवकरच लाहोरची बातमी त्याला कळली, तेव्हां त्यानें आपल्या शिपायांची परीक्षा घेण्याचें ठरविलें. त्याकरितां त्यानें सर्व शिपायांना परेडवर बोलाविलें. असें करण्यांत त्याचा हेतु, शिपायांच्या चेहऱ्यामोहऱ्यावरून त्यांच्या अंतःकरणाचा ठाव लावावा असा होता. शिपायांच्या अंतःकरणांत चाल-लेल्या खळबळीचें प्रतिबिंब शिपायांच्या चेहेरेपट्टींत स्पष्ट उमटलें होतें कीं काय

नकळे ! पण या निरीक्षणानें साहेबाचें समाधान झालें नाहीं, एवढें मात्र खरें ! या निरीक्षणाचा परिणाम असा झाला कीं, त्याच्या मनांतील या शिपायांबद्दल राहिलासाहिलेला विश्वासही पार उडाला. तेव्हां त्यानें सेनेच्या अधिकारीवर्गाशीं शिपायांना निःशस्त्र करण्यासंबंधीं बरेंच खलबत केलें. पण त्यांत सर्वांचें एकमत होत नाहीं असें पाहून त्यानें दुसरीच एक टूम काढिली. त्यानें असें ठरविलें कीं, दुसऱ्या दिवशीं सकाळपासून फिरोजपुरांत असलेले गोरे आणि काळे सैनिक यांनीं वेगवेगळया ठिकाणीं रहावें.

फिरोजपूरच्या अस्त्रागारांत दारुगोळा विपुल होता. म्हणूनच त्या अस्त्रागाराचें रक्षण कसोशीनें होत असे. त्याकरितां कोठारावर ५७ व्या पलटणीचे बरेचसे शिपाई पहारा देत असत. आतां देशी शिपायांवरचा विश्वास उडाला होता म्हणून या अस्त्रागाराचें रक्षण करण्याकरितां शंभर गोऱ्या शिपायांची नवीन नेमणूक झाली. त्याचप्रमाणें संकटकाळीं गोऱ्या स्त्रियांनीं आणि मुलांनीं या शस्त्रागारांत येऊन आश्रय घ्यावा, अशा सूचनाही छावणींतील सर्व इंग्रजांना करण्यांत आल्या. याप्रमाणें स्वसंरक्षणाची सर्व तयारी झाल्यावर दुसऱ्या दिवशीं शिपायांना निरनिराळया ठिकाणीं नेऊन निःशस्त्र करावें असें ठरलें, व सर्वांनीं बरोबर ५ वाजतां परेडवर यावें असा हुकूम देण्यांत आला. पण हा बेत तडीस गेला नाहीं. पांचाच्या सुमारास कांहीं शिपाई परेडवर आले. ५७ व्या पलटणीचे लोकच तेथें प्रथम पोहोंचले. ४५ व्या पलटणीचे लोक परेडला सदरबाजारांतून जाऊं लागले. बाजारांतून जातांना त्यांचीं मनें बिथरलीं. लोकांच्या तोंडून त्यांना नानाप्रकारच्या गटारगप्पा ऐकावयाला मिळाल्या. परेड ग्राउंडवर त्यांना तोफांच्या तोंडीं देण्यांत येणार अशी वार्ता पसरली. त्याबरोबर ते फितूर झाले. ते लोक याप्रमाणें क्षुब्ध होतांच त्यांच्यापैकीं कित्येकजण उघडपणें ओरडून म्हणाले, "आमचा तुम्ही अविश्वास करतां हें योग्य नाहीं." याप्रमाणें गडबड सुरू झाली. कांहीं शिपाई बंदुकी भरून शस्त्रागाराकडे धांवले, आणि कित्येक हुकुमाप्रमाणें परेडवर गेले.

अस्त्रागाराच्या बाहेरील भागाचें रक्षण करण्याची व्यवस्था नीट नव्हती. एक प्रकारें तो भाग अरक्षितच होता असें म्हटलें तरी चालेल. यामुळें शिपायांना सहजच त्याच्या भिंतीवर चढून जातां आलें, आणि ते आंत उतरले. परंतु ज्या घरांत दारूगोळा भरून ठेविला होता, त्याच्या भिंती सहा फुटांपेक्षांही अधिक उंच होत्या. दुसरें त्याच्या प्रवेशद्वारावर गोऱ्या शिपायांचा खडा पहारा होता.

यामुळें पुढचें काम तितकें सोपें नव्हतें. बंडखोरांनीं तेथें येतांच पहारा करीत असलेल्या गोऱ्या लोकांवर हल्ला केला. या झटापटींत कांहीं इंग्रज सैनिक व अधिकारी जाया झाले. पण क्षणभरानंतर पारडें पालटलें. इंग्रजी सैनिक आणि अधिकारी एक क्षणभरच या आकस्मिक हल्ल्यानें बावचळले, पण लगेच ते भानावर आले आणि त्यांनीं बंडखोरांची कत्तल उडविली. कांहीं वेळानें बाहेरून आंत येणारे दुसरे शिपाईही निःशस्त्र झाले, आणि याप्रमाणें देशी सैनिकांचा धाडशी पण अविचारी प्रयत्न फुकट गेला. अस्त्रागार अगदीं सुरक्षित राहिलें.

इकडे छावणी व बाजार या दोन्ही ठिकाणीं धूमधाम सुरू झाली. कारण बाजारांतून परेडवर जात असतां, रस्त्यांत शिपाई बिथरले आणि शस्त्रागाराकडे गेले, ही घटना लोकांच्या डोळ्यांदेखत दिवसा ढवळ्या घडली होती. त्यामुळें शहरांतील चोर, भामटे, गांवगुंड इत्यादिकांना संधी सांपडली. त्यांनीं एकदम पुकारा केला कीं शिपायांनीं बंड केलें. या पुकाऱ्यामुळें बाजारांत एकच गोंधळ माजला. त्या गडबडींत लुच्चा, लबाड लोकांना लुटालूट करणें अगदीं सोपें झालें. छावणींत इंग्रजांचे बंगले, हाटेलें, चर्च इत्यादि निरनिराळ्या इमारती होत्या, त्या सर्व जाळल्या जाऊं लागल्या. त्यामुळें एकच हाहाकार उडाला. पण या बंडखोरांनीं छावणींतल्या स्त्रियांना व बालकांना हातदेखील लाविला नाहीं. याप्रमाणें शांततारक्षणाचा उपाय फुकट गेला. शिपायांनीं बंड केलें आणि शहराची पुष्कळ खराबी करून ते दिल्लीला निघून गेले. लाहोरला जशी शिपायांच्या क्षुब्ध मनःस्थितींतही शांतता राहूं शकली तशी येथें राहिली नाहीं.

आतां फिलोरला काय झालें तें पाहूं. मीरतच्या बातम्या येतांच अधिकाऱ्यांनीं किल्ल्यांतील देशी शिपायांना बाहेर काढिलें व किल्ला इंग्रजी फौजेच्या हवालीं केला. तोफांचे मोर्चे बांधून सर्व इंग्रज शिपाई अष्टौप्रहर सावध राहूं लागले. अधिकाऱ्यांनीं शहरांत असलेल्या स्त्रियांना आणि मुलांना निवाऱ्याच्या जागीं पोहोंचविलें. शिवाय जालंधरच्या छावणींतून त्यांनीं दीडशें गोरे शिपाई मदतीदाखल मागविले.

जालंदरच्या आसपास पुष्कळच फौजेच्या छावण्या होत्या. जालंदरच्या देशी शिपायांना निःशस्त्र करण्याचा प्रयत्न तेथील अधिकाऱ्यांनीं केला असता तर ते शिपाई बिथरले असते. एवढेंच नव्हे तर आसपासच्या छावण्यांतले देशी शिपाईदेखील त्यांच्या मदतीला धांवून आले असते. जालंदरच्या

अधिकाऱ्यांनीं याच भीतीनें शिपायांना निःशस्त्र केलें नाहीं, असें म्हणणें धाडसाचें होईल. तेथील अधिकारी विचारशील होते, व त्यांना परिस्थितीची जाणीव होती. त्यांनीं मनुष्यस्वभावाचा पूर्ण विचार करून शिपायांच्या स्वाभिमानाला कारणावांचून डिवचणें योग्य नाहीं असें ठरविलें. त्यांनीं कपुरथळ्याच्या महाराजांना आपल्या मदतीला बोलाविलें. कपुरथळ्याचे महाराज जातीनें जालंदर मुक्कामीं हजर असल्यानें शिपायांना एक प्रकारचा धीर वाटत होता. महाराजांचें दर्शन रोज घडत असल्यानें, त्यांना वाटे कीं सध्या सर्व काम यथास्थित चालू आहे. या समजुतीनें जालंदरला कांहींच गडबड झाली नाहीं.

पंजाबच्या अधिकाऱ्यांना सर्वांत मोठी भीति वाटत होती ती पेशावरच्या छावणीची. तेथें अफगाण, अफ्रीडी, इत्यादि सीमाप्रांताचे अति निर्दय, क्रूर आणि लुटारू लोक असत. त्यांना बिथरण्याला एवढेंसें कारण पुरत असे. मूळचेच ते भांडकुदळ असल्यामुळें त्यांना भांडण उकरून काढावयाला मुळींच वेळ लागत नसे. हे पहाडी लोक अत्यंत काटक व क्रूर आहेत. एकदा कां ते बिथरले म्हणजे त्यांना शांत करणें फार कठिण असतें. सरहद्दीपलीकडे त्यांच्या भाइबंद काबुली लोकांचें राज्य आहे. सरहद्दीवरच्या लोकांनीं भांडण उकरून काढलें म्हणजे काबुली लोकांना आयतेंच फावलें असतें. बंडाच्या पूर्वीच इंग्रजांनीं अफगाण युद्धांत विजय मिळविला होता आणि काबुलच्या अमीर दोस्त महम्मदाला आपला दोस्त केलें होतें. एवढेंच नव्हे, तर ही मित्रता कायम राखण्याकरितां त्याला दरवर्षी १० लक्ष रुपये खंडणीदाखल देण्यांत येत असत. असें होतें तरी, सरहद्दीपलीकडील पेशावरचें नाकें इंग्रजांच्या हातीं असल्यानें अफगाणी लोकांच्या डोळ्यांत तें सारखें सलत होतें. सरहद्दीवरच्या लोकांनीं कलागत लावून दिल्यावर तें ठाणें काबीज करण्याचा मोह अमीराला आवरला नसता. अफगाण युद्धाची यातायात इंग्रज शिपाई विसरले नव्हते. त्याची पुनरावृत्ती कधींही होऊं नये अशीच त्यांची अंतःकरणपूर्वक इच्छा होती. म्हणूनच हिंदुस्थानांत इतर कोठेंही नसेल असा कडक बंदोबस्त त्यांना येथें ठेवावा लागे. ते या अशांततेच्या काळीं डोळ्यांत तेल घालून भांडखोर आफ्रिडी शिपायांना कलहाची संधी किंवा कारण मिळूं न देण्याची खबरदारी घेत. या सुमारास पेशावरच्या छावणींत ७६०० देशी शिपाई आणि केवळ दोन हजार गोरे शिपाई होते. देशी शिपायांचें संख्याबल इतकें मोठें असल्यानें इंग्रजांना त्यांच्याविषयीं काळजी वाटणें साहजिक होतें.

अशा विमनस्क स्थितींत असतांच तारीख अकराला दिल्लीहून बातमी आली कीं मीरतच्या फौजेनें बंड पुकारिलें व दिल्लींतून इंग्रजांना हांकलून लाविलें, आणि तेथें म्हाताऱ्या बहादुरशहाला पुन्हां बादशहा केलें. ही बातमी कळतांच कर्नल निकलसन आणि एडवर्डस यांना अत्यंत मोठी काळजी उत्पन्न झाली. त्यांनीं सर्व अधिकाऱ्यांना बोलावून त्यांच्याबरोबर या प्रसंगाला तोंड देण्या-संबंधीं वाटाघाट सुरू केली. ता. १३ मे रोजीं सेनापति रीडच्या बंगल्यावर सर्व अधि-काऱ्यांची सभा भरली. तींत असें ठरलें कीं या गडबडीच्या वेळीं पंजाबच्या सर्व अधिकाऱ्यांनीं एकमतानें आणि एकाच नीतीनें वागलें पाहिजे. त्यांनीं आपलें धोरण ठरविण्याकरितां सेनापति रीडसाहेबाला आपला नेता निवडलें आणि त्याच्या सांगण्याप्रमाणें सर्वांनीं वागावयाचें ठरविलें. त्यांनीं त्या वेळीं पंजाबांत असलेल्या सर्व मुलकी व व्यापारी इंग्रजांचें एक खडें सैन्य तयार केलें आणि या पल-टणीला दररोज युद्धकलेची तालीम मिळूं लागली. याबरोबरच या सर्व गोष्टी चीफ कमिशनरला कळविण्याकरतां चेंबरलेन साहेबाला रावळपिंडीस मुद्दाम रवाना केलें. तो ता. १६ ला रावळपिण्डीला पोहोंचला. कांहीं दिवसांनीं एडवर्डसाहेबही कमिशनरला भेटावयाला निघून गेला. चीफ कमिशनर सर जान लारेन्सनें ही सर्व हकीगत ऐकून व एकंदर परिस्थितीचें आकलन करून आपल्या फौजेंत पुष्कळ अफगाण आणि शीख शिपाई नवीन दाखल केले. त्यानें पोलिसांची संख्याही वाढविली. जागोजाग पोलिसांचीं नवीं ठाणीं बसविलीं आणि त्यांना कडक पहारा ठेवण्याचा सक्त हुकूम दिला. त्याचप्रमाणें खजिन्याच्या रक्षणाचें काम खात्रीच्या शिपायांकडे सोंपवून त्यांनाही सक्त ताकीद दिली. या गड-बडीच्या वेळेपुरता स्थानिक अधिकाऱ्यांना जादा लष्करी अधिकार देण्यांत आला कीं त्यांनीं संशयास्पद व्यक्तींना बेलाशक देहदंड द्यावा.

या वेळीं दिल्लीच्या मुसलमानांकडून पंजाबी मुसलमानांचीं मनें वळविण्याचा प्रयत्न बराच झाला. त्यांनीं कित्येक माणसें पाठविलीं आणि बरींच पत्रेंही लिहिलीं. पण तीं नेमलेल्या ठिकाणीं न पोहोंचतां नेमकीं इंग्रजांच्या हातीं पडलीं. यामुळें बंड-खोरांच्या बातम्या आणि गुप्त निरोप पंजाबी लोकांना पोहोंचूं शकले नाहींत. त्यामुळें पंजाबांत फारशी आग भडकली नाहीं. कारण जरी पुष्कळ लोकांचीं मनें इंग्रजांविषयीं कलुषित झालीं होतीं व इंग्रज आमची जात आणि धर्म विटाळणार आहेत, या गप्पा त्यांनीं ऐकिल्या होत्या, तरी त्यांना दुजोरा मिळाला नाहीं. परंतु

इंग्रजांना मात्र संशयपिशाच्चानें पूर्णपणें पछाडिलें होतें. त्यांना वाटे कीं सर्वच हिंदी एकजात इंग्रजांचे शत्रू बनले आहेत. त्यामुळें या संशयपिशाच्चाच्या कानमंत्राला मोहून इंग्रजांनीं कारणांशिवाय पंजाबांत बरींच दुष्कृत्यें केलीं, व लोकांवर अत्याचार केले. शीख शिपाई राजनिष्ठ असूनही एक दोनदां त्यांना वाईट रीतीनें वागविण्यांत आलें. परंतु इंग्रजाना दैव अनुकूल असल्यामुळें त्या चुक्यांचें प्रायश्चित्त त्यांना मिळालें नाहीं.

याच वेळीं कर्नल निकलसन यानें पहाडी जातींजवळ मदतीची याचना केली, पण त्यांनीं साफ नकार दिला. ता. २१ ला एडवर्ड साहेब रावळपिंडीहून परत आला. त्यानें पाहिलें कीं परिस्थिति दिवसेंदिवस बिकट होत आहे. त्या रात्रीं एडवर्ड आणि निकलसन एकाच ठिकाणीं मुक्कामाला राहिले, पण कोणालाच निद्रादेवी वश होईना. त्यांना क्षणोक्षणीं शिपायांच्या बंडाचे विचार अस्वस्थ करीत होते. ते अशा क्षुब्ध मनःस्थितींत तळमळत पडले असतां, मध्यरात्रीला त्यांना निरोप आला कीं नौशहरा गांवच्या शिपायांनीं बंड केलें आहे. हें ठिकाण पेशावरापासून चौवीस मैल अंतरावर होतें. बातमी कळतांच दोघेही ब्रिगेडीयर सिडने साहेबाच्या घरीं गेले. तेथें जाऊन त्यांनीं नौशहराची बातमी त्याला कळविली, आणि त्याला सल्ला दिली कीं, येथें असलेल्या पाचही देशी दळांना ताबडतोब निःशस्त्र केलें पाहिजे आणि हें काम सकाळच्या सकाळीं झालें पाहिजे. पहांटेस प्रत्येक दळाच्या नायकाला ब्रिगेडीयरनें बोलाविलें. त्यांच्या पलटणी निःशस्त्र करण्याचा विचार कळवितांच त्यांनीं कसून विरोध केला. त्यांनीं सांगितलें कीं शिपायांना निःशस्त्र करणें हा अविचार होईल, आणि आपण स्वतः त्यामुळें आपल्यावर संकट ओढून घेऊं. कारण शस्त्रें खालीं टाकण्याचा हुकूम देतांच शिपाई उत्तेजित होऊन बिथरतील आणि तेथल्या तेथें रक्तपात करण्यास कमी करणार नाहींत. परंतु त्यांच्या म्हणण्याचा विचार झाला नाहीं. त्यांचें म्हणणें मुख्य अधिकाऱ्यांना न पटून त्यांनीं शिपायांना निःशस्त्र करण्याचा हुकूम कायम केला.

योग्य वेळीं परेडच्या मैदानावर सर्व शिपाई जमले. गोरे शिपाई देशी शिपायांवर गोळ्या झाडण्यास सोइस्कर पडेल अशा जागीं जाऊन उभे राहिले. शिपायांनीं आपल्या अधिकाऱ्यांचं म्हणणें मुकाट्यानें ऐकिलें, आणि आपापलीं हत्यारें एका ढिगांत टाकून दिलीं. शिपायांवरील नायकांना हा दळांचा अपमान सहन

झाला नाहीं. त्यांपैकीं कांहींनीं रागानें आपलींही हत्यारें शिपायांच्या हत्यारांबरोबर त्या ढिगांत नेऊन ठेविलीं. याप्रमाणें शस्त्रसंन्यास करून सर्व शिपाई मुकाट्यानें आपापल्या छावणींत परत गेले. परंतु हा अपमान कित्येकांना असा झोंबला कीं ते पहाडांतील दऱ्याखोऱ्यांत पळून गेले, आणि तेथें लपून बसले. हे पळून गेलेले लोक पहाडी लोकांना जाऊन मिळतील आणि त्यांच्याशीं संगनमत करून नवेंच संकट उपस्थित करितील, म्हणून त्यांना धरण्याचें वारंट सुटलें. ज्या गांवांत ते लपून बसले होते तेथल्या लोकांनींच त्यांना धरून दिलें. त्यांना परवानगीशिवाय छावणी सोडण्याच्या अपराधाबद्दल शिक्षा झाल्या. त्यांपैकीं एका सुभेदाराला फांशी व एक हवालदार आणि दोघां शिपायांना सक्त मजुरीच्या कैदेची शिक्षा झाली. सुभेदाराला सर्व शिपायांसमोर फांशीं देण्यांत आलें.

यानंतर ५५ व्या पलटणीला निःशस्त्र करण्याचें घाटूं लागलें. या पलटणीचा अधिकारी स्पॉटिश वुड साहेब होता. त्याला हा विचार पसंत पडला नाहीं. परंतु त्याचें म्हणणें वरिष्ठांना रुचलें नाहीं. इकडे देशी शिपायांचीं शस्त्रास्त्रें काढून घेण्याकरितां वरिष्ठ अधिकारी आलेले पाहून साहेबाला फार वाईट वाटलें. त्याच्या पलटणीवर त्याचा फार विश्वास होता. अशा विश्वासू सैनिकांना शस्त्रसंन्यास करावयाला लाविणें हा त्याला फार मोठा अपमान वाटला व म्हणून त्यानें आपल्या खोलींत जाऊन आत्महत्या केली. आपला पाठिराखा मरण पावला असें पाहतांच शिपायांना फार दुःख झालें. त्यानें शिपायांचा मान राखण्याकरितांच आपला जीव दिला हें त्यांनीं ओळखिलें आणि त्यामुळें त्यांना अधिकच वाईट वाटलें. क्षणभर ते किंकर्तव्यमूढ बनले. पण त्यांनीं जेव्हां समोरून आपला अपमान करण्याकरितां येत असलेल्या गोऱ्या सैनिकांना पाहिलें तेव्हां त्यांचें पित्त खवळलें, व ते आपापलीं हत्यारें घेऊन त्यांच्यावर धांवून गेले. त्यांपैकीं कित्येकांनीं गोळीबारास आरंभ केला, व कांहीं हातास लागेल ते घेऊन पोबारा करूं लागले. याप्रमाणें पळापळी होऊन हे शिपाई 'सोवाट'च्या बाजूला निघून गेले. फक्त १२० शिपाई आपल्या जागीं उभे राहिले. कर्नल निकलसन पोलिसांचें घोडदळ बरोबर घेऊन पळपुट्यांचा पाठलाग करून त्यांना पकडण्याकरितां निघाला. रस्ता अवघड व पहाडी असल्यामुळें पळणारांनाही त्रास होऊं लागला. तेव्हां ते पांगले आणि ज्यांना ज्या गांवांत सोय होईलसें वाटलें तेथें ते जाऊन लपले. यामुळें त्यांच्यांत संगठितपणा राहिला नाहीं. पाठलाग

करणारेही त्यांच्या मागोमाग त्याच गांवांत आले. त्यांना जे जे शिपाई वाटेंत सांपडले, त्यांपैकीं कोणाला गोळी घाल, कोणाला कैद कर असें करीत करीत ते चालले. बरेचसे शिपाई जवळपासच्या पहाडी राजांकडे जाऊन धर्माच्या नांवावर आश्रय आणि मदत मागूं लागले. या राजांनीं त्यांना मदत केली नाहीं. तेव्हां शेवटचा उपाय म्हणून पाठलाग करणारांशीं त्यांनीं सामना केला. पण यांत त्यांना यश आलें नाहीं. १२० लोक मेले, दीडशें कैद झाले, आणि तीन चारशें घायाळ होऊन पडले. जे आपल्या जिवानिशीं सुरक्षितपणें सुवाटपर्यंत पोहोंचले ते सुवाटच्या आखुंद राजाच्या आश्रयाला जाऊन राहिले. तेथेंही ते स्वस्थ बसले नाहींत. राजा समानधर्मा आहे असें पाहून त्यांनीं विधर्मी इंग्रजांविरुद्ध बंड पुकारण्याचा त्याला सल्ला दिला. पण राजानें असला अविचार केला नाहीं. त्यानें या लोकांना सिंधूनद पार करून काश्मीरच्या बाजूस रवाना केलें. काश्मीरच्या वाटेवर हजारा जिल्ह्याच्या कमिशनरानें त्यांना अडविलें. तेव्हां त्यांनीं काश्मीरला जाण्याचा नाद सोडिला. आणि ते तुर्कस्थानाकडे वळले. कमिशनरानें इकडेही त्यांना अडविण्याची व्यवस्था केली असल्यानें त्यांचा मार्ग कुंठित झाला. अवघड पहाडी रस्ता, अन्नवस्त्राची ददात, थंडी मी म्हणत आहे आणि रस्ता चारीबाजूंनीं रोखिलेला, असें पाहून ते मेटाकुटीस आले आणि चवताळून इंग्रजांवर तुटून पडले. परंतु असले चिडलेले आणि चवताळून लढणारे लोक शिस्तीनें लढणाऱ्या शिपायांसमोर किती वेळ टिकाव धरणार? शेवटीं त्यांना इंग्रजांच्या पुढें दांतीं तृण धरून शरण यावें लागलें. पण याप्रमाणें शरण आलेल्यांना क्षमा करून त्यांचें रक्षण करण्याची वेळ इंग्रजांच्या मतें मागेंच निघून गेली होती. म्हणून त्यांना बंदुकीची गोळी खाऊन किंवा फांसावर लोंबून प्राण देणें भाग पडलें!

याप्रमाणें पंचावन्नाव्या पलटणीची विल्हेवाट लाविल्यानंतर, तारीख तीन जूनला ५१ व्या पलटणींतील पळून जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या बारा शिपायांना फांसावर चढविण्यात आलें. ‘मर्दान’ नांवाच्या ठिकाणीं एक फौजी छावणी असे. तेथील देशी पलटणींतले १२० शिपाई पलटण सोडून निघून गेले होते. त्यांपैकीं चाळीस जणांना फाशी द्यावी असा चीफ कमिशनरचा हुकूम होता. तारीख दहा जूनला हा फांशीचा विधि परेडच्या मैदानावर करावयाचा होता. हा विधि पाहण्याकरितां पेशावरचे झाडून सारे शिपाई मैदानावर गोळा झाले. कारण त्या

सर्वांनीं हा विधि पहावा अशी अधिकाऱ्यांची इच्छा होती, आणि म्हणूनच त्यांना तसा हुकूमही झाला होता. गांवांतले तमासगीरही गर्दी करीत होते. ठरलेल्या वेळीं ब्रिगेडीयर साहेब मैदानावर हजर झाला. आणि त्याच्या हुकुमानें ते चाळीस शिपाई तोफेच्या तोंडीं दिले गेले. त्यांचे राईराईएवढे तुकडे उडाले व शरीरांचा मागमूसही उरला नाहीं. ही भयंकर हत्या पाहून सर्वांच्या अंगावर शहारे आले. सशस्त्र आणि निःशस्त्र अशा हजारों माणसांच्या झुंडी हा समारंभ पहात होत्या. परंतु या कार्याला आडकाठी करण्याचें त्यांपैकीं कोणालाही धाडस झालें नाहीं. हा भयंकर देखावा जाहीरपणें लोकांना आणि विशेषतः शिपायांना दाखविण्यांत त्यांच्या मनांत दहशत उत्पन्न व्हावी, असा इंग्रज अधिकाऱ्यांचा हेतु होता. हा भयंकर देखावा पाहून जनसमूह खवळेल कीं काय अशी अधिकाऱ्यांना शंका वाटत होती. परंतु गोऱ्या शिपायांची तसल्या प्रसंगाला तोंड देण्याची जय्यत तयारी होती. यामुळें निःशस्त्र तमासगीरच काय, पण सशस्त्र देशी शिपाईही निमूटपणें तें पहात स्तब्ध उभे होते. यामुळें इंग्रज अधिकाऱ्यांचा हेतु पूर्ण झाला. त्यांच्या या कृत्यामुळें लोकांवर चांगलीच जरब बसली. लोकांना इंग्रजी सत्तेविरुद्ध 'ब्र' काढण्याचीही छाती नव्हती.

सोवाट नदीच्या कांठीं आबजाई नांवाचा किल्ला असे. तेथें ६४ वी पलटण होती. ज्या दिवशीं निकलसन साहेब पळपुट्या शिपायांचा पाठलाग करावयाला निघाला, त्याच दिवशीं त्याला बातमी लागली कीं, वर सांगितलेल्या किल्ल्यां-तील लोकांना फितविण्याकरितां एक आजुनखां नांवाचा अफगाण आला आहे. हा फितूरी चांगला धष्टपुष्ट असून अत्यंत साहसी होता. निकलसन साहेबाला हातचें काम सोडून किल्ल्याकडे जातां येणें शक्य नव्हतें, आणि ताबडतोब कांहीं तरी करावयाला हवें होतें. म्हणून त्यानें किल्ल्यांतील शिपायांचीं हत्यारें हिसकून घेण्याचा हुकूम सोडिला.

अयोध्येच्या प्रांतावर इंग्रजी अम्मल सुरू झाल्यापासून त्या प्रांतांतील मुसलमान अगदीं हवालदिल झाले होते. त्यांच्याप्रमाणेंच हिंदुस्थानच्या उत्तरेकडील भागांत राहाणारे मुसलमानही चिंतातुर झाले होते. त्यांना भय वाटत होतें कीं, इंग्रजांनीं जसा अयोध्येच्या नवाबाला क्षणार्धांत पदच्युत करून सर्व प्रांत गिळंकृत केला, तसा जर त्यांनीं उद्यां हैदराबादेच्या निजामला हाकलून दिला किंवा भोपाळच्या बेगमेला ती स्त्री म्हणून पदच्युत, केलें तर हिंदुस्थानांत

मुसलमानी राज्य नांवाला देखील रहावयाचें नाहीं. असें होऊं नये म्हणून कित्येक मुसलमान इंग्रजांवर संकट आणण्याच्या खटपटींत होते. वर सांगितलेला आजुनखां अशाच पहाडी मुसलमान कंपूचा नायक होता. त्याचा विचार असा होता कीं देशी सैनिकांना बंड करावयाला प्रवृत्त करून इंग्रजांचें बल कमी करावयाचें, व शिपायांनीं बंड पुकारतांच त्यांना पहाडांतील मुसलमान जातींनीं मदत करावयाची व याप्रमाणें सर्वांनीं मिळून पंजाबांतून तरी इंग्रजांची कायमची हकालपट्टी करावयाची. परंतु हा मनसुबा इंग्रजांनीं पार पडूं दिला नाहीं. सिडने काटन हा या कामावर नियुक्त केला गेला होता. त्यानें अशा शिताफीनें काम केलें कीं या धाडसी अफगाणाला आपले स्वतःचे प्राण वांचविण्याकरितां पोबारा करावा लागला, आणि इकडे आजबाई किल्ल्यांतील शिपायांना निःशस्त्र करण्यांत आलें. कोणत्याही प्रकारची गडबड न होतां हें काम त्यानें शांतपणें पार पाडलें.

आतां जालंदरला काय झालें तें पाहूं. तेथें मेजर लेक कमिशनर होता. त्याच्या गैरहजेरींत मीरत आणि दिल्लीच्या बातम्या जालंदरला पोहोंचल्या. कमिशनर साहेब जेव्हां परत आले तेव्हां शिपायांचा असंतोष त्यांच्या नजरेस पडला. इतर ठिकाणांप्रमाणें त्यानेंही शिपायांचीं हत्यारें काढून घेण्याचें ठरविलें. परंतु फौजेंतील अधिकाऱ्यांना हा विचार पसंत पडला नाहीं. मेजर लेकला फौजेंतील अधिकाऱ्यांच्या मतांविरुद्ध वागणें बरें वाटलें नाहीं. म्हणून तेथील शिपायांचा शस्त्रसंन्यास टळला. परंतु त्यांच्यांत पसरलेला असंतोष कायमच होता. तो दूर करण्याचा प्रयत्न झाला नाहीं. यामुळें ता० ७ जूनला शिपायांनीं गोऱ्या पलटणीच्या मुख्य अधिकाऱ्याच्या बंगल्याला आग लाविली. ही बंड पुकारण्याची खूणच होती असें वाटतें. कारण अग्नीच्या ज्वालांनीं विक्राळ स्वरूप धारण करितांच सैरावैरा धांवत असलेल्या शिपायांच्या टोळया दिसूं लागल्या. त्याच वेळीं गांवांतील इतरही कित्येक, बंडाकडे कल असलेलीं माणसें जमा झालीं. शस्त्रांचा खणखणाट होऊं लागला. गोरे शिपाई आणि अधिकारी परेडच्या मैदानाकडे धांवत सुटले. मुलेंबाळें घेऊन इंग्रज बायका घाबऱ्या घाबऱ्या वाट सांपडेल तिकडे पळत सुटल्या. सर्वत्र एकच गोंधळ माजला. येथल्या देशी शिपायांनीं हा सर्व गोंधळ उडवून देखील अत्याचार कांहींच केला नाहीं. कारण त्यांनीं कोणा गोऱ्या पुरुषावरही हत्यार उपसलें नाहीं, मग बायकामुलें तर दूरच राहिलीं. त्यांच्याकडे कोण ढुंकून पहातो? त्यांच्या हालचालीवरून एकच गोष्ट दिसत होती. त्यांना कसें तरी करून तेथून निसटावयाचें होतें, आणि दिल्ली गांठावयाची होती. त्यांचा असाही बेत होता

कीं वाटेंत होशियारपूर इत्यादि ठिकाणच्या शिपायांनाही साधल्यास दिल्लीला बरोबर न्यावें. त्याप्रमाणें त्यांनीं फिलोरला खबर कळविली. आणि ते सर्व जण रात्रीं एक वाजतां आलंदर सोडून निघाले. ब्रिगेडियर जान्स्टन त्यांचा पाठलाग करण्याकरितां गोरी पलटण ताबडतोब पाठवूं शकला नाहीं. किंचित् गोंधळ कमी होतांच शिपायांना एकत्र करून त्यानें त्यांचा पाठलाग चालविला. पण इंग्रज शिपाई कूच करीतोंपर्यंत दुसरे दिवशीं सकाळचे सात वाजले. मग कसले बंडखोर सांपडतात ? त्यांचा कांहींच पत्ता लागेना. म्हणून ही टोळी हात हालवीत तशीच परत आली.

याच वेळीं दुसरी बातमी आली कीं फिलोरलाही गडबड सुरू झाली आहे. तेव्हां कांहीं तोफा आणि गोरे शिपाई घेऊन एक इंग्रज अधिकारी फिलोरला जावयास निघाला. त्याच्याबरोबर पंजाबचें नं. २ चें घोडदळही होतें. फिलोरला पोहोंचतांच त्याला कळलें कीं गोरें सैन्य किल्ल्याच्या आश्रयानें बसलें आहे आणि देशी शिपाई सतलज ओलांडून पलीकडे गेले आहेत. याच वेळीं जालंदरचे देशी शिपाई तेथें पोहोंचले. या वेळीं काय करणें योग्य आहे हें इंग्रज सेनापति लवकर ठरवूं शकला नाहीं. त्यामुळें देशी शिपायांना संधी सांपडली, व ते पळून गेले आणि सतलज नदी ओलांडण्याच्या खटपटीला लागले. त्या वेळीं लुधियान्याचा अ. कमिशनर थर्नटन साहेब शिपायांचा पगार वांटावयाला तेथें आला होता. त्याला शिपाई बंड करून पळाले आहेत आणि आतां सतलज नदी ते ओलांडणार, असें कळतांच तो स्वत: घोड्यावर बसून सतलजच्या कांठीं गेला आणि त्यानें नदीवरचा पूल तोडून टाकिला. त्यामुळें शिपायांना दुसरी सोईची जागा पाहाणें भाग पडलें. नंतर थर्नटन साहेब लुधियान्याला परत गेला. तेथें डेप्युटी कमिशनर रिकेट्स हा जालंदरची बातमी ऐकल्यामुळें लुधियाना कसा वांचवावा या फिकीरींत पडलेला दिसला. त्याला असें भय वाटत होतें कीं, दिल्लीला जातां जातां शिपाई लुधियान्याची राखरांगोळी न करोत. लुधियान्याला जी फौज होती, तींत तरी शांतता कोठें होती ? तींतही असंतोष पसरतच होता. म्हणून त्याला वाटत होतें कीं शिपाई सतलज ओलांडून न येतील तर बरें होईल. त्यानें नाभाच्या राजाकडून मदत मागितली होती. साहेब या विवंचनेंत असतांनाच ती येऊन पोहोंचली. त्यामुळें साहेबाला बराच धीर आला आणि त्यानें जालंदरच्या शिपायांशीं युद्ध करावयाचें ठरवून, त्यांची गांठ घेण्याकरितां सेनेसकट पुढें कूच केलें.

थर्नटन साहेबानें पूल तोडून टाकिल्यामुळें शिपायांना चार मैल मागें हटावें लागलें. नदीचें पात्र अरुंद असून पाण्याला वेग नाहीं अशा ठिकाणाहून नदी पार करण्याचा त्यांचा बेत आहे, इत्यादि बातम्या रिकेट्स साहेबाला आधींच कळल्या होत्या, तेव्हां तो परत आला; आणि शिपाई सतलज नदी केव्हां ओलांडतात याची वाट पहात बसला. सुमारें १६०० शिपाई नदी ओलांडून गेले पण त्यांना लगेच इंग्रजी सेनेशीं सामना करावा लागला. इंग्रजांकडील शीख शिपाई देखील त्वेषानें बंडखोरांवर तुटून पडले. कारण पूर्वी याच हिंदुस्थानी शिपायांच्या मदतीनें इंग्रजांनीं पंजाबचें राज्य मिळविलें होतें. त्या शिपायांचीं मनें बिथरल्यामुळें इंग्रजी राज्याचा पाया आज डळमळूं लागला होता. परंतु आतां दुसऱ्या जातीच्या व धर्माच्या एकनिष्ठ आणि स्वामिभक्त शिपायांच्या मदतीनें बंडखोरांना खच्ची करून, तो पाया अधिक बळकट करण्याचें काम चालू झालें. इंग्रजांच्या जवळ तोफा असल्यामुळें त्यांनीं तोफांचा भडिमार चालविला. बंडखोर शिपायांजवळ नुसत्या बंदुकी असल्यामुळें त्यांचा मारा विशेष परिणाम करीना; पण ते नेटानें इंग्रजांवर गोळ्यांचा वर्षाव करीतच राहिले. याप्रमाणें दोन तास तुमुल रणकंदन माजून राहिलें, तेव्हां इंग्रजांचा धीर सुटला. शीखांची हिम्मतही अपुरी पडली, नाभाचे शिपाई तर केव्हांच विगलित होऊन चोहोंकडे फांकले होते. अशा स्थितींत डेप्युटी कमिशनर रिकेट्स आणि सेनापति विलियम्स यांनीं हाय खाल्ली आणि ते खिन्न अंतःकरणानें शहरांत परत आले. याप्रमाणें विजयश्रीनें माळ घाऊतांच बंडखोरांचा उत्साह दशगुणित झाला आणि ते लुधियाना शहरांत शिरले. त्या वेळीं किल्ल्यांतील देशी शिपाईही उत्तेजित झाले आणि त्यांना जाऊन मिळाले. गांवगुंड आणि बदमाष लोक अशा प्रसंगाची वाटच पहात असतात, त्यांनीं लूटमार आरंभिली. याप्रमाणें शहरांत जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. सरकारी इमारती आणि अमेरिकन व्यापाऱ्यांचीं घरें लुटल्यानंतर बंडखोर चर्च जाळण्याकरितां पुढें सरसावले. त्यांनीं छापखाना तोडून मोडून टाकला. ठरल्याप्रमाणें तुरुंग मोडून कैदी मोकळे केले. व्यापार उदीम करणारे लोक बिचारे बंडखोरांच्या अत्याचारांना भ्याले आणि त्यांनीं भितीनें बंडखोरांना दाणावैरण पुरविली. सावकारांनीं आपलें धन जमीनींत पुरून टाकिलें. दुकानें बंद पडावयाचींच. सारें शहर स्मशानवत् दिसूं लागलें. याप्रमाणें बंडखोरांनीं दिवसभर पैशाचिक लीला करून संध्याकाळीं दिल्ली शहरचा रस्ता धरला.

शहरांत शिरल्यावर बंडखोरांनीं इंग्रजांना जिवें मारण्याचा प्रयत्न केला नाहीं. पैसा अडका काय असेल नसेल तें लुबाडूनच ते संतुष्ट झाले. पण ते निघून गेल्यावर गोऱ्या लोकांना हायसें वाटलें. शहरांत गोंधळ सुरू असतां गोरे शिपाई आपापले प्राण घेऊन लपून बसले होते. त्यांना आपल्या प्राणांचें अतोनात भय वाटत असल्यामुळें किल्ला ओस पडला होता. पण बंडखोरांना याचा पत्ताच नव्हता. त्यांना केवळ लूट दिसत होती. मागचा पुढचा विचार कोण करितो? चतुर सेनापति नाहीं; तत्त्वनिष्ठ नेता नाहीं; केवळ मेंढयांच्या कळपाप्रमाणें समोर चाललेल्या माणसाच्या मागून डोळे मिटून चालणारे लोक ते! त्यांना कसेंही करून दिल्लीस जावयाचें होतें. रस्त्यांतल्या अडचणी दूर करण्यापुरतीच ही दंगल होती. तेव्हां मोकळा पडलेला किल्ला सर करण्याच्या भानगडींत ते पडले नाहींत.

गोरी पलटण कशीबशी धाडस करून शहरांतल्या इंग्रज रहिवाशांचें रक्षण करण्याकरितां आली. पण ती येऊन पोहोंचली तेव्हां बंडखोर शहर सोडून देखील गेले होते, त्यामुळें ते हिरमुसले झाले. परंतु राग कोणावर तरी काढिलाच पाहिजे, त्याशिवाय तो शांत होणार कसा? पण या रागाचे परिणाम बिचाऱ्या शहरवासियांना भोगावे लागले. काश्मीरच्या शालीचे मोठमोठे वीस व्यापारी फांसावर लटकविले गेले. जे जे लोक बंडखोरांना मदत करण्यांत सामील होते असा संशय आला, त्या सर्वांची अशीच दशा झाली. यामुळें कित्येक दुर्दैवी पण निर्दोष इसम देखील या क्रोधाग्नीला बळी पडले.

यानंतर लुधियानाच्या उरल्यासुरल्या देशी शिपायांचीं हत्यारें काढून घेण्याचा हुकूम सुटला. जालंदरहून आलेल्या गोऱ्या शिपायांच्या मदतीनें हें काम सहज पार पडलें. जे शिपाई जवळपास लपून बसले होते, त्यांना राजेरजवाड्यांनीं इंग्रजांच्या हवालीं केलें. ज्यांच्या घरीं खासगी हत्यारें होतीं, त्यांचीं हत्यारें काढून घेण्यांत आलीं. सरकारनें असा जाहीरनामा काढिला कीं कोणाही माणसानें आपल्याजवळ हत्यार बाळगूं नये; ज्याच्याजवळ हत्यार सांपडेल त्याला शिक्षा होईल. यामुळें लोक अधिकच चिडले. पण त्यांना आतां नुसतें चरफडत गप्प बसावें लागलें. लोकांजवळून जमा केलेलीं हीं सर्व हत्यारें दिल्लीच्या गोऱ्या सैनिकांना पुरविण्यांत आलीं. पतियाला, झिंद आणि नाभाच्या संस्थानिकांनीं या कामीं इंग्रज सरकारला भरपूर मदत केली.

याच वेळीं सीमान्त प्रांतांत धष्टपुष्ट आणि पहाडी जवान सैन्यांत घेतले गेले. या नव्या रंगरूटांचा नायक कॅप्टन डेली मुकरर केला गेला. ता. १३ मे रोजीं हे लोक नौशहरा मुक्कामीं पोहोंचले, व काटनसाहेबाच्या हुकमानें पुन्हां अटकेला परत गेले. तेथील किल्ला या नव्या फौजेच्या दमावरच सुरक्षित राहूं शकला. तेथून हें नवें सैन्य पंधरा मेला पुन्हां निघालें आणि १८ ला रावळपिंडीला पोहोंचलें. येथें कॅप्टन डेलीला अशी आज्ञा झाली कीं, तूं एकदम दिल्लीला जा. त्याप्रमाणें तो दिल्लीला जावयाला निघाला. रस्त्यांत लुधियाना येथें त्याला थांबावें लागलें. जूनच्या चवथ्या तारखेला त्याचा मुक्काम अंबाल्याला झाला आणि तारीख सहाला तो करनालला पोहोंचला. येथें त्याला दिल्लीहून लपून छपून पळत आलेले बरेच गोरे लोक भेटले. त्यांनीं जवळपासच्या गांवांत कित्येक बंडखोर लपून बसल्याची बातमी डेलीसाहेबाला सांगितली. एवढेंच नव्हे तर त्यांनीं त्याला असेंही सांगितलें कीं, हे बंडखोर कोणत्या वेळीं आमच्यावर तुटून पडतील याचा नेम नाहीं. हें ऐकतांच डेलीसाहेबानें गांवाचा धुव्वा उडविण्याचा सपाटा चालविला. त्या गांवांतून कांहीं लोक बंडखोरांना मदत करणारे असतीलही. प्रांताचा ताबा बंडवाल्यांच्या हातीं गेल्यावर, मनांत नसलें तरी त्यांना मदत करणें भाग पडतें. कारण लोकांनीं त्यांना मदत न केली तर ते त्यांना जीवें मारणार व त्यांच्या घरादाराला आग लावून देणार. बरें, स्वप्राणरक्षणाकरितां प्रसंग पाहून बंडवाल्यांना मदत केली तर इंग्रज त्यांना बंडखोर म्हणून फांशीं देणार, व गांवेंच्या गांवें उध्वस्त करणार. मग त्यांनीं काय करावें? इकडे आड व तिकडे विहीर! पण गांवांतील एकूण एक मनुष्य बंडखोरांना सामील झालेला नव्हता. मग या मूठभर लोकांच्या करितां सारा गांव उध्वस्त करणें हा भयंकर अन्याय ठरत नाहीं का? परंतु अशा अशांततेच्या काळांत कोणता मनुष्य बंडखोरांना मिळालेला आहे आणि कोणता नाहीं हें ठरविणें अत्यंत कठिण असतें. दुसरें, या प्रकारची चौकशी करून वेळ गमाविण्याला फुरसतही नसते. याशिवाय अधिकाऱ्यांना आतांपर्यंत जो अनुभव आला होता तोही गांवच्या लोकांना फारसा अनुकूल नव्हता. अशा वेळीं राज्यकर्त्यांच्या पुढें एकच गोष्ट दिसत असते. कोणत्याही उपायानें लोकांचीं मनें बंडापासून निवृत्त केलीं पाहिजेत. बंडखोरांना कोणत्याही प्रकारें मदत करणें सामान्य लोकांना धोक्याचें वाटलें पाहिजे. तसेंच बंडखोरांना कडक शासन करून त्यांना राज्यकर्त्यांची भीति वाटूं लागली पाहिजे, व घाबरून त्यांची ताबडतोब पांगापांग झाली पाहिजे.

यामुळें कधीं कधीं दुष्टांच्या संगतीचा परिणाम म्हणून सुष्टांनाही कष्ट होतात. म्हणूनच डेलीसाहेबानें शिपायांना गांवावर तुटून पडण्यास सांगितलें. गांवचे लोक पळूं लागले; परंतु शिपायांनीं गांवाला वेढा घातल्यामुळें पळून जावयालाही वाव नव्हता. कित्येक कैद झाले, व कित्येक गोळ्यांना बळी पडले. यानंतर गांवाला आग लावण्यांत आली आणि गांव धुळीस मिळविण्यांत आलें.

याप्रमाणें वाटेंतील गांवें उध्वस्त करीत कॅप्टन डेली दिल्लीला पोहोंचला. तो नऊ जूनला दिल्लीला पोहोंचला. त्याच दिवशीं त्याला बंडखोरांबरोबर युद्ध करावें लागलें. या लढाईंत डेलीचा सहाय्यक मारला गेला. या मारेकऱ्याचा सूड मेहेरबानसिंह नांवाच्या एका गुरख्यानें त्याला आपल्या कुकरीनें ठार करून उगविला. कॅप्टन डेलीनें केलेले अत्याचार अंगावर शहारे आणणारे आहेत. म्हणून त्यांचें वर्णन करणें अशक्य आहे. त्याला दया, माया, यांचें नांवही ठाऊक नव्हतें, असें वाटतें. कापाकापी, फांशी, गोळीबार आणि जाळपोळ याशिवाय त्याला दुसरें कांहींच दिसत नव्हतें. रडणें, आरडणें, विव्हळणें, इत्यादि गोष्टींचा त्याच्या मनावर परिणामच होत नव्हता. निरुपद्रवी व हताश झालेले लोक ईश्वराची प्रार्थना करीत असलेले पाहूनही त्याच्या मनाला पाझर फुटत नसे. उलट त्याच स्थितींत त्यांना गोळी घालून तो यमसदनाचा रस्ता दाखवीत असे. पण असल्या क्रूर आणि निर्घृण डेली साहेबाची एक गोष्ट वाखाणण्यासारखी होती. त्याची शिपायांना सक्त ताकीद असे कीं, बायकामुलांच्या केसालाही दंगलींत धक्का पोहोंचतां कामा नये. बंडखोरांनीं इंग्रज बायकामुलांवर केलेल्या अत्याचारांचीं खरींखोटीं प्रसिद्ध झालेलीं वर्णनें ऐकून त्याचा जीव कासावीस होई, रक्त उसळून येई, व सूड घेण्याची इच्छा प्रबल होई. म्हणूनच त्यानें इतके अत्याचार केले. पण त्याच्या हातून हिंदी बायकामुलांना मुळींच अपाय झाला नाहीं, हें इंग्रजी चारित्र्य नांवाजण्यासारखें अहे. पंजाबांत बंडाची दंगल फारशी उसळली नाहीं याचें श्रेय लारेन्स साहेबाला दिलें पाहिजे. शीख व पहाडी लोकांना संतुष्ट ठेवून हिंदी शिपायांना चोपून काढणें, हें धोरण त्यानें आंखलें व तें नेटानें अमलांत आणलें. त्यानें फौजेंत व पोलिसांत शीख, गुरखे व अफगाण या जातींचे नवे रिक्रूट भरती केले व त्यांना भरपूर पगार देऊं करून त्यांची व त्यांच्या जातभाईची सहानुभूती आपल्याकडे ओढून घेतली. कंपनीच्या या नव्या भक्तांच्या निष्ठेमुळें बंडवाल्या शिपायांना पंजाबांत आसरा मिळाला नाहीं, व सर्वांना

लपत पळत कशी बशी दिल्लीची वाट धरावी लागली. सर्व बंडखोरही दिल्लीस पोहोंचूं शकले नाहींत. त्यांच्यापैकीं बऱ्याच जणांची वाटेंतच कत्तल उडाली. त्याची शिस्त अतिशय करडी होती, व त्याचें उदाहरण पाहून त्याच्या हाताखालील अधिकाऱ्यांनींही संशयावरून बंडखोरांच्या पलटणींच्या पलटणी भाजून काढल्या, व शिपायांना दे माय धरणी ठाय करून सोडलें. या भयंकर शिक्षांमुळें पंजाबांत विलक्षण दहशत बसली, व बंडवाल्यांचा वारा देखील लोक आपल्या अंगावरून जाऊं देईनासे झाले. यामुळें पंजाबांतील शिपाई फारसे बंडांत सामील झाले नाहींत; जे बंडांत सामील झाले, त्यांच्यापैकीं बरेच तेथल्या तेथें भरडले गेले, व उरलेल्यांना जीव वांचविण्याकरितां पळतां भुई थोडी झाली, व त्यांना तोंड लपवूनच रहावें लागलें. पंजाबांतील फारच थोडे शिपाई दिल्लीस जाऊं शकले. तेव्हां लारेन्सच्या कडकपणाचें चीज झालें असेंच म्हटलें पाहिजे. कूपर, मांटगामेरी, डेली या लारेन्सच्या हस्तकांनीं क्रूरपणाची कमालच केली. घरांत ढेकूण झाले म्हणून तोफांच्या धडाक्याच्या माऱ्यानें घर पाडून त्याची राखरांगोळी करावी अशांतलाच हा प्रकार होता. या अघोरी उपायांमुळें मे १८५७ हा महिना संपावयाच्या सुमारासच पंजाबांत सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली. तेथील बंडाळी व बंडाळीचा मोड या दोन्ही वार्ता एकामागून एक त्वरेनें सर्वत्र पसरल्या, आणि लारेन्सचें कौतुक होऊं लागलें. कानपूर, लखनौ, झांशी या बंडाच्या प्रमुख केंद्रांत आग लागण्याच्या पूर्वीच पंजाबांत लारेन्सनें इतकी जरब व दहशत बसविली कीं, कंपनीच्या आज्ञा हिंदु वेदांप्रमाणें, मुसलमान कुराणाप्रमाणें व शीख ग्रंथसाहेबाप्रमाणें पूज्य व अनुल्लंघनीय मानूं लागले. त्यामुळें मुख्य सेनापतीच्या मागें लकडा लावून दिल्लीच्या स्वारीची संपूर्ण योजना लारेन्सला करतां आली. शीख व पहाडी लोकांना विश्वासांत घेऊन त्यांच्या नव्या पलटणी लारेन्सनें बनविल्या, व त्या योग्य अधिकाऱ्यांच्या दिमतीस देऊन दिल्ली कावीज करण्यास पाठविल्या. या अडचणीच्या प्रसंगीं त्यानें लोकांकडून सहा टक्के व्याजानें कंपनीच्या खर्चासाठीं नवें कर्ज काढलें. हें कर्ज लोकांनीं खुशीनें दिलें नसल्यामुळें, त्याला तें सक्तीनें वसूल करावें लागलें. दिल्ली शहर लुटून फस्त करण्याची व प्रतिज्ञेप्रमाणें मोंगलांवर गुरु गोविंदसिंहाचा सूड घेण्याची अमोल संधी शीख शिपायांनीं दवडली नाहीं; आणि जवळचें भांडवल कंपनीच्या कर्जरोख्यांत जबरीनें गुंतविलें गेल्यामुळें, कंपनीचा जय चिंतणें

पंजाबांतील सामान्य जनतेला, व्यापाऱ्यांना व सरदार मानकऱ्यांना भागच पडलें. [बासवर्थ स्मिथकृत लार्ड लारेन्सचें चरित्र, भाग २, पान ३०८]

लार्ड लारेन्सची राजनीति इंग्रजांना फलप्रद झाली व पंजाबप्रांत शांत राहिला. लारेन्सनें १८५८ मध्यें सर फ्रेडरिक करीस लिहिलें—" Under the mercy of God, the loyalty and the contentment of the people of the Punjab have saved India. Had the Punjab gone, we must have been ruined. ईश्वरी कृपेनें पंजाबच्या लोकांची राजनिष्ठा व समाधानवृत्ति, यांनीं हिंदुस्थानचें संरक्षण केलें. जर पंजाब बिथरला असता तर आपला सर्वनाश झाला असता." परंतु ही शांति कोणत्या उपायांनीं प्रस्थापित करण्यांत आली होती ? पलटणीच्या पलटणी संशयावरून भरडून व जबरीनें लोकांकडून द्रव्य उकळूनच पंजाबप्रांत दहशतीच्या धाकांत शांत ठेवण्यांत आला. पंजाबांत जून १८५७ पासून तों बंडाचा नायनाट होईपर्यंत पूर्ण शांतता नांदत होती, व त्यामुळें लारेन्सला बंड मोडण्याच्या कामीं द्रव्य व शिपाई उत्तर हिंदुस्थानांतील क्रांतिकारक टापूंत पाठवितां आले. पंजाबांतील बंडाळी निमिषार्धांत मोडून शांतता राखल्याबद्दल इंग्रज लेखकांनीं व मुत्सद्यांनीं त्याची परोपरीनें पाठ थोपटली आहे, व वाहवा केली आहे. जेत्यांच्या दृष्टीनें त्यानें व त्याच्या हस्तकांनीं योजलेले कडक व निर्घृण उपाय योग्यच ठरतील. कारण त्यामुळें लोकांवर इतकी दहशत बसली कीं, डोळा वर करून बघण्याची कोणाला हिंमत उरली नाहीं. परंतु नैतिक दृष्ट्या या उपायांचें कितपत समर्थन करतां येईल ? पंजाबांत शांति प्रस्थापित झाली, या फलावरून कारणाची परीक्षा केली तर त्याची करणी योग्य ठरेल. परंतु स्मशान-शांततेचें कौतुक जग करीत नाहीं. निर्विकार मनानें व नैतिक दृष्टीनें, लारेन्सची पंजाबांतील कारकीर्द इंग्रजी सत्तेला उपकारक झाली, तरी दोषास्पद व अघोरीच ठरते.

---

## प्रकरण १८ वें

## वायव्य प्रांतांत काय झालें ?



त्या वेळीं आग्रा आणि अयोध्येचा प्रान्त हा वायव्यप्रान्त या नांवानें ओळखला जात असे. बंडाच्या वेळीं कालविन साहेब या प्रांताचे शासक होते. हे

गृहस्थ बुद्धिमान् होते खरे, परंतु मीरतला घडलेला भयंकर प्रकार यांना कळला तेव्हां त्याचा परिणाम पुढें किती भयंकर होणार आहे याची साहेबाला प्रथम कल्पनाही झाली नाहीं. 'दिल्ली शहर बंडखोरांनीं काबीज केलें व तेथें वृद्ध मोंगल बादशहाची गादीवर स्थापना केली, तेथील इंग्रजांना आपले प्राण घेऊन पळावें लागलें आणि त्यांच्यापैकीं कित्येक बंडखोरांच्या हत्यारांना बळी पडले;' ही सविस्तर बातमी कालविन साहेबाला कळली, तेव्हां मात्र त्याच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मग मात्र त्याला वाटलें कीं हा वणवा वेळींच विझविला नाहीं तर हा कोठवर पसरेल याचा नेम नाहीं, आणि आगाऊ सावधगिरी घेतली नाहीं तर सरकारचें राज्यरूपी कुरण हा केव्हांच भस्म करून टाकील; तेव्हां त्यानें हा वणवा वाढूं न देण्याचा, निदान त्याचा व्याप कमी करण्याचा उपाय योजिला.

या प्रांतांत आग्रा हें एक मोठें शहर आहे. आग्र्याचा ताजमहाल माहीत नाहीं असा मनुष्य विरळा. या ताजमहालाशेजारींच इंग्रजांची छावणी होती. या छावणींत देशी आणि गोरे दोन्ही प्रकारचे शिपाई असत. जवळच गोऱ्या अधिकाऱ्यांचे बंगले आणि एक चर्च होतें. हें तत्कालीन प्रांतीय राजधानीचें ठिकाण असल्यामुळें, येथेंच प्रान्ताधिपति रहात असत. प्रान्ताधिकाऱ्याच्या बंगल्या भोंवतीं इतर मुलकी अधिकाऱ्यांचेही बंगले असत. सरकारी कचेऱ्या एका बाजूला आणि लष्करी छावणी दुसऱ्या बाजूला होती. शहर आणि किल्ला यांच्यामधून यमुनेचा प्रवाह वहात होता. नदीवर एक पूल होता, त्यानेंच लष्कराचें शहराशीं दळणवळण होई.

वर सांगितलेंच आहे कीं आग्रा येथील फौजेंत काळे, गोरे असे दोन्ही प्रकारचे शिपाई होते. गोऱ्यांची नं. ६ ची पायदळ पलटण होती आणि एक तोफखाना होता. देशी पलटणींत ४४ आणि ६७ नंबरच्या पलटणी होत्या. त्या वेळीं ब्रिगेडियर पोल हावेल याच्या ताब्यांत आग्र्याचें सैन्य होतें.

अनुक्रमें ता. १२ आणि १३ मेला, मीरत आणि दिल्लीची हकिगत आग्र्याला समजली. याच्यापूर्वींच गोऱ्या लोकांनीं आपल्या बचावाची व्यवस्था करून ठेविली होती. त्यांनीं किल्ल्यांत एक पलटण पाठवून दिली होती. आग्र्याच्याच तेवढ्या काळ्या शिपायांनीं बंड केलें तर त्यांना वठणीवर आणायला कांहींच अडचण पडणार नाहीं; पण जर आग्र्याच्या सर्वच लोकांनीं बंड पुकारिलें आणि शेजारच्या खेड्यापाड्यांतील लोकही त्यांना येऊन मिळाले, किंवा जवळपासच्या

छावण्यांतील शिपाईही या बंडखोरांना सामील झाले तर मात्र कठीण प्रसंग ओढवणार, असें तेथील साहेब लोकांना वाटत होतें. त्यांना वाटे कीं मीरतच्या शिपायांनीं जर दिल्लीवर चाल केली, तर तेच शिपाई आग्र्याला म्हणजे प्रांताच्या राजधानीला कसें मोकळें सोडतील? आणि अशा तऱ्हेचा तर्क लढवून कालविन साहेबानें एक सभा बोलाविली. अर्थातच ही सभा मुख्य मुख्य गोऱ्या अधिकाऱ्यांची होती. सभेपुढें त्यानें अशी सूचना आणली कीं सर्व गोऱ्या लोकांनीं किल्ल्यांत जाऊन आश्रय घ्यावा. परंतु हजर असलेल्या लोकांना ही सूचना फारशी आवडली नाहीं. त्यांचें म्हणणें असें पडलें कीं जर आपण सर्व जण बिऱ्हाड घेऊन किल्ल्यांत गेलों, तर लोकांना वाटेल कीं साहेब लोक घाबरले. लोकांची एकदां अशी समजूत झाली तर त्याचा परिणाम अनिष्ट होईल. या प्रश्नावर बरीच भवति न भवति झाल्यावर शेवटीं असें ठरलें कीं, सर्व सैनिकांना एकदां परेडला बोलवावें आणि गोऱ्यांचें एक स्वयंसैनिक दल उभारावें.

याप्रमाणें दुसरेच दिवशीं सर्व सैनिकांची परेड झाली. सर्व मुलकी आणि लष्करी अधिकारीही त्या दिवशीं परेडला मुद्दाम हजर राहिले. सर्व जण जमल्यावर कालविन साहेब आले. त्यांना रीतीप्रमाणें तोफांची सलामी देण्यांत आली. यानंतर त्यांनीं प्रथम गोऱ्या सैनिकांना उद्देशून म्हटलें:—"सैनिक हो, आजचा प्रसंग जरी काळजी करण्यासारखा असला व बाहेरून देशी शिपायांच्या बंडाच्या बातम्या तुमच्या कानावर आल्या असल्या, तरी तुम्ही या तुमच्यासमोर उभ्या असलेल्या देशी शिपायांविषयीं अविश्वास बाळगण्याचें कारण नाहीं. माझी खात्री आहे कीं, ते सर्व जण विश्वासपात्र आणि इमानाला जागणारे आहेत. म्हणून तुम्ही या हिंदुस्थानी शिपायांवर खुशाल विश्वास ठेवा. पण त्याबरोबरच एक गोष्ट लक्षांत ठेवा कीं, जर दिल्लीचे अत्याचारी लोक येथें येऊन पोहोंचले तर मात्र आपलें कर्तव्य करायला तुम्ही चुकूं नका. त्या वेळीं कर्तव्यपराङ्मुख होऊन मागें हटूं नका." हें उत्साहजनक भाषण ऐकून गोऱ्या शिपायांनीं आपापल्या बंदुकी सांवरल्या आणि साहेबाच्या म्हणण्याला संमति दर्शविली. इतकें झाल्यावर साहेब हिंदुस्थानी शिपायांस उद्देशून म्हणाले, " आमचा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे. तुमची कोणतीही तक्रार असली तरी ती ऐकून घ्यावयास आम्ही तयार आहोंत. तुम्हाला काय सांगावयाचें असेल तें मन मोकळें करून सांगा. तुमच्यापैकीं कोणाला जर सरकारची नोकरी करावयाची नसेल तर आपापलीं हत्यारें खालीं ठेवा. तुमच्यावर नोकरीची बळजबरी केली जाणार नाहीं. तुम्हाला

त्याबद्दल शिक्षाही होणार नाहीं." परंतु कोणी एकानेंही हत्यार खालीं ठेविलें नाहीं. कालविन साहेबाला हें पाहून संतोष झाला. आणि त्यानें सर्वांना आपापल्या जागीं परत जावयास सांगितलें.

तदनंतर त्यानें दिल्लीहून आग्र्याकडे येणाऱ्या रस्त्यावर उत्तम प्रकारचा बंदोबस्त केला. दिल्लीहून आग्र्यावर चढाई करणारांना रस्त्यांतच अडवावयाचें, आणि पुढें येऊं न देतां तेथेंच वाटेंत त्यांचा निकाल लावावयाचा असें त्यानें ठरविलें.

कालविन साहेबानें आपल्या प्रांतांतील प्रमुख लोकांना, जमीनदार–सरदारांना व राजेरजवाड्यांना, कंपनी सरकारला या अडचणीच्या प्रसंगीं मदत करण्याबद्दल पत्रें लिहिलीं. कारण त्यांच्याशीं झालेल्या तहनाम्यांत असें एक कलम होतें कीं, इंग्रज सरकारच्या प्रसंगोपात्त मदतीकरितां प्रत्येक देशी राजानें एक कवायत शिकलेली पलटण आपल्या पदरीं ठेवावयाची. असल्या पलटणी त्या वेळीं ग्वालेर, कोटा आणि भरतपूरच्या राजांकडे होत्या. त्यांची मदत मागण्यांत कालविन साहेबाचा दुहेरी हेतु होता. मदत मागण्याच्या निमित्तानें या राजेलोकांचा कल कोणीकडे आहे याचा छडा लावावयाचा, आणि कवायत शिकलेल्या संस्थानी पलटणी इंग्रजांच्या एकदां स्वाधीन झाल्यावर, शिल्लक राहिलेल्या हेंगाड्या शेंदाड शिपायांची किंवा राजेलोकांच्या मनांत यदाकदाचित् पुढें पाप आलेंच, तर मग त्यांची पर्वा करण्याचें कारण नव्हतें. साहाय्याची याचना करतांच भरतपूरची पलटण कॅप्टन निक्सन याचे हाताखालीं ता. १५ ला मथुरेला येऊन पोहोंचली. दुसऱ्याच दिवशीं ग्वालेराहूनही घोडदळ आणि तोफखाना आग्र्याला येऊन दाखल झाला. एवढेंच नव्हे तर ग्वालेरच्या शिंद्यांनीं आपलें खाजगी शरीररक्षक विश्वासू सैन्यही आग्र्याला पाठवून दिलें.

अशा रीतीनें व्यवस्था केल्यावर ता. २१ मे पर्यंत सर्व सुरळीत चाललें होतें. इतक्यांत अचानक अलीगडच्या शिपायांनीं बंड पुकारल्याची बातमी आली. अलीगड आग्र्यापासून ५० मैलांवर आहे. तेथें नं. ९ च्या पलटणींतल्या कांहीं तुकड्या होत्या. त्याच पलटणींतील बाकीचे लोक, कांहीं मैनपुरीला तर कांहीं बुलंदशहरांत, तर कांहीं इटाव्याला याप्रमाणें वांटले होते. मे महिन्याच्या मध्याच्या सुमाराला तेथें अस्वस्थता माजूं लागली. आसपासच्या खेडेगांवांतून रोजच्या रोज बाजारगप्पा उठत. या अतिशयोक्तीनें इतक्या फुगत कीं, कधीं कधीं वास्तविक घडत असलेल्या प्रकाराहून त्या फारच भयंकर असत.

तेव्हां त्यांत कितपत तथ्य आहे हें पाहण्याकरितां एक गोरा ऑफिसर कांहीं लोकांनिशीं टेहेळणीवर निघाला. शहरांतल्या कसाईखान्याजवळ बरीच गर्दी जमली होती. या जमावांतही क्षुब्धता दिसत होती. परंतु अधिकारी व त्याचे लोक सावधगिरीनें पुढें झाले व पलीकडे निघून गेले. त्यांना कोणत्याही तऱ्हेचा अडथळा झाला नाहीं. शहरांत इतरत्र कोठेंही नवलविशेष दिसलें नाहीं. जवळच्या गंग्रई नांवाच्या खेडेगांवीं मात्र एक ठिणगी धुमसत असलेली आढळली. ती हळूहळू पेट घेत होती.

येथें एक ब्राह्मण रहात असे. हा ब्राह्मण खाऊन पिऊन सुखवस्तु होता. त्याची गुंडगिरीही बरीच प्रसिद्ध होती. तुरुंगावरचा एक पहारेकरी या ब्राह्मणाच्या ओळखीचा असून, हा ब्राह्मण सांगेल तें काम करण्यास तो नेहमीं तत्पर असे. मीरत आणि दिल्लीच्या गोष्टी लोकांपासून गुप्त राहिल्या नव्हत्या. अधिकाऱ्यांनीं दिल्लीची वार्ता गुप्त ठेवण्याचा आपल्याकडून फार प्रयत्न केला. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. लोकांना तारायंत्रापेक्षांही अधिक जलदीनें या बातम्या मिळत असत. बंडाची धांदल सुरू होतांच कित्येक लोकांनीं या वाहत्या गंगेंत हात धुवून घेतले. बंडखोरांबरोबर नेमकें लुटालुटीच्या वेळेला हजर असावयाचें आणि सांपडेल त्याच्यावर हात मारावयाचा. पुन्हां आपण त्या गांवचेच नव्हे अशी वर बतावणी करावयाची. असल्याच माणसांपैकीं उपरोक्त ब्राह्मणही एक होता. त्या वेळीं अलीगडच्या खजिन्यांत ७ लाख रुपये शिल्लक होते. ही गोष्ट पुष्कळांना ठाऊक होती, तशी त्या ब्राह्मणालाही कळली होती. ब्राह्मणानें आपल्यापुरता विचार करून ठरविलें कीं, जर अलीगडचे शिपाई आणि गंग्रई गांवचे लोक सरकाराविरुद्ध बंड करितील तर आपलीही पोळी पिकेल. असा विचार करून त्यानें दोघां शिपायांना फितविलें; शिपायांना तर त्यानें असेंही सांगितलें कीं, ' तुम्ही जर बंडाचें निशाण उभाराल तर दोनशें लोकांनिशीं मी देखील तुम्हांला येऊन मिळेन. ' हें कारस्थान एका देशी अधिकाऱ्याला कळलें. त्यानें एकदम त्या ब्राम्हणाला कांहीं तरी निमित्त काढून आपल्याकडे बोलाविलें, व तो आल्याबरोबर त्याला कैद केलें. त्याची झटपट चौकशी होऊन ब्राह्मण फांसावर लटकाविला गेला. परंतु खरा प्रकार बाहेर न कळल्यामुळें लोकांची मात्र अशी समजूत झाली कीं, एक गरीब ब्राह्मण फुकट मारला गेला. ही लोकांची भ्रामक समजूतच पुढें भोंवली. हिंदू शिपायांनाही या ब्रह्महत्येबद्दल वाईट वाटलें, आणि एकाएकीं दंगल सुरू झाली. दंगल सुरू होतांच गोऱ्या

लोकांनीं पळापळी सुरू केली. थोड्याच वेळांत ते सर्व जण अलीगड सोडून पळाले. कांहीं लोक आग्र्याकडे आले, आणि कांहीं मीरतकडे गेले. जे लोक आग्र्याला आले ते तर सुरक्षितपणें निवाऱ्याच्या जागीं येऊन पोहोंचले. परंतु मीरतकडे गेलेल्या लोकांची जी दुर्दशा झाली तिची हकीगत वर्णनातीत आहे.

गोरे लोक निघून गेल्यावर लोकांना मनसोक्त वागावयास मुभा मिळाली. त्यांनीं खजिना लुटून सात लाख रुपये पार फस्त करून टाकिले, तुरुंग फोडून कैद्यांना सोडून दिलें, व गोऱ्या लोकांचे बंगले जाळून राख करून टाकिले. सारांश, ज्या ज्या वस्तूशीं इंग्रजांचा थोडा तरी संबंध आला होता, अशा वस्तूच दुनियेंत राहूं द्यावयाच्या नाहींत असा बंडखोरांचा जणूं निश्चयच दिसला. खजिन्यांतील लूट शिपायांनीं व गांवांतील लोकांनीं आपसांत वांटून घेतली. अलीगडांतील हा गोंधळ आणि ही नासधूस संपल्यावर शिपाई आपल्या हिश्याचे पैसे घेऊन दिल्लीकडे रवाना झाले, आणि गांवखेड्यांतील व शहरांतील रहिवाशी आपापला हिस्सा घेऊन घरीं जाऊन बसले.

जी पलटण अलीगडला होती त्यांतलेच कांहीं शिपाई मैनपूर, बुलन्द, आणि इटावा या ठिकाणीं वांटलेले होते. अलीगडची हकिगत ऐकून त्यांनींही तसेंच वर्तन आपापल्या गांवीं केलें व आपल्या भाईबंदांची अनुयायी भक्ति सिद्ध करून दाखविली. अलीगड, मीरत आणि दिल्लीच्या बातम्या इटावा येथें येऊं लागतांच, तेथील मॅजिस्ट्रेट ह्यूम साहेबानें ठरविलें कीं या बंडखोरांना कैद करावें. म्हणून प्रत्येक रस्त्यावर त्यानें खडा पहारा ठेविला. ता. १६ ला रात्रीं मीरतच्या सात घोडेस्वारांना साहेबानें कैद केलें. या स्वारांजवळ पिस्तुलें आणि तलवारी होत्या. छावणींत शिरतांच स्वारांनीं एका गोऱ्या अधिकाऱ्यावर गोळी झाडली. साहेबाच्या शिपायांनीं एका अपराध्याला जमिनीवर लोळण घ्यावयास लाविलें. उरलेल्या सहा जणांनाही शिक्षा देण्याचा विचार कायम झाला. शेवटीं एकाला गोळी घातली, दोघांना तलवारीनें कंठस्नान घातलें, दोघे जण पळून गेले आणि एकाला कैदेंत टाकलें. इतर कांहीं बंडखोरांनीं शेजारच्या जसवंतपुरावर असलाच अत्याचार करावयास सुरुवात केली. मॅजिस्ट्रेट ह्यूम साहेब ही बातमी ऐकतांच तिकडे ताबडतोब रवाना झाले. पण तेथें जाऊन पाहतात तों त्यांना असें दिसून आलें कीं हें काम तितकें सोपें नाहीं. कारण चारी बाजूंला मुसलमानांच्या झुंडीच्या झुंडी हत्यारें घेऊन उभ्या होत्या. साहेबाबरोबर

आलेला एक शिपाई पुढें झाला, पण तत्काळ बंडखोरांच्या गोळीला बिचारा बळी पडला. मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या सोबत्यालाही गोळी लागली. तेव्हां नाइलाज होऊन साहेबांना परत फिरावें लागलें.

मॅजिस्ट्रेटसाहेबानें फौजेच्या अधिकाऱ्यांच्या सल्लयानें इटाव्याच्या फौजेला दुसरीकडे पाठवून द्यावयाचें ठरविलें. हेतु हा कीं त्यांना अलीगडच्या शिपायांची हकीकत समजू नये. त्याप्रमाणें 'बरपुरा' येथें त्यांना पाठावावयाचें ठरलें. शिपाई निघतांना मोठ्या आनंदानें आणि उत्साहानें निघाले. पण कांहीं दूर गेल्यावर ते बिथरले. त्यांनीं आपल्या अधिकाऱ्यांचा हुकूम धाब्यावर बसविला आणि ते परत फिरले. कांहीं देशी शिपाई आणि अधिकारी मात्र आपल्या इमानाला जागले. ते शांत राहिले आणि त्यांनीं गोरे अधिकारी आणि त्यांचीं मुलेंबाळें यांना 'बरपुरा' पर्यंत सुरक्षितपणें पोहोंचविलें. जे शिपाई अर्ध्या वाटेंतूनच इटाव्याला परत आले, त्यांनीं शहरांतल्या क्षुब्ध वातावरणाचा फायदा घेऊन खजिना लुटला, तुरुंग तोडला, सरकारी कचेऱ्या आणि अधिकाऱ्यांचे बंगले यांची जाळपोळ केली. तेव्हां मॅजिस्ट्रेटसाहेबाला स्त्रीवेष घेऊन आपले प्राण वांचवावे लागले. जिकडे तिकडे जाळपोळ, लूटमार असा सांवळा गोंधळ माजून राहिला. घटकाभर असें वाटलें कीं इंग्रजी सत्तेचा समूळ नाश झाला आहे आणि सर्वत्र बेबंदशाही माजली आहे.

या वेळीं प्रतापनेरच्या चौहान राजकुमारांनीं ह्यूमसाहेबाला फार साहाय्य केलें. ज्यावेळीं वर सांगितल्याप्रमाणें उत्पात सुरू होते, त्यावेळीं या रजपूतकुमारांपैकीं कुमार लक्ष्मणसिंह ह्यूम साहेबाच्या मदतीला धांवून आला. त्यानें जातीनें हजर राहून कित्येक इंग्रज स्त्रियांना आणि बालकांना सुरक्षितपणें आग्र्याला पोहोंचविलें. जुलईपर्यंत ह्यूम साहेबाचा पत्ता नव्हता, म्हणून कंपनीतर्फे इटाव्याची पुढील व्यवस्था पांच तहसीलदारांनीं आपल्या जबाबदारीवर केली. या पांचांपैकीं उपरिनिर्दिष्ट लक्ष्मणसिंहाचा भाऊ जोहरसिंह हा एक होता. या पांचजणांनीं इतक्या उत्तम प्रकारें आपलें काम केलें कीं ह्यूमसाहेबानें तेथें परत आल्यावर तोंडांत बोट घातलें. या कार्यकुशलतेबद्दल ह्यूमसाहेबानें पांचही जणांची प्रशंसा केली. या पांचांपैकीं एक वैश्य जातीचा तहसीलदार एकदां बंडखोरांच्या हातीं सांपडला. बंडखोरांनीं त्याच्याकडून बातम्या काढण्याकरितां त्याचा नानाप्रकारांनीं छळ केला. तो सर्व छळ त्यानें निमूटपणें सहन केला, पण आपल्या गुप्त गोष्टी शत्रूला कळूं दिल्या नाहींत. ही स्वामिनिष्ठा प्रशंसनीय नाहीं का? कुमार लक्ष्मणसिंह स्वतः संन्याशाच्या

वेषानें बंडखोरांत जाऊन मिसळत असे आणि त्यांच्या बारीकसारीक गोष्टींचा छडा लावून, त्याची बित्तंबातमी इंग्रज अधिकाऱ्यांना देत असे. बंडखोर परके व इंग्रज आत्मीय, ही चुकीची भावनाच या सहाय्याच्या मूळाशीं होती. सामान्य हिंदीजनतेची तेव्हां अशीच मनोवृत्ती होती. या मदतीमुळें व बंडखोरांच्या हालचाली आणि गुप्त बेत योग्य वेळीं कळल्यामुळें इंग्रजांचा अपरिमित फायदा झाला. या अमूल्य मदतीमुळें ह्यूम साहेबानें हिंदवासियांबद्दल जे प्रशंसापर उद्गार काढले आहेत ते मननीय आहेत. ते उद्गार येणेंप्रमाणेः—

"मानवांना उचित अशा गुणांमध्यें इंग्रज व हिंदी या दोघांत कांहींच भेद नाहीं. आपलें नियोजित कर्तव्य करण्यांत दोघेही कुचराई करीत नाहींत. दोघेही दक्षतेनें आणि योग्यतापूर्वक आपलें कर्तव्य करितात. गुणांची विपुलता व स्वाभिमान दोघांत समसमान आहेत. यामुळें दोघांचा गौरव होतो. सुशिक्षणाच्या अभावामुळें दोघेही अत्याचाराला प्रवृत्त होतात. पक्षपातरहित होऊन विचार केला तर असें दिसून येईल कीं, दोघांमध्येंही कांहीं विशेष गुण आहेत व कांहीं दोषही आहेत. जर एखाद्या सुविद्य भारतीयाशीं एखाद्या सामान्य इंग्रजाची तुलना केली, तर तो इंग्रज थोर विभूतीमध्यें बसलेल्या माकडाप्रमाणें दिसेल. तसेंच जर, आपल्या कार्यात अविश्रांतपणें दीर्घकालपर्यंत काम करणाऱ्या, दूरदर्शी आणि जबाबदारीची जाणीव असल्यामुळें गंभीर बनलेल्या हिंदुस्थानवासी इंग्रजाशेजारीं एखाद्या अदूरदर्शी व मूर्ख हिन्दी माणसाला उभें केलें, तर तो इंग्रज एखाद्या दैवी पुरुषाप्रमाणें शोभेल. दोन्ही समाजांतील उत्कृष्ट गुणांनीं युक्त अशा दोन व्यक्ति एकमेकांशेजारीं उभ्या केल्या तर दोघेही समान योग्यतेचेच आढळतील.

× × × ×

हिंदुस्थानांतील इंग्रजाला नेहमीं हिंदी लोकांचे दोषच तेवढे दिसतात आणि स्वजातीयांचे मात्र फक्त गुण दिसतात. म्हणूनच त्यांना वाटतें कीं हिंदी मनुष्य म्हटला कीं तो निंद्यच असला पाहिजे; इंग्रज तेवढा मात्र प्रशंसनीय!"

खरें पाहूं गेलें, तर सामान्य इंग्रजाची आजपर्यंत अशीच समजूत आहे. ह्यूम साहेबासारखे निःपक्षपाती उदार लोक क्वचितच आढळतात. १८५७ सालचें बंड इतकें विकोपाला गेलें त्याच्या अनेक कारणांपैकीं एक कारण हेंही आहे कीं, हिंदी लोकांना शत्रुत्वाच्या व हीनतेच्या दृष्टीनें इंग्रज पहात असत, त्यांच्या

मनोभावनांविषयीं तुच्छता दर्शवीत, व त्यांच्याकडे सहानुभूतीनें पहाण्याची ते फिकीरच करीत नसत. ह्यूम साहेबासारखे उदार, पक्षपातरहित, व सहृदय इंग्रज अधिकारी जर कंपनी सरकारला पुष्कळसे लाभले असते, तर कदाचित बंडाचा वणवा इतका विकोपास गेला नसता; उलट तो ताबडतोब विझून गेला असता. कारण जें इटाव्याला झालें तेंच इतरत्र झालें असतें.

ता. २४ मे रोजीं रात्रीं ग्वाल्हेरची पलटण बनपुरा मुक्कामीं पोहोंचली. त्याच्या दुसरे दिवशीं ती इटाव्याला गेली आणि इटावा पुन्हा इंग्रजांच्या आधीन झाला. परंतु इटावा परत घेतांना कित्येक बंडखोरांबरोबर त्यांना युद्ध करावें लागलें, कित्येकांचीं घरेंदारें जमीनदोस्त झालीं आणि कित्येक कुटुंबें धारातीर्थीं पतन पावलीं.

आतां मैनपुरीला काय झालें तें पाहूं. ता. २२ ला अलीगडची हकीकत तेथील लोकांना कळली. तेथील मॅजिस्ट्रेट आणि कमिशनर या दोघांनीं ताबडतोब विचार करून इंग्रज बायकापोरांना एका विश्वासू मुसलमान शिपायांबरोबर आग्र्याला पाठवून दिलें. शिपायांना भावगांव मुक्कामीं जाण्याचा त्यांनीं हुकूम दिला, परंतु शिपायांनीं हा हुकूम अमान्य केला. आणि उलट ते इंग्रजांनाच सांगूं लागले कीं, आपले प्राण वांचवावयाचे असतील तर शहर सोडून चालते व्हा ! हा प्रकार पाहतांच इंग्रज अधिकारी मोठ्या संकटांत पडले. या वेळीं फौजेचे दोन अधिकारी होते. एक लेफ्टनंट क्रॅफर्ड व दुसरा डिकॅन्टज. परेडवर डिकॅन्टज एकटाच हजर होता. ले. क्रॅफर्ड तेथें नव्हता. यामुळें डिकॅन्टजला वाटलें कीं क्रॅफर्डला शिपायांनीं मारून टाकिलें. यामुळें आपल्या सोबत्याची नीट चवकशी न करितां तो तेथून घाबऱ्या घाबऱ्या थेट मॅजिस्ट्रेटकडे आणि कमिशनरकडे गेला. त्यानें दोघांनाही असें सांगितलें कीं, शिपायांनीं बंड करून क्रॅफर्डला ठार केलें; आणि मग स्वतांसाठीं आग्र्याला जाण्याची परवानगी मागितली. या परिस्थितींत कमिशनरलाही तेथें राहणें धोक्याचें वाटलें. म्हणून ते सर्वजण आग्र्याला रवाना झाले. मैनपुरीला मॅजिट्रेट, त्याचा धाकटा भाऊ व तिघे इंग्रज एवढेच कायते राहिले. शेवटीं मैनपुरीच्या राजाचा भवानीसिंह या नांवाचा एक नातलग होता, त्याची समजूत करून मॅजिस्ट्रेटनें त्याच्याकडून संस्थानी घोडदळ व पायदळ सैन्य मदतीला बोलाविलें.

इकडे क्रॅफर्डसाहेबाला शिपायांनीं चारी बाजूंनीं घेरलें. तेव्हां आतां काय करावें हें त्याला कळेनासें झालें. शिपायांनीं शहरांत लुटालूट सुरू केली. त्यांनीं

फौजेंतील शस्त्रास्त्रांचें कोठार लुटलें आणि ते खजिना लुटायला आले. त्या वेळीं कॅफर्डसाहेब जिवावर उदार होऊन त्यांच्यासमोर जाऊन उभा राहिला, आणि त्यांची समजूत घालूं लागला. त्याच्या या धाडसाचा परिणाम फारच छान झाला. बंडखोरांनीं खजिन्याच्या पहारेकऱ्यावर गोळ्या झाडल्या नाहींत. पहारेकऱ्यांना कांहींही करितां येणें त्या वेळीं अर्थातच शक्य नव्हतें. बंडखोरांनीं सावकाशपणें खजिना लुटला. दैववशात् राव भवानीसिंह याच वेळीं आपल्या फौजेनिशीं तेथें येऊन पोहोंचले. त्यानें शिपायांना समजाविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. तेव्हां शिपायांनीं उत्तर दिलें, "रावसाहेब स्वतः आम्हाला पोहोंचविण्याकरितां जातीनें येत असतील, तर आम्ही परत जावयाला तयार आहों." राव भवानीसिंह या तडजोडीला ताबडतोब कबूल झाले आणि बंडखोरांनीं खजिना न लुटतां तेथून पाय काढिला, आणि ले. कॅफर्डला तेथेंच सोडून ते मैनपुरी बाहेर चालते झाले.

या सर्व बातम्या आग्र्याला पोहोंचल्या तेव्हां तेथें काळजी, उत्कण्ठा, द्वेष आणि सूड उगवण्याची उत्कट इच्छा इत्यादि मनोविकारांचें एकच काहूर माजलें. पूर्वीं ज्या लोकांनीं किल्ल्यांत जाऊन राहण्याच्या कल्पनेचा निषेध केला होता ते सर्व आतां किल्ल्यांत तांतडीनें रहावयास येऊं लागले, आणि किल्ला लढविण्याची तयारी जारीनें सुरू झाली. किल्ल्याच्या तटबंदीवर अष्टौप्रहर पहारा बसूं लागला. सहा महिने एकसारखा किल्ला लढवितां येईल इतकी सामग्री किल्ल्यांत जमा झाली. सैनिकांची संख्या शक्य तितकी वाढविण्यांत येऊं लागली. या वेळीं एका अनुभवी वृद्ध अधिकाऱ्यानें कालविन साहेबाला अशी सल्ला दिली कीं, सरकारनें आतां असें जाहीर करावें कीं, 'जे बंडखोर आपापलीं हत्यारें खालीं ठेऊन सरकारला शरणचिठ्ठी लिहून देतील, त्यांना त्यांचा गुन्हा माफ करण्यांत येईल. ज्यांनीं खूनखराबी केली असें सिद्ध होईल तेवढयांनाच फक्त शिक्षा देण्यांत येईल. बाकीच्या लोकांना कोणत्याही प्रकारें शिक्षा होणार नाहीं. ही सल्ला कालविनसाहेबाला पसंत पडली आणि त्यानें त्याप्रमाणें एक जाहीरनामा काढिलाही. परंतु ही गोष्ट गव्हर्नर जनरल लॉर्ड कॅनिंग यांना त्या वेळीं पसंत पडली नाहीं. तरी लॉर्ड क्यानिंगच्या दयाळूपणाचीं सर्वत्र स्तुतिस्तोत्रें गाण्यांत येत, यामुळें कालविनला दुसरा एक जाहीरनामा काढावा लागला. 'ज्या पलटणींत कोणा अधिकाऱ्याची हत्या झाली नसेल, तिलाच फक्त माफी मिळेल, आणि त्याच शिपायांचीं हत्यारें परत घेण्यांत येतील. जेथें एकाद्या अधिकाऱ्याचा किंवा दुसऱ्या एकाद्या इंग्रज

माणसाचा खून झाला असेल .त्या पलटणींतील शिपायांना मुळींच क्षमा केली जाणार नाहीं.'

या प्रसिद्ध झालेल्या दोन्ही जाहीरनाम्यांत एवढाच फरक होता कीं गव्हर्नर जनरलच्या जाहीरनाम्याप्रमाणें सारी पलटणच्या पलटण शिक्षेला पात्र झाली असती, तर गव्हर्नरच्या जाहीरनाम्याप्रमाणें कांहीं निवडक लोकांनाच शिक्षा झाली असती. गव्हर्नर जनरलचा जाहीरनामा प्रसिद्ध होतांच सर्व इंग्रजांकडून त्याच्या प्रशंसापर उद्गार निघूं लागले, आणि त्या सर्वांनीं कालविनची शेळपट म्हणून निंदा करण्यास सुरुवात केली. कालविनचे जे मदतनीस मंत्री होते त्यांतही कांहीं त्याचे निंदक निघाले. त्यामुळें त्याची फारच मानहानी झाली; त्यांतच त्याची प्रकृति बरी नसल्यामुळें बिचाऱ्याची अतिशय दुर्दशा झाली.

याप्रमाणें तीन आठवडे लोटले. तोंवर आग्र्याची शांतता भंग करणारा एकही प्रसंग आला नाहीं. सर्व कामें सुरळीतपणें चाललीं. मे महिन्याच्या शेवटीं मथुरेला गडबड झाली. आग्र्याच्या ४४ व्या पलटणींतील कांहीं लोक मथुरेला होते. त्यांच्या मदतीला त्याच पलटणींतले आणखी कांहीं लोक पाठविण्याचें ठरलें. त्यांच्याबरोबर ६७ व्या पलटणींतलेही कांहीं लोक पाठविले. या शिपायांना पाठविण्याचें कारण असें कीं, त्यांनीं जाऊन मथुरेच्या खजिन्याचा तेथील रक्षकांकडून ताबा घ्यावा, आणि विशेष दक्षतेनें खजिन्याचें रक्षण करावें. या दक्षतेचें आणि सावधगिरीचें कारण असें होतें कीं तेथें सहा लाखांवर ऐवज खजिन्यांत होता. इकडे मथुरेच्या शिपायांत आणि सर्वसाधारण शहरवासियांत विलक्षण खळबळ चालू होती. तेथें अशी बाजारगप्प पसरली कीं दिल्लीचे बंडखोर आग्र्यावर चाल करून जात आहेत. दिल्लीहून आग्र्याला जाण्याच्या वाटेवरच मथुरा असल्यामुळें, मथुरेच्या इंग्रजांनीं आपल्या बायकामुलांना आग्र्याला पाठवून दिलें होतें. अर्धाअधिक मे महिना संपल्यावर भरतपुराहून कॅप्टन निक्सन मथुरेला आला, तेव्हां तेथील लोकांना बराच धीर आला.

ता. ३० मे रोजीं आग्र्याहून मथुरेला कुमक रवाना करण्यांत आली. याच वेळीं मथुरेच्या खजिन्यांतली रक्कम आग्र्याला पाठविण्याची तयारी चालली होती. बैलगाड्या तयार झाल्यावर लेफ्टेनन्ट बोल्टन संरक्षकांच्या समोर येऊन उभा राहिला. तो कूच करण्याचा हुकूम देणार इतक्यांत एका जमादारानें त्याच्यापुढें येऊन प्रश्न केला, 'हा खजिना कोठें जात आहे ?'

बोल्टननें उत्तर दिलें, 'आम्याला.'

जमादार—'छे, छे, हा तर दिल्लीला जाणार आहे.'

हे शब्द ऐकल्याबरोबर बोल्टन चिडून गेला, व संतापानें त्याच्या आंगावर चालून गेला आणि ओरडून म्हणाला, "अरे विश्वासघातक्या, तूं......"त्याचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच त्याच्या छातींतून बंदुकीची गोळी आरपार निघून गेली आणि तो घोड्यावरून खालीं पडला.

शिपायांना आतां मैदान मोकळें सांपडलें. त्यांनीं खजिना आपल्या ताब्यांत घेतला. गोरे लोक पळूं लागले, शहरांतलीं घरें जळूं लागलीं, आणि थोड्याच वेळांत शहरांत हाहाकार उडाला. मथुरेचे धनिक लोक वाट सांपडेल तिकडे प्राण व वित्त घेऊन पळत सुटले. उन्मत्त झालेल्या बंडखोरांनीं कचेऱ्यांतल्या खुर्च्या, मेजें, अलमाऱ्या, कागदपत्र वगैरे सर्व सामान एका ठिकाणीं जमा केलें, आणि त्याची एक भली मोठी होळी पेटविली. नंतर त्यांनीं तुरुंग तोडला आणि कैद्यांना मुक्त केलें. इतकें झाल्यावर ते दिल्लीच्या वाटेला लागले.

या वेळीं भरतपूरची पलटण 'हुदुल' गांवीं होती. भरतपूरचें आणि कंपनी-सरकारचें मित्रत्वाचें नातें असल्यानें गोरे लोकांना भरतपूरच्या मदतीची आशा होती. त्यांतून 'हुदुल'ला आलेली पलटण केवळ त्यांच्या मदतीला आली होती. कमिशनर हार्वे पलटणीबरोबर होता. ता. ३१ मेला मथुरेची बातमी इंग्रजांना कळली. तेव्हां हार्वेसाहेबानें भरतपूरच्या लोकांना हुकूम दिला कीं, तुम्ही ताबडतोब या दिल्लीकडे जाणाऱ्या बंडखोरांना अडवा. परंतु त्यांनीं एकदम नकार दिला, एवढेंच नव्हे तर उलट त्यांनीं आपल्या तोफांचा मोर्चा बदलून त्या इंग्रज-सैन्यावर रोखल्या. तेव्हां नाइलाज होऊन इंग्रजांना पळून जावें लागलें. गोरें सैन्य निघून जातांच बंडखोरांनीं त्यांच्या राहुट्या व डेरे जाळले, व इंग्रजांचे बंगलेही जमीनदोस्त करून टाकिले. रात्रीं ही हकिगत आम्याला कळली. तेव्हां तेथील अधिकाऱ्यानें सकाळ होतांच आपल्याजवळ असलेल्या दोन्ही देशी पलटणींना निःशस्त्र केलें. या निःशस्त्र लोकांपैकीं कांहीं लोक आपापल्या घरीं निघून गेले. कांहीं परत छावणींत आले आणि कांहीं दिल्लीकडे रवाना झाले.

जे शिपाई आपापल्या घराकडे जावयाला निघाले होते, त्यांनीं वाटेनें बरेंचसें विष पेरून ठेविलें. रस्त्यानें भेटेल त्याला इंग्रजांविरुद्ध वाटतील त्या गोष्टी सांगा-

वयास त्यांनीं सुरुवात केली. प्रत्यक्ष पलटणींतले लोकच असें सांगत आहेत, त्या अर्थी तें सर्व खरेंच असलें पाहिजे, अशी सर्वसाधारण जनतेची समजूत झाल्यास काय नवल ? यामुळें बहुतेकांना वाटूं लागलें कीं, आतां इंग्रजी राज्याचे शेवटचे दिवस भरत आले. हे लोक हिंदुस्थानांत यापुढें फार दिवस राहणें अशक्य. कारण प्लासीला बरोबर शंभर वर्षें झालीं व ज्योतिषांनीं भविष्यही तसेंच वर्तविलें होते. केवळ या चुकीच्या समजुतीनेंच कित्येक ठिकाणीं बंड झालें. दिल्ली आणि आग्र्याच्या आसपासच्या मुलुखांत खळबळ उडाली. शिपायांप्रमाणेंच कोठें कोठें इतरे जनांनींही बंड केलें आणि कित्येक लहान मोठे उत्पात झाले.

मीरतला ज्या २० व्या पलटणीनें बंड केलें होतें तिच्यांतील कांहीं लोक मुजफ्फरनगरला होते. त्यांना मीरतच्या बंडाची हकीकत कळली तरी ते शांत होते. त्यांच्या मनांत बंडाच्या विष–बीजानें प्रवेश केला नव्हता. पण तेथील मॅजिस्ट्रेटच्या घाबरटपणामुळें सर्व पारडें फिरलें. मीरतची हकीकत ऐकून मॅजिस्ट्रेटनें सर्व कचेऱ्या बंद केल्या आणि तो स्वतः शहराबाहेर सुरक्षित ठिकाणीं जाऊन बसला. खजिन्याच्या रक्षकांना त्यानें आपलें स्वतःचेंच रक्षण करण्याचें काम सांगितलें. परंतु या रक्षकांच्या मनांत मॅजिस्ट्रेट बारफर्ड साहेबाविषयीं आदर नव्हता. उलट मागें घडलेल्या एका प्रसंगापासून हे रक्षक बारफर्ड साहेबाचा द्वेष करूं लागले होते. त्यानीं बारफर्ड साहेबाची त्रेधा तिरपिट उडालेली पाहिली, तेव्हां त्यांना वाटलें कीं इंग्रजांचे दिवस आतां भरले ! अशी ठाम समजूत झाल्यामुळें त्यांनीं खजिना लुटण्याची मसलत केली. इकडे बारफर्ड साहेबानें जेलच्या रक्षकांनाही आपल्याजवळ बोलविलें. याप्रमाणें खजिना आणि तुरुंग, रक्षक–शून्य झाल्यामुळें भामट्यांना चांगलेंच फावलें. सगळे कैदी पळून गेले. सरकारी कचेऱ्या आणि गोऱ्या अधिकाऱ्यांच्या घरांना आगी लागल्या व सरकारी कगदपत्र भस्म झाले. साऱ्या जिल्ह्यांत अशा अफवा पसरल्या की इंग्रज पळाले, इंग्रजांचे राज्य गेलें. आतां वाटेल तें करावयाला हरकत नाही. जिकडे तिकडे मारामारी, कापाकापी जाळपोळ, लूटमार, पळापळीची एकच धांदल उडाली. बेबंदशाही सुरू झाल्यामुळें भामट्यांचें चांगलेंच फावलें. वैयक्तिक सूड उगवावयाला ही वेळ त्यांना उपयोगी पडते. अशा अडचणीच्या प्रसंगीं सज्जन व श्रीमंत लोक निराधार होतात आणि सभ्य व प्रतिष्ठित लोकांवर भयंकर प्रसंग ओढवतो. सरकारी खजिन्याची हीच कथा झाली. पेट्याची तोडफोड करून त्यांतले रुपये बंडखोरांनीं पळविले. यामुळें कंपनीचे ८५ हजार रुपये हां हां म्हणतां उडून गेले.

सहारनपुरासही गोंधळ सुरू झाला. या वेळीं येथें इंग्रज फार नव्हते. मुरादाबादच्या पलटणीपैकीं ७०।८० शिपाई खजिन्याचे रक्षक होते. त्यांचा नायक देशीच होता. सुमारें शंभर शस्त्रास्त्रधारी जवान तुरुंगाचें व गोऱ्या अधिकाऱ्यांचें रक्षण करावयाला जय्यत तयार होते. त्या वेळीं स्पेकिंगसाहेब सहारनपुरला मॅजिस्ट्रेट होता. स्पेकिंग धाडशी आणि समयसूचक होता. तो बारफर्ड साहेबासारखा भित्रा नव्हता. तेथल्या रहिवाशांत मुसलमानांची संख्या अधिक होती.

इतर ठिकाणांप्रमाणें येथील शिपायांनीं बंडाला सुरुवात केली नाहीं. पण चोहोकडच्या वार्ता ऐकून शहरांतल्या लोकांचीं मनें मात्र क्षुब्ध झाल्याशिवाय राहिलीं नाहींत. या क्षुब्ध मनःस्थितींत इतर ठिकाणच्या बातम्यांची भर पडत गेल्यामुळें गांवगुंडांनीं शहरांत चोऱ्याचपाट्या, लट्ठालठ्ठी सारखे प्रकार सुरू केले, आणि शेवटीं गोऱ्या लोकांवर हत्यार उपसण्यापर्यंत मजल येऊन ठेपली. कचेऱ्या बंद झाल्या, दुकानें ओस पडलीं आणि शहरवासी सैरावैरा वाट फुटेल तिकडे पळ काढूं लागले. इतकें सगळें झालें तरी शिपायांकडून कोणत्याही प्रकारचें प्रक्षुब्ध मनोवृत्तीचें किंवा बंडाचें चिन्ह दाखविण्यांत आलें नाहीं. तेथील गोऱ्या लोकांचीं बायका मुलें पूर्वीच मसुरीला जाऊन बसलीं होतीं. यामुळें त्यांच्याविषयीं तेथील गोऱ्या लोकांना कांहींच काळजी वाटत नव्हती. जॉइंट मॅजिस्ट्रेट राबर्टसनसाहेब शेजारपाजारच्या खेड्यापाड्यांतून दंगे शांत करीत होता. प्रथम प्रथम त्याच्या या प्रयत्नांना चांगलेंच यश आलें.

रोहिलखंडांत देखील शांतताभंगाचीं चिन्हें स्पष्टपणें दिसूं लागलीं होतीं. रोहिलखंडाचे रहिवाशी स्वातंत्र्यप्रिय आणि कसलेले वीर होते. तेथें बरेली नांवाचें चांगलेंच प्रसिद्ध असें एक शहर आहे. तेथून ४८ मैलांवर उत्तरेकडे मुरादाबाद शहर आहे. मुरादाबादेस २९ वी पायदळ पलटण आणि थोडे गोलंदाज असत. बंडाच्या वेळीं तेथें क्राकरफ्ट विलसन नांवाचा मॅजिस्ट्रेट होता. विलसनसाहेब तेथें फार दिवसांपासून असल्यानें लोकांना त्याचेविषयीं आदर व श्रद्धा वाटे. लोक विलसनसाहेबाला पूज्य मानीत असत. ही परिस्थिति लक्षांत घेऊन त्यानें गव्हर्नराला अर्ज केला कीं, येथील परिस्थितीला तोंड देण्याची जबाबदारी माझ्यावर सोंपवावी. त्याच्या विनंतीला गव्हर्नरानें रुकार दिला. ता. १६ मे रोजीं मीरतचें वर्तमान मुरादाबादेस सर्वतोमुखीं झालें. तेव्हां

विलसनसाहेब छावणींत गेले. तेथें सर्व शिपायांना त्यानें योग्य तो उपदेश केला. शहरांत मुसलमान बरेच होते. त्यांच्या मनोवृत्ति बेफाम झाल्या होत्या. परंतु विलसनसाहेबाच्या अनुभविक आणि जिव्हाळयाच्या उपदेशामुळें शहरवासी आणि शिपाई दोघेही शांत झाले. तेथें नियामतुल्लाखान नांवाचा पेन्शनर मुन्सिफ होता. त्यानें शिपायांना फोडण्याचा विचार केला. निरनिराळे प्रसंग साधून त्यानें शिपायांचीं मनें कलुषित करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला. त्यानें कित्येक देशी फौजेच्या हिंदी अधिकाऱ्यांना खाना दिला आणि त्यांना सांगितलें कीं, "मला दिल्लीच्या बादशहानें आपला येथील प्रतिनिधि नेमिलें आहे. दिल्लीला जुन्या मोंगल बादशहांना अभिषेक झाला आहे. निरनिराळ्या ठिकाणीं माझ्यासारखे बादशहाचे प्रतिनिधि काम करीत आहेत, आणि कित्येक ठिकाणें त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलीं आहेत. अशा वेळीं तुम्हाला माघार घेतां येणार नाहीं. आज जर तुम्ही माझ्या म्हणण्याला कबूल झालांत तर बादशहा प्रसन्न होतील आणि तुमचा हुद्दा वाढवितील. याशिवाय इनामें मिळतील तीं निराळींच. उलट तुम्ही जर आज माझ्या सांगण्याप्रमाणें वागणार नाहीं तर दोन दिवसांनीं बादशाही फौज येथें आली, म्हणजे तुम्हांला तेंच काम खुशीनें म्हणा कीं नाखुशीनें म्हणा करावें लागेलच. पण मग बक्षिस मात्र निराळ्या स्वरूपाचें मिळेल. तें कोणतें म्हणाल तर झाडावर फांशी किंवा कोल्ह्याकुत्र्याकरवीं मरण!!"

याप्रमाणें नियामतुल्लानें साम, दाम, दण्ड, भेद या चतुर्विध प्रसिद्ध नीतीचा प्रयोग करून पाहिला पण तो फुकट गेला. कारण विलसनचें लोकांत फार वजन होतें. तेव्हां त्याला स्वतःच्याच जीविताची भीति वाटून तो दिल्लीला चालता झाला. या वेळीं बंडखोरांच्या टोळया रोहिलखंडांत इतस्ततः भ्रमण करीत असून जागोजागच्या शिपायांना बंड करण्याकरितां प्रोत्साहन देत होत्या. जिकडे तिकडे त्यांच्या अत्याचारांच्या कर्णकठोर वार्ता ऐकूं येत होत्या. परंतु या वार्तांचा मुरादाबादच्या लोकांवर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. उलट ते बंडखोरांचें शासन करण्याचीच खटपट करीत राहिले. परंतु त्यांचा हा निश्चय फार दिवस टिकला नाहीं.

१८ मे रोजीं मुरादाबादेच्या अधिकाऱ्यांना पत्ता लागला कीं पांच मैल अंतरावर बंडखोरांची एक टोळी गंगेच्या कांठीं तळ देऊन बसली आहे, व तिच्या जवळ भली मोठी लुटीची रकम आहे. या टोळीचे साथीदार मुजफ्फरनगराहून

जाऊन त्यांना मिळाले होते. ही बातमी लागतांच विलसन साहेबानें आपल्याबरोबर कांहीं पायदळ आणि थोडे घोडेस्वार घेतले, व त्या टोळीवर हल्ला करण्याकरितां कूच केलें. विलसनसाहेब त्या टोळीच्या जवळ पोहोंचला त्या वेळीं रात्र झाली होती. काळाकुट्ट अंधार पडला होता. अराजक निर्वेधपणें झोपेंत घोरत पडले होते. या वेळीं विलसनसाहेबानें एकदम त्यांचेवर हल्ला केला व टोळींतील जागल्यांना कैद केलें. त्याचा पूर्वींचा विचार असा होता कीं, सर्व काम गुपचुप उरकावयाचें. पण पहारेकऱ्यांना कैद करतांना थोडासा गलबला झालाच. तो ऐकून बंडखोर जागे झाले. एकाएकीं आलेला छापा पाहून ते घाबरले व वाट सांपडेल तिकडे पळत सुटले. अंधार असा किट्ट होता कीं डोळयांत बोट गेलें तरी दिसावयाचें नाहीं. मग शेजारीं वावरत असलेला इसम कसा दिसणार ? त्यांतही तो शत्रुपक्षाचा का स्वपक्षाचा हें ओळखणें तर अशक्यच होतें. अशा संकटांत सांपडल्यानें बंडखोरांना मुकाट्यानें पळून जाण्याखेरीज दुसरा मार्गच उरला नव्हता. या वेळीं फक्त नगदी ८०० रुपये विलसन साहेबाच्या हातीं लागले. लढाईचें हत्यारांसकट सर्व सामानसुमान मिळालें आणि कांहीं कैदी हातीं सांपडले.

दुसरे दिवशीं कांहीं पळपुटे लोक मुरादाबादेस आले व शिपायांचे कान फुंकूं लागले. तेव्हां एका राजभक्त शीखानें त्यांतील एकाला गोळी घालून यमसदनाचा रस्ता दाखविला. कर्मधर्मसंयोग असा विचित्र कीं हा इसम २९ व्या पलटणींतल्या एका शिपायाचा नातलग होता. त्यानें या खुनाचा सूड उगवावयाचा निश्चय केला. आपल्या सोबत्यांपैकीं तडफदार व रागीट माणसांचीं मनें त्यानें उत्तेजित केलीं. याप्रमाणें कांहीं लोक तयार होतांच ते सर्व तुरुंगापाशीं आले आणि सर्व कैद्यांना त्यांनीं मोकळें केलें. कारण गंगेच्या कांठीं कैद केलेल्या लोकांना याच तुरुंगांत कोंडून ठेविलें होतें. याप्रमाणें ६०० कैदी मोकळे झाले.

ही बातमी विलसनसाहेबाला कळतांच तो तुरुंगाकडे येण्यास निघाला. पण आतां त्याचा काय उपयोग ? ६०० कैदी मोकळे होऊन आनंदानें नाचत बागडत चालले होते. त्यांच्यासमोर गेल्यानें उलट प्राणावर बेतावयाची, असा पोक्त विचार करून साहेब परत फिरला, आणि त्यानें रामपूरच्या नबाबाजवळ मदत मागितली. या नबाबाचे कांहीं स्वार मुरादाबादेजवळच डेरा देऊन पडले होते. पण या स्वारांनीं साहेबाला मदत करण्याचें नाकारिलें. २९ व्या पलटणीचे

कांहीं शिपाई बंडखोरांना मिळाले असले तरी बाकीचे शिपाई अजून स्वामिभक्त होते. त्यांच्या मदतीनें पळून गेलेल्या लोकांचा पाठलाग करावयाचें ठरवून विल्सनसाहेब निघाला. त्याच्या या प्रयत्नाला यशही आलें. कारण लवकरच दीडशें शिपाई पुन्हां धरले गेले. नंतर विल्सनसाहेब मुरादाबादेस परत आला आणि त्यानें शहरांतल्या प्रतिष्ठित लोकांना बोलाविलें. ते आल्यावर त्यांना शहरांत शांतता राखण्याची खटपट करण्यास सांगून तो शिपायांना भेटला. त्यांचीही त्यानें नाना प्रकारांनीं समजूत घातली, आणि बायबलची शपथ खाऊन त्यानें सर्व शिपायांना सांगितलें कीं जर तुम्ही राजनिष्ठ रहाल तर तुमचे सर्व अपराध क्षमा करण्याला मी गव्हर्नरजनरलला भाग पाडीन. शिपायांनीं त्याचें म्हणणें कबूल केलें आणि त्यांनीं राजनिष्ठ राहण्याची शपथ घेतली. शहरांत आणि छावणींत पूर्ण शांतता नांदू लागली. दुकानें उघडलीं. लोक आपापलीं नित्याचीं कामें करूं लागले. लपून बसलेले गोरे लोक उजळ माथ्यानें वावरूं लागले. याप्रमाणें मुरादाबाद शहरांत जिकडे तिकडे स्थिरस्थावर होऊन शांतता झाली. पण बाकीच्या जिल्ह्यांत अजून धूमधडाका चालूच होता. २० व्या पलटणीचे आणखी ऐशी लोक कैद झाले. तेव्हां अशीही एक बातमी आली कीं, एक मौलवी रामपूरच्या गांवगुंडांची आणखी एक टोळी तयार करीत आहे. ही बातमी लागतांच विल्सनसाहेब बरेली घाटावर जाऊन थडकला. तेथून गुंडांवर निकराचा हल्ला करितांच मौलवी मारला गेला आणि प्रमुख लोक धरले गेले. बाकीचे गुंड पळून गेले. येथेंही २९ व्या पलटणीनें आंग मोडून मेहनत केली.

दोन दिवसांनंतर दुसरी बातमी आली कीं, रस्ता साफ करणाऱ्या लोकांपैकीं (Sappers and Miners) दोन टोळ्यांनीं बंड पुकारलें आहे आणि लूटमार करीत ते रुरकीहून मुरादाबादेकडे येत आहेत. हें ऐकतांच कॅ. व्हिस २९ व्या पलटणीचे कांहीं शिपाई आणि कांहीं तोफा घेऊन त्यांना अडविण्याकरितां निघाला. ही बातमी शत्रूला कळली. तेव्हां ते मुरादाबादचा रस्ता सोडून तराईच्या बाजूला वळले. तिकडूनही त्यांची वाट अडविली गेल्यामुळें ते कैद झाले. कॅ. व्हिस तेथें पोहोंचतांच त्यानें त्यांचीं शस्त्रास्त्रें आणि कपडेलत्ते त्यांच्याजवळून काढून घेतले. तेव्हां तेदेखील बरेलीकडे निघून गेले.

२९ व्या पलटणीनें प्रत्येक ठिकाणीं इमानें इतबारें काम केल्यामुळें अधिकाऱ्यांना त्यांचा पूर्ण विश्वास वाटला. आणि त्यांच्या बाबतींत अधिकाऱ्यांना

कोणतीच काळजी किंवा शंका राहिली नाहीं. परंतु थोड्याच दिवसांत हें भ्रमपटल दूर झालें. गांव तेथें महारवाडा या न्यायानें मुरादाबादेस दुष्ट लोक होतेच. ते नेहमीं लुटीच्या संधीकरितां टपलेले असत. शिपाई त्यांचा चांगला समाचार घेत, व लूट त्यांच्या पदरांत पडूं देत नसत. तेव्हां हे लोक नवीन युक्ति योजण्याच्या खटपटीला लागले. त्यांनीं शिपायांचीं मनें कलुषित करण्याचा अगदीं नवीन उपाय योजिला. त्यांनीं शिपायांच्या मनांत भरवून दिलें कीं, इंग्रजांचा डाव असा आहे कीं हिंदु मुसलमानांना धर्मभ्रष्ट करावें. हा उपाय विलक्षण परिणामकारक ठरला. शिपायांच्या मनांत इंग्रजांच्या हेतूविषयीं जबर शंका उत्पन्न झाली. आणि प्रत्येकजण एकमेकाला विचारूं लागला कीं हें काय गौडबंगाल आहे ? वातावरण क्षुब्ध झालें. सगळे शिपाई हवालदिल झाले. पण त्यांनीं बरेलीचे लोक काय करितात हें प्रथम पाहण्याचें ठरविलें.

रोहिलखंडाचें मुख्य शहर बरेली असल्यामुळें तिकडे लोकांचें लक्ष एकवटणें साहजिकच होतें. बरेलीला शांतता राहिली तर तेथें कांहीं एक होणार नाहीं हें जवळजवळ ठरल्यासारखें होतें. अशा द्विधा स्थितींतच मे महिना संपला. जूनच्या पहिल्या तारखेला बरेलीची डाक आली नाहीं. यामुळें सर्वांनीं कयास काढिला कीं बरेलीला बंड झालें. अर्ध्या रात्रीं रामपूरच्या नबाबानें पाठविलेला दूत बरेलीची बातमी घेऊन आला. त्यानें विल्सनसाहेबाला कळविलें कीं, 'बरेलीच्या लोकांनीं बंड पुकारिलें. त्यांनीं कित्येक गोऱ्या लोकांना मारून टाकिलें आहे. प्रसंग मोठा कठीण आहे. म्हणून तुम्ही आपले प्राण वांचवा.' अशी विचित्र बातमी येतांच तेवढ्या रात्रीं विल्सनसाहेबानें सर्व अधिकाऱ्यांना गोळा केलें, आणि त्यांच्यांत पुढील कार्याच्या धोरणाविषयीं खलबत सुरू झालें. दुसरे दिवशीं सकाळपर्यंत असें ठरलें कीं खजिना, राजाचा झेंडा, आणि तोफखाना घेऊन सर्वांनीं मीरतला कूच करावें. अधिकाऱ्यांचें एकमत झालें, पण या गोष्टीला शिपाई कबूल होईनात. त्यांनीं स्पष्टच सांगितलें कीं, 'मुरादाबाद सोडून आम्ही गेलों तर आमच्यापुढें दोनच गोष्टी वाढून तयार राहतील. एक तर आम्हाला फांसावर चढवितील, किंवा कैदखान्याची हवा दाखवितील. म्हणून मुरादाबाद सोडून जाण्यास आम्ही मुळींच तयार नाहीं.'

दुसरे दिवशीं शिपायांची क्षुब्ध मनःस्थिती पाहून खजिना शिपायांच्या स्वाधीन करून आपण मीरतला जावें असें इंग्रजांनीं ठरविलें. विल्सनसाहेब स्वतः

तेथें हजर राहिला आणि त्यानें आपल्या हातानें रुपयांच्या थैल्या शिपायांच्या स्वाधीन केल्या. याप्रमाणें एकंदर ७५००० रुपये शिपायांना मिळाले. परंतु त्यामुळें ते फार रागावले. इतके थोडे रुपये खजिन्यांत कसे ? बाकीचे रुपये काय झाले म्हणून त्यांनीं खजीनदाराला जाब विचारिला. पण तो नरमाईनें मात्र नव्हे. दोघे शिपाई खजीनदाराला तोफेच्या तोंडावर धरून त्याला रागानें विचारूं लागले कीं, 'बाकीचे रुपये काय झाले ते सांग नाहीं तर देतों उडवून !' बिचारा खजीनदार गयावया करूं लागला. पण कोणालाच त्याची कींव येणें शक्य नव्हतें. कॅ. फॅडी या वेळीं पुढें झाला आणि त्यानें खजीनदाराचे प्राण वांचविले. याच वेळीं मॅजिस्ट्रेट आणि जज्ज घोड्यावर बसून तेथून जाऊं लागले. तेव्हां कांहीं उतावळ्या लोकांनीं त्यांच्यावर बंदुकी रोखल्या. परंतु सुभेदार भवानीसिंह आणि हवालदार बलदेवसिंह त्यांच्यासमोर आले आणि म्हणाले, "वीरहो, आपल्या प्रतिज्ञा विसरूं नका. इंग्रज म्हणून जेवढा आहे तेवढयाला शत्रू लेखून मारावयाचे नाहीं, फक्त धर्माच्या शत्रूंना कंठस्नान घालावयाचे अशीच ना तुमची प्रतिज्ञा आहे ? मग हें विरोधी वर्तन कसें ?" प्रतिज्ञेची याप्रमाणें आठवण आणि हवाला देतांच सर्व लोक शांत झाले. तेव्हां फौजेचे अधिकारी नैनीतालला निघून गेले आणि इतर सिव्हिलियन लोक मीरतला गेले.

आतां बरेलीला काय झालें तें पाहूं. या वेळीं तेथें गोरी पलटण एक देखील नव्हती. तेथें दोन देशी पलटणी होत्या. एक १८ वी आणि दुसरी ३८ वी. या दोन्ही पायदळ पलटणी होत्या. यांच्याबरोबर एक ८ वी घोडदळ पलटणही तेथें होती. तेथें मुलकी व व्यापार-उदीम करणारे कित्येक गोरे लोक रहात होते. अर्थातच बायकामुलें वगैरे मिळून इंग्रजांची संख्या बरीच होती. तेथील फौजेंत दिल्ली व रोहीलखंडांतील पठाणांची फार भरती होती. ही फौज सुरवातीला अगदीं शांत होती. मीरत व दिल्लीच्या बातम्या आल्या तेव्हां बरेलीच्या फौजेनें त्या पचविल्या. पण रोजची कांहीं तरी नवी बाजारगप्प तयार असेच. या गप्पा आणि अफवांना आळा घालणें अधिकाऱ्यांच्या काबूंत नव्हतें. परंतु या गप्पांवर विश्वास न ठेवण्याबद्दल अधिकाऱ्यांनीं लोकांना परोपरीनें सांगण्याचा उपक्रम मात्र चालू ठेविला होता. याचा फारसा उपयोग होत नाहीं असें पाहून अधिकाऱ्यांनीं परेडची घोषणा केली. तेथें सर्व शिपायांना भोंवतालची परिस्थिति समजावून सांगण्यांत आली, आणि सर्वांकडून राजनिष्ठेची हमी घेणें कसें आवश्यक आहे हेंही त्यांना समजाविलें. या सर्व गोष्टी सैनिकांना पटल्या आणि सर्वांनीं राजनिष्ठेच्या

शपथा घेतल्या. ८व्या घोडदळानेंही तशीच शपथ घेऊन पूर्ण विश्वास दाखविल्यामुळें त्या पलटणींतील जवानांची संख्या वाढविण्यांत आली.

याप्रमाणें सर्वत्र शांतता असतां २९ मे रोजीं एकाएकीं एक देशी आफीसर कर्नल ट्रुप जवळ आला आणि म्हणाला, 'मी आज दोन प्रहरीं स्नान करितांना १८ व्या व ३८ व्या पलटणींतील शिपायांना इंग्रजांचें निर्मूलन करण्याच्या शपथा घेतांना ऐकलें. ते आज दोन प्रहरीं इंग्रजांची कत्तल करणार आहेत.' ही बातमी ऐकतांच क. ट्रुपनें ही गोष्ट कॅप्टन मॅकेन्झी याला कळविली. त्यानें आश्वासन दिलें कीं माझी फौज संकटाच्या वेळीं मदत करील. आपण निःशंक असा. पण त्या दिवशीं विशेष असें कांहीं झालें नाहीं.

पण त्याच सुमाराला फिरोजपुराहून कित्येक सैनिक बरेलीला आले आणि त्यांनीं नाना तऱ्हेच्या अफवा गांवांत पसरविल्या. त्यांतली एक अशी होती कीं इंग्रजांनीं देशी शिपायांची कत्तल करण्याचें ठरविलें आहे. त्याकरितां गोरें सैन्य इकडे येत आहे हें ऐकतांच सर्व शिपाई घाबरले. त्यांना ही अफवा खरी वाटली. आधींच ते पूर्वग्रहदूषित असल्यानें त्यांना सारासार विचार करणें शक्य नव्हतें. त्यांनीं एकदम निश्चय केला कीं, आतां मात्र येथल्या गोऱ्यांपैकीं एकही वांचूं द्यावयाचा नाहीं. अधिकारी सावध होते तरी त्यांना फौजेच्या या नवीन मनःस्थितीचा पत्ता लागला नव्हता. एका मुसलमान सद्गृहस्थानें सैनिकांच्या या पालटलेल्या मनस्थितीचें चित्र कमिशनर अलेक्झांडरसमोर उभें केलें. कमिशनरनें ही गोष्ट ऐकली, पण त्या क्षणीं त्यानें कांहींही केलें नाहीं.

ता० ३० मे ही शांतपणें पार पडली व ३१ तारीख उजाडली. सर्वांना असें वाटत होतें कीं याच दिवशीं हिंदुस्थानांत सर्व शिपाई एकदम गोऱ्यांवर चाल करितील. पण त्या दिवशींही १० वाजले तरी कांहीं झालें नाहीं. अकराचा सुमार असेल नसेल तोंच छावणींतून तोफेचा धडाका ऐकूं आला. हा धडाका ऐकतांच गोरे लोक घाबरले. सर्वांना वाटलें कीं हा आवाज म्हणजे सर्व सैनिकांना एकत्र करण्याचा इशारा आहे. आतां सर्व फौज एका ठिकाणीं जमतांच इंग्रजांवर हल्ला करितील.

तोफेचा धडाका ऐकूं येतांच कित्येक गोरे घोडदळाच्या मागील बाजूस असलेल्या आमराईत दडून बसले. येथून घोडदळ अगदीं जवळ होतें. पहातां पहातां पायदळ सैन्यानें इंग्रजांच्या बंगल्यावर चाल केली. बंदुकींचे

आवाज ऐकूं येऊं लागले. धुराचे लोटचे लोट दिसूं लागले. बंगल्याच्या छपरांना आग लागली. जूनचा महिना नुकताच सुरू झाला होता. डोक्यावर सूर्य आपल्या प्रखरतर किरणांचा वर्षाव करीत होता. उन्हाळी वारा जोरानें वाहात होता. त्यामुळें बंगल्याच्या आगीनें क्षणार्धांत उग्र स्वरूप धारण केलें, आणि सर्व बंगले लवकरच धुळीस मिळाले. हें काम संपतांच शिपाई इंग्रजांचे प्राण घ्यावयाला उत्सुक झाले. इंग्रज दिसतांच त्यांनीं बार करावयाला सुरुवात केली. ब्रिगेडिअर रिबोल्ड गोळी लागून पडला. तो मेल्यावर कर्नल ट्रूप सेनेचा नायक झाला. आतांपर्यंत गोलंदाज आणि ६८ वी पायदळ पलटणच तेवढी अराजक झाली होती. इंग्रज लोक हवालदिल होऊन किंकर्तव्यमूढ झाले होते आणि ह्मणून ते स्तब्ध उभे होते. कांहीं वेळ अशा रीतीनें गेल्यावर त्यांची कर्तव्यबुद्धि जागृत झाली.

पूर्वीं सांगितलेल्या आमराईत लपलेले गोरे लोक संकट आलेलें पाहतांच नैनीतालकडे घोडे उडवीत निघून गेले. घोडदळानें आतां १८ व्या पलटणीचें मन बंड करण्याकरितां वळविण्यास सुरुवात केली. आतांपर्यंत १८ व्या पलटणीचा इंग्रज अधिकाऱ्यांना भरंवसा होता. ती पलटणही बंडखोरांना मिळाली तेव्हां ते हतबुद्ध झाले. दुसरा कोणताही उपाय त्यांना शक्य नसल्यामुळें ते नैनीतालला जाण्याकरितां तयार झाले. पण रस्त्यांत कित्येक दुष्ट लोक त्यांना भेटले आणि त्यांनीं या गोऱ्या लोकांना मारून टाकिलें. मुरादाबादच्या कालविन साहेबाच्या प्रयत्नानें त्यांतील थोडेसे वांचले.

यानतर उरलेल्या गोऱ्यांचे बरेलीस फार हाल झाले. त्यांपैकीं कांहीं कसेबसे जीव घेऊन पळाले, आणि कांहींना अत्यंत कठोर हाल सहन करीत प्राण सोडावे लागले. याप्रमाणें इंग्रज नांवाला देखील तेथें राहिले नाहींत. यानंतर बंडखोर विचार करूं लागले कीं आतां येथला शासनकर्ता कोणाला नेमावें ? रोहीलखंडांत पूर्वींपासून मुसलमानी अमदानींत नांवाजलेलें एक थोर घराणें नांदत असे. त्या घराण्याच्या मूळ पुरुषाचें नांव हाफिज रहमतखान ? या रहमतखानच्या वंशांतले दोघे इसम बंडखोरांच्या टोळींत हजर होते. एकाचें नांव बहादुरखान आणि दुसऱ्याचें मुबारकशाह होतें. हाफिज रहमतखानची वीरता आणि मायभूमीकरितां युद्धक्षेत्रांत त्यानें केलेलें आत्मार्पण रोहिले अजून विसरले नव्हते. यामुळें त्याचा वंशज बहादुरखान याला रोहिलखंडाचा नबाब करावा असें सर्वांना वाटत होतें. मुबारकखानाला वाटे आपणही नबाब होण्याला पात्र आहोंत. पण या वेळीं

पात्रापात्रतेपेक्षां सवंग लोकप्रियता हीच सर्वांत मोठी लायकी मानली जात होती. जो जितका लोकप्रिय असेल तितका तो योग्यतेंत आणि लायकींत मोठा समजला जाई. यामुळें वारें वाहील तशी पाठ देण्याशिवाय मुबारकखानाला गत्यंतर नव्हतें. बहादुरखानाला सरकारकडून दुहेरी पेन्शन मिळत असे. त्यानें कंपनी सरकारच्या दरबारीं सदर अमीनी करून पेन्शन घेतलें होतें. शिवाय तो रोहिलखंडाचा नबाब रहिमतखान याचा वंशज होता. म्हणूनही त्याला राजकीय पेन्शन मिळत असे. इंग्रज अधिकाऱ्यांना स्वप्नांत देखील वाटलें नसेल कीं, हा बहादुरखान खाल्या घरचे वांसे मोजणारा बहाद्दर आहे. अस्तु. आतां त्याला नबाबी मिळाली होती. तिचा त्यानें उपयोग कसा केला तो पहा. इंग्रज आणि काळे ख्रिस्ती निवडून काढून त्या सर्वांना त्यानें कंठस्नान घातलें. केवढें पुण्य कार्य (?) हें! त्याच्याजवळ दया म्हणून नव्हतीच. समोर धर्मलंड काफर आला कीं दे त्याला फांशीं, हाच त्याचा न्याय! व हाच त्याचा धर्म!!

ख्रिस्ती लोकांची कत्तल केल्यानंतर त्यानें आपले अधिकारी ठिकठिकाणीं नेमिले. छत्रचामरांनीं युक्त अशी त्याची मिरवणूक शहरांतून निघाली. इंग्रजांचें राज्य नष्ट होऊन पुन्हा नबाबी सुरू झाली अशी द्वाही फिरली. मोंगल सम्राटाच्या नांवानें कर वसूल होऊं लागला. स्वराज्य मिळालें पण तें सुराज्य नव्हतें. प्रजेला सुख मिळेना. त्यामुळें ती असंतुष्ट राहूं लागली. नबावशाहींत बळी तो कान पिळी असा न्याय सुरू झाला. निर्बल आणि अनाथांचा वाली कोणीच उरला नव्हता. मग काय विचारावें? जिकडे तिकडे एकच गोंधळ माजला. आजपर्यंत बंडखोरांना न मिळालेले तालुकदार, जहागिरदारही, आतां उघड उघड बंडखोर बनले.

बहादुरखान नबाब झाला तरी त्याला शत्रूंची वाण नव्हती. बहादुरखानाला न चाहणारी अशी एक पलटण बंडखोर बनलेली होती. बहादुरखान या पलटणीविषयीं नेहमीं साशंक असे. गोलंदाजांच्या पलटणीचा नायक सुभेदार बख्तखान, बहादुरखानाच्या पक्षाचा नसून मुबारक शहाचा पक्षपाती होता. तेव्हां मुबारकशहानें एक निराळीच क्लृप्ति योजिली. त्यानें बख्तखानाला दिल्लीला पाठविलें. उद्देश हा कीं त्यानें बादशाहाजवळ रदबदली करावी आणि बहादुरखानाच्या ऐवजीं आपल्या नांवानें सुभेदारीची सनद आणावी. बख्तखान त्याप्रमाणें दिल्लीस चालता झाला.

शहाजहानपुर येथें बरेलीचीच पुनरावृत्ति झाली. तेथें २८ वी पलटण असे आणि तिचा नेता कॅ. जेम्स होता. १५ मे रोजीं मीरतच्या प्रसंगाचें वर्तमान

शहाजहानपुराला सर्वतोमुखीं झालें. शहरांत खळबळ उडाली. पण शिपायांच्या राजनिष्ठेविषयीं अधिकारी निश्चिंत होते. त्यांना सैनिकांचा पूर्ण विश्वास होता कीं संकटसमयीं ते आपलाच पक्ष घेतील, इतरांचा घेणार नाहींत.

३१ मे रोजीं रविवार होता. त्या दिवशीं सर्व गोरे चर्चमध्यें गेले होते. एकाएकीं शिपायांनीं बंड केलें. इतर ठिकाणाप्रमाणें येथेंही गोऱ्यांचे बंगले जाळले आणि लुटले गेले; खजिना लुटला आणि कैद्यांना सोडून दिलें. गांवांतले बदमाश बंडखोरांत सामिल झालें आणि वाटेल तसा नंगानाच घालूं लागले. एका रात्रींतच असें वाटूं लागलें कीं इंग्रजी सत्ता नष्ट झाली. तेथल्या इंग्रजांना अनेक कठोर संकटांशीं सामना करावा लागला. कारण लुटालूट झाल्यावर बंडखोरांनीं निश्चय केला कीं इंग्रज म्हणून जेवढा असेल तेवढा मारून टाकावयाचा. याकरितां बंडखोरांनीं इंग्रजांवर चाल केली. या वेळीं ते सर्वजण चर्चमध्यें ईश्वरोपासनेंत गर्क होते. याप्रमाणें ते गैरसावध असतांना त्यांच्यावर हल्ला झाला आणि तोही ध्यनींमनीं नसतां ! यामुळें कित्येक लोक प्रतिकारासाठीं हातही न उचलतां यमसदनला गेले. कित्येकांनीं चर्चची दारें बंद करून घेतलीं आणि तेथेंच ते आंत लपून बसले.

याच वेळीं छावणींतही गडबड झाली. कॅ. जेम्स शिपायांची समजूत काढावयास परेडवर गेला, आणि त्यांच्या एका गोळीला बळी पडला. एक इंग्रज डॉक्टर इस्पितळांतून घरीं परत जात असतां त्याच्यावर शस्त्रप्रहार होऊं लागला; पण त्याचें नशीबच शिकंदर असल्यामुळें तो कसाबसा प्राण घेऊन घरीं पोहोंचला. घरीं तरी त्याला स्वस्थपणें कुठें बसतां येत होतें ? बायको आणि मुलगा यांच्या बचावाची त्याला तजवीज करणें भाग होतें. म्हणून बायको आणि मुलगा यांना एका गाडींत बसवून तो स्वतः गाडी हाकावयास बसला. सर्व इंग्रज चर्चमध्यें गेले होते. तिकडेच तोही निघाला. शिपायांची नजर डॉक्टरावर पडण्याचाच अवकाश ! लागलीच बंदुकी त्याच्यावर रोखिल्या गेल्या. डॉक्टर बिचारा कोलमंडून गतप्राण होऊन गाडीवरून खालीं पडला. त्याच्या बायकोला देखील जखम झाली. पण ती कशीबशी धडपड करीत मुलाला घेऊन चर्चमध्यें जाऊन पोहोंचली आणि तिनें आपले व मुलाचे प्राण वांचविले. इतके सर्व अत्याचार चालू असतां सुमारें शंभर शिपायांना या अत्याचारांचा वीट आला आणि ते इंग्रजांना मदत करायला तयार झाले. त्यांनीं चर्चमध्यें जमलेल्या इंग्रजांना व त्यांच्या

बायका मुलांना ' पौहाई ' गांवीं पोहोंचविण्याचें ठरविलें. परंतु तेथें पोहोंचल्यावर तेथील लोकांनीं सांगितलें कीं आम्ही या समयीं यांचें रक्षण करूं शकत नाहीं. तेव्हां नाइलाज होऊन त्यांना परत फिरावें लागलें, आणि तें सर्व अयोध्या प्रांतातील 'मुहम्मदी' नामक गांवीं निघून गेले.

बरेलीपासून ३० मैलावर बदाऊं नांवाचें शहर आहे. तेथें एडवर्डसाहेब मॅजिस्ट्रेट आणि कलेक्टर होते. या गृहस्थानें पूर्वी हिंदुस्थान सरकारच्या परराष्ट्र मंत्र्याजवळ काम केलें होतें. याला कळून चुकलें होतें कीं दिवाणी कोर्टें निघाल्यापासून देशी लोकांची कशी दैना झाली आहे. यावरून त्यानें अंदाज केला होता कीं एक दिवस हे सर्व लोक इंग्रजांविरूद्ध बंड करतील. म्हणून प्रथम सावधगिरी राखून त्यानें बायकामुलांना नैनीतालला पाठवून दिलें. आणि तो एकटाच आपलें कर्तव्य बजावण्याकरितां तयार झाला. तेथें दुसरा एक देखील इंग्रज नव्हता. तेव्हां अशा धामधुमीच्या काळांत प्राण मुठींत घेऊन आपलें कर्तव्य बजावणाऱ्या या साहेबाची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहें.

२५ मे रोजीं त्याला बातमी लागली कीं आज कोणत्या तरी वेळीं बंड होणार. त्या दिवशीं मुसलमानांचा सण होता. सर्व मुसलमान ' ईद ' असल्यामुळें आनंदांत मग्न होते. दंगा होण्याचा संभव जाणून मॅजिस्ट्रेटनें मुख्य मुख्य मुसलमान पुढाऱ्यांना अडकवून ठेवावयाचें ठरविलें. ही मडंळी त्याला भेटावयाला आली तेव्हां त्यानें त्यांना गोष्टींत गुंतवून ठेविलें. या पुढाऱ्यांना त्यानें शांतता राखणें कसें जरूर आहे हें बराच वेळपर्यंत समजाविलें, आणि हें काम त्यांचेवरच सोंपविलें. याप्रमाणें बराच वेळ गोष्टी आणि वादविवाद झाला. त्यांत असें दिसून आलें कीं कांहीं लोक फार तापट आणि जहाल आहेत. पण बंड पुकारण्याच्या ठरलेल्या वेळेपर्यंत वादविवाद चालू असल्यानें एडवर्ड साहेबाचा हेतु पूर्ण झाला. ही सभा बरखास्त झाली आणि त्या दिवशींचें संकट टळलें. आणखी दोन दिवस शांतपणें पार पडले, पण तिसऱ्या दिवशीं साहेब खाना खात बसले असतां एटाचा मॅजिस्ट्रेट फिलिप्स तेथें आला. हा फिलिप्स एडवर्डच्या नात्यांतला होता. त्यानें आपल्या बरोबर कांहीं स्वारही आणले होते. एटा जिल्ह्यांत जिकडे तिकडे बंडाळी माजली असल्यामुळें, खून खराबी, जाळपोळ, लुटालूट इत्यादि गोष्टी तेथें चालू होत्या. म्हणून त्या संकटांतून प्राण वांचवून फिलिप्स साहेब आश्रय मागायला बदाऊंला आला होता. एव्हाला असा भयंकर उत्पात सुरू असतां फिलिप्स साहेब त्यांतून

बचावून सुरक्षितपणें जिवानिशीं आला हें पाहून एडवर्डला आनंद झाला. परंतु त्याला सखेद कबूल करावें लागलें कीं, 'तुझ्या रक्षणाचें साधन मजजवळ नाहीं.' त्यावेळीं प्रत्येकाला आपलें स्वतःचें रक्षण आणि आपल्या ताब्यांतल्या मुलखाचें रक्षण करण्याचीच पंचाईत होती. मग एकमेकाला मदत कोण कशी करणार ?

एडवर्ड साहेबाला थोड्या वेळानें खबर लागली कीं बंडखोर मिलसा नांवाच्या व्यापारी पेठेवर चढाई करणार आहेत. त्यानें या कृत्याचा प्रतीकार करण्याकरितां बरेलीच्या कमिशनरजवळ मदतीची मागणी केली. ३१ मे रोजीं रात्रीं नऊ वाजतां कमिशनरकडून उत्तर आलें कीं, एका युरोपियन अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखालीं एक पलटण रवाना केली आहे. हें उत्तर ऐकून दोघांही मॅजिस्ट्रेटांना आनंद झाला. एडवर्डनें एक स्वार येणाऱ्या कुमकेचें स्वागत करण्याकरितां सामोरा पाठविला. इकडे फिलिप्सनें रात्रीं तीन वाजतां एट्याकडे परत कूच करावयाचें ठरविलें, आणि दोघेही साहेब निद्रादेवीची आराधना करण्याच्या इराद्यानें शयनागारांत प्रवेश करिते झाले. पण विधिलिखित कांहीं निराळेंच होतें. रात्रीं अडिचाचा सुमार असेल नसेल, त्यावेळीं एडवर्डसाहेबाचा एक नोकर शंख करीत आला. साहेबाला त्यानें झोंपेंतून जागें केलें, आणि सांगितलें कीं बरेलीहून कोणी आलें नाहीं. कारण तेथील शिपायांनीं बंड केलें. तेथील गोऱ्यांचे खून होत आहेत, खजिना लुटला गेला आणि ४००० कैदी मोकळे झाले आहेत. हे कैदी लुटालूट जाळपोळ करीत इकडेच येत आहेत आणि येथेंही त्याच अत्याचारांची पुनरावृत्ति करण्याचा त्यांचा विचार आहे.

ही वार्ता कसली ? मूर्तिमंत काळच आ पसरून येत असल्याची ही वार्ता होती. फिलिप्सनें पाहिलें कीं आतां उशीर करणें समंजसपणाचें होणार नाहीं. तेव्हां त्यानें एटाकडे एकदम कूच केलें. तो निघून गेल्यावर दुसरे तिघे अधिकारी एडवर्ड साहेबाला भेटले. आतांपर्यंत एडवर्ड साहेबाचा बदाऊं सोडून जाण्याचा निश्चय नव्हता. कारण त्याच्या देशी फौजेच्या अधिकाऱ्यांनीं त्याला आश्वासन दिलें होतें कीं, येथील शिपाई बरेलीच्या बंडखोरांना सामील होणार नाहींत. उलट त्यांचें पारिपत्य करण्याला मदत करतील. परन्तु शिपायांचा हा निश्चय फार वेळ टिकला नाहीं. कारण बरेलीचे बंडखोर तेथें येऊन त्यांचीं मनें वळवूं लागतांच त्यांचीं अभिवचनें विरघळलीं व निश्चय डळमळला. तेव्हां नाइलाज होऊन एडवर्ड साहेबाला पळता पाय काढावा लागला. मागाहून आलेले

तिघे गोरे आणि एडवर्ड असे चौघेजण घोड्यावर स्वार होऊन निघाले. ते थोड्या अंतरावर गेले असतील नसतील इतक्यांत एक प्रतिष्ठित मुसलमान गृहस्थ त्यांचेजवळ आला आणि त्यांना म्हणाला, "साहेब, शहर सोडून जाण्याचा आपला प्रयत्न आतां व्यर्थ आहे. बंडखोरांनीं कैद्यांना सोडचिट्ठी दिली आहे आणि त्या सर्वांनीं मिळून चारी वाटा अडविल्या आहेत. म्हणून म्हणतों आपण दुसरीकडे कोठेंही जाण्याचा बेत रहित करा आणि पुन्हा परत फिरून आपल्या घरांत लपून बसा." हा भला माणूस बदाऊं जवळच्या एका गांवचा रहिवाशी होता. एडवर्ड साहेबानें त्याच्याच घरीं रहावयाची आपली इच्छा दर्शविली. हा वेळपर्यंत जिकडेतिकडे धुमाकूळ माजली होती. शहरांत मारहाण, लुटालूट, जाळपोळ अशी एकच दंगल उडाली होती. या धांदलींत साहेबाचे नोकर लोकही आपला खिसा गरम करीत असलेले पाहून त्यास संताप आला. पण संतापून उपयोग कांहींच होण्यासारखा नव्हता. त्याला नुसतें चरफडत रहाण्यापलीकडे कांहीं करणें शक्य नव्हतें. म्हणून तो मुकाट्यानें रस्त्यानें चालला होता. ही चौकडी जेव्हां शेखपुरला पोहोंचली, तेव्हां वर सांगितलेल्या भल्या माणसाचा भाऊ त्यांना येऊन भेटला, आणि त्यानें साहेबाला सांगितलें कीं, "इतक्या लोकांना मी आपल्या घरांत आश्रय देऊं शकत नाहीं. कारण इतके लोक येथें राहिले म्हणजे बंडखोरांना सहज पत्ता लागेल. म्हणून आपण सर्वजण येथून १८ मैलांवर एक गांव आहे तेथें लपून बसा." या बोलण्यानें एडवर्ड साहेबाची तब्यत गरम झाली. ते हट्ट धरून बसले कीं आम्ही सर्वजण येथेंच राहूं. परंतु त्यांचा आश्रयदाता साहेबांच्या दरडावण्याला भीक घालणारा नव्हता. त्यानें साफ सांगून टाकिलें कीं, "तुम्ही साहेब, आणि त्यांतूनही कमिशनर असलां म्हणून काय झालें? तुम्हाला येथें आश्रय देऊन बंडखोरांकडून आपली स्वतःची अब्रू घालविण्यांत मला भूषण वाटत नाहीं. एडवर्डसाहेब, तुम्हाला एकट्याला हवा तर मी आश्रय देतों. पण तुमच्याशिवाय इतरांना मी येथें मुळींच राहूं देणार नाहीं." साहेब आपल्या सोबत्यांना सोडावयास तयार नव्हता. तेव्हां निमूटपणें साहेबाला आपल्या आश्रयदात्याचें म्हणणें पटलें आणि ते सर्वजण हिंदुस्थानी पोषाख करून निर्दिष्ट स्थानीं जाऊन राहिले.

इकडे बदाऊंत मॅजिस्ट्रेट निघून गेल्यामुळें लोकांना चांगलेंच फावलें. लुटालूट निःशंकपणें आणि राजरोस सुरू झाली. वाटेल तो वाटेल त्याला लुटूं आणि मारूं लागला. त्या शहरांतला प्रत्येक इसम आपणालाच तेथला राजा मानूं

लागला. मनसोक्त धांगडधिंगा घालून शिपाई दिल्लीला निघून गेले. ते गेल्यावर गांवगुंडांना मोकळीक मिळाली. बहादुरखानाच्या नांवानें सर्वत्र द्वाही फिरली. त्याचे तर्फे नवे अधिकारी नेमले गेले, आणि इंग्रजी सत्ता सर्वथैव नष्ट झाली.

आतां बहादुरखानानें आपली सत्ता मजबूत करण्याची नवी योजना अमलांत आणली. रोहिलखंडांत हिंदुलोकही कमी नव्हते. या हिन्दु लोकांनीं इंग्रजांना मिळूं नये अशी खटपट सुरू झाली. याकरितां बहादुरखानानें एक जाहिरनामा काढिला कीं, " जर हिंदु लोक इंग्रज आणि ख्रिस्ती लोकांना नामशेष करण्यांत मदत करतील, तर गोहत्या कायमची बंद केली जाईल. आणि जर कां हिंदु लोक आमच्या पक्षास न मिळतां गोऱ्यांना जाऊन मिळतील तर प्रत्येकाला सहा सहा महिन्याची कैद होईल व गोहत्या जोरांत सुरू होईल. " पण यापुढें खानाला अशी शंका आली कीं इंग्रजही असेंच करतील आणि मग मात्र हिंदु आपल्याला मिळणें कठिण जाईल. म्हणून त्यानें दुसरा जाहीरनामा काढून असें जाहीर केलें कीं, ' माझ्या प्रजेपैकीं कोणींही इंग्रजांवर विश्वास ठेऊं नये. हे लोक मोठे दगेबाज आहेत. ते कधींही आपलें वचन पाळीत नाहींत. त्यांच्या प्रत्येक कामांत स्वार्थ ओतप्रोत भरलेला असतो. हे भुलथापा देऊन प्रथम आपलें हित साधून घेतील व मग तुच्छता आणि तिरस्कार हेंच तुमच्या वांट्यास येईल. आजपर्यंत कित्येकांना भुलथापा देऊन यांनीं फसविलें आहे. ' याप्रमाणें किती तरी आक्षेप आणि दोष त्यानें इंग्रजांच्या माथीं मारिले. तसेंच नाना प्रकारचीं कारणें सांगून त्यानें लोकांजवळून पैसे उकळण्यास सुरुवात केली.

याच सुमारास फरुखाबादलाही तसलाच भयंकर प्रकार घडला. फरुखाबाद हा जिल्हा आग्रा विभागांत मोडत असे, परंतु भौगोलिक परिस्थितीच्या दृष्टीनें तो रोहिलखंडाच्या सीमेवरचा जिल्हा होय. लोक-राहाणी आणि रीतिभातीवरून त्याला रोहिलखंडाचाच एक भाग म्हटलें पाहिजे. येथील रहिवाशांत मुसलमान बहुसंख्याक होते. हा भाग इंग्रजी अमलाखालीं येण्यापूर्वी येथें चोऱ्या, डाके, खून व मारामाऱ्यांचें सत्र चालत असे. परंतु इंग्रजांनीं या सर्व गोष्टी बंद करून शांतता प्रस्थापित केली होती. असें असलें तरी रहिवाशांच्या मूळच्या स्वभावांत फारसा फरक पडला नव्हता. कारण ' स्वभावो दुरतिक्रमः. ' या बदमाशांना नव्या राजवटींत मनसोक्तपणें वागण्याची मुभा नसल्यामुळें ते मनांतून इंग्रजांचा द्वेष करीत. जिकडे तिकडे बंड माजल्यानें त्यांना हवी होती ती संधी एकदांची सांपडली. मे महिना संपण्याच्या आंतच सर्व जिल्हाभर बंडाचा अग्नि पेटला !

येथें मोंगलाईतील नबाबांच्या वंशांतील कित्येक लोक होते. पण त्यांची स्थिति अतिशय खालावलेली होती. ही आपली शोचनीय स्थिति इंग्रजी सत्तेमुळें झाली अशा समजुतीनें तेही इंग्रजांचे मनांतून शत्रूच बनले होते. बंडामुळें त्यांना देखील अवसर सांपडला. त्यांची फूस असल्यानें गांवोगांवीं लुटालूट आणि खून होऊं लागले. शिपायांनीं मात्र येथें कांहीं गडबड केली नाहीं.

१८५७ च्या आरंभापासूनच कटवाल्यांनीं लोकांची अशी समजूत करून ठेविली होती कीं, इंग्रज हिंदी लोकांच्या जाती आणि धर्म नष्ट करण्याच्या खटपटींत आहेत. तसें म्हटलें तर असल्या बातम्या देशाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचल्या होत्या; पण या जिल्ह्यांत त्यांनीं मोठाच कहर गुजरविला. आणखीही एक वदंता येथें पसरली होती. इंग्रज हिंदुस्थानांतील सर्व चांदी आपल्या देशांत नेणार आहेत, आणि म्हणून ते चांदीचे रुपये तेवढे लोकांजवळून घेऊन त्या ऐवजीं चामड्याचे किंवा कागदाचे रुपये येथें चालू करणार आहेत. या वदंतेमुळें व्यापाराला मोठाच धक्का बसला आणि इंग्रजांविरुद्ध द्वेष अधिकच वाढला.

फरुखाबादेच्या पठाणांनीं जवळच असलेल्या फतेहगड जिल्ह्यांतही हें विष पेरिलें. मे महिन्याच्या १० व्या तारखेस मीरतला जी हकीकत झाली तिची बातमी फतेहगडच्या शिपायांना लागली. या बातमीमुळें शिपायांना बंडाची स्फूर्ति झाली असली तरी तिचा परिणाम तात्काल दृष्टीस पडला नाहीं. मे महिना संपून जून सुरू झाला. ता. ३ जूनला बरेली आणि शहाजहानपुरच्या बातम्या आल्या, तेव्हां मात्र शिपायांची चलबिचल सुरू झाली. येथील पायदळ पलटणींचा नायक कर्नल स्मिथ होता. त्यानें औध आणि रोहिलखंडांत बंड पसरलेलें पाहिलें आणि सर्व बायका मुलांना व आजारी लोकांना कानपूरला पाठवून दिलें. त्यांना कानपूरलाच पाठवावयाचें कारण असें कीं, तेथें हा वेळपर्यंत शांतता होती आणि बरेंच इंग्रज सैन्य तेथें लखनौहून येऊन पोहोंचलें होतें, अशी स्मिथला बातमी लागली होती. लवकरच दहा बारा नावा तयार केल्या आणि जूनच्या चवथ्या तारखेला रात्रीं दोन वाजतां दीडशें पावणेदोनशें बायकामुलें अंधाराचा फायदा घेऊन व तेथील शिपायांची नजर चुकवून कानपुरला जावयास निघालीं. त्याच दिवशीं खजिन्यांतले रुपये किल्ल्यांत नेऊन ठेविण्याचा कर्नल स्मिथचा विचार होता, पण तो मात्र साधला नाहीं.

जूनच्या १६ व्या तारखेला कर्नल स्मिथला एक पत्र दाखविण्यांत आलें. हें पत्र अयोध्या प्रांतांतील सीतापूरच्या ४१ व्या पलटणीच्या सुभेदारानें लिहिलें

होतें. त्यांतील मजकुराचा आशय असा होता:– 'आम्हीं इंग्रजांविरूद्ध बंड पुकारिलें आहे. आतां तुम्हीदेखील आपल्या कर्तव्याला जागा. आणि आम्हाला मदत करा. खजीना लुटा व गोऱ्या अधिकाऱ्यांचीं शिरें धडापासून वेगळीं करा.' वगैरे वगैरे. एका हिंदी अधिकाऱ्यानेंच हें पत्र कर्नलसाहेबाला दाखविलें होतें. त्याच अधिकाऱ्यानें स्मिथला त्यावेळीं असेंही वचन दिलें कीं, 'आमच्याविषयीं तुमच्या मनांत कोणतीच शंका राहूं देऊं नका. आम्ही कधींही निमकहराम होणार नाहीं.' हें ऐकून कर्नल स्मिथला अत्यंत हर्ष झाला. त्यानें गंगेवरील पूल तोडण्याचा हुकूम दिला. असें केल्यानें बंडखोर शिपायांचा फतेहगडला येण्याचा मार्ग बंद झाला.

परंतु जूनच्या तिसऱ्या आठवड्यांत फतेहपुरला जी बंडाची लाट उसळली, तिनें दहाव्या पलटणीला आपल्या प्रवाहाबरोबर ओढून नेलें. या पलटणीनें स्मिथ साहेबाला स्पष्टपणें सांगून टाकिलें कीं आम्ही बंड पुकारणार, तेव्हां तुम्ही किल्ल्याचा आश्रय लवकर घ्यावा हें बरें. नाइलाजास्तव त्याला किल्ल्याचा आश्रय घ्यावा लागला. पण किल्ला चांगला मजबूत नव्हता. तेथें पुरेसें अन्न-पाणी नव्हतें आणि दारूगोळाही नव्हता. जेमतेम चाळीस पन्नास मेंढरें किल्ल्यांत पोहोंचूं शकलीं आणि किल्ल्यांत माणसें होतीं सुमारें सवाशें. अशा स्थितींत किल्ला लढवावयाचा कसा, असा बिकट प्रश्न त्यांच्यापुढें येऊन पडला. पण निरुपाय झाला असला तरी प्रसंगाला तोंड तर दिलेंच पाहिजे. आणि इंग्रजांची ही चिकाटीची कर्तव्यनिष्ठाच त्यांना फलद्रूप पुढें झाली.

शहरांत शिपायांनीं धुमाकूळ माजविला. फरुखाबादेच्या तफज्जुल हुसैन नांवाच्या मनुष्याला नबाबी अर्पण करून त्यांनीं कैद्यांना मुक्त केलें आणि खजिना लुटला. पंजाबकेसरी रणजीतसिंहाचा मुलगा दिलीपसिंह, याचें जप्त केलेलें जडजवाहीर येथील खजिन्यांतच होतें. तें सर्व बंडखोरांनीं लुटलें. परंतु नव्या नबाबाला या लुटींतून फुटकी कवडीदेखील मिळाली नाहीं. इतक्यांत सीतापुरचे शिपाई तेथें येऊन पोहोंचले आणि त्यांनीं गंगेचा पूल मोडलेला पाहिला. पण पूल मोडलेला असला म्हणून ते माघार घेणारे नव्हते. त्यांनीं नदींत नावा सोडिल्या आणि दुसऱ्या किनाऱ्यावर पाय ठेविला. फरुखाबादेस आल्यावर त्यांनीं खजिन्यांतल्या लुटीची वांटणी मागितली. १० व्या पलटणींतले लोक आपण केलेल्या लुटीचा हिस्सा द्यावयाला तयार नव्हते. यामुळें दोन्ही पक्षांत बरीच बाचाबाची झाली, आणि आतां अतिप्रसंग होऊन आपसांतच लढाई

जुंपणार असें पाहतांच, दहाव्या पलटणीचे लोक शहर सोडून आपापल्या घरीं जाऊं लागले. त्यांनीं शहरांत बराच धुमाकूळ माजविला असला तरी त्यांनीं आपल्या अधिकाऱ्यांची हत्या केलेली नव्हती, आणि त्यांची तसें करण्याची इच्छाही पण नव्हती. तसेंच अधिकारी व इतर गोरे लोक यांचे बंगलेही त्यांनीं जाळून उध्वस्त करून टाकिले नव्हते. इतकेंच नव्हे तर अधिकारी गैरहजर असतांही त्यांची मालमत्ता त्यांच्या घरांतून या लोकांनीं लुटली नव्हती. खजिन्यांतील लूट त्यांना इतकी मिळाली होती कीं, ते संतुष्ट झाले आणि ती लूट त्यांनीं आपसांत वांटून घेतली. यांतील हिस्सा द्यावा लागणार असें दिसतांच बऱ्याचशा लोकांनीं आपल्या घरचा रस्ता धरला. शिल्लक राहिलेले लोक बाहेरच्या बंडखोरांबरोबर चांगलेच भांडले. पण शेवटीं दोघांनीं आपसांत समेट केला आणि दोघांनीं मिळून किल्ल्यांतील लोकांवर हल्ला करावयाचें ठरवून त्याकरितां २५ जून हा दिवस योजिला. फरुखाबादेच्या नबाबानें यांना रसद व शस्त्रास्त्रें पुरविलीं. परंतु हे लोक २५ तारखेची वाट पहात स्वस्थ पडून राहिले. शत्रु गैरसावध आहेत असें पाहून किल्ल्यांतील इंग्रजांनीं आपल्या रक्षणाचे उपाय दृढतर करण्याचें योजिलें.

२५ जूनचा दिवस उजाडतांच बंडखोर शिपायांनीं किल्ल्याची झाडलोट करणाऱ्या कामकऱ्यांवर गोळीबार केला, आणि दुसऱ्या दिवशीं किल्ल्यावर तोफांचा भडिमार करण्यांत आला. बराच वेळ तोफांचा मारा करूनही इष्ट तो परिणाम होत नाहीं असें पाहतांच त्यांनीं तोफा बंद केल्या. दुसऱ्या दिवशीं जागोजागीं शिड्या लावून किल्ल्याच्या भिंतीवर चढून जाण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण तोही सफळ झाला नाहीं. तिसरे दिवशीं त्यांनीं पुन्हा तोच प्रयत्न करून पाहिला. परंतु इंग्रजांनीं गोळीबार करून त्यांचा प्रयत्न हाणून पाडिला. पांचव्या दिवशीं बंडखोरांनीं एक नवीन युक्ति योजिली. ते किल्ल्याजवळच्या एका गांवांत शिरले आणि घरांच्या छप्परांवर उभे राहून किल्ल्यांत गोळ्यांचा वर्षाव करूं लागले. कांहीं लोकांनीं किल्ल्याच्या प्रवेशद्वाराजवळचे घरावर कब्जा केला आणि तेथून किल्ल्याच्या भिंतीला एक भोंक पाडिलें. त्यांतूनच ते गोलंदाजांवर गोळीबार करूं लागले. या आकस्मिक गोळीबारानें गोलंदाज घाबरून तोफा सोडून मागें हटले. बंडखोरांनीं तटाचा एक भाग पाडला आणि ते किल्ल्यांत प्रवेश करण्याकरितां पुढें सरसावले. परंतु आंतील इंग्रजांनीं एकसारखा गोळ्यांचा वर्षाव केल्यामुळें ते पुढें जाऊं शकले नाहींत. या गोळीबारामुळें बंडखोरांचा नेता मुलतानखान

मारला गेला. पण शिपाई पळून गेले नाहींत. त्यांनीं पुन्हा किल्ल्याच्या भिंतीला सुरुंग लावण्याची खटपट सुरू केली. इंग्रज लोक अल्पसंख्याक असूनही शौर्यानें लढत राहिले. जोंपर्यंत त्यांच्या जवळ दारूगोळा होता तोंपर्यंत त्यांनीं बंडखोरांना मुळींच दाद दिली नाहीं. दारूगोळा होता तोंपर्यंत त्यांनीं शिपायांची प्रत्येक युक्ति, प्रत्येक कृप्ति हाणून पाडिली आणि त्यांना एक पाऊलही पुढें सरकूं दिलें नाहीं. परंतु दारुगोळा संपला तेव्हां त्यांनीं किल्ला सोडून देण्याचें ठरविलें. यावेळीं गंगानदीला मोठा पूर आला असल्यानें कर्नल साहेबानें कानपुरला जाण्याचें ठरविलें. कानपूरला बरीच मोठी इंग्रजी फौज असल्यामुळें तेथें आपणास आसरा मिळेल अशी बिचाऱ्यास आशा वाटत होती. मध्यंतरी कानपूरला जो अति प्रसंग घडला त्याची त्याला वार्ताही नव्हती. कारण बंडखोरांनीं तारा तोडून टाकल्या होत्या. नाहींपेक्षां तो आगींत आपण होऊन जाऊन पडला नसता. त्यानें मोठाल्या तीन नावा आणविल्या. तारीख तीन जुलई रोजीं अर्धी रात्र उलटून गेल्यावर अंधारांत ही मंडळी किल्ल्यांतून निघाली आणि नावांत जाऊन बसली. पहिल्यानें येथून जी तुकडी कानपुरला गेली होती, तिची बंडखोरांनीं कल्पनातीत दुर्दशा केली. आतां ही दुसरी तुकडी देखील रात्रीं दोन वाजतां निघाली. कर्नल स्मिथ, कर्नल गोल्डी आणि मेजर राबर्टसन असे तिघे अधिकारी एकेका नावेचे नेते झाले. थोडें दूर गेल्यावर कर्नल गोल्डीची नाव गंगेंतल्या एका भोंवऱ्यांत सांपडली. त्यानंतर सुंदरपुरच्या लोकांनीं त्यांच्यावर हल्ला केला. इंग्रजांनीं हा हल्ला परतविला आणि कर्नल गोल्डीच्या नावेवरील लोकांना कर्नल स्मिथच्या नावेवर घेतलें.

इकडे शिपायांना इंग्रज आपल्या हातावर तुरी देऊन पळाले ही गोष्ट कळावयाला फार वेळ लागला नाहीं. त्यांनींही नावा तयार केल्या आणि इंग्रजांचा पाठलाग करावयाला सुरुवात केली. गंगेच्या दोन्ही कांठच्या गांवांत राहणाऱ्या लोकांत खळबळ वाढत होती. विशेषतः मुसलमानांत दांडगा उत्साह दिसत होता. यामुळें नावेंतून पळ काढणाऱ्या लोकांना जागोजाग अडथळे होऊन, संकटपरंपरा त्यांच्या पाठीस हात धुवून लागली. कांठच्या गांवगुंडांनीं त्यांच्यावर हल्ले चढविले. नदीला भयंकर पूर आलेला; दोन्ही कांठांवरून गोळीबार सुरू; मागून शत्रुही पाठलाग करीत येत आहेत. अशा तिहेरी संकटांत सांपडल्यामुळें इंग्रज लोकांचा धीर सुटला. त्यांतही बरोबर बायकामुलें असल्यानें त्यांना अतिशय काळजी वाटूं लागली. याच वेळीं मेजर राबर्टसनची नांव भोंवऱ्यांत सांपडली. तेव्हां

दुसरा कांहीं तरणोपाय नाहीं असें पाहून स्त्रिया आणि मुलें यांनीं नदींत उड्या टाकिल्या. कोणी नदींत बुडून मेले, कोणाला गोळी लागली, आणि कोणा कोणाला शिपायांनीं तरवारीच्या वारानें साफ उडवून दिलें. राबर्टसन आणि त्याचे दोघे सोबती कसेबसे वांचले. त्यांनाही जबर दुखापती झाल्या होत्या. त्यांची स्त्री आणि मुलगा मृत्युमुखीं पडलीं. त्यांना एका इसमानें एका फळीच्या साहाय्यानें नदीकांठीं आणलें आणि ' कोलहर ' नांवाच्या गांवीं लपवून ठेविलें. दोन महिन्यांनंतर राबर्टसन तेथेंच झालेल्या जखमांमुळें वारला.

ज्या लोकांना बंडखोरांनीं कैद केलें होतें त्या सर्वांना नबाबाच्या हुकुमानें तोफेच्या तोंडीं देण्यांत आलें. कर्नल स्मिथ मात्र कानपूरला पोहोंचला. वाटेंत खाद्य पेय घेण्यासाठीं तो सोईच्या ठिकाणीं थांबत असे आणि खाणें पिणें झालें म्हणजे पुन्हा मार्ग आक्रमण करूं लागे. कानपुरास पोहोंचल्यावर त्याचें पुढें काय झालें याचा पत्ता लागला नाहीं. फतेहगड आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशांत मिळून, जून महिन्याच्या प्रारंभीं एकंदर दोनशें काळे गोरे ख्रिस्ती होते. हे सर्व निरनिराळ्या ठिकाणीं मारले गेले.

याप्रमाणें फरुखाबाद प्रांतांत इंग्रज म्हणून राहिला नाहीं. नबाब तफ़जुल हुसेनखान निष्कंटक राज्य करूं लागला. त्याच्या नांवें जाहीरनामे आणि हुकूम सुटूं लागले; कर वसूल होऊं लागला. पण ज्या लोकांनीं मोठमोठ्या हुद्यांच्या लालचीनें या कार्याला मदत केली होती, त्यांना चांगल्याच वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या. कित्येकांना तर कांहीं तरी क्षुल्लक कारणावरून जबर दंड झाला. यामुळें नबाबसाहेबांचें राज्य ईर्ष्या आणि द्वेष यांनीं पोखरलें गेलें. औट घटकांतच तेथील प्रजाजन आणि नबाबाचे कित्येक अधिकारी सुद्धां पुन्हां इंग्रजांचें राज्य व्हावें अशी इच्छा करूं लागले, व याच चिंतनांत आणि उपाययोजनेंत त्यांचे पुढील दिवस जाऊं लागले. याच लोकांनीं पुढें इंग्रजांना मदत केली व बंडखोरांचा बीमोड करून इंग्रजी सत्ता पूर्ववत् स्थापिली.

आतां बदाऊंच्या मॅजिस्ट्रेटसाहेबांचें पुढें काय झालें तें सांगून हें प्रकरण संपवूं. हिंदुस्थानी वेषांत कित्येक दिवस लपून छपून काढिल्यावर एका गांवाहून दुसऱ्या गांवीं असें फिरत फिरत ते सर्वजण अयोध्याप्रांतांतील ' धर्मपूर ' गांवीं जाऊन पोहोंचले. तेथें ते एका हरदेवबक्श नांवाच्या जमीनदाराकडे राहिले. पण ही गोष्ट फरुखाबादेच्या नबाबाला कळली, आणि त्यानें हरदेवबक्शाला कळविलें

कीं या पळपुट्यांना ताबडतोब आमच्याकडे पाठवून द्या. परंतु हरदेवबक्शानें तसें कांहींएक न करितां, त्यांना एका गुप्त ठिकाणीं लपवून ठेविलें व त्यांचे प्राण वांचविले.

वायव्य प्रांतांत म्हणजे अयोध्या, आग्रा व रोहिलखंडांत जिकडे तिकडे बंडानें कहर उडविला, तरी तेथें उदारहृदयी सद्गृहस्थ मुळींच नव्हते असें मात्र नव्हे. या सहृदय हिंदवासी गृहस्थांनीं वेळोवेळीं अमोलिक मदत करून अनेक इंग्रजांचे प्राण वांचविले, आणि हाल अपेष्टा व बेअब्रूपासून त्यांचें संरक्षण केलें. तात्पर्य काय कीं, या बंडाच्या वेळीं एकूण एक हिंदवासी इंग्रजांचा शत्रू झाला नव्हता. हें बंड शिपायांचें होतें, व इंग्रजी राज्यामुळें ज्यांची स्थिति खालावली त्या सरदारदरकदारांचें हें बंड होतें. या बंडांत देशांतील बदमाष गांवगुंड सामील झाले होते. परंतु सामान्यजनता यापासून अलिप्त होती.

उत्तर हिंदुस्थानांतील बंडांत हिंदूंपेक्षां मुसलमानांचेंच अंग प्रामुख्यानें होतें, हें वरील वर्णनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. दिल्लीस मोंगल बादशाहीची बंडवाल्यांनीं पहिल्या धडाक्यासरशीं स्थापना केली, व त्यामुळें ठिकठिकाणीं बंडाची आरोळी ठोकून शिपाई तडक दिल्लीचीच वाट धरीत. लखनौ येथील बंडाचा मुख्य सूत्रचालक फैजाबादचा मौलवी अहमद उल्ला लिआकतच होता, आणि लखनौ येथें जुनी नबाबी पुन्हा स्थापन करण्याच्या इराद्यानेंच या मौलवीनें बेगमेच्या वतीनें बंडांत पुढाकार घेतला होता. मौलवींच्या आज्ञा कशा कट्टर स्वरूपाच्या असतात, हें सर्व जाणतातच. त्यामुळें मुसलमानांच्या दृष्टीनें हें एकप्रकारचें धर्मयुद्ध बनलें. हें राजकारणी बंड असलें तरी त्याला जिहादाचें स्वरूप आलें. मुसलमानांचें बंडांत प्रमुख अंग असल्यामुळें ठिकठिकाणीं नवे नबाब बनविण्यांत आले. आणि या उपटसुंभ नबाबांनींच वाटेल तसे हुकूम देऊन अनाचार केले. नबाब उत्पन्न करण्याचा हा मुसलमानी कारखाना इतक्या जोरानें चालू होता कीं, कानपुरला देखील नानासाहेब पेशव्यांना प्रतिस्पर्धी म्हणून एक नन्हेखान नांवाचा फाटका नबाब उभा करण्यांत आला. या धर्मवेड्या मुसलमान बंडवाल्यांच्या लेखीं सर्व इंग्रज व देशी ख्रिस्ती काफर ठरले, आणि काफरांची मालमत्ता हिसकून घेणें, त्यांच्या घरादारांची राखरांगोळी करणें व त्यांची कत्तल करणें, या गोष्टी त्यांच्या धर्मशास्त्राप्रमाणें पुण्यकारकच होत्या. त्यामुळें हे बंडांतील अत्याचार विशेषतः मुसलमानांकडूनच अधिक घडले, आणि हिंदु शिपाई या बंडांत सामील असल्यामुळें त्यांच्यावर संगतीदोषानें हा अत्याचारांचा आळ आला. बऱ्याच ठिकाणचे हिंदु शिपाई

इंग्रजांचे व त्यांच्या बायकामुलांचे प्राण वांचविण्यास उत्सुक असत. परंतु मुसलमान शिपायांचें धर्मवेड काफरांवर दया दाखविण्यास यत्किंचितही तयार नव्हतें. या सामान्य नियमाला एकही मुसलमान अपवाद नव्हता अशांतला भाग नाहीं. त्यांनाही माणुसकी असते, परंतु अनेक प्रसंगीं ती धर्मवेडांत लुप्त होतें. कांहीं मुसलमानांनींही इंग्रजांचे जीव वांचविले, ही गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. मुसलमानांच्या दृष्टीनें जसे ख्रिस्ती काफर होते, तसेच हिंदूही काफर होते. परंतु हिंदूंची मदत त्यांना यावेळीं हवी असल्यामुळें, त्यांचा काफरपणा स्वहितास्तव त्यांनीं क्षणभर दृष्टीआड केला होता. परंतु बिजनोर, नगीना वगैरे ठिकाणचे मुसलमान ही स्वार्थी फायद्याची गोष्ट देखील आपल्या धर्मवेडाच्या नशांत विसरले. बिजनोर येथील महंमदखान नबाबानें शेजारच्या अनेक खेड्यांना आगी लावल्या व हिंदूंची कत्तल केली. या भयंकर अत्याचारामुळें येथील हिंदूंनीं इंग्रजांना मनोभावें साहाय्य करुन मुसलमान बंडखोरांचा मोड केला. मुसलमानांनीं या बंडांत जे अत्याचार केले, त्यामुळें संतापून जाऊन तरुण रावर्टसनें (पुढें लार्ड रावर्टस झालेले प्रख्यात इंग्रज सेनापति) ३१ डिसेंबर १८५७ रोजीं विलायतेस घरीं पाठविलेल्या खासगी पत्रांत लिहिलें— "Show these **rascally** Mussalmans that with God's help Englishmen will still be masters of India—ईश्वरी कृपेनें इंग्रज लोक यापुढेंही हिंदुस्थानचे मालक राहतील, ही गोष्ट या बदमाष मुसलमानांना दाखवून दिली पाहिजे." या शूर व तेजस्वी उदार तरुणाचें रक्त तापण्याइतके अत्याचार खरोखरच मुसलमानांनीं या बंडांत केले होते.

---

## प्रकरण १९ वें.

# पूर्वदिशेची हकीगत.



पहातां पहातां बंडाचा वणवा पूर्वेलाही पसरला. औध प्रांतांत या वणव्याचा अग्नि अति प्रखर झाला होता. लखनौ हें वणव्याचें प्रमुख केंद्र होतें. परंतु लखनौच्या पश्चिम व वायव्य प्रदेशांत ज्याप्रमाणें ही आग भडकली होती, त्याचप्रमाणें पूर्व प्रांतांतही तिच्या ठिणग्या जाऊन पडल्या, व तेथील परिस्थिति बिकट झाली.

पवित्र क्षेत्र काशी येथें जे लोक राहतात त्यांचें लक्ष धर्मकृत्याकडे विशेष असतें. हजारों वर्षांपासून काशीचें माहात्म्य प्रसिद्ध आहे. काशीला नित्याचे किंवा कारण-परत्वें जाऊन राहणाऱ्या लोकांना, पवित्र धर्मभावना, धार्मिक आचारविचार आणि धर्मकृत्यें याशिवाय इतर गोष्टींत फारसा आनंद वाटत नाहीं, निदान त्यावेळीं तरी अशी स्थिती होती. मग राजकीय घडामोडींचा त्या लोकांच्या मनावर परिणाम कसा होणार? इतिहासामध्यें हिंदुस्थानांतल्या कित्येक शहरांना तेथील राजकीय घडा-मोडीमुळें महत्व प्राप्त झालें आहे. पण काशीला धार्मिक बाब सोडिल्यास दुसऱ्या कोणत्याही कारणामुळें महत्व आलें नाहीं. परंतु त्या काशीक्षेत्राला देखील १८५७ सालच्या बंडाच्या वणव्याची आंच लागली, आणि तेथील लोकांची शांतता भंग पावली. ५७ सालच्या ग्रीष्मऋतूंत तेथें महागाई फार झाली होती. धान्यधून्य इतकें महाग झालें होतें कीं, गोरगरीबांना मोठ्या कष्टांत दिवस काढावे लागत होते. लोकांना वाटावयाला लागलें कीं, हे कष्टाचे व दुष्काळाचे दिवस इंग्रजी सत्ते-मुळेंच आले आहेत. प्लेगचा कहर प्रथम हिंदुस्थानांत उसळला, तेव्हां तो इंग्रज लोकांनींच जहाजांत भरून येथें आणला, अशी अनेक भोळया भाबड्या लोकांची प्रामाणिक समजूत झाली होती. लोकांना असें वाटावयाला लागलें असें म्हणण्या-पेक्षां, लोकांना असें कांहीं लोकांनीं वाटावयाला लाविलें असें म्हटलें तर तें सत्याला अधिक धरून होईल. कोणाच्या पोटावर पाय पडूं लागला म्हणजे तो थोडी बहुत तरी हालचाल केल्याशिवाय रहात नाहीं. आपल्या पोटाला चिमटा बस-ण्याला कारण इंग्रजी सत्ता, अशी समजूत होतांच लोकांच्या मनानें घेतलें कीं ही सत्ताच उलथून पाडावी. याशिवाय काशीला त्यावेळीं दिल्लींतील कांहीं खानदानी सरदार राहत होते. त्यांनीं लोकांच्या क्षुब्धतेचा फायदा घेऊन इंग्रजांच्या मनांत आलेल्या बाटवेगिरीच्या पापाचा कानमंत्र सांगायला सुरुवात केली. यामुळें लोकांच्या ज्वलज्जहाल धार्मिक वृत्तीवरच प्रहार झाला. मग त्यांना चेव यावयाला काय उशीर लागणार? जात्यभिमान, धर्माभिमान यांच्यावर होऊं पाहणाऱ्या या आघाताबरोबरच, महागाईच्या कारणमीमांसेनें पोटावरही आघात होऊं लागला. तेव्हां तेथें कटाची योजना होऊं लागली. काशीपासून तीन मैलांवर सिक्-रौल गांव आहे. तेथेंच त्यावेळीं इंग्रजांची छावणी होती. सरकारी कचेऱ्या, तुरुंग, चर्च, सरकारी कॉलेज, इस्पिताळ, फौजी छावणी, सुंदरशा बागा, हा सर्व इंग्रजी सरंजाम त्या गांवीं असे. तेथील छावणींत देशी पायदळ पलटणी तीन आणि ३० इंग्रज गोलंदाज होते. एकंदर सेना २००० पायदळ व ३० गोलंदाज

इतकीच होती. या सेनेचा अधिकारी जॉर्ज पानसनबी हा होता. त्या वेळीं हेनरी टकर बनारस विभागाचा कमिशनर होता; फ्रेडरिक गबिन्स जज्ज आणि लिण्डसाहेब मॅजिस्ट्रेट होता. या अधिकाऱ्यांनीं मीरत आणि दिल्ली येथें उद्भवलेल्या बंडाच्या बातम्या येऊं लागल्या, तेव्हां शिपायांना बंडापासून परावृत्त करण्याचा आणि शांतता राखण्याचा आटोकाट प्रयत्न केला. पण तो सिद्धीस गेला नाहीं. जी हकीगत दिल्ली आणि मीरतला घडली तीच लहानशा प्रमाणावर बनारसलाही घडून आली.

जून महिन्याच्या सुरुवातीलाच शिपायांकरितां नवीन तयार केलेल्या कांहीं रिकाम्या बराकींना आग लागली. या नंतर थोड्या वेळानें अशी खबर लागली कीं काशीपासून ६० मैलांवर असलेल्या आजमगड मुक्कामीं शिपायांनीं बंड केलें. तेथें १७ वी पलटण होती आणि ती मेजर बरोजच्या ताब्यांत होती. हा गृहस्थ सरळ स्वभावाचा आणि भोळा होता. यामुळें तो शिपायांना आपल्या काबूंत ठेऊं शकला नाहीं. शिपाई काडतुसांच्या प्रकरणामुळें बिथरलेले होतेच. त्यांत धनलोभाची भर पडली. गोरखपुराहून पांच लाख रुपये लेफ्टनंट पालिशर आणित होता; त्याच्या दिमतींत १७ व्या पलटणीचें थोडें पायदळ आणि १३ व्या पलटणीचें घोडदळ होतें. अधिकाऱ्यांचा मनसुबा असा कीं, या पांच लाखांबरोबर आजमगडचे दोन लाख घ्यावे आणि ती सर्व रकम बनारसच्या खजिन्यांत पोहोंचती करावी. सात लक्ष रुपये म्हणजे कांहीं लहानसहान रकम नव्हती. तिचा लोभ आवरणें शिपायांना शक्य नव्हतें. म्हणून आजमगडाहून काशीला रुपये घेऊन जावयाला ते कबूल झाले नाहींत. तरीदेखील तीन तारखेला अधिकाऱ्यांनीं त्यांना कसेंबसें तयार केलें, आणि ते आजमगडाहून निघाले. अधिकारी शिपायांविषयीं साशंक होतेच. परंतु त्या दिवशीं सर्व जण आपापल्या डेऱ्या राहुट्यांतून खाण्यापिण्यांत गुंतले असतां परेडच्या मैदानावर झालेला एक बंदुकीचा आवाज ऐकूं आला. या आवाजामुळें सर्वांच्या मनांत धडकी भरली. कारण हा बंदुकीचा बार म्हणजे बंड उभारल्याची खूणच होती. गोरे स्त्रीपुरुष घाबरले आणि कचेरीकडे धांवत गेले. यांपैकीं जे पुरुष होते ते अर्थातच सैनिक नव्हते. जिल्हाधिकारी व त्याचे मदतनीस यांनीं मिळून कचेरीच्या रक्षणाचा बंदोबस्त पूर्णपणें केला होता. गांवांतील ही सर्व मंडळी ठरल्याप्रमाणें येथें येऊन पोहोंचली. तिकडे शिपायांनीं आपल्या क्वार्टरमास्टर आणि क्वार्टर-मास्टर-सर्जन या दोघांनाच तेवढें मारिलें; इतरांना त्यांनीं मुळींच दुखापत केली

नाहीं. यानंतर ते वर सांगितलेल्या सात लाखांवर डल्ला मारावयाला धांवले. रक्षकांचे मुख्य अधिपति पालिशरसाहेब होते. ते खजिन्याचे रक्षण करूं शकले नाहींत. सर्व खजिना बंडखोरांनीं हस्तगत केला, तरीदेखील त्यांनीं कोणत्याही अधिकाऱ्यावर हात उगारिला नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं अधिकाऱ्यांना गाझीपुरापर्यंत सुखरूप पोहोंचविलें. जे लोक त्यांना मारावयाला तयार झाले होते, त्यांनादेखील संकटग्रस्त पाहून शिपायांनीं क्षमा केली. इतकें झाल्यावर शिपाई सात लाखांचा डल्ला घेऊन आजमगडाला परत आले. तेथें आल्यावर त्यांना दिसून आलें कीं शहरांत युरोपीयन नांवालासुद्धां राहिला नाहीं. कचेरी, छावणी इत्यादि सर्व ठिकाणें ओस पडलीं होतीं. हें पाहतांच त्यांना विजयाचा उन्मादवायु झाला. त्यांत ते मोठमोठ्यानें नाचून, बागडून, ओरडून गोंधळ करूं लागले, आणि अशा स्थितींतच फैजाबादकडे निघाले.

काशीच्या लोकांना आजमगडची बातमी लागली. तेव्हां तेथील अधिकाऱ्यांनीं स्वसंरक्षणाची योग्य ती तजवीज केली. त्यांच्या मदतीला नीलसाहेब कलकत्त्याहून आपली सेना घेऊन येत होता. तो राणीगंजापर्यंत रेलवेनें आला व तेथून पुढें घोड्याच्या गाडींतून प्रवास करीत करीत काशीला पोहोंचला. त्याच्याबरोबर दानापुरचे कांहीं शिपाईही आले होते. पुरेशी कुमक येतांच अधिकाऱ्यांनीं ठरविलें कीं काशीच्या शिपायांना परेडवर बोलवून त्यांचीं हत्यारें काढून घ्यावीं. ज्या दिवशीं हा विचार चालू होता त्याच्या दुसरे दिवशीं शिपायांना शस्त्र-रहित करावें असें कांहींचें म्हणणें पडलें, तर इतरांचें सांगणें असें होतें कीं शिपायांना शस्त्र-संन्यास करायला लावावयाचें असेल, तर दिरंगाई बिलकुल उपयोगी नाहीं. हें काम तावडतोब झालें पाहिजे. अशी वाटाघाट चालू असतां शिखांचे अधिकारी गार्डनसाहेब यांनीं खबर आणिली कीं शहरांतील गुंडलोक सैनिकांशीं गुप्त खलबत करीत आहेत. यामुळें तेथें जमलेल्या लोकांना या प्रश्नाचा कांहीं तरी निकाल तावडतोब लावणें भाग पडलें. म्हणून त्यांनीं जज्ज आणि कमिशनर यांची सल्ला घेतली. त्याच वेळीं कर्नल नील तेथें पोहोंचला असल्यामुळें त्याचीही सल्ला घेण्यांत आली. तेव्हां सर्वानुमतें असें ठरलें कीं त्याच दिवशीं सायंकाळीं ५ वाजतां शिपायांना परेडवर बोलवावें.

यानंतर पानसनवीसाहेब गार्डनसाहेबाबरोबर आपल्या घरीं गेला. तेथें त्याला ३७ व्या पलटणीचा नायक मेजर बारेट भेटला. मेजर बारेटच्या मनांत शिपायांविषयीं सहानुभूति होती. त्याचा शिपायांच्या स्वामिनिष्ठेवर पूर्ण

विश्वास होता. म्हणून त्याला शिपायांचीं हत्यारें काढून घेणें आवडलें नाहीं. त्यानें अधिकाऱ्यांच्या या विचाराला विरोध केला. परंतु पानसनबी साहेबानें त्याचें म्हणणें मुळींच ऐकलें नाहीं. तेव्हां नाखुषीनें त्यानें आपल्या शिपायांना पांच वाजतां परेडवर हजर राहण्याचा हुकूम दिला. परेडवर सर्वजण जमा झाल्यावर थोड्याच वेळांत मुख्य सेनानायक घोड्यावर स्वार होऊन तेथें आला. पानसनबी व गार्डन हे दोघेही परेडवर जावयाला निघाले. पानसनबी बरेच दिवसांपासून आजारी असल्यामुळें अशक्त झाला होता. अशा स्थितींत हें प्रकरण उपस्थित झाल्यामुळें, त्याच्या मनांत अशा प्रसंगाला जरूर असणारी शांतता वसत नव्हती. अशा अस्थिर मनःस्थितींत तो परेडच्या मैदानावर आला. त्यानें पाहिलें कीं नीलसाहेब आपल्या गोऱ्या दळासह तेथें हजर आहे आणि तोफाही तयार आहेत. या वेळीं तेथें हजर असलेल्या काशीच्या पलटणींत २००० हिंदी शिपाई होते. गोरे शिपाई अडीचशेंच्या वर होते. या दोनहजार शिपायांच्या मनांत खळबळ उडालेली होती. अशा स्थितींत पूर्वी ठरलेला हुकूम शिपायांना सोडण्याचें धाडसाचें काम पानसनबो साहेबाला करावें लागलें. शिपायांनीं हुकूम ऐकतांच आपआपलीं हत्यारें खालीं टाकिलीं. समोरच तोफा तयार होत्या. संगीनींनी सुसज्जित असे गोरे शिपाई थोड्या अंतरावर उभे होते. एकएक शिपाई आपआपलीं हत्यारें अंगावरून खालीं उतरीत होता. त्यांनीं काढून ठेविलेलीं हत्यारें उचलण्याकरितां जेव्हां गोरे शिपाई जवळ आले तेव्हां त्यांचीं मनें फिरलीं. त्यांना त्या वेळीं शांत राहणें अशक्य झालें. त्यांना वाटलें कीं आम्ही टाकिलेलीं हत्यारें प्रथम हस्तगत करून घेऊन आम्ही निःशस्त्र झालों, म्हणजे या तोफा आमच्यावर डागण्याचा तर साहेबांचा विचार नाहींना ? असा विचार मनांत येण्याचाच अवकाश. त्यांनीं तावडतोब आपलीं हत्यारें पुन्हा उचललीं आणि आपल्या अधिकाऱ्यांवर चाल करण्यास सुरवात केली. इतरत्र उभ्या असलेल्या गोऱ्या लोकांवरही गोळ्यांचा पाऊस पडला. क्षणार्धांत देशी शिपाई बंदुकी भरून इंग्रजांशीं लढावयाला सज्ज झाले. इंग्रज आश्चर्यानें थक्कच झाले. क्षणभर या अनपेक्षित प्रसंगानें त्यांची अक्कल गुंग झाली. सात आठ गोरे शिपाई जखमी होऊन पडले. तेव्हां अधिकारी तोफांच्या मदतीनें हा हल्ला परतविण्याचा प्रयत्न करूं लागले. मेजर बारेट पहिल्यापासूनच या निःशस्त्रीकरणाच्या विरुद्ध होता. त्याच्या मनांत या प्रसंगाची शंका प्रथमपासूनच डोकावत होती. ती खरी ठरली; पण आल्या प्रसंगाला तोंड देणें त्याला भाग होतें. शिपायांनीं आपल्या

हितचिंतकाला पूर्वीच ओळखिलें होतें. त्यांनीं बारेटसाहेबाच्या केंसालाही धक्का लागूं दिला नाहीं. तेथें उडालेल्या गोंधळांत आपल्या हितचिंतकाचें बरें वाईट होऊं नये, म्हणून त्यांनीं बारेट साहेबाला तेथून अलग उचलून एका सुरक्षित ठिकाणीं नेऊन ठेविलें. त्यांनीं बंड पुकारिलें होतें तरी ते आपल्या उपकारकर्त्यांशीं निमकहराम झाले नाहींत.

गोऱ्या शिपायांनीं जेव्हां पाहिलें कीं देशी शिपाई गोंधळ करीत आहेत, तेव्हां त्यांनीं तोफा डागण्यास सुरवात केली. तोफेच्या भडिमारासमोर कोण टिकाव धरूं शकणार? तोफांचा धडाका चालू होतांच सर्व शिपाई मैदान सोडून पळाले आणि घरांच्या भिंतींचा आश्रय घेऊन तेथून गोळीबार करूं लागले. परंतु तेवढयानें तोफांचा मारा थांबला नाहीं. कित्येक शिपाई लढाईंत पडले आणि भिंतीचा आश्रय अपुरा पडूं लागतांच बाकीचे सैरावैरा पळूं लागले. कांहीं शहरांत जाऊन लपून बसले, कांहीं जवळपासच्या गांवीं जाऊन लपले, आणि आपापल्या ठिकाणीं बसून सूड उगविण्याकरितां योग्य संधीची वाट पहात राहिले.

याच वेळीं इकडे एक देशी घोडेस्वारांचें दळ आणि शिखांचें एक दळ परेडच्या मैदानावर येऊन पोहोंचलें. यांचीं मनेंही पूर्वग्रहदूषित होतीं. तेथील घडलेला प्रकार कळून येण्यास त्यांना फारसा वेळ लागला नाहीं. घोडेस्वारांनीं आपल्या नायकाला मैदानावर पोहोंचतांच ठार केलें. शीख शिपाई हा सर्व तमाशा पहात होते. ते अजून राजनिष्ठ होते आणि तसेच राहिले असते. परंतु त्यांना जेव्हां असें दिसून आलें कीं गोरे अधिकारी आपणाविषयीं देखील साशंक आहेत, तेव्हां एका शीख शिपायानें संतापून आपल्या अधिकाऱ्यावर गोळी झाडली. पण क्षणार्धांत दुसरा शीख शिपाई त्या अधिकाऱ्याचा जीव वांचविण्याकरितां त्याच्या समोर झाला. याप्रमाणें त्या एकनिष्ठ स्वामिसेवकानें धन्याचा जीव वांचविण्याकरितां स्वतःचा बळी दिला. परंतु त्याच्या स्वामिनिष्ठेचें व उदारपणाचें चीज झालें नाहीं. सर्व टोळीच्या टोळी बंडखोर आहे असेंच अधिकाऱ्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें व सर्व पलटणीवर गोळीबार सुरू केला. त्यामुळें त्या दोन्ही देशी पलटणी बिथरल्या व इंग्रजांवर चाल करून गेल्या. यावेळीं तोफा रिकाम्या पडल्या होत्या. कारण त्यावरील गोलंदाज ३७ व्या पलटणीचा पाठलाग करण्यांत गुंतले होते, आणि ते पाठलाग करीत करीत शिपायांच्या घरापर्यंत पोहोंचले होते. यावेळीं मैदानावर असलेल्या बंडखोरांना

अक्कल असती तर प्रथम त्यांनीं तोफा काबीज केल्या असत्या. मग काशी शहर सर करणें अगदीं सोपी गोष्ट होती. पण बंडखोरांमध्यें चातुर्य, व्यवस्थितपणा व एकी या सर्वांचा अभाव होता. त्यांना कोणतेंही निश्चित ध्येय साध्य करावयाचें नव्हतें. किंवा त्यांना अधिकारयुक्त वाणीनें ठरीव काम करावयास लावणारा कोणी नायकही नव्हता. यामुळें गोऱ्या शिपायांशीं युद्ध करणें बाजूला राहून ते आपसांतच भांडूं लागले, आणि एकमेकांजवळ फुकाची प्रौढी मिरविण्यांत गर्क झाले. ही संधी इंग्रज काय म्हणून गमावितील? त्यांनीं युक्तीनें तोफा आपल्या ताब्यांत घेऊन बंडखोरांवर त्यांचा भडिमार सुरू केला. तोफांचा भडिमार सुरू होतांच आढ्यतेच्या, प्रौढीच्या व आत्मश्लाघेच्या गोष्टी जेथल्या तेथें जिरल्या आणि सर्वांना आपले प्राण वांचविण्याची फिकीर लागली. यामुळें सर्वजण तेथून पळून गेले.

ही सर्व घटना घडून येईतोंपर्यंत संध्याकाळ झाली. जनरल पानसनबीलाही सूर्याचेंच अनुकरण करावेंसें वाटलें. दिवसभर सतत अविश्रांत परिश्रम करून आपलें कर्तव्य बजाविल्यामुळें दिनमणि भास्कराला विश्रांति घ्यावीशी वाटली, त्याप्रमाणेंच घटनाचक्राच्या फेऱ्यांत चक्कर खावे लागल्यामुळें पानसनबी साहेबालाही विश्राम करावासा वाटला. त्यानें नीलसाहेबावर सर्व भार टाकून आपला पाय मोकळा करून घेतला. कर्नल नील आतां बनारसच्या फौजेचा अधिपति झाला. हीं अधिकारसूत्रें हातीं येतांच त्यानें आपला अम्मल गाजवावयाला सुरुवात केली. त्यानें आपला धाक बसविण्यासाठीं अपराध्यांना जबर शिक्षा देऊन, बहकलेल्यांना उदाहरण घालून जरब बसविण्याचा उपक्रम केला. त्यानें पळालेल्या बंडखोरांना हुडकून काढून शिक्षा ठोठावण्यास सुरुवात केली. जे शिपाई आपापल्या बराकींत परत आले होते त्यांना बराकींतून हांकलून देण्यांत आलें, किंवा ठार करण्यांत आलें. जे शहरापासून दूर जाऊन खोपटांतून लपून बसले होते त्यांच्या खोपटांलाच आगी लावून दिल्यामुळें ते खोपटासकट भस्म झाले.

इतकें करूनही अधिकारी निर्भय झाले असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. उरले सुरले शिपाई रात्रीच्या वेळीं गांवगुंडांच्या मदतीनें त्रास देतील अशी शंका होतीच. त्यामुळें सर्वांना रात्रीकरितां सुरक्षित अशी निवाऱ्याची जागा शोधणें भाग पडलें. पादरी लोकांनीं चुनारला जावयाचें ठरविलें. मुलकी अधिकारी कलेक्टरच्या कचेरींत जाऊन राहिले. या वेळीं काशीचा खजीना कसा वांचवावा ही एक मोठीच काळजी होती. त्याचें रक्षण शिखांची एक टोळी करीत होती. पण

या टोळीचा तरी काय नेम ? आपल्या जातभाईंचें अनुकरण त्यांनीं केलें तर त्यांत नवल नव्हतें. कारण काशी येथील शीख पलटणीशीं इंग्रजांचें वर्तन फारच कठोरपणाचें व तेंही अकारण झालें होतें. एकाच्या अपराधाची भरपाई दुसऱ्या शिपायानें आपल्या स्वामिनिष्ठेनें केली असतांदेखील, सर्व पलटणीला दोषी ठरविण्यांत आलें. त्यामुळें सर्व शीख बिथरले तर खजिन्याचें रक्षण तर दूरच राहो, पण प्राणांवर बेतेल त्याची काय वाट ? अशी भीति तेथील इंग्रजांना होती. पण त्या वेळीं एक उदारमनस्क व शांत प्रकृतीचा शीख सरदार तेथें रहात असे. त्याचें नांव सूरतसिंह असें होतें. त्यानें इंग्रजांशीं सहानुभूति दाखविली, आणि नानाप्रकारांनीं त्यांची खात्री करून दिली कीं, ' ही टोळी निमकहराम होणार नाहीं. तुम्ही निर्धास्त असा. या टोळींतील एका शिपायाच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत इंग्रजांच्या केंसाला धक्का पोहोंचूं शकणार नाहीं. ' तेव्हां इंग्रजांना बरें वाटलें व ते थोडे स्वस्थ झाले. कारण शीख लोकांवर त्याचें फार वजन होतें, व त्याचा त्यानें इंग्रजांच्या सहाय्यार्थ उपयोग केला.

शीखांचें दुसरें युद्ध संपल्यावर लार्ड डलहौसीनें रणजीतसिंहाचें राज्य खालसा केलें. त्या वेळीं सरदार सूरतसिंहाला कैद करून त्यानें काशीला आणून ठेवलें होतें. सूरतसिंह इंग्रजांचा नजरकैदी होता, तरी तो उदार अंतःकरणाचा होता. त्यानें काशीच्या खजिन्यावरील शीख रक्षकांना हूं का चूंही करूं दिलें नाहीं. या सरदाराच्या प्रासंगिक व अमूल्य मदतीमुळें काशीच्या खजिन्यांतली रोकड आणि लाहोरच्या किल्ल्यांतून तेथें आणून ठेविलेलें जडजवाहीर शाबूत राहिलें. या शीख सरदारानें जर मनांत आणिलें असतें तर शीख युद्धांत झालेल्या आणि काशीला केलेल्या शीखांच्या प्राणहानीचा सूड त्याला उगवितां आला असता. परंतु हा नीच विचार त्याच्या उदार अंतःकरणाला शिवलादेखील नाहीं. त्याच्या प्रमाणेंच कित्येक हिंदू लोकांनींही या वेळीं इंग्रजांना बरीच मदत केली. या अनपेक्षित सहाय्याचें इंग्रजांना मोठें आश्चर्य वाटलें. पण यांत आश्चर्य कसलें ? धर्मयुद्धाची तऱ्हा हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. हिंदूंच्या मनावरचा हा संस्कार कधींही लोपला नाहीं, व पुढेंही कधीं लोपणार नाहीं ! एखाद्या हाडवैऱ्यावरही संकट आलें तरी त्याला साहाय्य करावें, असें बाळकडूंच हिंदूमात्रास पाजलें जातें ! इंग्रजांनीं मात्र भारतीयांना चांगलेंसें ओळखिलें नाहीं, म्हणूनच हा अनर्थ त्यांच्यावर ओढवला, आणि येथील अमृतही त्यांना विषतुल्य झालें !

गोऱ्या अधिकाऱ्यांनीं जसा कयास बांधला होता, तसें कांहींच पुढें घडलें नाहीं. बंडखोरांनीं नंतर त्यांना कोणत्याही तऱ्हेनें त्रास दिला नाहीं; त्यांच्यावर हल्ला केला नाहीं, त्यांना ठार मारण्याचा प्रयत्न केला नाहीं किंवा शहरांत लुटालूट चोरीचपाटी वगैरे कांहींच झालें नाहीं. कारण बंडखोरांना तोफांच्या माऱ्यानें, चांगलीच अद्दल घडली होती. पण इंग्रजांच्या मनांतून शंका आणि भीति मात्र नाहींशी झाली नाहीं. जिकडे तिकडे पूर्ण शांतता आहे असें पाहिल्यावर मात्र काळजी आणि भीति दूर झाली, पण त्याच्या जागीं क्रोध आणि सूड येऊन बसले. बरेचसे शिपाई जवळपासच्या गांवीं जाऊन लपले होते. त्यांना शोधून काढण्याचें निमित्त करून इंग्रजांनीं भोंवतालच्या विभागांत एकच धुमाकूळ घातला. एक वेळ असें वाटूं लागलें कीं हे लोक आतां हा विभाग नेस्तनाबूद करून टाकितात कीं काय? ९ जूनला सर्वत्र लष्करी कायदा जारी करण्यांत आला. गांवोगांवीं लोकांना वेताचे फटके बसूं लागले, आणि जागोजागीं फांशीचा बाजार भरूं लागला. लहानमोठे, गरीबश्रीमंत, सुष्टदुष्ट, चोरसाव असला भेदभाव राहिला नाहीं. सगळे एक: सारखे समजले जाऊं लागले. ज्या हिंदुस्थानी लोकांच्या मेहरनजरेनें हे काशीचे गोरे लोक ऐन आणीबाणीच्या वेळीं जीव धरून राहिले, त्यांच्याच भाऊबंदांवर सूड उगविण्यांत येऊं लागला.

कांहीं मुलांनीं गमतीच्या खेळांत बंडवाल्या शिपायांप्रमाणें एक झेंडा तयार केला आणि ढोल वाजवीत त्याला रस्त्यानें मिरवीत चालले. या अपराधाबद्दल त्या सर्व मुलांना फांशीची शिक्षा झाली. एका गोऱ्या अधिकाऱ्याला या मुलांची दया आली, पण सेनापतीच्या लष्करी कायद्याला कसली दयामाया? काशीपासून ३० मैलांवर असलेल्या एका गांवीं कांहीं शिपाई लपले आहेत, अशी बातमी बावीस जूनला लागली. २७ जून रोजीं २४० गोऱ्या शिपायांची टोळी त्यांच्यावर पाठविली गेली. इंग्रज येत आहेत असें पाहून काळे शिपाई सैरावैरा पळूं लागले. त्यांतले कित्येक मारिले गेले आणि कित्येकांना फांसावर लटकविलें. गोऱ्या शिपायांत एक युवक होता. त्याच्या कोमल मनोवृत्ती इतरांप्रमाणें जळून खाक झालेल्या नव्हत्या. त्यानें विलायतेला पाठविलेल्या एका पत्रांत या प्रसंगाचें हृदयस्पर्शी चित्र रेखाटलें होतें. हें पत्र त्या वेळीं विलायतेच्या 'टाइम्स' मध्यें प्रसिद्धही झालें होतें. या पत्रांतील कांहीं मजकूर आम्ही वाचकांच्या माहितीसाठीं खालीं देत आहों. त्यावरून कळून येईल कीं, यावेळीं ही राक्षसी लीला कोणत्या थराला पोहोंचली होती. तो युवक लिहितोः—

" आम्ही आठ दिवस आणि नऊ रात्री प्रवासांत काढिल्यावर ४२१ मैल अंतरावर असलेल्या काशीला पोहोंचलों. २७ जूनला आमच्यांतील २४० सैनिक ( त्यांपैकीं एक मी होतों ), ११० शीख व २० घोडेस्वार इतक्यांनीं बनारस सोडिलें. आम्ही बैलगाड्यांतून प्रवास करीत होतों. दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं तीन वाजतां आम्ही बंडखोरांनीं आश्रय घेतलेल्या गांवाजवळ येऊन पोहोंचलों. मी ज्या टोळींत होतों ती टोळी गांवांत शिरतांच गांवकरी गांव सोडून पळून गेले. तेव्हां आम्ही गांवाला आग लाविली आणि तो भस्म करून टाकिला. तेथून परत जात असतां एका मनुष्यानें आम्हाला बातमी दिली कीं येथून दोन मैलांवर असलेल्या एका गांवीं बंडखोर लोक लढाईला अगदीं तयार आहेत. ही बातमी कळतांच आम्ही त्या दिशेला आपला मोर्चा वळविला. आम्ही त्या लोकांपासून सुमारें सहाशें हातावर आलों तोंच ते लोक आम्हाला पाहून पळाले. आम्हीं गोळीबार केला आणि त्यांतलीं आठ माणसें मारलीं. यानंतर आम्हीं गांवांत शिरलों. यावेळीं एक मनुष्य घाई घाईनें आमच्या जवळ आला आणि त्यानें आमच्या अधिकाऱ्याला सलाम केला. आम्हाला वाटलें तो शिपाईच आहे, म्हणून आम्हीं त्याला कैद केलें. याशिवाय आम्हीं आणखीही वीस माणसांना कैद केलें. या कैद्यांना घेऊन आम्ही सडकेवर उभ्या असलेल्या बैलगाड्यांजवळ आलों. तेव्हां एक वृद्ध गृहस्थ तेथें येऊन म्हणाला, ' तुम्ही आतांच जो गांव जाळून टाकिलात त्याची नुकसानभरपाई तुम्हाला द्यावी लागेल. ' आमच्या बरोबर एक मॅजिस्ट्रेट होता. त्यानें त्या उद्धट व उद्दाम वृद्धावर बंडखोरांना लपवून ठेविल्याबद्दल आरोप ठेविला, आणि पांच मिनिटांच्या आंत निकाल देऊन शिक्षेची सुनावणी केली कीं याला देहान्त प्रायश्चित्त द्यावें. पूर्वी सांगितलेला शिपाई आणि हा वृद्ध हे दोघे फांशीवर लटकावले गेले. रात्रभर त्यांचीं प्रेतें आमच्या समोर झाडावर लोंबत राहिलीं. सकाळीं उठून आम्ही पुन्हा बराच लांबचा प्रवास केला, पण पाऊस पडूं लागला. पाऊस जोराचा येऊं लागतांच आम्ही तेथेंच मुक्काम केला आणि एका गांवाला आग लाविली. यानंतर आम्ही पुढें निघालों. आमच्या दळांतले लोक आपलीं कामें मोठ्या आनंदानें करीत होते. त्यांनीं ऐंशी लोकांना कैद केलें आणि त्यांतल्या सहा जणांना त्याच दिवशीं फांशीं दिलें व साठ जणांना वेताचे फटके मारावयाची शिक्षा दिली. यानंतर मॅजिस्ट्रेटसाहेबानें जाहीर केलें कीं, जो कोणी बंडखोरांच्या सरदाराला धरून देईल त्याला २००० रु. इनाम मिळेल. त्या दिवशीं रात्रीं

आम्ही रस्त्यांतच मुक्काम केला. फांशी दिलेल्या सहाजणांचीं प्रेतें आमच्या समोरच झाडावर लटकत होतीं. दुसऱ्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं आम्ही तेथून कूच केलें. पण त्या दिवशींही जोराचा पाऊस आला. पण आम्ही तसेंच भिजत पुढें चाललों. असेंच भिजत भिजत आम्ही रात्रीच्या सुमारास एका गांवीं पोहोंचलों आणि त्या गांवाला आग लावून दिली. सकाळीं सूर्योदय झाला व आम्ही आपले ओले कपडे वाळविले, व वाळलेले कपडे चढवून आम्ही पुढें निघालों. पण कांहीं दूर गेल्यावर ते पुन्हा भिजले. पण या वेळीं ते पावसानें भिजले नाहींत तर घामानें भिजले. या वेळीं आम्ही एका मोठ्या गांवीं मुक्काम केला. तेथील दोनशें माणसें आम्ही धरून आणिलीं, व त्या गांवाला देखील आग लाविली. चारी बाजूंनीं ज्वाळा उठूं लागल्या. एक म्हातारा मनुष्य त्या अग्निकुंडाबाहेर येण्यासाठीं धडपड करीत होता. परंतु त्याला नीटसें चालतां येत नसल्यानें तो आगींत तडफडत होता. आम्हींही त्याला बाहेर येण्यास सांगितलें. पण तो येणार कसा ? तेव्हां तो ज्या खाटेवर बसला होता ती खाट मी बाहेर ओढून काढिली आणि त्याला वांचविलें. यानंतर आम्ही एका बोळाशीं आलों. तेथें आम्हाला असें दिसलें कीं, एक चार वर्षांचें अर्भक आगीच्या आंचेनें पीडित होऊन बाहेर पळून जाण्याकरितां एका भिंतीवर चढून धडपड करीत आहे. त्या घराच्या चारी बाजूंनीं पेट घेतला होता. मी जवळ गेलों. तेथें माझ्या नजरेस एक अत्यंत हृदयद्रावक दृश्य दिसलें. घरांत आठ वर्षांपासून दोन वर्षांपर्यंतच्या वयाचीं सहा चिल्लींपिल्लीं धुरामुळें गुदमरून किलबिलाट करीत होतीं. त्यांच्या शेजारीं एक वृद्ध जोडपें काळजी करीत बसलें होतें. जवळच एक वीस बावीस वर्षांची युवती नुकत्याच जन्मलेल्या आपल्या अर्भकाला पोटाशीं धरून रडत व शोक करीत बसली होती. विचारपूस करितां असें दिसून आलें कीं, पांच सहा तासापूर्वींच ही बाई बाळंत झाली होती आणि आतां हा असा दुर्धर प्रसंग ओढवला होता. मी तात्काळ त्या लहानग्या बाळाला उचलून घेतलें आणि त्या स्त्रीला माझ्या मागून येण्यास खुणाविलें. तिनें तें मूल मजजवळ राहूं दिलें नाहीं. तिनें स्वतःच त्याला घेतलें. नंतर मी त्या सर्व कच्चाबच्चांना बाहेर काढिलें आणि शेवटीं म्हातारा म्हातारीलाही काढिलें. हें सर्व करितांना मला अतोनात त्रास झाला. या सर्वांना बाहेर काढून एका शेतावर नेऊन पोहोंचविलें आणि मी दुसरीकडे गेलों. इकडेही तसलेच प्रकार नजरेस पडले. एक म्हातारी हातपाय टेकून रांगत जाण्याचा प्रयत्न करीत होती. तिला एक पाऊलही पुढें सरकतां

येत नव्हतें. शेवटीं मी तिच्या मदतीला धांवलों. तिनें माझी मदत नाकारिली पण मी तिला बळेंच बाहेर काढिलें. तेथून पुढें गेलों तों एक युवती आपल्या आजारी पतीची शुश्रूषा करीत असलेली दिसली. हें जोडपें अगदींच तरुण होतें. रोग्याजवळ बसून स्त्री त्याला औषध पाजीत होती. घराच्या चोहोंबाजूंनीं ज्वाळांचा खेळ चालू होता. तेथें जवळच आणखी चार बायका उभ्या होत्या. त्यांच्याजवळ जाऊन मी त्यांना म्हटलें कीं या रोग्याला आणि त्याची शुश्रूषा करणाऱ्या स्त्रीला कसेंही करून वांचवा. पण त्या कशाला ऐकतात? त्यांचें सारें लक्ष स्वतःचे प्राण कसे वांचतील या एकाच विवंचनेंत गुंतलें होतें. तेव्हां मी संगीन बाहेर काढली आणि त्यांना धमकी दिली कीं, माझें म्हणणें ऐका नाहीं तर सगळ्यांना येथेंच ठार करितों. या धमकीनें मात्र काम झालें. त्या रोग्याला आणि त्याच्या पत्नीला बाहेर काढण्यांत मला त्यांनीं मदत केली. त्यांना बाहेर काढिल्यानंतर मी आणखी पुढें गेलों. आगीच्या ज्वाळा त्या वेळीं आकाशाशीं स्पर्धा करीत होत्या. मी ज्या भागांत पोहोंचलों त्या भागांत १४० स्त्रिया व ६० मुलें घाबरलेल्या स्थितींत आढळलीं. मी या सर्वांना संकटांतून वांचविलें. तेव्हां सर्वजण मला धन्यवाद देऊं लागले. मी त्यांना आपल्या जवळचीं बिस्किटें देऊं लागलों. पण तीं कोणींच घेतलीं नाहींत. कारण काय? तर म्हणे तीं खाल्लीं म्हणजे त्यांची जात विटाळते. याच वेळीं आम्हां सर्वांना एकत्र जमण्याचा बिगुली हुकूम ऐकूं आला. तेव्हां मी परत छावणीकडे निघालों. × × × × आम्ही दहा माणसांना फांशी दिलें आणि साठ माणसांना वेताचे फटके मारले. त्याच रात्रीं आम्हीं एक गांव आणखी जाळला. आमच्या बरोबर जे कैदी होते ते मोठ्या आनंदानें मृत्युमुखीं पडावयाला तयार होत. हें पाहून आम्हाला आश्चर्य वाटे. एकदां एका फांशी दिलेल्या माणसाच्या गळ्याचा दोरी तुटली. तेव्हां तो झाडावरून खालीं पडला. पण तो लगेच धोतर झाडून उभा राहिला आणि मुकाट्यानें टकमकां इकडे तिकडे बघूं लागला त्याला पुन्हा फांसावर लटकाविलें. जेव्हां सर्व लोकांना फांशीं देणें संपलें तेव्हां उरलेल्या कैद्यांना तें दृश्य पहावयाला तेथें आणिलें. ता. २६ ला आम्हाल २००० जवानाशीं सामना द्यावा लागला. आम्हांला पाहतांच शत्रू तीन टाळ्या करून आमचा रस्ता अडवून उभे राहिले. पण आम्ही जसजसे पुढें जाऊं लागलों तसतसे ते पळून जाऊं लागले. ज्या गांवांत ते दडून बसले त्या गांवाला चारी बाजूंनी घेरून आम्ही आग लावून दिली. ते अग्नीपासून बचाव व्हावा म्हणून बाहेर येत तेव्हां आम्ही

त्यांच्यावर गोळया झाडूं लागलों. त्यांच्यांतले १८ लोक कैद झाले. आम्ही सगळयांचा एकदम निकाल लाविला. × × × × × × × आम्ही या सगळयांना गोळया घालून ठार केलें. याप्रमाणें या भागांतील पांचशें लोक आमच्या हातून मृत्युमुखीं पडले."

वर दिलेल्या वर्णनावरून वाचकांना कळून येईल कीं देशी शिपायांनीं गोऱ्यांचें जेवढें नुकसान केलें, त्याचा सव्याज वचपा काढून गोऱ्या लोकांनीं त्यांचें दसपट नुकसान केलें. तसें म्हटलें तर या भागांतील साधारण जनतेनें इंग्रजांना सहाय्यच दिलें होतें. असें असून इंग्रज शिपायांची वागणूक नेहमींप्रमाणेंच क्रूरपणाची झाली. काळया लोकांवर जरब बसवून बंडाचा बींमोड व्हावा म्हणूनच हे राक्षसी व अन्यायी उपाय योजण्यांत आले! आणि कैक प्रसंगीं सुक्याबरोबर ओलेंही जळालें. वारे धर्मनिष्ठ सेनापती नील!

काशीच्या वायव्येस तीन मैलांवर गोमती नदीच्या कांठीं जोनपूर शहर आहे. सन १७७५ त हें शहर कंपनी सरकारनें घेतलें. तेथें एक अत्यंत मजबूत असा दगडी किल्ला आहे. या किल्लयांत कैद्यांना ठेवीत असत. पूर्वेकडच्या बाजूला फौजेची छावणी असे. बंडाच्या वेळीं या छावणींत १६९ शीख शिपाई होते आणि त्यांचा अधिकारी 'मरे' नांवाचा होता. अर्थातच तो अधिकारी इंग्रज होता.

जूनच्या चवथ्या तारखेला हे शीखही गोऱ्या अधिकाऱ्यांचे कोपास पात्र झाले. या वेळीं जर फौजेचे अधिकारी विवेकानें आणि हुशारीनें वागते तर निदान या ठिकाणचा पुढील अनर्थ टळला असता. पण त्या वेळच्या अधिकाऱ्यांत किंबहुना एकंदर इंग्रजांत अतोनात शौर्य असलें तरी सहानुभूति आणि विवेक यांचा अभाव होता. यामुळें त्यांच्या अविचारी कृतीनें शिपायांचा असंतोष कमी न होतां उलट वाढतच चालला.

४ तारखेला जोनपुर शहरांत अशी अफवा उठली कीं आजमगडच्या शिपायांनीं बंड केलें. यानंतर लवकरच काशीच्या बातम्या तेथें पोहोंचल्या. परंतु या बातम्यांचा शिपायांवर तादृश परिणाम झाला नाहीं. ते सर्व राजनिष्ठ राहिले. इतक्यांत दुसरी बातमी आली कीं, कांहीं बंडखोर जवळचीच एक कोठी लुटून लखनौच्या रोखानें चालले आहेत. बंडखोर जोनपुरला येत नाहींत असें पाहतांच, कचेऱ्यांतून आश्रय घेऊन बसलेले इंग्रज बाहेर पडले आणि खाद्यपेयांचा तपास करूं लागले. पण तेथील शीख शिपायांनीं काशीला आपल्या जातभाई शीखांची

झालेली दुर्दशा ऐकली, तेव्हां त्यांचीं मनें सहजच क्षुब्ध झालीं. त्यांनीं आपली समजूत करून घेतली कीं, इंग्रज लोक झाडून साऱ्या शीख, हिंदू, मुसलमान, पुरभय्ये इत्यादि शिपायांना कंटस्नान घालून जगांतून नाहींसे करून टाकणार आहेत. तेव्हां ते इंग्रजांवर उठले. त्यांचा अधिकारी मरे साहेब कचेरीच्या ओसरीवर उभा असतां त्याला बंदुकीचा बार ऐकूं आला. त्याच्याजवळ असलेला दुसरा एक इंग्रज हा बार ऐकून दचकला आणि मागें वळून पहातो तों, मरे साहेब घायाळ होऊन खालीं पडला आहे, आणि शेजारची जमीन रक्तानें माखली आहे. त्याच्या छातींत गोळी लागली असून रक्ताची धार जखमेंतून वहात आहे. हा आकस्मिक प्रकार पहातांच सर्व गोरे घाबरले आणि घरांत लपून बसले.

जोनपुरचे जाइंट मॅजिस्ट्रेट जेलवर जात असतां वाटेंतच ठार झाले. शीखांनीं दोन लाख साठ हजार रुपये खजिन्यांतून लुटले. जिकडे तिकडे धुमाकूळ माजला. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहींसा झाला. तेथें अशी अंधेरनगरी झाल्यावर कचेरीच्या आश्रयानें राहिलेल्या इंग्रजांना आपण सुरक्षित आहों असें वाटेना. म्हणून ते तेथून पळवाट काढूं लागले. कोणी घोड्यावर स्वार होऊन पळाले. कोणी गाडीत बसून पळाले. सारांश ज्याला जें वाहन मिळालें, त्याचा त्यानें उपयोग करून आपले प्राण वांचविले. अशी एकच धांदल उडाल्यामुळें जखमी झालेल्यांना कोण विचारतो? मरे साहेब तसाच मरणोन्मुख पडला होता. त्याची स्त्रीही थोड्याच अंतरावर मरून पडली. त्यांची कोणी वास्तपुस्त केली नाहीं. या पळून जाणाऱ्या सर्व इंग्रजांनीं 'कराकट' गांवीं मुक्काम केला. वाटेंत त्यांना बंडखोरांनीं कांहीं त्रास दिला नाहीं. उलट त्यांच्या देशी नोकरांनीं त्यांना सर्व प्रकारची मदत दिली. कराकट गांवीं लाला हिंगनलाल नांवाचा एक धनिक गृहस्थ रहात असे. त्यानें सर्व इंग्रजांना त्यांच्या बायकामुलांसह आपल्या घरीं आश्रय दिला. एवढेंच नव्हे तर त्यांच्या खाण्यापिण्याची व राहाण्याची सर्व सोय त्यानें उत्तम प्रकारें केली. त्यानें आपलीं नोकरमाणसें या गोऱ्या लोकांच्या दिमतीस देऊन, त्यांचें रक्षण करण्याकरितां शस्त्रास्त्रांनीं सुसज्जित करून जय्यत तयार ठेविलीं. बंडखोरांनीं हा गांव दोन तीन वेळ लुटला, पण ते हिंगनलालाच्या घराकडे मुळींच आले नाहींत. कारण त्यांना ठाऊक होतें कीं हा गृहस्थ मोठा धर्मशील आणि उदार आहे, आणि आपलें धन व काळ परोपकारांत खर्च करीत असतो. अशा सत्पुरुषाशीं वैर कोणाचेंच नसणार! यानंतर लवकरच काशीच्या कमिशनरानें गोरी पलटण पाठवून हिंगनलालाच्या घरीं आश्रय घेऊन राहिलेल्या आबाल-

वृद्ध इंग्रज स्त्रीपुरुषांना काशीला आणविलें. सरकार हिंगनलालासारख्या परोपकारी माणसास विसरेल हें शक्यच नव्हतें. पुन्हां जिकडेतिकडे स्थिरस्थावर झाल्यावर हिंगनलालाला डेप्युटी मॅजिस्ट्रेटची जागा मिळाली आणि शंभर रुपये पेन्शन त्याला मरेतों मिळत होतें. हें पेन्शन त्याच्या मुलालाही चालू राहिलें.

बंड वाढत वाढत अलाहाबादेपर्यंत पोहोंचलें. अलाहाबादच्या किल्ल्यांत युद्ध-सामग्री जय्यत तयार होती. खजिन्यांतही भरपूर रक्कम होती. ही रक्कम सुमारें तीस लक्ष रुपये होती. एवढी युद्धसामग्री आणि एवढा खजिना येथें असूनही येथल्या पलटणींत गोरे शिपाई मुळींच नव्हते. किल्ल्यांत आणि किल्ल्यापासून चार मैल दूर असणाऱ्या छावणींत सहावी देशी पायदळ पलटण, कांहीं गोलंदाज आणि शीखांची एक तुकडी एवढेंच सैन्य होतें. गोलंदाज होते तेदेखील देशी होते. ६ व्या पलटणींत अयोध्या आणि बिहार या प्रांतांतले लोक होते. या पलटणीनें किती तरी लढाया इंग्रजांकरितां मारल्या होत्या. यांतले शिपाई स्वामिभक्त असून मोठे धाडशी होते. यामुळें खजिन्याचें रक्षण करावयाला देखील याच पलटणींतले लोक ठेविले होते. एकदां असें झालें कीं, दोघां गृहस्थांनीं या रखवालदारांचीं मनें इंग्रजांविरुद्ध कलुषित करून, त्यांना बंड करून इंग्रजांविरुद्ध उठण्यास प्रवृत्त करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां शिपायांनीं या दोघां राजद्रोही प्रचारकांना सरळ अधिकाऱ्यांचे हवालीं केलें. यामुळें यांच्या राजनिष्ठेची खात्री पटून त्यांच्यावरील अधिकाऱ्यांचा विश्वास वाढला. असें असूनही दैवगतीची विचित्र फेरी येथेंही फिरली. प्रसंग आला तेव्हां एवढे स्वामिभक्त म्हणून नावाजलेले आणि कसावर पारखलेले लोकदेखील बंडखोरांना जाऊन मिळाले. त्यांची राजनिष्ठा आणि स्वामिभक्ति पार उडून गेली आणि त्यांनीं कित्येक इंग्रज ठार केले, खजिना लुटला आणि शहरांत हलकल्लोळ उडवून दिला. कदाचित् स्वदेश व स्वधर्मप्रेमानें ऐन वेळीं राजनिष्ठेला मागें सारलें असेल. सरते शेवटीं इंग्रजांची कुमक येतांच हे लोक आपापला जीव घेऊन पळून गेले.

या पलटणीखेरीज आणखीही एक पलटण तेथें होती. तींत पंजाबांतले कडवे शीख होते. एक काळ असा होता कीं, याच शीखांनीं आपलें स्वातंत्र्य-रक्षण करण्याकरितां इंग्रजांबरोबर घनघोर युद्ध केलें होतें, पण आज तेच रणगाजी इंग्रजांच्या पक्षास गेले आणि आतां त्यांचे सर्वांत मोठे पक्षपाती दोस्त झाले, व ते इंग्रजांचे अत्यंत इमानदार आणि स्वामिभक्त सेवक बनले.

मे महिन्याच्या अकराव्या तारखेला मीरतला जी दंगल उडाली तिची खबर तारेनें अलाहाबादेला पोहोंचली आणि क्षणार्धांत ती गल्लोगल्लीं पसरली. तशीच दिल्लीची बातमीही लोकांना कळली. पण मे अखेरपर्यंत तेथील इंग्रज लोक चैनींत होते. मे महिना तर असाच निघून गेला. जून महिन्याच्या सुरुवातीला ज्या बातम्या आल्या त्यानें मात्र इंग्रजांचें धाबें दणाणलें. जूनच्या चौथ्या तारखेला बंडखोरांनीं तारा तोडल्यामुळें, तेथें तार येणेंदेखील बंद झालें. त्याच दिवशीं अशी बातमी आली कीं, काशीच्या शिपायांनीं आपल्या अधिकाऱ्यांना यमलोकचा रस्ता दाखविला असून ते आतां इकडेच येत आहेत.' तेव्हां सर्व इंग्रज किल्ल्यांत आश्रयार्थ येऊन राहिले.

काशीहून अलाहाबादेस येणारास दारागंज नांवाच्या शहराच्या भागांत गंगा ओलांडावी लागते. अलाहाबादेच्या मॅजिस्ट्रेटनें असा हुकूम सोडिला कीं, सहा नंबरच्या पलटणीनें तोफेचा मोर्चा गंगेच्या बाजूला बांधावा आणि तेथें पहारा देत बसावें. त्याप्रमाणें शिपाई पहारा देऊं लागले. या वेळीं अयोध्येचे घोडेस्वारही तेथें जवळच हजर होते. आतांपर्यंत हे स्वार राजनिष्ठ राहिले होते. पण जेव्हां त्यांनीं ऐकलें कीं, काशीस आपल्या बांधवांना निःशस्त्र करून तोफेच्या तोंडीं दिलें, तेव्हां त्यांचींही डोकीं फिरलीं. त्यांना वाटलें कीं नीलसाहेबानें जशी वागणूक बनारसच्या देशी शिपायांशीं ठेविली, तशीच येथील अधिकारी आपल्याशीं ठेवणार नाहींत कशावरून ? तेव्हां जूनच्या सहावीला हे लोक इंग्रजांवर हत्यार उपसावयाला तयार झाले. त्यांनीं असाही विचार केला कीं, आमचे काशीचे बांधव आमच्या मदतीच्या आशेनें येथें येत आहेत, तेव्हां आम्हाला रिकामें बसून कसें चालेल ? आम्हालाही आपल्या कर्तव्याला जागलें पाहिजे.

जूनची सहावी तारीख, रात्रीची वेळ, दिवसभराचीं कामें आटोपून लोक आपआपल्या घरीं परत आले होते. विश्रामदायिनी निशादेवीचें राज्य सुरू झाल्यामुळें बहुतेक लोक विश्रांति घेण्यांत गर्क झाले होते. कोणी निद्रादेवीची आराधना करीत आंथरुणावर लोळत होते. कोणी निद्रादेवीची कृपा झाल्यानें सुखानें घोरत पडले होते. अशा निस्तब्ध वेळीं बिगुल वाजलें. हा बिगुलाचा आवाज एकाएकीं कां बरें झाला, अशी उत्सुकता इंग्रज अधिकाऱ्यांना वाटली. त्यांचा थरकांप झाला. हें बंडाचें रणशिंग तर नव्हे ना ? अशी शंकाही कित्येकांना आली. सेनापतीला देखील जिज्ञासा उत्पन्न झाली आणि तो घोड्यावर स्वार होऊन छावणीकडे रवाना

झाला. इतर इंग्रज सैनिकही बिगुल ऐकतांच छावणीच्या बाजूला धांवत गेले. हें गौडबंगाल आहे तरी काय? तें जाणण्यास प्रत्येकजण उत्सुक झाला होता. गंगेच्या कांठावर पहारा करीत बसलेल्या सैनिकांनींच हें रणशिंग फुंकलें होतें, आणि शिंग फुंकून त्यांनीं असें जाहीर केलें होतें कीं अतःपर आह्मी तुमचे चाकर, मित्र वगैरे कोणी नसून तुमचे शत्रू आहोंत. त्यांच्याजवळ दोन तोफा होत्या. इंग्रज अधिकाऱ्यांनीं हुकूम सोडिला असूनही काळ्या शिपायांनीं या तोफा सोडल्या नाहींत. त्यांनीं प्रथम तोफांचें रक्षण करणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्यावरच हल्ला केला. त्या वेळीं अयोध्येच्या सैनिकांनीं इच्छा नसतांही गोऱ्या सैनिकांच्या विनवण्या ऐकून त्यांना मदत केली. त्यांनीं किल्ल्यांत जाऊन बंडाची खबर दिली. इतक्यांत छावणींतून एकच गोंगाट आणि बंदुकींचा ठणठणाट ऐकूं येऊं लागला. आतां मात्र अयोध्येचे सैनिकही पवित्रा बदलून उभे राहिले. त्यांच्यापैकीं फक्त तीनच शिपाई अजून राजनिष्ठ राहिले होते. आकाशांत चांदणें स्वच्छ पडलें होतें. त्या प्रकाशांत गंगातटावर उधळणारा रणरंग, तारागण जणुं तल्लीनतेनें पहात होता. क्षुब्ध सैनिक गोऱ्यांच्या रक्ताकरितां हपापलेले दिसले. तोफांचें रक्षण करणारे इंग्रज सैनिक, तोफा सोडून जाण्यांतच आपलें कल्याण आहे असें पाहून चालते झाले. ज्या औधवासीयांनीं अजूनही इंग्रजांचा पक्ष सोडिला नव्हता, त्यांचा नायक धारातीर्थी शयन करिता झाला. मग काय विचारावें? विजयी शिपायी तोफा घेऊन छावणीकडे वळले. ते मैदानांत आलेले पाहून त्यांच्या सोबत्यांचा उत्साह द्विगुणित झाला.

त्यावेळीं कर्नल सिमसन शिपायांच्या मध्यभागीं उभा होता. त्यानें शिपायांना तोफा इकडे आणण्याचें कारण विचारिलें. तोफा आणणारांनीं कर्नल साहेबावर गोळी झाडूनच या प्रश्नाचें उत्तर दिलें. भाग्यवशात् गोळी त्याला लागली नाहीं. पण त्याला कळून चुकलें कीं यापुढें आतां कांहींही अधिक बोलणें व्यर्थ आहे. म्हणून तो आपल्या घोड्यावर बसला आणि शिपायांना सोडून दुसरीकडे निघून गेला. शिपायांच्या मनांत कर्नल साहेबाला मारावें असें नव्हतें, म्हणून त्यांनीं कर्नल साहेबाला किल्ल्याचा आश्रय घेण्याचा सल्ला दिला. परंतु त्यानें एका अधिकाऱ्याला आपल्याबरोबर घेतलें, आणि ते दोघेही खजिन्याचें रक्षण करण्याकरितां निघाले. परंतु तेथें जावयाला रस्ता कोठें मोकळा होता? तो जेथें जेथें जाई त्या त्या बाजूला गोळ्यांचा वर्षाव सुरू होई. एक गोळी त्याच्या टोपाला चाटून गेली. तेव्हां नाइलाज होऊन तो किल्ल्याकडे वळला. या बाजूलाही

गोळीबार कांहीं कमी झाला नाहीं. त्याच्या घोड्याला कित्येक गोळ्या लागल्या, पण त्या शूर आणि इमानी घोड्यानें त्याला शेवटपर्यंत दगा दिला नाहीं. त्यानें आपल्या धन्याला किल्ल्याच्या फाटकाजवळ पोहोंचविलें. धनी खालीं उतरतांच घोडा धाडकन जमिनीवर पडला आणि त्यानें धन्याच्या पायापाशीं प्राण सोडिले.

सेनापति सिमसन किल्ल्यांत सुरक्षितपणें पोहोंचला. पण शिपाई आपलें काम करीतच राहिले. त्यांना गोरा माणूस दिसला रे दिसला, कीं त्यांनीं त्याचा पाठलाग करावा आणि त्याला ठार करावें. असा सारखा क्रम चालू होता. अशा प्रकारें बरेच इंग्रज प्राणांस मुकले. आठ इंग्रज तरुण.बांड लढाईचें काम शिकण्याकरितां नवीनच हिंदुस्थानांत आले होते. त्यांपैकीं सातजणांची आहुति शिपायांच्या सत्रांत पडली, आणि आठवासुद्धां तसाच जावयाचा, पण बिचारा थोडक्यांत बचावला. तो जखमी होऊन एका जवळच्याच गढींत लपून बसला. त्याचें वय सोळा सतरा वर्षांचें असेल नसेल. कोंवळें पोर ! बिचारें शिपायांनीं पेटविलेल्या हवनकुंडांत होरपळून निघालें! त्यांतल्या त्यांत बिचाऱ्यानें एक उड्डाण मारून ही गढी गांठली म्हणून थोडक्यांत बचावलें. पण तेथें त्याला एका ईश्वराशिवाय कोण सहायक होतें? तें तेथेंच तडफडत, विव्हळत चार दिवस पडलें होतें. त्याच्या वेदना न पाहवून म्हणा, किंवा त्याच्या अत्यंत लीनतेनें आणि शरण भावानें मारलेल्या हांकेला ' ओ ' देण्याकरितांच जणूं, पांचवे दिवशीं बंडखोर शिपायांची नजर त्याचेवर पडली. या वेळीं ते शिपाई त्या जखमी शिपायाला प्रत्यक्ष यमदूताप्रमाणें भासले. पण ते यमाचे दूत नव्हते. ते ईश्वरी प्रेरणेनें तेथें येऊन पोहोंचले होते. म्हणूनच त्याच्या दुःखानें शिपायांचीं मनें हळहळलीं, आणि त्यांनीं त्याला किल्ल्यांत नेऊन पोहोंचविलें. पण त्याच्या जखमा विकोपास जावून तें पोर सोळा जूनला परमेश्वराचा पाहुणचार घेण्यास निघून गेलें. बंडखोरांनीं आपली माणुसकी या प्रसंगीं प्रगट केली हें मात्र खरें !

आतां आपण अलाहाबादेच्या किल्ल्यांत प्रवेश करूं या. ते पहा, सर्व सैनिक आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन लढाईकरितां सज्ज होऊन उभे आहेत. त्यांत कित्येक इंग्रज सैनिक आहेत. सहाव्या देशी पलटणींतलेही कित्येक शिपाई येथें आहेत. याशिवाय कांहीं शीख सैनिकही दिसत आहेत. देशी शिपायांनीं जेव्हां किल्ल्या-बाहेर होत असलेला बंदुकीचा आवाज ऐकला, तेव्हां त्यांना वाटलें कीं काशीचे शिपाई येथें येऊन पोहोंचले आहेत, आणि आमचे साथीदार त्यांना जाऊन मिळाले असून ते आतां इंग्रजांवर चाल करून येत आहेत. परंतु इतक्यांत

कर्नल सिमसन रक्तानें न्हालेला किल्ल्यांत परत आला. तो जरी नखशिखांत रक्ताच्या चिळकांड्यांनीं न्हालेला दिसत होता, तरीं तें रक्त त्याचे स्वतःचें नसून त्याच्या एकनिष्ठ घोड्याचें होतें. आपल्या धन्याकरितां त्या घोड्यानें इतकें रक्त वाहविलें एवढेंच नव्हे, तर आपले प्राणही खर्ची घातले. हीच गोष्ट कर्नल साहेबाचे कपडे सांगत होते. रणरंगानें याप्रमाणें नटलेल्या सेनापतीला पाहून शिपाई चमकले. त्यांना वाटलें कीं आपला तर्क चुकीचा ठरला. कारण काशीची पलटण आली असती तर सेनापति धडधाकट किल्ल्यांत परत येणें शक्यच नव्हतें, असें त्यांना वाटलें आणि ते हताश झाले. सेनापतीनें किल्ल्यांत येतांच देशी सैनिकांना निःशस्त्र करण्याचा हुकूम सोडिला. सैनिकांचीं शस्त्रें घेण्याचें काम त्यानें शीखांच्या नायकाला सांगितलें. हा शिपाई गडी पंजाबांत इंग्रजांवरोबर जें शीखांचें युद्ध झालें होतें, त्यांत शौर्य गाजविल्यामुळें प्रसिद्धीस आला होता. आतां तर तो इंग्रजांच्या नाकांतील बाल झाला होता. गोऱ्या सैनिकांची आणि अधिकाऱ्यांची त्याच्यावर बहाल मर्जी असे. त्यानें हें काम करण्याचें कबूल केलें. देशी शिपाई किल्ल्याचे द्वारपाळ होते. या शिपायांना शीख मिळाले असते, आणि दोघांनीं मिळून बंडखोरांना मदत केली असती, तर तेथील इंग्रजांची कांहीं धडगत नव्हती. असें झालें असतें तर किल्ला बंडखोरांच्या हातीं अगदीं सहज गेला असता आणि संभवतः अलाहाबादेंतून इंग्रज निर्मूल झाले असते; किल्ल्यांत ठेविलेलें धन बंडखोरांनीं लुटलें असतें; आणखी काय काय झालें असतें तें कोणीं सांगावें? इतकें मात्र खरें कीं शीख शिपाई बंडखोरांना मिळाले नाहींत. ते कंबर कसून किल्ल्याचें रक्षण करावयाला तयार झाले. त्यांनीं चुनारगडहून आणलेल्या मोठाल्या तोफा किल्ल्याच्या तटबंदीवर चढविल्या. त्यांना मदत करावयाला इंग्रज स्वयंसैनिकही येऊन उभे राहिले. इंग्रज गोलंदाज पलीते पाजळून उभे राहिले. ही तयारी, हा उत्साह आणि ही स्वामिनिष्ठा व कर्तव्यदक्षता पाहून बाकीचे हिंदुस्थानी शिपाई लज्जित झाले. त्यांनीं खालीं माना घातल्या. शीखांच्या नायकानें हत्यारें मागतांच त्यांनीं तीं मुकाट्यानें त्याचे स्वाधीन केलीं. नंतर त्यांना किल्ल्याबाहेर हांकलून देण्यांत आलें. लज्जेनें त्यांना वर डोकें उचलून पाहवेना. अशाच स्थितींत ते मुकाट्यानें किल्ल्याबाहेर आले आणि बंडखोरांना जाऊन मिळाले.

किल्ल्यांत दारूगोळा भरपूर भरला होता. तसा प्रसंग आलाच तर त्याला आग लावून देण्याचें एका इंग्रज गोलंदाजानें ठरविलें होतें. कारण जर हा विपुल

दारुगोळा बंडखोरांचे हातीं पडता तर त्यांनीं अनर्थ केला असता. पण या गोलंदाजानें जेव्हां पाहिलें कीं शिपाई मुकाट्यानें हत्यारें खालीं ठेवीत आहेत, तेव्हां त्यानें आपला जवांमर्दीचा धाडशी बेत रहित केला.

इकडे शहरांत, जिकडे पहा तिकडे बंडखोर लुटालूट करीत होते. थोडाही विरोध करणाराला ते ठार करीत होते. त्यांनीं नाना उत्पात मांडिले होते. त्यांनीं तुरुंग तोडून कैदी मोकळे सोडिलेच होते. हे कैदी बंधनमुक्त होतांच लुटींत मिळाले. यूरोपियन व ख्रिस्ती लोकांवरच या सर्वांचा विशेष डोळा होता. इंग्रज मग तो कोठेंही आणि कसाही असो, ठार झालाच पाहिजे, हें त्यांचें तत्त्व दिसलें. ख्रिस्ती लोकांचीं घरें लुटून फस्त झालीं, म्हणजे त्यांना आग लावणें ही अगदीं सहज गोष्ट होती. ख्रिस्त्यांचीं दुकानेंही या लोकांनीं जाळून पाडून जमीनदोस्त करून टाकिलीं. रेलवेचा कारखाना तोडून टाकिला. तारायंत्राच्या तारा कापिल्या. किल्ल्याबाहेर असलेल्या इंग्रजांपैकीं कोणीही यांच्या तडाख्यांतून वांचला नाहीं. कारण या लोकांना लुटून ठार मारण्याची जणूं बंडखोरांनीं प्रतिज्ञाच केली होती. आणि या प्रतिज्ञापालनाच्या पवित्र कार्याला ते जीवेंभावें लागले होते. कालपर्यंत जे इंग्रजांचे मित्र होते आणि कंपनीचें अन्न खात होते, तेच आज इंग्रजांना नष्ट करण्यास व त्यांचें समूल उच्चाटन करण्यास प्रवृत्त झाले होते. कोणी कोणी असेंही म्हणतात कीं कित्येक पेन्शनर शिपाईही बंडखोरांना मिळाले होते. त्याचप्रमाणें अलाहाबादचे सर्व गांवगुंड बंड करून इंग्रजांविरुद्ध उठले होते. कांहीं वेळ असें वाटूं लागलें कीं इंग्रजांची सत्ता कायमची बुडाली. मुसलमानी अर्धचंद्र कोतवालीवर फडकूं लागला.

बंडखोर खजिना लुटण्याकरितां बरेच दिवसांपासून टपून बसले होते. परंतु जूनच्या सहाव्या तारखेपर्यंत त्याला कोणी हात लाविला नाहीं; कारण त्यांना असें वाटलें कीं मोंगल सम्राट लवकरच आपला लवाजमा घेऊन दिल्लीहून येथें येतील, त्या वेळीं हा खजिना आपण त्यांना नजर करूं. परंतु यापुढें त्यांच्यानें धीर निघेना, आणि अखेरीस सात तारखेला सकाळीं सहाव्या पलटणीचे शिपाई खजिन्यासमोर येऊन उभे राहिले. त्यांनीं दरवाजा तोडला आणि आंत शिरून ज्याला जितकें द्रव्य नेतां आलें तितकें त्यानें नेलें. यानंतर जें कांहीं शिल्लक राहिलें तें सर्व गांवगुंडांनीं लांबविलें. त्या वेळीं अलाहाबादेच्या खजिन्यांत नगद तीस लाख रुपये होते असें म्हणतात. प्रत्येक शिपाई दोन दोन चार चार थैल्या घेऊन गेला. प्रत्येक थैलींत हजार रुपये असत. तेव्हां प्रत्येक शिपायाला किती ऐवज मिळाला

असेल तो ज्याचा त्यानें ठरवावा. शिपाई तर लुटीचें धन खाकोटीस बांधून घरो-घर निघून गेले. राहिले शहरवासी आणि चोर, बदमाश व गांवगुंड ! त्यांना दाही दिशा मोकळ्या मिळाल्या आणि ते मनास येईल तें करूं लागले. शहरवासी-यांचे मात्र हाल होऊं लागले. हें वारें खेड्यापाड्यापर्यंत पोहोंचलें, आणि त्यानें विशेषतः मुसलमान जमीनदार व शेतकरी यांना पछाडलें. त्यांना वाटूं लागलें कीं कंपनीसरकारचें राज्य नष्ट झालें. मुसलमानांची तर अशी खात्रीच झाली होती कीं इंग्रज हिंदुस्थान सोडून निघून गेले. म्हणून ते नाना प्रकारचे अत्याचार करूं लागले.

जूनच्या अकरा तारखेला नीलसाहेब अलाहाबादला येऊन पोहोंचला. त्यानें चोहींकडे अराजकता पसरलेली पाहिली. अशा स्थितींतही किल्ला इंग्रजांच्याच हातीं आहे हें पाहून त्याला आनंदाश्चर्य वाटलें. किल्ल्यांत येऊन त्यानें पाहिलें तों तेथेंही अव्यवस्थेचेंच प्राबल्य आहे. कोणी कोणास पुसत नाहीं. दारूच्या बाटल्यां-वर बाटल्या फस्त होत आहेत, आणि त्या नशेंत झिंगून मारामारी आणि शिवीगाळ चालू आहे. हें दृश्य पाहून त्याला बरें वाटलें नाहीं. ही स्थिति सुधारण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें प्रथम शीख शिपायांना किल्याबाहेर काढिलें आणि बाहेरच निरनिराळ्या ठिकाणीं त्यांचा पहारा बसविला. यानंतर तो बंडखोरांचा समाचार घ्यावयाला निघाला, आणि कित्येक ठिकाणीं त्यानें त्यांना खरपूस चोप दिला. या सुमाराला शहरांत अशी अफवा उठली कीं इंग्रज लोक चारी बाजूंनीं तोफा लावून शहर उडवून देणार आहेत. या अफवेनें शहर-वासीयांना दे माय धरणी ठाय असें झालें. त्यांनीं हां हां म्हणतां शहर रिकामें केलें आणि सर्व लोक बाहेर चालते झाले. नंतर त्यानें थोडेसे सैनिक शहराचें रक्षण करण्याकरितां ठेवून, बाकीच्या शिपायांच्या निरनिराळ्या टोळ्या करून त्यांना जव-ळच्या दर्याबाद, सैदाबाद, रसूलपूर इत्यादि ठिकाणीं गांवगुंड बंडखोरांचा बीमोड करण्याकरितां रवाना केलें. याप्रमाणें शहरांतून बंडखोरांना आणि गुंडांना हांकलून लाविल्यामुळें शांतताप्रिय काळे गोरे घराबाहेर पडूं लागले. आणि हळू हळू सर्वत्र स्थिरस्थावर होऊन सर्व कामें पूर्वीप्रमाणें सुरळीतपणें चालू होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं.

याप्रमाणें ईश्वरानें खैर केली आणि वेळेवर इंग्रजांनीं सुसंगठित प्रयत्न केला म्हणूनच अलाहाबाद इंग्रजांच्या हातीं राहिलें. असो. संकट निघून गेल्यावर त्याचा वचपा काढण्याकरितां, आणि बंडखोरांनीं केलेल्या अत्याचारांचा सूड

उगविण्याकरितां व त्यांच्यावर जरब बसविण्यासाठीं गोरे लोक उत्सुक होऊं लागले. ज्याप्रमाणें दोन आठवडेपर्यंत बंडखोरांनीं गोरा माणूस दिसला कीं त्याच्या पाठीस लागून त्याचा पिच्छा पुरविला, त्याप्रमाणेंच आतां गोऱ्या लोकांनींही काळ्यांच्या बाबतींत सुरू केलें. यामुळें दुष्टांबरोबर सुष्टांनादेखील आंच पोहोंचली.

संयुक्त प्रांतांत याप्रमाणें एकच गोंधळ उडाल्यामुळें कलकत्त्याच्या अधिकाऱ्यांना देखील चिंता वाटूं लागली. शांतताप्रिय व दयाळु लार्ड क्यानिंगनें याच सुमारास लष्करी कायदा पुकारिला ! या कायद्याच्या जोरावर लष्करी व मुलकी अधिकारी लोकांना कडक शिक्षा ठोठावूं लागले. या अधिकाऱ्यांना सर्व काळे लोक शत्रू भासूं लागले, आणि त्यांनीं जो सांपडेल त्याला केवळ संशयावरून फांशी देण्याचा सपाटा चालविला. त्यांना चौकशीची, साक्षीपुराव्याची गरजच नव्हती. न्यायाचा दिखाऊ फार्स मात्र होत असे. यामुळें दररोज पुष्कळ लोक फांसावर चढविले जाऊं लागले. कधीं कधीं वीस वीस, तीस तीस लोक एका दिवसांत फांसावर चढविले जात. यांची पूसतपास करणारा कोणीच नव्हता ! फांशीची शिक्षा म्हणजे त्या दिवसांत अगदीं साधारण शिक्षा होऊन बसली.

अलाहाबादेस याप्रमाणें स्थिरस्थावर झाल्यावर नीलसाहेब लखनऊ आणि कानपूरकडे वळण्याचा विचार करूं लागले. परंतु त्यांना ताबडतोब या वेळीं हें काम करतां आलें नाहीं. किंबहुना त्यांनीं कानपूर जलदीनें गांठण्याचा प्रयत्नच केला नाहीं. त्यांना तेथें जाण्याची विशेष निकट वाटली नाहीं. पळपुट्या बंडखोर शिपायांना हुडकून काढून शिक्षा देण्यांत ते दंग होते. शिवाय एक तर त्यांच्याजवळ रसद कमी होती, दुसरें पुरेशा बैलगाड्या नव्हत्या, त्यामुळें फौज पाठविणें कठिण झालें. कारण शिपाई चालत गेले तरी दारुगोळा, तंबूडेरे वगैरे युद्धसामग्री वाहून नेण्याकरितां बैलगाड्यांची आवश्यकता होती. नीलसाहेब या अडचणी दूर करण्याची खटपट करीत असतांच सैन्यांत महामारीची सांथ सुरू झाली. एका दिवसांतच वीस माणसें मेलीं. महामारीच्या रोग्यांनीं इस्पितळें भरून गेलीं. यामुळें त्याला जून अखेरपर्यंत कांहींच करतां आलें नाहीं. शेवटीं ३० जूनला कसेबसे ४०० गोरे, ३०० शीख, १०० घोडेस्वार, आणि दोन तोफा एवढें सैन्य कानपूरला रवाना झालें. या सैन्याचा नायक रेनसाहेब होता. नीलसाहेबानें रेनला जो हुकूम लिहून दिला होता त्याचा सारांश असा:—" रस्त्यांत बंडखोरांनीं कोठेंही आश्रय घेतलेला दिसला तर तेथेंच त्यांच्यावर हल्ला करावा; ज्या गांवीं बंडखोर लपून बसले असतील तें गांव जाळून टाकूं अशी धमकी द्यावी. आवश्यकताच वाटली

तर तें गांव जाळून उध्वस्त करून टाकावें. जे शिपाई आपण निर्दोषी आहों हें पूर्णपणें सिद्ध करूं शकणार नाहींत त्यांना फांशी द्यावी. फत्तेपूरच्या लोकांनीं बंड केलें आहे. वाटेंत त्यांच्यावर स्वारी करणें अत्यंत जरूर आहे. तेथील पठाण राहतात तो भाग उध्वस्त करून टाकावा. तेथील डेप्युटी कलेक्टर सांपडला तर त्याला फांशी द्यावें, आणि त्याचें शीर कापून मुख्य मशिदीवर लटकावून द्यावें."

याच वेळीं मुंबईला असलेला हॅवेलॉक साहेब कलकत्त्याला आला. गव्हर्नर जनरल लॉर्ड कॅनिंग यानें त्याला अलाहाबादेस मुख्य सेनापती नेमून पाठविलें. कारण नीलच्या हडेलहप्पी व दुष्ट वागणुकीची वार्ता कॅनिंगला कळली असल्यामुळें, अशा अविचारी व अत्याचारी माणसाच्या हातीं मोहिमेचें आधिपत्य ठेवणें त्याला इष्ट वाटलें नसावें. हॅवेलॉक ३० जूनला अलाहाबादेस पोहोंचला. नीलला या अपमानामुळें फार वाईट वाटलें. पण तो करतो काय? वरिष्ठाच्या हुकुमाप्रमाणें हॅवेलॉकच्या हाताखालीं काम करणें त्याला भाग होतें. नीलसाहेबानें कानपूरकडे पाठविलेल्या तुकडीची हकीकत त्याला सांगितली. ती ऐकून हॅवेलॉकला संतोष झाला. त्यानें आणखी एक तुकडी नावेंतून तिकडे रवाना केली.

सूड उगविण्याला आणि बंडाचें उट्टें काढण्याला उत्सुक असलेले रेनचे सैनिक आपल्या अधिकाऱ्यांच्या हुकुमाची अंमलबजावणी करितांना अतिरेक करूं लागले. त्यांनीं रस्त्यांत जे जे गांव लागले ते ते उध्वस्त केले, व सूड घेण्यांत आपला अमूल्य वेळ घालविला. यामुळें जितक्या लवकर त्यांना कानपूरला पोहोंचावयास हवें होतें, तितक्या लवकर ते तेथें पोहोंचूं शकले नाहींत. हे शिपाई कानपूरला पोहोंचण्यापूर्वीच त्यांना लखनऊहून हेनरी लारेन्सनें पाठविलेला एक दूत भेटला. त्यानें आणलेली बातमी अशी होती, "आतां कानपूरचें रक्षण करणें शक्य नाहीं. शहर शत्रूच्या हातीं गेलें आहे. तेथील सेनापतीनें आपले प्राण विसर्जन केले आहेत, आणि त्याच्याबरोबर इतरही सर्व गोरे लोक मारले गेले आहेत."

ही खबर अलाहाबादेस कळली तेव्हां नीलसाहेबाचा तिजवर विश्वासच बसेना. त्याला वाटलें कीं हा केवळ शत्रूचा एक फसवणुकीचा डाव आहे. परंतु लवकरच इतर हेरांनीं ज्या बातम्या आणल्या त्या जेव्हां सर्व एकमेकांशीं जुळूं लागल्या, तेव्हां तेथें एकच हाहाःकार उडाला. शेवटीं ते सर्व कर्नल हॅवेलॉकला भेटले आणि सर्वजण मिळून विचार करूं लागले कीं आतां पुढें काय करावें? कारण सैन्याचें पुढारीपण हॅवेलॉककडे आलें होतें. लारेन्सप्रमाणें नीलचीदेखील हडेलहप्पी चालू होती.

त्यानेंदेखील न्यायापेक्षां सुडाला प्राधान्य दिलें. लोकांना कडक शिक्षा देऊन, व त्यांच्यांत दहशत उत्पन्न करून बंडाचा वणवा पेटूं द्यावयाचा नाहीं ही त्याची नीति होती. त्यामुळें त्याच्या हातून पूर्वप्रदेशांत फार अत्याचार झाले. त्याच्या अविवेकी धोरणामुळेंच काशी व जोनपूर येथील शीख इंग्रजांचे शत्रू बनले. सुदैवानें येथून पंजाब प्रांत फार दूर असल्यामुळें ही वार्ता सर्वसाधारण शीख समाजांत पसरूं शकली नाहीं. त्याच्या हडेलहप्पीनें व लष्करी न्यायानें पूर्व प्रांतांत इंग्रजांचा दरारा बसून तेथें बंड भडकलें नाहीं हें मात्र खरें. काशी-प्रयागचा टापू इंग्रजांच्या हातांतच राहिल्यानें, तेथून लखनौ-कानपूरवर चाल करून जाणें त्यांना सोयीस्कर पडलें. कलकत्त्याशीं त्यांचें दळणवळणही यामुळें सुरळीत चालू राहिलें. कारण रसद व दारुगोळ्याचा भरपूर पुरवठा झाल्याशिवाय शिपायांना तलवार मारणें शक्य नसतें. लष्करी दृष्टीनें लष्करी कायद्याच्या नांवाखालीं हे सर्व अत्याचार झाले असले, तरी त्यांचें समर्थन मात्र करतां येत नाहीं. बहुधा नीलच्या अत्याचारांच्या कथा ऐकूनच लार्ड क्यानिंगनें फौजेचें आधिपत्य त्याच्याकडून काढून घेऊन तें हॅवेलॉककडे सोंपविलें असेल. कारण असे अत्याचार करून जर विजय मिळविला तर जेत्यांना त्यांत भूषण नाहीं! सुधारलेले व रानटी जेते यांत मग काय फरक राहिला?

पुढें कानपूर घेतल्यानंतरही हातीं लागलेल्या बंडखोर शिपायांवर नीलनें फार अत्याचार केले. त्यांच्याकडून रक्त साफ करवलें, अभक्ष्य भक्षण करविलें व मृत्यूपूर्वी त्यांच्या धर्मभावना दुखवून मग त्यांना फांशीं दिलें. धर्म व जात बुडाल्यामुळें मेल्यानंतर स्वर्गलोकीं जातां येणार नाहीं, अशा मानसिक विवंचनेंत तडफडत अनेक बंडवाले त्याच्या हातून फांशीं दिले गेले. मृत्यूपेक्षां या धर्मनाशानें बंडवाले फार दुखावले गेले. त्यांनीं बंड केलें तेव्हां ते मृत्यूसाठीं तयारच होते. इंग्रजांच्या मनांत आपल्याविषयीं दयामाया नाहीं, ही गोष्ट ते जाणून होते. परंतु मृत्युपूर्वी एक तासभर जबरीनें आपला धर्म बाटवून आपल्याला भ्रष्ट केलें जाईल, ही मात्र त्यांना कल्पना नव्हती. त्यामुळें फांसावर चढतांना ते नीलला तळमळून शाप देत असत. नीलची रोजनिशी व त्यानें विलायतेला बंडासंबंधीं पाठविलेलीं पत्रें यावरूनच त्याचे अत्याचार समजून येतात. तरी तो धर्मनिष्ठ म्हणून त्याची प्रसिद्धि होती. कदाचित् त्याची धर्मनिष्ठा गोऱ्यांपुरतीच मर्यादित असेल! नील तर लखनौवर नव्हेंबर १८५७ मध्यें हल्ला चढवितांना गोळी लागून ठार झालाच. परंतु बंडानंतर तीस वर्षांनीं, मध्य हिंदुस्थानांत आगर येथें नीलचा मुलगा एका

शिपायाच्या हातून मारला गेला. याच्या बापाला नीलनें प्रथम धर्मभ्रष्ट करून नंतर फांशीं दिलें होतें. या सैनिकानें आपल्या बापाचा सूड नीलच्या पुत्रावर संधी येतांच उगवला. यामुळें नीलची वर्तणूक सुधारलेल्या राष्ट्राला न शोभण्यासारखी होती हें कोणालाही कळून येईल. नाहींपेक्षां ५७चें शल्य सरासरी तीस वर्षें एखाद्याच्या हृदयांत सारखें खुपत राहिलें नसतें. प्राणांची कोणी पर्वा करीत नाहीं. जो लढा-ईत सामील होतो, तो तळहातावर शीर घेऊनच आंत उतरतो. परंतु कोणाच्या धर्मावर घाला घालणें—आणि तो मनुष्य आपल्या कैदेंत असहाय होऊन पडला असतां,—त्याच्या दृष्टीनें धर्मनिषिद्ध अशा गोष्टी तरवारीच्या धारेखालीं करावयास त्याला भाग पाडणें, हें नामर्दाईचें कृत्य होय !

---

## प्रकरण २० वें.

# संस्थानांची हालहवाल.

———:०:———

पश्चिमोत्तर प्रान्तांतील निरनिराळ्या ठिकाणीं उडालेला गोंधळ पाहून आग्रा येथील गवर्नर कॉल्विनसाहेब बरेच अस्वस्थ झाले, व त्यामुळें साहजिकच त्यांचें लक्ष देशी संस्थानांकडे लागलें. या बंडखोर वातावरणाचा देशी संस्थानिकां-वरही परिणाम झाल्यास परिस्थिति फार बिकट होईल असें त्यांच्या मनानें घेतलें, व त्यांनीं प्रत्येक संस्थानिकाच्या मनाचा कल पाहण्यास सुरवात केली. कारण मध्यहिंदुस्थानांतील संस्थानांवर त्यांच्यामार्फतच कंपनीची हुकमत चालत असे. त्यामुळें खास कंपनीच्या प्रदेशांत बंडाची लाट उसळली, तरी संस्थानें बंडाळीपासून अलिप्त राहिलीं तर बंडाचा हां हां म्हणतां मोड करतां येईल असें त्यांना वाटत होतें. आणि संस्थानांनीं व संस्थानिकांनीं या आगींत उडी घेतली तर कंपनीचें राज्य टिकणें कठिण हें ते जाणून होते. या वेळीं संस्थानिकांना आपल्या जुन्या कर्तबगारीचा व पराक्रमाचा विसर पडला नव्हता, आणि त्यांच्या महत्वाकांक्षेवरील राख उडून ती पुन्हां प्रज्वलित होण्यास फक्त एक लहानशी फुंकर पुरे होती. मध्यहिंदुस्थानातील संस्थानात ग्वाल्हेर हें विस्तारानें, संपत्तीनें व पराक्रमानें श्रेष्ठ होतें.

ग्वाल्हेर आग्र्यापासून ६५ मैल अंतरावर आहे. त्या संस्थानाचे महाराज जयाजीराव शिंदे तेव्हां २३ वर्षांचे असून तारुण्याच्या ऐन उमेदींत होते. त्यांचेजवळ इंग्रजांचे देखरेखीखालीं तयार झालेले ८००० हून जास्त शिपाई

व २६ तोफा होत्या. याशिवाय हिंदी अधिकाऱ्यांचे देखरेखींत १०००० हून जास्त फौज होती. यांची इंग्रजांवर फार निष्ठा होती. काल्विनसाहेबानें मदत मागतांच त्यांनीं आपल्या खास शरीररक्षकांची पलटण त्यांचेकडे आग्र्याला रवाना केली. कारण रेसिडेन्टसाहेबांना दुसऱ्या शिपायांबद्दल विश्वास वाटत नव्हता. ह्या शिपायांना बंडखोरांबद्दल मनापासून सहानुभूति वाटत होती व दिल्ली–कलकत्त्याकडून रातोरात येणाऱ्या दूतांबरोबर ते गुप्त खलबत करीत असत. इंग्रजांचा नाश करण्याची व त्यांना हिंदुस्थानांतून हांकून देण्याची, त्यांनीं गंगाजल हातांत घेऊन शपथ घेतली होती, अशी अफवा सर्व दूर पसरली होती. रेसिडेन्ट मॅक्फर्सन व स्वतः महाराज यामुळेंच त्या शिपायांवर विशेष विश्वास ठेवीत नसत. शिपायांच्या वर्तनामुळें अधिकाऱ्यांचे त्यांच्याशीं वारंवार खटके उडत असल्यामुळें, इंग्रज बायकामुलांना राजवाड्यांत नेऊन त्यांच्याभोंवतीं ग्वाल्हेरच्या खास शिपायांनीं पहारा करावा अशी रेसिडेन्टानें व महाराजांनीं सूचना केली, परंतु ही सूचना इंग्रज सैनिकांना व अधिकाऱ्यांना पसंत पडली नाहीं.

महाराजांचा किल्ला लष्करांत असून छावणी मुरारमध्यें होती. लष्कर मुरारपासून ६ मैल अंतरावर होतें. महाराजांना छावणींतील इंग्रजांच्या रक्षणाची फार काळजी लागली होती. कारण मीरत व दिल्ली येथील बातम्यांमुळें ग्वाल्हेर येथील तैनाती फौज बिथरली होती व तिचा वारा महाराजांच्या फौजेलाही लागला होता. बंडाचा भडका केव्हां उडेल याचा नेम उरला नव्हता. अशा स्थितींत मेच्या २८ तारखेस ग्वाल्हेरचे शिपाई इंग्रजांवर हल्ला करणार अशी खोटीच अफवा उठली. चोहोंकडे या बातमीमुळें हाहाःकार उडाला. शेवटीं ही हूल खोटी ठरली व इंग्रजांना आपल्या कमकुवतपणाबद्दल लाज वाटली. ही बातमी महाराजांना कळतांच ते स्वतः घोड्यावर स्वार होऊन रेसिडेन्टसाहेबांकडे आले. तेथें पहाऱ्याचा कडेकोट बंदोबस्त करून इंग्रज बायकामुलांना आपल्या महालाजवळील वाड्यांत पाठविण्यास त्यांनीं रेसिडेन्टाला सांगितलें. त्यांचे इच्छेनुरूप दुसरे दिवशीं बायकामुलांची तिकडे रवानगी करण्यांत आली. या प्रकारामुळें पलटणी शिपायांनीं, आमच्यावर गैरविश्वास दाखविण्यांत आला हें चांगलें झालें नाहीं असा एकच गिल्ला केला, व आपल्या राजनिष्ठेचें प्रदर्शन केलें. शिपायांच्या सांगण्यावरून अधिकाऱ्यांनीं आपल्या बायकामुलांना पुन्हां छावणींत आणलें. महाराजांनीं ग्वाल्हेरमध्यें राहणाऱ्या इंग्रजांच्या रक्षणासाठीं चांगलाच बंदोबस्त केला. ग्वाल्हेर येथील फौजेचा त्या वेळीं ब्रिगेडिअर रामसे हा एक

मुख्य अधिकारी होता. त्याचा आपल्या शिपायांवर सोळा आणे विश्वास होता. कालिवनसाहेबांस महाराजांचे शरीररक्षकांना आग्रा येथून ग्वाल्हेरास परत पाठवण्यास रेसिडेन्टनें तार दिली असतां, यानें येथें कांहीं गडबड होण्याचा संभव नाहीं, आपण शिपायांना पाठवूं नये, अशा अर्थाचें कालिवनसाहेबांस पत्र लिहिलें. परंतु येथील रागरंग कांहीं वेगळाच होता. देशी संस्थानांतील इंग्रजांची तैनाती काळी फौज हळूहळू आपली फितुरी प्रगट करूं लागली. ता. ४ जून रोजीं नीमचच्या छावणींतील कांहीं सैनिक फितूर झाले. जूनच्या ७ तारखेस झांशीची एक पलटण फितूर झाली. सिपरी व जबलपूर येथील शिपायांच्या हालचालीसुद्धां संशयास्पद होऊं लागल्या. इंग्रजांच्या ताब्यांतील सर्व मुलखांत फितुरीच नजरेस येऊं लागली. एकंदरींत इंग्रजांच्या भरंवशाच्या तैनाती फौजेनेंच संस्थानांत बंडाचें निशाण प्रारंभीं तरी उभारलें. संस्थानी फौज मागाहून त्यांत सामील झाली.

ग्वाल्हेरमध्यें पण फितुरीला आरंभ झाला. इंग्रजांना आपले मुलखांतून हुसकून लावल्यास तुमची शक्ति वाढेल व पूर्वीप्रमाणें हिंदुस्थानचें पुढारीपण तुमच्या घराण्याकडे येईल व तुमच्या पराक्रमाला वाव मिळेल, आणि पेशवाई स्थापन केल्याचें पुण्य लागेल, अशा अर्थाचा महाराजांना वारंवार सल्ला मिळूं लागला. महाराज सर्वांचें ऐकून घेत. पण ते कोणाच्याच तंत्रानें वागण्याचें चिन्ह दिसत नव्हतें. त्यामुळें त्यांचे खासदार शिपाई संदिग्ध झाले. त्यांना उघडपणें कोणताच पक्ष घेतां येईना. इंग्रजांच्या हाताखालील फौजेंत दिवसेंदिवस पराकाष्ठेचा असंतोष पसरूं लागला व उघड उघड बंडाचा झेंडा उभारण्यास ती सेना अधीर होऊन योग्य संधीची वाट पाहूं लागली.

ता. १४ जूनला आदितवार होता. त्या दिवशीं एका इंग्रजी अधिकाऱ्याचें मूल वारलें. त्याच्या स्मशानयात्रेला बरेच इंग्रज लोक कबरस्थानांत गेले होते. शिपायांनीं त्यांना जातांना पाहिलें. कसा तरी दिवस संपला. संध्याकाळीं मात्र खूप गडबड सुरू झाली. इंग्रज लोक शिपायांवर चाल करून येत आहेत अशी खोटीच हूल उठली. सर्व शिपाई आपलीं हत्यारें व बंदुका सांवरून सज्ज होऊं लागले. सगळीकडे दंगल उडाली. अधिकारी लोकांना उडणाऱ्या दंगलीची कांहींच वार्ता नसल्यामुळें, ते शांतपणें आराम करीत होते. बंदुकीचे बार व हत्यारांचा खणखणाट ऐकून तेपण हत्यारबंद होऊन आल्या प्रसंगास तोंड देण्यास छावणीकडे गेले. त्यांचेपैकीं बरेच जणांना बंडखोरांनीं कापून काढलें. इंग्रज स्त्रिया आपले व आपल्या मुलांचे

प्राण वांचविण्यासाठीं जंगलाच्या रोखानें पळून जाऊं लागल्या. मेजर ब्लेक हे दुसऱ्या पायदळ पलटणीचे अधिपति होते. त्यांना दुसऱ्या एका पथकांतील शिपायांनीं कापून काढलें. ब्लेकसाहेबांवर त्यांच्या शिपायांचें फार प्रेम होतें. त्यांचा खून झालेला पाहतांच, त्यांच्या हाताखालील सर्व शिपाई दुसऱ्या पायदळ पलटणींतील शिपायांवर तुटून पडले. याप्रमाणें इंग्रजांना ठार मारण्यास जसे कांहीं लोक प्रवृत्त झाले, त्याप्रमाणेंच कांहीं त्यांचे संरक्षणाकरितांही तयार झाले. कित्येक शिपायांनीं इंग्रजांना आपल्या पाठीवर सामानाचे गठ्यांप्रमाणें लादून, निवाऱ्याचे जागीं पोंचवलें. बरेचसे इंग्रज लोक रेसिडेन्सींत व महाराजांचे महालांत जाऊन लपले.

या सर्व प्रकारानें महाराजांना फार दुःख झालें. रेसिडेंट मॅक्फर्सन यांना ही बातमी कळतांच ते महाराजांकडे जाण्यास ताबडतोब निघाले. रस्त्यांत फितूर झालेल्या वऱ्याच शिपायांनीं त्यांचेवर हल्ला करण्याचा यत्न केला, पण एका मराठ्यानें त्यांचा प्राण वांचविला. आम्ही साहेबांना कैद करून महाराजांकडे नेत आहोंत, असें खोटेंच सांगून त्यानें त्या बंडखोर शिपायांना चकविलें. त्या शिपायांनीं तें खरें मानून त्यांना जाऊं दिलें. महाराजांनीं घडलेल्या प्रकाराबद्दल आपली दिलगिरी प्रदर्शित केली. रेसिडेंटानें तेथील इंग्रजांची आग्रा किंवा चंबळ येथें रवानगी करण्यासाठीं गाड्यांचा बंदोबस्त करण्यास महाराजांस सांगितलें, परंतु स्वतः मात्र महाराजांजवळच राहण्याची इच्छा प्रकट केली. कारण त्यामुळें आपलें महाराजांवर वजन पडून ते बंडवाल्यांना सामील होणार नाहींत असा त्याला भरंवसा वाटत होता. पण यदाकदाचित् रेसिडेंटसाहेब महाराजांचे महालांत आहे असा पत्ता बंडखोरांस, लागल्यास, ते महालावर हल्ला करतील म्हणून महाराजांनीं या गोष्टीस नकार दिला व त्यांनाही आग्रा येथें निघून जाण्याची सल्ला दिली. नाइलाज म्हणून ते जाण्यास तयार झाले. ग्वाल्हेरमधील बंडखोर शिपायांस थोडेबहुत पैसे देऊन कसें तरी करून तेथून घालवून द्यावें, अशी महाराजांची इच्छा होती. पण रेसिडेंटाला तें पसंत पडलें नाहीं. त्यांचें म्हणणें पडलें कीं आग्रा व दिल्ली येथें शांतता होईपर्यंत शिपायांना येथून पाठविणें ठीक नाहीं. यांना येथून घालविल्यास ते बंडखोरांस जाऊन मिळतील, व इंग्रजांना त्यांचा दुसऱ्या टापूंत त्रास होईल.

ग्वाल्हेरहून निघालेले इंग्रज चंबळच्या रस्त्यानें चालूं लागले. रस्त्यांत त्यांचेवर बरींच संकटें आलीं. फितुरी बंडखोरांनीं कांहीं जणांना ठार मारलें व त्यांचें धन

लुटलें. बायकापोरांवर मात्र त्यांनीं हात टाकला नाहीं. जगले वांचलेले लोक चंबळहून दोन मैल दूर असलेल्या एका गांवीं येऊन पोंचले. येथें २०० बंडखोरांचा व त्यांचा सामना झाला. या लोकांचा मुख्य जहांगीरखान म्हणून एक हवालदार होता. हा पूर्वी कंपनीच्या नोकरींत असून पुढें ग्वाल्हेर दरबारचा नोकर झाला होता. हा वर वर आपण साहेबलोकांचें रक्षण करणारे मित्र आहोंत असें दाखवीत होता, पण याचे मनांत कपट आलें होतें. इतक्यांत ग्वाल्हेर दरबारचे प्रधान दिनकरराव यांनीं पाठवलेले ठाकूर बलदेवसिंग, कांहीं हत्यारबंद सैनिकांसह तेथें येऊन पोंचले, व त्यांचे सहाय्यानें हे इंग्रज लोक बायकापोरांसह सुखरूप चंबळ नदीच्या पलीकडील तीरावर जाऊन पोंचले. मॅक्फर्सन साहेबांचे विनंतीवरून धोलपूरच्या राजानें कांहीं हत्ती व शिपाई या लोकांच्या मदतीसाठीं पाठवले होते. ह्या पळून आलेल्या इंग्रज स्त्रीपुरुषांना हत्तीवर बसवून संस्थानी शिपायांनीं आपल्या पहाऱ्यांत त्यांना धोलपुरास पोंचविलें. तेथें महाराजांनीं त्यांना कांहीं दिवस ठेऊन घेतलें व त्यांचा आदरसत्कार केला. त्यानंतर बरेच हाल सोसून ही सर्व मंडळी १७ जूनला आग्रा येथें सुखरूप पोंचली. उरलेली मंडळी १९ व २२ जूनला आग्र्यास पोंचली.

एकंदर वीस इंग्रज ग्वाल्हेरमध्यें मारले गेले. महाराजांनीं रीतीप्रमाणें त्यांचें उत्तरकार्य करविलें.

कात्विनसाहेबांना ही सर्व हकीगत यथाक्रम कळली. मॅक्फर्सनसाहेबांचे सूचने प्रमाणें इंग्रजांच्या पदरची हिंदी फौज ग्वाल्हेरलाच ठेवल्यामुळें त्या बाजूनें आग्रा शहरावर हल्ला होण्याची भीति उरली नाहीं. परंतु बाकीच्या ठिकाणांहून येणाऱ्या बातम्यांमुळें छोटे लाटसाहेब विशेष अस्वस्थ होऊं लागले. नीमच येथील शिपाई फितूर होऊन आग्र्यावर चाल करून येत होते. पहिल्यानें हें ठिकाण ग्वाल्हेर संस्थानचे ताब्यांत होतें, पण इंग्रजांनीं तेथें आपली एक फौजी छावणी बनविली व तें ठिकाण आपल्या अधिकाराखालीं घेतलें. येथें दोन पायदळ तुकड्या व १ नंबरच्या घोडदळांतील कांहीं स्वार इतकी फौज होती. नीमचच्या उत्तरेस दोडशें मैलांवरील नसीराबाद येथील छावणींतही इंग्रजांच्या दोन पायदळ तुकड्या, एक गोलंदाजांची तुकडी व एक मुंबईची पलटण होती. येथील पायदळ फौजेंत व गोलंदाजांत चलबिचल दिसून येऊं लागली. ता. २८ मेला तिसऱ्या प्रहरीं कांहीं शिपाई तोफांजवळ जाऊन आपण कंपनी सरकारविरुद्ध बंड उभारल्याचें जाहीरपणें सांगूं लागले. मुंबईची पलटण मात्र यांना सामील झाली नाहीं. परंतु बंडखोर लोकांवर चाल करून तोफा ताब्यांत घेण्याचा

या पलटणींतील लोकांना हुकूम सुटला असतां, त्यांनीं त्या हुकमाकडे लक्षच दिलें नाहीं. यामुळें फुशारून बंडखोरांनीं अधिकाऱ्यांवर तोफा डागल्या. दोन अधिकारी मारले गेले व दोन जखमी झाले. यामुळें तेथील इंग्रज रहिवाशी हवालदील झाले. त्यांनीं आपली चीजवस्त तेथेंच टाकली व बायकापोरांना घेऊन ते पळून गेले. बंडखोरांनीं जाळपोळ व लुटालूट करून दिल्लीचा रस्ता धरला.

नसीराबादची ही हालहवाल नीमचला पोंचतांच तेथेंही पण ह्या प्रकाराची पुनरावृत्ति झाली. ता. ३ जूनला तेथील शिपायांनीं पण जाळपोळ करून दिल्लीची वाट धरली. यांनीं कोणाची हत्या मात्र केली नाहीं.

नीमच येथील शिपाई दिल्लीवर चाल करून येत आहेत ही बातमी आग्रा येथें पोंचतांच तेथेंही पण गडबड सुरू झाली. कारण दिल्लीच्या वाटेवरच आग्रा शहर होतें. ३०० मैल रस्ता चालून आल्यावर बंडखोरांच्या अंगीं आग्र्यावर चाल करण्याची हिंमत राहील असें काल्विन साहेबांस वाटत नव्हतें, व म्हणून ते विशेष काळजींत नव्हते. इंदूर संस्थानावर मात्र त्यांची तीक्ष्ण नजर होती. कारण त्या संस्थानांत बंडखोरांच्या चळवळी नेटानें चालू होत्या.

त्या वेळीं महू येथें इंग्रजांची फौजेची छावणी होती. हें ठिकाण इंदूर संस्थानांत आहे. येथें २३वी पायदळ पलटण, घोडेस्वारांचे पहिले तुकडींतील कांहीं स्वार, व एक गोलंदाजांचें पथक येवढी फौज होती. पायदळ सैन्यांत १६ इंग्रज, व ११७९ हिंदु, घोडेस्वारांत १३ इंग्रज व २८२ देशी, व गोलंदाजांत ९१ इंग्रज व ९८ देशी या प्रमाणांत शिपायांची भरती होती. या सैन्याचे अधिपति कर्नल प्लाट हे त्या छावणींत सर्वांत मोठे अधिकारी होते. इंदूरची रेसिडेन्सी येथून सरासरी १२ मैल दूर होती. रेसिडेंटचें राहण्याचें घर दुमजली असून मजबूत दगडी होतें, व त्याच्याभोंवतीं बाग होता. रेसिडेन्सीच्या त्या लांबलचक आवारांत बाजार व सरकारी रेसिडेन्टचा वाडा होता. याचे पश्चिमेस महूकडे जाणारी सडक होती. रस्त्याचे दक्षिणेस व पूर्वेस बागबगीचे व झाडांच्या रांगा होत्या. पश्चिमेस बाजार व लोकांचीं राहण्याचीं घरें होतीं. येथें रेसिडेन्सीचे रक्षणासाठीं ठेवलेले होळकर महाराजांचे शिपाई राहात असत. पोस्ट ऑफिस, तारघर व खजीना पण येथेंच होता. भोपाळची घोडेस्वार सेना येथेंच राहत होती. सर रॉबर्ट हॅमिल्टन् हे इंदूरचे पहिले रेसिडेन्ट होते. परंतु आजारी असल्यामुळें ते विलायतेस रजेवर गेले असतां, त्यांचे जागीं कर्नल हेनरी डुरँड यांना मुक्रर

करण्यांत आलें होतें. ते एक उत्कृष्ट लष्करी तज्ज्ञ होते. अफगाण युद्धांत यांनीं बरेंच नांव कमावलें होतें. १८५७ सालीं यांना गव्हर्नर जनरलनें मध्यहिंदुस्थानांतील संस्थानांचे एजंट नेमले, परंतु सर रॉबर्ट सुटीवर जातांच त्यांचे जागीं म्हणजे रेसिडेंटीवर यांची नेमणूक झाली. सर रॉबर्ट हॅमिल्टन् हे फार शांत प्रकृतीचे व विचारी पुरुष होते. त्यांच्या अगदीं उलट डुरँड साहेबांची वागणूक होती. ते फार कडक होते. लष्करी रिवाजाप्रमाणें प्रत्येक काम बिनचुक यंत्राप्रमाणें व्हावें अस त्यांचें मत असे. यामुळेंच त्यांना फौजेंतून काढून राजकीय खात्यांत एवढ्या मोठ्या जबाबदारीचे जागीं नेमलें, हें चांगलें झालें नाहीं. कारण त्या जागेला असा उद्दाम पुरुष चालत नाहीं.

इंदूरचे महाराज या वेळीं फक्त २१ वर्षांचे होते. हॅमिल्टन् साहेबांनीं त्यांचे शिक्षणाचे बाबतींत मुळींच हयगय केली नाहीं. उमेदसिंग नांवाच्या एका विद्वान ब्राह्मणास त्यांचे शिक्षक नेमून त्यांना सर्व शिक्षण यथासांग देण्यांत आलें. हॅमिल्टन्साहेब असतांना महाराजांना कोणताच त्रास पोंहोचूं न देण्याची ते खबरदारी घेत असत. कांहीं गडबड झाल्यास ते शांततेनें ती मिटवीत असत. डुरँडसाहेब हिंदी लोकांना फार तुच्छ लेखीत असत. महाराजांना हरप्रसंगीं दाबण्याचा व शिस्तीच्या कैचींत धरण्याचा ते प्रयत्न करीत. आपण येथें खरे मालक आहोंत, असें महाराजांना भासविण्यांत व त्यांचा सदोदित पाणउतारा करण्यांत ते धन्यता मानीत असत. यामुळें महाराज नेहमीं मनांत कुढत असत, व दोघांचीं मनें एकमेकांविषयीं सहजच विटलीं होतीं.

या वेळीं इंदूरच्या चारी बाजूंना अस्वस्थता माजली होती. पश्चिमोत्तर प्रांतांत सगळीकडे बंडाचीच आग पेटली होती. ग्वाल्हेर, नसीराबाद, नीमच येथील बंडखोर शिपाई इंदूरला वारंवार ये-जा करूं लागले होते. दिल्ली इंग्रजांचे ताब्यांतून बंडखोरांनीं घेतली होती. इंग्रजांना हिंदुस्थानांतून बाहेर मारपीट करून हांकलून लावण्याच्या धुंदींत सर्व लोक निमग्न होते.

अशा स्थितींतही रेसिडेन्टच्या चढेल वागणुकीनें नेहमीं दुःखित असलेले महाराज तुकोजीराव होळकर इंग्रजाविरुद्ध गेले नाहींत, हें खरोखरीच इंग्रजांचें नशीब होय. आजूबाजूची परिस्थिति पाहून ते मोठे चिंतातुर झाले. हत्यारांची कमतरता हें त्यांच्या चिंतेचें एक कारण होतें, व ती दूर करण्याकरतां त्यांनीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड एल्फिन्स्टन् यांस २००० बंदुका, ६०० पिस्तुलें व ४

लाख काडतुसें पाठविण्याकरितां लिहिलें. गव्हर्नरनें त्यांची मागणी पुरी नसली तरी अर्ध्या प्रमाणांत भागविण्याचें कबूल केलें. आतांपर्यंत महाराजांचेबद्दल डुरँड साहेबांना निश्चितता वाटत होती. जून महिनाभर सगळीकडे शांत होतें. १ जुलै रोजीं मात्र तेथें एकाएकीं बंडाचा डोंबाळा उठला.

त्या दिवशीं इंदूर येथील सर्व सैनिक इंग्रजांविरुद्ध उठले. सकाळची वेळ होती. साहेब लोक चहापाणी करण्यांत गुंतले होते. देशी शिपाई स्नान-स्वयंपाक करीत होते. इतक्यांत एकाएकीं तोफ डागली गेली. घोडदळांतील सादतखान नांवाचा एक सैनिक 'बांधवहो, लवकर तयार होऊन इंग्रजांना ठार मारा, असा महाराजांचा हुकूम आहे', असें ७१८ सैनिक बरोबर घेऊन ठिकठिकाणीं ओरडत असलेला दिसला. पाहतां पाहतां बरेच शिपाई त्याला सामील झाले. इंदूर दरबारचेही बरेच शिपाई इंग्रजांविरुद्ध उठले. कर्नल डुरँड यांनीं रेसिडेन्सीचे रक्षणार्थ ज्या तोफा मागवल्या होत्या, त्यांतूनच रेसिडेन्सीवर तोफांचा मारा सुरू झाला. प्रथमतः भोपाळचे घोडेस्वार व पायदळ रहात होते त्या छावणीवर हे तोफांचे गोळे पडले. कर्नल ट्रॅव्हर्स त्या तुकडीचे अधिपती होते, त्यांनीं त्या पलटणीस बंडखोरांवर तुटून पडण्याचा हुकूम दिला; पण त्यांनीं तो हुकूम पाळण्याचें नाकारलें. उलट त्यांनीं कर्नलसाहेबांचा घोडा जखमी करून त्यांची तलवार मोडून टाकली. मोठ्या कष्टानें जीव घेऊन ते पळून गेले.

कर्नल डुरँड ही सर्व हकीकत ऐकून थक्क झाले. आपण नेहमीं तुच्छ लेखत असलेले हिंदी लोक आपल्यावर उठलेले पाहून त्यांना आश्चर्य वाटलें, तसाच क्रोध पण आला. पण करतात काय ? सर्वच पलटणी बिथरल्या होत्या. शिवाय या शूर गड्याला बिकट प्रसंगीं कसें वागावें हें सुचत नव्हतें. उत्तम फौज दिमतीस असली म्हणजे हे तलवार मारीत व विलक्षण शौर्य प्रगट करीत. परंतु या विपन्नावस्थेंत त्यांचा धीर खचला. त्यांचा लष्करी ताठरपणा मावळून ते पळून जाण्यास तयार झाले. त्यांचेबरोबर दुसरे इंग्रज आपल्या बायकापोरांसह निघाले. ३०० भिल्ल, भोपाळचे कांहीं पायदळ शिपाई, व २०० घोडेस्वार त्यांचे रक्षणार्थ म्हणून निघाले. जातां जातां या लोकांना बंडखोरांनीं आपलीं घरेंदारें जाळून टाकलीं असें दिसलें, कारण आगीचा डोंब आकाशापर्यंत उठलेला दिसत होता. हे लोक लाचार होऊन भोपाळच्या बेगमकडे आश्रयार्थ गेले.

इकडे महूच्या छावणींतील रागरंगही निराळाच दिसूं लागला. कर्नल प्लॅट यांचा आपल्या शिपायांवर पूर्ण विश्वास होता. परंतु गोलंदाजांचे मुख्य कॅप्टन

हंगरफोर्ड, याला शिपायांचा संशय आल्यामुळें तोफा खुल्या जागेंत नेऊन ठेवण्याबद्दल त्यानें कर्नल ड्लॉटकडून हुकूम मागितला. कर्नलसाहेबांनीं हा मान्य केला. गोऱ्या लोकांचे व त्यांच्या बायकापोरांचे प्राण रक्षण करण्यासाठीं, अचूक माऱ्याच्या जागीं एक तोफ रोखून ठेवण्यांत यावी म्हणून त्यानें पुन्हां दुसरी सूचना केली, परंतु कर्नलसाहेबांनीं ती मान्य केली नाहीं. अशा वागण्यानें शिपायांना आपल्यावरील इंग्रजांचा विश्वास उडला आहे असा संशय येईल, व त्याचा एकंदर परिणाम ठीक होणार नाहीं असें त्यांचें मत पडलें, व इंग्रजांच्या संरक्षणाची कांहीं विशेष सोय कर्नलनें केली नानें.

ता. १ जुलै रोजीं होळकरांचे शिपाई व इंदूर येथील तैनाती फौज उलटल्याची बातमी कळतांच कॅप्टन हंगरफोर्डनें आपला तोफखाना घेऊन इंदूरकडे चाल केली. रस्त्यांत त्याला इंग्रज लोक तेथून पळून गेले असल्याचें समजलें, व त्यामुळें तो मधूनच महूकडे परत फिरला. सेनापतींना सर्व हकीकत सांगितल्यावर किल्ल्यावर तोफा चढविण्यासाठीं त्यानें हुकूम मागितला. परंतु कर्नल ड्लॉटनें शिपायांचे मनांत किल्मिष येईल म्हणून पुन्हां या गोष्टीला नकार दिला. परंतु हंगरफोर्डनें आपला हट्ट सोडला नाहीं. त्यामुळें नाइलाज म्हणून त्यांना रुकार द्यावा लागला. तोफा किल्ल्यावर चढविल्याबरोबर अस्वस्थतेचीं चिन्हें दिसूं लागलीं. एकाएकीं रात्रीं १० वाजतां २३ व्या पलटणीच्या स्वयंपाकगृहाला आग लागली व ती आजूबाजूच्या घरांना लागून फार पसरूं लागली. त्या रात्रीं ९ वाजतां ड्लॉटसाहेबानें सर्व कांहीं ठीक आहे म्हणून हंगरफोर्ड साहेबाला कळवलें होतें. बरोबर १ तासानेंच आगीचा डोंब उसळला व नेहमींचे आज्ञाधारक शिपाई अधिकाऱ्यांचे प्राण हरण करण्यास सज्ज झाले. कर्नलसाहेब घाबरत घाबरत हंगरफोर्डकडे गेले व त्यांनीं तोफा डागण्याकरितां तयार करण्याचा त्याला हुकूम दिला. नंतर स्वतां घोड्यावर स्वार होऊन ते शिपायांना फितुरीपासून परावृत्त करण्याकरतां गेले. परंतु एका शिपायानें गोळी घालून त्यांची इहलोकची यात्रा पूर्ण केली. त्यांच्या साथीदारांची पण अशीच वासलात लागली. पहिल्या घोडदळ पलटणीच्या अधिकाऱ्याला अशीच एक गोळी लागली. गोळी वर्मी न लागल्यामुळें तो पळून जाण्याची तयारी करूं लागला. इतक्यांत शिपायांनीं त्याला पकडून तलवारीनें त्याचें शिर धडापासून अलग केलें.

इकडे कप्तान हंगरफोर्ड स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं तोफा डागण्याकरतां तयार केल्या; परंतु त्यांना समोर कोणी फितुर शिपाईच दिसेनात. ते किल्ल्या-

वरून उतरून छावणीकडे आले व अंधेरांतच छावणीवर त्यांनीं अंदाजें गोळयांची सरबत्ती केली. शिपायांनीं पण उलट गोळीबार केला, परंतु अंधेरांत त्यांचे नेम ठीक लागले नाहींत. हंगरफोर्डच्या तोफांपुढें त्यांचा फार वेळ टिकाव लागला नाहीं, म्हणून ते इंदूरकडे चालते झाले. हे शिपाई इंदुरास पोंचतांच तेथील फितुर शिपायांना फार स्फुरण चढलें.

महू येथील बंडखोर इंदुराकडे गेल्यामुळें हंगरफोर्ड साहेब एक प्रकारें निश्चिंत झाले. मेलेल्या अधिकाऱ्यांचीं प्रेतें त्यांनीं पुरविलीं व आलेल्या संकटाचे निवारणार्थ चांगला बंदोबस्त केला. महूमध्यें त्यांनीं लष्करी कायदा पुकारला. नंतर महाराजांच्या मनाचा कल पाहण्याकरतां त्यांनीं महाराजांना, " मला आपण बंडखोरांना सामील आहांत, अशा अर्थाचीं बरीच निनांवी पत्रें येतात. तरी खरी हकीगत काय ती कळवावी, " अशा अर्थाचें एक पत्र पाठविलें. महाराजांनीं आपल्यावर केलेल्या आरोपांचें सडेतोड खंडन करण्याकरतां व सर्व खरीखुरी हकीगत हंगरफोर्डला नीट समजावून सांगण्याकरतां दोन अधिकाऱ्यांना महूस पाठविलें. त्यांनीं सांगितलेली हकीगत ऐकून हंगरफोर्डसाहेब संतुष्ट झाले व त्यांनीं इंदूर आणि महू येथें आपल्या मनाप्रमाणें बंदोबस्त करण्याची तयारी केली.

इकडे महाराज फार चिंतेंत पडले. इंदूर व महू येथें बंड झाल्यानें त्याचा शिंतोडा आपल्यावर पण थोडा बहुत येईल ही जाणीव त्यांना होती. ते इंग्रजांचे पक्षपाती नसले तरी त्यांची शक्ती जाणून होते. ता. १ ते ३ जुलाईच्या दरम्यान इंदूर संस्थानांत असंतोष व बंडाळी माजली होती. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नव्हता. मात्र बऱ्याच इंग्रजांना महाराजांनीं आपल्या महालांत रक्षणार्थ आणून ठेवलें. बंडवाल्या शिपायांनीं या लोकांसाठीं मागणी घातली असतां महाराजांनीं या लोकांना त्यांचे हवालीं केलें नाहीं. ४ जुलाईला महाराज स्वतः घोड्यावर स्वार होऊन बंडखोरांचे समोर आले व त्यांना बंडापासून परावृत्त होण्याचा उपदेश करूं लागले. बंडखोरांनीं तिकडे दुर्लक्ष करून इंग्रजांचे दुर्गुणांचा महाराजांसमोर पाढा वाचला व आपण धर्माच्या पवित्र कार्यांत आमचें पुढारीपण स्वीकारा, अशी महाराजांना उलट विनंती केली. त्यावर महाराज म्हणाले, " मी कांहीं आपल्या बापदाद्यांसारखा धाडशी व शूर नाहीं, शिवाय बायकापोरांची ही चाललेली कत्तल पण मला पसंत नाहीं." इतकें म्हणून ते आपल्या महालाकडे परत फिरले. शिपायांपैकीं कांहीं महाराजांचे म्हणण्याप्रमाणें शांत

झाले व बाकी लोक रेसिडेन्सीच्या खजिन्यांतून व इंदोर येथील ख्रिस्ती लोकांपासून लुटलेली संपत्ति व तोफा घेऊन दिल्लीकडे रवाना झाले. शहरामधील धामधूमही बंद झाली. तेव्हां महाराजांनीं कंपनीच्या सरकारी खजिन्यांत उरलेली रक्कम आपल्या आश्रयाला राहिलेल्या इंग्रजांबरोबर हंगरफोर्डसाहेबांकडे महूस रवाना केली. आपल्या तिजोरींतील जडजवाहीर व महत्वाचे दस्तऐवजही पण त्यांचेकडे पाठवून दिले. नंतर मुंबईचे गव्हर्नर, कर्नल डुरँड, व दुसऱ्या अनेक इंग्रज अधिकाऱ्यांना सविस्तर पत्रें पाठवून त्यांत आपल्या दोस्तीची, सहाय्यतत्परतेची व विश्वासूपणाची जाणीव करून दिली, व पत्रांत स्वच्छ लिहिलें कीं, “माझे शिपाई बंडखोर झाले असले तरी मला त्यांचेबद्दल बिलकुल सहानुभूति वाटत नाहीं. मीं डुरँडला मदत करण्याचा प्रयत्न केला, परंतु माझ्या शिपायांनीं माझे हुकूम पाळण्याचें नाकारल्यामुळें माझा नाइलाज झाला. बंडवाल्यांवर हत्यार उचलण्याचें त्यांनीं सपशेल नाकारलें. या तीन चार दिवसांत बंडवाल्यांची कशीबशी येथून धिंडका काढून मीं इंदूर येथें शांतता प्रस्थापित केली आहे.” इतक्यांत माळव्याचे हद्दींतील अमझेऱ्याचे अधिपतीनें कॅप्टन हचिन्सन यांना आपल्या किल्ल्यांत कैद केलें असल्याची बातमी आली. अमझेरा हें ग्वाल्हेर संस्थानांतील एक लहानसें मांडलिक संस्थान आहे. कॅप्टन हचिन्सन हे भिल्लांचे वस्तींत इंदूरचे एजंटातर्फे सरकारी एजंट नेमले गेले होते. हे सर रॉबर्ट हॅमिल्टन् यांचे जांवई होते. सर हॅमिल्टन् यांच्याशीं असलेल्या घरोब्यामुळें, होळकरमहाराज त्यांच्या नातलगांनासुद्धां आपलेच आप्त समजत असत. त्यामुळें ही बातमी कळतांच होळकर महाराजांना फार चिंता लागली. पण ही बातमी खरी नव्हती. कॅप्टन हचिन्सन् त्या वेळीं अमझेऱ्याच्या जवळच भूपावरनामक गांवीं भिल्ल सैनिकांबरोबर होते. ता. २ जुलईला तेथें अशी बातमी कळली कीं, इंदूरचे शिपायांनीं रेसिडेन्सीवर हल्ला केला व स्वतः महाराज बंडवाल्यांचे पुढारी झाले आहेत. या बातमीमुळें माळव्यांतील लहानमोठ्या संस्थानांत खळबळ सुरू झाली. अमझेऱ्याचे शिपाई आपल्यावर चाल करून येत आहेत असें कॅप्टन हचिन्सनला कळलें. ता. २ जुलै रोजीं रात्रीं धारचे कांहीं शिपाई भूपावरकडे चाल करून येत आहेत अशीही पण बातमी आली. या बातम्या ऐकून सर्व भिल्ल पळून गेले व केवळ ३० जण कॅप्टनसाहेबांजवळ राहिले. हें पाहून कॅप्टनसाहेब व तेथें राहणाऱ्या इतर इंग्रजांनीं आपापल्या बायकामुलांसह वेष पालटून पळून जाण्याचा विचार केला. शेवटीं काबूली व इराणी व्यापाऱ्यांचे वेष घेऊन ते झबुवानामक

संस्थानाकडे आश्रयार्थ गेले. हें संस्थान इंदोर व अमझेरा यांचे मध्यें आहे. येथील महाराज जोधपुर वंशांतील होते. हचिन्सननें झबुवा येथील राजाला पत्र लिहून आपल्या मदतीसाठीं १०० मिल्ल मागवून घेतले, व त्यांचे बरोबर तो झबुवा येथें येऊन पोहोंचला.

तेथील महाराज या समयीं १६ वर्षांचे युवक होते, व सारा राज्यकारभार त्यांची आजी पाहात होती. या म्हाताऱ्या राणीनें आश्रयार्थ पळून आलेल्या या लोकांची चांगली तरतूद ठेवली. मात्र होळकर महाराजांना कॅप्टन हचिन्सन् झबुवा राज्यांत कैद होऊन पडले आहेत अशी खोटीच बातमी कळली. तेव्हां त्यांनीं कांहीं सैनिक त्यांना सोडविण्याकरतां म्हणून पाठविले. पण खरी हकीकत कळतांच त्या निराश्रित लोकांना इंदुरास घेऊन येण्यासाठीं आपल्या सैनिकांना त्यांनीं हुकूम दिला. कांहीं उपद्यापी लोकांनीं हचिन्सन् साहेबांना इंदूरची खोटीनाटी हालहवाल सांगून तेथें न जाण्यास सांगितलें, परंतु महाराजांवर त्यांचा पूर्ण विश्वास असल्यामुळें ते इंदुरास आले. वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या अनुमतीनें ते इंदुरास तात्पुरते रेसिडेंट झाले व कॅप्टन् हंगरफोर्डनें त्यांना त्या कामाचा सर्व चार्ज समजावून दिला.

या सर्व गोष्टींवरून महाराजांची राजनिष्ठा व्यक्त झाली. परंतु कर्नल डुरँडनें त्यांचेवर आळ ठेवण्यास कमी केलें नाहीं. आपल्या भीरुपणाची व पलायनाची त्याला लाज वाटली नाहीं, पण तो महाराजांवर मात्र निष्कारण, ते बंडखोरांना सामील असल्याचा आरोप करीत होता. यामुळें महाराजांची राजनिष्ठाच विशेष व्यक्त झाली. बंडाच्या समाप्तीनंतर हिंदुस्थान सरकारचे परराष्ट्रीय मंत्री झाल्यावर देखील, त्यानें बंडखोरांना सामील असल्याचा आरोप होळकरांवर शाबीत करण्याचा प्रयत्न केला. बंडामध्यें ज्या संस्थानिकांनीं कंपनी सरकारला मदत केली त्या सन्माननीय दोस्तांच्या यादींतसुद्धां होळकरांचा त्यानें निर्देश होऊं दिला नाहीं. परंतु सर्व इतिहासकार होळकरांना निर्दोषी समजतात. मुंबईचे गव्हर्नर प्रथमपासूनच त्यांना निर्दोषी समजत असत, व शेवटीं तर भारत सरकारला देखील होळकरांचा जाहीर सन्मान करावा लागला.

इंदूरच काय पण धारचें संस्थानसुद्धां इंग्रजी राज्याला जोडण्याचें डुरँड साहेबांच्या फार मनांत होतें. परंतु मोठमोठ्या संस्थानिकांचा व खुद्द कंपनीचा सुद्धां आपल्या फितूर सैन्यावर ताबा चालूं शकला नाहीं, तर या छोट्या संस्थनिकांनाच दोष लावण्यांत काय अर्थ, म्हणून त्यांचें म्हणणें सरकारनें निकालांत काढलें.

याप्रमाणें कर्नलसाहेबांची कोणतीच इच्छा पुरी झाली नाहीं. त्यांची बढती मात्र सारखी होत गेली व शेवटीं ते पंजाबचे गव्हर्नर झाले.

२३ मे १८५७ रोजीं धारचे महाराज पटकीनें मरण पावले व त्यांचा धाकटा भाऊ आनंदराव पवार हा गादीवर बसला. आनंदरावाचें वय त्या वेळीं फक्त १३ वर्षांचें होतें, त्यामुळें त्यांचा दूरचा चुलता भीमराव भोंसले व दिवाण रामचंद्र बापूजी यांच्या तंत्रानेंच संस्थानचा राज्यकारभार चालला होता. बंडाची लाट धारला पोहोंचली, तेव्हां शिपायांना तेथें कोणीच पायबंद घालूं शकलें नाहीं. १ जुलै रोजीं इंदोरला झालेलें बंड धारला कळल्याबरोबर, तेथील शिपायांनीं भोपापूर आणि सरदारपूर हीं गांवें लुटून जाळपोळ केली, व सभों-वतालचा मुलूख वैराण करून ३१ आगष्ट रोजीं धारचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. डुरँडसाहेब तेव्हां भोपाळकडे पळून गेले होते. त्यांनीं थोडेंसें प्रसंगा-वधान व अधिक धैर्य दाखविलें असतें, तर त्यांच्या जवळ राहिलेल्या तीनशें चारशें राजनिष्ठ शिपायांच्या जोरावर महूहून कुमक येईतोंपर्यंत इंदुरास आपलें आसन ठेवणें त्यांना फारसें कठिण गेलें नसतें. कारण त्यांच्या मदतीसाठीं हंगरफोर्ड तोफखाना घेऊन महूहून इंदूरकडे निघालाच होता. परंतु माझ्या हाताखालील शिपाई राजनिष्ठ असले तरी बंडखोरांवर उलट मारा करीनात, पण मला भोपाळ-कडे पोहोंचविण्यास मात्र ते तयार झाले, अशा लंगड्या सबबीवर स्वतांच्या पळ-पुटेपणाचें समर्थन करणाऱ्या डुरँडनें, शिपायांना काबूंत न ठेवल्याबद्दल होळकर व पवार यांना दोष द्यावा व बंडवाल्यांना तुम्ही आंतून सामील होतां असा त्यांच्यावर उघड आरोप करावा, हा निर्लज्जपणाचा कळसच होय! ‘आमचे हुकूम शिपायांनीं ऐकले नाहींत, पण कोणते शिपाई तुमचे हुकूम तरी तेव्हां ऐकत होते,’ असा होळकरांनीं डुरँडला उलट प्रश्न करून, ‘तू देखील बंडवाल्यांना आंतून सामील होतास असा निष्कर्ष आम्ही काढला तर कोठें चुकेल?’ असा खडा सवाल टाकावयाला हवा होता. मुंबईच्या पलटणी घेऊन डुरँड साहेबाची स्वारी परत मध्यहिंदुस्थानांत आली, तेव्हां १९ ते ३१ आक्टोबरपर्यंत तोफांचा भडिमार करून त्यांनीं बंडवाल्यांचा मोड केला व धारचा किल्ला व संस्थान आपल्या ताब्यांत घेतलें. धार संस्थानचे अधिपति केवळ १३ वर्षांचे असल्यामुळें बंडांत त्यांचें अंग नव्हतें, व दुसऱ्यांच्या अपराधाबद्दल त्यांना शिक्षा देणें अन्याय्य ठरेल या कल्पना डुरँडच्या लष्करी मेंदूंत येणें शक्य नव्हतें. धार संस्थान खालसा कर-ण्यांत यावें अशीच त्याची मनीषा होती, परंतु हिंदुस्थान सरकारनें त्याची

शिफारस मानली नाहीं. तरी पण भोपाळच्या बेगमेनें दाखविलेल्या अपूर्व राजनिष्ठेबद्दल व इंग्लंडला संकटकाळीं दिलेल्या आश्रयाबद्दल, ४५६ चौरस मैल क्षेत्रफळ असलेला बैरशिया जिल्हा धार संस्थानांतून जप्त करून भोपाळच्या राज्यांत सामील करण्यांत आला. बेगमेच्या राजनिष्ठेचें बक्षीस हलवायाच्या घरावर परभारें तुळशीपत्र ठेवून देण्यांत आलें. आनंदराव पवारांचा काडीमात्र अपराध नसतांना देखील, त्यांना आपल्या राज्याच्या एका मोठ्या तुकड्याला त्या वेळीं मुकावें लागलें. बळी तो कान पिळी हा न्याय चालू असल्यामुळें, जिवावरचें दुखणें शेपटावर गेलें म्हणून आनंद व समाधान मानून घेणें त्यांना भाग होतें. कारण त्यांचें सर्व संस्थान गिळंकृत करण्याची डुरँडसाहेबाची इच्छा होती, परंतु होळकर व पवार यांच्या सुदैवानें ह्यामिल्टन साहेब लवकरच परत आपल्या कामावर रुजू झाले व त्या संस्थानामागची डुरँडची भेकड व चढेल संक्रांत सुटली.

देवासचे राजे व जावरा येथील नबाब इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिले. नबाबानें तर बंडवाल्यांच्या कारस्थानांचा इंग्रजांना अनेक वेळां सुगावा दिला, आणि डुरँडसाहेब परत आले तेव्हां त्यांच्या फौजेंत स्वतां जातीनें लढण्यास तो तयार झाला. रेवा, ओरछा व छत्रपूर येथील संस्थानिकांनीं इंग्रजांना तऱ्हेतऱ्हेची मदत केली. त्यामुळें बंडाचा वणवा दक्षिणेंत पसरूं शकला नाहीं. मध्यहिंदुस्थानांतील राजनिष्ठ संस्थानांचा नर्मदेच्या कांठानें बांध असल्यामुळें उत्तरेकडील बंड उत्तरेसच राहिलें. या सर्व संस्थानिकांत शिंद्यांची मदत फारच मोठी झाली. शिंद्यांचें सामर्थ्य, नांव व दरारा बंडवाल्यांच्या बाजूस गेला असता, तर बंडाचा वणवा खात्रीनें हिंदुस्थानभर भडकला असता. केच्या मतानें तर हिंदुस्थानांतील इंग्रजी सत्तेचें भवितव्य चार महिनेपर्यंत शिंद्यांच्या हातीं होतें. त्यांनीं कंपनीला साहाय्य करण्याचें ठरविल्यामुळें बंड सुलभ रीतीनें मोडतां आलें. शिंदेहोळकरांचें इंग्रजांवर विशेष प्रेम होतें अशांतला भाग नाहीं. परंतु इंग्रजांचें सामर्थ्य ते ओळखून होते. आपण बंडवाल्यांना मिळालों व बंड अयशस्वी झालें तर इंग्रजांच्या सुडाच्या ज्वाळांत आपण पार होरपळून जाऊं व आपलीं पाळेंमुळें खणलीं जातील, ही भीति त्यांना वाटत होती. शिवाय दिल्लीच्या मोंगल बादशाहीपेक्षां इंग्रजी बादशाहीच त्यांना विशेष पसंत होती. बादशाही नष्ट होऊन जर स्वातंत्र्य त्यांना उपभोगतां आलें असतें, तर तें त्यांना साहजिकच अधिक रुचलें असतें, परंतु तसा योग दिसत नव्हता. बंड यशस्वी झालें तर मोंगल बादशाहीची पुन्हा प्राणप्रतिष्ठा होणार हें उघड दिसत होतें, आणि ती

गोष्ट त्यांना मुळींच इष्ट वाटत नव्हती. त्यापेक्षां त्यांच्या लेखीं इंग्रजच बरे वाटत होते. शिंदे होळकरांच्या उदाहरणानें मध्यहिंदुस्थानांतील लहान मोठे संस्थानिक इंग्रजांशीं राजनिष्ठच राहिले. त्यांचे शिपाई–विशेषतः नांवाला त्यांची-परंतु खरी इंग्रजांची तैनाती फौज बिथरली, परंतु ते व त्यांच्या खासगी संस्थानी फौजेनें इंग्रजांना पूर्णपणें साहाय्य केलें.

स्वातंत्र्येच्छू रजपूतवीर संस्थानिक कंपनीशीं अत्यंत राजनिष्ठ राहिले. त्यांच्या वर्तनामुळें राजपुतान्यांतील असंतुष्ट लोकांना डोकें वर करण्याची संधी मिळाली नाहीं. खरें पाहिलें तर या वेळीं राजपुतान्याकडे लोकांचें सारखें लक्ष वेधून राहिलें होतें, परंतु तेथें असंतोष कुठेंच दिसत नव्हता. इंग्रज आपल्या जातींचा व धर्माचा नाश करण्याचा प्रयत्न करीत आहेत अशा कंड्या तिकडेही पिकल्या होत्या. परंतु त्यांच्यावर कोणाचा विश्वास बसला नाहीं. राजपुतान्यांत मेवाड, जयपूर, जोधपूर आदिकरून १८ लहान मोठीं संस्थानें होतीं. यांतील १७ संस्थानिक हिंदू होते, व फक्त एका संस्थानाचें आधिपत्य विख्यात पेंढारी सरदार अमीरखान याच्या वंशजाकडे होतें. प्रत्येक संस्थानांत सरकारतर्फे एक एक एजंट असून त्या सर्वांवर एक रेसिडेंट होता. त्यावेळीं तेथील रेसिडेंट प्रख्यात सर हेन्री लॉरेन्स यांचे बंधु कर्नल जॉर्ज लॉरेन्स हे होते. हे पण आपल्या भावाप्रमाणें निर्भय, धाडशी व कर्तव्यपरायण होते. मीरत येथील दंग्याची हकीकत कळली तेव्हां हे अबू येथें होते. परंतु ही हकीकत कळतांच त्यांनीं सर्व संस्थानांत शांतता राखण्याबद्दल जाहीरनामा काढला व संस्थानी फौजा जय्यत तयार ठेवण्याबद्दल सर्व संस्थानिकांना सूचना केली. पश्चिमोत्तर प्रांताचे गव्हर्नर लॉर्ड काल्विन् यांनीं सर्व गोरे शिपाई व खजीना घेऊन आग्र्याला निघून येण्याबद्दल कर्नल लॉरेन्स यांना लिहिलें. पण या वेळीं प्राणांच्या भयानें राजपुताना सोडणें रास्त नाहीं या सबबीवर त्यांनीं तिकडे जाण्याचें टाळलें. काल्विनसाहेबांना पण पुढें ही गोष्ट पटली. त्यांनीं त्यांचें म्हणणें ऐकलें, व त्यांना ब्रिगेडियर जनरलचा किताब देऊन राजपुतान्यांतील सैन्याचे प्रमुख सेनापति केलें.

राजपुतान्याचें केंद्र जें अजमीर, तेथें त्या वेळीं सरकारी तिजोरींत पुष्कळ द्रव्य होतें. बंडखोरांची यावर नजर जाऊं नये म्हणून कर्नल लॉरेन्सनीं अजमीरच्या बचावाचा विशेष बंदोबस्त करण्याकडे लक्ष दिलें. तेथें एक शिपायांची पलटण होती व माहीर नांवाचे निम्नश्रेणींतील कांही सैनिक होते. माहीर लोक पहिले फारच उर्मट होते. अजमीरचे कमिशनर डिक्सन साहेब यांचे शिक्षणानें त्यांची

स्थिति थोडीफार सुधारली. त्या वेळीं डिक्सनसाहेब आजारी असून देवार नामक ठिकाणीं होते. तेथेंच त्यांचा शेवट झाला. त्यांचे शिक्षणानें माहीर लोक उत्कृष्ट शिपाई झाले. या माहीर लोकांचें इतर शिपायांशीं जातिभेदामुळें वितुष्ट होतें. ब्रिगेडियर लॉरेन्स यांनीं पलटणी शिपायांना अजमीराहून हलवण्याचें ठरविलें, व त्यांच्या जागीं एक माहीर पलटण अजमिरला आणून ठेवली व त्यांच्या जोरावर शिपायांना तेथून काढून लावलें. यामुळें अजमीरच काय पण सारा राजपुताना बंडाचे आगींतून वांचला. कारण लारेन्ससाहेबापाशीं प्रथम पन्नासदेखील खात्रीचे सैनिक नव्हते. सर्व राजपुतान्यांतील इंग्रज शिपायांची संख्या शंभराच्या आंत बाहेर होती. परंतु त्यांनीं आपलें रोजचें काम सुरळीत चालवून, जणूं विशेष कांहीं घडलेंच नाहीं अशी वृत्ती राखली. त्यांच्या या धैर्यशाली वर्तनाचा लोकांच्या मनावर फारच उत्कृष्ट परिणाम झाला, व बंडखोरांना पकडण्याकरितां नागरिक मदत करूं लागले. उदेपूरचे राणाजी वाडवडिलांचे वेळेपासून स्वाभिमानी व आपल्याच मतानें चालणारे होते, त्यामुळें इंग्रजांची त्यांचेवर विशेष नजर होती. कॅप्टन सावर्स तेथील एजन्ट होते. त्यांना भेटून राजानें आपल्या राजनिष्ठेबद्दल खात्री करून दिली व वेळ प्रसंगीं मदत करण्याचें वचनही दिलें. इकडून तिकडून पळून आलेल्या इंग्रजांची व त्यांच्या बायकामुलांची चांगल्या तऱ्हेनें तरतूद करून व त्यांचे प्राण वांचवून राजानें आपलें वचन पाळलें.

जयपूरच्या राजानें इंग्रजांना चांगली मदत दिली. त्याची सेना आग्र्याच्या सरहद्दीचें संरक्षण करीत होती. जोधपूरचा राजा अंतःकलहामध्यें व्यग्र होता तरी त्यानें २००० सैनिक व ६ तोफा इंग्रजांचे मदतीस दिल्या, व त्यांची बाजू बळकट केली.

या प्रकारें राजपुतान्यांतील देशी संस्थानिकांनीं इंग्रजांशीं सलोख्यानें राहून त्यांना चांगली मदत केली व इंग्रजांशीं वितुष्ट येण्याची वेळ आली असतांही आपली राजनिष्ठा व इंग्रजांबद्दल वाटत असलेला विश्वास आपल्या वर्तनानें सिद्ध केला. इंग्रजांचा सूड घेण्याची बुद्धी त्यांना झाली नाहीं, त्यांची महत्वाकांक्षा या प्रसंगीं फुरफुरली नाहीं व स्वराज्याचा तर राहोच परंतु हिंदुधर्मरक्षणाचा घोषही त्यांनीं घतला नाहीं. उलट जे थोडेसे लोक बंडवाल्यांना सामील झाले होते, त्यांचा त्यांनीं आपल्या खास रक्षकाकरवीं खरपूस समाचार घेतला व इंग्रजांचें सर्व प्रकारें संरक्षण केलें. त्यांच्या फौजा व त्यांचा खजिना इंग्रजाच्या उपयोगीं

आणीबाणीच्या वेळीं पडला, आणि यांच्या उदाहरणानें देशांत उठलेल्या धर्मनाशाच्या अफवा खोट्या आहेत अशी सामान्य जनतेची खात्री झाली. इतक्याउपरही शिपायांना बंड करण्याची लहर आली, तरी प्राणदात्या व अन्नदात्या स्वधर्मी संस्थानिक स्वामीविरुद्ध हत्यार उचलण्याची कृतघ्नता हिंदी लोकांच्या अंगीं बाणलेली नाहीं. रजपूत राजांच्या या अपूर्व राजनिष्ठेमुळें राजपुताना जवळ जवळ शांत राहिला, आणि बंडवाल्यांची पश्चिम व दक्षिण मारली गेली.

आपण बरें व आपलें राज्य बरें अशी रजपुतांची वृत्ति होती. स्वधर्म व स्वराज्याच्या भावना त्यांच्या मनांत उसळत नव्हत्या व त्यांची वीरवृत्ति सर्वस्वी लोपली होती. राजपुतान्याचे मुख्य एजंट सर जॉर्ज लॉरेन्स यांनीं १९ जून १८५४ रोजीं अबूहून सर जॉन केला लिहिलेल्या पत्रांत स्वानुभवानें तावून सुलाखून खालील पुष्पांजलि रजपुतांना वाहिली आहे:–" You are right in thinking that the Rajputs are a dissatisfied opium-eating race. Tod's picture, howsoever it truely may have applied to the past, is a caricature on the present. There is little, if any, truth or honesty in them and not much more manliness. Every principality is more or less in trouble" रजपूत हे अतृप्त अफोमबाज आहेत हें तुमचें मत बरोबर आहे. जुन्या काळाला टॉडचें चित्र कितीही लागू पडत असलें, तरी सद्यस्थितीच्या दृष्टीनें तें हास्यास्पदच ठरेल. त्यांच्यांत सत्य किंवा प्रामाणिकपणा फारसा सांपडावयाचा नाहीं, आणि पौरुषदेखील अधिक आढळणार नाहीं. प्रत्येक संस्थानांत थोडीफार भानगड आहेच." रजपुतांबद्दल के व लॉरेन्स या दोघांचीं मतें जुळल्याचें वरील पत्रावरून दिसून येतें. परंतु रजपूत लोकांचे हे अवगुणच १८५७ सालीं इंग्रजांच्या कामीं पडले. कारण या भ्याड अफीमबाजांवर देशांतील खळबळीचा यत्किंचितही परिणाम झाला नाहीं, व त्यामुळें त्यांची राजनिष्ठा भंग पावली नाहीं. कोटा किंवा अजमीर येथील शिपायांनीं थोडीफार टुरटुर करून पाहिली, परंतु रजपूत राण्यांच्या सहानुभूतीनें व मदतीनें लॉरेन्सनें तो सर्व प्रांत शांत ठेवला, एवढेंच नव्हे, तर आपला सरासरी एक लाख चौरस मैलांचा टापू संभाळून प्रसंगविशेषीं मध्यहिंदुस्थान व संयुक्त प्रांतांतील इंग्रजी फौजेला कुमक पाठविली.

जीं संस्थानें ईस्ट इंडिया कंपनीच्या डोळयांत शल्यासारखीं खुपत होतीं व ज्यांना येनकेनप्रकारेण गट्ट करूं पहाण्याची संधी कंपनी पहात होती, त्यांच्यामुळेंच अखेर

इंग्रजी राज्याचें रक्षण झालें. कारण उत्तरेस नेपाळ-भूतान, पश्चिमेस राजपुताना व दक्षिणेस मध्य हिंदुस्थानांतील ग्वाल्हेर-इंदूर इत्यादि संस्थानें, यांचा बंडाच्या टापूभोंवतीं वेढा पडल्यामुळें बंडवाले आंतल्या आंत कोंडले गेले. या स्वाभाविक पडलेल्या वेढ्यामुळें बंडाची आग हिंदुस्थानभर भडकेना, व बंडवाल्यांना आपली कारवाई आकुंचित क्षेत्रांत करावी लागली. पूर्वेकडून बंगाली व मद्रासी फौज बंडवाल्यांवर चालून जात होती व वायव्येकडून पंजाबी शिपायांनीं त्यांना चेपलें. त्यामुळें बंडवाले कैचींत सांपडल्यासारखे झाले. कानपूर-लखनौ-झांशीचा टापू सोडून संस्थानी मुलखांत त्यांनीं पाय टाकला, तर त्यांचे पाय ताबडतोब मोडण्यांत येत असत. कंपनीच्या दृष्टीनें हिंदुस्थानच्या सुरळित राज्यकारभारांत व एकछत्री साम्राज्यांत अडगळ माजविणारीं ही संस्थानेंच १८५७ सालीं कंपनीला तारक झालीं. जर कंपनीच्या आसुरी लालसेप्रमाणें सर्व संस्थानें यापूर्वी नष्ट होऊन, एक-जात कंपनीचें राज्य हिंदुस्थानांत झालें असतें तर हें साल कंपनीला फार कठिण गेलें असतें. कारण तेथीलही फौज आपल्या भाईबंदांप्रमाणें बिथरून त्यांनीं इंग्रज अधिकाऱ्यांचा निकाल लावून त्यांचा खजिना लुटला असता, व ते इंग्रजांच्या शस्त्रास्त्रांनींच इंग्रजांशीं लढण्यास सज्ज झाले असते. परंतु इंग्रजांच्या सुदैवानें सर्व संस्थानें घशांत टाकण्याची कंपनीला संधी मिळाली नव्हती व लॉर्ड डल-हौसीच्या कारकीर्दीतूनही उत्तर हिंदुस्थानांतील बरींच संस्थानें जिवंत राहिलीं होतीं. त्यामुळें संस्थानांवर व संस्थानिकांवर सदोदित कुरघोडी करण्याकरितां तेथें ठेवलेली इंग्रजांच्या हातांतील तैनाती फौज फितुर झाली, तरी संस्थानांतील खासगी फौजा व संस्थानिकांचे खास शरीर-संरक्षक इंग्रजांच्या उपयोगीं पडले; संस्थानी खजिना बंडाचा मोड करण्याकरितां व शिपायांना बक्षिसें देण्याकरितां तात्पुरता वापरावयास मिळाला, आणि संस्थानिकांचीं दर्शनी मोहोरीं आपल्या बाजूनें पुढें करून सामान्य जनतेवर नैतिक दबाव टाकतां आला. हिंदी संस्थानांचें महत्व इंग्रजांना १८५७ सालीं पूर्णपणें कळून आलें यांत शंका नाहीं. कारण त्यांच्या अस्तित्वामुळेंच त्या वेळीं इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत टिकून राहिलें.

संस्थानांतील शांतता कायम राखल्याचें श्रेय राजपुताना येथील गव्हर्नर जनरलचे एजंट सरजॉर्ज लॉरेन्स व आग्रा येथील गव्हर्नर काल्विन यांनाच दिलें पाहिजे. डुरँड-सारखे तिरसिंगरावी तिस्मारखान त्या जागीं असते तर प्रसंग कठीण होता. बंडाची सुरवात झाली तेव्हां सर्व राजपुतान्यांत मिळून, जॉर्ज लॉरेन्सच्या दिम-तींत केवळ वीस गोरे होते. परंतु स्वतांची तडफ, दूरदर्शी धोरण व संस्थानिकांशीं

गोडीगुलाबीनें वागण्याची हातोटी, या गुणांनीं जॉर्ज लॉरेन्सनें तो प्रसंग यशस्वी रीतीनें निभावून नेला. काल्विन साहेबही शांत, धीमे व कर्तव्यदक्ष होते. त्यांची हिंमत अफाट होती. पश्चिमोत्तर प्रांताची जबाबदारी तर त्यांच्यावर होतीच, परंतु संस्थानी मुलखाचीं मुख्य सूत्रेंही त्यांच्याच तंत्रानें हालविलीं जात. आग्रा येथें त्यांची मुख्य कचेरी होती. भोंवतालीं बंडाचा अतोनात भडका उडाला असून देखील, त्यांनीं आग्र्यांतून इंग्रजांचें आसन ढळूं दिलें नाहीं. डुरँडच्या वृत्तीचे इंग्रज त्यांच्यावर दुबळेपणाचा व ढिलाईचा ठपका देतात. परंतु बंडाची ठिणगी पडतांच पळणारा डुरांड, व भोंवताली बंडाची प्रचंड आग भडकली असतां देखील आग्रा येथें इंग्रजी सत्ता कायम ठेवून, मधूनमधून दिल्लीकडे जाणायेणाऱ्या बंडवाल्यांच्या टोळयांवर एखाददुसरा हल्ला चढवून व बंडवाल्यांचा पराभव करून आणि इंग्रजी सत्तेच्या अस्तित्वाची जाणीव त्यांना करून देऊन, आपली फौज पुन्हा युक्तीनें आग्र्याच्या किल्ल्याच्या आश्रयास नेणारा काल्विन, यांची कोणीही तुलना करून पहावी. त्यांच्याइतका कामाचा व त्याबरोबरच चिंतेचा बोजा ५७ सालीं कोणावरच पडला नाहीं. कारण बंडाच्या केंद्रांत ते राहात होते. त्यांची प्रकृती दिवसेंदिवस खालावत चालली. एकतर त्यांची प्रकृति मूळची ठीक नव्हती, व चोहों बाजूची चिंताजनक बातमी ऐकून ते जास्तच अस्वस्थ होत. त्यांचे जातभाई त्यांना नालायक व भ्याड ठरविण्यासाठीं टपलेले होते, पण या सर्व अडचणींतून ते हिंमतीनें आपलें काम करीत होते.

जून महिन्याचे अखेरीस आग्रा शहरांत हूल उठली कीं, नीमच व नसीराबादचे बंडखोर शिपाई रस्त्यानें जाळपोळ व लुटालूट करीत, व लोकांना आपलेकडे वळवीत आग्र्यावर चाल करून येत आहेत. चौकशी अंतीं ही बातमी खरी पण ठरली. बंडखोर शिपाई २६०० असून त्यांचेजवळ १६ तोफा होत्या. हें कळतांच काल्विनसाहेबांनीं सर्व इंग्रजांना किल्ल्याचे आंत राहण्याचा हुकूम केला. २ जुलाई रोजीं बंडखोर आग्र्याहून २३ मैल दूर असलेल्या फत्तेपूर सिक्री मुक्कामीं येऊन पोंचले. त्यामुळें आग्र्याचें संरक्षण करण्याकरतां जादा बंदोबस्त करणें अत्यंत आवश्यक झालें.

या समयीं कोटा संस्थानचे शिपाई आग्र्याला येऊन पोंचले होते, व नबाब सैफुल्लाखां याचे ६०० शिपाई पण हजर होते. भरतपूरचे ३०० घोडेस्वार व २ तोफा पण इंग्रजांच्या मदतीकरतां आल्या होत्या. बंडखोर फत्तेपुरास पोंचल्याचें

कळतांच कालविननें कोट्याचे फौजेकडे छावणीच्या रक्षणाचा भार सोंपविला, व सैफुल्लाची फौज फत्तेपूरच्या रस्त्यावर ४ मैल दूर असलेल्या शहागंज गांवीं पाठविली.

३ जुलई रोजीं कालविनसाहेबांना अर्धांगवायू झाला, त्यामुळें ते असहाय्य झाले, व २४ घंट्यांसाठीं सर्व कारभार त्यांनीं एका कमेटीकडे सोंपविला. विचारान्तीं कमिटीनें खालील गोष्टी करण्याचा निश्चय केला.

(१) कैद्यांमध्यें जे धट्टेकट्टे लोक असतील त्यांना नदीच्या दुसरे तीरावर सोडून द्यावें.

(२) किल्ल्याजवळचा यमुनेचा पूल तोडून टाकावा.

(३) सर्व इंग्रजांना किल्ल्याचे आंत रहावयास बोलवावें.

(४) सैफुल्लाच्या दोन्ही तोफा किल्ल्यांत ठेवाव्या.

(५) कोट्याचे शिपायांना पुढें पाठवून त्यांच्याकरवीं बंडखोरांशीं सामना द्यावा.

यांतील पहिल्या तीन गोष्टी झटपट अमलांत आणल्या गेल्या, परंतु शेवटच्या दोन अमलांत आणण्यास बऱ्याच अडचणी आल्या. कोट्याचे शिपाई बंडखोरांना सामील असावें ते, असा संशय येत होता. म्हणून त्यांचीं हत्यारें काढून घ्यावीं अशी बऱ्याच जणांची इच्छा दिसली, परंतु ब्रिगेडियरच्या पसंतीस ही गोष्ट आली नाहीं. शेवटीं या संशयास्पद वर्तनाच्या लोकांना जवळ न ठेवतां, त्यांना फत्तेपूर सिक्रीच्या रस्त्यावरच ठेवण्याचें ठरलें. परंतु ते बंडखोरांशीं सामना द्यावयास जाण्याचे ऐवजीं इंग्रजांविरुद्ध उठले व त्यांनीं आपल्या अधिकाऱ्यांवर गोळीबार सुरू केला, आणि नंतर ते नीमचचे लोकांना जाऊन मिळण्याकरतां निघाले. हें पाहून एका अधिकाऱ्यानें गोऱ्या स्वयंसेवकांची पलटण घेऊन त्यांच्यावर हल्ला केला. बरेच बंडखोर शिपाई त्यामुळें कामास आले व युद्धोपयोगीं सामान लादलेले कांहीं उट इंग्रजांचे हातीं लागले.

इकडे सैफुल्लानेंही सूचना दिली कीं, आमच्या शिपायांचा नूर वेगळाच दिसतो; करितां त्यांचेवर भरंवसा टाकणें ठीक नाहीं. भरतपूरच्या घोडेस्वारांनींही आपल्या दोन तोफा घेऊन स्वतंत्र रस्ता धरला. त्यामुळें करौलीच्या शिपायांची उमेद मावळली, व ते डळमळूं लागले. तेव्हां नाइलाजानें सैफुल्लाला शहागंजाहून करौलीला परत जाण्याचा हुकूम देण्यांत आला.

इकडे काल्विन साहेबांची प्रकृति फार बिघडली म्हणून त्यांनाही किल्ल्यांत नेण्यांत आलें. ते पहिल्यानें आंत जाण्यास कबूल नव्हते, परंतु डॉक्टरांचे म्हणण्याप्रमाणें औषधोपचाराकरितां त्यांना अखेर आंत जावें लागलें.

या वेळीं कोव्याचे शिपाई चारी बाजूंना लुटालूट व अतिशय धामधूम करीत होते; हें ऐकून काल्विनसाहेब फार चिन्तेंत पडले. आजारी असतांना सुद्धां त्यांना कर्तव्याचा विसर पडला नाहीं. ब्रिगेडियरचे घरीं जाऊन राहण्याचें त्यांचे मनांत होतें. अशासाठीं कीं आपल्याला वेळच्या वेळीं त्यांना सल्लामसलत देतां यावी. परंतु डॉक्टरांनीं त्यांना स्थलांतराची मनाई केली.

आग्र्यावर बंडखोर जोरानें चाल करून येत आहेत अशी ५ तारखेला बातमी आली. त्या दिवशीं १ वाजतां म्हातारे ब्रिगेडियर पाळहावेल ८०० सैनिकांसह बंडखोरांशीं सामना करण्यास निघाले. शहागंजाला पोंचतांच तेथेंच मुक्काम ठोकून बंडखोरांची हालचाल पाहत राहण्याचा त्यांनीं निश्चय केला. तेथून सुमारें १ मैल दूर शानिया गांवाजवळ बंडखोरांची छावणी पडली होती. बंडखोरांच्या छावणीरामोर लहान लहान टेकड्या व वृक्षांची दाट झाडी होती. त्यामुळें इंग्रजी फौजेनें गोळीबार सुरू केला तरी त्यांची विशेष हानी झाली नाहीं. इंग्रजांवर मात्र गोळयांचा भयंकर वर्षाव सुरू झाला. त्यांचें फार नुकसान झालें. तोफांच्या दोन गाड्या जळल्या व एक तोफ बेकाम झाली. तेव्हां या लोकांनीं शत्रूवर एकदम तुटून पडण्याचा निश्चय केला. त्यांचेजवळची युद्धसामुग्री कमी झाली होती, पण केवळ आपल्या हिंमतीच्या जोरावर ते पुढें सरसावले. परंतु थोड्याच वेळांत कप्तानाला गोळी लागून जखम झाली व त्याला तोफेच्या गाडीवर निजविलें. इतक्याउपरही त्या वीरपुरुषानें आपला धीर सोडला नाहीं व तो आपलें कर्तव्य करीत राहिला. त्याच दिवशीं त्याला किल्ल्यावर पोंचविण्यांत आलें व दुसरे दिवशीं त्याचा अंत झाला. इंग्रजांचे बरेच शूर वीर या लढाईंत मारले गेले. थोडा वेळ लढाईला तोंड देऊन पालहावेल साहेबांनीं उरलेल्या लोकांना मागें हटण्याचा हुकूम दिला. हे लोक परत आलेले पाहून किल्ल्यांतील सर्व लोक निराशेच्या सागरांत बुडून गेले. दोन हत्ती पाठवून जखमी झालेल्या लोकांस लढाईच्या क्षेत्रांतून किल्ल्यांत आणविलें.

इंग्रजांच्या पराभवामुळें इकडे गांवांतील बदमाषांना जोर चढला. ही संधि पाहून त्यांनीं चोहोंबाजूनें दंगा करण्यास सुरवात केली. त्यांनीं इंग्रजांचे बंगले

जाळून टाकले, व ज्या पोर्तुगीज व ख्रिस्ती लोकांनीं किल्ल्यांत प्रवेश केला नव्हता त्यांना ठार मारलें.

त्या लढाईत बंडखोर सामान्यतः विजयी झाले असतांही त्यांनीं आग्र्याचे किल्ल्यावर चाल केली नाहीं, त्यामुळें विजयाचा फायदा त्यांच्या पदरांत पडला नाहीं. वेड्यासारखे ते थेट दिल्लीकडे गेले. दिल्लीवाल्यांनींही तोफा सोडून त्यांचें थाटानें स्वागत केलें.

या युद्धाचे दुसरे दिवशीं आग्र्याचा कोतवाल मुरादअल्ली यानें शहरभर दौंडी पिटविली व दिल्लीच्या बादशहाला जे आपला बादशहा मानत असतील त्यांनीं त्याला गव्हर्नर मानावें असा हुकूम सोडला. या नव्या सुभेदाराचे हत्यारबंद शिपाई शहरांत वावरूं लागले. त्यांतील बहुतेक मुसलमान होते.

नव्या नबाबाची ही दौंडी ऐकतांच गांवगुंडांनीं आणखी मारपीट, लुटालूट व जाळपोळ आरंभली. दोन दिवस त्यांचें हें घोर व अमानुष सत्र चालू होतें. यावेळीं राजाराम नांवाचा एक मनुष्य मोठ्या चतुराईनें बंडवाल्यांची नजर चुकवून किल्ल्यांत घुसला, व तेथें छपून राहिलेल्या मॅजिस्ट्रेट साहेबाला म्हणाला कीं, शहरांत बंडखोर शिपाई एकदेखील नाहीं. इकडचे तिकडचे गुंड-बदमाश मात्र लूटमार करीत आहेत, तरी तुम्ही किल्याच्या बाहेर पडून आपली जरब लोकांवर पुन्हां बसवावी. हें ऐकून ते कांहीं गोरे शिपाई व तोफा घेऊन बाहेर पडले, व शहरभर फिरून इंग्रजांचें राज्य कायम आहे म्हणून लोकांस सूचना देऊं लागले. त्या वेळीं मुलकी, फौजी व व्यापारी मिळून ३००० गोरे, १५०० हिंदु, ५००-६०० बायका, व ३००।४०० मुलें किल्ल्यांत होतीं. सर्वांचा राहण्याचा व खाण्यापिण्याचा बंदोबस्त कसा तरी केला गेला होता. किल्ल्याच्या भिंतीवर तोफा चढवल्या व नव्या माणसांची गोलंदाजांमध्यें भरती करून त्यांची संख्या वाढविण्यांत आली. दारुगोळा तयार करण्यांत आला, व दारूचें कोठार आणि शस्त्रागार यांच्यावर कडक पाहारा ठेवला गेला. काल्विन साहेबानें याप्रमाणें आग्र्याचा बंदोबस्त केला व किल्ला लढाईसाठीं सज्ज केला; गोरे व काळे शिपाई किल्ल्यांत राहून सर्व प्रकारच्या गैरसोयी सोसून दिवस काढीत होते. सर्व जुलाई महिना गेला व आगष्ट पण अशा प्रकारें चालू झाला. आजारी असलेल्या काल्विनसाहेबांना कुठूनच आशाजनक बातमी मिळेना. चोहोंबाजूंनीं अस्वस्थतेच्याच बातम्या येत होत्या. अखेर काल्विन साहेबांना हवी होती ती संधी सांपडली. अलीगडच्या बंडाची हकीगत त्यांना कळली व तेथील बंदोबस्त बेताचा आहे असें कळल्यामुळें,

आग्र्याच्या संरक्षणापुरती फौज जवळ ठेवून, शिलकी फौज बाहेर पाठविण्याचें त्यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें गौसरंवाचे विरुद्ध किल्ल्यांतून एक पलटण निघून अलिगडकडे रवाना झाली. २४ आगष्टला हे लोक अलीगडला पोंचले. गौसरंवाच्या फौजेनें मोठ्या शौर्यानें या फौजेशीं सामना घेतला, परंतु शेवटीं इंग्रजांचे फौजेनें लढाई जिंकली.

ही बातमी ऐकून आजारी काल्विन साहेबांचे चित्ताला तात्पुरती शांतता वाटली. परंतु एवढ्यानें त्यांची चिंता समूळ नष्ट थोडीच झाली! कारण दिल्ली अजून बंडखोरांचेच ताब्यांत होती, व जवळच्या प्रान्तांतील दुसरें मुख्य ठिकाण जें लखनौ तेथें बंडखोरांचा अतोनात जोर होता, आणि त्यांच्या प्रांतभर सर्व ठिकाणीं अस्वस्थतेचें साम्राज्य माजलें होतें. परंतु आजारांतही एक दिवस ते आपलें कर्तव्य करण्यास चुकले नाहींत. डॉक्टरांची काम करण्याची मनाई किंवा मित्रांचा विश्रांती घेण्याचा उपदेश, यामुळें मोहवश होऊन त्यांना कर्तव्याचा विसर क्षणभरदेखील पडला नाहीं. अतिश्रम, शारीरिक अस्वास्थ्य व मानसिक चिन्ता, यामुळें मृत्यूनें त्यांना आपल्याकडे ओढलें, व ता. ९ सप्टेंबरला संसारांतील सर्व चिन्तांतून त्यांचा शेवट झाला. ७ सप्टेंबरपर्यंत ते आपलें काम नियमानें करीत होते. १० सप्टेंबरला त्यांचें प्रेत किल्ल्यांत दफन केलें गेलें.

बंडाच्या बिकट प्रसंगीं अशा रीतीनें एका उच्च दर्जाच्या कर्तव्यनिष्ठ व राजकारणी पुरुषाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून कॅनिंग साहेबांना फार दुःख झालें. त्यांच्यावर ढिलाई व दुबळेपणाचा आरोप करणाऱ्यांना चोख उत्तर देण्यास ते पुढें जिवंत राहिले नाहींत एवढेंच. परंतु संस्थानी प्रदेशास बंडाच्या आगीची झळ त्यांनीं लागूं दिली नाहीं, व भोंवतालीं बंडाची आग पेटली असतां, आणि इकडे दिल्ली व तिकडे लखनौ अशीं राज्यक्रांतीचीं प्रमुख केंद्रें दोन बाजूंस असतांना देखील, मधले आग्रा शहर अवलपासून अखेरपर्यंत इंग्रजांच्या हातीं राहिलें, यांतच त्यांचें तोंडानें न दिलेलें चोख उत्तर भरलें आहे. डुरँड—के—प्रभृति अधिकाऱ्यांना त्यांची योग्यता पटली नसली, व स्वतांच्या कर्तबगारीचा डंका त्यांनीं स्वतां वाजविला नसला, तरी लॉर्ड क्यानिंगनें मुक्तकंठानें त्यांच्या थोरवीची प्रशंसा केली आहे. मोक्याावरील आग्रा शहर अखेरपर्यंत इंग्रजी सत्तेखालीं ठेवणें व विस्तीर्ण संस्थानी प्रदेशाला शांत राखणें, या दोन्ही गोष्टी बंडाच्या इतिहासांत विजयाच्या दृष्टीनें तरी सामान्य कर्तबगारीच्या खास नाहींत!

---

## प्रकरण २१

# कानपूरची कत्तल !



कानपूर गंगेच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलें आहे. हें शहर बनारस किंवा अलाहाबादप्रमाणें अति प्राचीन नाहीं, व येथें कोणतीं ऐतिहासिक ठिकाणेंही पण नाहींत. हें जुनें शहर नसल्यामुळें आर्य लोकांच्या इतिहासांत याचा कोठें उल्लेख केलेला दिसत नाहीं. बाबरच्या इतिहासांत किंवा अकबराच्या कारकीर्दींत हें शहर मुळींच अस्तित्वांत नव्हतें. जेव्हां कंपनीचें राज्य झालें तेव्हां या शहराचें नांव प्रथम इतिहासांत झळकलें. या ठिकाणीं १७७५ सालीं अयोध्येच्या नबाबा-करितां इंग्रजी फौज ठेवण्यांत आली होती. १८०१ सालच्या तहाप्रमाणें हें शहर कंपनीच्या ताब्यांत गेलें. पूर्वीं या ठिकाणीं चोर, डाकू आणि ठग यांची वस्ती होती. येथें फौजेची छावणी झाल्यानंतर व्यापार वाढला, आणि इंग्रजी राज्याच्या उन्नतीबरोबर या शहराला ऊर्जितावस्था प्राप्त झाली.

प्राचीन इतिहासांत या शहराचें नांव नसतांना देखील आज कानपूरला फारच महत्व आलें आहे. हें शहर वायव्य प्रान्ताच्या मध्यभागीं असून याच्या उत्तरेस अयोध्या आणि आग्नेयेस अलाहाबाद हीं प्रमुख शहरें आहेत. येथें कलकत्त्यावरून फौजफांटा येण्यास एक सरळ मार्ग होता. आग्रा व दिल्ली, आणि पंजाबकडून येणारे रस्तेही या शहरावरून गेले आहेत. दक्षिणेकडून मद्रास आणि मुंबई येथील फौजाही येथें सुलभतेनें येऊं शकतात. वाहतुकीच्या उत्तम सोयीमुळें बहुतेक कंपनीच्या कारकीर्दींत कानपूर हें छावणीचें ठिकाण झालें असावें.

वायव्य प्रान्तांत कानपूर चामड्याच्या कामाकरितां फार प्रसिद्ध आहे. येथें जोडे व घोड्यावरील कातड्याचें खोगीर वगैरे सामान तयार होतें. बंडानंतर येथें सुती व लोंकरी कापडांचे कारखाने उघडण्यांत आले आणि त्यांना लवकरच ऊर्जितावस्था प्राप्त झाली. गंगेच्या सान्निध्यामुळें नावांच्याद्वारें मालाची नेआण होऊं लागली; त्यामुळेंही व्यापार वाढण्यास बरीच मदत झाली. ५७ सालच्या सुमारास येथें नं. ५४ व नं. ५६ चें पायदळ आणि घोडदळ होतें. सर्व मिळून तीन हजार हिंदुस्थानी शिपाई, साठ गोरे गोलंदाज आणि कांहीं बनारसचे गोरे शिपाई होते. या व्यति-रिक्त पायदळ आणि घोडदळांतील गोऱ्या अधिकाऱ्यांची संख्या ६७ होती. एकंदर गोरे लोकांची वस्ती त्या वेळीं येथें सरासरी ३०० होती.

सर ह्यू व्हीलर हे सर्व सेनेचे सेनापति होते. चौपन वर्षें शिपायाचें काम करून यांनीं हिंदुस्थानी शिपायांच्या चालीरीति व त्यांच्या चरित्राचें संपूर्ण ज्ञान संपादन करून घेतलें होते. सेनापति लॉर्ड लेकच्या हाताखालीं यांनी फ्रेंच लोकांशीं सामना केला; अफगाणिस्थानच्या पहाडी मुलखांत जाऊन अफगाण लोकांस वेढा दिला व पंजाबच्या रणभूमीवर शीखलोकांचे विरुद्ध आपलें सैन्य नेलें होतें. अशा रीतीनें यांनी ५० वर्षें निरनिराळ्या रणभूमींवर आपला पराक्रम दाखविला. शिपायांचें यांच्यावर पूर्ण प्रेम असून सर्व त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागत. याच देशांतील एका युरेशियन स्त्रीशीं त्यांचा विवाह झाला होता. श्याहत्तर वर्षांचें वय असून देखील त्यांचे शरीर काटक व मजबूत होतें. मीरत आणि दिल्ली येथील बंडाच्या हकीकतीवरून कानपुरास बंड होणें असंभवनीय नव्हतें. कानपुरास त्या सुमारास म्हणण्यासारखें गोरें सैन्य मुळींच नव्हतें. पूर्वी कानपुरास जें गोरें सैन्य होतें, तें सर्व नवीन जिंकलेल्या अयोध्या प्रांतांत बंदोबस्ताकरितां पसरण्यांत आले होतें. मे महिन्यांत जेव्हां ठिकठिकाणच्या शिपायांना बंड करण्यास उत्तेजन मिळूं लागलें, प्रत्येक शहरांतील यूरोपियन लोक प्राणांच्या भीतीनें जीव घेऊन पळूं लागले, व ठिकठिकाणाहून बंडाच्या भिन्नभिन्न व भयंकर बातम्या येऊं लागल्या, तेव्हां पुरेशा गोऱ्या सैन्याच्या अभावीं सेनापति व्हीलर चिंतातुर झाले. कानपुरांत युरोपियन लोक आपल्या स्त्रीपुत्रांसह राहात होते. इंग्रजांचा परिवार नगरांतील प्रत्येक भागांत वाटला गेला होता. दवाखान्यांत सैन्यांतील ३२ गोरे गर्मीमुळें आजारी होऊन पडले होते. या सर्व असहाय्य लोकांच्या रक्षणाचा भार सेनापति व्हीलर यांचेवर येऊन पडला. म्हातारपणीं असला कठीण प्रसंग त्यांचे डोक्यावर येऊन पडला, कीं जो त्यांच्या ५४ वर्षांच्या नोकरींत कधींच पूर्वी आला नव्हता.

शिपायांच्या मनांत इंग्रजाकरवीं होऊं घातलेला जातिनाश आणि धर्मनाश यांच्या अनेक प्रकारच्या शंकाकुशंका येतच होत्या. मेच्या दुसऱ्या आठवड्यांत कणकीचीं पोतीं भरलेल्या कित्येक नावा कानपुरास आल्या. बाजारांत ही कणीक फारच स्वस्त भावानें विकली गेली. कणीक जुन्या व खराब झालेल्या गव्हांची असल्यामुळें पोळ्यांना एक प्रकारची घाण मारत असे. धर्माचा नाश करण्याकरितां कणकींत गाय आणि डुक्कर यांचीं हाडें मिसळलीं आहेत अशी गप्प उठविण्यांत आली. विजेप्रमाणें ही गप्प सर्व सैन्यांत जाऊन पोहोंचली; तेव्हां शिपायांचे मनांत जाति आणि धर्मरक्षणा बद्दल मोठी चिंता उत्पन्न झाली. यानंतर चर्बी मिसळलेल्या

काडतुसांची शंका काढण्यांत आली. कांहीं शिपाई नवीन काडतुसें वापरण्याच्या प्रयोगाचा अभ्यास करण्याकरिता अंबाला येथील सैनिक-विद्यालयांत गेले होते. अभ्यास करून परत आल्यानंतर त्यांना जातिबहिष्कृत करण्यांत आलें नाहीं. ५३ नं. च्या पलटणींतील एक शिपाई मानखां हा आपले बरोबर नमून्याकरितां म्हणून कांहीं काडतुसें घेऊन आला होता. त्यांत कोणत्याही प्रकारची चर्बी मिसळलेली नाहीं अशी तो शिपायांची खात्री पटवूं लागला, पण त्याच्यावर कोणीही विश्वास ठेवला नाहीं. नवीन काडतुसांना वाईट घाण येत असल्यामुळें व त्यांना सहज कोणालाही दिसेल अशी वरूनच चर्बी चोपडली असल्यामुळें शिपाई घोटाळ्यांत पडले होते. शिपायांच्या असल्या शंकेखोर मनस्थितीचें पर्यवसान क्रोधांत झालें, आणि इंग्रजांना सर्वजण विश्वासघातकी व धर्माचा नाश करणारे म्हणूं लागले. मनाची अस्थिरता अनेक प्रकारच्या कल्पनांना जन्म देते. यावेळीं देखील लोकांच्या डोक्यांतून अनेक नवीन नवीन कल्पना निघूं लागल्या. शिपायांच्या चिंतितावस्थेंतच अशी एक गप्प उठविण्यांत आली कीं, परेड ग्राऊंड खालीं भुयार खणून आंत बारूद पसरण्यांत आली आहे, आणि सर्व सैनिकांना मैदानावर एकत्रित करून ती गुपचुप उडवून देण्यांत येईल. अशा प्रकारच्या भयानक वार्ता पसरल्यामुळें शिपायांचीं मनें फारच भयभीत झालीं. आतांपर्यंत हे सर्व कंपनी सरकारवर पूर्ण विश्वास ठेवून त्यांचे बाजूनें लढत व मरत असत, व सेनापतीच्या आज्ञेंत राहात. पण या नवीनच उपस्थित झालेल्या प्रकारामुळें शिपायांचा, सेनापतीच केवळ नव्हे, तर सर्व इंग्रज जातीवरचा विश्वास अजीबात उडाला.

सेनापति व्हीलर यास ऑफिसरांच्या तोंडून शिपायांच्या चंचल मनाची खबर समजली होती, त्यामुळें त्यांचे मन अस्वस्थ झाले होतें. त्यांचा समज असा होता कीं थोड्या दिवसानंतर ही स्थिति आपोआप दूर होईल; परंतु मीरत आणि दिल्ली येथील समाचारानें शिपायांना अधिकच जोर आला. कानपूर येथील गोरे भयभीत झाले. दिल्लीचा तुरुंग तोडून कैदी फरारी झाले आणि आसपासच्या गांवांत लूटमार करूं लागले. कानपुराहून दिल्लीस जाण्यास जो सरळ मार्ग आहे, त्याच्या दोनही बाजूंच्या गांवांत गूजर जातिचे लोक राहात असत. त्याकाळीं हे लोक प्रसिद्ध चोर व डाकू समजले जात. त्यांनीं चौफेर दंगल माजविली व देशांतील अस्वस्थतेचा फायदा घेतला. इकडे कानपूरच्या शिपायांची मुजोरी वाढत चालली; त्यामुळें संकट केव्हां व कशा स्वरूपांत पुढें येईल, या शंकेनें इंग्रज बावरले. एक दिवस त्यांना बातमी लागली कीं, गूजर लोक त्यांचेबर

चालून येत आहेत; एके दिवशीं रात्रीं इंग्रजांचेच कांहीं गोलंदाज तोफा घेऊन कानपुरास येत होते. घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकून सर्व युरोपियन आपापल्या आंथरूणावरून उठून आत्मरक्षण करण्याकरितां तयार झाले. खरी गोष्ट समजल्यानंतर ईश्वराचे आभार मानून ते स्वस्थचित्त झाले. परंतु एक क्षण देखील त्यांच्या मनांतील भीति दूर झाली नाहीं. रात्रंदिवस बंडाचें भयंकर दृश्य त्यांच्या डोळ्यांसमोर दिसत होतें. अद्यापपर्यंत शिपायांनीं बंड पुकारलें नव्हतें, तरी इंग्रज आपणाला संकटग्रस्त समजत होते. त्यांनीं हिंदुस्थानी नोकरांच्या मदतीनें हिंदुस्थानी पोषाख तयार केले, आणि बायकामुलांस तो घालून त्यांना सुस्थळीं पोहोंचविण्याचा विचार केला. इंग्रज इतके घाबरून गेले होते कीं त्यांचे हातीं बरोबर नेण्यासारखी जी जी वस्तू लागे, ती घेऊन ते आश्रयाला छावणींत जाऊन राहात असत.

वृद्ध सेनापति इंग्रजांची अशी स्थिति पाहून त्यांच्या बचावाचा उपाय शोधूं लागले. जोंपर्यंत बाहेरून मदत मिळणें शक्य नाहीं तोंपर्यंत बायकामुलांस कोठें तरी सुरक्षित ठेवण्याचा त्यांनीं विचार केला. पण हें काम कांहीं सोपें नव्हतें. तरी त्यांनीं फारसा वेळ न लावतां छावणीजवळ असलेल्या दोनही इस्पितळाभोंवतीं चार फूट उंचीचा एक तट बांधविला व तेथें २५ दिवस पुरेल इतकी अन्नसामग्री नेऊन ठेवली. ही व्यवस्था कित्येक लोकांना पसंत पडली नाहीं. उभारलेला तट अगदींच कुचकामाचा होता. गंगेच्या कांठीं छावणीपासून सहा मैलांवर एक तोफखाना होता. त्याचे जवळच खजीना आणि कैदखाना होता. त्या मजबूत इमारतींत जर बायकामुलांस नेऊन ठेवलें असतें तर कदाचित् पुढें त्यांचें रक्षण झालें असतें, व भावी आपत्ती टळली असती. परंतु त्यांनीं तसें न करतां छावणीची जागाच पसंत केली. याच कारणामुळें इतिहासकारांनीं वृद्ध सेनापतीवर अदूरदर्शित्वाचा आरोप ठेवला आहे. वरील गोष्ट सेनापतीचे लक्षांत आली नसावी असें म्हणतां येत नाहीं. छावणीजवळ राहण्यांत त्यांचा निराळाच उद्देश होता. कारण शिपायांपासून दूर राहण्याचा विचार ठरविणें धोक्याचें झालें असतें. तोफखान्यांत जाऊन राहिल्यास, तेथें बायकामुलांचें रक्षण करण्याकरितां कांहीं शिपाई ठेवावे लागले असते. परंतु त्यांचेवर त्या परिस्थितींत कितपत विश्वास ठेवावा हा एक प्रश्नच होता. अशा करण्यानें आयताच तोफखाना आणि शस्त्रास्त्रें त्यांचे हातीं देण्यासारखें झालें असतें. अगोदरच शिपायांचीं मनें विचलित झालेलीं, तशांत शस्त्रास्त्रें हातीं लागतीं तर कोणत्या वेळीं काय प्रसंग येता हें सांगतां येणें कठीण होतें. या सर्व

कारणांमुळें त्यांनीं छावणीजवळच छातीठोकपणें राहण्याचा विचार केला. कारण शिपायांनीं अजून उघड बंड पुकारलें नव्हतें, त्यामुळें त्यांच्याजवळ राहिल्यानें त्यांना वचक वाटेल असा सेनापतीचा अंदाज होता. शिवाय सेनापतीकडे निरनिराळ्या ठिकाणांहून ज्या बातम्या येत, त्यांवरून त्यांनीं असें अनुमान काढलें होतें कीं, शिपायांनीं सरकारचे विरुद्ध बंड केल्यास ते तडक दिल्लीस जातील. शिवाय यावेळीं कलकत्त्याहून त्यांच्या साहाय्यार्थ सेना येण्याचा बराच संभव होता. आतां ही गोष्ट खरी कीं, त्यांचे अनुमानाप्रमाणें सर्वच गोष्टी घडून आल्या नाहींत; म्हणून त्यांचें अनुमान चुकीचें होतें असें मात्र म्हणतां येणार नाहीं. त्यांनीं जाणूनबुजून बायकामुलांचे जीव धोक्यांत घातले नव्हते. परंतु एकंदरींत परिणामाच्या दृष्टीनें त्यांची निवड व धोरण चुकलें यांत शंका नाहीं. शिपायांच्या राजनिष्ठेची त्यांना काडीमात्र खात्री नव्हती. त्यामुळें त्यांना छावणींतच ठेवून, आपण बायकामुलांसह गंगेच्या कांठीं तोपखान्याच्या व शस्त्रागाराच्या आश्रयार्थ जाणें योग्य झालें असतें. आलेल्या बातम्यांवरून आठचार दिवसांत शिपाई बंड करणार हें त्यांनीं ओळखावयास हवें होतें, व त्या धोरणानें बंदोबस्त करणें जरूर होतें. हा शहाणपणा त्यांनीं दाखविला नाहीं हें म्हणणें भाग आहे.

स्वतःचें बल वाढविण्याकरितां त्यांनीं लखनौस सर हेनरी लॉरेन्सला सैन्य पाठविण्यास लिहिलें होतें. या वेळीं अयोध्या प्रांतांत प्रत्येक ठिकाणीं बंडाला उकळी फुटत होती. त्या प्रांताचें रक्षण करण्याकरितां जवळ पुरेसें सैन्य नसून देखील, सर हेनरी लॉरेन्सनें सेनापतीचे मदतीकरतां ३२ नं. च्या गोऱ्या पलटणींतील ८४ शिपाई घोड्यांच्या गाडींतून ताबडतोब कानपुरास रवाना केले. याशिवाय गोलंदाजांसह दोन तोफा पाठविल्या, व कानपूर येथील परिस्थिति समजून घेण्यासाठीं सर लॉरेन्सनें खुद्द आपल्या सेक्रेटरीस तेथें पाठविलें.

महाराष्ट्राचा शेवटचा पेशवा दुसरा बाजीराव जेव्हां पुण्याच्या गादीवरून पदच्युत केला गेला, तेव्हां तो कानपुराजवळ बिठूर (ब्रम्हावर्त) येथें येऊन राहिला. येथेंच बाजीरावानें नानासाहेबांस दत्तक घेतलें. बाजीरावानंतर हा त्याच्या संपत्तीचा अधिकारी झाला. वडिलांचें जप्त झालेलें पेन्शन पुन्हा मिळण्यासाठीं एक मुसलमान वकील यानें विलायतेंत खुद्द डायरेक्टरांकडे खटपट करण्याकरितां पाठविला, पण त्याला पेन्शन मिळाली नाहीं. हा सर्व इतिहास पूर्वप्रकरणांत आलाच आहे. अशी स्थिति असून देखील त्यानें इंग्रजांशीं पूर्वीप्रमाणेंच व्यवहार व सख्य कायम ठेवलें. इंग्रज त्याच्या आदरसत्कारानें संतुष्ट होत व त्याचे गुणानुवाद गात. अशा करण्यानें

नानासाहेबास वाटे कीं, हे लोक आपल्या देशांत जाऊन माझ्यातर्फे शिष्टाई करून मला परत पेन्शन मिळवून देतील. परंतु स्वतांच्या पदरास दमडीचा खार न लागूं देतां, मेजवान्या झोडण्यास सवकलेल्या कंपनीच्या इंग्रज अधिकाऱ्यांची नानासाहेबांस मुळींच परीक्षा झाली नाहीं असें म्हटलें पाहिजे. या सर्व गोष्टी कशाही असल्या तरी, पेशव्यांचा राजमहाल नेहमीं इंग्रज पाहुण्यांच्या येण्याजाण्यानें भरलेला असे. पाहुण्यांचें नोंदणीबुक उघडून पाहिल्यास शेंकडों इंग्रजांचीं नांवें त्यांत दृष्टीस पडत. कित्येक लोक नानासाहेबांच्या घरीं सदासर्वदा पाहुणचार घेत पडलेले असत. एके दिवशीं एक इंग्रज त्यांचे बरोबर गाडींत बसून बिठूर येथें गेला असतां, त्यानें नानासाहेबांच्या गाडीची फारच प्रशंसा केली. ती ऐकून नानासाहेबानें म्हटलें कीं माझेजवळ याहीपेक्षां एक उत्तम गाडीघोडा होता; परंतु मी ती गाडी जाळून घोड्यास मारून टाकलें. कारण कानपूरचा एक साहेब व मेम आपल्या आजारी मुलास या गाडींत बसवून, बिठूर येथें हवापालट करण्यास येत असतां वाटेंतच तो मुलगा मरण पावला. तेव्हांपासून मी ती गाडी उपयोगांत न आणतां तिची वरीलप्रमाणें व्यवस्था लावली. साहेबानें विचारलें कीं ती गाडी तुम्हीं एखाद्या पाद्री किंवा मुसलमान मित्रास कां देऊन टाकली नाहीं? नानासाहेबानें उत्तर दिलें कीं, तसें केलें असतें तर त्यामुळें त्या साहेबास फार दुःख झालें असतें.

या वेळीं नानासाहेबांचें वय ३६ वर्षाचें होतें. तारुण्यांतील तडफ व उद्योगप्रियता त्यांचे आंगीं पूर्णपणें वास करीत होती. नानासाहेब अनुभवी आणि दूरदर्शी होते. परंतु दुसऱ्यावर वाटेल तसा विश्वास टाकीत असत. अजीमुल्लाखां नांवाचा एक मुसलमान यांचा मंत्री होता. कोणतेंही काम करावयाचें झाल्यास नानासाहेबांस याची मदत आणि सल्ला घ्यावा लागे. अजीमुल्लाखांचा इतिहास फार मनोरंजक आहे. सुरवातीला हा इंग्रजांचा खानसामा होता. पुढें शाळेंत शिकून यानें एका विद्यालयांत शिक्षकाचें काम केलें. नंतर इंग्रजांचा मुन्शी झाला आणि शेवटीं नानासाहेबांचा विश्वासू सेवक व दोस्त बनला. यास इंग्रजी उत्तम बोलतां येत होतें; शिवाय जर्मन व फ्रेंच याही भाषा अवगत होत्या; परंतु अंगीं योग्यता मात्र नव्हती. नानासाहेबानें याला आपल्या तर्फे लंडन येथें पेन्शनीची वकिली करण्याकरितां पाठविलें; परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं. याचें शरीरसौंदर्य अतिशय उत्तम असल्यामुळें तेथें तो विलासांत दंग झाला. याची मोठमोठ्या इंग्रज

घराण्यांत ओळख झाली, व इंग्रज बायका या तरुणावर भाळल्या. इंग्लंडहून हा तुर्क राजधानींत गेला. या सुमारास क्रिमियाच्या लढाईमुळें सबंध युरोपांत खळबळ उडाली होती. युद्ध पाहाण्याच्या इच्छेनें हा देखील रणभूमीवर गेला. रूसच्या तोफांच्या माऱ्यापुढें इंग्रजांचें कांहीं चालेना व त्यांच्या शिपायांचे हाल होऊं लागले. रसद व औषधोपचार यांचा तुटवडा पडला व त्यामुळें इंग्लंडांत एकच हलकल्लोळ उडाला. इंग्रजांची अशी दुःस्थिति पाहून साहजिकच याला फार आनंद झाला, व आपल्या देशांत परत गेल्यावर आपणास या संधीचा फायदा घेऊन इंग्रजांची सत्ता नामशेष करतां येईल अशी याची खात्री झाली. इंग्रजांची अडचण तोच आपणांस फायदेशीर मुहूर्त असें त्याचें मत होतें. परत आल्यावर अजीमुल्लानें आपला सर्व अनुभव नानासाहेबास सांगितला. पेन्शन बंद झाल्याची हकीकत ऐकून नानासाहेबांस फार वाईट वाटलें व इंग्रजांचा मनांतून फार राग आला होता. लॉर्ड डलहौसीनें व तत्पूर्वी इंग्रज कंपनीनें केलेल्या कर्मांचीं कटु फळें आतां दृष्टीस पडूं लागलीं. अजीमुल्लानें त्यांच्याजवळ युरोपांतील युद्धांत इंग्रजांची कशी गाळण उडाली आहे, याचें रसभरीत भडकदार वर्णन केलें, व आपली बंडाची योजना त्यांच्यापुढें मांडली. युरोपांत इंग्रजांचा धुव्वा उडाला असल्यामुळें आपण या वेळीं उठावणी केली तर खात्रीनें यश मिळेल असें त्यानें सांगितलें. नानासाहेबांच्या राजप्रासादांत त्यांचे सर्व भाऊबंद आणि बालपणचे मित्र राहात होते. अजीमुल्लाप्रमाणेंच तात्या टोपी हाही नानासाहेबांचा सल्लागार होता. कानपूरचे बंडांत हेच दोघे त्यांचे प्रमुख मंत्री होते.

कानपूरचे इंग्रज बंडाच्या बातम्यामुळें जेव्हां भयभीत होऊन बायकामुलांच्या रक्षणाचा उपाय योजूं लागले, त्याच वेळीं खजिन्याच्या रक्षणाचीही त्यांना काळजी वाटूं लागली. या वेळीं खजिन्यांत बारा लक्ष रुपये होते. येथील मॅजिस्ट्रेट आणि कलेक्टर हिलर्सडन यानें नानासाहेबांच्या मदतीनें खजिन्याच्या रक्षणाचा विचार केला. कलेक्टराची यांचेवर फारच मर्जी होती. हिलर्सडनच्या बायकोनें घरीं आपल्या नातलगांना त्या वेळीं खालीलप्रमाणें एक पत्र लिहिलें होतें:—" येथें बंड होण्याचा बराच संभव आहे. तशी जर स्थिति आली तर मी कानपुरापासून ६ मैलांवर बिठूर येथें जाईन. येथें पेशवे राहतात. हे साहेबांचे मित्र आणि मोठे धनवान गृहस्थ आहेत. यांनीं आश्वासन देऊन सांगितलें आहे कीं तुम्ही येथें निश्चिंतपणें येऊन राहा. माझा छावणींतच. राहण्याचा विचार होता, पण यजमानांनीं मला बिठूर येथेंच राहण्याचा सल्ला दिला आहे. "

नानासाहेबांवर कलेक्टराचा इतका विश्वास असल्यामुळेंच खजिन्याचें रक्षण त्यांचेच मदतीनें करण्याचें त्यानें ठरविलें. नानासाहेबांवर सर्वच इंग्रजांचा अतोनात विश्वास होता. तेव्हां नानासाहेबांवर विसंबून व त्यांच्या मदतीची अपेक्षा करून, छावणीची सदोष रचना केल्याबद्दल एकट्या व्हीलरला दोष द्यावयास नको. फक्त बंड होण्यापूर्वी नानासाहेब एकदां लखनौला गेले होते, तेव्हांच कायतें लॉरेन्सला त्यांचें वर्तन संशयास्पद वाटलें. नानासाहेब आपल्या स्नेह्यांसह लॉरेन्सच्या भेटीस गेले असतां लॉरेन्सनें फक्त त्यांना बसावयास खुर्ची दिली व इतरांना खोलींत तसेंच उभें ठेवलें. नानासाहेबांना आपल्या मित्रांचा हा अपमान सहन झाला नाहीं, व त्यांनीं तडफीनें लॉरेन्सचा निरोप घेतला. ह्याच उद्दाम (?) वागणुकीमुळें लॉरेन्सला नानासाहेबांचा संशय आला होता. हो, खरेंच ! मित्रांना साहेबानें उभें ठेवलें म्हणून रागवावयास काय झालें ? तो साहेबलोकांचा नेहमींचा परिपाठ ! नानासाहेबांनीं बंडाची योजना निश्चित केली तरी शेवटपर्यंत त्यांचें मन डळमळत होतें, व इंग्रजांशीं ते गोडीगुलाबीनें वागून त्यांना खुष ठेवण्याचा प्रयत्न करीत. त्यांना वाटे कीं इंग्रज मेजवान्यांनीं व डाल्यानीं एकदां प्रसन्न झाले म्हणजे आपल्याला स्वखुषीनें पेन्शन चालू करतील व मग बंडाचा खटाटोप करण्याचें कारण राहणार नाहीं. आणि यदाकदाचित् इंग्रजांनीं त्यांना पेन्शन देऊन त्यांच्या मनांतील इच्छा पूर्ण केली असती तर कानपूरच्या इंग्रजांची जी कत्तल झाली आणि बायकामुलांच्या रक्तानें गंगानदी दूषित झाली, तें सर्व विघ्न बहुधा टळलें असतें.

नानासाहेब इंग्रजांस साहाय्य करण्यास तयार झाले. त्यांचेजवळून इंग्रजांनीं कोणत्या प्रकारच्या मदतीची आशा केली होती हें येथें सांगणें आवश्यक आहे. मुलकी आणि फौजी इंग्रज अधिकारी या वेळीं खजिन्याच्या रक्षणाच्या बाबतींत मोठ्या काळजींत होते. इंग्रजांनीं ज्या ठिकाणीं आपल्या रक्षणाची व्यवस्था केली होती तेथें खजिना नेतां येत नव्हता. हें ठिकाण छावणीजवळ होतें आणि तेथें खजिना नेला असता तर शिपाई खजिन्याच्या लोभामुळें झटपट विरुद्ध होण्याचा संभव होता. या वेळीं खजिन्याच्या रक्षणाकरितां जे शिपाई ठेवलेले होते त्यांनीं आपली राजभक्ति प्रगट करून असें म्हटलें कीं, आम्हीं आपल्या सामर्थ्यावर पूर्णपणें विसंबून खजिन्याचें रक्षण करूं. जर खजिना येथून हालविण्यांत आला तर आमच्या राजभक्तीला आणि विश्वासाला कलंक लागेल. अधिकाऱ्यांनीं यावर कोणत्याही प्रकारचा वाद केला नाहीं; कारण या वेळीं जर त्यांचेवर अविश्वास दाखविला असता तर

कदाचित् शिपाई ताबडतोब उलटण्याचा संभव होता. अधिकाऱ्यांनीं कांहीं सशस्त्र शिपाई तेथें ठेवण्याचा निश्चिय केला. याच कामाकरितां नानासाहेबांची त्यांना मदत हवी होती. नानासाहेब लवकरच आपले २०० सशस्त्र शिपाई आणि दोन तोफा घेऊन, खजिना आणि तोफखाना यांच्याजवळ नवाबगंज येथें येऊन राहिले. या बाबतींत नानासाहेबांचा मित्र तात्या टोपे यानें म्हटलें आहेः—

" १८५७ च्या मे महिन्यांत कानपूरच्या कलेक्टरनें नानासाहेबांस लिहिलें होतें कीं, तुम्ही माझी बायको व मुलें यांना विलायतेंत पाठविण्याची व्यवस्था कराल तर बरें होईल. नानासाहेबानें या गोष्टीस आपली अनुमति दिली. चार दिवसांनंतर नानासाहेबांस कलेक्टरनें तीनशें शिपाई आणि तोफा घेऊन मदतीस येण्यास लिहिलें. नानासाहेब त्याप्रमाणें कानपुरास आले. या वेळीं कलेक्टर आपल्या घरीं नव्हता. त्यानें आम्हांस आपल्या घरीं राहण्यास सांगून पाठविलें. तो स्वसंरक्षणाकरितां व्हीलरनें योजलेल्या दवाखान्यांत रहावयास गेला होता. आम्ही ती रात्र त्याचेच वाड्यांत काढली. दुसरे दिवशीं कलेक्टर आम्हांस येऊन भेटला. त्यानें आम्हांस त्याचे घरींच राहण्यास सांगितलें. त्याचें घर शहरांत होतें. आम्ही तेथेंच राहूं लागलों. चार दिवसांनंतर कलेक्टरानें म्हटलें कीं आमचे पगारी शिपाई आमचा हुकूम मानीत नाहींत; अशा वेळीं नानासाहेबांनीं आम्हास साहाय्य करण्याचें कबूल केलें ही आनंदाची गोष्ट होय. नानासाहेबांनीं आपल्या नोकरांच्या खर्चाविषयीं त्यांचेजवळ गोष्ट काढली. कलेक्टर आणि सेनापति या दोघांनीं ही गोष्ट आम्यास ले. गव्हर्नरला लिहून पाठविली. तेथून लिहून आलें कीं नानासाहेबांच्या शिपायांच्या खर्चाची कंपनी तर्फे सर्व व्यवस्था होईल. अशा प्रकारें नानासाहेबांनीं २२ मे रोजीं सरकारच्या खजिन्याच्या रक्षणाचा भार आपले शिरावर घेतला." चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या राजरोसपणें देण्यांत आल्या. त्या वेळीं नानासाहेबांना जर गव्हर्नरनें पेनशन चालू करण्याचें वचन दिलें असतें, तर त्यांनीं तितक्या परिस्थितींतूनही माघार घेतली असती, व ते इंग्रजांशीं इमानेंइतबारें वागले असते. परंतु इंग्रजांचा द्रव्यलोभ आडवा आला!

ज्या वेळीं इंग्रज आपल्या रक्षणाची व्यवस्था करीत होते व दवाखान्याभोंवतीं भिंती उभारून त्यावर तोफा चढवीत होते, त्याच वेळीं तथील शिपाईदेखील निरनिराळ्या ठिकाणच्या हकीकती व गप्पा ऐकून उत्तेजित होत होते. पहिल्या प्रथम सेनेमधील २ नं. चा रिसाला विरुद्ध झाला. शिपाई आपली मालमत्ता व मुलेंबाळें दुसऱ्या ठिकाणीं पाठवूं लागले. सैन्यामध्यें कांहीं मुसलमान होते,

ते सर्वांच्या अगोदर बंडाकरितां उभे राहिले. हिंदूंप्रमाणें त्यांना देखील आपला धर्म बाटण्याच्या भीतीमुळें झोंप येत नव्हती; शिवाय दिल्लीची मोंगल बादशाही त्यांना हाका मारीत होती. मशीदींत सर्व मुसलमान एकत्रित होऊन विचार करीत. २४ मे रोजीं ईद होती. इंग्रजांस वाटलें होतें कीं याच दिवशीं हे लोक बंडाकरितां उभे राहतील. पण तो दिवस शांततेंत गेला.

परंतु सेनापति आणि शिपाई यांच्यामध्यें परस्परांविषयीं चांगला भाव उत्पन्न झाला नाहीं. शिपाई शंकितच राहिले व इंग्रजांचा संशय वाढतच गेला. शिपा-यांनीं पाहिलें कीं, इंग्रज आपणास नेहमीं संशयाच्या दृष्टीनें पाहतात. त्यांनीं स्वतःच्या बचावाकरितां तोफा लाविल्या आहेत व भोंतालीं कोट उभारला आहे; गोरे शिपाई नेहमींच हत्यारबंद असतात. हे सर्व प्रकार पाहून हिंदी शिपायांचीं मनें अधिकच भडकून गेलीं. या भरलेल्या तोफांनीं आपणास कदाचित् उडवून देतील, ही भीती त्यांच्या मनांत डोकावूं लागली. इंग्रजी राज्यांत आपला धर्म आणि जात तर नाश पावलीच, पण शेवटीं प्राण देखील जातील. अशा प्रकारचे विचार प्रत्ये-काच्या मनांत घोळूं लागले. ज्या दिवशीं लखनौहून कानपुरास थोडीशी गोरी सेना साहाय्याकरितां आली, त्या दिवशीं सर्व घोडेस्वार आपापले तमंचे भरून लढाई-करितां तयार झाले. तोफा छावणीमध्यें कशाकरितां येत आहेत याचें कारण एकासही माहीत नव्हतें. तोफांबरोबर गोरे शिपाई पाहून त्यांना वाटलें कीं, हे लोक आपणांस मारण्याकरितांच येत आहेत. या काळजीमुळें त्यांचीं मनें अस्वस्थ झालीं, आणि त्यांनीं आपापले घोडे तयार केले. गोलंदाज तोफा घेऊन त्यांच्या घरावरून पुढें निघून गेले, तरीही त्यांचीं मनें शांत झालीं नाहींत. गांवातील रहिवाशां-पैकीं पुष्कळ मंडळी त्या गोष्टीचा शोध घेण्यासाठीं शिपायांजवळ गेली. हें पाहून एक गोरा अधिकारी तेथें गेला आणि म्हणाला, " अयोध्येहून जे शिपाई तोफांबरो-बर येत होते त्यांनीं आतांपर्यंत कोणत्याही प्रकारची गडबड किंवा राजद्रोह केला नव्हता, आणि म्हणूनच त्यांना फत्तेगडास पाठविलें होतें; परंतु तेथें त्यांनीं सेनापतीचा खून करून आपली राजनिष्ठा कलंकित केली." त्याच्या अशा बोलण्यानें शिपाई आणखी भडकले. त्यांपैकीं एकानें म्हटलें कीं, "अधिकाऱ्यांनींच प्रथम विश्वासघात केला यांत मुळींच संशय नाहीं. अधिकाऱ्यांनीं त्यांचीं हत्यारें आणि घोडे काढून घेण्याचा प्रयत्न केला, पण तें न साधल्यामुळें त्यांना पगार घेण्या-साठीं बोलाविलें. परंतु हे लोक सहजासहजीं फसणारे नव्हते." एकानें म्हणून देखील दाखविलें कीं, "जर अधिकारी विश्वासघातकी व संशयी नसते तर

त्यांनीं आपल्या बचावाकरितां कोट कशाला उभारला असता ? व जादा फौज व तोफखाना कशाकरितां बोलावला असता ? आमच्याशीं गोरे पहिल्याप्रमाणें वर्तन ठेवतील, तर आम्हीही त्यांचें कोणत्याही प्रकारचें नुकसान करणार नाहीं. पण हे लोक आमची जात व धर्म बुडविण्यास टपले आहेत. त्यांना माहीत होतें कीं आम्ही या नव्या काडतुसांना शिवणार नाहीं, म्हणूनच त्यांनीं कणकींत गाय आणि डुक्कर यांचीं हाडें दळून मिसळून दिलीं. " तिसरा म्हणाला, " हें सर्व आम्हांस ठाऊक आहे. आजपर्यंत खजीना आणि तोफखाना यांच्यावर आमचा पाहरा होता. पण आतां आमच्या जागीं गोरे लोक ठेवले." गोऱ्या अधिकाऱ्यानें त्यांना शांत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण व्यर्थ. तो सरकारचा उद्देश जितका जास्त स्पष्ट करण्याचा प्रयत्न करी, तितक्या त्यांच्या अधिकच कुशंका निघत. मीरतच्या प्रकरणाचा उल्लेख करून ते लोक म्हणाले, " तेथील शिपायांस दहा वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली ती कां ? त्यांचा अपराध इतकाच कीं त्यांनीं तीं धर्मभ्रष्ट काडतुसें दांतांनीं तोडण्याचें नाकारलें. आतां कानपुरास गोरे शिपाई आले तर आमचीदेखील तीच स्थिति होईल. पण आम्ही ती स्थिति येऊंच देणार नाहीं. येथेंही एक दिवस एका गोऱ्यानें एका पहारेकऱ्यावर गोळी झाडली; पण त्याला, तो दारूच्या नशेंत होता, असें म्हणून सोडून दिलें. आम्हीं जर एखाद्या गोऱ्यावर चुकून गोळी झाडली असती, तर आम्हांस एकदम फांशींच दिलें असतें." यावर त्या अधिकाऱ्यानें म्हटलें, " तुम्हीं आपल्या हातानें आपल्या नाशाचा दरवाजा उघडा करीत आहां. इंग्रजांशिवाय तुम्हाला दुसरा कोण नोकरी देईल ? " त्याचवेळीं एक शिपाई उत्तरादाखल म्हणाला कीं, " आम्हीं मुसलमान आहोंत. आम्ही मुसलमान बादशाहाची नोकरी करूं. ते आमची इज्जत चांगल्या तऱ्हेनें ठेवतील. "

यावप्रमाणें शिपायांचा क्रोध वाढूं लागला. इंग्रज जों जों आपल्या रक्षणाचे जास्त उपाय योजूं लागले, तों तों शिपायांचीं मनें अधिकच अस्थिर होऊं लागलीं. वृद्ध सेनापतीनें कशा प्रकारची व्यवस्था केली होती हें मागें सांगितलेंच आहे. इंग्रज लोक किती घाबरले आहेत हें शिपायांना स्पष्ट दिसत होतें. ज्यांना आजपर्यंत ते दृढनिश्चयी, तेजस्वी आणि वीर समजत होते, त्यांची अशी घाबरगुंडी उडालेली पाहून, इंग्रज देखील इतर माणसांप्रमाणेच साधारण माणसें आहेत अशी शिपायांची समजूत झाली. यांना जिंकणें कांहीं कठीण गोष्ट नाहीं, याच विचारानें शिपाई इंग्रजांकडे तुच्छतेनें पाहूं लागले. अशा रीतीनें दोघांच्याही मनांतील भाव बदलून गेले.

मे महिन्यांतील शेवटचा आठवडा निरनिराळया बातम्यांमुळें गरम झाला होता. शंका वाढत गेल्या परंतु शांतता नष्ट झाली नाहीं. महाराणीच्या जन्म-दिवशीं सेनापतीनें शिपायांच्या धास्तीनें तोफांचे आवाज काढले नाहींत, परेड-ग्राउंडवर सैन्य एकत्रित केलें नाहीं, व कोणत्याही प्रकारचा लष्करी उत्सव झाला नाहीं. सर्व शांत होतें. अशा रीतीनें हा वार्षिक बादशाही दिवस पार पडला. एक युरोपियन स्त्री कांहीं जरूरीचें सामान आणावयास बाजारांत गेली. तिला एक शिपाई म्हणाला कीं, आतां तुमचें आयुष्य एक आठवडाभर देखील उरलें नाहीं. परत गेल्यावर तिनें ही गोष्ट सर्वांस सांगितली, पण तिच्या बोलण्यावर कोणींही विश्वास ठेवला नाहीं. आदले दिवशीं एका गोऱ्या अधिकाऱ्याचें घर पेटलें होतें. शिपायांना आग विझविण्याची आज्ञा केली; त्यांनींही मुकाट्यानें आग विझविली. संकट एक एक पाऊल पुढें चालून येतच होतें. अजोमुल्ला आपलें काम बरोबर करीत होता; व इंग्रजांची मधूनमधून थट्टाही करीत होता. लेफ्टनंट डानियलला त्यानें विचारलें कीं, ' तुम्हीं जो चारी बाजूंना भिंत उभारीत आहां तिचें नांव काय ? ' त्यानें उत्तर दिलें कीं मला तें माहीत नाहीं. अजीमुल्ला म्हणाला, ' याचें नांव निराशेचा किल्ला असें ठेवलें पाहिजे.' डानियल म्हणाला, ' नाहीं. आम्ही याला विजयदुर्ग म्हणूं. " यावर अजीमुल्ला नुसता हाः हाः करीत हंसूं लागला. हा लेफ्टनंट डानियल नानासाहेबांचा मित्र होता. एके दिवशीं नानासाहेबानें याला आपल्या हातांतील हिऱ्याची आंगठी बक्षीस दिली होती.

या वेळीं कानपुरास नानकचंद नांवाचा एक वकील होता. तो श्रीमंत बाजीरावांच्या पुतण्याचे तर्फे, पेशव्यांच्या संपत्तीचा वारसा मिळविण्यासाठीं नानासाहेबांचे विरुद्ध भांडत होता. हा कंपनी सरकारचा कट्टर पक्षपाती होता. यानें १५ मेपासून डायरी लिहिण्यास सुरुवात केली होती. तिच्यांत त्यानें लिहिलें आहे कीं, खजिन्याच्या रक्षणाकरितां शिपायांवर जो विश्वास टाकण्यांत आला, त्याबद्दल शिपाई सरकारच्या भोळेपणाला हंसतात. कांहीं जरी कारण असलें, तरी मे महिना अखेर कोणीही सरकारच्या विरुद्ध गेला नाहीं. दिल्ली-मीरतनंतर तीन आठवडे शांतपणें लोटल्यामुळें सेनापति व्हीलरला वाटलें कीं, संकटाचा जोर कमी झाला. आतां लखनौस सर हेनरी लॉरेंसच्या मदतीकरितां सैन्य पाठवितां येईल. याच विचारानें वृद्ध सेनापतीनें लॉरेंसला १ जून रोजीं लिहिलें, " माझा विश्वास आहे कीं लवकरच कानपूर संकटमुक्त होईल, व मी आपणांस उलट येथून मदत पाठवूं शकेन. माझ्या ५२ वर्षांच्या कारकीर्दीत सैन्याचा मीं

बराच विश्वास संपादन केला आहे. तरी हल्लीं कोणतेंही काम फारच सावधगिरीनें करावें लागतें. जरा इकडे तिकडे झाल्यास त्याचा परिणाम अनिष्ट होतो. असें जरी आहे, तरी मला खात्री आहे कीं, मी कानपुरास शांति ठेवूं शकेन. लोक म्हणतात कीं माझ्यामुळेंच येथील शिपाई दुसऱ्यांचें अनुकरण करण्यास तयार नाहींत. माझ्या या आत्मप्रशंसेबद्दल क्षमा कराल अशी आशा आहे." वृद्ध सेनापति अशा दृढ विश्वासानें लखनौहून आलेल्या गोऱ्या शिपायांना परत पाठविण्याचा विचार करूं लागला. व्हीलर साहेबानें त्यांना मे महिना अखेर लखनौला परत पाठविलें. याविषयीं त्यानें गव्हर्नरजनरलला पत्र लिहिलें कीं, 'सर हेनरी लॉरेंसचें उद्वेगजनक पत्र आल्यामुळें मी ८४ नंबरच्या पलटणीचे पन्नास शिपाई व दोन अधिकारी, अशी लहानशी तुकडी लखनौला परत पाठविली आहे. लखनौस ही मदत पाठविल्यानें जरी माझ्या पक्षाचें बळ कमी झालें आहे, तरी माझी खात्री आहे कीं दुसरीकडून मदत येईतोंपर्यंत मी आत्मरक्षण करूं शकेन. लखनौला जाणाऱ्या तुकडीनें गंगा नदी ओलांडिली, तेव्हां गोरें सैन्य तेवढेंच कमी झालें आणि इंग्रजांचा पक्ष थोडा निर्बल झाला, असें देशी शिपायांनीं समाधानाचे उद्गार काढिले. आतां ते चांगल्याशा संधीचीच वाट पहात होते. इंग्रजांच्या बंधनांतून मुक्त होऊन दिल्लीच्या बादशहाच्या नोकरीचीं सुखस्वप्नें त्यांनां पडूं लागलीं.

जून महिना सुरू होतांच देशी शिपायांची क्षुब्धता वाढीस लागली. घोडदळ त्यांतल्या त्यांत विशेष अधीर झालें होतें. त्यानें पायदळ शिपायांना आपल्याकडे वळविलें. बाजारांतून आणि छावणींत गुप्त खलबतें होऊं लागलीं. या वेळीं नानासाहेब नवाबगंजांत रहात होते. त्यांच्या बरोबर त्यांचीं चाकर माणसें आणि लवाजमाही होता. याच ठिकाणीं बंडखोर नानासाहेबांना येऊन मिळाले. जवळच सरकारी खजीना, तुरुंग आणि तोफखाना होता. या सर्व गोष्टी अनुकूल आहेत असें पाहून शिपायांना अपरिमित आनंद झाला. त्याला कारणेंही तशींच झालीं. पूर्वी अजद अल्ली नांवाचा नानासाहेबांचा एक मुसलमान नौकर असे. त्यानें अलीकडे घोडे विकण्याचा धंदा चालविला होता. तो आतां बंडखोरांना मिळाला. शिवचरण दासाचें म्हणणें असें आहे कीं, नं. २ च्या घोडदळाचा सुभेदार टीकासिंह यानें नानासाहेबांजवळ बोलणें लाविलें कीं, ' तुम्ही इंग्रजांतर्फे खजीन्याचें रक्षण करावयाला आलां आहांत खरे, पण आम्ही सगळे हिन्दु व मुसलमान शिपाई आपला धर्म वांचविण्याकरितां तयार झालों आहों. बंगालच्या शिपायांनीं बंड

केलें, तें केवळ स्वधर्म रक्षणाकरितांच केलें! तुम्ही गो-ब्राह्मण-प्रतिपालक म्हणवितां! तर आतां तुमचें काय म्हणणें आहे?" नानासाहेबांनीं उत्तर दिलें कीं, मी शिपायांच्या म्हणण्याबाहेर नाहीं. दुसऱ्या एकाचें म्हणणें असें आहे कीं, जूनच्या सुरुवातीस एकदां संध्याकाळीं बाळासाहेब व अजीमुल्ला यांना घेऊन नानासाहेब गंगेवर सहल करण्यास गेले. तेथें त्यांची आणि टीकासिंहाची व इतर कटवाल्यांची भेट झाली. नंतर सर्वजण नावेंत बसून दोन तास गुप्त खलबत करीत होते.' तें कसेंही असो. कोण कोणाला जाऊन भेटला आणि गुप्त कट कोणत्या ठिकाणीं झाला, या गोष्टीबद्दल वाद असला तरी एवढें मात्र खरें कीं, जूनच्या चवथ्या तारखेपर्यंत कांहीं तरी घाटत होतें आणि या कटांत नानासाहेबही होते. नानासाहेबांचीं नोकर माणसें पहिल्यापासूनच बंडाला अनुकूल होतीं. कदाचित् या नोकरांकडूनही बंडखोरांना नानासाहेबांचा कल शिपायांकडे असल्याची बातमी लागली असेल. कानपूर येथील शिपायांचें सेनापति व्हीलरवर विशेष प्रेम होतें अशांतला भाग नाहीं. परंतु त्याच्या वयामुळें व ५२ वर्षांच्या नोकरीमुळें शिपाई त्याला वचकून असत. त्यामुळें ह्या भेटी-प्रतिभेटींत बंडाचा दिवस नक्की करणें जरूर होतें. त्याप्रमाणें दिवस नक्की केल्यावर नानासाहेबानें बहुधा झांशी येथें व इतरत्र निरोप पाठविले असावेत. शिपायांची आणभाक होईतोंपर्यंत बंडाचा बाहुटा उघडपणें उभारण्याची नानासाहेबांची इच्छा नव्हती.

सेनापति व्हीलर यानें हिंदुस्थानांत बरींच वर्षे हिंदी शिपायांबरोबर घालविलीं असल्यामुळें त्याला शिपायांची भाषा चांगलीच अवगत होती. त्याचें या भाषेवरील प्रभुत्व दांडगे होतें. तो बोलावयाला लागला म्हणजे त्याचीं वाक्यें, शब्द, त्यांचा उच्चार आणि त्यांत प्रगट होणारे विचार, एखाद्या हिंदी माणसाचेच आहेत असें वाटे. आजपर्यंत या भाषाप्रभुत्वामुळें शिपायांना साहेबाविषयीं आपलेपणा वाटे. पण आतां मनु बदलला होता. त्यानें छावणींत जाऊन शिपायांची त्यांच्याच भाषेंत स्नेहानें समजूत घालण्याचा पुष्कळ पयत्न केला. शिपायांनींही त्याचें म्हणणें निमूटपणें ऐकलें, पण त्यांच्या मनावर परिणाम मात्र कांहींच झाला नाहीं. शिपाई बंडाकरितां अगदीं उतावीळ झाले होते. पण पहिल्यानें बंड कोणीं पुकारावयाचें आणि पुढें काय काय करावयाचें यासंबंधीं एकमत होईना. या शुष्क वादविवादांत कित्येक दिवस निघून गेले. शिपाई बंडाला अगदीं तयार होत आणि ऐन वेळीं कांहीं तरी कारण उपस्थित होऊन तो बेत रहित होई. एक दिवस तर एका देशी अधिकाऱ्यानें, बंड पुकारण्याकरितां सर्व शिपायांनीं शस्त्रास्त्रांनीं

सज्ज होऊन जमावें, म्हणून बिगुल वाजवावयाला तोंडाला लाविलें, पण इतक्यांत दुसऱ्या एकानें बिगुलावर हात ठेऊन त्याला तसे करूं दिलें नाहीं. जूनच्या तिसऱ्या तारखेला रात्रीं घोडदळ असेंच उताविळ झालें, पण त्या दळाचा सुभेदार भवानसिंह यानें मोठ्या आयासानें त्यांना शांत केलें. नानासाहेबासुद्धां सर्व लहानमोठे पुढारी बंडाला तयार असले तरी मध्यंतरीं अनेक शंकाकुशंका निघून, पहिलें पाऊल पुढें टाकावयाचें तें कोणी, केव्हां व कसें याविषयींच एकमत नव्हतें. जो तो आपण मागें राहूं इच्छीत होता. म्हणजे प्रथमग्रासे मक्षिकापात झाल्यास नामानिराळें राहण्यास बरें! अशा स्थितींत जास्त वेळ जाणें शक्य नव्हतें. दुसरे दिवशीं दिवसभर कांहीं गडबड झाली नाहीं, पण रात्रीं शिपायांनीं निश्चयच केला. त्यांनीं मग सुभेदाराच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं, व वृद्ध सेनापतीकडे पाहिलें नाहीं. चार तारखेला मध्यरात्र उलटून गेल्यावर या घोडदळानें बंडाचें निशाण उभारलें. सुभेदारानें त्यांना समजविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. पण व्यर्थ! त्यांनींच सुभेदाराला धमकी दिली कीं आमच्या बरोबर चल, नाहीं तर मरणाला तरी तयार हो. या म्हाताऱ्या सुभेदारानें बंडखोर शिपायांशीं बराच वादविवाद केला, पण त्यामुळें शिपाई अधिक चवताळले आणि त्यांनीं त्या वृद्ध सुभेदाराला तलवारी भोसकून तेथेंच टाकिला आणि ते पुढें निघून गेले. नंतर पायदळ पलटण तयार झाली आणि त्यांच्या मागोमाग रवाना झाली. ही बातमी ऐकतांच वृद्ध सेनापति व्हीलर तेथें आला आणि शिपायांना हिंदींत सांगूं लागला कीं 'बाबांनो, तुम्हीं हें काय मांडिलें आहे. हें तुमचें काम फार वाईट आहे.' शिपाई कशाला त्याचें ऐकतात? ते सर्व नबाबगंजाकडे निघाले. त्यांनीं इकडे तिकडे न पहातां घरांची जाळपोळ सुरू केली. ज्या ज्या रस्त्यानें ते गेले तो रस्ताच आपली कर्मकहाणी सांगूं लागला. तरी पण ते पहिल्यानें खजिन्याकडे वळले. त्यांनीं प्रथम इंग्रजांवर चाल केली नाहीं.

शिपायांच्या दोन तुकड्या नबाबगंजाजवळ पोहोंचतांच नानासाहेबांच्या नोकरांनीं त्यांचें स्वागत केलें. ३५ नंबरच्या पलटणीचे शिपाई या वेळीं खजिन्यावर पहारा करीत होते. ते बंडखोरांना सामिल झाले नाहीं, उलट त्यांच्याशीं लढूं लागले. इंग्रजांनीं त्यांच्या बंदुकींचा आवाज ऐकला, पण सेनापतीनें त्यांना मदत पाठविली नाहीं. हे रक्षक थोडे होते, ते किती वेळ टिकाव धरणार? तरी त्यांनीं पहिला हल्ला परतविला. पण लवकरच खजीना लुटला गेला, तुरुंग तुटला

आणि कैदी सुटले, कचेऱ्या अग्निनारायणानें स्वाहा केल्या व रुपया पैसा जो कांहीं हातीं लागला तो सर्व हत्ती, घोडे आणि बैलगाड्यांवर लादून शिपाई दिल्लीकडे रवाना झाले.

सेनापति नीलसाहेबानें नमूद करून ठेविलें आहे कीं, व्हीलर साहेबाला तोफखान्यांत कोणतें सामान आहे याचा पत्ता देखील नव्हता. हें अज्ञानच पुढील अनर्थाला कारण झालें. सेनापति व्हीलरची खात्री होती कीं नानासाहेब इंग्रजांचा पक्ष घेऊन त्यांचें रक्षण करतील; पण झालें याच्या अगदीं उलट ! बंडखोर शिपाई होतें नव्हतें तें सर्व लुबाडून दिल्लीच्या वाटेला लागले, पण त्या सर्वांना नाना-साहेबानें परत कानपुरास आणिलें. कारण तो चतुर सेनानी होता. जयाचा ठेवा दिल्लीला सांपडेल अशी मूर्खपणाची समजूत तो उराशीं बाळगीत नव्हता. शत्रूला चोंहों बाजूंनीं पायबंद दिल्याशिवाय तो वठणीस येत नाहीं, हें त्यांस ठाऊक होतें. कानपूर व इतर ठिकाणच्या बंडाळींत हाच मोठा फरक होता. आतां मात्र व्हीलर-साहेब चोहोंकडून संकटांनीं घेरला गेला. त्याच्याच तोफा त्याच्यावर गोळे सोडूं लागल्या. यापूर्वी थोडा वेळ त्याचे शिपाई तोफखान्याच्या सामानाची तपासणी करून त्याची याद करण्याकरितां गेले होते. त्यांनीं बराच वेळ डेरे आणि राहु-ट्यांच्या मोजदादींत व्यर्थ घालविला. तोफा, दारूगोळा आणि हत्यारें यांच्याकडे त्यांचें लक्षच नव्हतें. तिकडे लक्ष जातांच त्यांना दिसून आलें कीं, त्यापैकीं कोणतेंही सामान जागेवर शिल्लक नव्हतें. तें सर्व बंडखोर शिपायांनीं लांबविलें होतें. ही खबर त्यांनीं व्हीलर साहेबाला कळविली तेव्हां बिचारा हताश झाला. दिल्लीप्रमाणें कानपूरचें दारुगोळ्याचें कोठार उडवून द्यावें, हा त्याचा विचार जागच्या जागींच जिरला. वायव्य प्रांताच्या पोलिस कमिशनरचें असें म्हणणें आहे कीं, एक गोरा शिपाई तोफखाना आणि कोठार उडवून देण्याकरितां आला होता. पण तोफखान्याच्या रक्षकांनीं त्याला तसें करूं दिलें नाहीं.

दुसऱ्या नंबरचें घोडदळ आणि पहिल्या नंबरचें पायदळ यांनीं बंड पुकारिलें आणि ते नवाबगंजांत जाऊन पोहोंचले, तरी देखील मागें राहिलेल्या दोन दळांनीं बंड पुकारलें नाहीं, हें पाहून त्यांना चिंता वाटूं लागली. सकाळ झाली तरी हे सैनिक आपल्याला येऊन कां मिळाले नाहींत ? त्याचें कारण हें कीं, त्या दळांचे अधिकारी रात्रींच त्या शिपायांना जाऊन मिळाले, व त्यांच्या नजरेखालीं रात्रभर शिपाई परेडच्या मैदानावर सुसज्जित होऊन उभे होते. नं. ६५ च्या

पलटणीच्या कप्तनानें नं. २ च्या रिसाल्याच्या छावणीकडे जाण्याचा हुकूम आपल्या टोळीला दिला. रिसाल्याचे लोक जे सामान सोडून गेले होते, तें सर्व सामान आणि घोडे त्यानें एकत्र करविले, आणि नंतर दोन्ही दळांना आपापल्या छावणींत जाण्याचा हुकूम दिला. याप्रमाणें हुकूम देऊन अधिकारी नवी भिंत उभारलेल्या इस्पितळाकडे निघून गेले. रात्रभर अधिकाऱ्यांच्या हुकुमानें जे सैनिकपरेडवर उभे राहिले, ते एकाएकीं लोभवश झाले कसे ? अधिकारी समोर होते तोंपर्यंत हे सैनिक राजभक्तच होते. परंतु ते स्वयंपाकाच्या तयारींत असतां, त्यांच्या मागें तोफेचे गोळे येऊन पडले. तीन पलटणींनीं बंड पुकारिलें असल्यामुळें, आधींच देशी शिपायांविषयीं शंकित असलेले अधिकारी सर्वच शिपायांना एका मापानें मोजूं लागले. म्हणूनच पसतिसावी पलटण इतरांप्रमाणेंच राजद्रोही आहे अशी त्यांची समजूत झाली. या समजुतीच्या घोटाळ्यानें त्यांनीं तोफा डागल्या. पस्तिसाव्या पलटणींत घोटाळा उडाला. आपल्या राजनिष्ठेविषयीं अधिकारी साशंक आहेत अशी त्यांची खात्री झाली, व या अपमानानें चिडूनच त्यांनीं बंड पुकारिलें. तोफांचा मारा सुरू झाला, तेव्हां प्रथम शिपायांना हा मारा आपल्यावर होत आहे अशी खात्री होईना. मारा सारखा चालू राहिला, तेव्हां नाइलाज होऊन त्यांना तेथून पळ काढावा लागला.

कानपूरचे शिपाई बंड केल्यावर खजीना व दारूचें कोठार लुटून दिल्लीला जावयास निघाले होते, परंतु नानासाहेबानें त्यांना परत बोलाविलें, ही हकीकत वर आलीच आहे. नानासाहेब प्रथम शिपायांबरोबर दिल्लीला जावयाला तयार झाले होते पण अजीमुल्लानें त्यांचें मन वळविलें. तो म्हणाला, " जर तुम्ही दिल्लीला गेलां तर तेथें तुम्हाला कोणी विचारणार नाहीं. बादशहाच्या दरबारांत तुमचा मानमरातब राहणार नाहीं. तेथें तुम्हाला स्वतंत्रता मिळणार नाहीं. तुम्ही बादशहाचे अंकित म्हणवाल. तेथल्या मुसलमान दरबारी लोकांत तुमची शक्ति क्षीण होईल. कारण ते दरबारी तुमचा मत्सर करतील व तुमचें महत्व नष्ट करण्याची खटपट करितील. यामुळें शिपाई तुम्हाला सोडून जातील आणि बादशाहा देखील तुमच्याविषयीं मन कलुषित झाल्यामुळें तुम्हाला संकटांत आणील. तेंच जर तुम्ही येथें राहिलां, तर यापैकीं कांहींएक होणार नाहीं. तुमचें स्वतंत्र अस्तित्व कायम राहील. तेव्हां तुम्ही हिंदुपदपादशाही स्थापन करणाऱ्या शिवछत्रपतींच्या मार्गाला लागावें हें बरें. ज्या बाजीराव पेशव्यानें मोंगल बादशहाला आपल्या मनासारखें करावयाला भाग पाडलें, त्यांचे

तुम्ही वंशज आहांत. पेशव्यांनीं कोणत्याही संकटाला न जुमानतां आपलें अस्तित्व स्वतंत्रच राखिलें आहे. तेव्हां तुम्हांलाही स्वतंत्र अस्तित्व राखूनच बंडांत सामिल झालें पाहिजे. इंग्रजांची शक्ति नष्ट झाल्यासारखीच आहे. राहिली साहिलेली शक्ति किती वेळ टिकाव धरील ? ती नष्ट झाली म्हणजे साऱ्या उत्तर हिंदुस्थानांत तुमचेंच राज्य होईल. आतां तुम्हींच सांगा, येथें राहून आपलें स्वतंत्र अस्तित्व राखून मराठ्यांचा गौरव वाढविणें चांगलें, कीं दिल्लीस जाऊन जें आहे तेंही गमावून बसणें चांगलें?" अजीमुल्लानें रेखलेलें भावी वैभवाचें भडक चित्र पाहून नानासाहेबांचें हृदय उचंबळूं लागलें. त्या वैभवानें त्यांचे डोळे दिपले. त्यांच्या मनांतही तेच विचार घोळत होते. परंतु शिपायांचा ओढा दिल्लीकडे असल्यामुळें ते नाइलाजानें त्यांच्या बरोबर दिल्लीस जाण्यास निघाले होते. परंतु शिपायांचें मन वळविण्याचें अजीमुल्लानें कबूल केल्यामुळें त्यांना अत्यानंद झाला. व्हीलर साहेबाला बाहेरून मदत मिळणें शक्य आहे किंवा काय याचा विचार करून पाहतां, नानासाहेबांना दिसून आलें कीं, लखनौ, बनारस, प्रयाग आणि आग्रा या ठिकाणांहून मदत येण्याची मुळींच आशा नाहीं. कारण त्या ठिकाणचे इंग्रज पायाखालची आग विझविणें सोडून दुसऱ्याच्या मदतीला कसे धांवणार ? याप्रमाणें व्हीलर साहेबाचा आधार तुटला होता. उलट नानासाहेबांकडे चार बंडखोर पलटणी आणि विठुरला असलेले त्यांचे स्वतःचे लोक होते. पेशव्यांचें नष्ट वैभव पुन्हा एकदां चमकूं लागणार अशीं सुखस्वप्नें त्यांना पडूं लागलीं. इंग्रजांची शक्ति कमी होत आहे. देशी शिपाई इंग्रजांपेक्षां पुष्कळ जास्त आहेत. त्यांच्या भीतीनें गोरे सैरावैरा पळूं लागतात. इत्यादि ठिकठिकाणच्या बातम्या नानासाहेबांना रोज ऐकूं येत. त्यामुळें त्यांना यशाविषयीं खात्री वाटूं लागली. डलहौसीच्या कुटिलनीतीमुळें आपल्या न्याय्य हक्काला आपण कसे आंचवलों, इंग्रजांबरोबर इतक्या भलेपणानें वागूनही इंग्रज सरकारानें माझें पेन्शन सुरू केलें नाहीं; खात्रीनें हे इंग्रज दगलबाज आहेत, त्यांना त्यांच्या पापाचा मोबदला पुरापुरा दिला पाहिजे, असे विचार त्यांच्या मनांत आले.

वर दिलेल्या हकीगतीवरून नानासाहेब बंडखोरांना कसे मिळाले हें कळेल. तात्या टोपीनें यासंबंधाची जी हकीकत नमूद केली आहे ती अगदीं निराळ्या स्वरूपाची आहे. त्याचें म्हणणें त्याच्याच शब्दांत येणेंप्रमाणें आहे—"दोन दिवसांनंतर तीन पायदळ पलटणी आणि एक रिसाला यांनीं खजीन्याजवळ

येऊन मला आणि नानासाहेबाला घेरलें, व खजीना आणि तोफखाना त्यांनीं लुटला. लुटीपैकीं दोनलाख अकराहजार रुपये त्यांनीं नानासाहेबाला दिले आणि त्यांच्यावर नजर ठेवण्याकरितां पहारेकरी नेमले. आमचे विठूरचे लोक बंडखोरांना जाऊन मिळाले. यानंतर बंडखोर शिपाई मला, नानासाहेबाला व आमच्या सर्व लोकांना बरोबर घेऊन दिल्लीकडे जावयाला निघाले. कानपुरापासून तीन मैल दूर गेल्यावर नानासाहेब शिपायांना म्हणाले, 'आतां संध्याकाळ झाली आहे. आज येथेंच मुक्काम करूं. उद्यां दिवस उजाडतांच दिल्लीकडे आपण कूच करूं.' शिपाई या गोष्टीला कबूल झाले आणि त्यांनीं तेथेंच मुक्काम केला. दुसरे दिवशीं ते नानासाहेबाला पुढें चलण्यास सांगूं लागले. पण नानासाहेब कबूल होईनात. तेव्हां शिपाई त्यांना म्हणाले, 'तुम्हाला दिल्लीला जावयाचें नसेल तर आमच्याबरोबर कानपूरला परत चला आणि इंग्रजांना हांकलून लावण्यांत आम्हाला मदत करा.' नानासाहेब या गोष्टीलाही प्रथम कबूल झाले नाहींत. तेव्हां शिपायांनीं त्यांना जबरदस्तीनें कानपुरास नेलें." तात्या टोपीच्या या विधानावरून असें दिसतें कीं, नानासाहेबांना त्यांच्या इच्छेविरुद्ध शिपायांनीं बंडांत सामिल होण्यास भाग पाडिलें. या दोन परस्परविरोधी विधानांचा मेळ कसा घालावयाचा? नानासाहेबांकडे पहिल्यापासून बंडाचें पुढारीपण असलें, तरी तें त्यांनीं प्रगट केलें नव्हतें. आपल्या भलाईच्या वर्तनाला मोहून कंपनी आपल्याला पेन्शन सुरू करते कीं काय, याची त्यांनीं शेवटपर्यंत वाट पाहिली, व निराशा झाल्यावर उघडपणें ते बंडांत सामील झाले. पुढें देखील शिपायांचा कल दिल्लीच्या बादशाहीकडे असलेला पाहून त्यांना ओढूनताणून अंगीं चंद्रबळ आणावें लागलें, व शिपाई परत कानपूरला आले तरच आपण स्वधर्माकरितां केवळ शिपायांच्या आग्रहास्तव बंडाचें नेतृत्व पत्करूं, असें अवसान दाखवावें लागलें. त्यामुळें तात्याटोपीची तशी समजूत झाली असावी.

बंडखोरांनीं त्यांना आपला राजा म्हटलें, आणि त्यांच्या नांवानें पुढील कामें होऊं लागलीं. निरनिराळीं पथकें तयार झालीं आणि त्यांचे नायक नेमले गेले. सर्व ठिकाणीं हिंदू सेनानायक दिसल्यामुळें कांहीं इतिहासकारांनीं लिहिलें आहे कीं, बंडांत जितके हिंदू सामिल झाले होते तितके मुसलमान नव्हते. पण हें म्हणणें सत्याला धरून नाहीं. कानपूरच्या नं. २ च्या रिसाल्यांत बहुतेक सगळे मुसलमानच होते व त्यांनींच प्रथम बंडाचें निशाण उभारिलें. त्यांतल्या त्यांत दिल्ली व लखनौ येथें मुसलमानांचें व कानपुरास हिंदूंचें प्रस्थ वाढणें साहजिक होतें. परंतु या बंडांत

हिंदु-मुसलमान हे दोघेही मोकळ्या मनानें सामील झाले होते, व दोघांचा त्यावेळीं इंग्रजांविरुद्ध पूर्ण मिलाफ होता. लष्करांतील हिंदु-मुसलमानांच्या प्रमाणांतच बंडखोरांत हिंदु-मुसलमानांचें प्रमाण होतें, आणि हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांच्या साहाय्यानेंच या बंडाची उठावणी झाली.

ता. ६ जूनला शनिवार होता. त्या दिवशीं सकाळीं व्हीलरला नानासाहेबांकडून एक पत्र गेलें. त्यांत इंग्रजांना सुचविलें होतें कीं, बंडखोर शिपाई लवकरच इंग्रजांवर हल्ला करणार आहेत. शिपाई दिल्लीच्या रस्त्याला प्रथम लागले, तेव्हां इंग्रजांना वाटलें होतें कीं हे लोक आतां परत येत नाहींत, तरी आपल्याला अलाहाबादला सुखरूप जातां येईल. पण लगेच शिपाई परत येऊं लागले तेव्हां त्यांची निराशा झाली. एवढेंच नव्हे, तर बंडखोर मातीच्या भिंतीनें वेष्टिलेल्या इस्पितळाकडे येऊं लागले, हें पाहून वृद्ध सेनापतीची कंबरच खचली. पूर्वी सांगितलेंच आहे कीं हें ठिकाण निवाऱ्याचें नव्हतें. जमीन अगदीं सपाट होती व त्या जमीनीवर भुसभुशीत मातीची भिंत होती. ही भिंत कुठवर इंग्रजांचें रक्षण करणार? नानकचंदानें आपल्या डायरींत लिहिलें आहे—"इंग्रज अजाणपणें वागले. त्यांनीं हा विचार केला नाहीं, कीं जर चारी बाजूंनीं शिपाई उठले तर इस्पितळाला घेरा घालून तें सर करण्याला त्यांना किती वेळ लागेल? दुसरें शिपायांजवळ तोफा, दारुगोळा आणि पैसाअडका भरपूर होता. पण आलेल्या प्रसंगाला तोंड देण्यास त्या स्थितींतही इंग्रज तयार झाले. प्रत्येकाला त्याच्या वांट्याचें काम सांगितलें गेलें आणि जो तो तन मन लावून आपलें कर्तव्य करावयाला तयार झाला."

याप्रमाणें इंग्रज आपल्या संरक्षणाची तयारी करीत असतां बंडखोर शिपाई पुढें पुढें सरकत होते. वाटेंत सांपडेल त्या किरिस्तांवाला कंठस्नान घालीत ते पुढें येत होते. नानासाहेबांचें पत्र आल्यापासून क्षणोक्षणीं बंडखोरांचा हल्ला होईल, अशी प्रतीक्षा करीत गोरे शिपाई बसले होते. दोन प्रहर उलटून जाईपर्यंत बंडखोरांनीं हल्ला केला नाहीं. सूर्य जसा विश्रामस्थानाकडे वळला तसा तोफांचा भडिमार सुरू झाला. त्याबरोबर सेनापतीनें शिटी वाजविली. शिटीच्या आवाजाबरोबर सर्व लोक आपापल्या नेमलेल्या जागीं जाऊन उभे राहिले. इकडे तोफांचे गोळे इंग्रजांच्या घरांवर पडूं लागले. पण इंग्रज डगमगले नाहींत! बायकामुलें धाय मोकलून आक्रोश करीत आहेत; शत्रूंच्या तोफांचे गोळे घरावर पडून त्यांना जमीनदोस्त करीत आहेत; शत्रूचे लोक आपल्यापेक्षां संख्येनें

पुष्कळ पटीनें अधिक आहेत; या परिस्थितीची जाणीव असूनही इंग्रज आपल्या स्थानापासून च्युत झाले नाहींत. त्या स्थितींतही त्यांनीं बायकामुलांना वांचविण्याचा आटोकाट प्रयत्न केला.

बंडखोरांनीं इंग्रजांच्या निवासस्थानावर ६ जूनपासून २६ जूनपर्यंत तोफांचा मारा केला. अशा स्थितींत इंग्रजांच्या दुर्दशेला कांहीं ठिकाण नव्हतें. त्यांचे जसे हाल या वेळीं झाले, तसे हाल कदाचित् जगांतल्या कोणत्याही लढाईत पूर्वी झाले नसतील. जून महिन्यांतील कडत कडत उन्हाळी वारे सुरू होते. त्यामुळें आधींच ते भट्टींतून भाजून निघत होते. तो उन्हाळा एरवींच त्यांना असह्य होई व त्यांच्या बायकामुलांना पंखे व वाळयाच्या तट्या असूनही जीव उष्णतेनें नकोसा होई. परंतु आतां डोक्यावर मोडकें छपर व बाजूला तोफांनीं जर्जर केलेल्या मोडक्या भिंती, अशा स्थितींत त्यांना दिवस काढावे लागले. तोफांचा मारा सारखा चालू, प्राण केव्हां जाईल याचा नेम नाहीं, पोटभर खाण्यापिण्याला नाहीं, अशा स्थितींत त्यांनीं जें शौर्य दाखविलें तें अवर्णनीय होय. शिवाय बंदुकी आणि तोफा, एकसारखा मारा केल्यामुळें इतक्या तापत होत्या कीं त्यांना हात लाववत नसे. गोऱ्या स्त्रियांना हिंदुस्थानांत दोनदां स्नान केल्यावांचून बरें वाटावयाचें नाहीं, दिवसांतून तीनचार वेळ कपडे बदलल्यावांचून त्यांना चैन पडावयाचें नाहीं; त्या स्त्रियांना आतां स्नान केल्याशिवाय अशा उन्हाळयाच्या दिवसांत अंगाला दरदरून घाम सुटत असतां, घाणेरडे कपडे घालून जिवाच्या भीतीनें तळमळत पडावें लागत होतें. मुलेंबाळें तहानेमुळें व उष्णतेमुळें मूर्च्छित पडूं लागलीं. उन्हामुळें स्त्रिया आणि मुलें होरपळून व प्रसंगीं गुदमरून प्राण सोडीत असतां, तोफांचा भडिमार चालूच होता. गोरे शिपाई घायाळ होऊन पडत, पण 'आपण फार थोडे लोक आहों, आपण मेल्यानें शत्रूला चांगलेंच फावेल, व बायकामुलें असहाय होऊन शत्रूंच्या हातीं पडतील,' या तीव्र जाणिवेनें ते पुन्हा पुन्हा उठत आणि आपलें सर्व बळ एकवटून बंदुकी उचलून उलट गोळीबार करीत. असें करतांना तापलेल्या बंदुकांमुळें त्यांचे हात भाजून निघत, पण त्याचीही त्यांनीं फिकीर केली नाहीं.

मातीच्या भिंतीवर जागोजाग तोफा रोखिल्या होत्या. दर दहा पंधरा पावलांवर एक एक योद्धा बंदूक घेऊन उभा होता. सेनापति व्हीलरच्या हुकुमानें छावणींतील प्रत्येक चालता बोलता मनुष्य या वेळीं स्वसंरक्षणाकरितां हत्यार घेऊन रणमैदानांत उभा राहिला होता. प्रत्येक माणसाजवळ गोळ्या भर-

लेल्या तीन तीन बंदुकी होत्या. जे गोरे शिपाई निशाणबाजींत पटाईत होते त्यांच्याजवळ सात सात आठ आठ बंदुकी सज्ज केलेल्या होत्या. यामुळें बंडखोरांचे गोलंदाज नेहमीं गोऱ्या शिपायांच्या बंदुकीच्या आटोक्यांत सांपडत असत. जखमी शिपाई व आजारी बायकामुलांची शुश्रूषा करावयाला कोणीही नव्हतें. अशा बिकट प्रसंगांत इंग्रज सांपडले होते. पण असें असूनही ते आपल्या जागेवरून लवमात्र हटले नाहींत. कानपूरच्या बंडाची हकीकत लिहिणारा टामसन साहेब या वेळीं तेथें हजर होता. इंग्रजांच्या कडक शिस्तीचें उदाहरण म्हणून तो म्हणतो, "मी अगदीं थकून गेलों होतों आणि बंदूक खालीं ठेवून चहा प्यावा अशी मला उत्कट इच्छा झाली. मी त्याकरितां ब्रिगेडियर जॅकला एक मिनिटाची सुटी मागितली, पण सेनापतीचा हुकूम नसल्यामुळें मला ती एक मिनिटाची देखील सुट्टी मिळाली नाहीं." अशा दु:सह स्थितींत दिवसामागून दिवस आणि रात्रीमागून रात्री जाऊं लागल्या; पण गोरे शिपाई आपल्या कर्तव्यनिष्ठेमुळें आपल्या स्थानापासून क्षणभरही न चळतां अहोरात्र तेथेंच ठाम उभे राहिले.

तिकडे बंडखोरांचे नायक आपल्या कर्तव्यांत इतके तन्मय झाले नव्हते. टिकासिंह रिसाल्याचा नायक होता. त्यानें तोफखान्याच्या सर्व तोफा बाहेर काढिल्या आणि शनिवारीं दिवसभर तो एक सारखा तोफा हालविण्यांत गढून गेला होता. त्यानें सर्व तोफा इंग्रजांच्या आश्रयस्थानासमोर आणून उभ्या केल्या व त्यांचे मोर्चे तेथे बांधले. रविवारीं हिन्दी आणि उर्दू अशा दोन्ही भाषांत एक जाहीरनामा निघाला. तो छापवून सर्व देशी सैनिकांना वांटण्यांत आला. त्यांत हिंदू आणि मुसलमान या दोघांनाही स्वधर्मरक्षणाकरितां प्रोत्साहन दिलें होतें. शहरांतील विचारी लोकांना या धामधुमीनें बिचलित केलें नाहीं, परंतु अविचारी लोक लूटमार करून आपले खिसे भरण्याच्या मोहाला बळी पडले आणि बंडखोरांना मिळाले. याशिवाय कांहीं जहागीरदार व ज्यांना इंग्रजी अंमलामुळें थोडी तरी तोशीस सोसावी लागली होती असे लोक बंडखोरांना येऊन मिळाले. याप्रमाणें बंडाला भर येऊं लागला व त्याचें स्वरूप अधिकाधिक भयानक होऊं लागलें. जागोजाग लूट होऊं लागली. किरिस्तांव लोक प्राणास मुकूं लागले आणि इंग्रजांशीं युद्ध करण्याकरितां कांहीं सामान्य व सन्मान्य लोक शिपायांना येऊन मिळूं लागले.

जाहीरनामा वांटला जातांच सर्व लोक चवताळून इंग्रजांवर तुटून पडले. सोमवारीं म्हणजे ता. ८ जूनला गंगेच्या कालव्याच्या दक्षिणेस मुसलमानांचा हिरवा

झेंडा फडकूं लागला. या झेंड्याखालीं उभे राहून मौलवी विधर्मियांचे अवगुण वर्णन करून सांगूं लागले व त्यांचें पारिपत्य आणि नाश करण्याच्या युक्त्या सुचवूं लागले. कानपूरचे गोरे शिपायांच्या चक्रव्यूहांत पूर्णपणें सांपडले, व त्यांचा नाश—प्रथम हालहाल व अखेर मृत्यू—समोर स्पष्ट दिसूं लागला.

त्या वेढयांत गोरे शिपाईच केवळ सांपडले होते असें नव्हे, तर लढाईचा सराव नसलेले मुलकी अधिकारी व हत्याराशीं परिचय नसलेले गोरे व्यापारी, आणि त्यांच्या नाजुक स्त्रिया व सुकुमार बालकें देखील त्या आपत्तींत सांपडलीं होतीं. कानपूरच्या बंडांत सांपडलेल्या गोऱ्या स्त्रियांची ही परीक्षेची वेळ होती. सहज सुकुमार स्त्रीहृदय ! एखाद्या धटिंगणानें जोरानें दरडावलें कीं थरथर कांपायला लागणारी भित्री स्त्री जात ! ती तोफांचा गडगडाट ऐकून गर्भगळित झाल्यास नवल काय ? पहिल्यानें गोऱ्या स्त्रिया तोफांचा मारा होतांना पाहून घाबरल्या, रडल्या, ओरडल्या, व कोनाकोपऱ्यांत दडून बसल्या. पण लवकरच त्यांच्या अंगांत अननुभूत धैर्यानें संचार केला. त्या आपले मोजे उत्तेजनार्थ शिपायांना देऊं लागल्या, घायाळांची शुश्रूषा करूं लागल्या, व शिपायांना अन्नपाणी पोहोंचवूं लागल्या. एवढेंच नव्हे तर छावणींत कांहीं कैदी होते, त्यांच्यावर नंग्या तरवारीचा खडा पहाराही देऊं लागल्या. गोऱ्या स्त्रियांचें हें धाडस प्रशंसनीय नाहीं का ? त्यांना करतां येण्यासारखीं सर्व कामें त्यांनीं उचललीं, व पुरुषांना लढाईकरितां मोकळे केले; एवढेंच नव्हे तर त्यांनीं सर्व पुरुषांत वीरवृत्ति जागृत केली.

व्हीलर साहेब आशातीत नेत्रांनीं मदतीची वाट पहात होता. त्याला बळकट आशा होती कीं पंजाबांतून सर जॉन लॉरेन्स कुमक पाठवील, लखनौहून सर हेनरी लॉरेन्स साहाय्य करील, किंवा अलाहाबादेहून नील साहेब स्वतः मदतीला येईल. पण या आशा जागच्या जागींच जिरल्या. सर जान लॉरेन्सचें पत्र आलें कीं, 'पंजाबचें रक्षण करायलाच मजजवळ पुरेशी सेना नाहीं तर मी मदत कोणाकोणाला आणि कशी करूं शकणार ? ' १४ जूनपर्यंत नील साहेब अलाहाबादेहून खास येईल असें व्हीलरला वाटत होतें, पण नीलचें येणें न होतां १४ जून निघून गेली. तेव्हां संध्याकाळीं लखनौचा जज्ज गोवेन याला त्यानें पत्र लिहिलें. त्यांत तो म्हणतो—" आम्ही कानपूरचे इंग्रज लोक चारी बाजूला मातीची भिंत असलेल्या तात्पुरत्या हंगामी कोटांत आहोंत. आतांपर्यंत आम्ही सुरक्षित आहोंत खरे, पण आम्ही सुखरूप कसे राहिलों याचेंच आश्चर्य वाटतें. या वेळीं आम्हाला

कोणी तरी एकाच गोष्टीची भीक घालावी. ती भिक्षा म्हणजे मदत! मदत!! मदत!!! आज जर आम्हाला दोनशें लोक येऊन मिळतील तर आम्ही खात्रीनें शत्रूला पिटाळून लावूं." पण व्हीलरनें असें काकुळतीचें पत्र लिहूनही माणसें आलीं नाहींत. तेव्हां व्हीलरसाहेब अगदीं निराश झाला. आपल्यापुढें कसलें ताट वाढून ठेविलें आहे हें त्याला कळून चुकलें. पण कांहीं झालें तरी प्रसंगाला तोंड देतांना वीरोचित वागणूकच ठेवावयाची, या निश्चयानें सर्व इंग्रजांनीं कुडींत प्राण असे तों लढण्याचें ठरविलें.

याप्रमाणें एक आठवडा निघून गेला. या आठवड्यानंतर इंग्रजांवर निराळाच गहजब गुदरला. किल्लेकोटांतील फक्त एका घरावर कौलांचें छप्पर होतें. या घरांत जखमी शिपाई व इतर म्हातारे कोतारे, रोगी व असहाय लोक आणि बायका मुलें राहत असत. एक दिवस तोफेच्या गोळ्यामुळें या घराला आग लागली. तेव्हां त्यांत असणाऱ्या असहाय, व रोगी लोकांवर भयकर संकट ओढवलें. इकडे शिपायांनीं पाहिलें कीं कोटांतील घराला आग लागली आहे, तेव्हां त्यांनीं मुद्दाम त्याच बाजूला गोळे टाकणें चालू ठेविलें. यामुळें आग भडकली व रात्र झाली तरी आगीच्या उजेडाच्या साह्यानें, त्यांच्यावर बंदुकांच्या गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला. त्यामुळें तें दवाखानेवजा घर जमीनदोस्त झालें. औषधांचा सांठा आणि वैद्यकीचीं शस्त्रें पार जळून गेलीं. आतां रोग्याला औषध मिळेना, व गोळ्या अंगात शिरल्या तरी त्या काढतां येईनात. अशा अनुकंपनीय स्थितींत सांपडलेल्या जखमी परंतु शूर शिपायांनीं तें इस्पितळ भरून गेलें. त्या असहनीय वेदनांमुळें शिपाई पटापट मरूं लागले. जखमांच्या वेदनापेक्षां मरण पुरवलें असें त्यांना वाटूं लागलें.

जें घर जळून राख झालें त्यांत कांहीं हिंदी शिपाईही होते. पूर्वीं सांगितलेला ३५ व्या पलटणीचा सुभेदार भवानीसिंहही येथेंच होता. शिपायांचीं मनें बंडापासून निवृत्त करीत असतां शिपायांनीं त्याला घायाळ केलें होतें. आणि त्याला तसेंच टाकून ते निघून गेले होते. गोरे शिपाई त्याला आपल्याबरोबर कोटांत घेऊन आले होते. शिवाय कांहीं राजभक्त हिंदुस्थानी शिपाईही येथें होते, तें निवाऱ्याचें एक घर जळून गेल्यामुळें त्यांना रहायला जागा नाहींशी झाली. खाण्यापिण्याचें सामान संपून गेलें होतें. तेव्हां सेनापतीनें त्यांना आपापल्या घरीं जाण्याची आज्ञा केली. हे हिंदी शिपाई सुमारें शंभर होते. त्यांना वाटखर्चाला कांहीं रुपये आणि एक एक पत्र देऊन रवाना करण्यांत आलें. यांपैकीं

कांहीं लोक बंडखोरांच्या हातीं सांपडून मारले गेले. हे हिंदी शिपाई सरळ घरीं गेले. वाटेंत त्यांना बंडखोरांनीं अडविलें, व आपलेकडे वळविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. ते अत्यंत इमानी स्वामिभक्त होते. त्यांनीं सरळ आपल्या घरीं जावयाला मिळावें म्हणून आपल्या देशबांधवांवर देखील शस्त्र उपसलें. त्या चकमकींत कांहीं लोक मेले देखील, पण त्यांनीं आपल्या धन्याविरुद्ध बंड केलें नाहीं. अशा एकनिष्ठ स्वामिभक्त शिपायांना देखील व्हीलर साहेबानें अखेरीस निरुपाय म्हणून घालवून लाविलें. ते शिपाई जर युद्धक्षेत्रांत हजर असते तर त्यांची इंग्रजांना मदतच झाली असती.

इंग्रजांचे शिपाई दिवसेंदिवस कमी कमी होऊं लागले. जे उरले, तेही कोणी लंगडे झाले, तर कोणाचे हात तुटले. बंडखोरांच्या अव्याहत भडिमारामुळें बापाला आपल्या मुलांचें प्राणोत्क्रमण उघड्या डोळ्यांनीं पहाण्याचे प्रसंग येत कधीं कधीं तोफांच्या गोळ्यांमुळें आपल्या देखत आपल्या स्त्रीपुत्रादिकांचीं शरीरें छिन्नविच्छिन्न झालेलीं पहावीं लागत. भिंतीच्या बाहेरच्या बाजूस जवळच एक विहीर होती. तींत सर्व प्रेतें टाकून देत. दिवसाढवळ्या प्रेतें तशींच पडून रहात, आणि रात्रीच्या पांघरुणाखालीं दडवून स्त्रिया, मुलें, शिपाई इत्यादि सर्वांचीं प्रेतें त्या कबरीवजा विहिरींत लोटून दिलीं जात.

इंग्रजांच्या तोफांचा कांहींच परिणाम होत नव्हता असें नाहीं. त्यांच्या तोफा आणि बंदुकींच्या गोळ्यांनीं बंडखोरांचीही बरीच हानि झाली. पण बंडवाल्यांचें मनुष्यबळ भरपूर असल्यामुळें जे जे मरत त्यांची जागा दुसरे लोक भरून काढीत. अजमगडचें १७ नं. चें पायदळ त्यांना येऊन मिळालें. कानपुराजवळ चौबेपुर नांवाचें एक गांव होतें. तेथें लखनौचे कांहीं पायदळ आणि घोडेस्वार होते. तेदेखील बंडखोरांना मिळाले. मीर नबाब नांवाचा एक तालुकेदार होता. डलहौसी लहान मोठीं संस्थानें आपल्या घशांत कोंबत होता, त्याच वेळीं या मीर नबाबानें गुप्तपणें सैन्याच्या उभारणीस सुरवात केली होती. तोही आतां नानासाहेबाला सामिल झाला. याप्रमाणें क्षणोक्षणीं बंडखोरांना मदत मिळत गेल्यामुळें त्यांची शक्ति कायम राहिली. उलटपक्षीं इंग्रजांना मुळींच मदत मिळाली नाहीं; शिवाय रोजच्यारोज त्यांचे थोडथोडे शिपाई गारद किंवा निकामी होऊं लागले. त्यामुळें त्यांची शक्ती झपाट्यानें संपुष्टांत येऊं लागली.

शंभर वर्षांपूर्वी लॉर्ड क्लाइव्हनें बंगालच्या नबाबी फौजेला जसें दांतीं तृण धरून शरण आणलें, तसें इंग्रजी सेनेला त्राहि त्राहि करावयाला लावावें, अशी बंडखोरांची महत्वाकांक्षा होती. त्याकरितां पायदळ आणि घोडदळ, दोघांनीं मिळून चोहींकडून एकदम हल्ला केला. पण या हल्ल्यांत त्यांची सरशी झाली नाहीं. इंग्रज अगदीं मेटाकुटीस आले होते तरी ते रणकुशल होते. त्यांनीं चातुर्यानें शिपायांवर तोफांचा मारा केला. त्या माऱ्यापुढें शिपाई टिकले नाहींत; ते परत गेले. याप्रमाणें ता. २३ ला इंग्रजांनीं बंडखोरांचा निकराचा हल्ला परतविला, आणि आपलें रक्षण केलें. बंडखोर आतां वारंवार अशी लगट करूं लागले होते, व इंग्रजांना कोठूनही मदत येण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां ता. २४ जूनला एक गोरा शिपाई मदतीसाठीं निकडीचा निरोप घेऊन, वेष बदलून अलाहाबादेस जावयास निघाला. परंतु बंडखोरांच्या वेढयांतून तो पलीकडे जाऊं शकला नाहीं, म्हणून छावणींत परत आला. दुसरा एक साहेब वेष बदलून बाहेर जाण्यास निघाला, पण बंडखोरांनीं त्याला कैद करून तीन वर्षांची शिक्षा ठोठावली. याप्रमाणें कानपूरच्या इंग्रजांना दुर्दैवानें पूर्णपणें पछाडिलें होतें, त्यांचा प्रत्येक प्रयत्न फुकट जाऊं लागला. संकटकालीं अगदीं प्राणांवर नौबत बेतली, तरी मनुष्याला आशा सोडीत नाहीं. हा आशेचा ततूच मनुष्याला धीर देत असतो. कानपूरच्या इंग्रजांचा हा आशातंतू म्हणजे अलाहाबादेहून येऊं घातलेली मदत होय. अलाहाबादेकडे डोळे लावून हे लोक आशाळभूत नेत्रांनीं तिकडे पहात होते. पण दिवसामागून दिवस निघून गेले, तरी अलाहाबादेकडून कोणीच आलें नाहीं. इंग्रजांची रसद संपली. खाण्यापिण्याचें सामान त्यांना पुरविण्याचा प्रयत्न कांहीं हिंदुस्थानी लोकांनीं केला, पण तो फुकट गेला. डबल रोट्या घेऊन जाणाऱ्या एका गाडीवाल्याला बंडखोरांनीं पकडलें. जोहरी नांवाच्या अबकारी खात्याचा एक अधिकारी संधी साधून रोट्या, लोणी आणि अंडीं इंग्रजी छावणींत गुपचुप पाठवून देई. १४ जूनला याप्रमाणें सामान नेत असलेलीं पंधरा माणसें धरलीं गेलीं. त्यांत दोन बायकाही होत्या. या सर्वांना शिपायांनीं तोफेच्या तोंडीं दिलें. पण त्यांनीं जौहरीचें नांव सांगितलें नाहीं. याप्रमाणें कांहीं हिंदुस्थानी लोक प्राणांची पर्वा न करितां इंग्रजांना मदत करीत होते. वेढयांत सांपडलेले इंग्रज भूक शमविण्याकरितां घोडे आणि बैल मारूं लागले. त्यांना पिण्याचें पाणी जवळच्या एका विहिरींतून मिळत असे. तोफेच्या गोळयानें एक दिवस विहिरीच्या पाळीची भिंत पडली. पाळीचा आडोसा नाहींसा झाल्यामुळें तेव्हां पाणी भरायला जाणारे बंडखोरांच्या

गोळ्यांना अचूक बळी पडूं लागले. रात्रीं देखील निर्वेधपणें पाणी भरणें अशक्य झालें. पाणी भरण्याचा आवाज होतांच त्या बाजूला गोळ्यांचा वर्षाव होई. यामुळें अर्धपोटी आणि तृषार्त स्थितींत राहण्याचा इंग्रजांवर प्रसंग आला. अशा विपद्ग्रस्त स्थितींत तीन आठवडे निघून गेले. इंग्रजांकडील अडीचशें माणसांना विहिरींत समाधी मिळाली; माणसें मेलीं; रात्रंदिवस तोफांचा भडिमार चालू असल्यामुळें तोफा फुटल्या; दारुगोळा संपला; रसद संपली पण मदत आली नाहीं. भूक व तहानेमुळें व्याकुळ झालेले ते लोक किती दिवस टिकाव धरणार ? बंडखोरांची कोंडी फोडून बायका मुलांना घेऊन जाणें शक्य नव्हतें. त्यांच्याबरोबर बायकामुलांचें लटांबर नसतें, तर त्यांनीं हिंमतीनें बंडवाल्यांची फळी फोडण्याचा प्रयत्न केला असता. परंतु बायकामुलांची बेडी त्यांच्या पायांत पडली होती. अशा हालअपेष्टांत दिवस काढीत असतां एक ख्रिस्ती बाई भिंतीजवळ आली. तिला पाहतांच एका गोऱ्या शिपायानें तिच्यावर बंदुकीचा नेम धरिला. थामसन साहेबानें त्याला अडविलें. चौकशीनंतर त्यांना कळलें कीं ती स्त्री नानासाहेबांकडून पत्र घेऊन आली होती. त्यांत लिहिलें होतें—"महाराणी व्हिक्टोरियाचे प्रजाजन जर हत्यारें खालीं ठेवतील व कोट आमच्या स्वाधीन करतील, तर त्यांना सुरक्षितपणें अलाहाबादेला जाऊं देऊं." हें पत्र अजीमुल्लाच्या हातचें होतें. पत्रावर सही नव्हती. सेनापति व्हीलर शरण जावयाला तयार झाला नाहीं. कारण नाना किंवा अजीमुल्ला यांपैकीं कोणावरही त्याचा विश्वास उरला नव्हता. सर्व इंग्रज शेवटपर्यंत युद्ध करावयाची सल्ला देऊं लागले. व्हीलरनें कॅप्टन मूर व व्हीटिंग या दोघांची सल्ला घेतली. त्या दोघांचें मत असें पडलें कीं, "आमच्याबरोबर स्त्रिया, मुलें आणि आजारी लोक नसते तर आम्ही शेवटपर्यंत युद्ध केलें असतें. आमच्यापैकीं एका शिपायाच्या जिवांत जीव असेतों आम्ही लढलों असतों. पण सध्याची स्थिती बिकट आहे. यावेळीं बायकामुलांच्या रक्षणाचा एकही उपाय शिल्लक राहिलेला नाहीं. आतां आम्ही शरण गेलों नाहीं तर यांचें पुढें कसें होणार ? म्हणून यावेळीं शरण जाणें हाच एक मार्ग उरला आहे." तेव्हां सेनापतीनें त्या स्त्रीबरोबर उलट निरोप पाठविला कीं, आम्ही आमच्या अधिकारीवर्गाशीं सल्लामसलत करून मग काय ठरेल तें उत्तर देऊं. म्हणून तारीख २५ ला शिपायांनीं इंग्रजांवर गोळ्या सोडिल्या नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं नानासाहेबांचें घोडदळ घेऊन ज्वालाप्रसाद इंग्रजांच्या आश्रयस्थानाकडे गेला. इंग्रजांतर्फे कॅप्टन मूर, व्हीटिंग व पोष्टाचे रोडे साहेब शिष्टाईकरितां गेले.

त्यांत असें ठरलें कीं, इंग्रजांनीं शस्त्रास्त्रें, तोफा, बंदुकी, रुपया पैसा सर्व येथल्या येथें टाकून द्यावें. फक्त एक एक बंदुक आणि साठ साठ काडतुसें प्रत्येकानें वाटल्यास आपल्या बरोबर घ्यावीं. नानासाहेब त्यांना सुरक्षितपणें गंगेपर्यंत पोहोंचवितील. तेथें नावा आहेत, व खावयाला कणीक मिळेल. यावेळीं अजीमुल्ला आणि ज्वालाप्रसाद म्हणाले, आम्ही बकऱ्या आणि मेंढयाही देऊं. हा करार इंग्रजांनीं कबूल करून अजीमुल्ला आणि ज्वालाप्रसादाच्या हातीं दिला. तिसऱ्या प्रहरीं एका स्वारानें इंग्रजांना येऊन सांगितलें कीं नानासाहेबाला तुमचा करार मंजूर आहे; आज रात्रीं तुम्ही हें ठिकाण रिकामें करा, व प्रयागाचा रस्ता धरा.

म्हाताऱ्या सेनापतीनें त्यावर आक्षेप घेतला कीं आम्ही बायकामुलांना घेऊन रात्रीचा प्रवास कसा करणार? स्वार परत जाऊन आला आणि म्हणाला, 'नानासाहेबांना तुमची बित्तंबातमी आहे. तुम्ही आपल्या दुर्दशेचा विचार करा. या सवलतीचा फायदा कां घेत नाहीं? त्यांनीं पुन्हां तोफा डागल्या तर तुमची धडगत नाहीं. तुम्हाला आंतल्या आंत उदराप्रमाणें मरावें लागेल.' पण असल्या दरडावणीला भीक घालण्यास इंग्रज तयार नव्हते. त्यांनीं त्यावर स्पष्टच सांगितलें कीं, "आम्ही वीरांसारखे लढत लढत खुशाल मरूं पण रात्रीच्या वेळीं प्रवास करणार नाहीं, आणि आपलें स्थानही सोडणार नाहीं." तेव्हां स्वार परत गेला, आणि पुन्हा परत येऊन म्हणाला, "नानासाहेबाला तुमचें म्हणणें कबूल आहे. तुम्ही सर्वजण उद्यां सकाळीं अलाहाबादला जावयाला तयार असा." बंडखोरांपैकीं तिघेजण रात्रीं इंग्रजांच्या कँपांत ओलीस म्हणून येऊन राहिले. त्यांपैकीं एक ज्वालाप्रसाद होता. त्यानें वरवर तरी वृद्ध सेनापतीविषयीं फार आदर दाखविला. बरेच दिवस शिपायांवर प्रभुत्व गाजविल्यानंतर आतां त्याच शिपायांकडून अपमानित व्हावें लागलें, याबद्दल त्यानें सहानुभूति प्रगट केली. सूर्यास्तानंतर थोड्या वेळानें इंग्रजांनीं आपल्या तोफा बंडखोरांच्या हवालीं केल्या. बंडखोरांचे हस्तक रात्रभर तोफांपाशीं उभे होते. गंगेवर नावा तयार आहेत किंवा नाहीं, हें पाहाण्याकरितां तीन इंग्रज शिपाई हत्तीवर बसून गंगेवर गेले. त्यांच्या बरोबर कित्येक देशी घोडेस्वारही गेले. घाटावर जाऊन पाहिलें कीं, जवळ जवळ चाळीस नावा नदीवर तयार आहेत. त्यांपैकीं कांहींवर छायेकरितां आच्छादन होतें. बाकीच्यांचीं छपरें तयार केलीं जात होतीं; खाण्यापिण्याचें सामानही येत होतें. ही सर्व तयारी पाहून त्यांच्या मनांत संशयाचा मागमूसदेखील राहिला नाहीं. इंग्रजांबरोबर जे स्वार आले

होते त्यांनींदेखील वाटेनें कांहीं अनुचितपणा केला नाहीं. ते सुरक्षितपणें आपल्या छावणींत परत आले. यानंतर टॉड नांवाचा एक साहेब तहाचा करारनामा घेऊन सवेदा कोठींत नानासाहेबाकडे गेला. हा टॉड पूर्वी नानासाहेबाला इंग्रजी शिकवीत असे. नानासाहेबानें आपल्या गुरूच्या सत्कारांत कोणतीही उणीव राहूं दिली नाहीं. करारनाम्यावर सही करून नानासाहेबानें तो टॉडला परत दिला. टॉड नानासाहेबांची गुरुभक्ति पाहून खूश होऊन छावणींत परत आला.

२७ जून रोजीं सकाळीं इंग्रज अलाहाबादेस जाण्याची तयारी करूं लागले. लवकरच आपली मुक्तता होणार म्हणून ते अवश्य वस्तूंची बांधाबांध करूं लागले. कोणीं बहुमूल्य दागिन्यांच्या पेट्या गुप्तपणें काढिल्या, कोणी मनास शांति देणारें बायबल आपल्याबरोबर घेतलें, तर कोणीं आपलीं पिस्तुलें घेऊन बाहेर पडला. इंग्रजांच्या निराशेनें उतरलेल्या आणि कष्टामुळें वाळलेल्या चेहेऱ्यावर पुन्हां आशेची टवटवी दिसूं लागली. ज्या ठिकाणीं त्यांनीं अवर्णनीय कष्ट भोगिले होते, तेथून गंगेपर्यंत जावयाला त्यांच्याकरितां पालख्या आणि हत्ती तयार होते. जे इंग्रज अजूनही धडधाकट होते, ते कमरेला पिस्तूल बांधून आणि खांद्यावर बंदूक ठेवून बाहेर पडले. आजारी माणसें आणि बायका पालखींत बसल्या. सर्वजण मिळून यावेळीं साडेचारशें इंग्रज व निमगोरे गंगेच्या कांठीं जाण्यास निघाले. त्यांना पहावयाला शहरवासीयांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या. त्यांचीं म्लान वदनें आणि फाटून चिंध्या झालेले कपडे पाहून बहुतेकांना दुःख झालें, कित्येकांना त्यांची कींव आली आणि कित्येक तर पूर्वीपेक्षां अधिकच त्यांच्यावर रागावले. इतक्या थोड्या लोकांनीं इतके दिवस आपल्याला दाद दिली नाहीं व आपल्याशीं शौर्यानें झुंज घेतली, ही जाणीव असल्यामुळें शिपायांना लाज वाटली व इंग्रजांच्या पराक्रमाचा संताप व हेवा वाटला. वृद्ध सेनापती व्हीलरसाहेब आपल्या पत्नी आणि कन्येबरोबर पायींच गंगेवर जावयाला निघाले.

गंगेच्या सतीचोर नांवाच्या घाटावर नावा तयार होत्या. इंग्रजांच्या आश्रयस्थानापासून हा गंगेचा घाट सुमारें एक मैलावर होता. घाटावर महादेवाचें एक मंदिर होतें आणि जवळच सतीचोर गांव होता. घाटावर जायला एक लहानसा लाकडी पूल ओलांडावा लागे. घाटावर जाण्याकरितां इंग्रज हा पूल ओलांडूं लागले. देशी शिपाई त्यांना वेढ्यांतील अनेकविध वार्ता विचारूं लागले. आपल्या जुन्या अधिकाऱ्यांच्या मृत्यूबद्दल त्यांनीं दुःख प्रगट केलें, व भोगलेल्या विपत्तीनंतर त्यांचा पुढला प्रवास सुखाचा व्हावा अशी इच्छा कित्येक शिपायांनीं प्रदर्शित केली.

त्यावेळीं गंगेला पाणी फार नव्हतें. उन्हाळ्यामुळें नदीच्या पात्रांत जागोजाग वाळूचीं बेटें तयार झालीं होतीं. कांठाजवळ पाणी खोल नसल्यामुळें नावा कांठाजवळ येऊं शकत नव्हत्या, आणि कांठावरून नावेंत जाण्याकरितां दोरांच्या शिड्या किंवा तशी दुसरी कांहींही सोय केली नव्हती. म्हणून इंग्रजांपैकीं जीं धडधाकट माणसें होतीं, तीं गुडघ्याइतक्या पाण्यांत उभीं राहून बायकांना, मुलांना आणि रोग्यांना उचलून नावेवर बसवीत होतीं. नवाच्या सुमारास सर्व लोक नावांवर जाऊन बसले. टीकासिंग, तात्याटोपी आणि अजीमुल्ला असे तिघे घाटावरील मंदिराजवळ उभे राहून हा तमाशा पहात होते. घोडेस्वार कांठावर उभे होते. पायदळ आणि गोलंदाजही कांठावर गोळा झाले होते. परंतु हे सर्व शिपाई फार वेळ शांत राहिले नाहींत. एकाएकीं बिगुलाचा आवाज झाला, आणि गंगेच्या प्रवाहांतच रक्ताचा प्रवाह वाहूं लागला.

नावांतून बसलेले इंग्रज बिगुल ऐकून आश्चर्यचकित झाले. त्यांना त्याचा अर्थच कळेना. क्षणार्धांत त्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला. बिगुल ऐकतांच नावाडी नावावरून उड्या मारून कांठावर निघून गेले. नावांच्या छप्परांवर निखारे टाकून ठेविले होते, असें दिसतें. कांठावरून गोळीबार होऊं लागला आणि इकडे नावांना आग लागली. बंडवाल्यांच्या छावणीच्या रक्षणासाठीं, व नदी उतरून एकाएकीं प्रयाग लखनौच्या इंग्रजांचा हल्ला होऊं नये म्हणून, बंदोबस्ताकरितां नदीच्या कांठावर तोफांचे मोर्चे बांधून ठेविले होते. त्या तोफांचे गोळे या नावांवर येऊन आदळूं लागले. तेव्हां इंग्रजांची किती दुर्दशा झाली असेल बरें ? त्यांना स्वप्नांतही वाटलें नसेल कीं आपणांस असा दगा होईल. रोगी आणि जखमी शिपाई, तशींच कित्येक मुलें आगींत जळून मेलीं. बायकांनीं आपापल्या मुलांना पोटाशीं धरून नदींत उड्या टाकिल्या, पण त्यांपैकीं कोणीही बचावलें नाहीं. घोडेस्वारांनीं आपले घोडे गंगेंत दामटले आणि प्राणरक्षणाकरितां धडपडत असलेल्या त्या अबलांना आणि अर्भकांना, त्या निर्दयांनीं नामर्दपणें मारून टाकिलें ! गंगेचें पाणी असहाय, निर्दोष आणि निरुपद्रवी लोकांच्या रक्तानें रंगलें ! जे लोक कसे बसे कांठावर पोहोंचले त्यांना पायदळ शिपायांनीं संगीनी भोसकून ठार केलें. बंडखोर शिपायांना पाषाणहृदयी म्हणण्यापेक्षां, त्यांना हृदयच नव्हतें, असें म्हटलें, तर तें अधिक शोभेल ! त्यांना दया शिवलीदेखील नाहीं !! ऐंशी वर्षांवर वय झालेल्या वृद्ध सेनापतीलाही

त्यांनीं कंठस्नान घातलें. याप्रमाणें अत्यंत नीचपणानें दगाबाजी करून त्या दुष्टांनीं बायकामुलांसकट सर्वांचा संहार चालविला.

ज्या वेळीं गंगेच्या कांठीं हा अत्याचार चालू होता त्या वेळीं नानासाहेब आपल्या डेऱ्यांत होते. तोफांचा आवाज ऐकून त्यांनीं ताडलें कीं शिपायांनीं पुन्हां युद्ध सुरू केलें. भांडणास कोणतें नवें कारण घडलें व झालेल्या झटापटींत काय होतें, हें जाणण्याच्या उत्सुकतेनें ते आपल्या तंबूंतच येरझारा घालूं लागले. थोड्या वेळानें एक जासूद आला आणि त्यानें सतीचोर घाटावरच्या घटनेचा पाढा त्यांच्यासमोर वाचला. बायका व मुलें मारलीं गेलीं हें ऐकून त्यांना फार वाईट वाटलें, आणि त्यांनीं कत्तल एकदम थांबविण्याचा व जीं बायकामुलें वांचलीं असतील त्यांना कैद करण्याचा हुकूम सोडिला. या हुकमाप्रमाणें १२५ माणसें कैद झालीं. ज्या रस्त्यानें कांहीं वेळापूर्वीं हीं माणसें, जीव वांचवून लवकरच आपल्या माणसांत जाऊन पडण्याच्या उल्हासानें हत्तीवरून व पालखीवरून गेलीं होतीं, त्याच रस्त्यानें तीं आतां जिवाविषयीं निराश होऊन, व यापुढें कोणकोणतीं संकटें येतील त्याविषयीं चिंतातुर होऊन, खिन्नवदनानें अधोमुख होऊन चाललीं. यांपैकीं कित्येक जखमी झाले होते, कित्येकांचे कपडे पाण्यानें ओलेचिंब झाले होते आणि कित्येकांचे चिखलानें माखले होते. त्यांच्या चेहऱ्यावरून असें दिसत होतें कीं, पुढें ओढवणाऱ्या संकटांत जाऊन पडण्यापेक्षां सोबत्यांबरोबर आम्ही कत्तलींत मेलों असतों तर बरें झालें असतें!

फक्त एका नावेला आग लागली नव्हती व ही नाव फार वजनदारही नव्हती. त्यामुळें तींत बसलेल्या इंग्रजांनीं, ही नाव मोठ्या शिताफीनें ढकलत ढकलत नेऊन गंगेच्या धारेंत सोडली. या नावेवर कॅप्टन टॉमसन, मूर, डीलाफोसी इत्यादि लोक होते. ही नाव गंगेच्या धारेंत वहात चालली असतां, कांठावरच्या शिपायांनीं या नावेवर गोळ्यांचा वर्षाव चालू ठेविला. नावेंतल्या लोकानीं त्या गोळीबारापासून स्वतःचें रक्षण करण्याची शक्य तेवढी खटपट केली. नावाडी नदींत उड्या टाकून निघून गेले, तेव्हां त्यांनीं वल्हीं वगैरे सामानही आपल्याबरोबर नेलें होतें. यामुळें नावेला आपल्या मनाप्रमाणें वळविणें अशक्य होतें. गंगेची धार जिकडे नेईल तिकडे जाणें नावेंतील इंग्रजांना भाग होतें. शिवाय जातीचे नावाडी नसल्यामुळें, त्या लोकांना नाव वेगानें हांकतां येणेंही अशक्य होतें. यामुळें कांठावरून होत असलेला गोळीबार त्यांना फारसा चुकवितां आला नाहीं. त्या गोळीबाराला कॅप्टन मूर व त्याचा सोबती बळी पडले. तेव्हां नावेंतल्या लोकांनीं त्यांचीं प्रेतें गंगेच्या प्रवाहांत सोडून दिलीं. अशा रीतीनें गंगेची धार नेईल तिकडे ही नाव जात असतां, वाटेंत ही नाव उथळ

पाण्यांत वाळूंत रुतून बसे. असें झालें म्हणजे नावेंतले सर्व लोक नदींत उतरत आणि तिला पुन्हां खोल पाण्यांत ढकलत. हा प्रवास चालू असतां नावेंतले प्रवासी देवाला सारखी करुणा भाकत कीं, देवा आमच्यावर आतां तरी दया कर आणि जोराचा पाऊस पडूं दे. कानपूरच्या कोटामध्यें असतांना हे लोक याच्या अगदीं उलट प्रार्थना देवाला करीत होते. त्यावेळीं जोराचा पाऊस पडता, तर त्यांची मातीची भिंत पावसाळ्यांत विरघळून जाती. पण आतां पाऊस नसल्यामुळें गंगेला पूर आला नव्हता; आणि म्हणूनच या लोकांना प्रवासांत अतिशय त्रास होत होता. तोच जोराचा पाऊस पडला असता म्हणजे गंगेच्या मोठ्या पुरांत ही नाव हां हां म्हणतां अलाहाबादेस पोहोंचली असती. पण प्रवासाचा पहिला दिवस कोरडाच गेला. कांठावरील शिपाई या प्रवाशांच्या कष्टांत भरच टाकीत राहिले. दुसरे दिवशीं म्हणजे ता. २८ जूनला ही नाव कानपुराजवळ असलेल्या अजफगडाला आली, आणि पुन्हां रेताडांत रुतली. नावेवर पुन्हां गोळीबार सुरू झाला. नदीच्या कांठावर एक तोफ आणण्यांत आली आणि शिपायांनीं तिचा मारा नावेवर करण्याचा विचार केला. पण देवानेंच खैर केली. कारण याच वेळीं असा जोराचा पाऊस पडूं लागला कीं, कांठावरच्या बंडखोरांना आपलें काम थांबवावें लागलें. संध्याकाळच्या सुमारास कानपुराहून कांहीं बंडखोर नावेंत बसून यांच्या मागावर आले. त्यांनीं गोऱ्या लोकांवर जोराचा हल्ला केला. यामुळें नावेंतील आणखी कांहीं लोक मेले. पण इंग्रजांनीं या संकटपरंपरेमुळें हताश न होतां बंडखोरांच्या नावेवर उलट हल्ला केला आणि आपल्या पराक्रमानें बंडखोरांना जेरीस आणून त्यांच्या नावेवर आपला कबजा केला. या नावेवर गोऱ्या शिपायांना दारुगोळा बराच सांपडला. हें एक त्यांच्या पथ्यावर पडलें. पण त्यांना दुसरी अत्यंत आवश्यक असलेली वस्तु म्हणजे खाद्य, तें मात्र सांपडलें नाहीं. यामुळें आतां त्यांचे प्राण भुकेनें व्याकुळ होऊं लागले. पण उपाय नसल्यानें ते तसेच स्वस्थ पडून राहिले.

अशा स्थितींत रात्र झाली. भुकेनें व्याकुळ झालेले आणि निकराचा हल्ला करून थकलेले गोरे शिपाई झोपीं गेले. झोपेंत असतांनाच जोराचा वारा सुटला आणि नाव वाऱ्याबरोबर वाहूं लागली. सकाळीं गोरे शिपाई जागे होऊन पहातात तों त्यांची नाव दुसऱ्याच एका ठिकाणीं अडकून पडली आहे. नदीच्या कांठावर लोकांची बरीच गर्दी जमली आहे, आणि त्यांची क्षुब्धता क्षणोक्षणीं वाढत आहे, असें त्यांच्या नजरेस पडलें. कांठावरच्या लोकांची ठाम समजूत झाली होती कीं इंग्रजांचें राज्य गेलें. आतां या इंग्रजांना पळून जाऊं देणें

चांगलें नाहीं. देशी राजाची प्रजा या नात्यानें, या इंग्रजांना मारणें किंवा कैद करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. अशा रीतीनें एकीकडून कांठावरचे लोक उठले आहेत, तोंच दुसऱ्या एका नावेंतून बंडखोर शिपाईही त्यांच्या मागोमाग आले. गोऱ्या शिपायांवर कहरच गुदरला! ते दोन दिवसांचे उपाशी होते, आणि उघड्यांत वारा पाऊस खाऊन व एकसारखे लढून जेरीस आले होते. नाव रुतल्यामुळें जें संकट आलें होतें तें निराळेंच. मागेंपुढें शत्रु व हे मध्यें कात्रींत सांपडले होते. अशा स्थितींतही त्या लोकांनीं मोठ्या धैर्यानें बंदुकी उचलल्या. वीरश्रीचा त्यांच्या आंगांत संचार झाला. या वेळीं नावेंतील इंग्रजांना आपल्या दोन तुकड्या करणें भाग होतें. चौदाजण कांठावरच्या लोकांचा समाचार घ्यावयाला निघाले, आणि बाकीचे नावेंतून येणाऱ्या बंडखोरांचा समाचार घेण्यास व आपल्या नावेचें रक्षण करण्यास सज्ज झाले.

कांठावर जाण्याकरितां जे लोक निघाले त्यांच्याबरोबर कॅप्टन थॉमसन होता. हे लोक किनाऱ्याच्या लोकांवर हल्ला करण्यांत गुंतले असतांना, इकडे लाटांमुळें त्यांची नांव धारेंत सांपडली आणि एकदम चालू झाली. थॅामसन आणि त्याच्या सोबत्यांनीं अविरत गोळ्यांचा वर्षाव केल्यामुळें कांठावरचे लोक मागें हटले आणि बरेच दूर निघून गेले. तेव्हां थॅामसन आपल्या सोबत्यासह नदीकांठीं परतून आला. पण तेथें पहातो तों नाव नाहीं! नावेंत असलेल्या लोकांचें काय झालें? नाव प्रवाहांत वाहून गेली कीं शत्रूंच्या हातांत सांपडली, हें थॅामसनला कळेना. ज्या ठिकाणीं हे लोक कांठावर उतरले होते, तेथील जमीनदार रामबक्श नांवाचा होता. त्याच्या लोकांनीं इंग्रज शिपायांची उडालेली त्रेधा पाहून त्यांच्यावर हल्ला केला. तेव्हां थामसनसाहेबानें पळ काढिला! पळत पळत तीन मैल दूर गेल्यावर त्याला एक मंदिर आढळलें. या मंदिरांत शिरून इंग्रज आपला बचाव करूं लागले. मंदिरांत त्यांना थंडगार पाणी मिळालें, तें पिऊन त्यांनीं आपली तहान भागविली. जमीनदाराच्या लोकांनीं मंदिराला वेढा दिला. चार गोरे शिपाई दरवाजावर उभे राहून, पुढें येणारांना संगीनी भोसकून ढकलून देत होते. दुसरे गोरे आंतून गोळीबार करूं लागले. तेव्हां लोकांनीं मंदिराच्या दाराजवळ लांकडें रचून त्यांना आग लाविली. धूर मंदिरांत कोंडून गोरे शिपाई गुदमरून बाहेर पडतील असें त्यांना वाटलें; पण वारा उलट दिशेनें वाहूं लागल्यामुळें जमीनदाराच्या लोकांनाच त्या धुराचा त्रास होऊं लागला. तेव्हां त्या लोकांनीं दारूच्या थैल्या मंदिराकडे फेकावयाला सुरवात केली. त्यामुळें गोऱ्या लोकांना मंदिरांत राहाणें अशक्य झालें. अतिशय धाडस करून ते मंदिराबाहेर पडले आणि विस्तव

ओलांडून, जमीनदाराच्या लोकांचा व्यूह भेदीत ते नदीकडे निघून गेले. चौदा लोकांपैकीं सातजण काय ते नदीवर पोहोंचले. बाकीचे वाटेंतच गणप्राण झाले. या सातांपैकीं तिघे नदीवरच मारले गेले. तेव्हां राहिलेल्या चौघांनीं आपलीं हत्यारें फेंकून दिलीं आणि नदींत उड्या घेतल्या. याप्रमाणें नदींतून पोहत जात असतां, कांठावरून कांहीं माणसें त्यांना बोलावीत असलेलीं त्यांनीं पाहिलीं तीं म्हणत होतीं, “साहेब, अहो साहेब! तुम्ही पोहून कोठें भलतीकडे चाललांत; इकडे या, आम्ही तुमचे मित्र आहोंत.” पण त्यांच्यावर इंग्रज विश्वास कसा ठेवणार ? त्यांचा विश्वास बसावा म्हणून हे लोक जेव्हां आपलीं हत्यारें नदींत फेकून द्यावयाला तयार झाले, एवढेंच नव्हे तर कांहीं जणांनीं आपलीं हत्यारें त्याप्रमाणें नदींत फेंकलीं देखील, तेव्हां गोऱ्या शिपायांना त्यांचें म्हणणें पटलें. नंतर ते कांठावर आले. किनाऱ्यावर उभे असलेले लोक अयोध्या प्रांतांतील दिग्विजयसिंह नांवाच्या तालुकदाराचे आश्रित होते. दिग्विजयसिंह इंग्रजांचा मित्र होता. त्याला कानपूरची हकीकत कर्णोपकर्णी कळलीच होती. त्यानें आपल्या लोकांना सांगून ठेविलें होतें कीं, विपत्तीनें ग्रस्त झालेले गोरे लोक तुम्हाला आढळले तर त्यांना तुम्ही मजजवळ घेऊन या. नदींतून बाहेर आलेल्या लोकांना नेण्याकरितां दिग्विजयसिंहानें आपला हत्ती पाठविला होता.

हत्तीवर बसून हे गोरे शिपाई तालुकदारापुढें हजर झाले, तेव्हां त्यांचें स्वागत मोठ्या आदरानें झालें. या चौघांपैकीं एक थॉमसनसाहेब होता. दिग्विजयसिंहानें थॉमसनच्या तोंडून सर्व हकीकत ऐकली, तेव्हां त्यानें चौघांचीही त्यांच्या पराक्रमाबद्दल तारीफ केली. नंतर त्यांना राहावयाला जागा देऊन दिग्विजयसिंहानें त्यांची चांगली बरदास्त ठेविली. त्यांना नवीन पोषाख दिले. त्यांचे घाव बांधून मलमपट्टी व औषधाची सोय केली. थामसनसाहेब या तालुकदाराचा पाहुणचार घेत तीन आठवडे तेथें राहिले. या अवधींत त्यांना कोणतीही उणीव भासली नाहीं. तीन वेळां स्वादिष्ट भोजन खावें आणि स्वस्थ आराम करीत पडावें. तालुकदार व त्याची बायको दोघेंही स्वतः जातीनें येऊन रोज यांचा समाचार घेत. जितके दिवस ते तेथें राहिले, तितके दिवस त्यांना दिग्विजयसिंहानें घराबाहेर पडूं दिलें नाहीं. कारण चारी बाजूंला बंडखोर शिपाई वावरत होते. ते इंग्रजांच्या रक्तपाताकरितां हपापलेले होते. शेजारच्या गांवांतूनही बंडखोर होतेच. म्हणून थॉमसन वगैरे गोऱ्या लोकांना घराबाहेर पडणें धोक्याचें होतें. त्यांच्या घराकडे बंडखोर फिरकूं शकत नव्हते. कारण दिग्विजयसिंहानें आपले सशस्त्र

लोक पहाऱ्यावर ठेविले होते व ते वाड्यावर सारखा खडा पहारा करीत. कानपूरच्या शिपायांना ही बातमी कळली, तेव्हां त्यांनीं दिग्विजयसिंहाला या लोकांना पाठवून देण्याविषयीं लिहिलें. परंतु त्यानें स्पष्ट नकार दिला, व शरणागतांचें रक्षण खऱ्या क्षत्रियाप्रमाणें केलें.

थॉमसनला व त्याच्या सोबत्यांना पकडून नेण्याकरितां जे शिपाई तालुकदाराजवळ येत, ते वाटेल तशा खोट्यानाट्या गप्पा देत. ते म्हणत कीं इंग्रजांचें राज्य नष्ट झालें, आणि आम्ही बहुतेक इंग्रजांना देशाबाहेर हांकलून दिलें आहे. राहिले साहिले गोरे लोक आमच्या कैदेंत खितपत पडले आहेत. अर्थातच या गटारगप्पांची किंमत थॉमसन साहेब ओळखून होता. तो स्पष्टपणें तालुकदाराला सांगे कीं घाबरूं नका, यांचें सगळें म्हणणें अक्षरन् अक्षर खोटें आहे; याची प्रचीति तुम्हाला लवकरच येईल. एक लाख गोरी फौज बंडखोरांचा समाचार घ्यावयाला रवाना झाली आहे. ती लवकरच येईल आणि तुमच्यांपैकीं एकेकाला हुडकून काढून, इंग्रजांचें राज्य बुडालें नाहीं अशी खात्री पटवील. शिपाई म्हणत, ' नानासाहेबांनीं रशियांतून मदत मागविली आहे. रशियापासून मदत मागावयाला गेलेले लोक उंटावरून तांतडीनें गेले आहेत. नानासाहेब सर्व इंग्रजांना कलकत्त्यास हांकलून देऊन हिंदुस्थानावर निष्कंटक राज्य करणार आहेत.' अशा गोष्टी ऐकल्या म्हणजे थॉमसनला हंसें येई आणि तो मनांत म्हणे, ' उंटावरचे शहाणे आहांत झालें. ' शिपायांचा मात्र दृढ विश्वास असे कीं, ' इंग्रजांचें राज्य नष्ट होणार, कारण त्यांनीं हिंदु-मुसलमानांना कणकींत हाडांचें पीठ मिळवून व काडतुसांना चर्बी लावून धर्मभ्रष्ट केलें आहे. ' एवढें तेवढें कारण झालें कीं शिपायांनीं म्हणावें, ' पाहिलें, अयोध्येचें राज्य लुबाडलें त्याचेंच हें फळ तुम्हांला मिळत आहे. ' या सर्व अफवा अजीमुल्लानें पसरविल्या होत्या. त्यानें क्रीमियाच्या युद्धांत रशियन लोकांनीं दाखविलेला पराक्रम पाहिला होता व त्याचीच धुंदी त्याच्या डोळ्यांवर होती.

थॉमसन व त्याचे सोबती दिग्विजयसिंहाचा पाहुणचार घेत कांहीं दिवस राहिल्यावर, त्यानें शेजारच्या एका जमीनदाराकडे या लोकांना पाठवून दिलें. तेथेंही कांहीं दिवस मुक्काम करून कॅप्टन थॉमसन हॅवेलला जाऊन मिळाला. बंडाच्या काळांत हिंदुस्थानी लोकांनीं इंग्रजांना हर तऱ्हेचें साह्य केल्याचीं उदाहरणें अनेक सांपडतील. बंडाच्या इतिहासांत एकीकडे अत्यंत कठोर व निर्दय घटना दिसतील, पाषाणालाही पाझर फुटेल असे हृदयद्रावक देखावे पहावयास सांपड-

तील व आंगावर केवळ ऐकूनच कांटा उभा करणारे अत्याचार दिसतील, तर दुसरीकडे याच्या अगदीं उलट प्रकार नजरेस पडेल. तेथें द्वेषाचें नांवसुद्धां सांपडणार नाहीं व दयेचे मूर्तिमंत पुतळेच असे हिंदी लोक आढळतील. इंग्रजांना मदत करण्याकरतां स्वतःचे प्राण व वित्त खर्चणारे लोक दिसतील. सुष्ट व दुष्ट अशीं दोन्ही उदाहरणें हवीं तितकीं देतां येतील.

नावेंतून उतरून कांठावर गेलेल्या लोकांचें काय झालें, त्यांच्यावर कसकसे प्रसंग ओढवले, व त्या प्रसंगांतून निभावून चौघेजण हॉवेल साहेबाजवळ कसे पोहोंचले, इतकें वर्णन आतांपर्यंत सांगितलें. नावेमध्यें राहिलेल्या लोकांच्या वांट्याला इतकेंही सुदैव नव्हतें. त्यांची नाव लवकरच बंडखोरांच्या हातीं पडली. त्यांतले ८० स्त्रीपुरुष कैद करून कानपूरला पाठविले गेले. कानपूरला आल्यावर ३० जूनला बायका पुरुषांपासून वेगळ्या केल्या गेल्या. नंतर पुरुषांना फाशीं द्यावें किंवा काय यावर बरीच भवती न भवती झाली. याविषयीं एकमत असें होईना; कोणी म्हणत यांना फाशी देऊन एकदाचा सोक्षमोक्ष करून टाकावा, तर दुसरे म्हणत कीं यांना कैदेंत खितपत पडूं द्यावें. याबद्दल बराच वादविवाद होऊन शेवटीं या सर्वांना गोळ्या घालून ठार करण्यांत आलें. एक स्त्री आपल्या पतीला कांहीं केल्या सोडीना. ती त्याला बिलगून राहिली. तिचा निश्चय होता कीं, माझें जें काय व्हावयाचें असेल तें माझ्या पतिदेवासमोर होऊंदे. पतीला एक क्षण-भरही तिनें आपल्यापासून दूर होऊं दिलें नाहीं. पतीला ठार करण्याची शिक्षा ऐकली तेव्हां ती म्हणाली, 'मीही पतिबरोबरच मरेन. त्याला एकट्याला मरूं देणार नाहीं.' शिपाई हट्टास पेटले आणि त्यांनीं एकाच गोळींत दोघांही पति-पत्नीची विल्हेवाट लाविली ! बाकीच्या बायका **व मुलें** कैदेंत पाठवून देण्यांत आलीं. पूर्वी गंगेच्या घाटावर धरलेलीं बायकामुलेंही तेथेंच ठेवलीं होतीं.

तारीख १ जुलईला नानासाहेब बिठूरला आले व यथासांग विधिपूर्वक त्यांना राज्याभिषेक झाला. सलामीच्या तोफा सोडण्यांत आल्या. हा समारंभ मोठ्या थाटांत पार पडला. रात्रीं कानपूरला दारुकाम झालें. अशा थाटानें राज्यारोहण-समारंभ उरकल्यानंतर आठ तारखेला नानासाहेबांनीं कानपूरच्या मैदानावर शिपायांची परेड पाहिली. शिपायांनीं आनंदातिशयानें त्यांना बऱ्याचशा तोफांची सलामी दिली. पेशव्यांनींही बक्षिसाखातर शिपायांना एक लाख रुपये देण्याचें जाहीर केलें.

याप्रमाणें बिठूरला हिंदुराजाचा राज्याभिषेकोत्सव धूमधडाक्यानें चालू असतां कानपूरला एक मुसलमान अधिकारी नेमला गेला. त्यामुळें मुसलमानही संतुष्ट झाले व उत्सवांत सामिल होऊन आनंद करूं लागले.

याप्रमाणें सर्व लोक उत्सवांत मग्न असतांच अलाहाबादेहून गोरी फौज येत असल्याची बातमी चोहींकडे पसरली. ही बातमी ऐकतांच लोक घाबरले आणि इकडे तिकडे पळूं लागले. हें पाहून जून महिन्यांत जसा जाहीरनामा बंडखोरांनीं काढिला होता, तसाच दुसरा जाहीरनामा नानासाहेबांच्या नांवानें निघाला. लोकांनीं घाबरूं नये म्हणून हा सारा खटाटोप होता. शिपायांना नानासाहेबांनीं जाहीर केलेलें बक्षीस मिळालें नव्हतें म्हणून तेही हवालदिल झाले होते. त्यांना बक्षिसें देण्याचा समारंभ झाला आणि शिपाई पूर्ववत् खूश झाले.

कानपूरला एका श्रीमंत मुसलमानानें एक हॉटेल उघडलें होतें. नानासाहेब आपल्या सरंजामासहित याच घरांत राहूं लागले. हें घर फार मोठें होतें. वाड्याच्या दिंडी दरवाजाजवळ दोन तोफा ठेविल्या होत्या व नंग्या तरवारीचा खडा पहारा रात्रंदिवस तेथें चाले. तेथें आल्यावर नानासाहेब आपल्या सेनापतीशीं खलबत करूं लागले. अलाहाबादेहून इंग्रज सैन्य आलें तर त्याला कोठें, कसें व कोणी अडवावयाचें, या सैन्याला पिटाळून लाविल्यावर त्याचा पाठलाग करावयाचा काय, करावयाचा असल्यास कोठवर करावयाचा—इत्यादि लष्करी हालचालींचा विचार करण्याकरितां रोज बैठकी भरूं लागल्या. त्याबरोबरच शहराचें रक्षण कसें करावयाचें, गोरें सैन्य शहरालगत आलें तर आपण काय करावयाचें, याचाही विचार होऊं लागला. नानासाहेबाला या युद्धाच्या चिंतेमुळें फुरसत मिळेनाशी झाली.

ज्या वाड्यांत नानासाहेब येऊन राहिले होते, त्याच्या जवळच गंगेच्या कालव्याच्या उत्तरेकडच्या कांठावर एक लहान घर होतें. असें म्हणतात कीं मागें हें घर एका गोऱ्या साहेबानें आपल्या प्रेमपात्राकरितां तयार करविलें होतें. म्हणून त्याचें नांव बीबीघर पडलें होतें. या घरांत २० फुट लांबीच्या आणि १० फुट रुंदीच्या अशा दोन खोल्या होत्या, व समोर एक लहानसें आंगण होतें. त्याची लांबी सरासरी १० हात असेल. सर्व गोरे कैदी या घरांत आणून ठेविले होते. या लहानशा घरांत कैद्यांची गर्दी झाल्यामुळें त्यांना त्रास होऊं लागला. जुलै महिन्यांत कानपूर दिल्लीच्या भागांत अतिशय उष्णता असते. तशांतच दिवसेंदिवस कैद्यांची संख्या वाढत होती. कानपुरापासून ८० मैलांवर गंगेच्या कांठीं फतेहगड नांवाचें स्थान होतें.

तेथेंही बंडखोरांनीं इंग्रजांना वेढा दिला होता. तेथील इंग्रज संधी साधून, एका नावेंत बसून कानपूरला पळून आले. त्यांना वाटलें होतें कीं कानपुरला आल्यावर आपणांस कांहींएक त्रास होणार नाहीं, उलट आपण आनंदांत राहूं. कारण फत्तेगडापेक्षां कानपुरास इंग्रज अधिक होते. त्यामुळें कानपूर शहर बंडवाल्यांच्या हातीं गेलें असेल अशी त्यांना कल्पनाही नव्हती. परंतु ते नबाबगंजाजवळ येतांच बंडखोरांनीं त्यांची नाव धरली, व सर्वांना नानासाहेबांसमोर आणून उभें केलें. त्यांनीं पुरुषांना मारून टाकण्यास सांगितलें आणि स्त्रियांना व मुलांना बीबीघरांत नेऊन कोंडण्याचा हुकूम दिला.

ह्या इंग्रज स्त्री-कैद्यांना या लहानशा घरांत ठेविल्यामुळें फार कष्ट होत. खावयाला त्यांना पोळी, वरण व दूध मिळे. परंतु एवढयानें कैद्यांचें समाधान होत नसे. कारण मांसाशनाची त्यांना संवय होती. शिवाय उष्णतेमुळें त्यांचे फार हाल होत असत. परंतु कधींमधीं त्यांचें पूर्वीचे हिंदी नोकर त्यांच्या समाचाराला येत. तेथें आले म्हणजे आपल्या स्वत:च्या पैशानें ते गोऱ्या कैद्यांना मिठाई वगैरे खाद्य पेयें खाऊं घालीत व त्यांचें समाधान करण्याचा प्रयत्न करीत. परंतु घरचे कर्ते पुरुष मारले गेले असल्यामुळें त्यांचें अशा सहजासहजीं उपायांनीं समाधान होणें शक्य नव्हतें.

कानपूर पडलें व तेथील गोऱ्या पुरुषांची कत्तल झाली असून बायकामुलें कैदेंत आहेत, ही बातमी हॅवेलॉक साहेबाला कळली. तेव्हां त्यानें थोड्या सैन्यानिशीं कानपूरच्या मदतीकरितां आगाऊ रवाना झालेल्या रेनाड साहेबाला वाटेंतच थांबविण्याकरितां एक स्वार पाठविला. कारण सध्याच्या पराभूत स्थितींत एवढया थोड्या लोकांनीं बंडखोरांचा सामना घेणें इष्ट नव्हतें. रेनाड साहेबानें लोहंग गांवीं मुक्काम केला. हॅवेलॉकही ताबडतोब फौज घेऊन निघाला. कानपूरला पोहोंचण्यापूर्वीच रेनाडला गांठावयाचें होतें म्हणून तो फार वेगानें निघाला. निघतांना त्यानें कलकत्त्याला तार केली. तींत तो म्हणतो, ‘ कानपूर बंडखोरांच्या हातीं गेलें आहे. कानपूर पुन्हां आपल्या हातीं आलें म्हणजे तेथूनच लखनौचें रक्षण करतां येईल. याकरितां मी पुढें जात आहें. १४०० गोरें पायदळ आणि ६ तोफा मला मिळाल्या म्हणजे मी मुख्य रस्त्यानें बेधडक पुढें जाईन. आणखी एक पलटण आली म्हणजे कर्नल नील माझ्या मदतीला येईल. अलाहाबादेचा किल्ला योग्य अधिकाऱ्यांच्या ताब्यांत आहे.’ त्याचा ४ जुलईला निघण्याचा विचार होता, पण जरूर तेवढें सामान जमा न झाल्यामुळें हा दिवस तसाच निघून गेला. रसद गोळा

करण्याकरितां कांहीं दिवस त्याला थांबावें लागलें. शेवटीं ७ तारखेला तिसऱ्या प्रहरीं हॉवेलॉक साहेब निघाला. त्याच्या बरोबर १००० गोरें पायदळ, १३० शीख, कांहीं गोरे स्वयंसेवक स्वार आणि सहा तोफा होत्या. अलाहाबादेस ज्या फौजी अधिकाऱ्यांचे शिपायांनीं बंड केलें होतें, त्यांना आतां कांहीं काम नव्हतें. ते सर्व बिनपलटणी अधिकारी, साधे शिपाई बनून हॉवेलॉक साहेबाबरोबर निघाले. सरकारी कचेऱ्या बंदच होत्या. म्हणून सिव्हिलियन अधिकारीही हॉवेलॉक साहेबा-बरोबर निघाले. इतक्या लोकांना बरोबर घेऊन हावेलाक कानपूर आणि लख-नौचा उद्धार करण्याकरितां मोठ्या उत्साहानें प्रयागहून निघाला.

त्यावेळीं आकाश मेघांनीं आच्छादिलें होतें. लवकरच पावसाच्या सरीवर सरी येऊं लागल्या. पावसाळ्याचे दिवस सुरू झाले होते. तेव्हां निसर्ग वाटेंत अडथळे आणील याची जाणीव हॉवेलॉकसाहेबाला होतीच. त्याप्रमाणें त्यानें सोयही केली होती. आधींच निघावयाला तीन दिवस उशीर झाला होता, त्यांत पावसामुळें पहिले दोन दिवस फारच थोडा प्रवास झाला. कांहीं लोक मागेंच राहिले. यामुळें हॉवेलॉकला काळजी वाटूं लागली. निसर्गानें कितीही अडचणी उपस्थित केल्या तरी कानपूरची स्वारी सोडून देतां येत नव्हती. कारण तेथील पराभवानें इंग्रजांची अब्रू सपशेल गेली होती, व इंग्रज बायकामुलें बंडखोरांच्या कैदेंत असहाय्य स्थितींत सांपडलीं होतीं. त्यानें तशा अडचणीच्या वेळींही शक्य तितक्या वेगानें प्रवास सुरू केला. १० जुलईला त्याला बातमी लागली कीं, बंडखोरांची एक मोठी फौज त्याच्यावर चाल करून येत आहे.

इकडे नानासाहेब आपल्या मंत्रीमंडळाबरोबर इंग्रजांचा हल्ला परतवून लावि-ण्याचीं खलबतें करीत होते. त्यांचा सेनापति टीकासिंह शिपायांची सेना तयार करण्याच्या खटपटींत होता. बाबाभट रसद जमवीत होता. बनिया लोकांना तंबू, राहुट्या वगैरे सामग्री तयार करून फौजेला पुरविण्याचा, नव्या पेशवे सरकारचा हुकूम सुटला होता. ही सर्व सामग्री जमल्यावर नऊ जुलईला टीकासिंह, ज्वालाप्रसाद, बाबा-भट वगैरे रथी, महारथी १५०० पायदळ व गोलंदाज, ५०० स्वार आणि १५०० इतर हत्यारबंद माणसांनिशीं अलाहाबादेकडे निघाले. त्यांच्या बरोबर बारा तोफा होत्या. इंग्रज सैन्य अलाहाबादेहून रवाना झालें असून झपाट्यानें मजल दर मजल करीत कानपूरकडे येत आहे, ही खबर कळतांच ज्वालाप्रसादानें वाटेंत फत्तेपुरला आपल्या सेनेचा व्यूह रचला.

नील साहेबाला कानपूर बंडखोरांनीं घेतलें हें खरेंच वाटेना, म्हणून त्यानें रेनाडला कळविलें कीं तूं पुढें चल. त्याप्रमाणें रेनाड पुढें निघाला. इकडे हॉवेलॉक रेनाडला जाऊन भेटण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होता. त्याला वाटे कीं रेनाड जर एकटाच पुढें गेला आणि बंडखोरांच्या कचाट्यांत सांपडला, तर बंडखोर त्याची चटणी उडवितील. याप्रमाणें झपाट्यानें प्रवास करून हॉवेलॉक ११ तारखेला रात्रीं रेनाडच्या सेनेंत जाऊन पोहोंचला. रात्रीची वेळ होती. चांदणें लक्ख पडलें होतें. दोन्ही सैन्यांतील लोकांनीं एकमेकांना पाहून मोठ्यानें रणवाद्यांचा घोष केला. दोघांनाही आनंद झाला. याप्रमाणें एकमेक मिळाल्यावर १२ जुलईला सकाळीं सातांच्या सुमारास, हें सैन्य फत्तेपुरापासून चार मैलांवर असलेल्या वेलिंदा नांवाच्या ठिकाणीं पोहोंचलें. रेनाडचा विचार हॉवेलॉक येऊन पोहोंचण्यापूर्वीच फत्तेपूर आपल्या ताब्यांत घेण्याचा होता. फत्तेपुरास बंडखोरांनीं केलेल्या कडेकोट तयारीचा सुगावा त्याला लागला नव्हता. त्याला कळलेली बातमी अशी होती कीं, फत्तेपुरास फक्त मूठभर शिपाई आहेत. पण रेनाडचा मनुष्य ही बातमी काढून गेल्यानंतर थोड्याच वेळानें नानासाहेबांचें मोठें सैन्य तेथें येऊन पोहोंचलें होतें. फत्तेपुरास थोडेच लोक आहेत अशा समजुतीनें जर रेनाडनें फत्तेपुरावर हल्ला केला असता, तर त्याला खात्रीनें दगा झाला असता. हॉवेलॉक साहेबानें या सर्व गोष्टी हेरल्या होत्या. म्हणूनच त्यानें प्रथम रेनाडला थांबण्यास सांगितलें होतें; व नंतर वाटेंत त्याला गांठण्याचा आटोकाट प्रयत्न केला. रेनाड व हॉवेलॉक या दोघांची फौज मिळून १४०० गोरे शिपाई, ६०० हिंदी मदतनीस व ८ तोफा एवढी होती. झपाट्यानें मजल मारल्यामुळें गोरी फौज थकली होती. म्हणून हॉवेलॉकनें त्यांना विश्रांति घेण्यास सांगितलें. याप्रमाणें सर्व शिपाई हत्यारें बाजूस ठेऊन खाण्यापिण्याच्या गडबडींत निमग्न झाले. इतक्यांत दूतांनीं बातमी आणली कीं, नानासाहेबांची सेना फत्तेपुरास पोहोंचली. बातमी कळतांच हॉवेलॉकनें लढाईची तयारी करण्याचा हुकूम दिला. हॉवेलॉक बारा तारखेला ज्वालाप्रसादासमोर येऊन अचानक उभा राहिला. ज्वालाप्रसादाला अशी बातमी होती कीं, फक्त रेनाडची लहानशी तुकडी फत्तेपूरवर चालून येत आहे. तेव्हां एवढ्याशा तुकडीला आपण हां हां म्हणतां उडवून देऊं, अशा उत्साहानें ज्वालाप्रसाद पुढें आला होता. पण समोर रेनाडबरोबर हॉवेलॉकची सेना पाहून तो चकित झाला. त्याचा उत्साह पार मावळला. पण आतां विचार करावयाला फुरसत नव्हती. त्यानें आपल्या तोफांचे मोर्चे बांधले, आणि लगेच इंग्रज सेनेवर तोफांचे गोळे पडूं लागले. या युद्धांत

तलवारी, संगीनी व पिस्तुलांचें कामच पडलें नाहीं. कारण लढाई हातोहात होण्याची वेळच आली नाहीं. शेवटपर्यंत तोफाबंदुकांचीच लढाई चालली होती. इंग्रजांच्या नव्या बंदुकी ३०० यार्डावरून मारा करीत होत्या. बंडखोरांजवळ जुन्या बंदुका असल्यानें त्यांच्या बहुतेक गोळ्या फुकट जात होत्या. त्यांचा मारा लांबवर पोहोंचत नव्हता. म्हणूनच ज्वालाप्रसादाच्या सैनिकांना इंग्रजांच्या अचूक माऱ्यापुढें टिकाव धरून राहाणें कठिण झालें. आपल्या तोफांचा मारा फुकट जात आहे, उलटपक्षीं शत्रूंच्या तोफा अचूक काम करीत आहेत, आणि अशीच स्थिति आणखी थोडावेळ कायम राहिली तर लढाईचें पारडें फिरेल, असें पाहून ज्वालाप्रसादानें आपल्या रिसाल्याला पुढें दामटलें. हॉवेलॉकनें हें पाहून आपलेंही घोडदळ पुढें पाठविलें. घोडदळाचा नायक पालिशर स्वतः घोड्यावर बसून, तीन इंग्रज स्वयंसेवक आणि १२ देशी स्वारांनिशीं पुढें झाला ! बाकीचे देशी स्वार आस्ते कदम जात आहेत असें पाहून, हॉवेलॉकला वाटलें कीं हे लोक शत्रूला मिळणार. त्याच वेळेला पुढें गेलेला पालिशर शत्रूकडून वेढिला जाईल असें दिसूं चिन्ह लागलें. हां हां म्हणतां ज्वालाप्रसादाच्या घोडदळानें पालिशरला चारी बाजूंनीं वेढा दिला. थोड्या लोकांनिशीं पालिशर घेरला गेला, पण त्याच्याबरोबर असलेला रिसालदार नजीबखां आणि इतर स्वार निकरानें लढूं लागले. या सर्व स्वारांनीं आपल्या नायकाच्या चारी बाजूला उभे राहून त्याचें रक्षण केलें. या चकमकींत नजीबखां आपल्या सहा सोबत्यांसह पडला, पण त्यानें युद्धाचें पारडें फिरविलें. ज्वालाप्रसादाचे स्वार, गोऱ्या स्वारांच्या शिस्तीच्या, व्यवस्थित, तीव्र व अचूक माऱ्यापुढें टिकले नाहींत. पालिशरनें सहज त्यांची फळी फोडली. हें पाहतांच ज्वालाप्रसादाचे स्वार जसे पुढें आले तसे परतले. इकडे इंग्रजांच्या लांब पल्ल्याच्या बंदुकींचा मारा चालूच होता. यामुळें ज्वालाप्रसादाचे सैनिक तोफा सोडून पळाले. याप्रमाणें कानपूरच्या स्वारीवर निघालेल्या हॉवेलॉकसाहेबाला पहिल्या सपाट्यासच विजयश्रीनें माळ घातली. ज्वालाप्रसादाचे दीडशें लोक या लढाईत मेले. त्या मानानें इंग्रजांचें फारसें नुकसान झालें नाहीं. युद्ध संपल्यानंतर बरोबरच्या कांहीं हिंदी सैनिकांविषयीं संशय आल्यामुळें, त्यांचीं हत्यारें व घोडे मात्र हॉवेलॉकनें हिसकून घेतले.

फत्तेपूर कानपुरापासून ४० मैलांवर वायव्येस वसलें आहे. हें शहर कानपूर आणि अलाहाबादेच्या जवळजवळ मध्यावर आहे. १८०१ सालीं इंग्रजांनीं हें शहर अयोध्येच्या नबाबाकडून घेतलें होतें. तेथें त्या वेळीं १६।१७ हजारांची

वस्ती असे. यापैकीं बहुतेक मुसलमान होते. हे मुसलमान चांगले पटाईत घोडेस्वार होते, म्हणून ते इंग्रजांच्या घोडदळांत नोकरी करीत. येथें त्यावेळीं गोऱ्या-लोकांची फारच थोडी वस्ती होती. येथील एक मॅजिस्ट्रेट हिकमतुल्ला नांवाचा मुसलमान होता. हा फार धार्मिक असे. शहरांत नेहमींप्रमाणें खिस्ती धर्मोपदेशक लोकांना उपदेश करून खिस्ती करीत, हें हिकमतुल्लाला खपेना. इकडे हिकमतुल्ला जसा मुसलमानी धर्माचा अभिमानी, तसा तेथील गोरा जज्जही खिस्ती धर्माचा फार अभिमानी असे. त्यानें फत्तेपूरच्या दरवाजाजवळ चार खांब उभारिले आणि त्यांच्या-वर हिंदी व उर्दू या दोन्ही भाषांत खिस्ती धर्माचीं तत्त्वें ठळक अक्षरांनीं खोदविलीं. गोऱ्या जज्जाला जरी आपल्या धर्माचा इतका अभिमान होता, तरी त्यानें कधीं कोणाही माणसावर जबरीनें आपला धर्म लादला नाहीं. तो उदार अंतःकरणाचा आणि अतिशय दयाळु असे. रोग्यांना, दुःखपीडितांना, विपद्ग्रस्तांना आणि निराश्रितांना त्यानें कधींही विन्मुख जाऊं दिलें नाहीं. उलट त्यांना तो हरएक प्रकारची मदत करी. त्यामुळें गरीबांचा वाली, असहायांचा सहायक अशीच त्याची कीर्ती होती. यामुळें लोक त्याला अतिशय चाहात असत.

फत्तेपूरच्या खजिन्याचें रक्षण करावयाला अलाहाबादेच्या पायदळापैकीं ७० लोक ठेवले होते. मे महिना अखेर ६५ व्या पायदळाचे आणि नं. २ च्या रिसाल्याचे कांहीं लोक अलाहाबादेहून बंड करून व लुटीचा माल घेऊन फत्तेपूरला आले. या लोकांशीं फत्तेपूरच्या सैनिकांनीं गुप्तपणें संगनमत केलें होतें कीं काय नकळे; कारण ते फत्ते-पुरचा खजीना सहजासहजीं लुटून निघून गेले. या वेळीं फत्तेपूरच्या लोकांत बरीच खळबळ उडाली होती. साऱ्या हिंदुस्थानांत ज्या गप्पा उठल्या होत्या त्यांचीच पुनरावृत्ति फत्तेपूरला झाली होती. इंग्रज आमचा धर्म नष्ट करीत आहेत. त्यांच्या समोपचाराच्या गोडगोड थापांना भुलून आम्ही खिस्ती होत नाहीं म्हणून त्यांनीं विहिरींतून गाईचीं व डुकरांचीं हाडें टाकविलीं आहेत, अशी लोकांची समजूत झाली होती. तेथील गोरा जज्ज लोकप्रिय असल्यामुळें कांहीं लोक ही तक्रार घेऊन त्याच्याकडे गेले. तो हंसला आणि म्हणाला, 'तुम्हाला वेडतर नाहींना लागलें. खिस्ती धर्मांत जे लोक घेतले जातात ते असे जबरीनें आणि फसवणूक करून घेतले जात नाहींत. जे आमच्या धर्माचीं तत्त्वें पटल्यामुळें आपखुशीनें आमचा धर्म स्वीकारण्यास तयार होतात, त्यांना विधियुक्त दीक्षा दिली जाते. हें हाडारक्ताचें खूळ तुमच्या डोक्यांत कोणातरी लबाड मनुष्यानें भरविलें आहे.' पण क्षुब्ध झालेल्या जनतेला, रोजच्या रोज नव्या नव्या बाजार बातम्या मिळत

असल्यानें जज्जाचें हें बोलणें मानभावीपणाचें वाटलें. लोकांची क्षुब्धता पाहून इंग्रजांनीं आपल्या बायकामुलांना अलाहाबादेस पाठवून दिलें. तसेंच देशी ख्रिस्ती लोकांनाही आपल्या बायकामुलांना सुरक्षित ठिकाणीं पाठवून द्या, असा इशारा देण्यांत आला. ५ जूनला कानपूरच्या बाजूनें तोफांचा धूमधडाका ऐकून इंग्रजांची पांचावर धारण बसली. सर्वजण मॅजिस्ट्रेटच्या बंगल्यावर गेले. अलाहाबादेहून ६२ नंबरचें पायदळ व २ नंबरचें घोडदळ कानपूरला जात आहे, असें मॅजिस्ट्रेटनें ऐकिलें होतें. त्यापैकीं कांहीं लोक पूर्वी येऊन फत्तेपूरचा खजीना लुटून गेलेच होते. फत्तेपूरचे सैनिक ७ जूनपर्यंत, आम्ही स्वामिभक्त आहों असें दाखवीत होते. ७ तारखेला जेव्हां त्यांनीं ऐकलें कीं, त्यांच्या पलटणीचे लोक कानपूरला जात आहेत, तेव्हां ते शस्त्रास्त्रांनीं सुसज्जित होऊन कानपूरला चालते झाले. त्यांत त्यांचा भलेपणा एवढाच कीं, फत्तेपूरला मूठभर इंग्रज होते तरीदेखील त्यांना कोणत्याही प्रकारची इजा न करतां ते तेथून मुकाट्यानें निघून गेले.

९ जूनला एकीकडून अलाहाबाद व दुसरीकडून कानपूरच्या कर्णकटु बातम्या आल्या. फत्तेपूरला एकच गोंधळ उडाला. शहरांतले हिंदु-मुसलमान दोघेही शिपायांना मिळाले. मुसलमान लोक ख्रिस्ती धर्मोपदेशकांवर चिडलेच होते. आतां संधी मिळाल्याबरोबर त्यांचा नाश करावयाला ते सज्ज झाले. शिपायांनीं तुरुंग तोडला व खुल्या झालेल्या कैद्यांनीं लूटमार व जाळपोळ सुरू केली. कचेरी व खजीना बंडखोरांच्या कचाट्यांत सांपडला. इंग्रजांनीं पाहिलें कीं सर्व शहरवासियांत बंडाचें वारें चांगलेंच शिरलें आहे. तेव्हां त्यांच्यापासून चार हात दूर राहाण्यांतच शहाणपणा आहे. आधींच येथें इंग्रज मूठभर होते. बंडखोरांनीं मनांत आणलें तर तेव्हांच त्यांची चटणी उडणार ! तेव्हां त्यांतले बहुतेक लोक घोड्यावर स्वार होऊन ९ जूनला रवाना झाले. हे लांबचा चक्कर घेऊन बावीस दिवसांनीं अलाहाबादेस पोहोंचले.

फत्तेपूरला एकच गोरा माणूस शिल्लक राहिला. हा मनुष्य म्हणजे पूर्वोक्त लोकप्रिय जज्ज राबर्ट टकर होय. त्यानें जिवावर उदार होऊन शहरांत शांतता स्थापित करण्याचा प्रयत्न केला. वास्तविक तो सिव्हिलियन असल्यामुळें लढाईच्या किंवा फौजेच्या कामाशीं त्याचा कांहीं संबंध नव्हता. पण प्रसंगच आला तेव्हां फौजी पोषाखाखेरीज भागावयाचें नाहीं असें पाहून त्यानें कमांडरचा पोषाख केला, बरोबर पोलिसांची तुकडी घेतली आणि शहरांत घुसला. तेथल्या गोंधळांत एकटा सांपडला असूनही त्याचें साहस क्षणभरही विचलित झालें नाहीं. त्यानें आपल्या

प्राणांपेक्षांही कर्तव्याची महती अधिक मानिली. आणि त्या कर्तव्याचें पालन करण्याकरितां एकटाच बंडखोरांच्या धांगडधिंग्यांत घुसला. त्याच्या शौर्यानें कित्येक बंडखोर जखमी झाले, तसे त्यालाही कांहीं वार लागले. तरीदेखील तो आपलें काम करीतच राहिला.

परंतु या कर्तव्यनिष्ठेचा व स्वार्थत्यागाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आपलें कर्तव्य बजावीत असतांच तो प्राणास मुकला. तो कसा मारला गेला याविषयीं एकमत नाहीं.

याप्रमाणें १८०१ मध्यें इंग्रजांच्या हातीं आलेलें फतेपूर शहर १८५७ सालच्या जून महिन्याच्या १० तारखेला त्यांच्या हातून गेलें. पण बंडखोरांच्या हातीं ते पांच आठवड्यांपेक्षां जास्त दिवस राहूं शकलें नाहीं. या पांच आठवड्यांत बंडखोरांनीं नानासाहेबाला आपला राजा म्हटलें, पण प्रत्यक्ष वर्तन अगदीं स्वेच्छाचारी ठेविलें. ज्याच्या जें मनास येईल तें त्यानें करावें, अशी अंधेर नगरी तेथें माजली. हॅवेलॉक साहेबानें येऊन पुन्हा फत्तेपूरावर फत्ते मिळविली, तेव्हां लोकांची घाबरगुंडी उडाली. त्यांतले कित्येक तर जीव घेऊन पळाले. इंग्रजांनीं आपल्या कर्तव्यनिष्ठ देशबंधूच्या खुनाचा सूड उगवायला कमी केलें नाहीं. फत्तेपुराहून पळून जे इंग्रज अधिकारी अलाहाबादेस पोहोंचले होते, ते आतां हॅवेलॉकबरोबर होतेच. त्यांपैकीं एका सेरार नांवाच्या मॅजिस्ट्रेटनें असें वर्णन लिहून ठेविलें आहे कीं, 'आम्हांला वाटेंत जीं गांवें लागलीं तीं बहुतेक जाळलीं गेलीं. एक चिटपाखरूंही कोठें दिसत नव्हतें. जेथें सुंदर घरें आणि मोठमोठ्या इमारती होत्या, तेथें आतां राखेचे ढीग दिसत होते. मनुष्याचा तर वासदेखील येत नव्हता. तेथें अशी प्रेतकळा आली होती कीं, दिवसाढवळ्या बेडकांचें डरॉंव डरॉंव, आणि रातकिड्यांचा किर्र ध्वनि ऐकूं येत होता. वारें वाहूं लागलें म्हणजे जळत असलेल्या प्रेतांची घाण सुटे, ती अगदीं असह्य होई. हें दृश्य मी कधींही विसरणार नाहीं.' इंग्रजांनीं बंडखोरांचा सूड उगविण्याकरितां गांवांची काय दशा करून टाकिली होती, त्याची कल्पना होण्याकरितां सेरारचे शब्द पुरेसे आहेत. फत्तेपूरची गति तीच झाली. जिकडे तिकडे शुकशुकाट झाला. बंडखोरांच्या धांगडधिंग्यानें एक वेळ अहोरात्र कोलाहल माजलेलें तें शहर आतां स्मशानवत् शांत झालें व ओस पडलें. इंग्रजांच्या शिपायांनीं घरें फोडिलीं, त्यांत जें काय मिळालें तें लुटलें, नंतर तोफांनीं मोठमोठ्या इमारती जमीनदोस्त करून टाकिल्या. इतकेंही करून ज्या इमारती शिल्लक राहिल्या त्यांना आग लावून दिली.

गोऱ्या शिपायांनीं ज्या द्वेषाचें प्रदर्शन केलें व जसा संहार केला, तसलाच प्रकार हिंदी बंडखोरांनीही पूर्वी केला होता. त्यांनीं गोऱ्या लोकांच्या कचेऱ्या, बंगले आणि दुकानें जाळून भस्म करून टाकिलीं होतीं. हॅवेलॉकच्या सैन्यांतील एकानें लिहिलें आहे. 'हिंदी लोकांनीं आमचीं दुकानें व बंगले लुटले आणि जाळले, चर्चें तोडून मोडून टाकिलीं, ज्या ज्या वस्तूंशीं इंग्रजांचा किंवा इंग्लंडचा संबंध आला होता, त्या सर्व वस्तु त्यांनीं नष्ट करून टाकिल्या होत्या. तारेचे खांब उपटून मोडून टाकले होते, आणि तारा कापून टाकिल्या होत्या. सडकेच्या बाजूला जे मैलाचे दगड असतात तेदेखील उपटून फोडून टाकले होते.' या सैनिकानें बंडखोरांच्या कृष्णकृत्यांचें चित्र रेखाटलें आहे आणि फत्तेपूरच्या मॅजिस्ट्रेटनें विजयी इंग्रजांनी उगवलेल्या सुडाचें वर्णन केलें आहे. हीं दोन्ही चित्रे समोर ठेवून, हें चित्र पहा आणि तें चित्र पहा असें म्हणण्याची पाळीच येत नाहीं. कोणत्याही चित्राकडे पाहिलें तरी अमक्यानें अमुक एक केलें नाहीं, असें म्हणावयाला जागा नाहीं. दोघेही सारखेच. दोघेही एका माळेचेच मणी. निःपक्षपाती दृष्टीनें कोणाला निंदायला नको व कोणाला वंदायला नको!

फत्तेपूरची हकीकत कानपूरला कळली. तेव्हां बाळारावाची इंग्रजांना अडविण्याकरितां रवानगी करण्यांत आली. त्यानें कानपूरपासून २२ मैलांवर अवंग नामक गांवीं आपल्या सेनेचा तळ दिला आणि शत्रूशीं सामना करण्याची तयारी चालविली. फत्तेपूरच्या लढाईत हॅवेलॉक साहेबाला १२ तोफा मिळाल्या होत्या. त्या तोफा आता बाळासाहेबावर सोडिल्या जाऊं लागल्या. १४ जुलईला हॅवेलॉकला बातमी लागली कीं, सहा मैलांवर बाळासाहेब सेनेसह तयार होऊन बसला आहे. १५ जुलईला सकाळीं दोघांचें युद्ध सुरू झालें. यावेळीं इंग्रजांच्या जवळ तोफा जास्त होत्या. लांब पल्ल्याच्या रायफलीही होत्याच. त्या यावेळीं फार चांगलें काम करूं लागल्या. बाळासाहेब आपला रिसाला घेऊन मोठ्या वेगानें पुढें झाला, पण बंदुकीच्या माऱ्यामुळें त्याला वाटेंतच थांबावें लागलें. त्यानें लांबचा चक्कर घेऊन इंग्रजी सेनेवर पाठीमागून छापा घातला. हा हल्ला अतिशय जोराचा होता. सारखें दोन तास घनघोर युद्ध झालें पण शेवटीं बाळाराव हरलाच.

अवंग गांवापासून थोड्या अंतरावर पांडु नदी आहे. तसें म्हटलें तर ही नदी अगदी ओढ्यासारखी लहान आहे. पण पावसाळी दिवस असल्यामुळें या नदीला फार मोठा पूर आला होता. या नदीवर एक पूल होता. या पुलाशिवाय नदी

ओलांडण्याचें दुसरें साधन नव्हतें. बाळाराव हारला तेव्हां त्यानें आपल्या फौजेसुद्धां ही नदी तर ओलांडली, पण आपला पाठलाग करीत येणाऱ्या शत्रूला रस्ता मिळूं नये. म्हणून तोफांच्या गोळ्यांनीं पूल मोडून टाकण्याच्या तो खटपटींत होता. बाळाराव पूल तोडीत आहे अशी बातमी लागतांच हॅवेलॉक तडक पुलाकडे निघाला. ऊन फार कडक पडलें होतें. सैनिकांच्या आंगांतून घामाच्या धारा लागल्या होत्या. अशा स्थितींत गोरें सैन्य दोन तासांनीं पुलाजवळ येऊन पोहोंचलें. बाळारावानें पुलाजवळच दोन मोठमोठ्या तोफा ठेविल्या होत्या. गोरें सैन्य आलेलें पाहतांच त्यानें तोफांचे मोर्चे इंग्रजी सैन्याकडे वळवून, त्यांच्यावर मारा सुरु केला. या माऱ्यामुळें गोऱ्या सैन्याला पुढें जातां येईना. त्यांच्याजवळ मोठ्या तोफा नसल्यामुळें त्यांना लांबून उलट माराही करतां येईना. इंग्रजांनीं त्यांतल्या त्यांत चपळाई करुन आपल्या तोफा बाळारावाच्या तोफांच्या माऱ्याच्या आंत नेल्या, आणि तेथून बाळारावाच्या सैन्यावर मारा सुरू केला. त्या माऱ्यामुळें तोफेंत गोळे भरावयाचा दांडा मोडला आणि बाळारावाच्या तोफा बंद पडल्या. तोफा बंद पडल्या असें पाहतांच हॅवेलॉकनें रेनाडला आपलें पायदळ घेऊन शत्रूवर चाल करण्यास सांगितलें. रेनाडही आपली फौज घेऊन झपाट्यानें पुढें गेला. बाळारावाचा रिसाला सामन्याला पुढें झाला. हॅवेलॉकनें आपल्या तोफांचा मारा करून रिसाल्याची गति कुंठित केली. त्यामुळें रेनाडनें पुलावर कबजा केला. बाळारावाच्या खांद्याला गोळी लागली. तेव्हां तो परत गेला. मागें जातांना मात्र त्यानें पांच तोफा टाकून दिल्या. या युद्धांत इंग्रजांचें बरेंच नुकसान झालें. रेनाडच्या मांडींत गोळी लागून तो जायबंदी झाला आणि त्या जखमेनें दोन दिवसांनीं मेला. नदीकांठीं बंडखोर शिपायांनींही आपलें शौर्य चांगलेंच दाखविलें; पण शिस्तीच्या अभावीं त्यांचें शौर्य परिणामकारक होऊं शकलें नाहीं.

बाळाराव जखमी होऊन कानपुरला पोहोंचला. १५ तारखेला तिसऱ्या प्रहरीं नानासाहेबांचा दरबार चालू असतां, बाळाराव हरल्याची बातमी आली. या बातमी-मुळें साहजिकच आनंद मावळला, आणि चिंतेची रेषा सर्वांच्या कपाळावर उमटली. बाळारावानें चपळाई केली असती, तर त्याला गोरें सैन्य पोहोंचण्यापूर्वी पूल उडवून देतां आला असता. तरी पण लढाईवरून जखमी होऊन आलेला शूर शिपाई, म्हणून त्याला 'रणकुशल' अशी पदवी बहाल करण्यांत आली. पदवी बहाल करणें सोपें काम होतें, पण इकडे हॅवेलॉकची सेना कानपूरकडे येत होती तिची काय वट? हा प्रश्न दत्त म्हणून पुढें येतांच कोणालाही त्यावर उपाय सुचवितां

येईना. सर्वच जण आपले प्राण कसे वांचतील या काळजींत होते. एकानें हळूच तोंड सुचविली, 'यावेळीं आपण सर्वजण बिठूरला निघून जावें हें बरें.' त्याबरोबर सर्वांनीं एकदम 'खाशी' म्हणून टाळ्या वाजविल्या. कोणीं सुचविलें कीं फत्तेगडाला जावें, कोणी म्हणे रस्त्यांतच इंग्रजी सेनेला अडवावें. अशा पुष्कळ सूचना, उपसूचना व उपसूचनांवर पुन्हां उपसूचना आल्या. शेवटीं बराच वादविवाद होऊन असें ठरलें कीं, कानपूरच्या रस्त्यावरच हॅवेलॉकला अडवावें. ठराव पास झाला व युद्धाची तयारी होऊं लागली.

तेव्हां अजीमुल्लाच्या क्रूर स्वभावानें उचल केली. तो नानासाहेबाला म्हणूं लागला कीं, हे इंग्रज आपल्या बायकामुलांना सोडविण्याकरितां इतक्या घाईनें आणि तांतडीनें इकडे येत आहेत, तर आपल्या जवळ कैदेंत असलेल्या बायकामुलांची कत्तल उडवून द्या म्हणजे हॅवेलॉकचा सारा खटाटोप व्यर्थ होईल, आणि तो हाय हाय करीत आणि हात चोळीत परत जाईल. त्याचें हें विघ्न-संतोषी पाषाणहृदय पाहून नानासाहेब चरकले. बायकांची हत्या करण्याचा विचार त्यांना नामर्दपणाचा वाटला. पेशव्यांच्या घरच्या स्त्रियांनींही अजीमुल्लाची बरीच निर्भर्त्सना केली व गोऱ्या स्त्रियांची हत्या झाल्यास आपण जीव देऊं, असा धाकही दाखविला. पण याचा परिणाम मात्र उलट झाला. अजीमुल्लाचें चांडाळ-हृदय या तेजोभंगानें अधिकच काळवंडलें. त्यानें निश्चयच केला कीं आतां तर यांची कत्तल झालीच पाहिजे. त्या वेळीं कर्तुमकर्तुं शक्ति अजीमुल्लाचे हातीं असल्यानें त्याला कांहींच कठिण नव्हतें. शिवाय बिबीघरांतील स्त्री-कैद्यांनीं हॅवेलॉकच्या सैन्याशीं चोरून पत्रव्यवहार करण्याचा प्रयत्न केला व आपला भेद त्यांना कळविला, हें जाडें निमीत्तही त्याला सांपडलें होतें.

त्यानें आपला मोर्चा बीबीघराकडे वळविला. तेथें चार पांच आजारी गोरे पुरुष कैदी होते ते ताबडतोब उडवून देण्यांत आले. पण बायकांचीं डोकीं उडविण्याला कोणीच तयार होईना. अजीमुल्लाच्या रिसाल्याचे शिपाई इंग्रजांवर इतके चिडले होते, तरी देखील बायकांची कत्तल करावयाला ते तयार झाले नाहींत. सरतेशेवटीं तुरुंगाचे रक्षकच या अघोर कृत्याला कबूल झाले. त्यांनीं या गरीब गाईंवर गोळ्या सोडिल्या. पण त्या नाजुक नारींना जखमांच्या वेदनांनीं तडफडतांना पाहून त्यांच्याही हृदयाला पाझर फुटला, व मग त्यांना तोफेच्या तोंडीं देण्याची भीति घातली, तरीदेखील ते शिपाई पुन्हा बंदुकीला हात लावीनात. तेव्हां तुरुंगांत एक

अझीझन नांवाची रांड पांच कसायांना घेऊन आली, व त्यांनीं सर्वांचीं मुंडकीं धडापासून वेगळीं केलीं! हें पैशाचिक अघोर कृत्य करून त्या निर्घृण अजीमुल्लयानें हिंदुस्थानच्या इतिहासाचें पृष्ठ कलंकित करून ठेविलें आहे! १६ जुलईला सकाळीं सर्वांचीं प्रेतें जवळच्या एका विहिरींत टाकून दिलीं. हिंदुस्थानवासी लोक पाप-भीरु म्हणून प्रसिद्ध आहेत, मग त्यांच्या हातून असलें अघोर कृत्य झालें कसें? तो बंडाचा काळ होता. देशांत राज्यक्रांतीची मोठी लाट उसळली होती. अशा राज्यक्रांतीच्या वेळीं क्रांतिकारक कोणताही मागचापुढचा विचार न करतां, केवळ लोकांवर जरब बसवून सुलभपणें, विशेष अडथळा न होतां विजय संपादनार्थ अशींच अघोर कृत्यें करितात. जगाच्या इतिहासांत जेवढया राज्यक्रांत्या झाल्या त्या सर्वांत असलीं अघोर कृत्यें घडलीं आहेत. प्राचीन रानटी काळाची गोष्ट बाजूस सारली तरी, अगदीं अलीकडच्या सुधारलेल्या काळांतील ग्रीस व टर्की येथील मुसलमान व ख्रिस्ती लोकांच्या झालेल्या कत्तली प्रसिद्धच आहेत. पण अशीं उदाहरणें दिल्यानें बंड-खोरांनीं केलेल्या या घातकी कृतीचें समर्थन होणें शक्य नाहीं. असलीं मांग हृद-याचीं कामें मग तीं कोणींही केलेलीं असोत, कोठेंही केलेलीं असोत आणि कशाही परिस्थितींत केलेलीं असोत, तीं अत्यंत निंद्य, पैशाचिक आणि अघोर होत. त्यांचा निषेध स्पष्ट शब्दांत करणें जरूर आहे. कारण मानवतेला त्यांच्यामुळें कलंक लागतो.

१६ जुलईला पायदळ, घोडदळ आणि गोलंदाज मिळून सुमारें पांच हजार लोकांना बरोबर घेऊन नानासाहेबांनीं हॅवेलॉकला अडविण्यासाठीं स्वतः कूच केलें. कानपुरापासून चारएक मैलांवर दक्षिणेस असलेल्या अहरवा गांवीं त्यांनीं तळ दिला. या ठिकाणापासून दोन रस्ते फुटत होते. एक रस्ता कानपूरच्या छावणींत जात होता आणि दुसरा दिल्लीकडे जात होता. डावीकडून गंगा वहात होती आणि उजवीकडे एक गांव होता, व त्यांत एक आमराई होती. डावीकडे गंगेच्या कांठच्या खिंडारांत नाना-साहेबांनीं आपल्या तोफा रोविल्या. उजवीकडे आंब्याच्या झाडांआड आणि गांवा-जवळही तोफा रोविल्या. ज्या ठिकाणीं रस्ते मिळाले होते तेथें पायदळ सेना अर्ध-चंद्राकृती उभी राहिली, आणि पायदळाच्या मागें घोडेस्वार उभे केले. याप्रमाणें आपल्या सेनेचा व्यूह रचून नानासाहेब हॅवेलॉकची मार्गप्रतीक्षा करूं लागले. त्यांचें अनुमान असें होतें कीं, हॅवेलॉकची सेना दिल्लीकडे जाण्याचो हूल दाखवील. इकडे हॅवेलॉकला १५ तारखेलाच बातमी लागली होती कीं नानासाहेब लढाईची जय्यत तयारी करीत आहेत. त्यावेळीं गोरी फौज २२ मैलांवर होती. त्या दिवशीं दिवस रात्र चालून हॅवेलॉक १४ मैल चालून आला. नंतर तेथें थोडा वेळ

विश्रांति घेऊन व सैनिकांचें खाणें पिणें उरकून तिसऱ्या प्रहरीं हॅवेलॉकनें पुन्हा कूच केलें. नानासाहेबांच्या सेनेपासून दोन मैलांवर हॅवेलॉक आला, तेव्हां त्याला बंडखोरांचा व्यूह दिसला. नानासाहेबांची प्रचंड सेना व्यूह रचून उभी असलेली पाहून हॅवेलॉक स्तंभितच झाला. लहानपणापासून हॅवेलॉक लढाईच्या वातावरणांतच वाढला होता. युद्धकलेची बारीक खांच खोंचही त्याच्या नजरेंतून निसटली नव्हती. तो एक मोठा महारथीच होता. पण त्यानें जेव्हां नानासाहेबांचें व्यूहरचनाचातुर्य पाहिलें, तेव्हां त्याला क्षणभर तोंडांत बोट घालून स्तब्ध रहावें लागलें. त्यानें तात्काळ ओळखलें कीं, येथें अविचारानें एकदम हल्ला केला किंवा गोरी फौज एकदम पुढें जाऊन झुंजूं लागली तर सपशेल मार खाईल. येथें प्रत्येक पाऊल जपून आणि विचारपूर्वकच टाकिलें पाहिजे. हॅवेलॉकजवळ १००० गोरे आणि ३०० शीख सैनिक होते. इतर ठिकाणीं जशी तडफीनें झडप घालून शत्रूकडून विजयश्री लुबाडली, तसें येथें करूं गेलें तर आपणच ठार होऊं, हें हॅवेलॉकनें ओळखिलें होतें. म्हणून त्यानें विचारपूर्वक डाव टाकिला. प्रथम स्वयंसेवक स्वार पुढें झाले. त्यांचे मागून तोफा चालूं लागल्या व सरतेशेवटीं पायदळ निघालें. नानासाहेबांच्या गोलंदाजांनीं जेव्हां गोऱ्या सेनेला आंब्याच्या झाडाखालून पुढें निघतांना पाहिलें, तेव्हां त्यांनीं तोफांचे गोळे सोडण्यास सुरुवात केली. अर्धा मैल गोरी सेना पुढें चालून आल्यावर, नानासाहेबांची सेना प्रथम ज्या बाजूला गोळे सोडीत होती तिकडे सोडीनाशी झाली, व आतां तिनें दुसरीकडे गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. हॅवेलॉकनें अजून आपल्या तोफा डागल्या नव्हत्या. तो योग्य संधीची वाट पहात होता. त्याची फौज आतां नांगरून ठेविलेल्या शेतांतून चालली होती. पायदळ सैनिकांना व घोडेस्वारांनाही फार कष्ट होत होते, तोफांना ओढण्याकरितांही घोड्यांना फार श्रम पडत होते; आणि अशा अड-चणीच्या जागेंतून चालत असतांना वरून नानासाहेबांच्या तोफांचे गोळे पडत होते. या तोफांच्या माऱ्यामुळें गोऱ्या फौजेची गति कुंठित झाली. हॅवेलॉकला कळून चुकलें कीं, नानासाहेबाच्या तोफा बंद पाडल्याशिवाय पुढें एक पाऊलदेखील टाकणें कठिण आहे.

पण त्यांच्या तोफांवर नेमके गोळे पडतील अशा बेतानें आपल्यातोफांचे मोर्चे बांधणें फार कठिण होतें. तिकडे नानासाहेब सारखा भडिमार करीत होते, रणवाद्यें वाजत होतीं, व सैनिकांच्या आंगांत वीरश्री संचार करीत होती. बंडखोर शिपायांनीं रणवाद्यें वाजविण्याची कला इंग्रजांजवळूनच ग्रहण केली होती. या वेळीं

ती गुरुची विद्या गुरूसच फळ देऊं लागली. हॅवेलॉकनें पाहिलें कीं, या वेळीं काम झालेंच तर तें धडाडी आणि हिम्मतीनेंच होईल. म्हणून त्यानें संगिनीच्या जोरावर नानासाहेबांच्या तोफा काबीज करण्याचा हुकूम दिला. स्कॉटिश हायलँडर गोळ्यांचा सारखा पाऊस पाडीत पुढें सरले. त्यांनीं तोफांच्या गोळ्यांची पर्वा केली नाहीं. नानासाहेबांच्या सेनेपासून शंभर यार्डांच्या अंतरावर येतांच हॅवेलॉकनें हातघाई करण्याचा हुकूम दिला. हुकूम कानीं पडतांच ते त्वेषानें संगिनी समोर धरून धावले. त्यांच्या बरोबर सेनापति हॅवेलॉकही त्यांना उत्साह देण्याकरितां जात होता. संगिनींचा मारा करीत गोरे धडाडीनें पुढें आले, तसे नानासाहेबांचे गोलंदाज हतबुद्ध झाले. तोफांच्या गोळ्यांना न जुमानतां हे बहादूर लोक पुढें आले होते, आणि तोफांच्या माऱ्याच्या टप्प्याच्या आंत एकदां आल्यावर, तोफांचा या लोकांवर कांहींच परिणाम होणें शक्य नव्हतें. जवळ येतांच त्यांनीं संगिनी भोंसकण्यास सुरुवात केली. या जोराच्या माऱ्यापुढें बंडखोर टिकले नाहींत. इंग्रजांनी तोफांवर कब्जा केला. तोफा हातच्या गेल्या तसे बंडखोर मागें हटले. त्यांच्या मागें इंग्रज लागले, तोंच बंडखोरांनीं इंग्रजांना अर्धचंद्राकृती वेढा दिला. यावेळीं नानासाहेबांनीं नेट धरला असता आणि आपल्या अर्धचंद्राला भगदाडें पडूं दिलीं नसतीं, तर इंग्रजांची तेथें चटणीच उडाली असती. पण कुशल कर्णधाराच्या अभावीं जशी तुफानांत सांपडलेली नाव, नावाड्यांच्या चुका वेळींच दुरुस्त न केल्यामुळें खडकावर आदळावी, तशी नानासाहेबांच्या फौजेची स्थिती झाली. नानासाहेबांचे लोक एखाद्या भागावर जोराचा मारा झाला कीं मागें हटत, आणि तेथें त्यांच्या व्यूहांत भगदाड पडे. त्याच वेळीं त्यांना उत्साहित करून पुन्हां परत जोराचा मारा करावयाला सांगणारें कोणीं नव्हतें. बरें सांगितलें तरी त्याचा उपयोग होत नसे. कारण शिपायांची कुवत कमजोर होती व अवसान उसनें होतें. त्यांच्यांत शिस्त नव्हती व सेनापतीविषयीं विशेष आदर नव्हता. त्यांच्यांत हिंदु-मुसलमान हे तट होते, आणि हातून घडलेल्या विश्वासघातकी व क्रूर कत्तलींनीं त्यांचीं मनें कचलीं होतीं. नानासाहेब स्वदेशाभिमानी असले, तरी त्यांचे शिपाई द्रोही होते. याच्या अगदीं उलट स्थिति इंग्रज सेनेची होती. हॅवेलॉकचें लक्ष साऱ्या रणक्षेत्रावर होतें. त्याचे लहान मोठे अधिकारी कुशल होते. त्यांच्यांत, एकानें चूक केली तर ती दुसऱ्यानें तावडतोब सुधारण्याइतकी एकी होती. यामुळें त्यांचें काम सुरळीतपणें चाललें होतें. त्यांची प्रगतीच होत गेली. इकडे नानासाहेबांच्या व्यूहाची उजवी फळी इंग्रजांनीं फोडिली, आणि देशी शिपाई मागें हटूं लागले. तोफा

मागून तोफा इंग्रजांच्या हातीं पडूं लागल्या. हॅवेलॉकनें संगिनींचा जोराचा मार करून तोफा तर मिळविल्याच, पण जवळ असलेल्या गांवावरही कब्जा केला याप्रमाणें आपली सर्व खटपट फुकट गेली असें पाहातांच नानासाहेब पळाले. युद्ध थांबलें व इंग्रजांची सरशी झाली. या युद्धांत इंग्रजांकडील १०८ माणसें व शिपायांकडील २५० धारातीर्थी पडलीं. देशी शिपायांनीं कमी पराक्रम दाखविला असें नव्हे. संगिनीच्या लढाईत त्यांनीं चांगलेंच शौर्य दाखविलें, परंतु तडफ व धडाडी, आणि नेटाची चढाई किंवा बचावाची शिस्त त्यांच्यांत दिसली नाहीं.

हॉवेलॉकची फौज तहान आणि भूक यांनीं व्याकुळ झाली होती. कानपूरच्या छावणीपासून दोन मैलांवर येतांच ते विश्रांती घेऊं लागले. १७ जुलईला सकाळीं हावेलाकनें कानपूर घेण्याकरितां पुढें कूच केलें. रस्त्यांतच त्याला कानपूरच्या कत्तलीची हकीकत कळली. त्याच्या दूतांनीं त्याला सांगितलें कीं, ज्यांना सोडविण्याकरितां तुह्मी इतक्या धडाडीनें चाललां आहांत, त्यांना मुक्त करणें आतां मनुष्याच्या शक्तीपलीकडे गेलें आहे. बीबीघरांत कैद असलेलीं बायकामुलें कसायांनीं कापून काढिलीं, ही वार्ता ऐकतांच सर्व सैनिकांच्या हृदयांत चरका बसला. त्यांचीं हृदयें कळवळून आलीं. अति दुःखित व क्रोधित अंतःकरणानें ते छावणींत पोहोंचले. तेथें पोहोंचतांच त्यांना अंतरावर पुष्कळसा धूर निघत असलेला दिसला. लागलाच एक मोठ धडाका उडाला. सारी जमीन हादरली व भूकंप झाल्यासारखें वाटलें. इंग्रज अधिकाऱ्यांच्या तेव्हांच लक्षांत आलें कीं, बंडखोरांनीं बारुदखाना उडवून दिला आहे. ज्या रणसाहित्याच्या प्रचंड कोठारामुळें शिपायांना विपुल युद्धसामग्री मिळून त्यांचें बळ वाढलें होतें, तें अशा रीतीनें त्यांच्याच हातून नष्ट झालें.

१७ जुलईला पुन्हा इंग्रजांचा झेंडा कानपुरावर फडफडूं लागला. कानपूर ताब्यांत येऊन तेथें इंग्रजी निशाण फडकूं लागल्यावर, हॅवेलॉकनें आपल्या सर्व शिपायांना एकत्र केलें आणि हृदयस्पर्शी शब्दांत त्यांच्या पराक्रमाचें वर्णन करून त्यांना शाबासकी दिली. त्याचे कित्येक सैनिक लढाईंत कामास आले होते, कित्येक कडक उन्हाळ्यामुळें महामारीच्या भक्ष्यस्थानीं पडले होते, आणि बरेचसे आजारी झाले होते. अजून कानपूरला स्थिरस्थावर झालें नव्हतें. पण इतक्यांत बातमी आली कीं विठूरला नानासाहेब नवीन फौजेची जमवाजमव करीत आहे. ही बातमी ऐकतांच सर्व सैनिक चवताळून उठले. पण मागाहून ही बातमी खोटी ठरली. सर्व बंडखोर आपापल्या जागीं लपून बसले होते.

इकडे नानासाहेब कांहीं स्वारांबरोबर बिठूरला पोहोंचले. तेथें गेल्यावर त्यांना दिसून आलें कीं त्यांचे नोकर हळूहळू त्यांना सोडून जात आहेत. त्यांचा वजीर अजीमुल्ला पळून गेला. अशा स्थितींत महालांत राहाणें त्यांस अशक्य झालें. तेव्हां बायकामुलें आणि अत्यंत विश्वासांतलीं नोकर माणसें घेऊन, ते गंगा उतरून पलीकडे गेले. त्यांच्या घरची कांहीं बायकामंडळी त्यांच्याबरोबर न जातां तेथें वाड्यांतच राहिली. कदाचित् इतका परिवार बरोबर घेऊन पलायनाचा बेत जुळणें त्यांना शक्य वाटलें नसेल किंवा कदाचित् आपण विजयी होऊन पुन्हा बिठूरला येऊं असेंही त्यांना वाटलें असेल. तात्या टोपी मात्र त्यांच्याबरोबर गेला नाहीं. तो फौज जमवून इंग्रजांशीं पुन्हा सामना देण्याच्या उद्योगास लागला. लोकांनीं गप्पा उठविल्या कीं नानासाहेब गंगेंत बुडून मेले. खरी हकीकत अशी होती कीं, नानासाहेब गंगा उतरून आले तेव्हां त्यांनीं नावाड्यांना असा हुकूम दिला होता कीं, नाव नदीच्या मध्यांत आली कीं दिवा विझवून टाका, म्हणजे आपला माग कोणाला लागणार नाहीं. त्याप्रमाणें नाव नदीच्या मधोमध आल्यावर नावाड्यांनीं दिवा विझविला. नानासाहेबांनीं अंधारांतच नदीचा दुसरा किनारा गांठला होता. कांठावरून ज्या थोड्या लोकांनीं हा खेळ पाहिला, त्यांना वाटलें कीं नानासाहेबांची नाव बुडाली, आणि तिच्याबरोबर नानासाहेबही रसातळाला गेले !

आतां इंग्रजांना सूड उगवावयाला संधी मिळाली. इंग्रज सैनिकांची शौर्याबद्दल, चिकाटीबद्दल आणि धाडसाबद्दल साऱ्या जगांत ख्याती आहे. पण तितकेच ते खुनशीही आहेत. विशेषतः अशिक्षितांना आपण काय करतों याचें भान राहत नाहीं, व गोऱ्या फौजेंत त्यांचाच भरणा होता. तेच हे अशिक्षित व क्रुद्ध सैनिक आतां तर सूड उगवावयाला आले होते. त्यांच्या जातभाईनीं उभारलेली मातीची भिंत आणि तिनें वेष्टिलेलें इस्पितळी स्थान अजून तसेंच पडलें होतें. गंगेच्या घाटावर अजूनही रक्ताचे डाग दिसत होते, बीबीघरांत अजून रक्ताचा चिखल वाळला नव्हता. जागोजागीं बायकांच्या केसांचे पुंजके, लहानग्या मुलांचीं खेळणीं, बायकांचे जोडे, व टोप्या आणि अशा आठवणीच्या कित्येक लहानसहान वस्तू पडल्या होत्या. त्या घरांत एकीकडे बायबल पडलें होतें. इतकीं उत्तेजक साधनें दिसल्यावर, त्यांना झालेल्या राक्षसी कत्तलीची आठवण होऊन, त्यांच्या तोंडून पदोपदीं दुःखाचे व द्वेषाचे उद्गार निघाले तर काय नवल ? या स्मृतिचिन्हांनीं त्यांच्या हृदयाला इंगळ्यांनीं चावा केल्यासारख्या वेदना झाल्या. शिवाय इंग्रजी वर्तमानपत्रांनीं गोऱ्या

स्त्रियांवर शिपायांनीं अनेक पाशवी अत्याचार त्यांचे प्राण घेण्यापूर्वी केले अशा सपशेल खोट्या बातम्या छापून गोऱ्या शिपायांना भडकावलें होतें. त्यामुळें ते आपलें भान विसरले व सूड घेण्यास उद्युक्त झाले. संतापाच्या भरांत त्यांचा सारासार विचार नष्ट झाला, व अपराध्यांबरोबर निरपराधीही त्यांच्या क्रोधाला बळी पडले.

उन्मत्त गोऱ्या शिपायांनीं कानपूरचा जसा सत्यानाश केला, तसलें दुसरें उदाहरण इतिहासांत मिळेल कीं नाहीं याची शंकाच आहे. कानपूरच्या छावणींत आतां गोऱ्या लोकांना कोणी शत्रु राहिला नव्हता. नानासाहेबांची सेना इतस्ततः विखरली होती. परंतु गोऱ्या शिपायांनीं तेथें राहाणारा मनुष्यमात्र आपला शत्रु आहे अशी समजूत करून घेतली. त्यांच्या नजरेस जो पडेल त्याच्यावर ते गोळी झाडूं लागले. त्या वेळच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें होतें कीं, याप्रमाणें कानपूर व त्याच्या जवळपास इंग्रजांनीं एकंदर दहा हजार लोक ठार केले. हॅवेलॉकच्या सैनिकांनीं हिंदी लोकांना नादिरशहाची आठवण करून दिली खरी! बहुतेक लोक गोऱ्या शिपायांच्या भीतीनें घरांत दडून बसले होते. पुष्कळसे घरदार सोडून दूर निघून गेले होते. कित्येक तर औधच्या प्रांतांत पळून गेले. एका माणसाच्या अपराधाचें प्रायश्चित्त हजारों निरपराधी माणसांना मिळावें हें न्याय्य नव्हे. पाशवी अत्याचाराला प्रत्युत्तर पाशवी अत्याचारानें देणें, म्हणजे मनुष्यत्वावर तिलांजली देण्यासारखें आहे. गोऱ्या शिपायांना चिडून जाण्याला व त्यांचें रक्त सुडाकरितां उसळण्याला कारणेंही जबरदस्त घडलीं होतीं, यांत संशय नाहीं. त्यांचीं बायकामुलें ठार झालीं होतीं. ज्यांची सुटका करण्याकरितां इतक्या तांतडीनें, उन्हातान्हाचे व पावसापाण्याचे हाल सोसून, तसेच वाटेनें लढाया मारीत मारीत ते आले होते, ज्या बायकामुलांची सोडवणूक करण्याकरितां त्यांनीं कित्येक शिपायांचे रणसंग्रामांत बळी दिले होते, त्या इंग्रज बायका, तीं मुलें आतां कोठें होतीं? तीं बायकामुलें मृत्युमुखीं आजारानें, भुकेनें किंवा अपघातानें पडतीं, तरी हरकत नव्हती. पण त्यांचा खून ज्या नीचपणानें, नामर्दपणानें आणि निर्दयपणानें झाला होता, तो प्रकार खरोखरच चीड आणणारा होता. शिपाई चेतलेले खरे, परंतु ज्या सेनापतीवर या सैनिकांना कबजांत ठेवण्याची जबाबदारी होती, त्या सेनापतीनें यःकश्चित् क्षुद्र माणसासारखें वर्तन करावें हें केवढें आश्चर्य? त्यानें जर सैनिकांच्या कृत्यांना प्रारंभींच आळा घातला असता तर अनेक निरपराधी हिंदी लोक वांचले असते. हॅवेलॉकसाहेबानें शेवटीं तेंच केलें. त्यालाही तें दृश्य अखेरीस असह्य होऊन, शिपायांना कत्तल थांबविण्याचा

हुकूम द्यावा लागला. पण हजारों माणसांची कत्तल झाल्यावर हॅवेलॉकसाहेबानें जें केलें तेंच त्याला सुरवातीला करावयाला हवें होतें. गोरे सैनिक दारु पिऊन धुंद झाले, आणि त्या धुंदींत जनतेच्या मालमत्तेची नासाडी झाली. ज्या वस्तूवर त्यांची नजर पडे ती त्यांनीं लांबवावी; जो दिसेल त्याला ठार करावें. गोरे सैनिक इतके उन्मत्त झाले होते कीं, त्यांचा उन्माद उतरविण्याकरितां फौजी कोर्टें बसवावीं लागलीं. सर्व शिपायांना सूचना देण्यांत आली कीं, कोणाही शिपायानें लूट केली तर त्याला फांशीची शिक्षा होईल. दुय्यम प्रतीचे अधिकारीही आपापल्या तुकडींतून शिपायांना वठणीवर आणण्याचा कसोशीनें प्रयत्न करूं लागले.

यानंतर हॅवेलॉकनें कानपूरच्या छावणीच्या वायव्येकडे, नवाबगंजावरून दिल्लीला जाणारा रस्ता आपल्या ताब्यांत ठेविण्याकरितां व त्याचें रक्षण करण्याकरितां एक कंपनी नेमली. त्याला असें भय वाटत होतें कीं, बंडखोर पराभवानंतर पुन्हां एकत्र होऊन कदाचित् या दिल्लीच्या रस्त्यानें येतील आणि कानपूरवर हल्ला करितील. पण तसें कांहीं झालें नाहीं. बंडखोरांत नैतिक जोर नव्हताच, त्यामुळें एका पराभवानंतर त्यांची कंबर मोडे व ते कच खात. तरीदेखील योग्य ती काळजी घेणें आणि कोणत्याही बाजूनें बंडखोरांना यावयाला वाव सांपडूं नये अशी तजवीज करणें, त्याचें कामच होतें. तें काम त्यानें चोख रीतीनें बजाविलें. शहरांत पुनरपी शांतता स्थापित करून, शहरवासियांचीं सर्व कामें सुरळीत चालूं लागावीं याची तो खटपट करूं लागला. १८ तारखेलाच इंग्रजी राज्य आणि इंग्रजी कायद्याची कानपुरांत पुनः स्थापना झाल्याचें त्यानें जाहीर केलें. सर्व लोकांनीं बिनधोक आपापलीं कामें करावीं असेंही त्यानें जाहीर केलें. त्याच्या आज्ञेप्रमाणें कांहीं लोक कोतवालीमध्यें आले आणि कामें करूं लागले.

हॅवेलॉकनें दुसऱ्या दिवशीं बिठूरला एक सेना पाठविली. नानासाहेब पळून गेले होते. त्यांचे नोकर चाकर मात्र वाड्यांत लपून बसले होते. तेथें गोऱ्या फौजेला नानासाहेबांचा दिवाण रामचंद्रराव सांपडला. ब्रिटिशांचें सैन्य बिठूरला पोहोंचल्यावर या रामचंद्ररावानें त्यांना बरेंच साहाय्य केलें. मी प्रथमपासूनच इंग्रजांचा पक्षपाती असून या बंडाच्या विरुद्ध होतों, त्यामुळें नानासाहेबांचा मजवर राग होऊन त्यांनीं मला प्रतिबंधांत ठेवलें होतें, असें रडगाणें गाऊन त्यानें इंग्रजांना प्रसन्न करण्याचा फार प्रयत्न केला, व निमकहरामीबद्दल जहागीर लाटली. गोऱ्या शिपायांनीं बिठूरला असलेली नानासाहेबांची अगणित संपत्ति लुटली.

महालाजवळच्या विहिरींत त्यांना नानासाहेबांचीं चांदीसोन्याचीं भांडीं मिळालीं. शीखांनीं पेशव्यांची हिरे मोतीं जडविलेली तीन लाख रुपयांची तलवार घेतली. महाल व देवळें जळून जमीनदोस्त झालीं. आंतील सर्व सुंदर सामानाचा पूर्णपणें विध्वंस करण्यांत आला व पेशवाईचें स्मारक नष्ट झालें. या जाळपोळींत वाड्यांत राहिलेल्या कांहीं स्त्रिया अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडल्या, असा प्रवाद आहे. नानासाहेबांची लाडकी मुलगी आंत जळाली असेंही कांहींचें म्हणणें आहे. वाडा चोहों बाजूंनीं पेटला असतां, वरच्या गच्चीवर एक अत्यंत सुंदर कुमारिका उभी असलेली अनेक शिपायांनीं पाहिली, एवढें मात्र खरें! कोणाच्या मतें ती तात्या टोपीची पत्नी किंवा कन्या असावी.

कानपूर हातीं आलें खरें, परंतु बंडाचा जोर वाढताच होता. या वेळीं लखनऊला बंडखोरांचें प्रस्थ वाढत होतें, दिल्लीला तर त्यांची बादशाहीच स्थापन झाली होती, व आग्र्यालाही बंडखोरांनीं घेरिलें होतें. हॅवेलॉकसाहेबानें कानपूरची पुढली व्यवस्था नीलसाहेबावर सोंपविली आणि तो स्वतः लखनऊकडे रवाना झाला.

नीलसाहेबानें अपराध्यांचा पत्ता काढून त्यांना शिक्षा करण्याचें काम प्रथमच हातीं घेतलें. अलाहाबादेस त्यानें अपराध्यांना नुसतें फांशीवरच लटकविलें होतें. पण कानपूरला फांशीला एक पुस्ती जोडण्यांत आली. बीबीघराजवळची विहीर साफ बुजवून टाकण्यांत आली होती, पण बीबीघरांतला रक्ताचा चिखल तसाच पडला होता. नीलसाहेबाच्या कचाट्यांत एखादा अपराधी सांपडला म्हणजे त्याला आधीं तेथली जागा प्रसंगीं जिभेनें चाटून स्वच्छ करावी लागे. हिंदू आणि मुसलमान दोघेही, गोऱ्या लोकांच्या रक्तानें माखलेलें घर स्वच्छ करण्यास, व इतर मेहेतराचीं कामें करण्यास हरकत घेत. त्यांनीं तक्रार केली किंवा साफ करतांना ते कचरले, म्हणजे त्यांच्या पाठीवर वेताचे फटके बसत. हें झालें म्हणजे त्यांना फांशी देण्यांत येई. उद्देश हा कीं, मृत्यूनंतर त्यांच्या दृष्टीनें त्यांना नर्कलोक प्राप्त व्हावा, व धर्मभ्रष्ट स्थितींत मृत्यु आल्यानें त्यांच्या मनाला अखेरचें समाधान लाभूं नये! ६ नंबरच्या सैन्याचा एक सुभेदार नीलच्या कचाट्यांत सांपडला. त्याच्या हातांत झाडू देऊन त्याला बीबीघर झाडण्यास सांगण्यांत आलें! तो उच्च कुलांतला ब्राह्मण असल्यानें त्यानें रक्त साफ करण्याला इन्कार केला, तेव्हां त्याच्या पाठीवर वेत बसूं लागले! त्या वेदनांनीं जेरीस येऊन कण्हत कण्हत त्यानें तें रक्त चाटून साफ केलें! यानंतर त्याला फांशीं दिलें आणि त्याचें प्रेत भर रस्त्यांत फेंकून देण्यांत आलें!!

याप्रमाणें स्वतांचें दगडाचें हृदय असल्याबद्दलचा पुरावा निर्दय नीलसाहेबानें दिला. यासंबंधानें त्यानें लिहिलें आहे:—"दोनशेंहूनही अधिक इंग्रज स्त्रिया व मुलें बीबीघरांत आणलीं होतीं. त्यांतलीं कित्येक नावेंतच मेलीं व कित्येक कैद होतांना मेलीं. जीं काय ताप, महामारी इत्यादीं रोगांच्या कचाट्यांतून वांचलीं तीं सर्व येथें मारलीं गेलीं. त्यांना जें अन्न मिळे तें अगदींच वाईट असे. पण यापेक्षांही वाईट वर्तन त्यांच्याबरोबर केलें जाई. त्यांचीं कामें करावयाला नोकर माणसें नव्हतीं, व सरतेशेवटीं त्यांना खाटकांनीं गुरांप्रमाणें कापून काढलें. जीं बायकामुलें आजारामुळें मेलीं होतीं त्यांचीं प्रेतें एका विहिरींत फेकून देण्यांत आलीं होतीं; व नंतर ज्यांची तलवारीनें कत्तल करण्यांत आली, त्यांचीं प्रेतेंदेखील त्याच विहिरींत टाकून देण्यांत आलीं. येथें आल्याबरोबर मी तें घर पाहिलें. तेथें जागोजाग बायकामुलांच्या रक्तानें माखलेले कपडे व जोडे पडले होते. तेथेंच डोक्याच्या केंसांचे पुंजके पडले होते. ज्या घरांत त्यांची कत्तल उडविली तेथें अजूनही रक्ताचा चिखल सांचलेला आहे. हें दृश्य पाहून कोणालाही आपलें मन ताब्यांत ठेवणें कठीण आहे. ज्यांनीं हें काम केलें त्यांच्यावर कोण दया करूं शकेल? ज्या शिक्षेमुळें हिंदी लोकांना सर्वांत जास्त दुःख होईल व जें काम करितांना त्यांना जास्तींत जास्त वेदना होतील, तीच शिक्षा त्यांना द्यावी व तींच कामें त्यांना जबरीनें करायला लावावीं असें मला वाटतें. ही शिक्षा हिंदुधर्माविरुद्ध असली तरी या प्रसंगाला योग्यच आहे."

ज्या वेळीं नील कानपूरला आला त्या वेळीं गोरे व शीख दोघेही सर्व शहरभर मनसोक्त लूट करीत होते. नीलनें कडक शब्दात आज्ञा दिली तेव्हां ही लुटालूट बंद झाली. यासंबंधानें तो लिहितो—"ज्या दिवसापासून मी येथें पाय ठेवला, त्या दिवसापासून येथें शांतता प्रस्थापित करण्यासाठीं व येथली घडी नीट बसविण्यासाठीं मला अविश्रांत श्रम करावे लागले. मी आलों त्या वेळीं सर्वजण लुटालुटींत मग्न होते. मी शांतता राखण्याचे नियम केले आणि ते सक्तीनें अमलांत आणलें. फौजी लोकांनीं अगदीं निर्लज्जपणाचें वर्तन केलें. बंडखोर धरला जातांच त्याचा निकाल लागे. कोणीही बंडखोर आपल्या बचावाकरितां पुरावा देतांना अडखळला किंवा योग्य प्रमाणें देऊं शकला नाहीं, कीं तो फांसावर लटकावला जाई. ज्या ठिकाणीं इंग्रज बायकामुलांची कत्तल झाली त्या जागीं रक्ताचा अजूनही दोन इंचांचा थर आहे. येथला एक भाग मी मुद्दाम बंडखोरांकडून साफ

करविला. उच्च जातीचे हिंदू प्रेताच्या रक्ताला स्पर्श करणें घृणित आणि निंद्य मानतात. त्यांची धार्मिक समजूत अशी आहे कीं, यामुळें आत्मा अनंत काळ नरकांत पडून राहतो. त्यांच्या मनांत काय असेल तें असो, पण माझा उद्देश हाच कीं, त्यांच्याकडून हींच कामें करवून घेऊन त्यांच्यावर जबरदस्त दहशत बसवावी."

कानपूर येथील कत्तल अत्यंत नीच व राक्षसी तर खरीच, परंतु इतिहासांत ही एकच कत्तल आजपर्यंत घडली असें नाहीं. खुद्द सुधारलेल्या युरोपखंडांत प्राटेस्टंट व क्याथलिक लोकांनीं केलेल्या एकमेकांच्या कत्तली प्रसिद्ध आहेत. फ्रान्समधील सेंट बार्थालोमो येथील कत्तल प्रसिद्धच आहे, व सिसिलीच्या राजधानींत संध्याकाळीं उपासनामंदिरांत उडलेली कत्तल विस्मरणाच्या कप्यांत अजून दडली नाहीं. हिंदी लोकांना वाटलें कीं आपल्या धर्मावर घाला आला, आणि धर्माच्या तीव्र भावना एकदां जागृत झाल्या कीं, माणसाच्या हातून अत्याचार घडतात. इंग्रजांनीं पुष्कळ जीव तोडून सांगितलें कीं तुमच्या धर्मांत हात घालण्याची आमची इच्छा नाहीं; पण इंग्रजांवर कोणाचा काडीमात्रही विश्वास बसेना. पाहतां पाहतां इंग्रजांनीं हिंदू व मुसलमान या दोघांचाही पराभव करून हिंदुस्थानचें राज्य संपादन केलें. तागडी घेऊन व्यापाराची परवानगी मिळविण्याकरितां, बादशहाच्या दाढीला हात लावून खुशामत करतां करतां त्यांनीं सार्वभौम मोंगल बादशहाला बुटाच्या टांचेखालीं दाबून धरलें. इंग्रज कंपनीनें या देशांत राज्य कसें कमावलें याचा इतिहास ग्रंथारंभीं मुद्दामच विस्तारानें सांगितला आहे. कारण त्यामुळें इंग्रजांवर लोकांचा व शिपायांचा विश्वास कां बसेना, याचा उलगडा होईल. कंपनीला नीतीचें वावडें होतें. त्यामुळें इच्छा नसतांना इंग्रजांनीं ज्याप्रमाणें हिंदुस्थानचें राज्य घशांत टाकलें, त्याप्रमाणेंच हिंदु-मुसलमानांच्या धर्मांत हात घालण्याची इच्छा नसतांना देखील ते हिंदुस्थान ख्रिस्ता करतील, अशी भीति शिपायांना वाटत होती. त्यामुळें शिपायांच्या धर्मभावना भडकल्या व त्यांच्या हातून अत्याचार घडले. धर्मवेडाचा प्रभाव विलक्षण आहे. खुद्द ख्रिस्ती लोकांतील रोमन क्याथलिक व प्रॉटेस्टंट या दोन पंथांच्या लोकांनीं एकमेकांना जीवंत जाळण्यापर्यंत कसे अत्याचार केले, हें इतिहासप्रसिद्ध आहे. हिंदुस्थानांतील लोकांची कडवी धर्मश्रद्धा विश्रुतच आहे. त्यामुळें या शिपायांच्या हातून कानपूरची कत्तल घडून आली. इंग्रज आपला धर्मनाश करणार ही गोष्ट शिपायांच्या मतें निश्चित झाली असल्यामुळें, प्रत्येक इंग्रज पुरुष किंवा स्त्री त्यांना

शत्रूप्रमाणें वाटूं लागली. शिपायांनीं हा आपला राग केवळ इंग्रजांवरच काढला असें नाहीं, तर हिंदी ख्रिस्ती स्त्री-पुरुषही त्यांच्या कोपाला बळी पडले.

कानपूरच्या वेढयांत सांपडलेल्या इंग्रजांची संख्या खालीलप्रमाणें होतीः—

| | |
|---|---|
| गोरे शिपाई ... ... ... ... ... | २१० |
| गोरे फौजी अधिकारी ... ... ... ... | १०० |
| मुलकी खात्यांतील किंवा व्यापारी इंग्रज ... ... ... | १०१ |
| स्त्रिया व मुलें ... ... ... ... ... | ५४६ |
| एकंदर | ९४७ |

यांपैकीं बरेच लढाईत कामीं आले. अन्नावांचून वेढयांत अगदीं उघड्या व मोडक्या घरांत, भर उन्हाळ्यांत सांपडल्यामुळें स्त्रियामुलांचे अतोनात हाल झाले, आणि आजारानें किंवा जखमी होऊन यांपैकीं बरींच माणसें मृत्युमुखीं पडलीं. कुमारी लिंडसे हिनें आपल्या कुटुंबावर कोसळलेल्या संकट-परंपरेची हकीगत एका चिठ्ठीवर लिहून ठेवली होती. कानपूर सर केल्यानंतर बिबीघरांत इंग्रजांना ती सांपडली. तिच्यावरून कानपूरच्या वेढयांत इंग्रजांचे—केवळ लढाऊ पुरुषांचेच नव्हे—कसे हाल झाले याची कल्पना होते. तिची ही छोटी रोजनिशी खालीं दिली आहे.

| | | |
|---|---|---|
| २१ मे | ... | दवाखान्यांत रहावयास आले. |
| ५ जून | ... | घोडदळ उलटलें. |
| ६ जून | ... | पहिला गोळा उडाला. |
| १७ जून | ... | लिली मावशी वारली. |
| १८ जून | ... | विली काका वारले. |
| २७ जून | ... | गंगेवर गेलों. जार्ज मारले गेले. |
| ९ जुलै | ... | अलिस वारली. |
| १२ जुलै | ... | आई वारली. |

× × × ×

पुढील अमानुष खाटकी कत्तलींत ही कुमारी आपल्या बहीणीसह मारली गेली.

१२ जुलै पूर्वी लिंडसे कुटुंबांतील तिघी स्त्रिया कानपूरला वारल्या खऱ्या, परंतु याबद्दल शिपायांकडे गुन्हा लागू होत नाहीं. कारण युद्धाची कथा रम्य असली तरी

प्रत्यक्ष युद्ध अत्यंत भयानक असतें. पुरेसा आसरा नाहीं, पुरेसें अन्नपाणी नाहीं, अंगावर संवय नसलेली उन्हाळ्याची आग, आणि वरून तोफांचा मारा, अशा स्थितींत २७ जूनपूर्वीं बरींच इंग्रजांचीं माणसें कामास आलीं. वेढयांतील स्त्रिया–मुलांची दशा पाहूनच सेनापती व्हीलर व इतर इंग्रज अधिकारी कळवळले, आणि स्वतांची इच्छा बाजूस सारून ते बंडवाल्यांना शरण गेले. लिंडसे कुटुंबाप्रमाणें, वेढयांत सांपडलेल्या इतर इंग्रज कुटुंबांची अशीच वाताहात २७ जूनपूर्वीं झाली असावी. त्या प्राणहानीबद्दल स्वाभाविक हळहळ वाटली, तरी कोणाला दोष देतां येत नाहीं. परंतु प्रथम इंग्रजांना विश्वास दाखवून २७ जून रोजीं गंगेच्या घाटावर त्यांच्यावर केवळ फसवेगिरीनें जो अवचित छापा घालण्यांत आला, त्याबद्दल शिपायांना दोष देणें जरूर आहे. तोफांचा भडिमार करून बंडवाल्यांनीं व्हीलरसाहेबांनीं उभारलेला मातीचा कोट जमीनदोस्त केला असता व इंग्रज स्त्रिया-मुलें त्या भडिमारांत मारलीं गेलीं असतीं, तर शिपायांना दोष देण्याचें कांहींच कारण नव्हतें. ती गोष्ट सामान्य युद्धापत्तीच समजली जाते ! परंतु व्हीलरनें भलत्याच जागीं कोट उभारून घोडचूक केली, तरी देखील बंडवाल्यांना तें स्थान सर करतां आलें नाहीं. इंग्रजांनीं व विशेषतः त्यांच्या स्त्रियांनीं ज्या धैर्यानें व शौर्यानें विपत्तीशीं झुंज घेतली, व सर्वतोपरी प्रतिकूल परिस्थिती असूनही, आपल्या पुरुषांना साहाय्य केलें व लढण्यास उत्तेजित केलें, त्याबद्दल त्यांची स्तुति कितीही केली तरी ती अपुरी पडेल. उलटपक्षीं, असंख्य बंडवाल्यांना तोफा व दारुगोळ्याचा भरपूर पुरवठा असतांना देखील मूठभर इंग्रजांचा पराभव करून त्यांचा किल्लेकोट सर करतां आला नाहीं, यावरून त्यांची ढिलाई व्यक्त होते. परंतु पराक्रमानें साध्य न झालेली गोष्ट या भ्याडांनीं विश्वासघातानें घडवून आणली.

शिपायांना याहीपेक्षां अधिक कालिमा आणणारी गोष्ट म्हणजे, इंग्रज सैन्य कानपुरावर चालून आल्यावर असहाय स्त्रिया-मुलांची १५ जुलैला बिबीघरांत केलेली कत्तल, ही होय. एकवीस दिवसांच्या वेढयांतून व २७ जूनच्या विश्वासघातकी हल्ल्यांतून जे थोडेसे लोक वांचले होते, त्यांत फत्तेगडाहून आलेल्या स्त्रिया-मुलांची भर पडली होती. फत्तेगडाहून आलेल्या नावेंत १९ पुरुष, २३ स्त्रिया व २६ मुलें होतीं. यांपैकीं पुरुषांची तर ताबडतोब कत्तल करण्यांत आली, परंतु स्त्रिया-मुलांना बिबीघरांत पाठविण्यांत आलें होतें. यापैकीं कांहीं आजारांनीं व जखमांची योग्य शुश्रूषा न झाल्यामुळें मरण पावलीं. परंतु उरलेल्या सर्वांची १५ जुलै रोजीं

कत्तल करण्यांत आली. या शेवटच्या कत्तलींत २१० स्त्रिया-मुलें कापलीं गेलीं व प्रेतांची तेथें जवळच असलेल्या एका विहिरींत वाट लावण्यांत आली. कानपुरची प्रसिद्ध विहीर ती हीच होय. या विहिरीसमोर आज लज्जेनें खालीं मान घालणें हिंदी लोकांना भाग आहे. अशा कत्तली जगाच्या इतिहासांत दुसरीकडे घडल्या आहेत, या सबबीनें आपलें पाप कमी होत नाहीं. गुन्हा तो गुन्हाच. ही शेवटची नामर्द कत्तल करण्यास एकही हिंदु शिपाई तयार झाला नाहीं, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. अन्नदात्या व दुग्धदात्या निरपराधी गरीब गाईंची नित्यशः कत्तल करण्याची सँवय झालेल्या मुसलमान खाटकांनींच ही हत्या केली. बेगम नांवाची एक मुसलमान हलकट बाई व सुरवरखान नांवाचा तिचा खाटिक प्रियकर यांनीं या कत्तलींत प्रामुख्यानें भाग घेतला. या कत्तलींत इंग्रज स्त्रियांबरोबर कांहीं देशी खिस्ती स्त्रिया व त्यांचीं मुलेंही मारलीं गेलीं. कांहीं विश्वासु आयांनीं गोरीं मुलें या खाटकांच्या स्वाधीन न करतां, आपल्या जातीपातीच्या नसलेल्या अर्भकांसाठीं केवळ वत्सलतेनें व प्रेमानें मृत्यूला कवटाळलें. या स्वामिभक्तीची थोरवी वर्णावी तितकी थोडीच.

या दोन्ही गोष्टींचा दोष कोणाकडे येतो ? कानपूर येथील बंडाचे पुढारी नानासाहेब पेशवे असल्यामुळें, किंबहुना बंडाच्या मूळ प्रवर्तकांपैकीं ते एक असल्यामुळें त्यांना या कलंकाचा प्रमुख वांटा उचलणें भाग आहे. त्यांच्या अनुयायांनीं कृष्णकृत्यें केलीं तरी पुढाऱ्यावर तो दोष शेकणारच. 'मारे शिपाई और नाम सरदारका,' या म्हणीप्रमाणें अनुयायांच्या वर्तनानें सरदारांचा जसा फायदा होतो, तसाच प्रसंगविशेषीं तोटाही होऊं शकतो. शिपायांनीं लढाईंत विजय मिळविला कीं पुढाऱ्याचा फायदा होतो व कीर्तीही त्याच्या पदरांत पडते. त्याचप्रमाणें शिपायांच्या अपयशाचें व कुवर्तनाचें खापरही त्याच्या कपाळीं लोकांनीं फोडावें हें सहाजिक आहे. विशेषतः, पुढाऱ्यांच्या निरपराधी बायकामुलांची अमानुष कत्तल झाल्यामुळें संतापलेल्या इंग्रजांना नानासाहेब मूर्तिमंत राक्षस वाटावा, यांत नवल नाहीं. पुढारी या नात्यानें या दोन्ही गोष्टींचा कलंक त्यांना लागतो यांत शंकाच नाहीं. परंतु घडलेल्या प्रकारांत त्यांचें प्रत्यक्ष अंग कितपत होतें, किंवा झालेल्या प्रकाराला त्यांची कितपत संमति होती, हा प्रश्न आहे. नानासाहेबांच्या घरच्या स्त्रियांनीं, इंग्रज बायकामुलांच्या केसालादेखील धक्का लावण्यांत येऊं नये, म्हणून उपासतापास चालविले होते व त्यांना इजा झाल्यास आपण आत्महत्या करूं असाही धाक घातला होता, असा पुरावा उपलब्ध आहे. १८५७ सालापूर्वी

नानासाहेबांच्या उमद्या, सालस व दिलदार स्वभावाचें अनेक इंग्रजांनीं स्वानुभवानें केलेलें वर्णन आज उपलब्ध आहे. कानपुरांत मुसलमानांचें प्रस्थ वाढल्यामुळें, त्यांना खुश करण्याकरितां कानपूरचा मुख्य अधिकार नव्हे नबाबाच्या सुप्रत नानासाहेबांस करावा लागला, ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. सेनापतीपेक्षां बेगम किंवा अझीझन नायकीण अशा हलकट स्त्रियांची शिपायांवर अधिक हुकमत होती, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. अशा स्थितींत व्यक्तिशः नानासाहेबांना घडलेल्या प्रकाराबद्दल कितपत दोष देतां येईल? अनावर व दुराचारी लोकांनींच हे अत्याचार नानासाहेबांच्या नांवावर केले असावेत, असा संशय येतो. गेलेली पेशवाई परत मिळविण्यासाठीं नानासाहेबांनीं बंडाचा अखेरचा फासा टाकून पाहिला याबद्दल त्यांना दोष देतां येत नाहीं. हा त्यांचा पुरुषार्थ आहे. ते हरले ही गोष्ट निराळी; परंतु मेलेलें अन्न खाण्यापेक्षां रणांगणावरील शय्या त्यांना आवडली, व बिकट परिस्थिती समोर दिसत असतांही त्यांनीं बलाढ्य इंग्रजी सत्तेशीं झुंज घेतली, यांत त्यांचा स्वाभिमानच व्यक्त होतो. परंतु बंड करणें निराळें, आणि विश्वासघात करणें निराळें! इंग्रजांना रणांगणांत यमलोकीं पाठविणें निराळें, व असहाय अबलांची आणि अर्भकांची खाटकी कत्तल करणें निराळें! ५७ सालापूर्वीं दिलदार व उमदा समजला गेलेला नानासाहेब अशीं घोर कृत्यें करील कीं काय, याबद्दल संशय वाटतो.

झालेल्या प्रकाराबद्दल तात्या टोपीकडे मुळींच दोष येत नाहीं. कानपूर इंग्रजांच्या हातीं पडून बंडवाल्या शिपायांची वाताहात झाल्यानंतरच तात्या टोपीची स्वतंत्र, व चमकदार कारकीर्द सुरू झाली. त्यानंतरच त्यानें लोक गोळा करून पेशव्यांच्या तर्फे फौजेचें आधिपत्य स्वीकारलें व मराठी चमक इंग्रजांना दाखविली. कानपूरला त्याचा दर्जा कनिष्ठच होता. कारण इंग्रजी पलटणींतील निमकहराम बनलेल्या देशी शिपायांचेंच तेथें प्रारंभीं प्रस्थ माजलें होतें व तसें होणें साहजिक होतें. कारण बंडाची मुख्य मदार प्रारंभीं तरी त्यांच्यावरच होती. त्यांनींच इंग्रजांविरुद्ध स्वधर्मरक्षणार्थ आरंभीं बंड पुकारलें. १७ जुलैपर्यंत ब्रिगेडीअर ज्वालाप्रसाद व टीकासिंग यांचीच फौजेवर हुकमत होती. प्रत्येक जमादार-सुभेदार आपल्याच गुर्मीत असल्यावर तात्या टोपीला विचारतो कोण? तात्या टोपी अत्यंत स्वामिभक्त होता, परंतु बंडखोर शिपायांच्या दृष्टीनें नानासाहेबांचा एक आश्रित एवढीच त्याची त्या वेळीं किंमत होती. त्याचें शौर्य तोंपर्यंत तरी शमीवृक्षांतील अग्नीप्रमाणें सुप्तच होतें. गोऱ्यागोमट्या, विलायतेस जाऊन आलेल्या, व मिठास भाषण करणाऱ्या अजीमुल्लाचें नानासाहेबांवर व शिपायांवर त्या वेळीं

विलक्षण वजन होतें. झालेल्या अत्याचारांची योजना त्याच्या सुपीक व तडफदार मेंदूतून निघाली असल्याचा संभव आहे. कारण अजीमुल्लाचें ग्रहण कानपुरास लागलें असल्यामुळें तात्या टोपीची योग्यता बंडवाल्यांना कळणें अशक्य झालें होतें. कत्तलींत मुसलमान खाटकांनीं जो प्रामुख्यानें भाग घेतला, त्यावरून अजीमुल्लाच या अत्याचारांच्या मुळाशीं असावा या संशयाला दुजोरा मिळतो.

इंग्रजांनीं कानपूर घेतल्यानंतर अनेक हिंदी लाळघोटे त्यांच्या भोंवतीं जमले व त्यांनीं नानासाहेबांबद्दल बऱ्याच खऱ्याखोट्या गोष्टी इंग्रजांना तिखटमीठ लावून सांगितल्या व त्यांची मर्जी सुप्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न केला. नानासाहेबांचा एकजात शत्रू नानकचंद वकील यानें देखील या दुतोंड्या लोकांना अविश्वासी ठरविलें आहे, व त्यांच्या जबान्यांना काडीमात्र किंमत देऊं नये असें इंग्रजांना परोपरीनें विनविलें. नानासाहेब असतांना त्यांचा या लोकांनीं पेशवा म्हणून जयजयकार केला, परंतु त्यांचे ग्रह उलटतांच हे आपण त्या गांवचेच जणूं नव्हेत, असा बहाणा इंग्रजांजवळ करूं लागले! नानासाहेबांचा कारभारी नारायण रामचंद्र सुभेदार यानें तर त्या वेळीं इंग्रजनिष्ठेचें असें कांहीं सोंग आणलें कीं यंवरे यंव! त्याच्या ढोंगाची नानकचंदालाही चीड आली. परंतु नानासाहेबांविरुद्ध पुरावे म्हणून त्यानें थोडेसे उर्दू कागदपत्र व जाहीरनामे इंग्रज सेनापतीपुढें पेश केल्यामुळें इंग्रजांनीं त्याचा अतोनात सन्मान केला. हे सर्व जाहीरनामे अत्यंत सुंदर अशा उर्दू किंवा पर्शियन भाषेंत लिहिलेले होते. त्याचप्रमाणें ठिकठिकाणच्या शिपायांना पाठविण्यांत आलेल्या अभिनंदनपर किंवा उत्तेजक पत्रांच्या ज्या नकला पेश करण्यांत आल्या, त्यादेखील अस्सल उर्दू भाषेंत लिहिलेल्या होत्या. यावरून कानपुरच्या दंगलींत अजीमुल्लाचें असलेलें प्रस्थ व्यक्त होतें. इंग्रजांना रुचतील अशा तऱ्हेच्या जबान्या देऊन या दुतोंडी लोकांनीं आपला स्वार्थ साधला व नानासाहेब पेशवे आणि तात्या टोपी यांचीं नांवें विनाकारण अतोनात बद्दू केलीं. इंग्रजांनीं या दोघांची त्यांच्या गैरहजेरींत, या लाळघोट्यांच्या एकतर्फी जबान्यांच्या आधारें न्यायाची चौकशी केली व त्यांना दोषी ठरविलें. नारायण रामचंद्राला या खऱ्या खऱ्या स्वामीद्रोहाबद्दल व दिखाऊ इंग्रजनिष्ठेबद्दल शाबासकी व वर जहागीर मिळाली. परंतु पुढें म्हातारपणीं मात्र हे बिठूरचे हत्तीवाले सुभेदार, ‘नानासाहेबांच्या अंगांत विशेष कर्तृत्व नव्हतें, व बंडांत त्यांनीं पुढाकार घेतला नसून, शिपायांनीं त्यांना जबरीनें ओढलें’ अशी भाषा बोलूं लागले व लेखी पत्रें लिहूं लागले. [श्री. न. चिं. केळकर यांच्याजवळ सदर सुभेदार घराण्यांतील बंड प्रत्यक्ष पाहिलेल्या

एका प्रमुख व्यक्तीनें ज्ञातारपणीं लिहिलेलें मासलेवाईक पत्र आहे.] कानपुर सर केल्यानंतर इंग्रजांच्या भोंवती नादान चोंबड्यांची स्वार्थाकरितां जी मासलेवाईक गर्दी जमली, तिचें मार्मिक वर्णन नानकचंदानें केलें आहे. तो प्रथमपासूनच इंग्रजभक्त असल्यामुळें त्याच्या डायरीला विशेष किंमत आहे. तो वकील होता, त्यामुळें सुभेदार खोटें बोलत आहेत हें माहीत असूनही त्याला बळकट पुराव्याच्या अभावीं गप बसावें लागलें. या एकतर्फी साक्षीपुराव्यावरून व चौकशीवरून नानासाहेब, रावसाहेब, बाळाराव व नानासाहेबांचा पहिल्या घरचा सख्खा थोरला भाऊ बाबाभट हे सर्वच दोषी ठरले. त्याचप्रमाणें तात्या टोपीवर देखील पुढें या प्रकरणाचा दोष ढकलण्यांत आला. मात्र तात्या टोपी हातीं लागल्यावर त्याच्यावर जो लष्करी कोर्टापुढें खटला करण्यांत आला, त्यांत बायकामुलांची कत्तल केल्याचा किंवा विश्वासघातानें हल्ला करण्याचा आरोप तात्यावर लादण्यांत आला नाहीं, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. फक्त इंग्रजी सत्तेविरुद्ध बंड केल्याचा आरोप त्याच्यावर ठेवण्यांत आला, आणि त्यानें त्यावर मोठी बाणेदार जबानी दिली.

तात्यानें कानपुर येथें घडलेल्या अत्याचारांचा दोष सर्वस्वी शिपायांच्या माथीं मारला आहे. त्यानें आपल्या जबानींत स्वच्छ सांगितलें आहे कीं, 'शरण आलेल्या इंग्रजांना त्यांच्या बायकामुलांसह प्रयागला पाठविण्याची नानासाहेबांनीं व मीं शक्य तेवढी खटपट केली. परंतु शिपाई आमच्या कह्यांत राहिले नाहींत. त्यांनीं नदींत उतरून कत्तल करण्यास सुरवात केली. शिपाई कोणालाच त्या वेळीं मानीत नव्हते.' तात्या टोपीची जबानी सरळ व सडेतोड आहे. यामुळें कानपूरच्या कत्तलीचा कलंक नानासाहेबांना प्रत्यक्षपणें कितपत लागतो, याबद्दल जबरदस्त शंका आहे. कारण शिपाई कोणाच्याच कह्यांत वागत नव्हते हा अनुभव इंग्रजांनाही आला आहे.

नानासाहेबांच्या तर्फे अत्यंत महत्त्वाचा साक्षीदार म्हणजे महमद अली हा होय. हा इंग्रजी शिकलेला असून रुरकी येथील एंजीनिअरी परीक्षा पास झाला होता. हा बरेली येथील एका थोर सरदार घराण्यांत जन्मास आला असून, नेपाळच्या जंगबहादूरचा खासगी चिटणीस या नात्यानें त्यानें त्यांच्याबरोबर ५७ पूर्वी विलायतची यात्रा केली होती. अझीमुल्लाचा व याचा अतिशय स्नेह होता. परंतु लखनौकरांतर्फे जिमीग्रीन हें टोपण नांव धारण करून, तो इंग्रजी छावणीचा भेद घेत असतां त्यांच्या हातीं लागला. अर्थातच हेर म्हणून त्याला फांशीची शिक्षा

सुनावण्यांत आली. मृत्यूच्या आधल्या दिवशीं रात्रीं त्यानें आपलें चरित्र फार्बेस-मिचलला सांगितलें. कारण त्याचा मृत्यु चुकविणें जरी फार्बेस मिचलच्या हातीं नव्हतें, तरी त्यानें त्याचा मृत्युपूर्वी धर्मछल होऊं दिला नाहीं. त्यानें आपल्या जबानींत स्वच्छ सांगितलें कीं, 'नानासाहेबांच्या मनांत बायकामुलांना वांचवावयाचें होतें, व त्यांनीं त्या बाबत पुष्कळ प्रयत्नही केला. परंतु त्यांचा इलाज चालला नाहीं. बेगम व अजीमुल्ला या कत्तलीबद्दल सर्वस्वी जबाबदार आहेत. तिचा इंग्रजांवर इतका राग कां होता कोण जाणे.' अजीमुल्लाच्या खास मित्रांपैकीं एका खानदानी मुसलमान सरदाराची व सुशिक्षित एंजीनियरची मृत्यूपूर्वी दिलेली ही जबानी वाचली म्हणजे कत्तलीचा दोष पेशव्यांकडे नसावा अशी खात्री पटते.

[Reminiscences of the Great Mutiny, by F. Michael, Pages 174–193].

कानपूरला बायकामुलांची अमानुष कत्तल झाली खरी, पण इतर अनाचार व अत्याचार त्यांच्यावर घडले नाहींत ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. त्यावेळीं वर्तमानपत्रांत अशा अत्याचारांच्या बातम्या (बळजबरी वगैरे) प्रसिद्ध झाल्या होत्या, व त्यामुळें इंग्रज अधिकच चवताळले. सर्वत्र एकच संताप व सुडाचा ध्वनी निघाला, आणि विलायतेंतील इंग्रजही अत्यंत क्रुद्ध झाले. त्या तीव्र संतापामुळें गोऱ्या शिपायांनीं विजय मिळाल्यानंतर घोर कर्मे केलीं. कदाचित् इंग्रजशिपायांना लढण्यास स्फुरण चढावें, म्हणून या बातम्या कांहीं हलक्या मनाच्या व कानाच्या इंग्रज लोकांनीं प्रसिद्ध केल्या असाव्यात. परंतु त्यांचा परिणाम अपेक्षेबाहेर होऊन इंग्रजही तात्पुरते राक्षस बनले. कानपूर सर केल्यानंतर त्यांनीं तेथें जी सररास बीजन केली, त्यामुळें गंगेचें पाणी बरेच दिवस लाल दिसत होतें असें म्हणतात, आणि कलकत्त्यापर्यंत हे मानवी रक्तामांसाचे ओंडके वाहत वाहत समुद्राला जाऊन मिळतांना दिसत असत. चौकशीअंतीं बंडवाल्या शिपायांच्या अत्याचाराच्या सर्व बातम्या गटारगप्पा ठरल्या, आणि पुरेसें व पौष्टिक अन्न खाण्यास न देणें व स्त्रियांकडून दळण्याकांडण्याचीं व काबाडकष्टाचीं कामें करवून घेणें, एवढीच सत्यता या गटारयंत्रांतून बाहेर आली. सारांश, स्त्रियांची अब्रू व त्यांचें पातिव्रत्य यांना काळ्या बंडवाल्या शिपायांनीं यत्किंचितही धक्का लावला नाहीं, ही गोष्ट सर्व इंग्रजी इतिहासकारांनीं मोकळ्या मनानें मागाहून कबूल केली आहे. याला एकच अपवाद आहे. २७ जून रोजीं गंगेच्या घाटावर इंग्रजांवर जो अचानक छापा घालण्यांत आला, त्या वेळीं सेनापती

व्हीलरसाहेबांच्या धाकट्या मुलीला अलीखान नांवाच्या एका तरुण, सुंदर आणि धिप्पाड घोडेस्वारानें पळविलें. ती मुलगीही वयानें १७–१८ वर्षांची असून फार सुंदर होती, आणि तिच्या अंगांतील हिरवा झगा ओला झाल्यामुळें तिच्या अंगाला चिकटून तिचें सौंदर्य अधिकच उठावदार करीत होता. अलीखानानें पुढें मुसलमानी धर्माप्रमाणें तिच्याशीं निका लावला व तीं दोघेंही १८५७ नंतर बेपत्ता झालीं. कदाचित् तिनें मुसलमानी नांव धारण करून गोषांतील संसार कुठेंतरी थाटला असेल. हें एवढें अपवादात्मक उदाहरण सोडून दिल्यास, कानपूरची कत्तल क्रूर असली तरी अधःपातनिदर्शक नव्हती असें म्हणावें लागेल, आणि म्हणूनच कानपूरच्या विहिरीसमोर शिपायांच्या अमानुष क्रूरतेची आठवण होऊन हिंदी माणसाला लाज वाटली, तरी स्वतांचा तिरस्कार मात्र खात्रीनें वाटत नाहीं.

---

## प्रकरण २२ वें.

# दिल्लीवरील हल्ला



दिल्ली शहरापासून कांहीं अंतरावर एक लहानशी ५० ते ८० फूट उंचीची मुरमाडी टेकडी आहे. येथून दिल्लीवर मारा करणें सोयीस्कर असल्यामुळें, छावणीकरितां हीच जागा इंग्रजांनीं पसंत केली. या रिजवर एक गोरी फौज डेरे टाकून पडली होती. दिल्लीला बंड झालें, तेव्हां बंडखोरांपासून दिल्ली शहर काबीज करण्याकरितां म्हणून ही फौज आली होती. या छावणीजवळ ग्वालेरच्या शिंद्यांचा एक वाडा होता. तो हिंदुरावांचा वाडा म्हणून प्रसिद्ध असे. त्या वाड्यांत पूर्वी जिवबा नांवाचा एक सरदार रहात असे. हा जिवबा मराठा असला तरी त्याचा थाट व रहाणी अगदीं साहेबी असे. आणि म्हणूनच त्यानें आपला वाडा साहेबी थाटानें सजविला होता. त्याच्या मृत्युनंतर वाड्यांत कोणीच रहावयास आले नाहीं, कारण ते सरदार मूळ ग्वाल्हेरचे असून केवळ राजकीय कारणाकरितां त्यांना ही हद्दपारी झाली होती. गोरी फौज तेथें येऊन पोहोंचली, तेव्हां वाडा रिकामा आहे असें पाहून सेनापती सर हेनरी बर्नार्ड यानें आपलें बिऱ्हाड या वाड्यांतच ठेविलें. शेजारच्या कांहीं धड असलेल्या व कांहीं मोडकळीस आलेल्या इमारतींतून थोड्याशा शिपायांनीं आपलीं बिऱ्हाडें केलीं. बाकीचे शिपाई तंबू राहुट्यांतून त्या टेकाडावरच रहात असत. टेकडाच्या उतरणीवर ही छावणी वसली असल्यामुळें, थोडासा सुरक्षितपणा तिला

अनायासें लाभला होता. चारी बाजूंनीं तोफांचे मोर्चे लावून आपल्या संरक्षणाची तयारी गोऱ्या फौजेनें जय्यत ठेविली होती. या ठिकाणापासूनच चार दिशांना चार रस्ते फुटत असल्यानें गोऱ्या फौजेला हें स्थान फार सोइचें झालें होतें. सेनापती वाड्यांतूनच शत्रूच्या फौजेची हालचाल निरखीत बसत असे. या वेळीं बर्नार्ड साहेबाच्या ताब्यांत तीन हजार गोरे शिपाई असून बावीस तोफा होत्या. शिवाय पंजाबांतून आलेले गुर्खे व शीख शिपाईही होते. बंडखोरांची संख्या या मानानें पुष्कळच मोठी होती. त्यांच्याजवळ युद्धसामुग्रीही भरपूर असल्यानें त्यांनीं कित्येकदां इंग्रजी छावणीवर हल्ला केला आणि गोऱ्या शिपायांना पळवून लाविण्याची खटपट केली. तारीख बारा जूनला तर त्यांनीं विशेष जोराचा हल्ला केला पण तोही नेहमीं-प्रमाणें फुकट गेला.

तारीख सतराला इंग्रजी छावणींत अशी बातमी आली कीं, देशी शिपाई जवळच्या किसनगंज गांवांतून बॅटरी लावून इंग्रजी छावणी उडवून देण्याचा विचार करीत आहेत. लेफ्टनन्ट ट्रम्स आणि मेजर रीड कांहीं सैनिकांना घेऊन या देशी शिपायांचें पारिपत्य करण्याकरितां ताबडतोब तिकडे रवाना झाले. त्यांनीं ती बॅटरी तोडून मोडून फेकून दिली आणि बंडवाल्या शिपायांना पिटाळून लाविलें. या चकमकींत तीनशें देशी शिपायी मेले, आणि गोऱ्या फौजेंतील फक्त तीन मेले आणि बारा जखमी झाले.

हळू हळू दिल्ली शहरांत बाहेरगांवचे बंडखोर येऊं लागले. त्यामुळें दिवसें-दिवस बंडखोरांना अधिकाधिक उत्तेजन मिळूं लागलें. त्यांनीं १९ तारखेला पुन्हा इंग्रजांवर हल्ला केला. हल्ला अतिशयच जोराचा होता. त्यांच्या तोफा कमालीचें काम करूं लागल्या. त्यामुळें इंग्रजांकडील लोकांना काळजी पडली. दिवसभर तोफांचा मारा चालू राहिला. रात्र झाली, पण ती अंधारी रात्र होती त्यामुळें लवकरच लढाईला खळ पडला, व शिपाई परत शहरांत गेले. पंजाबांतून आलेला कप्तान डेली जखमी झाला. इंग्रजांचे शिपाईही कित्येक मेले आणि अनेक जखमी झाले. या दिवशीं इंग्रजांचें बरेंच नुकसान झालें.

परंतु २२ जूनला ८५० सैनिक आणि पांच तोफांची कुमक पंजाबांतून इंग्रजांकडे आली. त्यामुळें इंग्रजांना थोडा धीर आला; पण तिकडे बंडखोरांनाही जालंधर आणि फिलोरचे बंडखोर येऊन मिळाले. २३ जूनचा दिवस उजाडला. आज प्लासीच्या युद्धाला बरोबर शंभर वर्षें झालीं होतीं. शंभर वर्षांपूर्वी याच तेवीस जूनला प्लासीच्या रणांगणांत इंग्रजांनीं सिराजउद्दौला याला हारविलें

होतें, आणि समरभूमीला पाठ दाखवून पळावयाला लाविलें होतें. याच प्लासीच्या लढाईनंतर इंग्रजी सत्ता हिंदुस्थानांत स्थापन झाली. कांहीं कुडबुड्या जोशांनीं असें भविष्य वर्तविलें होतें कीं, टोपीवाल्यांचें राज्य हिंदुस्थानांत बरोबर शंभर वर्षे टिकणार, व त्यापुढें ते आपलें चंबू गवाळें गुंडाळून हिंदुस्थानाला शेवटचा रामराम ठोकणार! बंडखोरांची या भविष्य वाणीवर पूर्ण श्रद्धा असल्यामुळें त्यांना खात्री वाटत होती कीं, आतां आपण या झगड्यांत विजयी होणारच. तेवीस जूनचा दिवस उजाडला, तसा दिल्लीच्या बंडखोरांनीं इंग्रजांवर निकराचा हल्ला करून, दिल्ली शहरापुढून गोऱ्या फिरंग्यांना हांकलून देण्याचा निश्चय केला. आणि टोपीवाल्यांना पळवून लाविल्याचा मान प्रथम आपल्याला मिळावा म्हणून प्रत्येक जण अहमहमिकेनें या युद्धांत भाग घेऊं लागला. त्यांनीं सब्जी मंडई जवळून इंग्रजांच्या पिछाडीस जाऊन त्यांच्यावर हल्ला केला. नुकतीच इंग्रजांना कुमक आल्याचें वर सांगितलेंच आहे. त्यांच्या मदतीनें इंग्रजांनीं थोड्याच वेळांत बंडखोरांना मागें हटविलें. याप्रमाणें इंग्रज विजयी झाले आणि त्यांनीं कुडबुड्या जोशांचें भविष्य खोटें ठरविलें. भविष्य खोटें ठरलेलें पहातांच देशी शिपायांना आश्चर्य वाटलें. तरी देखील ते फारसे हताश झाले नाहींत. दररोज बाहेरचे बंडखोर दिल्लीस येतच होते. इकडे पंजाबांत सर्वत्र शांतता स्थापित करून सर जॉन लॉरेन्स दिल्लीला वेळोवेळीं कुमक पाठवीत होताच. चेंबरलेन साहेब अडजुटन्ट जनरल होऊन याच सुमारास दिल्लीला आला. रुरकीच्या एंजीनिअरिंग कालेजचे प्रमुख अध्यापक, कर्नल बेअर्ड स्मिथ ही दिल्लीस येऊन पोहोंचले. याप्रमाणें गोऱ्या सैनिकांनाही वेळोवेळीं कुमक येऊन मिळत होत्या. यामुळें त्यांचा धीर कधींच खचला नाहीं. वरचेवर अशी कुमक येत असतांना देखील सर हेनरी बर्नार्ड दिल्लीवर हल्ला करण्याचें मनांत आणीना. त्याला आपल्या सैन्यबलाविषयीं खात्री वाटेना. लहानसान चकमकी चालू होत्या. पण त्यानें दिल्लीवर जोराची चढाई करून तेथें ताबा स्थापन करण्याचा प्रयत्न केला नाहीं. अशा स्थितींत जून महिना संपला आणि जुलईला आरंभ झाला. आतांपर्यंत एकंदर तीस चकमकी झाल्या पण त्यांत इंग्रजांचें फारसें नुकसान झालें नाहीं.

पांच जुलईला बर्नार्ड साहेब महामारी होऊन वारला. त्यानंतर जनरल रीडची नेमणूक मुख्य अधिकाऱ्याच्या जागेवर झाली. पण तोही आजारी झाल्यामुळें त्याला अंबाला येथें परत पाठविण्यांत आलें. शेवटीं ब्रिगेडिअर विलसन याला हा अधिकार मिळाला. याच वेळीं आणखी सहाशें नव्या सैनिकांची कुमक इंग्रजांना

मिळाली. तिकडे बंडखोरांनाही चार हजार शिपाई येऊन मिळाले. हे शिपाई बरेलीहून आले होते, आणि त्यांचा पुढारी बख्तखां होता. दिल्लीस पोहोंचतांच त्यानें बादशहा बहादुरशहाकडून मुख्य सेनापतीचीं वस्त्रें मिळविलीं. याच सुमारास झांशी, राजपुताना, मध्यहिंदुस्थान आणि इतर प्रांतांतील निरनिराळ्या ठिकाणांहून बंडखोर दिल्लीच्या शिपायांना येऊन मिळाले. बंडखोरांचें हें वाढतें संख्याबल पाहून विलसन फारच व्याकुळ झाला. त्यालाही त्यामुळें त्यांच्यावर एकदम हल्ला करण्याचा धीर होईना. बंडखोरांनीं आतां जागें होऊन, पंजाबांतून दिल्लीस येणाऱ्या इंग्रजी कुमकीचा रस्ता आणि रसद बंद करण्याचा प्रयत्न केला. पण तो इंग्रजांनीं हाणून पाडिला. नंतर बंडखोरांनीं पुन्हा पुन्हा इंग्रजी छावणीवर हल्ले चढविले. परंतु त्यांचा उपयोग कांहींच झाला नाहीं. पण त्यामुळें इंग्रजांना संरक्षक धोरणच ठेवावें लागलें. ते दिल्लीवर चढाई करून जाऊं शकले नाहींत.

याप्रमाणें दिल्ली येथील फौज स्वस्थ बसलेली पाहून पंजाबांत सर जॉन लॉरेन्स संतापला. त्यानें लॉर्ड कॅनिंगला लिहून विचारलें देखील, कीं दिल्ली सर करण्याचें काम मी आपल्या हातीं घेऊं का ? पण लार्ड कॅनिंग उतावळा नव्हता. तो शांत डोक्याचा असल्यामुळें त्यानें लॉरेन्सचें म्हणणें ऐकलें नाहीं. लॉरेन्सला केवळ दिल्लीच्या फौजेची अक्षम्य दिरंगाई दिसत होती, पण कॅनिंगला पंजाबवरही लक्ष पुरविणें जरूर होतें. लारेंस जर पेशावर सोडून जाता तर अफगाण, आफ्रीडी वगैरे लोकांनीं तिकडे बंडें पुकारलीं असतीं, आणि निकलसन साहेबानें मोठ्या आयासानें स्थापिलेली शांतता क्षणभरांत भंग पावली असती.

आगस्टच्या पहिल्या तारखेला रावी नदीच्या कांठीं 'बालघा' नांवाच्या गांवीं लाहोराहून बंड करून निघालेल्या २६ व्या पायदळ पलटणींतले कांहीं लोक आले. एका देशी अधिकाऱ्यानें पोलीस आणि ग्रामवासी यांच्या मदतीनें त्यांना धरण्याचा प्रयत्न केला. त्या चकमकींत बंडवाल्यांचे सुमारें दीडशें लोक मारले गेले आणि बाकीचे पळून गेले. त्यांच्या शोधार्थ निघालेले लाहोरचे डेप्युटी कमिशनर संध्याकाळच्या सुमारास त्याच गांवीं येऊन पोहोंचलें; आणि त्यांनीं पंजाबी शिपायांच्या मदतीनें २८२ लोकांना धरून ठार केले. नंतर त्या सर्वांचीं प्रेतें एका विहिरींत टाकून दिलीं; वरिष्ठ अधिकाऱ्यांना या आपल्या पराक्रमाचा रिपोर्ट करितांना कूपर साहेब लिहितात, "कानपुरास जशीं इंग्रजांचीं प्रेतें विहिरींत टाकिलीं, तशींच अजनाल्यांतही कांहीं प्रेतें मी विहिरींत टाकिलीं आणि सुडास सूड उगविला!"

पेशावरलाही याचप्रमाणें सातशें बंडखोर ठार करण्यांत आले. या सर्व गोष्टींचा विचार करितां लॉरेन्सला पंजाबांतच रहाण्याची कॅनिंगची आज्ञा किती दूरदर्शी आणि शहाणपणाची होती हें दिसून येईल. लारेन्स पंजाबांत असल्यामुळें, कोणत्याही ठिकाणीं बंड झाल्याबरोबर, बंडखोरांचा ताबडतोब त्यांना दहशत बसेल असा निःपात करण्यांत येई व म्हणूनच बंडाची आग पंजाबांत वाढली नाहीं. दरारा व दहशत हें लॉरेन्सचें मुख्य सूत्र होतें.

पावसाळा सुरू झाला, तरी युद्धाचा कांहींच निकाल लागेना. दिल्ली शहर बंडवाल्यांच्या हातीं राहिल्यानें त्यांचें नैतिक बल वाढत होतें, व कंपनीच्या वर्चस्वाला तें लांछन होतें. कारण मोंगल बादशाहीचें भूत जीवंत होऊन, तिनें कंपनीला बंडखोर गुमास्ता ठरविलें होतें. तेव्हां तें भूत जलदीनें गाडणें जरूर होतें. त्यामुळें दिल्लीची दिरंगाई लॉरेन्स व क्यानिंगला सहन होईना. दर आठवड्यांत दोन तीन चकमकी व्हाव्या, परंतु पुढें कांहीं नाहीं. असें पाहून दिल्लीचे गोरे शिपाईही कंटाळले. त्यांच्या मनांतून बंडखोरांशीं दोन हात करून त्यांना इंग्रजी शौर्याचें पाणी दाखविण्याची खुमखुमी भरली होती. बंडखोरांवर सूड उगविण्याला ते अगदीं उतावीळ झाले होते. त्यांचे हात नुसते खवखव करीत होते. पण दिल्लीवर हल्ला होईना. तेव्हां त्यांनीं आपला राग आपल्या इमानी व अत्यंत कष्टाळु हिंदुस्थानी नोकरमाणसांवर काढण्यास सुरुवात केली. नोकरमाणसांना हे अत्याचार असह्य झाले, तेव्हां ही गोष्ट वरिष्ठांच्या कानांपर्यंत पोहोंचली. सेनापति विलसन तेव्हां फार रागावला, आणि त्यामुळेंच गोऱ्या शिपायांचे हे आचरट अत्याचार बंद झाले. नाहींपेक्षां छावणींतील देशी नोकर पळून गेले असते, व मग शिपायांचे हाल अतोनात झाले असते.

दिल्लीचा बादशहा बहादुरशहा हा अतिशय म्हातारा झाला होता. स्वतःचे अंगीं कांहींच कर्तबगारी नसल्यामुळें, तो बंडखोरांच्या हातांतलें केवळ बाहुलें बनला होता. दररोज त्याच्या नांवानें नवीं नवीं फर्मानें आणि फतवे निघत, पण त्यांचा बहादुरशहाला पत्ताच नसे. अमीर, उमराव आणि इतर दरबारी लोक आपसांत सल्ला मसलत करून कांहीं तरी ठरवीत आणि बादशहाच्या नांवानें शिपायांना आणि त्यांच्या अधिकाऱ्यांना हुकूम देत. पण हा सांवळागोंधळ ज्याच्या नांवाखालीं चाले, त्या बहादुरशहाचा मानमरातब कितपत ठेविला जात होता? त्याला कोणीच विचारीत नसे. त्याचा सल्ला कोणत्याही कामीं

घेतला जात नसे. माथेफिरू मुसलमान मौलवी आणि बंडखोर शिपाई यांचेंच खरें राज्य—जर याला राज्य म्हणावयाचेंच असेल तर—दिल्लीस चालू होतें. ते मनास वाटेल तसे वागत. महालांत शिपाई येऊन राहूं लागले. राजमहाल म्हणजे एक क्रीडांगण होऊन बसलें. तेथें खुशाल चकाट्या पिटाव्या व हुक्का ओढावा. बहादुरशहा हें या खेळांतलें एक बाहुलें झालें होतें.

शहरांत हिंदुमुसलमानांत भांडणें होऊं लागलीं. कोणी म्हणे गोहत्या अजीबात बंद केली पाहिजे, तर कोणी म्हणत गोमांसासारखें दुसरें स्वादिष्ट भोजनच नाहीं. शिपाई वारंवार बाजार लुटीत, यामुळें बाजार सारखा बंद राहूं लागला. दुकानदारांनीं याबद्दल बादशहाकडे फिर्याद केली. पण ऐकतो कोण? बादशहाला अधिकार होता कोठें? आग्र्याच्या कैद्यांची तुरुंगांतून सुटका झाली तेव्हां तेही सर्वजण दिल्लीला येऊन पोहोंचले. त्यांनीं तेथें जास्तच गोंधळ माजविला. बरेलीचा बख्तखां आतां मुख्य सेनापति झाला होता. पण सर्व शिपायांना तो आवडत नव्हता. यामुळें सैन्यांत दुफळी झाली आणि वैर व द्वेषभाव सर्वत्र पसरला. बेशिस्त वर्तन व गचाळ राहणी, आणि अचाट भोजन, या कारणांनीं याच वेळीं सैन्यांत महामारीची सांथ पसरली. ही सांथ पसरल्याबरोबर शिपाई अधिकच असंतुष्ट झाले. त्यांच्या औषधपाण्याची व शुश्रूषेची तेथें कांहींच सोय नव्हती, व कोणी तिकडे लक्षही दिलें नाहीं.

याप्रमाणें बहादुरशहा बंडखोरांच्या हातीं जाऊन 'इतो भ्रष्टः ततो भ्रष्टः' झाला. बंडखोरांना मिळाल्यामुळें त्याला मान देणारे इंग्रज त्याचे वैरी झाले आणि बंडखोर तर त्याचें मुळींच ऐकेनात. त्यांना त्याच्या नांवाचाच तेवढा उपयोग करून घ्यावयाचा होता. त्याच्या नांवावर मन मानेल तसें वागून, वाटेल तसा धुमाकूळ घालावयाला मिळाल्यावर त्याला कोण विचारतो? त्याच्या खास परिवारांतील लोक आपल्या घरांत गोऱ्या शिपायांना लपण्यास जागा देऊं लागले. एवढेंच काय, पण त्याची आवडती राणी झीनत महाल बेगमसुद्धां, जेव्हां आपल्या महालांत युरोपियनांना चोरून आश्रय देऊन त्यांचे लाड करूं लागली, तेव्हां बिचारा बहादुरशहा हताश झाला आणि त्यानें इंग्रजांशीं तहाचें बोलणें लाविलें. पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

असो. आगष्टच्या सात तारखेला कर्नल निकलसन दिल्लीस येऊन पोहोंचला. विलसनशीं त्याच्या सल्लामसलती होऊं लागल्या. निकलसन ३६ वर्षांचा भर

ज्वानींत असलेला वीर होता. त्यानें दिल्लीला पोहोंचतांच सर्व परिस्थितीचें निरीक्षण केलें. त्याची खास सेनाही तेरा तारखेला दिल्लीला येऊन पोहोंचली, आणि आतां बंडखोरांना शह कसा द्यावयाचा याचा जोरानें विचार होऊं लागला. झिंदचा राजा इंग्रजांचा मित्र होता. बंडखोरांनीं त्याच्या राज्यावर स्वारी करावयाचें ठरविलें. परंतु जनरल हडसननें त्यांना रस्त्यांतच अडविलें. शस्त्रांची देवाण घेवाण सुरू झाली. शिपायांची कधींच सरशी झाली नाहीं. शेवटीं बावीस आगस्टला शिपायांना पळवून गोरे आपल्या छावणींत परत आले.

फिरोजपुराहून एक तोफखाना इंग्रजांच्या मदतीकरितां येत होता. त्याची बातमी लागतांच या तोफा हस्तगत करण्याच्या विचारानें बंडखोर दिल्लीहून गुपचुप रवाना झाले. ही खबर कळतांच निकलसन एक हजार गोरे आणि दोन हजार देशी शिपाई घेऊन निघाला. वाटेंत खूप पाऊस पडला; परंतु इंग्रजी सैन्य असल्या अडचणींना जुमानीतच नसे. निकलसन बहादुरगडाच्या रोखानें चालला होता, पण वाटेंतच त्याला कळलें कीं बंडखोर नजफगडाकडे जात आहेत. दोन तासांनंतर गोरें सैन्य नजफगडाला पोहोंचलें.

नजफगडांत येऊन बंडखोरांनीं नदीपलीकडे डेरे दिले होते. ही जागा लढाईच्या दृष्टीनें फार चांगली होती. कारण समोर नदी वहात होती. तिचें पाणी खोल होतें व धार फारच वेगानें वहात होती. उजवीकडे नजफगडाच्या एका कालव्याचा फाटा आला होता, आणि डावीकडे गांव होता; तोही बंडखोरांच्या हातीं होता.

संध्याकाळीं पांच वाजण्याच्या सुमारास इंग्रजांनीं नदी ओलांडली. निकलसननें बंडखोरांचें आश्रयस्थान बनलेल्या सराईवरच प्रथम हल्ला करण्याचें ठरविलें. तोफांचा मारा करीत करीत त्या आधारावर इंग्रज बंडखोरांच्या अगदीं जवळ म्हणजे वीस एक गज अंतरावर पोहोंचले. यानंतर संगीनी चमकूं लागल्या. थोड्याच अवकाशांत शत्रूंच्या तोफा इंग्रजांनीं हस्तगत केल्या. बंडखोरांना सराई सोडून पळून जाण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाहीं. पाऊस पडल्यामुळें रस्ता इतका वाईट झाला होता कीं, त्यांना पळतांना तोफा आपल्याबरोबर नेणें शक्य नव्हतें. रस्ता वाईट असल्यामुळें इंग्रजांनींही त्यांचा पुढें पाठलाग केला नाहीं. इंग्रजांनीं शेवटीं नजफगड आपल्या ताब्यांत घेतला. या लढाईंत १३ तोफा इंग्रजांच्या हातीं लागल्या आणि बंडखोर शिपायांपैकीं २०० मेले, व उरलेले दिल्लीला पळून गेले.

चवथ्या सप्टेंबरला इंग्रजी फौजेला पुन्हां कुमक आली. तरीदेखील विलसन-साहेबाचा दिल्लीवर चाल करण्याचा हिय्या होईना. आणखी कांहीं दिवसांनीं इंग्रजांकडे एकंदर नऊ हजार सैनिक झाले. यांतले अर्ध्यांहून अधिक पंजाबी आणि गुर्खे होते. हे सगळे हिंदी शिपाई कंपनी सरकारचे एकनिष्ठ सेवक असून अत्यंत राजभक्त होते. इंग्रज अधिकाऱ्यांची देखील त्यांच्याबद्दल खात्री होती. आतां मात्र दिल्लीवर जोरानें चाल करून जाण्याची तयारी सुरू झाली. हल्ला करण्याचा व फौजेच्या हालचालींचा नकाशा आंखण्याचें काम बेअर्ड स्मिथ साहेबाकडे सोंपविण्यांत आलें. प्रथम दिल्लीच्या मुख्य दरवाजावर तोफा रोखाव्या असें ठरलें, आणि त्याप्रमाणें सप्टेंबरच्या सात तारखेला प्रत्येक दरवाजा रोखून तोफांचे मोर्चे बांधण्याचें काम संपलें. तेव्हांपासून तेरा तारखेपर्यंत दिल्लीवर तोफांचा मारा एकसारखा सुरू होता. यामुळें दिल्लीचा कोट तुटून दोन ठिकाणीं खिंडारें पडलीं, आणि आंत शिरण्याकरितां वाटा तयार झाल्या.

१४ तारखेला पहांटे तीन वाजतां या खिंडारांतून आंत जाण्याकरितां इंग्रजी सेना सज्ज झाली. त्या वेळीं त्यांच्याबरोबर पंजाबी, गुर्खे, आणि शीख शिपाईही होते. कर्नल निकलसनचा हुकूम होतांच शिपाई कोटाच्या आंत शिरूं लागले. तिकडून बंडखोरांनीं गोळीबार सुरू केला, पण रस्त्यांत पडलेल्या प्रेतांना तुडवीत, व गोळ्यांची पर्वा न करितां शिपाई आंत शिरले. त्यांनीं काबुली दरवाजा धडकीसरसा सर केला. याप्रमाणें चंचुप्रवेश झाल्यावर पुढील गोष्टी पटापट होऊं लागल्या. निकलसननें नंतर लाहोर दरवाजा सर करण्याचें ठरविलें. या दरवाज्याजवळ देशी शिपायांचे डेरे होते. येथें इंग्रजांकडील सैनिकांना घनघोर युद्ध करावें लागलें. कर्नल निकलसन स्वतः जखमी झाला. पण त्याला ताबडतोब इस्पितळांत पाठविण्यांत आलें. दुसऱ्या एका तुकडीनें काश्मीरी दरवाजाकडे नजर फिरविली. हा दरवाजा सुरुंग लावून उडवून देण्याची मसलत त्यांनीं योजिली. सुरुंगाला ज्योत लावितांना कित्येक लोक नाहक प्राणास मुकले, पण त्यांनीं आपले प्राण फुकट दवडले नाहींत. मरतां मरतां त्यांनीं सुरुंगास बत्ती दिली. सुरुंग उडतांच दरवाजा हवेंत उडून गेला आणि त्याचा चक्काचूर झाला. त्या दरवाजाचें रक्षण करीत असलेले सगळे शिपाई प्राणास मुकले. याप्रमाणें तीन दळांनीं तीन दरवाजे सर केले, पण चौथ्या दळाला असें कांहीं नावाजण्यासारखें करून दाखवितां आलें नाहीं.

या चवथ्या दळानें असा बेत केला होता कीं, शहरालगतच्या किसनगंज भागांतल्या बंडखोरांना रेटीत रेटीत लाहोर दरवाजाकडे न्यावयाचें. पण येथल्या

बंडखोरांनीं एकसारखा तोफांचा मारा सुरू ठेविल्यामुळें या दळाचें कांहीं चालेना. प्रथम जम्मूच्या शिपायांनीं खटपट केली, पण ती विफल झाली. तेव्हां मेजर रीड गुर्खे शिपाई आणि तोफा घेऊन पुढें सरसावला. पण त्यालादेखील हार खावी लागली. तो परत फिरणार इतक्यांत होप-ग्रँट नांवाचा साहेब कुमक घेऊन त्याच्या मदतीस आला. याला विल्सननें मुद्दाम इकडे पाठविलें होतें. याची मदत आली तरी फारसा फायदा झाला नाहीं. शेवटीं यश आलें तें इंग्रजांच्या निग्रहानें आणि चिकाटीनें! बंडखोरांच्या तोफा एकदांच्या बंद पडल्या!

याप्रमाणें इंग्रजांचा हल्ला सफल होऊन इंग्रजांनीं शहरांत प्रवेश केला. सेनापति विलसन आणि बेअर्ड स्मिथ या दोघांनाही अपरिमित आनंद झाला. शहरांत आल्यावर त्यांनीं 'स्किनर भुवन' नांवाच्या इमारतींत तळ दिला. ही इमारत स्किनर नांवाच्या एका साहेबानें बांधली होती. दुसऱ्या दिवशीं मुळींच लढाई झाली नाहीं. यामुळें गोऱ्या आणि काळ्या दोन्ही शिपायांचें लक्ष दिल्लीच्या संपत्तीकडे वळलें. फार दिवसांपासून हे शिपाई दिल्लीच्या अपूर्व वैभवाविषयीं आणि श्रीमंतीविषयीं नवलकथा ऐकत होते. त्या आतां प्रत्यक्ष अनुभवून त्यांपासून आपल्याला लाभ व्हावा म्हणून ते शहरांत लुटालूट करूं लागले. दारु पिण्यांतही ते अतिरेक करूं लागले. त्यांचें वर्तन पाहून कधीं न चळणारे निग्रही शीख शिपाईही उन्मत्त होऊन दारू पिऊं लागले; आणि ते त्या नशांत अधिकाऱ्यांना जुमानीनातसे झाले. तेव्हां अधिकाऱ्यांनीं शहरांतली सर्व दारू रस्त्यांत ओतून टाकिली आणि पिंपें व बाटल्या फोडून टाकल्या. यामुळें जिकडे तिकडे रस्त्यांत दारूची घाण पसरली. परंतु सैन्यांत व्यवस्था व शिस्त लागली.

यावेळीं बंडखोर स्वस्थ बसले होते. इंग्रजांचे सैनिक ज्या वेळीं दारू पिऊन धुंद झाले होते, आणि लुटालूट करीत होते, ज्या वेळीं इंग्रजांचे काळे गोरे सैनिक इतके उन्मत्त झाले होते कीं ते आपल्या अधिकाऱ्यांचेंही ऐकतना, अशा वेळीं बंडखोरांनीं जर आपलें पाणी दाखविलें असतें, अशा वेळीं जर योग्य नायकाच्या नेतृत्वाखालीं बंडखोरांनीं जोराचा फेर हल्ला केला असता तर? तर काय झालें असतें? दिल्ली इंग्रजांच्या हातीं इतक्या लवकर लागली नसती. परंतु बंडखोरांचा विशेष गुण असा कीं, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, कोणीं कोणाचें ऐकावयाचें नाहीं, जो तो स्वतःच बादशहा! शत्रुपक्षाची अशी स्थिति होती म्हणूनच इंग्रज अधिकाऱ्यांना, त्यांच्या शिपायांनीं इतकें स्वैर वर्तन केलें तरी परवडत

असे. नाहींतर सैनिकांना अधिकाऱ्यांनीं इतकी मोकळीक दिली नसती, व प्रथम पासूनच त्यांना पूर्ण कह्यांत ठेवलें असतें.

याप्रमाणें ता. १५ सप्टेंबर निर्विघ्नपणें पार पडला. ता. १६ ला देशी शिपायांनीं किसनगंज सोडिलें. इंग्रजी सेनेनें ताबडतोब त्या गांवावरही कब्जा केला. तेथें इंग्रजांना बरीच युद्धसामग्री मिळाली. ता. १७ सप्टेंबरला दिल्ली शहरांत जिकडे तिकडे इंग्रजी सेना फिरूं लागली. बंडखोरांशीं वाटेंत बारीक सारीक चकमकी झडल्या, आणि नंतर इंग्रजी सैन्य महालाकडे वळलें. त्याला पदोपदीं अडविण्याचा बंडखोरांनीं निकराचा प्रयत्नही केला. रस्त्याच्या दोन्ही बाजूंला असलेलीं घरेंच जणूं बंडखोरांनीं किल्ले बनवून लढविलीं. या छोट्याशा घरगुती किल्ल्यांतील झरोका, खिडकी, दार इत्यादि ठिकाणांतून इंग्रजांवर गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला. परंतु या वर्षावाची बिलकूल पर्वा न करितां शिपयांच्या बंदुकांना बंदुकांचेंच उत्तर देत देत, इंग्रजी सैन्य पुढेंच सरकत चाललें. ता. १८ ला लाहोर दरवाजा आपल्या ताब्यांत घेण्याचा दुसरा प्रयत्न इंग्रजी सेनेनें केला. परंतु भोंवतालच्या घरावरून गोळ्यांचा वर्षाव होत असल्यानें त्यांची गति कुंठित झाली. विलसन साहेबाला त्यामुळें चिंता वाटूं लागली. पण आस्ते कदम पुढें सरकण्याचें काम इंग्रजांनीं चालू ठेवलें. दोन दिवसांनंतर म्हणजे २० तारखेला इंग्रजी सेनेनें लाहोर दरवाजा, जुम्मामशीद, आणि अजमीर दरवाजा इतक्या ठिकाणांवर आपला अधिकार बसविला. एवढेंच नव्हे तर राजमहालावरही युनियन जॅक फडकूं लागलें. तेव्हां सर्वांनाच अति आनंद झाला. या आनंदाप्रीत्यर्थ दीवाण-इ-आम या सुप्रसिद्ध दिवाणखान्यांत इंग्रजी अधिकाऱ्यांची एक मजलस भरली.

याप्रमाणें दिल्ली शहर इंग्रजांच्या हातीं जातांच लोकांना कळून चुकलें कीं, आतां अपराध्यांची चौकशी होऊन त्यांना कडक शिक्षा ठोठावल्या जाणार. तेव्हां पुढें काय होतें तें पाहाण्याची उत्कंठा व काळजी कांहींना लागली, तर कांहींनीं तेथून आपला गाशा गुंडाळला. इंग्रजांनीं आणि शिखांनींही शहरवासियांवर खूप सूड उगवेला. शीखांचें मनोराज्य खरें झालें, व पूर्वप्रतिज्ञेप्रमाणें दिल्ली सर करून त्यांना लुटतां आली. परंतु इंग्रजांचे दुय्यम सहाय्यक म्हणूनच हें कार्य त्यांच्या हातून झालें, स्वतंत्र पराक्रमाच्या जोरावर नव्हे. पण इंग्रजांनीं कोणाही स्त्रीला किंवा अर्भकाला जाणूनबुजून मारिलें नाहीं. लूट फार झाली व कत्तलही फार घडली. यामुळें लोकांना धचक बसला आणि दिल्ली शहरांत इंग्रजांविरुद्ध मग कोणींही चळवळ केली नाहीं.

दिल्लीच्या राजप्रासादावर अधिकार बसला, तरी पण त्या दिवशीं वृद्ध बादशाहा बहादुरशहा मात्र इंग्रजांच्या हातीं लागला नाहीं. ता. १८ ला दिल्लीचा कांहीं भाग इंग्रजांच्या हातीं जातांच बंडखोरांचा सेनापति बख्तखां घाबरला व त्यानें तेथून पळून जाण्याचें ठरविलें. परंतु बादशहाचें लचांड आपल्याबरोबर नको असें त्याला वाटत होतें. तो बादशहापाशीं गेला आणि म्हणाला, "हुजुरांना कोणत्याही गोष्टीची काळजी करण्याचें कारण नाहीं. शहराचा कांहीं भाग इंग्रजांच्या हातीं गेला असला, तरी हुजुरांच्या पुण्याईनें अजून शिपायांनीं धीर सोडिलेला नाहीं. ते अजूनही लढत आहेत. आणि अजूनही ते टोपीवाल्यांना हांकलून लावितील. हुजुरांनीं मात्र धीर सोडूं नये." परंतु या भूलथापांनीं फसून जाण्यासारख्या मनस्थितींत या वेळीं बहादुरशहा नव्हता. तो फारच घाबरून गेला होता. आणि तेथून कोठें तरी दूर दुसरीकडे निघून जावें असें त्याला वाटत होतें. आपल्या बोलण्याचा बादशहावर कांहींच परिणाम होत नाहीं, असें पाहून बख्तखां तर तेथून निसटला. तो निघून गेला, तेव्हां बादशहाचा व्याही मिर्झा इलाहीबक्ष यानें बादशहाला आपल्या घरीं नेलें. त्यानें बादशहाला सांगितलें कीं तुम्ही आतां शिपायांशीं असलेला आपला संबंध साफ तोडून टाका. बादशहाची त्यानें नाना प्रकारांनीं समजूत घातल्यावर, बादशहा आपली बेगम झीनतमहाल आणि आपले शहाजादे व त्यांचीं लहान मुलें यांना घेऊन, हुमायूनच्या कबरस्थानांत लपून राहिला.

यावेळीं फौजेंतील गुप्त बातम्या काढण्याच्या आणि पुरविण्याच्या कामावर हडसन साहेब होता. त्याचा मुख्य मदतनीस रज्जबअली नांवाचा एक मुसलमान होता. तो आपल्या कामांत फार पटाईत असल्यामुळें त्याच्यावर हडसन साहेबाची बहाल मर्जी असे. दिल्ली शहर इंग्रजांनीं काबीज केल्यापासून शहरांतील बित्तंबातमी काढून ती तो साहेबाला पुरवी. इंग्रजांची सत्ता प्रस्थापित होतांच, कायद्याच्या तीक्ष्ण पंजापासून दूर राहण्याच्या व आपले प्राण आणि धन वांचविण्याच्या प्रखर इच्छेनें, पुष्कळ धनिक व मध्यम स्थितींतले लोक इंग्रजांचे राजनिष्ट हितचिंतक व बादशाहीचे द्वेष्टे झाले होते. त्यांची रज्जबअलीला फार मदत होई. यामुळें बहादुरशहाचा पत्ता लावणें त्याला मुळींच कठिण गेलें नाहीं. तो इलाहीबक्षाजवळ गेला, आणि त्याच्यावर आपल्या लटपटपंचीनें भुरळ टाकून, त्याच्याकडून बहादुरशहाला चोवीस तासपर्यंत राहत्या ठिकाणाहून हलूं न देण्याचें वचन घेतलें. इलाहीबक्षानें पाहिलें कीं ही संधी फार नामी आली आहे. यावेळीं जर मी बादशहाला धरून देण्यास मदत केली नाहीं, तर पुढें मागें मी बादशहाचा

ण्याही व संबंधी असल्यानें माझ्याच जिवावर बेतणार नाहीं कशावरून? आणि तेंच जर बादशहाला कैद करण्यांत मीं मदत केली तर मला काडीचा धोका नाहीं, पण शिवाय वर कांहीं तरी लभ्यांश इंग्रजांच्या कृपेनें होईल. रज्जबअलीनें हडसन-साहेबाला ही बातमी दिली, तेव्हां तो फार खुष झाला. त्यानें लागलीच विलसन साहेबाजवळ बादशहाला पकडण्याचें वारंट मागितलें. विलसन साहेबालाही मोठा पेंच पडला. एवढया मोठ्या मोंगल बादशहाला कैद करावें तरी कठीण! बरें न करावें तरी कठीण! पण हडसनसाहेबाच्या विनंतीला जेव्हां चेंबरलेन साहेबानें दुजोरा दिला, तेव्हां विलसनसाहेब वारंट काढावयाला कबूल झाला. आणि त्यानें वृद्ध बहादुरशहावर पकड वारंट जारी करून, तें हडसनसाहेबाच्या हवालीं केलें.

हडसनसाहेब पन्नास सशस्त्र जवानांना घेऊन बहादुरशहा रहात असलेल्या ठिकाणीं पोहोंचला. तेथें बरेच बंडखोर सरदार, व इतर दरबारी लोक एकत्र झालेले पाहून हडसनसाहेब दचकला. त्याला प्रथम असें वाटलें होतें कीं बादशाहा तेथें फक्त आपल्या दोनचार सेवकांबरोबर एकांतांत लपला असेल. अशा गर्दीतून आणि खवळलेल्या जनसमूहांतून बहादुरशहाला कसा धरून न्यावा, हा एक मोठाच प्रश्न त्याच्या पुढें दत्त म्हणून उभा राहिला. पण नुकत्याच घडलेल्या दिल्ली येथील रक्तमय घटनाचक्रामुळें लोकांना इंग्रजांची दहशत बसली होती. तीमुळें तेथें जमा झालेले लोक, बादशहास कैद करावयास सज्ज झालेल्या हडसन साहेबास व रक्तानें हात रंगलेल्या त्याच्या हाताखालील इंग्रज जवानांस पाहून देखील, हूं का चूं न करितां स्तब्ध उभे राहिले. हडसनसाहेबानें बहादुरशहाकडे निरोप पाठविला कीं जर तुम्ही आपण होऊन आमच्या स्वाधीन झालांत, तर तुमच्या केसालाही धक्का पोहोंचावयाचा नाहीं. नाहीं तर काय होईल हें सांगणें कठीण आहे. दुसरी कोणतीही अट पाळण्याला आम्ही बांधलेले नाहीं. कितीतरी वेळ निरोप येण्यांत आणि त्यांचीं उत्तरें जाण्यांत निघून गेला. शेवटीं एकदांचा बहादुरशहा इंग्रजांच्या स्वाधीन व्हावयाला कबूल झाला. तरीसुद्धां निघण्यापूर्वी प्रथम त्यानें हडसन साहेबाला स्वतः शपथ घेऊन प्राणरक्षणाचें अभिवचन द्यावयाला लाविलें. यानंतर झीनत महाल बेगम व राजकुमार जवानबखत एका पालखींत, आणि बहादुरशहा दुसऱ्या एका बैलगाडींत बसून वाड्याबाहेर पडले. बहादुरशहा बाहेर येतांच हडसन साहेबानें त्याला आपलीं हत्यारें उतरून खालीं ठेवण्यास सांगितलें. बहादुरशहानें प्रथम हाच हडसनसाहेब अशी खात्री करून घेतली, आणि नंतर त्याच्याकडून आपल्या प्राणरक्षणाच्या प्रतिज्ञेचा त्रिवार उच्चार करविला. इतकें

झाल्यावर बहादुरशहानें हत्यारें त्याच्या स्वाधीन केलीं. त्या वेळीं तेथें जमा झालेले लोक बादशहाची ही दीनदशा पाहून फार हळहळले. त्यांच्या तोंडून हाय! हाय!! असे दुःखोद्गार नकळत बाहेर पडले! कारण जुन्या पराक्रमी मोंगल बादशाहीचें तें एक अवशेष स्मारक होतें. परंतु वाटेंत विशेष कांहींएक गडबड न होतां बादशहा इंग्रजांच्या स्वाधीन झाला. त्याला दिल्ली येथें आणण्यांत येऊन तेथील एका महालांत नजरकैदेंत ठेविण्यांत आलें.

लवकरच रज्जबअली आणि इलाहीबक्ष यांच्या मदतीनें बहादुरशहाचे तिघे फरारी झालेले मुलगे व नातूही धरले गेले, आणि त्यांना भररस्त्यांत बिनाचौकशी गोळ्या घालून ठार करण्यांत आलें. हें दुष्ट व क्रूरपणाचें राक्षसी कृत्य हडसनच्या हातून झालें. २१ तारखेला सकाळीं हडसनसाहेब शंभर सैनिक व आपले जासूद रजबअली व इलाहीबक्ष यांच्यासह हुमायूनच्या कबरेकडे गेला. या घरभेद्यांच्या साहाय्यानें मिर्झा खझर सुलतान, मोंगल मिर्झा व अबूबखत मिर्झा या तिघांना तेथें कैद केलें व गाडींत घालून दिल्लीकडे चालविलें. परंतु दिल्लीशहर जवळ येतांच त्यानें गाडी थांबविली व त्या दुर्दैवी राजपुत्रांना फरफटत गाडीबाहेर ओढलें, आणि त्यांना आपले कपडे उतरण्याची आज्ञा केली. बिचारे हीन दीन लाचार स्थितींत उभे राहिले. तेव्हां त्या चांडाळानें त्यांना गोळ्या घालून ठार मारलें. या अघोरी कृत्यामुळें हडसनवर फार टीका झाली, तेव्हां त्यानें स्वताच्या कृत्याचें समर्थन करण्याकरितां अशी सबब सांगितली कीं, मीं जर असें केलें नसतें तर लोकांनीं माझ्यावर हल्ला करून मला व माझ्या फौजेला सुखरूप दिल्लीला परत येऊं दिलें नसतें. परंतु ही सबब अगदींच खोटी होती. कारण दिल्ली काबीज केल्यावर इंग्रज फौजेनें तेथें जी नादीरशाही कत्तल उडविली, तिच्यामुळें लोक भीतीनें गोगलगायीप्रमाणें बनले होते. आधल्या दिवशीं खुद्द बादशहाला लोकांमधून हडसननें कैद करून नेलें, तरीदेखील लोकांनीं त्याच्या गाडीवर हल्ला केला नाहीं. तर राजपुत्रांना नेतेवेळीं कोण हल्ला करणार? या प्रकरणीं फार टीका झाल्यामुळें हडसननें व त्याच्या मित्रानें मागाहून सुचलेली ही लंगडी व फुसकी सबब पुढें केली, व आपल्या अमानुष आणि रानटी कृत्याचें समर्थन केलें. परंतु २३ सप्टेंबर १८५७ रोजीं त्यानें लिहिलेल्या पत्रांत खालील कबूली आहे. 'I am not cruel, but I confess that I did rejoice in the opportunity of ridding the earth of these ruffians. मी दुष्ट नाहीं, परंतु या दांडगेश्वरांपासून पृथ्वीला मुक्त करण्याची संधी सांपडल्याबद्दल मला आनंद

वाटला, हें मी कबूल करतों.' काय हा आसुरी आनंद ! आणि या आसुरी आनंद मानणाऱ्या प्राण्याचे बहुतेक इंग्रजांनीं वाभाडे काढले असले, तरी त्याचें कौतुक करणारे इंग्रजही त्यावेळीं हिंदुस्थानांत होते. लॉरेन्सचे दुय्यम, पंजाबचे रॉबर्ट मॉंटगोमेरी यांना हडसनचा हा भेकड व नीच पराक्रम कळतांच, त्यांनीं हडसनला खालील पत्र पाठविलें–' All honour to you for catching the king and slaying his sons. I hope you will bag many more. राजाला पकडल्याबद्दल व त्याच्या मुलांची कत्तल केल्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. तुम्हांला आणखी अशीच पुष्कळ शिकार सांपडेल, अशी आशा करतों.' त्या वेळच्या मॉंटगोमेरी, मार्टीन, क्यांपबेल या इंग्रज लेखकांनीं, दिल्ली येथें विजय मिळाल्यावर इंग्रजांनीं केलेल्या हत्याकांडाची नादीरशाही कत्तलीशीं तुलना केली आहे. शहाजाद्यांच्या खुनानें या घोर कृत्यावर कळस चढविण्यांत आला, आणि इंग्रजी फौजेचा पराक्रम सर्वांना ठाऊक झाला, आणि बंडखोरांवर भयंकर वचक बसला. इंग्रजांनीं हा सुडास सूड घेतला, व ११ ते १४ मे या चार दिवसांत बंडवाल्यांनीं ख्रिस्ती स्त्रीपुरुषांची जी दुष्ट कत्तल केली, तिचा याप्रमाणें त्यांनीं भरपूर बदला घेतला. संतापामुळें इंग्रजांचें देहभान त्या वेळीं हरपलें होतें व दिल्ली-कानपूर-झांशीच्या हकीगतींनीं त्यांचे मनोविकार भडकून त्यांनीं हे अत्याचार केले, असा त्यांच्यातर्फे बचाव अनेक ग्रंथांतून देण्यांत येतो. मग इंग्रजांनीं केलेला परोपरीचा विश्वासभंग, व देशी राज्येंच्या राज्यें गिळंकृत केल्यामुळें, हिंदी शिपाई व त्यांचे सरदार खवळून त्यांनीं अत्याचार केले असल्यास त्यांनाच शिव्यांची लाखोली कां वाहण्यांत यावी ? हिंदी लोकदेखील इंग्रजांसारखींच माणसें आहेत. त्यांचेही मनोविकार प्रसंगविशेषीं भडकणें शक्य आहे. तेव्हां या दुहेरी अत्याचारांचा सारखाच कडक शब्दांनीं निषेध करणें जरूर आहे. आपला तो बाब्या व दुसऱ्याचा तो कार्टा, ही इंग्रज ग्रंथकारांची बंडाची हकीगत वर्णन करण्याची शैली खऱ्या इतिहासाला व इतिहासलेखकाला मुळींच शोभत नाहीं.

दिल्लीला बंडवाल्यांची कंबरच मोडली. त्यांनीं उभारलेला मोंगल बादशहाचा बाहुला इंग्रजांच्या हातीं लागला. त्यामुळें कॅनिंगच्या अपेक्षेप्रमाणें त्यांचें नैतिक बल तुटलें. बंडवाल्यांपैकीं जे दिल्लींतून पळाले, त्यांची पांगापांग होऊन, बरेचसे आपण त्या गांवचे नव्हतों, अशा सोंगानें आपापल्या खेड्यांत घरीं जाऊन लपून बसले. कांहीं लढाईंत मारले गेले, व कांहीं इंग्रजांच्या हातीं लागले. उरलेल्यांनीं लखनौची वाट धरली. दिल्लीचा इंग्रजी दरारा देशभर पसरला, व इंग्रजी सत्ता सर्वत्र दृढमूल

होऊ लागली. 'दहीं खाऊं कीं मही खाऊं' अशा वृत्तीचे लोक व इतरही इंग्रजांच्या काळ्या किंवा संस्थानी पलटणी, व त्यांचे अधिकारी, आणि देशांतील जहागीरदार, यांचे दिल्लीमुळें खाडकन डोळे उघडले, व ते इंग्रजांचे राजनिष्ठ हितचिंतक बनले. इंग्रजांच्या बाजूस राहिल्यानेंच आपल्यास ओली कोरडी भाकर खावयास मिळेल नाहींपेक्षां तुपाचा लोभ केल्यास जवळचें तेलही जाऊन हातीं धुपाटणें येईल, अशी त्यांची खात्री झाली. याकरितांच दिल्ली सर करण्याचा तगादा लॉर्ड कॅनिंगनें फौजी अधिकाऱ्यांच्या मागें सारखा लावला होता. ह्याप्रमाणें दिल्ली शहरावर इंग्रजांची सत्ता पूर्णपणें स्थापित झाली, व बहादुरशहा कैद झाला. त्यामुळें बंडखोरांची कंबरच खचली. या दिल्लीच्या झगड्यांत इंग्रजांचे ६१ लक्ष रुपये खर्च झाले, ३८३७ सैनिक मरण पावले आणि कर्नल निकलसन युद्धांत जखमी झाला होता तोही पुढें लवकरच वारला. निकलसनचें वय त्या वेळीं केवळ ३७ वर्षांचें होतें, आणि पराक्रम व बुद्धिमत्ता या दोन्ही गोष्टी त्याला अनुकूल होत्या. त्याच्या महत्वाकांक्षेचा पाया असा भरीव, व त्याची आजपर्यंतची मुलकी आणि लष्करी कामगिरी अतोनात उच्च दर्जाची झाली असल्यामुळें, सर्वांना तो अभिमानास्पद वीर वाटत होता, व तो पुढें किती मोठ्या योग्यतेस चढेल याविषयीं त्याचे मित्र, सैनिक व वरिष्ठ अधिकारी प्रेमानें व कौतुकानें भविष्यें वर्तवीत. परंतु हा शूर पुरुष दिल्लीच्या वेढयांत गोळी लागून कामास आल्यामुळें इंग्रजांचें फार मोठें नुकसान झालें. परंतु त्याचें चढाईचें धोरण त्याच्या मृत्यूपूर्वी यशस्वी होऊन दिल्ली इंग्रजांच्या हातीं लागली, एवढें समाधान त्यांतल्या त्यांत त्याला लाभलें होतें.

---

प्रकरण २३ वें.

## लखनौचा वेढा.



औंध प्रांत खालसा केल्यामुळें कंपनीवर लोकांचा अतोनात संताप झाला होता. नबाबी जाऊन इंग्रजी त्या जागीं आल्यामुळें लोकांवर नवे नवे कर बसले. लखनौ प्रांतांत अफूचा खप फार असे. पण करामुळें ती सुलभ चैनीची वस्तू महाग झाली, व सामान्य माणसांना आपली तलफ भागविणें कठिण पडूं लागलें. नबाबाचे जुने वंशपरंपरागत अधिकारी घरबैठे झाल्यामुळें मनांत झुरत होते.

कारागीर, व कसबी यांचा लहरी पण उदार पोशिंदा गेल्यामुळें ते उघडे पडले. नबाबाच्या लष्करांत जे साठ हजार शिपाई प्यादे होते, त्यांपैकीं फक्त २० हजारच कंपनीनें आपल्या नोकरींत ठेवले, व बाकीच्यांच्या हातावर थोडीशी नगदी रकम ठेवून त्यांना रजा दिली. नगदी तेव्हांच खर्च झाले व पुढें पोटासाठीं विवंचना त्यांना पडली. तेदेखील कंपनीवर नाराज झाले. तालुकदार, जमीनदार व इतर सरदार यांच्या वतनावर थॉमसनसाहेबांची धाड पडूं पाहत असल्यामुळें ते आधींच बिथरले होते, व या तालुकदारांच्या प्रेरणेनें सामान्य जनताही इंग्रजांना विरोधी झाली. सर हेनरी लॉरेन्स आपल्याकडून सर्वत्र स्थिरस्थावर करण्याचा प्रयत्न करीत होते, परंतु कंपनीचें राज्य लोकांना नकोसें झालें व जुनी नबाबी स्थापन व्हावी अशी त्यांना इच्छा झाली. मौलवी लोक इंग्रजांविरुद्ध मशीदींतून व्याख्यानें देऊन लोकांना भडकावूं लागले. त्यांच्यापैकीं कांहींना पकडून इंग्रजांनीं राजद्रोहाबद्दल फटके मारवले, परंतु लोकांतील असंतोष त्यामुळें लवमात्र कमी झाला नाहीं. लवकरच नव्या चरबटलेल्या काडतुसांचें प्रकरण उद्भवलें, व आपल्याला इंग्रज जबरीनें बाटविणार अशी सर्वांची खात्री झाली. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या वर्तनानें या आगींत तेल पडलें, व बाटलेले हिंदी ख्रिस्ती लोकांच्या द्वेषास व तिरस्कारास पात्र झाले.

मे महिन्याच्या सुरवातीपासूनच लखनौ येथें शिपायांत अशांतता उघड उघड दिसूं लागली, परंतु लॉरेन्सच्या वचकामुळें तेथील शिपायांना डोकें वर काढण्यास संधी मिळेना. दिल्ली व मीरत येथील हकीगत सर्वत्र पसरल्यावर शिपायांना धीर चढला. लॉरेन्सनें मात्र आपलें डोकें शांत ठेवलें, व जुन्या राजवटींतील रिकाम्या लोकांना नोकरींत नव्यानें भरती करण्याचें धोरण अंगिकारलें. शिपायांचा पगारही त्यानें वाढविला. अपराध्यांना शिक्षा व राजनिष्ठांना भर दरबारांत सन्मानपूर्वक बक्षिसें वांटणें, या धोरणाचें अवलंबन करून त्यानें कंपनीच्या सत्तेचा वचक लखनौंत ठेवण्याचा प्रयत्न केला. बंड झाल्यास स्वसंरक्षणासाठीं म्हणून रेसीडेन्सी व मच्छी भवनाची त्यानें डागडुजी करून, इंग्रजांसाठीं निवाऱ्याचा उमदा आसरा तयार केला, व बचावाचा कडेकोट बंदोबस्त केला. त्याच्या तडफदार भाषणांनीं व वर्तनानें मे महिना नीट लोटला. लखनौच्या आसपास मात्र ठिणग्या उडूं लागण्यास प्रारंभ झाला.

३० मेच्या रात्रीं सर हेन्री लॉरेन्स छावणी जवळच्या भोजनालयांत आपल्या मित्रांसह भोजन करीत होते. मनांत कितीही खळबळ उडाली असेना, त्यांचे

तोंडावर मात्र शांतता दिसत होती. थोड्या वेळापूर्वी कॅप्टन् विल्सन् यानें येऊन सांगितलें कीं, आज रात्रीं ९ वाजतां येथेंही पण बंडाचा डोंबाळा उठेल, असें मला एक शिपाई म्हणाला. सर्व लोक उत्कंठेनें भिंतीवर टांगलेल्या घड्याळाकडे वारंवार नजर टाकीत होते. हळू हळू ९ वाजले. परेडच्या मैदानावरील ९ वाजतांची तोफ पण डागली गेली, पण कोठेंच गडबडीचीं चिन्हें दिसेनात. तेव्हां हंसून सर हेन्री लॉरेन्स कॅप्टन विल्सनला म्हणाले, "कसें काय विल्सन्, तुमच्या दोस्तांनीं ठीक वेळेवर आपलें काम सुरू केलेलें दिसत नाहीं."

त्यांचें भाषण संपतें न संपतें तोंच बंदुकीच्या गोळ्यांचे धुडुम गुडुम आवाज ऐकूं आले. लॉरेन्ससाहेब अजून हंसतच होते. इतक्यांत बराच मोठा गलबला त्यांचे कानीं आला. तेव्हां सर हेन्री लॉरेन्स गंभीरपणें नोकराला ताबडतोब घोडा आणावयाचा हुकूम देऊन, भोजनालयाचे दाराजवळ आले.

बंडखोरांनीं घरांना आगी लावल्या होत्या व त्यांच्या ज्वाळा आकाशाला भिडत होत्या. बंदुकांच्या आवाजांबरोबर शिपायांचा जोराचा कोलाहल पण दुरून स्पष्ट ऐकूं येत होता.

इतक्यांत एक पहारेवाल्यांचें पथक तेथें पोंचलें. त्यांच्या मुख्यानें दंगलीची हकीकत सांगून, दंगेखोरांस तोंड देण्यासाठीं बंदुका ठांसून भरण्याबद्दल कॅप्टन् विल्सनची परवानगी मागितली. सर हेन्री यांचे इच्छेनुसार आज्ञा दिली गेली. ही परवानगी अनुचित वेळीं दिली गेली असा कित्येकांचा समज झाला. कारण या वेळीं शिपायांवरचा सर्वांचा विश्वास उडाला होता. त्याच बंदुका शिपाई आपल्यावर उडवतील असें भय त्यांना पडलें होतें. परंतु सर हेन्री जसे सरळ मनाचे तसेच दृढ निश्चयीही होते. ते हुकमी आवाजांत सैनिकांना म्हणाले, "मी ह्या सैतानांना छावणींतून बाहेर घालवीत आहें. मी परत येईपर्यंत तुम्ही या जागेचें रक्षण करा व येथें कोणालाही दंगाधोपा करूं देऊं नका. जर तुमच्यांत मला यत्किंचित् चलबिचल झालेली दिसली, तर लक्षांत ठेवा कीं मीं सर्वांना बेधडक फांशी देईन."

असें म्हणून ते पुढें निघाले. त्यांचे नोकर त्यांचे मागून चालूं लागले. त्यांच्या आज्ञेचा परिणाम असा झाला कीं, सैनिकांनीं सर्व रात्रभर मोठ्या कसो-शीनें छावणींत पहारा दिला. लोक त्यांना फितवण्यास आले परंतु ते त्यांच्या झांपडींत आले नाहींत. चोहोंबाजूंस जाळपोळीचें सत्र सुरू झालें, तरी येथें त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं.

छावणी शहरापासून २-३ मैल दूर होती. बंडखोरांचा शहराला उपसर्ग पोहोंचूं नये म्हणून, सर लॉरेन्सनीं ३२ व्या पलटणीला शहराकडे जाणाऱ्या रस्त्यावर पहारा करण्यास सांगितलें. त्या रात्रीं ७१ व्या पलटणींतील शिपाई फितुर होऊन त्यांनीं ब्रिगेडिअरला ठार मारलें व इतर इंग्रजांना मारण्याकरतां ते हॉटेलांत घुसले. तेथें कोणी नजरेस न पडल्यामुळें त्यांनीं छावणींत दंगा सुरू केला. नशीब थोर म्हणून बायकापोरांचे बळी छावणींत त्या दिवशीं पडले नाहींत. दुसऱ्या पलटणींतील बरेच लोक भीतीनें घरीं पळून गेले व कित्येक बंडखोरांना मिळाले, व बाकी ५००।६०० सनिक इंग्रजांचे पक्षांत राहिले. पळून गेलेल्या सैनिकांपैकीं कांहीं घोडदौडीच्या मैदानावर जमा झाले. सर हेनरी सैन्यासमवेत तेथें पोंचले व त्यांनीं कांहीं वायबार करवले—त्यामुळें घाबरून बंडखोर शिपाई सैरावैरा धावूं लागले. त्यांपैकीं ६० इसम पकडले गेले. शहरांत कांहीं मुसलमानांनीं धामधूम सुरू केली होती, पण त्यांचा सुद्धां पोलिसांकडून बंदोबस्त करण्यांत आला. ३० मे रोजीं घडलेली लखनौमधील धूमधाम अशा रीतीनें दाबण्यांत आली खरी, परंतु तिचा परिणाम दूरवर पोंचला. सर्व अयोध्या प्रान्तांत बंडाचा डोंब उसळला. दररोज लखनौला जागजागून चिन्ताजनक बातम्या येऊं लागल्या. जेथून पाहावें तेथून इंग्रजांचे बळी, घरांची जाळपोळ व खजिन्याची लुटालूट, याच्याच बातम्या येत होत्या. सीतापूर, मलावण, फैजाबाद, सुलतानपूर, मुहमदी, सलोनी, गोंडा, सिकरोरा, मुल्लापूर, दर्याबाद इत्यादि ठिकाणीं, बंडामुळें फार अस्वस्थता माजली. इंग्रजांची जीव घेऊन पळतां पळतां पुरेवाट झाली. पळून जाणाऱ्यांपैकीं कित्येकांचे रस्त्यांत बळी पडले व कित्येकांना रस्त्यांत भयंकर हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. कांहीं ठिकाणच्या लोकांनीं मात्र या पळपुट्यांना आश्रय देऊन त्यांचा बचाव केला. कांहीं दिवस इंग्रजांचें स्वामित्व सर्व ठिकाणांहून उखडल्यासारखें दिसत होतें.

इंग्रजांनीं या आपत्तींत आपले जीव कसे वांचवले व प्राण वांचवण्यास त्यांना कशा हालअपेष्टा सोसाव्या लागल्या, याची कथा येथून तेथून सारखीच आहे. शिपाई उलटले, गांवगुंड त्यांना मिळाले, सांपडतील त्या इंग्रजांना त्यांनीं ठार केलें, व उरलेले रानावनांत लपतछपत आडवाटेनें लखनौ किंवा प्रयागकडे गेले. ज्यांना हिंदी लोकांनीं चोरून लपून वा उघड सहाय्य केलें ते वांचले, व बाकीचे वाटेंतच मारले गेले.

सीतापुर येथील एक सिव्हिलियन् स्टुअर्ट जॅक्सन आपल्या दोन्ही बहिणींना घेऊन पळून जाण्याच्या बेतांत होते. ते जायला निघणार, इतक्यांत एक बहीण कुठें गेली, किंवा तिचें काय झालें हेंच कळेना. नाइलाज म्हणून ते आपल्या एकाच बहिणीला घेऊन निघाले. रस्त्यांत त्यांना आणखी कांहीं पळपुटे भेटले. सर्व मिळून मिथोलीकडे निघाले. तेथील राजा लूनीसिंग यानें त्या सर्वांना कचिपानी येथील जंगली किल्ल्यांत पाठवून दिलें. बिचाऱ्यांचे पाय कांट्यांनीं रक्तबंबाळ झाले व त्यांच्या कपड्यांची पण फाटून दुर्दशा झाली. सुमारें तीन महिनेपर्यंत या लोकांना तेथें हालांत राहावें लागलें. त्या जंगलांत उपयोगी अशा वस्तु पण दुर्मिळ होत्या. तिसरे महिन्यांत बंडखोरांना या लोकांचा सुगावा लागला. बंडखोर तेथपर्यंत पोंचले नाहींत हे नशीब. तेथील राजानें आपल्याला बंडखोरांकडून इजा पोहोंचूं नये म्हणून, त्यांना तेथून निघून जाण्यास सांगितलें. बिचाऱ्यांच्या विपत्तीला पारावार राहिला नाहीं. दोन बंड्यांमध्यें कसे तरी सगळे कोंबून भरून हे लोक वाट चालूं लागले. मिथोलीच्या जहीर-उल-हसन नांवाच्या एका हवालदारानें या लोकांना साखळीनें बांधून १५० सैनिकांचे पहाऱ्यांत लखनौला पाठविलें. सहा दिवसांनीं हे लोक लखनौला पोंचले. बिचाऱ्यांची योग्य खाणें पिणें, व पुरेशी झोंप न मिळाल्यानें दुर्दशा झाली होती. सर स्टुअर्ट जॅक्सन तर रस्त्यांतच बेशुद्ध झाले. बायकांना साखळदंडांनीं बांधलें नव्हतें, तरी त्यांना खाणेंपिणें इतकें वाईट मिळत असे कीं, त्या त्याला शिवत देखील नसत. लखनौच्या केसर बागेजवळच्या चौकीपाशीं, एका लहान कोठडींत या सर्वांना कोंडून ठेवलें होतें. एका पहारेकऱ्याला यांची ही दुर्दशा पाहून दया आली व तो त्यांना एका बऱ्यापैकीं घरांत घेऊन गेला. यामुळें कैदेंत ही या लोकांना थोडे आरामानें राहतां आलें. या पहारेवाल्याचें नांव मीर वाजिदअल्ली असे होतें.

लखनौचे पदच्युत नबाब वाजिदअल्लीशहा यांची बेगम हजरतमहाल, हिचा कादिर नांवाचा सरासरी ११ वर्षांचा मुलगा याच संधीस नबाबी मसनदीवर बंडवाल्यांनीं बसविला. आपल्या मुलातर्फे बेगम राज्यकारभार चालवूं लागली. लहानमोठ्या हुद्यांवर अधिकारी नेमून औध प्रांतांतील सर्व तालुकदारांना दरबारांत हजर राहण्याकरतां हुकूम सुटले. इंग्रजांनीं अयोध्या प्रान्त आपल्या राज्यास जोडल्यावर सैनिकांचीं १२ पथकें तयार केली होतीं. याच शिपायांनीं पुढें लखनौ आपल्या ताब्यांत घेऊन कादिरला नबाब केलें. बेगमेचे मुख्य प्रधान व साहाय्यक मम्मूखां यांचेवर शिपायांचा असा दाब होता कीं, त्यांचे इच्छेविरुद्ध

कांहीं करण्याची कोणाची प्राज्ञाच नव्हती. नांवाचा नबाब कोणी कां असेना; शिपायांची तेव्हां खरी नबाबी चालत होती.

त्याच सुमारास अहमदुल्लाशाह नांवाचा एक विचित्र मौलवी तेथें आला. हा पूर्वी फैजाबादमध्यें होता. तेथील मशीदींत यानें जानेवारी महिन्यांत एक लांबलचक व्याख्यान दिलें. त्यामुळें लोकांत फार खळबळ उडाली. तेथील अधिकाऱ्यांना याची शंका आली. त्यांनीं मौलवी व त्याचे सशस्त्र अनुयायी यांना हत्यारें खालीं ठेवण्यास सांगितलें. मौलवीनें या गोष्टीस नकार दिला. तेव्हां खूप गडबड उडाली. दोनी बाजूंमध्यें मारामारी सुरू झाली; मौलवी व त्याचे साथीदार यांना जखमा झाल्या, व त्यांना पकडण्यांत आलें. बरेच दिवस त्यांचेवर खटला चालला होता; इतक्यांत बंडाची आग फैजाबादमध्यें लागली व त्याच-वेळीं संधी साधून हा आपल्या साथीदारांसह तुरुंगांतून पळाला व बंडखोरांना सामील झाला. परंतु याची फैजाबाद येथील शिपायांनीं लखनौस रवानगी केली. हळू हळू दिल्लीहून लखनौला आलेल्या शिपायांनीं याला आपला मुख्य सल्लागार नेमून, अयोध्येचे माजी मंत्री अलीनकीखान यांचा वाडा राहण्यास दिला. तेथून हे मौलवीसाहेब रोज नवे फतवे काढूं लागले, व अनुयायी गोळा करूं लागले. लवकरच हे सर्व सशस्त्र बंडखोरांचे मुख्य झाले. यांच्या स्फूर्तिदायक भाषणांमुळें लोकांत नवा जोम उत्पन्न झाला.

कैसराबादमधे कैदेंत असलेल्या इंग्रजांबद्दल वाजिदअल्लीप्रमाणें शहागंजचे राजा मानसिंग यांना पण फार दया वाटत होती. दिल्लीचे शिपाई व त्यांचे म्होरके मालवी जर त्यावेळीं लखनौमध्यें नसते, तर या कैदी इंग्रजांना त्यांनीं कुठेंतरी दूर खास पळवलें असतें. स्टुअर्ट जॅकसनसाहेबांची बेपत्ता असलेली बहीण पण येथेंच निराळ्या वाटेनें आली होती, व कॅप्टन ऑरसुद्धां याच कैद्यांमध्यें होते. जनरल हावेलॉक, व औटरॅम ज्या दिवशीं लखनौ शहरांत आले, त्याच दिवशीं शाहसाहेब मौलवीच्या हुकुमानें या १९ कैद्यांना ठार मारण्यांत आलें. राजा मानसिंग किंवा वाजिदअल्ली यांना त्यांच्या बचावासाठीं कांहींच करतां आलें नाहीं.

२६ आक्टोबरपासून १६ नवंबरपर्यंत मम्मूखां रोज या कैद्यांना येऊन म्हणत असे कीं, तुम्ही कॅप्टन् ऑरकडून जनरल् आउटरॅम् यांस, 'सर्व इंग्रज लोक अयोध्या प्रान्त सोडून जात असल्यास येथील सर्व इंग्रज कैद्यांची सुटका होईल,' अशा अर्थाचें पत्र लिहवा. परंतु ही गोष्ट इंग्रज कैद्यांनीं कबूल केली नाहीं.

शेवटीं १६ नव्हेंबरला हे सर्व लोक मारले गेले. फक्त २ बायका व एक मुलगी तेवढी वांचली. वाजिदअल्लीनें युक्तिप्रयुक्तीनें त्यांना तेथून पळवलें, व त्याच्या कृपेनेंच त्यांचा बचाव झाला. सीतापूरला जें घडलें तेंच औंध प्रांतांतील इतर ठिकाणींही घडून आलें.

याप्रमाणें ठिकठिकाणची हालहवाल ऐकून सर हेनरी लॉरेन्स दिवसेंदिवस फार उद्विग्न होऊं लागले. त्यांनीं अविश्रान्त श्रम करून शहराचें रक्षण करण्याला सुरवात केली. बंडखोरांना व गांवगुंडांना शिक्षा करण्याकरतां मच्छीभुवनाच्या समोर फाशीचे खांब उभे केले. दररोज कित्येक लोक फांशी देण्यांत येत असत. पकडणें, चौकशी करणें व शिक्षा सुनावणें हें त्रिविध कार्य झटपट उरकण्यांत येऊं लागलें. शहरांत लष्करी कायदा पुकारण्यांत आला. कॅप्टन कार्नेजी नांवाचे एक पोलिस अधिकारी कसोशीनें खऱ्याखोट्या बंडखोरांना पकडूं लागले.

सर हेनरी यांची प्रकृति आधींच अशक्त होती. त्यांतून या अस्वस्थतेच्या हालहवालीमुळें ती अधिकच खराब झाली. ते आजारी असल्यामुळें डॉक्टराच्या सल्ल्यानें पूर्वींच विलायतेस जाणार होते, परंतु आणीबाणीची वेळ जाणून त्यांनीं प्रकृतीची पर्वा न करतां लखनौचा सुभा सांभाळला. अखेरीस नाइलाज होऊन, राज्यकारभार चालवण्यास फायनान्स कमिशनर मार्टिन गबिन्स यांचे अध्यक्षतेखालीं त्यांनीं एक कमिटी नेमली. गबिन्ससाहेब स्वभावानें फार करडे होते. अधिकार हातांत येतांच त्यांनीं सैन्याला निःशस्त्र करण्यास सुरवात केली, व कित्येकांना तर नोकरीवरून दूर केलें. सर हेनरींना ही गोष्ट फार बोंचली, कारण ते सैनिकांबद्दल अविश्वास दाखवीत नसत. म्हणून त्यांनीं कमिटी बरखास्त करून अधिकारसूत्रें पुन्हां आपल्या हातांत घेतलीं, व शिपायांना दूतांमार्फत परत बोलावलें. ५०० शिपाई परत आले व त्यांनीं जन्मभर इंग्रजांची इमानानें नोकरी केली. धमकी किंवा प्रलोभन यामुळें एकदांसुद्धां ते बहकले नाहींत, व बंडाच्या धामधुमींतही सारखे राजनिष्ठ राहिले. यानंतर त्यांनीं ५०० पेन्शनर शिपाई निवडले व त्यांची एक स्पेशल पलटण बनविली. याप्रमाणें लखनौच्या रक्षणासाठीं सुमारें १००० अत्यंत विश्वासू शिपाई गोळा करण्यांत आले.

१२ जूनला पोलिसचें काम करणारे शिपाई फितूर झाले. यांमध्यें पायदळ तुकडी व घोडदळाचे शिपाई होते. या लोकांनीं ताबडतोब सुलतानपूरचा रस्ता धरला. एका इंग्रज सेनानीनें यांचा पाठलाग केला, परंतु शिपायांच्या हातून सुटून त्याला जिवानिशीं परत येतां आलें, हेंच त्याचें नशीब म्हटलें पाहिजे ! मग शिपायांना परत आणणें दूरच राहिलें !

इकडे कानपुराहून सेनापति व्हीलर यांनीं आपल्या संकटांची बातमी सर हेनरींना कळवून त्यांचेपासून सैन्यबळ मागितलें. परंतु लखनौच्या रक्षणाची मदार ज्या लोकांवर होती, त्यांना मदतीस पाठवल्यास लखनौची काय वाट होणार, या विचारानें मोठ्या खेदानें त्यांनीं सेनापतीला नकार दिला. इकडे लखनौचे रेसिडेन्सींत गर्मीमुळें कॉलरा सुरू झाला व युरोपियन बायकापोरांचे फार हाल झाले. हळूहळू जून महिना संपत आला व पावसाचे सुरवातीमुळें रोगराई दबली, परंतु सर हेनरींची काळजी दूर झाली नाहीं. कानपूरहून बातमी आली कीं सर व्हीलर मारले गेले व कानपूर बंडवाल्यांच्या हातीं लागलें. त्यामुळें नबाबगंज व बाराबंकीला जमलेल्या बंडवाल्यांना जोर चढला व ते लखनौच्या रोखानें निघाले. २९ तारखेला बातमी आली कीं, बंडखोरांची आघाडीची तुकडी ८ मैलांवरील चीनहाट गांवीं पोंचली आहे. ही बातमी ऐकतांच सर हेन्री लारेन्स ३० जूनला सकाळीं ६ वाजतां कांहीं इंग्रजी सैनिकांसमवेत बंडखोरांशीं सामना करण्यास निघाले. लखनौ व चीनहाट यांचेमध्यें कोचरेल नांवाची नदी पडते. लखनौहून फैजाबादला जी सडक जाते तिच्यावरच हा पूल आहे. हा पूल उतरून गोऱ्यापलटणीनें इस्माइलपुरांत बंडखोरांशीं सामना घेतला. बंडखोरांनीं प्रथमच तोफा रोंखून जय्यत ठेवल्या होत्या. गोऱ्यांना पाहून बंडखोरांनीं तोफांची सरबत्ती सुरू केली, व घोडेस्वार आणि पायदळ शिपायांनीं दोहों बाजूंनीं पुढें सरसावून या छोट्या फौजेला वेढा दिला. सर्व बाजूंनीं घेरले गेल्यामुळें गोरे लोक घाबरले व सैरावैरा धावूं लागले. सेनापतीला गोळी लागली व त्यांच्या तोफा बंडखोरांनीं काबीज केल्या. बरेचसे गोरे कामास आले. लाचार होऊन त्यांना लखनौला वापस जाणें अवश्य झालें. बरेच शिपाई रस्ता अडवून उभे होते. त्यांनीं या लोकांना स्वस्थतेनें मागें हटूं दिलें नाहीं. कसे तरी जीव घेऊन हे लोक पळाले. एकूण ११९ गोरे त्या दिवशीं कामास आले. इंग्रजांचा उत्साह मावळला. आधींच त्यांची संख्या कमी, त्यांत सुमारें १२५ लोक कामास आलेले. लढाईस यापुढें तोंड कसें द्यावें हा विचार सर्वांना जाचूं लागला.

चीनहाटची लढाई जिंकून फुशारलेले शिपाई नव्या दमानें गोमतीचे तीरावर आले. पुलावर तोफा रोखलेल्या होत्या म्हणून ते दुसऱ्याच युक्तीनें नदीपार झाले. दुपार होते न होते तोंच शिपायांनीं फैजाबाद, सीतापुर, सुलतानपुर वगैरे गांवें व्यापून टाकलीं. लखनौमध्येंही शिपाई घुसले व त्यांनीं भयंकर धूमधाम सुरू केली. तडफीनें इंग्रजांचे बंगले, आणि रेसिडेन्सी व मच्छीभुवनाच्या

आसपासचीं समग्र घरें व्यापून, त्यांनीं रेसीडन्सींत कसेबसे जीव घेऊन राहाणाऱ्या इंग्रजांवर दिवस रात्र गोळ्यांची सरबत्ती चालू ठेवली.

एक दिवस सर व्हीलरनीं सर लॉरेन्सपाशीं मदतीची याचना केली होती. आज त्यांना दुसऱ्यांकडे मदतीसाठीं याचना करावी लागली. ३० जूनला चीनहाटमध्यें त्यांचा पराभव झाला व १ जुलाईपासून औधमधील इंग्रजी सत्ता खिळखिळी झाल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. एका दिवसांत ही सर्व उलथापालथ झाली. रेसीडेन्सीमध्यें सर्वांनीं राहावयास जावें व मच्छीभवनांतील युद्धोपयोगी सामानाचा नाश करावा असें त्यांनीं ठरविलें; व त्याप्रमाणें मच्छीभवनांतील सर्व सामग्री बारुदीनें उडवून देऊन सर्व इंग्रज रेसीडेन्सींत येऊन राहिले. कारण दोन्ही ठिकाणें हातीं राखणें त्यांना अशक्य वाटूं लागलें. इकडे बंडखोर शिपायांनीं एका अर्थानें लखनौ शहर आपल्या ताब्यांतच घेतलें. २ जुलाई रोजीं सर हेन्रींनीं ठिकठिकाणीं तोफा व सैनिक ठेवून रेसीडेन्सीच्या बचावाचा बंदोबस्त केला. पण त्याच दिवशीं त्यांना भयंकर जखम झाली. शिपायांनीं चीनहाटचे युद्धांत इंग्रजांची एक हॉवि-ट्झर तोफ ताब्यांत घेतली होती, तिचाच एक गोळा सर हेन्री यांचे जांघेवर पडला. त्यावेळीं ते कॅप्टन विल्सन यांच्याशीं गोष्टी करीत होते. इतक्यांत जोरानें एक गोळा येऊन पडला व त्यानें आपलें काम केलें. त्यांचेजवळच त्यांचे पुतणे जॉर्ज लॉरेन्स बसले होते, त्यांना किंवा कॅप्टन विल्सनूला बिलकुल इजा झाली नाहीं. फक्त छताच्या तुटलेल्या विटा त्यांना लागल्या. लवकरच डॉक्टरला बोलावून त्यांचे सल्ल्याप्रमाणें त्यांना घरीं पोंचविण्यांत आलें.

या आपत्तीचें सर हेन्रींना कांहींच वाटलें नाहीं, पण त्यांचे जवळचे लोकांना त्या अपघातानें फार उदासीनता वाटली. भयंकर वेदना होत असतांनासुद्धां, ते त्या शांतपणें सहन करीत होते. 'मला विशेष मानापानानें पुरूं नका. कर्तव्य करीत असतां मेलेल्या साधारण शिपायाप्रमाणें मला मूठमाती द्या,' असें ते वारंवार म्हणत. आपल्या देशी-विदेशी मित्रांना बोलावून आत्मरक्षणाचे अनेक उपाय त्यांनीं सांगितले. सर्वांना शेवटीं त्यांनीं हाच उपदेश केला कीं, 'शरण जाऊं नका किंवा अपमानकारक अटींवर तह करूं नका, तर आपलें कर्तव्य करीत वीरांसारखे रणांगणांत मरा.'

शेवटीं ता. ४ जुलै रोजीं सकाळीं त्यांचा आत्मा ही नश्वर कुडी सोडून गेला. तोफांचे गडगडाटांत साधारण शिपायांचे जवळच त्यांचें प्रेत पुरलें गेलें. हे एक

खरोखरच थोर पुरुष होते. त्यांची कर्तव्यदक्षता अवर्णनीय होती. त्यांचें शौर्य वाखाणण्यासारखें होतें, व त्यांचा स्वभाव उमदा होता. सर हेनरी लॉरेन्ससारखे उदारचरित पुरुष फार थोडे लाभतात. ते न्याय, निःपक्षपातीपणा व सदयता यांची केवळ मूर्तीच होते. जर त्यांच्यासारखे न्यायी पुरुष प्रत्येक प्रान्ताचे अधिपति असते व त्यांचीच नीति सर्वांनीं चालविली असती, तर कदाचित् हिंदुस्थानांत बंडाची आगसुद्धां पेटली नसती.

इकडे सर हेन्रीचें कलेवर पुरलें गेलें व तिकडे बंडखोरांच्या गोळीबारांना ऊत आलेला दिसला. रेसिडेन्सीवर भीषण अग्निवर्षाव सुरू झाला. सर्व शहरांत पळापळ चालू होती. रेसिडेन्सींत प्राणरक्षण करण्याकरितां राहिलेल्या लोकांचे जिवावर मोठेंच संकट कोसळलें. एक एक दिवस प्रलयकालासारखा भासूं लागला. इंग्रजांचे नोकर चाकर पळून गेले. त्यामुळें त्या लोकांना आपल्या हातांनीं पाणी भरावें लागत होतें, कपडे धुवावे लागत होते, व हात जाळून स्वयंपाकही करावा लागत होता. शिवाय लढाई व पहाऱ्याचें मुख्य काम होतेंच. एकाएका घरांत कित्येक लोक रहात होते. कांहींना तर घोडपागेंत राहावें लागत होतें. जखमी लोकांची संख्या वाढून सर्व हास्पिटल भरून गेलें. इंग्रजांच्या बायका मात्र काळजीपूर्वक त्यांची सुश्रूषा करीत असत.

या स्थानाचा विध्वंस करण्याकरतां शिपायांनीं जागजागीं तोफा रोखल्या व जवळपासच्या ऊंच घरांवर चढून अचूक निशाणबाजी सुरू केली. दोनप्रहरची वेळ सोडून सर्व दिवसभर गोळ्यांचा वर्षाव होत होता. या भीषण प्रसंगांतून आपला बचाव करण्यासाठीं इंग्रजांनीं नव्या भिंती बांधणें सुरू केलें. मृत्यूची जणूं बाजारपेठ तेथें भरली होती. या वेढ्यांत सांपडलेल्या इंग्रजांना जितक्या अडचणी भोगाव्या लागल्या, त्यांचें वर्णन करणेंसुद्धां कठीण आहे. त्यांचे मुख्य इंजिनीयर, गोलंदाज व कमिश्नर मारले गेले. रेसीडेन्सीच्या रक्षणार्थ प्रारंभीं १६९२ लोक होते. त्यांत ९२७ गोरे व ७६५ हिंदी होते. या वेढ्यांत ३५० इंग्रज व १३३ हिंदी शिपाई कामास आले. २३० हिंदी शिपाई बेपत्ता झाले. कित्येक लहान मुलें लागट रोगांना बळी पडलीं. अफाट शत्रुसैन्यापुढें टिकाव धरणें मूठभर लोकांना फार कठीण होऊन गेलें. बाहेरून कुठूनतरी मदत मिळेल अशी त्यांना अपेक्षा होती, पण सप्टेंबर महिना अर्धा गेला तरी त्यांना कोठून मदत आली नाहीं. तरी त्यांनीं नेटानें टिकाव धरला व इंग्रजांचें नांव राखलें. त्यांची चिकाटी अवर्णनीय होय. या वेळीं इंग्रजांचा एक अंगद नांवाचा विश्वासू जासूद होता. त्यानें आपलें

नांव सार्थ केलें. अडकून पडलेल्या इंग्रजांचीं पत्रें तो नीट सुस्थळीं पोहोंचवून देत असे. त्याच्याकडूनच जनरल हॅवेलॉक कानपूरहून लखनौवर चाल करून येत आहेत, ही बातमी अडकलेल्या इंग्रजांना कळली. ही बातमी ऐकून त्यांना फार आनंद झाला. आपली सुटका होणार असा त्यांच्या मनांत विश्वास उत्पन्न झाला, व कुमकेची ते वाट पाहूं लागले. अतिशय विपत्तींत त्यांनीं दिवस काढले, परंतु ते शत्रूंना शरण गेले नाहींत. सर्व आभाळ फाटलेलें दिसत असूनही त्यांची हिंमत खचली नाहीं. या वेढ्यांत इंग्रज स्त्रियांनीं पुरुषांना उत्तेजन देण्याचे व जखमी आणि आजारी लोकांची सुश्रूषा करण्याचें कार्य मोठ्या धीरानें व तत्परतेनें पार पाडलें. त्यामुळें लढवय्यांचा उत्साह द्विगुणित झाला. शिवाय कानपूरची शोक-जनक वार्ता सविस्तर कळल्यामुळें शरण जाण्याचा प्रश्नच उरला नाहीं. कारण शिपाई विश्वासघातकी आहेत, हें सर्वांना कळून चुकलें होतें. लॉरेन्ससाहेबांच्या दूरदृष्टीमुळें रेसिडेन्सींत अन्नपाणी व दारूगोळा, यांचा भरपूर पुरवठा होता व बंदोबस्ताची जागाही बचावाच्या दृष्टीनें मोक्केशीर निवडली गेली होती. इंग्रजांना या बंडांत आज ना उद्यां जय मिळून ते आपणांस सोडविण्याकरितां येतील, अशी सर्वांची खात्री होती. तोंपर्यंत दम धरण्याचाच काय तो प्रश्न होता, परंतु प्रत्येक दिवशीं परिस्थिती अधिकाधिक बिकट होत होती. दिल्ली व मीरतच्या बातम्यांनीं क्षुब्ध झालेले शिपाई कानपूरची हकीगत ऐकून उन्मादानें बेफाम झाले होते, व ठिकठिकाणांहून बंडखोर शिपायांची भरती लखनौस होत होती. बंडवाल्यांजवळ तोफा व इतर युद्धसामग्री भरपूर होती. कानपूरप्रमाणेंच लखनौ येथील इंग्रजांची चटणी उडविण्यास ते उत्सुक झाले होते. त्यामुळें रेसीडेन्सीवर त्यांनीं सारखा तोफांचा मारा चालू ठेवला होता. इंग्रजी सेनेनें कानपूर जिंकून घेतल्यानंतर, तेथील बंडवाले लखनौकडेच वळले; आणि इंग्रजांनीं दिल्ली काबीज केल्यानंतर तर बंडाचें मुख्य केंद्र लखनौ बनलें, व सर्व बंडवाले शिपाई दिल्लीऐवजीं लखनौस एकत्र होऊं लागले. त्यामुळें रेसीडेन्सीवरील दाब वाढला, आणि इंग्रजी फौजेला कठिण दिवस आले, व मदतीची अपेक्षा त्यांना अधिकच तीव्रतेनें भासूं लागली. कांहीं हिंदी लोकांचें इंग्रजांना उत्तम साहाय्य झाल्यामुळेंच त्यांचा निभाव लागला. पेनशनर शीख शिपाई शेवट-पर्यंत राजनिष्ठ राहिले आणि सर्वांनीं उत्तम शौर्य प्रगट केलें. अंगदासारखे जासूद तर शरिराची मुद्दाम चिरफाड करून घेऊन, व त्या झालेल्या जखमेंत निरोपाच्या चिठ्या ठेवून, इकडून तिकडे धाडसानें जात असत. त्यामुळें कडेकोट वेढा असूनही इंग्रजी फौजेचें बाहेरच्या जगाशीं दळणवळण अगदींच बंद झालें नाहीं.

कानपूरच्या रक्षणाचा भार नीलवर सोंपवून हॅवेलॉक लखनौच्या मदतीला निघाला. पण वाटेंत त्याला ठिकठिकाणीं बंडखोरांच्या टोळया आडव्या येऊं लागल्या त्यामुळें त्याला बंडवाल्याशीं वाटेंत ठिकठिकाणीं सामना घेणें भाग पडे. झालेल्या तीन चार चकमकींत त्याचा जय झाला खरा; परंतु बरेच इंग्रज शिपाई कामास आल्यामुळे पुढें जाण्याची त्याची हिंमत होईना. कारण त्याच्या जवळ फारच थोडी फौज होती. इकडे ब्रह्मावर्ताला बंडवाले पुन्हा एकत्र होऊं लागल्यामुळें त्याची पिछाडी तुटण्याचा संभव उत्पन्न झाला. त्यामुळें अध्या वाटेवरून परत कानपूरला जाणें हॅवेलॉकला भाग पडलें. त्यानें बिठूर येथें बंडवाल्यांचा मोड केला, व अधिक सैन्याची जुळवाजुळव चालविली. कारण पुरेसें सैन्य बरोबर घेतल्याशिवाय लखनौवर चाल करून जाणें वेडेपणाचें आहे असें त्याला वाटत होतें. लखनौ येथील इंग्रज बायकामुलें अत्यंत संकटांत असल्यामुळें व कानपूरची कत्तल ताजी असल्यामुळें, नीलला हॅवेलॉकच्या दिरंगाईचा संताप आला व त्यानें आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याला लिहूं नये, असें उद्दाम पत्र हॅवेलॉकला लिहिलें. हिंदुस्थान सरकारला देखील हावेलाकची दिरंगाई सहन झाली नाहीं. त्यामुळें क्यानिंगनें आउट्रॅमला मुख्य सेनापती नेमून हॅवेलॉकला त्याच्या दिमतीस दिलें. हॅवेलॉकचा हा अपमानच होता, कारण आउट्रॅमचा एरवींचा दर्जा त्याच्या खालीं होता. आउट्रॅम कानपूरला आल्यावर त्याला हॅवेलॉककडे मुळींच दोष नाहीं असें दिसून आलें, व त्यामुळें आपल्या अधिकारांत जाहीरनामा काढून लखनौच्या स्वारीचें आधिपत्य त्यानें हॅवेलॉककडेच राहूं दिलें व आपण स्वतां फक्त मुलकी अधिकारी या नात्यानें स्वारीबरोबर जाण्याचें ठरविलें. त्यानें 'या स्वारींत लष्करी अधिकार हॅवेलॉकचा राहून मी त्यांचा मदतनीस म्हणून बरोबर जाईन,' असें जाहीर केलें. त्याचें हें उदार वर्तन पाहून सर्वांनीं त्याची प्रशंसा केली व हॅवेलॉकसाहेब खट्टू राहिल्यानें जो अनर्थ होण्याचा संभव होता तो टळला, आणि क्यानिंगची घोडचूक दुरुस्त झाली !

२१ सप्टेंबरला हॅवेलॉक व आउट्रॅम लखनौला रवाना झाले. त्यांचेजवळ तेव्हां ३१७९ सैनिक व १८ तोफा होत्या. एक तुकडी सेनापति नील याचे ताब्यांत दिली व तोदेखील स्वारीबरोबरच निघाला. मंगलौरला या लोकांचा बंडखोरांशीं सामना झाला. त्यांना हरवून व उन्नाव गांव मागें टाकून लखनौच्या दक्षिणेस असलेल्या अलमबाग नांवाच्या महालाजवळ ते येऊन पोंचले. बंडखोर येथें पहिल्यापासूनच होते. त्यांच्याशीं जोराची चकमक झाल्यावर इंग्रजांनीं

त्यांना तेथूनही हुसकून लावलें. २५० शिपायांना पिछाडीच्या संरक्षणाकरितां तेथेंच ठेवून, बाकी लोकांना रेसिडेन्सीकडे कूच करण्याचा हुकूम झाला. रस्त्यांत कालव्यावरील पुलावरून जावयाचें होतें. त्याला चारबागचा पूल असें म्हणतात. तेथें सैन्य पोंचतांच बंडखोरांनीं त्यांचेवर जोराचा गोळीबार सुरू केला. चोहों-बाजूंच्या घरांच्या गच्च्यांवरून गोळ्यांचा जणूं पाऊस पडत होता. आउट्रॅम साहेबांच्या हाताला गोळी लागली. जखम भयंकर नव्हती म्हणून त्यांनीं हाताला पट्टी बांधून आपल्या सेनेला एका जवळच्या बागेंत नेलें. बरेचसे गोरे शिपाई ह्या चकमकींत मारले गेले.

थोड्या वेळानें हॅवेलॉकचे मुलानें कांहीं शिपाई घेऊन पुलाकडे चाल केली व बंडवाले शिपाई आपल्या बंदुका भरताहेत इतक्यांत संगिनींनीं व तलवारींनीं त्यांचेवर जोराचा मारा केला. हाणामार करीत इंग्रज सेना पूल ओलांडून जाऊं लागली. रस्त्यांत पुन्हां त्यांचेवर चोहों बाजूंनीं गोळीबार सुरू झाला. परंतु त्याची पर्वा न करतां हे लोक सरळ मार्ग कापूं लागले. जेव्हां ते केसरबाग नांवाच्या महालापाशीं पोंचले तेव्हां मात्र त्यांना भयंकर गोळीबाराला तोंड द्यावें लागलें. येथूनही रस्ता काढीत काढीत हे लोक फरीदबक्ष व छतरमंजिलजवळ येऊन पोंचले. या पुढचा रस्ता पार केला कीं रेसिडेन्सी लागते.अधिकाऱ्यांनीं आपसांत सल्लामसलत केल्यावर, आल्यासारखें पुढें चालून जाण्याचें निश्चित झालें. हायलँडर सैनिकांना पुढें करून हे लोक धडाडीनें पुढें चालूं लागले. रस्त्याचे दोन्ही बाजूचीं घरें शिपायांच्या ताब्यांत होतीं. त्यामुळें हें सैन्य बाजारांत पोंचतांच त्यांचेवर दोन्ही बाजूंनीं गोळीबार सुरू झाला. नील याला गोळी लागून तो तेथेंच ठार झाला. पण यामुळें निरुत्साह न होतां सैनिक पुढें सरसावले. शेवटीं २५ सप्टेंबर रोजीं रात्रीं ते लोक रेसिडेन्सींत जाऊन थडकले. या प्रयत्नांत हॅवेलॉक साहेबांचे एकंदर ५५० शिपाई मारले गेले. १ जुलैला लखनौला वेढा पडला व त्यानंतर आलेली ही पहिली कुमक होय.

सर जेम्स आउट्रॅमचें म्हणणें पडलें कीं रेसिडेन्सीचें बनेल तोंपर्यंत कसून रक्षण करावें. तेथें अडकून पडलेल्या इंग्रज लोकांना व बायकापोरांना सुखरूप बाहेर नेण्यास ही नवी फौज असमर्थ होती. कारण चोहों बाजूला बंडखोरांचा भारी तळ पडला होता. व ही फौज त्या मानानें फार लहान होती. म्हणून आणखी कुमकेची वाट पाहात ते रेसिडेन्सींत मुक्काम करून राहिले. रेसिडेन्सींतील इंग्रजांना कुमक आली खरी, परंतु त्यांची सुटका मात्र झाली नाहीं. उलट ही नवी फौज देखील वेढ्यांत सांपडली. हॅवेलॉकनें वाटेंत जी दिरंगाई

केली, ती किती रास्त होती हें आलेल्या अडचणीनें सिद्ध झालें. या सहाय्यानें वेढयांतील इंग्रजांना हिंमत चढली व बंडवाल्यांची खचली, यांत शंका नाहीं.

इकडे दिल्लीवर अम्मल प्रस्थापित होतांच जनरल विल्सन् सिमन्यास गेले व गंगा-यमुना यांचे मधील मुलखांतून बंडखोरांना हुसकून लावण्याच्या उद्योगाला लागले. याकरतां त्यांनीं ७५० गोरे व १९०० देशी सैनिकांच्या पलटणी तयार करवल्या. ही सेना कर्नल ग्रिथेड यांचे आधिपत्याखालीं २४ सप्टेंबरला दिल्लीहून रवाना झाली. २८ सप्टेंबरला ही सेना बुलंद शहरीं पोंचली. येथें बंडखोरांशीं चकमक होऊन त्यांत इंग्रजांचा जय झाला. तेथून ते मालघरकडे वळले. येथें मोंगल बादशहाच्या नांवानें नवाब वलीदादखान कारभार चालवीत होता. इंग्रज आल्याचें कळतांच तो तेथून पळून गेला. इंग्रजांनीं १ ऑक्टोबरला त्याचा किल्ला सर केला. येथून ती विजयी फौज खुर्जाकडे वळली. तेथें त्यांना एका इंग्रज बाईचें धड दिसलें. तें पाहून सैनिक संतापले. पण हें काम तेथील कोणा माणसाचें नाहीं अशी खात्री पटल्यावर ते शांत झाले. तेथून सैन्य अलिगडला पोंचलें. बंडखोर शिपाई येथून पूर्वींच निघून गेले होते. फक्त फितुर झालेल्या लोकांचें पारिपत्य करावयाचें काम उरलें होतें. त्याला कांहीं फार वेळ लागला नाहीं. तेथून ते लोक अकबराबादकडे गेले. येथें मंगलसिंग व मेहताबसिंग नांवाचे दोन भाऊ गांवचे मालक होऊन बसले होते. त्यांना रात्रीं पकडून ठार मारण्यांत आलें व त्यांची मालमत्ता लुटून फस्त करण्यांत आली.

याच वेळीं आग्रा वगैरे ठिकाणीं अडकलेल्या इंग्रजांनीं जासुदामार्फत ग्रिथेड-साहेबांजवळ मदतीदाखल पत्रें पाठविलीं. त्याप्रमाणें ते आग्र्याकडे चालून गेले. तेव्हां आग्र्याला बंडखोरांची बरीच मोठी फौज गोळा झाली होती. ग्वालेर, भोपाळ, महीदपूर, माळवा वगैरे ठिकाणचे बंडखोर शिपाई आग्र्यास एकत्र झाले होते. १० ऑक्टोबरला ग्रिथेडसाहेब आग्र्यास येऊन पोंचले. तेथें सैन्याचा तळ देऊन विश्रांति घेत आहेत, तोंच शत्रूनें अचानक हल्ला करून त्यांच्या फौजेवर गोळी-बार सुरू केला. थोड्याच वेळांत तेथें घोर संग्राम सुरू झाला. तलवारी व संगिनींचा मारा सुरू झाला. याप्रमाणें थोडा वेळ हातघाईची लढाई होऊन शिपाई हळूहळू माघार घेऊं लागले. ग्रिथेडसाहेबानें त्यांचा पाठलाग करून त्यांना हैराण करून सोडलें. त्यांच्या १० तोफा ग्रिथेडसाहेबांचे हातीं लागल्या.

ही फौज १४ ऑक्टोबरपर्यंत आग्रा येथें राहिली. नंतर ती तेथून मैनपुरी-कडे वळली. रस्त्यामध्येंच वरिष्ठांच्या हुकुमान्वयें कर्नल होपग्रँट यांनीं दिल्लीहून

येऊन ब्रिथेडसाहेबांपासून चार्ज घेतला. मैनपुरीच्या राजानें इंग्रज आल्याचें कळतांच तेथून पलायन केलें. त्याचा किल्ला सुरुंग लावून उडवण्यांत आला. यानंतर तेथें पूर्ण शांतता प्रस्थापित करण्याचे उद्योगाला ते लागले. तेथून आश्रयार्थ आग्र्याला पळून गेलेल्या सगळ्या सिव्हिलियनांना परत बोलावून आणलें व सर्व कामें पहिल्यासारखीं सुरळीत होऊं लागलीं. जनरल आउट्रॅमचें पत्र पोचतांच ते तेथून लखनौला निघाले. हें सैन्य 'सरायमीरा' गांवीं पोंचतांच तेथें बंडखोरांशीं सामना झाला. त्यांत बंडखोरांचा मोड झाला. २६ ऑक्टोबरला हें सैन्य कानपुरला पोंचलें, व ३१ तारखेस लखनौजवळ आलमबाग व राणीचा पूल यांचे मधील मैदानांत तळ देऊन, हें सैन्य भारतवर्षाचे मुख्य सेनापती येण्याची वाट पाहूं लागले. या फौजेनें ज्या जलद हालचाली केल्या, त्यांमुळें बंडवाल्यांच्या भुरट्या टोळ्यांवर फारच वचक बसला, व भुरटे शिपाई भीतीनें आपापल्या घरीं गेले. त्यामुळें आसमंतांत शांतता उत्पन्न झाली, व इंग्रजी सत्तेचा सर्वत्र वचक बसूं लागला. यामुळें गंगायमुनामधील दुआब शांत झाला व लखनौ केंद्राच्या नाड्या तुटल्या. हायलँडर शिपायांबद्दल तर लोकांना इतका वचक बसला होता कीं, हिंदुस्थान निर्मनुष्य होऊन इंग्रज बायकामुलांच्या हत्येचा बदला घेतला गेल्याशिवाय कंबरेचा घागरा (लहेंगा) नेसणें सोडणार नाहीं, अशी त्यांनी शपथ घेतल्याची किंवदंति सर्वत्र प्रचलित होती. त्यांचें रणगाजित्व महशूरच आहे.

सर कॉलिन् कँबेल भारतवर्षाचे मुख्य सेनापति होऊन १३ ऑगस्टला कलकत्त्याला पोंचले होते. यावेळीं बंडाची आग चोहोंकडे पेटली होती. त्यांतल्यात्यांत अयोध्या व रोहिलखंड प्रांतांत धामधूम विशेष होती. बंडखोरांचा मोड करण्यासाठीं त्यांनीं चोहोंबाजूला सैन्य व भरपूर दारुगोळा पाठवण्यास सुरवात केली. कांहीं ठिकाणीं हें सैन्य वेळेवर पोंचलें नाहीं ही गोष्ट वेगळी, परंतु त्यांनीं आपलेकडून प्रयत्नांची कांहीं कसूर केली नाहीं. कलकत्त्याहूनच ते सर्व फौजेचीं सूत्रें हालवीत होते.

२७ आक्टोबरला ते स्वतः कलकत्त्याहून रवाना झाले व दिवसरात्र घोड्याचे गाडीनें प्रवास करून १ नोव्हेंबरला अलाहाबादला येऊन पोंचले. त्याचे दुसरे दिवशीं ते फतेपूरला पोंचले! त्यांचा लखनौला स्वतां जाण्याचा उद्देश होता.

२ नव्हेंबरला कानपूरच्या रस्त्यांत कॅप्टन पीलचा बंडखोरांशीं कजवा नामक ठिकाणीं सामना झाला. येथेंच १६५६ सालीं औरंगजेबानें आपला भाऊ सुजा याचा पराजय करून आपला सिंहासनाचा रस्ता मोकळा केला होता! कॅप्टन पील

या सामन्यांत विजयी झाला. ३ नोव्हेंबरला कानपूरला मुख्य सेनापति पोंचले. तेथून लागलीच निघून, ९ नोव्हेंबरला कर्नल होपग्रँट तळ देऊन त्यांची वाट पहात होते त्या ठिकाणीं ते येऊन पोचले.

कानपुरांत सर कँबेल यांनीं तेथील भयानक कत्तलींची हकीकत व बिबीघरांतील बायकांची झालेली दुर्दशा ऐकली व अप्रत्यक्ष पाहिली होती. कानपूरचीच पुनरावृत्ती लखनौला होऊं नये, ह्मणून त्यांनीं शिपायांना, ' जिवावर बेतली, तरी हरकत नाहीं, पण लखनौच्या वेढ्यांत सांपडलेल्या इंग्रज लोकांची सुटका ताबडतोब केली पाहिजे, ' अशा अर्थाचा उपदेश केला.

सर कँबेलला जनरल हॅवेलॉकप्रमाणें गल्ल्यांतून व आडमार्गानें शत्रूवर हल्ला करणें प्रशस्त वाटलें नाहीं. कारण हॅवेलॉकपेक्षां अधिक सज्ज लष्कर त्याच्या-जवळ होतें. याच सुमारास जनरल आउट्रॅमनें एका जासुदामार्फत रेसिडेन्सीवर चाल करून येण्याचा सरळ मार्ग त्यांना लिहून कळविला. यामुळें त्यांचा फार फायदा झाला. इकडे कर्नल होपग्रँट व सर कॉलिन् कँबेल यांचें ताज्या दमाचें सैन्य आल्याची बातमी कळतांच, बंडखोरांनीं जागजागीं तोफा रोखून त्यांचा रस्ता अडवून धरण्याचा बंदोबस्त केला.

१२ नव्हेंबरला मुख्य सेनापतींनीं लखनौकडे कूच केलें, व १३ नव्हेंबरला अलमबागचे मधील जलालाबादचा किल्ला सर केला. दुसरे दिवशीं सकाळीं या लोकांनीं दिलखुश बाग व मार्टिनियर कॉलेज आपल्या ताब्यांत घेतलें. यानंतर तें सैन्य शिकंदर बागेजवळ पोंचलें. येथें घरांच्या खिडक्यांतून चोरटा गोळीबार करून इंग्रजी फौजेला बंडखोरांनीं हैराण करून सोडलें. यामुळें जिवावर उदार होऊन सर्व शीख, पंजाबी, मुसलमान व गोरे हायलँडर्स, शिकंदर बागेची भिंत तोडून मोडून आंत घुसण्याचा यत्न करूं लागले. शेवटीं त्यांचा यत्न सफळ होऊन सर्व सैनिक मोठ्या शर्थीनें बागेंत घुसले.

१६ नव्हेंबरला इंग्रजांनीं रेसिडेन्सीवर चाल करण्यास सुरवात केली. हे लोक हळू हळू नबाब गाजीउद्दीन हैदर याच्या शहानजफ नांवाच्या कबरीजवळ येऊन पोंचले. त्याच्या पुढेंच कदमरसूल नांवाची एक लहानशी मशीद होती. शीख स्वारांनीं मशिदीवर कब्जा केला; पण शहानजफचा ताबा घेण्यास त्यांना फार कठीण पडलें. या मशिदीजवळच्या जंगलांत किंवा त्या उंच भिंतीमागें लपून, शिपायांनीं लहान लहान भोंकांमधून गोळीबार करून इंग्रजांची त्रेधा करून सोडली. रात्र होत

आली तरी शिपायांचा जोर कमी होण्याचें चिन्ह दिसलें नाहीं, म्हणून सेनापतींनीं तात्पुरतें परत फिरावयाचें ठरविलें. परंतु कर्नल होपग्रँट यांना ही बातमी कळतांच, त्यांनीं छपून छपूनच या जंगलांत घुसण्यास कोठून वाव आहे किंवा नाहीं याची चौकशी सुरू केली. एका ठिकाणीं त्यांना भिंतींत एक भगदाड आढळलें व तेथूनच सर्व सैनिक धडाक्यानें आंत घुसले. अशा रीतीनें इंग्रजांनीं शहानजफचा कबजा घेतला. यानंतर त्यांनीं एक दोन माऱ्याचीं ठिकाणें शिकस्तीनें आपल्या ताब्यांत घेतली.

इकडे रेसिडेन्सीमध्यें अडकून पडलेले लोक कांहीं स्वस्थ बसले नव्हते. तेही सेनापतीला भेटण्यासाठीं फार उत्सुक झाले होते, व बंडखोरांचें लक्ष दुसरीकडे वेधून सेनापतींना साहाय्य करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यांच्या या शिताफीच्या मदतीनें सेनापतीचा मार्ग सुलभ झाला. कारण बंडखोरांचा जोर वांटला गेला.

सेनापति सर कॉलिन् यांनीं शिकंदरबाग काबीज केल्याचें सर हॅवेलॉक यांना कळतांच, त्यांनीं 'फरीदबक्ष मंजील' महालाची तटबंदी फोडून शिपायांवर गोळे उडविण्यास सुरवात केली. इकडे त्यांच्या पायदळ सैन्यानें फरीदबक्ष व मोतीमहाल यांच्यामधील दोन घरें आपल्या ताब्यांत घेतलीं. यामुळें सेनापतींचा मार्ग आणखी सुलभ झाला. ही हकीकत ता. १६ नोव्हेंबर रोजीं घडली.

१७ नोव्हेंबरला पहांटेस सर कॉलिन् यांचे सैनिकांनीं 'खुर्शेद मंजिल' वर हल्ला करून तें ठिकाण कबजांत घेतलें. तेथून त्यांनीं मोतीमहालावर चढाई केली. याच्या रक्षणार्थ शिपाई खूप शर्तीनें लढले; परंतु सुर्योदयाचे सुमारास त्यांचा मोड होऊन तें ठिकाण पण इंग्रजांच्या ताब्यांत आलें.

इतक्याउपरही शिपायांनीं गांगरून न जातां केसरबागेंतून मोतीमहाल व खुर्शेद मंजिलवर गोळीबार सुरू केला. भयंकर गोळीबार होत असतांही सर जेम्स आउट्रॅम व जनरल हॅवेलॉक खुर्शेद मंजिलमध्यें जाऊन मुख्य सेनाध्यक्षांना भेटले. या लोकांना वाटेंत कांहीं दुखापत झाली नाहीं. परंतु कर्नल नेपियर व हॅवेलॉक यांच्या मुलांना लहानसहान जखमा झाल्या. याप्रमाणें पांच दिवसांनीं ४५ अधिकारी व ४९६ शिपायांचा बळी देऊन सेनाध्यक्ष आपले उद्दिष्ट स्थानीं पोंचले.

यानंतर मुलें, मुली व स्त्रियांना रेसिडेन्सींतून घेऊन जाण्याचा विचार ठरला. हॅवेलॉक, आउट्रॅम वगैरे अनुभविक माणसांना हा विचार फारसा रुचला नाहीं. परंतु सेनाध्यक्षांनीं त्यांनीं रेसिडेन्सी सोडण्याबद्दल हट्ट धरला. गळ्यांतील

बायकामुलांचें लोढणें दूर केलें म्हणजे शिपाई निर्धास्त राहतील, व वाटेल तितका वेळ बंडखोरांशीं झुंज घेऊन रेसीडेन्सी लढवितील, असें त्यांचें म्हणणें पडलें. तेथून ५ मैल दूर असलेल्या दिलखुश बागेंत प्रथम मुक्कामाला जाऊन राहण्याचें ठरलें. परंतु रस्त्यांत केसरबागेंतून होत असलेल्या गोळीबारामुळें बायकामुलें वाटेंत जखमी होण्याचा बराच संभव होता. म्हणून पुढील मैदानांत मातीची चाल-चलाऊ भिंत उठवून, तिचे आडून शिपायांवर गोळीबार करण्यांत आला, आणि शिपायांना याप्रमाणें एकीकडे गुंतवून १७ नोव्हेंबरला रेसीडेन्सींतील बायका-पोरांना दिलखुश बागेंत पोंचविण्यांत आलें. येथें नबाबाच्या मंडळींनीं गर्दीत टाकलेलें २५ लाख रुपये किंमतीचें जडजवाहीर व बरीच युद्धसामुग्री इंग्रजांच्या हातीं लागली. दुर्दैवानें सर हेनरी हॅवेलॉक यांना २० तारखेस अतिसाराचें दुखणें झालें व २४ तारखेला त्यांतच त्यांचा अंत झाला. इंग्रज लोक यामुळें फार शोकाकुल झाले. आलमबागेंत त्यांचें प्रेत पुरण्यांत आलें. याप्रमाणें एक अत्यंत शूर योद्धा कामास आला. लखनौला आलेली ही दुसरी कुमक होय !

लखनौ येथील बंडखोरांवर वचक बसविण्याकरितां आउट्रमला ४००० शिपायांनिशीं आलमबागेंत ठेवण्यांत आलें, आणि मोठ्या कौशल्यानें रेसीडेन्सींतील जखमी व आजारी लोक आणि इंग्रज बायकामुलें मिळून सरासरी दोन हजार निराश्रित जीव विश्रांतीसाठीं सुरक्षित स्थळीं पोहोंचविण्याकरितां क्यांबेलनें आपल्याबरोबर घेतले. क्यांबेलबरोबर इतर लढवय्ये सैनिक तीन हजार होते. क्यांबेलनें सेनापति विन्डहॅमला कानपूरच्या रक्षणासाठीं मागें ठेवलें होतें. परंतु तिकडील समाचार मुळींच न कळल्यामुळें, क्यांबेल गर्दीगर्दीनें कानपुरास गेला. विंडहॅमला तात्या टोपीनें अत्यंत मोठ्या पेचांत पकडलें होतें. क्यांबेलनें प्रथम लखनौहून सोडवून आणलेल्या जखमी लोकांची व बायकामुलांची प्रयागला रवानगी केली, व मग तो विंडहॅमच्या साहाय्यास गेला.

क्यांबेलनें ग्वालेरच्या बंडखोर फौजेचा पराभव करून तिला पळावयास लावलें, व तात्या टोपीच्या हातून कानपूर परत जिंकून घेतलें. म्यान्सफील्डला त्यानें सुभेदाराच्या तलावावरील रस्ता रोखून तात्याला पकडण्याचा हुकूम दिला. पण तात्या सर्वांच्या बारशाला जेवला असल्यामुळें तो त्या कैचींतून निसटला, व सर्वांना त्याची त्या व्यूहांतून सुटका होणें अशक्य दिसत असूनही, ती त्यानें शक्य करून दाखविली ! क्यांबेलनें रागारागानें बिठूरचें पेशव्यांचें उरलेंसुरलें वैभव, वाडा, देवळें, घाट, स्मारकमंदिरें-सर्व जमीनदोस्त केलीं. त्यानंतर लखनौचा जणूं

काय साफ विसर पडून मीरानकी सराईस तो गेला. तेथें त्याची व कॅप्टन हडसनची मुलाखत झाली. हडसनचें त्यानें सप्रेम स्वागत केलें, व त्याच्या पराक्रमाचें कौतुक केलें. त्यानंतर तो फतेगढला गेला व तेथें आणि भोंवतालच्या प्रदेशांत त्यानें स्थीरस्थावर केलें. त्याच्या मनांत तसेंच पुढें रोहिलखंडांत जावयाचें होतें. कां तें कोण जाणें ? कदाचित् तिकडे लुटीची अधिक अपेक्षा असेल. किंवा यशाचा वांटा तिकडे गेल्यास पूर्णपणें आपल्या पदरांत पडेल, असें त्यास वाटत असावें. पण लॉर्ड क्यानिंगनें त्यास ताबडतोब लखनौस जाऊन तें शहर जिंकून घेण्यास फर्माविलें. कारण तेथें आउट्रॅम, आलमबागेंतील आपल्या लहानशा सैन्यानें शत्रूंचे हल्ले मोठ्या शौर्यानें पिटाळून लावीत असला, तरी लाख पन्नास हजार जवानांच्या जोरावर जय्यत लष्करी तयारीनें शहर कबजांत ठेवणाऱ्या बंडखोरांवर स्वतां हल्ला चढविण्याचें त्याच्यांत सामर्थ्य नव्हतें. परंतु काय असेल तें असो, क्यांबेल आपली फौज घेऊन तिकडे जाण्याची टाळाटाळ करूं लागला. लॉर्ड क्यानिंगनें खडकावल्यामुळें त्याला अखेर लखनौस जाणें भाग पडलें. तरी पण त्यानें शक्य तेवढा विलंब लावलाच. १ फेब्रुवारी रोजीं त्यानें फतेगड सोडलें, परंतु लखनौस तो ३ मार्चपर्यंत पोहों-चला नाहीं. लष्करी तयारीची सबब त्याच्या विलंबाच्या आधाराला सज्ज होतीच. त्याच्याबरोबर २१००० फौज व चांगला तोफखाना होता. शिवाय क्यानिंगच्या आमंत्रणावरून नेपाळचा जंगबहादूरही आपले कडवे गुरखे शिपाई घेऊन त्याच्या साहाय्यास आला. याप्रमाणें लखनौच्या शेवटच्या लढाईचें श्रेय विभागलें गेलें. लारेन्स व हॅवेलॉक यांचीं नांवें तर लखनौच्या इंग्रजी शौर्याशीं निगडित होतींच, परंतु अखेरच्या लढाईंत देखील आउट्रॅम व जंगबहादूर हे क्यांबेलच्या यशोगौरवांत वांटेकरी झाले. आणि खरें सांगावयाचें तर या तिघांत आउट्रॅमचाच पराक्रम लखनौ सर करण्यांत अधिक कामास आला, व तो जर क्यांबेलच्या जागीं मुख्य सेनापति असता तर त्यानें एकही बंडखोर तेथून निसटूं दिला नसता. लखनौला क्यांबेलला लूट करावयास मिळाली नाहीं असें नाहीं, पण त्या लुटींत वांटे पडले. इंग्रजी व नेपाळी शिपायांनीं विजय मिळाल्या-नंतर शहरांत हैदोस घातला व श्रीमंतीनें नटलेल्या त्या शहरांत जें जें हातीं लागलें, तें तें प्रत्येकानें आपल्या खिशांत टाकलें.

हॅवेलॉकच्या मृत्यूमुळें सर्वांसच दुःख झालें, परंतु आउट्रॅमला तें विशेषच जाणवलें. कारण त्यानंतर लखनौची पुढील जबाबदारी त्याच्या एकट्यावरच

पडली. त्याच्या हाताखालील सैन्य ताज्या दमाचें होतें, व त्याच्याजवळ शस्त्रास्त्रांचा पुरवठाही भरपूर होता. शिवाय क्यांबेलनें बायकामुलें व जखमी आजारी माणसें आपल्याबरोबर नेल्यानें त्याची जबाबदारीही कमी झाली होती. त्याची छावणी आलमबागेंत असल्यामुळें बाहेरच्या जगाशीं त्याचें दळणवळण आतां चालू होतें. तो यापुढें वेढयांत नव्हता. २६ नव्हेंबर १८५७ पासून तों क्यांबेल परत लखनौ येथें ३ मार्च १८५८ रोजीं येईपर्यंत, आउट्रमनें बंडवाल्यांना नेटानें तोंड दिलें, व त्यांनीं केलेले अनेक निकराचे हल्ले परतवून लावले. बंडवाल्यांनीं आपली शिकस्त करून पाहिली, परंतु आउट्रमचें आसन ढळलें नाहीं. ३ मार्च रोजीं क्यांबेल लखनौस आला, तेव्हां त्याच्या हाताखालीं दुय्यम या नात्यानें आउट्रम काम करूं लागला. बंडवाल्यांनीं लखनौ शहराचा प्रत्येक भाग व प्रत्येक महत्वाची इमारत किल्याप्रमाणें लढविली. त्यामुळें ३ ते १७ मार्चपर्यंतही लखनौ शहरांतील ही धांवती लढाई चालली होती. एकामागून एक महत्वाच्या इमारती इंग्रजांनीं बंडवाल्यांपासून जिंकून घेतल्या, आणि लखनौ शहरांत पुन्हा इंग्रजी सत्ता पूर्ववत् स्थापन केली. सादतगंज येथें लपलेल्या मौलवीचा २१ मार्च रोजीं पराभव करून त्याला तेथून पळावयास लावलें. लखनौ निष्कंटक झाल्यामुळें सर्वत्र शांतता पसरली व कानपूर ते लखनौचा टापू इंग्रजी सत्तेखालीं पुन्हां नांदूं लागला. क्यांबेल व आउट्रम यांच्यामध्यें या शेवटच्या लढाईत थोडी थंडाई उत्पन्न झाली, व क्यांबेलनें आउट्रमला दिलेल्या एका निष्काळजीपणाच्या हुकुमामुळें, कांहीं बंडवाल्यांना तेथून कसें बसें निसटतां आलें, व थोडे दिवस पुढें भोंवतालीं इंग्रजी फौजेशीं टुरटुर करतां आली.

---

## प्रकरण २४ वें

# बंगाल, मद्रास, मुंबई व मध्यप्रांत.



हिंदुस्थानांतील बंगाल, मद्रास व मुंबई हे तीन प्रमुख इलाखे शांतच होते असें म्हटलें तरी चालेल. बंगाली लोकांना मुसलमान व त्यांच्या हातांखालील रजपूत सरदार आणि मराठे यांच्या स्वाऱ्यांचा पुष्कळसा कटु अनुभव आला होता. त्यांना शांतता हवी होती, आणि इंग्रजी अमलांत ती त्यांना मिळाली होती.

मेकॉले व राजा राममोहन राय यांच्या अविश्रांत श्रमानें बंगाली राष्ट्र इंग्रजी ज्ञान-भांडाराचें अवलोकन करूं लागलें होतें. ब्रम्हसमाजाची स्थापना होऊन सामाजिक सुधारणेचें पाऊल पुढें पडत होतें. अशा स्थितींत, भावी सुखाचीं व उन्नतीचीं स्वप्नें स्पष्ट दिसत असतां त्यांचा बंडाला विरोध असणें स्वाभाविक होतें. शिवाय कलकत्त्यास लार्ड क्यानिंग अति जागरूकपणें पहारा देत बसला होता. इंग्रजी वर्तमानपत्रें बेफामपणें लिहूं लागलीं, तेव्हां त्यानें प्रेस ॲक्ट सररास लागू केला व वर्तमानपत्रांतील लेखांचें नियंत्रण केलें. हत्यारांचा दुरुपयोग होतोसें दिसल्या-बरोबर त्यानें हत्यारांचा तात्पुरता कायदा जारी करून काळयागोऱ्यांवर त्याची निःपक्षपात दृष्टीनें बजावणी केली.

सिगौली, मुजफरपूर, छपरा, डाका, गया, चटगांव, पूर्णिया वगैरे ठिकाणीं थोडाबहुत दंगा झाला. चारदोन गोरे मारले गेले, दोनतीन ठिकाणचा खजीना लुटला गेला व एकदोन ठिकाणचे कैदी बंडवाल्यांनीं मोकळे केले. मात्र ही अस्वस्थता एक दोन दिवसच काय ती टिकली. परंतु क्यानिंगनें आपलें दळ इकडून तिकडे मोठ्या युक्तीनें हालवून बंडवाल्यांचा मोड केला व संशयी पलटणींना निःशस्त्र केलें. टेलरसाहेबांची हडेलहप्पी कारकीर्द लोकांना रुचत नाहीं हें पाहून पाटणाहून टेलरची बदली केली व स्यामुल्सला तेथें पाठविलें. आणि मुनशी अमीरअल्लीला त्याचा मदतनीस नेमलें. त्यामुळें बंडाचा फैलाव तिकडे फारसा न होतां, कलकत्त्याहून अलाहाबाद, कानपूर, लखनौची वाट मोकळी राहिली व इंग्रजी सेनांचा क्यानिंगला कलकत्त्याहून समाचार घेतां आला, आणि त्यांना वरचेवर सामग्री पुरवितां आली. कलकत्त्यास नबाब वाजीदअल्लीशहा पेनशन घेत स्वस्थ होते. परंतु औध येथील बंडाची हकीकत ऐकतांच त्यांच्या अनुयायांत चलबिचल उडाली, व कदाचित् कलकत्त्यास वावटळ उठेल व उठली तर ती शांत करणें फार कठीण जाईल, हें जाणून त्यांनीं एडमनस्टनला ताबडतोब पाठवून नबाबास कैद केलें व किल्ल्यांत आणून टेवलें. नबाबाला या अन्यायाचें व बेइज्जतीचें फार दुःख झालें. तो म्हणाला, 'माझ्या हातीं फौजफाटा असतांना देखील मी आपलें राज्य तुमच्या हवालीं केलें. पाहिजे तर सेनापती आउट्रमला विचारा. आतां मी पेनशनर व निराधार असतां तुमच्याविरुद्ध हत्यार कसें उचलूं शकेन ?' परंतु वादविवाद करण्याची ती वेळ नसल्यामुळें नबाबाच्या तक्रारीकडे कोणी लक्ष दिलें नाहीं, व एकपरी हें बरें झालें. कारण जर बंडाची ठिणगी कलकत्त्यास पडली असती तर मोठाच भडका उडला असता. कारण हिंदुस्थानची ती राजधानी असल्यामुळें, ती बंडवाल्यांच्या

हातीं जाती तर सर्वत्र बंडखोरांना उत्तेजन मिळालें असतें. दिल्ली जुन्या मोंगल बादशाहीची, तर कलकत्ता इंग्रजी कंपनीची राजधानी होती. त्यामुळें दिल्ली शहर बंडवाल्यांच्या हातीं पडलें, तरी कंपनीला ऐटीनें वर मान करून कलकत्त्याहून आपले हुकूम जारी करतां येत होते, आणि त्या आणीबाणीच्या प्रसंगीं सर्व हिंदुस्थानचीं सूत्रें शांतपणें हालवितां येत होतीं. अनेक सरकारी कचेऱ्या, खजीना, बारूदगोळा व तोफाबंदुकांचे कारखाने व साठवणीच्या इमारती, लष्करी व मुलकी अधिकाऱ्यांचे बंगले, पोस्ट व तारघरें, चर्च, शाळा व कॉलेजें, इंग्रजी व्यापाऱ्यांचीं दुकानें, कोठ्या व वखारी आणि राहण्याचीं घरें, किल्ला व गोदी, या सर्वांचें संरक्षण करणें फार कठीण झालें असतें. आणि यांचें रक्षण करण्यांत सर्व युरोपियन सैन्य गुंतलें असतें तर लखनौ व कानपूरवर कोणतें सैन्य चालून गेलें असतें? लॉर्ड क्यानिंगच्या चातुर्यामुळें हा अनर्थ टळला. त्यानें हिंदी लोकांवर अविश्वासही दाखविला नाही, व त्या धामधुमीच्या काळांत कोणाचा फाजील विश्वासही धरला नाहीं. जेथें जेथें देशी पलटणी बिथरल्याच्या बातम्या येत, तेथें भोंवतालचें इंग्रजी सैन्य तांतडीनें गोळा करून तो फितुर पलटणींना निःशस्त्र करी व शिपायांना आपापल्या घरीं जाण्याची खुशाल परवानगी देई. हे संशयास्पद बंडखोर परंतु निःशस्त्र शिपाई बहुधा लखनौची वाट धरीत, आणि त्यामुळें कलकत्त्यावरील ग्रहण सुटे. कलकत्ता शांत व सुरक्षित ठेवण्याचें महत्व लॉर्ड क्यानिंग पूर्णपणें जाणून होता. कारण कलकत्ता शांत राहाण्यांत कंपनीची व इंग्रजी सत्तेची इभ्रत होती. यामुळें निःशस्त्र शिपायांना केवळ संशयावरून अटकेंत टाकण्याचें किंवा इतर शिक्षा देण्याचें तो नाकारी. त्यामुळें त्याचे सहकारी व इतर इंग्रज त्याच्यावर नाराज होत व भित्रा म्हणून त्याची टवाळी करीत. परंतु त्याचें करणें यथायोग्य होतें हेंच पुढें सिद्ध झालें. निःशस्त्र शिपाई लखनौला जाऊन पोहोंचले, म्हणजे कलकत्ता ते लखनौपर्यंतची पायपीट करतां करतां त्यांच्या उत्साहावर विरजण पडत असे. त्यांच्यापैकीं फारच थोडे बंडांत सामील होत. बरेचसे थकले भागलेले शिपाई आपल्या मुलांमाणसांत जाऊन स्वस्थ विश्रांति घेत बसत. कारण बंडांत सामील व्हावयास घोडे, कपडे व शस्त्रास्त्रें प्रथम त्यांना पैदा करावीं लागत, आणि इतर खुनी व हत्यारी बंडवाले, ते निःशस्त्र झाल्याबद्दल त्यांची भ्याड म्हणून सुखासुखी टवाळी करीत व हलक्या दर्जाचें अपमानास्पद काम त्यांना सांगत. त्यामुळें बंडवाल्यांची संख्या कलकत्त्याच्या निःशस्त्र पलटणींनीं फारशी फुगली नाहीं. जे थोडेबहुत शिपाई बंडांत सामील झाले,

ते इतरांबरोबर सांपळ्यांत सांपडले. उलट पक्षीं, लॉर्ड क्यानिंगनें त्यांच्यापैकीं कांहीं जणांना तेथल्या तेथें आपल्या सहकाऱ्यांच्या भरीस पडून शिक्षा ठोठावल्या असत्या, तर बाकीच्यांनीं जिवावर उदार होऊन तेथेंच ताबडतोब बंडाचें निशाण उभारलें असतें आणि बंगाल प्रांतांत रक्ताच्या नद्या वाहवून लॉर्ड क्यानिंगचें पुढील कर्तव्य कठीण केलें असतें.

मद्रास इलाख्यांत सर्वत्र शांत असल्यामुळें बऱ्याच मद्रासी पलटणी बंड मोडण्याकरितां कलकत्त्यास येऊं शकल्या. त्या वेळीं लॉर्ड हॅरीस मद्रासचे गवर्नर होते. मद्रासी शिपायांना उत्तर हिंदुस्थानांतील बंडवाल्यांविषयीं काडीमात्र सहानुभूती वाटत नव्हती. त्यांना मोंगल बादशाहीची पर्वा नव्हती व पेशवाईची तर नव्हतीच नव्हती. लॉर्ड क्लाईवनें मद्रासी लोकांची आपल्या पलटणींत भरती करून त्यांना कवाईत शिकवून तरबेज केलें होतें. मागें अर्काटच्या वेढयाच्या प्रसंगीं, स्वतां फक्त भाताच्या पेजेवर आपला गुजारा करून इंग्रजांना भात देणारे हे राजनिष्ठ शिपाई इंग्रजांच्या उत्तम परिचयाचे होते. याच शिपायांच्या जोरावर १७५७ सालीं क्लाईवनें प्लासीची लढाई मारली, व बंगाल प्रांतांत इंग्रजी सत्ता स्थापन केली. हे मद्रासी शिपाई शीखांइतके शूर किंवा गुरख्यांइतके कंटक नसले तरी कष्टाळु, विश्वासु व राजनिष्ठ होते. शरीरानें बुटके, रंगानें काळे परंतु जी-हुकुमी अशा या शिपायांचा १८५७ सालींही इंग्रजांना फार उपयोग झाला. मद्रासहून फक्त काळ्या पलटणीच कलकत्त्यास दाखल झाल्या असें नाहीं, तर बरेंच गोरें सैन्यही तेथून कलकत्त्यास आलें. मद्रास इलाख्यांत इंग्रजांचें राज्य स्थापन होऊन बरींच वर्षें लोटलीं असल्यामुळें, तिकडे धामधूम उडण्याचा फारसा संभव नव्हता. त्यामुळें लॉर्ड हॅरीसनें बरेंच मोठें सैन्य उत्तरेस रवाना केलें. हें सैन्य अर्थातच समुद्राच्या वाटेनें प्रथम कलकत्त्यास आलें, व नंतर तेथून बंडाच्या टापूंत चालून गेलें.

पंजाबकडील खास सैन्याची लॉर्ड क्यानिंगनें दिल्लीवर पूर्वींच रवानगी केली असल्यामुळें, कर्नल नीलच्या आधिपत्याखालीं आलेल्या मद्राशी पलटणींची त्यानें काशी-प्रयागाकडे रवानगी केली. वाटेंतील बंडाळी मोडून पुढें कानपुरावर चालून जावयाची त्यास आज्ञा होती. नीलनें २३ मे रोजीं कलकत्ता सोडलें. तो ४ जून रोजीं काशीस व तेथून १३ जून रोजीं प्रयागास पोहोंचला. त्यानें वाटेनें बंडवाल्यांवर असा जरब बसविला कीं सर्वत्र सामसूम झालें. लष्करी कायदा किती

बेकायदेशीर व बेबंदशाही असतो हें त्यानें जगाला दाखवून दिलें. तो पुढें कानपुरास सेनापती व्हीलरच्या सुटकेकरितां जाणार होता, परंतु हॅवेलॉकला मुख्य सेनाधिपती करून क्यानिंगनें तिकडे पाठविलें. हॅवेलॉक अत्यंत शूर योद्धा होता व त्याच्या हातीं आणि पुढें सर जेम्स आउट्रॅम याच्या हातीं, औध प्रांतांतील सूत्रें लॉर्ड क्यानिंगनें सोंपविल्यामुळें बंडाचा इतक्या लवकर उपशम झाला. नील-सारखा हडेलहप्पी त्या कामास खरोखरच नालायक होता. इराणच्या मोहिमेवरून परतून १३ आगस्ट रोजीं सर कालिन क्यांपबेल कलकत्ता येथें येऊन पोंहोंचला व मुख्य सेनापतीच्या जागेचा भार त्यानें उचलला. औध व संयुक्त प्रांतांतील बंडाचा सर्व वणवा त्यानें व त्याच्या नेतृत्वाखालीं आउट्रॅम व हॅवेलॉक यांनीं विझविला. यांच्या शौर्याचें, पराक्रमाचें व धडाडीचें जेवढें वर्णन करावें तेवढें थोडेंच होईल.

मुंबई इलाख्यांत या वेळीं लॉर्ड एल्फिन्स्टन गवर्नर होता. त्याला मुंबई इलाख्याचीच नव्हे तर सर्व हिंदुस्थानची परिस्थिती चांगली ठाऊक होती. कारण पूर्वी तो मद्रास इलाख्याचा गवर्नर होता, व शीख लोकांशीं झालेल्या लढायांत त्यानें पंजाब व काश्मीरची सफर मारली होती. मीरत येथील बंडाची हकीगत कळतांच, मुंबई ते आग्रा हा महारस्ता इंग्रजांच्या काबूंत पूर्णपणें ठेवण्याची आवश्यकता त्याला भासूं लागली. त्यामुळें त्याला जमवितां आलें तितकें गोरें सैन्य त्यानें एकत्र करून त्यास महूवर चालून जाण्यास सांगितलें. कारण मुंबई-आग्रा रस्ता मध्य हिंदुस्थानांतील संस्थानी प्रदेशांतून जात होता, आणि तेथें उत्तरेकडून बंडाची लाट येण्याची धास्ती त्याला साहजिकच वाटत होती. परंतु त्याचा सेनापती वुडबर्न अतिशयच ढिला मनुष्य होता. एल्फिन्स्टनचा तगादा सारखा मागें असतांना देखील, त्यानें एका फितुरी देशी पलटणीचीं हत्यारें काढून घेण्याच्या व पकडलेल्या शिपायांचें कोर्टमार्शल करण्याच्या निमित्तानें औरंगाबाद येथें बरेच दिवस मुक्काम ठोकला. इकडे एल्फिन्स्टननें सिंध प्रांतांतून परभारें एक पलटण पंजाबकडे मदतीदाखल रवाना केली. बेळगांव व कोल्हापूर येथील देशी पलटणी क्षुब्ध होतांच, त्यानें त्यांचीं हत्यारें काढून घेऊन पुढाऱ्यांना धडाकून शिक्षा दिल्या. उत्तर हिंदुस्थानांतून बंडाची वार्ता घेऊन तो आग दक्षिणेंत लावण्यास आलेल्या जासुदांना पकडून त्यानें ताबडतोब तोफेच्या तोंडीं दिलें. कोल्हापूर येथील बंडाळींत सामील असल्याच्या आरोपावरून चिमासाहेब व रंगो बापूजीचा मुलगा व पुतण्या यांना पकडून फांशीं देण्यांत आलें. जमखिंडीचे बक्षीबंधू

हे फासावर चढले, परंतु त्यांनीं बंडाची जबाबदारी पूर्णपणें आपल्यावर घेतली. रंगोबापूजी मात्र इंग्रजांच्या हातीं लागला नाहीं. त्याला पकडून देणारास पांचशें रुपये इनाम देऊं, असें इंग्रजांनीं जाहीर केलें होतें. सातारकर छत्रपतींचा मुलगा, पंत सचीव, जमखिंडीकर वगैरे दक्षिणेंतील संस्थानिक बंडांत सामील असल्याचा इंग्रजांना जबर संशय आला होता, व इंग्रजांनीं त्या सर्वांना रंगणावर धरलें होतें. परंतु तो रास्त नव्हता. इनाम कमीशननें प्रत्येक लहानमोठ्या जमीनदाराला व संस्थानिकाला, तुमच्या ताब्यांतील गांवांच्या सनदा पेश करा नाहीं तर तुमचें इनाम आम्ही जप्त करतों, असा सारखा लकडा लावला होता. इनाम कमीशननें सनदांच्या अभावीं एकवीस हजार लोकांचीं इनामें व वतनें जप्त केलीं. कित्येक सपशेल नागवले गेले, कित्येक श्रीमंताचे गरीब झाले, व कित्येकांच्या जहागिरींची अंगठीच्या खड्याएवढी राहील या बेतानें, छाटाछाट करण्यांत आली. जुन्या काळीं प्रत्येक इनामी गांवाबद्दल सनदा देण्याची वहिवाट नव्हती. पुष्कळ वेळां तोंडी हुकमानेंच इनामें देण्यांत येत असत, तर पुष्कळ जहागिरी सरदारांनीं स्वतांच्या पराक्रमाच्या जोरावर मिळविल्या होत्या. ते सनदा कुठून पेश करणार ? त्यामुळें त्यांचीं इनामें जप्त करण्यांत आलीं. दक्षिणेंतील इनामदार या अन्यायानें त्रस्त झाले होते हें खरें. शिवाय साताराच्या छत्रपतींना इंग्रजांनीं दत्तक घेऊं दिला नाहीं, या उदाहरणामुळें औरस संततीच्या अभावीं आपलींही संस्थानें जप्त होतात कीं काय, अशी इतर संस्थानिकांना भीति पडली होती. त्यामुळें इंग्रजांविषयीं त्यांच्या मनांत अनादर उत्पन्न झाला होता. परंतु ते बंडांत सामील झाले होते असें म्हणणें, हें वस्तुस्थितीचा विपर्यास व अतिशयोक्ती करणारें आहे. जर दक्षिणेंत असा कट खरोखर झाला असता, तर त्याच्या ज्वाळांनीं इंग्रजांचे हात खात्रीनें होरपळले असते. कारण ती आग मोंगलाईंत पसरल्यावांचून राहतीना, व गुजराथ मध्यहिंदुस्थान आणि मध्यप्रांत यांतही भयंकर भडका उडाला असता. कारण त्या प्रांतांतील सर्व संस्थानिकांचे छत्रपतींशीं व दक्षिणेंतील संस्थानिकांशीं प्रेमाचे धागेदोरे फार दिवसांचे गुंतले होते. उत्तरेंतील बंडाची हकीकत ऐकून चार असंतुष्ट व धाडशी लोकांनीं थोडीशी टुरटुर केली व लूटमार करण्याचा प्रयत्न केला. इंग्रजांनीं त्यांना ताबडतोब पकडून सातारा येथें तोफेच्या तोंडीं दिलें, व सर्वांवर आपला दरारा बसविला. जुलै १८५७ च्या अखेर ही बंडाळी उद्भवली व आगस्टमध्यें शांतही झाली. सप्टेंबर ८ तारखेला सांपडलेल्या सर्व कैद्यांची चौकशी पूर्ण होऊन त्यांना फांशीही झाली. कांहींना काळ्या पाण्यावर पाठविण्यांत

आलें. जमखिंडीकर पटवर्धनांना केवळ संशयावरून रत्नागिरीच्या किल्ल्यांत कैद करून ठेवण्यांत आलें. खुद्द रंगो बापूजींचा या बंडाळीशीं कितपत संबंध होता याविषयीं जबरदस्त संशय आहे. कारण, इंग्रजांचें सामर्थ्य त्याच्या पूर्ण परिचयाचें झालें होतें. विलायतेंत त्यानें कित्येक वर्षें घालविलीं होतीं. दक्षिणेंत सर्वत्र शांतता असतां दहावीस लोकांनिशीं तो बंडाळी माजवील हें संभवनीय वाटत नाहीं. कदाचित् ही निराशेची आत्महत्या असेल. दक्षिणेंत अशी शांतता असल्यामुळें एल्फिन्स्टनला वर उत्तरेकडे फौज पाठवितां आली. त्यानें मारीशस व केपटाऊन येथील गव्हर्नरांकडे स्पेशल बोटींनीं जासूद रवाना करून, तेथून मिळतील तितक्या गोऱ्यांची व तोफखान्याची कुमक आणविली. इराणहून आलेलें सैन्य तांतडीनें कलकत्त्यास रवाना केलें, व महूस पळपुट्या कर्नल डुरँडच्या मदतीस तांतडीनें जाण्याबद्दल लष्करी अधिकाऱ्यांच्या मागें नेट लावला. इतक्यांत सुदैवानें मामळभटी वुडबर्न मेला, व सैन्याचें आधिपत्य स्टुअर्ट नांवाच्या तडफदार अधिकाऱ्याच्या हातीं आलें. त्यानें १२ जुलै रोजीं औरंगाबाद सोडलें, व झपाट्यानें चालून जाऊन तो कर्नल डुरँडला २२ जुलै रोजीं अशीरगड येथें जाऊन मिळाला. डुरँडनें नंतर धारचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला व बंडवाल्यांचा मोड केला, व महू येथें शांतता स्थापित केली. डुरँड नंतर मंदोसरवर चालून गेला व तेथील बंडवाल्यांचा गोरारिया येथील लढाईंत पुरता मोड करून त्यानें माळव्यांत सर्वत्र शांतता स्थापन केली. नीमच येथील बंडवालेही या लढाईंत पराभूत झाले. २५ आक्टोबर १८५७ रोजीं ही लढाई झाल्यानंतर डुरँड इंदूरवर चालून गेला व १ जुलै रोजीं बंडखोर बनून रेसिडेन्सीवर हल्ला करणाऱ्या होळकरांच्या फौजेला त्यानें निःशस्त्र केलें. याप्रमाणें माळव्यांत सर्वत्र शांतता स्थापन झाल्यामुळें सर ह्यू रोझचा रस्ता पुढें मोकळा झाला. औरंगाबाद येथील ज्या मुसलमानी पलटणींनीं दिल्लीवर चालून जाण्याची अधिकाऱ्यांची आज्ञा अमान्य केली, त्यांनींच या मोहिमेंत डुरँड व स्टुअर्टला उत्तम साहाय्य केलें, आणि महत्वाची कामगिरी पार पाडली. दिल्लीच्या मोंगल बादशहाविषयीं मुसलमान शिपायांच्या मनांत पिढीजाद आदर असल्यामुळें त्याच्याविरुद्ध लढण्याचें त्यांनीं नाकारलें, एवढ्यावरून त्यांना बंडखोर म्हणतां येणार नाहीं. कारण याच पलटणींनीं पुढें इंग्रजांच्या आज्ञेंत वागून मध्यहिंदुस्थानांतील बंडाचा मोड केला. दिल्लीवर जाण्याचा हुकूम सपशेल मोडणाऱ्या मुसलमान पलटणी धारवर खुशाल चालून गेल्या, हें त्या काळच्या राष्ट्रीयत्वाचें उदाहरण लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

१८५७ सालांत दक्षिणेंत हैदराबाद येथेंही सर्वत्र शांत होतें. १८ मे रोजीं निझाम नसीरउद्दौला वारला व त्याचा मुलगा अफझुल-उद्-दौला नवा निजाम झाला. सर सालरजंग त्या वेळीं निजामचा मुख्य दिवाण होता. मीरत व दिल्ली येथील बंडाच्या बातम्या हैदराबादेस आल्यावर, ता० १२ जून रोजीं सर्व शहरभर, कांहीं मौलवींनी धर्माच्या नांवानें मुसलमानांची उठावणी करणाऱ्या जाहिराती लावल्या. परंतु सालरजंगाचा बंदोबस्त चांगला कडेकोट असल्यामुळें गडबड उडाली नाहीं. १७ जुलै रोजीं मात्र कांहीं रोहिल्यांनीं रेसिडेन्सीवर हल्ला केला. परंतु त्या वेळचा हैदराबादचा रेसिडंट मेजर डेविडसन अशा प्राप्त प्रसंगाला तयारच होता. त्यानें पूर्वीच रेसिडेन्सीचा बंदोबस्त केला होता. त्यानें बंडवाल्यांवर सपाटून मारा केला व त्यांना पिटाळून लावलें. इतक्यांत निजामाचें सैन्यही बंडखोरांवर चालून आलें. याप्रमाणें कचाटींत सांपडल्यामुळें त्यांना चांगलीच अद्दल घडली, व पुढें हैदराबाद येथें कोणी बंडाचें नांवही काढलें नाहीं. हैदराबाद येथें शांतता असल्यामुळें तेथून बरीच फौज उत्तर हिंदुस्थानांत जाऊं शकली.

१८५७ साल दक्षिणेंत शांततेचें गेलें खरें, परंतु १८५८ सालीं दोन लहान लहान बंडें तेथें उद्भवलीं. निजामचा मांडलिक असलेला शोरापूरचा हिंदु राजा बंडवाल्यांना जाऊन मिळाला, व त्यांच्या तर्फे त्यानें बंडाचें निशाण उभारलें. मुंबई इलाख्यांतून मालकम व मद्रासच्या बाजूनें ह्यूजेस राजावर चालून आले. राजाची फौज शौर्यानें लढली खरी, परंतु तिचा लवकरच मोड झाला. राजा हैदराबादेकडे पळून गेला; तेथें त्याला पकडून लोकांनीं सालरजंगाच्या हवालीं केलें. सालरजंगानें राजाची रेसिडंटाकडे रवानगी करून दिली. राजाला इंग्रजांनीं कैदेंत टाकलें, परंतु झालेल्या पराभवामुळें व लज्जेनें त्यानें तुरुंगांतच आत्महत्त्या केली.

दक्षिणेंतील दुसरें बंड २७ मे १८५८ रोजीं नरगुंदचे संस्थानिक भावे यांनीं पुकारलें. राजाला मुलगा नसल्यामुळें त्यानें दत्तक घेण्याची परवानगी मागितली; परंतु इंग्रजांनीं ती नाकारल्यामुळें त्याला अतोनात संताप आला होता. आपलें संस्थान आपल्यामागें एवींतेवीं खालसा होणारच, तर मग इंग्रजांशीं लढून कां न मरावें, या विचारानें त्यानें इंग्रजांकडे मूठभर दारू पाठवून युद्ध पुकारलें. रामदुर्गचे संस्थानिक त्याचे भाऊबंदच होते. परंतु त्यांनीं भीतीनें नरगुंदकरांना साहाय्य केलें नाहीं. राजाजवळ फक्त तीन गंजलेल्या तोफा होत्या व त्याचें राज्य टीचभर होतें. परंतु अंगी भरपूर शौर्य असल्यामुळें त्यानें हें साहस केलें. नरगुंदकरानें

घातलेल्या छाप्यांत म्यान्सन मारला गेला. मालकम आपली प्रचंड फौज घेऊन नरगुंदवर चालून आला व २ जून रोजीं त्यानें नरगुंदचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. राजाची आई व पत्नी यांनीं आपल्या अब्रूच्या रक्षणार्थ मलप्रभा नदींत जाऊन जीव दिला. ३ जून रोजीं राजाला इंग्रजांनीं पकडलें व बेळगांव येथें ११ जून रोजीं त्याच्यावर खटला भरून, १२ जून रोजीं चवाठ्यावर त्यास फांशी दिलें. याप्रमाणें दक्षिणेंतील हें दुसरेंही औट दिवसांचें बंड समाप्त झालें.

मध्यप्रांतांत नागपूर येथें त्या वेळीं जार्ज प्लावडन हा मुख्य कमीशनर होता. १८५३ सालीं भोंसल्यांचें राज्य खालसा झाल्यामुळें हा प्रांत नुक्ताच इंग्रजांच्या अमलाखालीं आला होता. उत्तरेकडील बातमी ऐकून तेथील देशी शिपायांत खळबळ उडाली. परंतु सुदैवानें नगपूरजवळील कामठी येथील लष्करी छावणींत मद्राशी पलटणींचा भरणा विशेष होता, आणि या एकजात राजनिष्ठ राहिल्या. प्लावडननें बंडखोर शिपायांना तावडतोब निःशस्त्र केलें, व सीताबर्डीच्या किल्ल्या-वर नागपूरकडे तोंड करून तोफा रोखून ठेवल्या. रेसिडेन्सीचाही त्यानें बराकी-सारखा उपयोग केला, व बंड झाल्यास त्याचा मोड करण्याची जय्यत तयारी केली. नागपूर येथें नबाब अलीखान या उंच्यापुऱ्या इसमाकडे बंडाचें नेतृत्व होतें, व कटवाले त्याच्या घरीं जमत असत. परंतु गोऱ्या अधिकाऱ्यानें दरडावून विचारतांच बिचाऱ्याला कांपरें भरलें, व तो निमूट इंग्रजांच्या स्वाधीन झाला. इतर कटवाले पळून गेले. अलीखानाला पुढें फांशी देण्यांत आलें. चांदा, भंडारा, व बिलासपूर येथेंही थोडी थोडी देशी फौज होती. परंतु कामठी येथील मद्राशी शिपायांच्या साहाय्यानें चांदा व नागपूर येथें उत्पन्न झालेल्या गडबडीचा त्यानें लागलाच बंदोबस्त केला, व बंडखोरांना शिक्षा देऊन प्रांतात शांतता राखिली.

मध्यप्रांतांतील उत्तर भागांत म्हणजे जबलपूर, सागर व नरसिंगपूर या बाजूस बंडाचा बराच जोर झाला. हा प्रांत बुंदेलखंडाला अगदीं लागून असल्यामुळें बाणपूरच्या राजानें या प्रांतावर स्वारी केली. परंतु नरसिंगपूर येथील टर्नान व सागर येथील सेज या दोन अधिकाऱ्यांनीं आपल्या ठाण्यांचा बचाव तर केलाच. परंतु मध्यें मध्यें बंडखोरांवर सैन्य पाठवून आसमंतातच्या भागांत इंग्रजी फौजेचा वचक ठेवला. या वेळीं दिलेरी येथील गोंड राजाचें टर्नानला फारच साहाय्य झालें. अफगाण युद्धांत या राजानें केलेल्या मदतीबद्दल एक सुवर्ण पदक त्यास देण्यांत आलें होतें. परंतु पुढें थामसन साहेबाच्या हुकुमानें, त्याला अतोनात कर्ज झालें या सबबीवर त्याची बरीच इस्टेट जप्त करण्यांत आली, व त्याची राजा ही पदवी

रद्द करण्यांत आली. राजानें एक वर्षांतच आपलें देणें फेडलें, तेव्हां ही सबब फोलच होती. या धडधडीत अन्यायाबद्दल टर्नाननें आपल्या वरिष्ठाकडे तक्रार केली. परंतु राजाची दाद लागली नाहीं. तरी देखील टर्नानचे उपकार स्मरून त्यानें बंडांत इंग्रजांना फार मदत केली. जबलपूर येथील ५२ वी देशी पलटण फितुर झाली होती, परंतु कामठीहून मद्राशी पलटणी येऊन पोहोंचल्यामुळें बंडखोर शिपाई पाटण येथें पळून गेले. तेथील जुना गोंड राजा शंकरशहा व त्याचा मुलगा यांचें बंडांत अंग असल्यामुळें, इंग्रजांनीं त्यांना शहरांत फवाऱ्याजवळ फाशीं दिलें. कटंगी जवळ हीरण नदीच्या कांठीं, जबलपुराहून पळालेल्या बंडखोर शिपायांचा मद्राशी पलटणीनें मोड केला. शिवाय राजनिष्ठ रेवा संस्थानाची फौज मधूनमधून आसबोर्नच्या हुकमानें इंग्रजांच्या मदतीस आल्यानें, सागर-जबलपूर-नरसींगपूर हा टापू बंडवाल्यांच्या हातीं कायमचा लागला नाहीं. भोंवतालीं खेड्यापाड्यांतून धामधूम व लूटमार मात्र होत होती. नर्मदा कांठचा हा प्रदेश पूर्वीपासूनच लूटमार करणाऱ्या पेंढाऱ्यांचें निवासस्थान होतें. त्यांनीं या संधींत आपले हात पुन्हा एकदां धुवून घेतले. परंतु दिलेरीचा गोंड राजा व त्याचे भाईबंद यांनीं इंग्रजांना चांगली मदत केल्यामुळें व टर्नान आणि सेज यांच्या विलक्षण कर्तबगारीमुळें बंडवाल्यांचें या टापूंत फारसें चाललें नाहीं. त्याचप्रमाणें सागर येथील ३१ वी देशी पलटण ( ४० शिपाई सोडून ) शेवटपर्यंत राजनिष्ठ राहिल्यामुळें सेज साहेबाला ललितपूरपर्यंत बंडवाल्यांवर मधूनमधून नजर ठेवतां आली. १३ जून १८५७ पासून तों जानेवारी १८५८ मध्यें सर ह्यू रोझ आपली प्रचंड सेना घेऊन बंडवाल्यांचा चक्काचूर करीतोंपर्यंत, सेज, टर्नान व एरस्कीम या तीन अधिकाऱ्यांनीं फारच थोड्या शिपायानिशीं नर्मदाकांठचा हा टापू रोखून धरला व बंडवाल्यांशीं ते सात आठ महिने सारखी बचावाची लढाई खेळत राहिले. त्यामुळें बंडाच्या ऐन धामधुमींत बंडाच्या ज्वाळा नर्मदेवरच थोपल्या जाऊन त्या दक्षिणेकडे येऊं शकल्या नाहींत.

सर ह्यू रोझनें १८ डिसेंबर रोजीं इंदूर येथील फौजेचें आधिपत्य स्वीकारलें, व महू येथून काल्पीस चालून जाण्याचें ठरविलें. मद्रासची फौज जनरल व्हिटलाक याच्या दिमतींत असून, जबलपूर–प्रयाग–मिर्झापूर हा रस्ता प्रथम अगदीं मोकळा करून, नंतर बुंदेलखंड ओलांडून बांदा येथें जाण्याची कामगिरी या फौजेवर सोंपविण्यांत आली होती. व्हिटलाकमध्यें रोझची तडफ व धडाडी नव्हती, आणि शौर्य व लष्करी विद्या या दोन्ही गोष्टींत तो रोझचा शागीर्द शोभला असता.

त्यामुळें रोझला आपला मुक्काम मध्यें मध्यें लांबवून व्हिटलाकची वाट पहावी लागे. दोघांचे मार्ग निराळे असले तरी ते एकमेकांना पूरक असे होते. ६ जानेवारी १८५८ रोजीं रोझ आपली फौज घेऊन महूहून सिहोरच्या मार्गानें निघाला. २८ जानेवारी रोजीं रहातगडचा अभेद्य किल्ला सर करून, ३० तारखेस बाणपूरच्या राजाच्या आधिपत्याखालीं आडव्या आलेल्या प्रचंड बंडखोर सेनेचा त्यानें पुरता मोड केला. ३ फेब्रुवारी रोजीं तो सागर येथें पोहोंचला व बंडखोरांच्या मुलखांत आठ महिने टिकाव धरून राहणाऱ्या सेजला त्यानें कुमक पोहोंचविली व भोंवतालच्या प्रांतांतून बंडखोर हुसकून लावले. तेथून मालथन घाटांत बंडखोरांशीं फारच मोठी लढाई देऊन त्यानें मदनपूर गांठलें. इकडे त्याच्या हाताखालील एका तुकडीनें स्टुअर्ट व कीटींगच्या आधिपत्याखालीं, मंदोसर-आग्रा रस्त्यावरील तुटलेली तारायंत्री तार जोडली व गुणा आणि चंदेरीचे किल्ले सर केले. याप्रमाणें मधला सर्व टापू निःशस्त्र करीत ता. १९ रोजीं तो झांशीपासून १४ मैलांवर चंचलपूर येथें येऊन पोहोंचला, व पुढें त्यानें झांशीस वेढा दिला.

इकडे व्हिटलाकला कामठीहून निघून जबलपूर येथें पोहोंचावयास ६ फेब्रुवारी उजाडली. नंतर जबलपूरला बराच तळ देऊन २६ फेब्रुवारी रोजीं त्यानें दमो गांठलें. बरें, या मुक्कामांत आसपासच्या खेड्यांत लहान लहान फौजेच्या तुकड्या पाठवून बंडवाल्यांची पांगापांग करण्याचा जबलपूरच्या कमिश्नर अर्स्कीननें आग्रह केला, तोदेखील व्हिटलाकनें मानला नाहीं. नंतर ५ मार्चला हळूच तो सागर येथें गेला. परंतु रोझनें तिकडील बंडवाल्यांचा पूर्वीच फडशा उडविला होता. बुंदेलखंडांतील राजनिष्ठ राजांना मदत करून व हट्टा, नागोर, पन्ना या मार्गानें चाल करून, रस्ता साफ करीत करीत सर ह्यू रोझला ताबडतोब मिळण्याचा त्याला हुकूम होता. परंतु व्हिटलाक परत दमोला आला व २२ मार्चपर्यंत खुशाल तेथेंच झोंपा ताणत राहिला. इकडे झांशीचा किल्ला लवकर सर होईना, तेव्हां त्याला रोझनें आपल्या मदतीस बोलाविलें; परंतु ६ एप्रीलपर्यंत हा मांडला सोडूं शकला नाहीं. १९ एप्रिल रोजीं बांदा येथील नबाबाचा यानें पराभव केला व तेथील लूट जमा करीत मजेंत तेथेंच ह्यानें मुक्काम ठोकला. झांशी येथें नाहीं तर नाहीं, परंतु काल्पीच्या लढाईंत देखील रोझच्या मदतीस हा शूर (?) वीर गेला नाहीं. '२९ मे रोजीं मी काल्पीच्या रोखानें निघतों,' असें त्यानें रोझला लिहून कळविलें. परंतु त्यापूर्वीच रोझनें २३ मे रोजीं तात्या टोपीचा पराभव

करून, काल्पी २४ मे रोजीं आपल्या ताब्यांत घेतली होती. मग हा काल्पीकडे कसा जाणार? व गेला तरी जाऊन काय दिवे लावणार? २ जून रोजीं हा बांदा येथून निघाला व ६ जून रोजीं किरवी उर्फ चित्रकूट येथें येऊन पोहोंचला. तेथील अधिपती माधवराव पेशवे हे त्यावेळीं फक्त ९ वर्षांचे होते, व त्यांच्या संस्थानचा कारभार इंग्रजांच्या मार्फत चालत होता. कारभारी रामचंद्रराव पेंडशे यांची नेमणूक इंग्रजांनींच केली होती, व तें संस्थान शेवटपर्यंत इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिलें. हिंदुस्थान सरकारनें नंतर तेथील प्रकरणाची चौकशी करावयास मेनसाहेबास स्पेशल कमीशनर नेमलें होतें. त्यानें आपल्या रिपोर्टांत स्वच्छ लिहिलें कीं, "पेशवे माधवरावांचा तर बंडांत कांहीं संबंध नव्हताच, परंतु रामचंद्रराव पेंडशेदेखील आपल्याशीं शेवटपर्यंत राजनिष्ठेनें व प्रामाणिकपणाने वागले. त्यांनींच बंडाच्या धामधुमींत किर्वी येथील म्याजिस्ट्रेट काकरेल यांचा जीव वांचविला. तेव्हां त्यांना या कामगिरीबद्दल कांहीं तरी इनाम पुढें मागें देणें जरूर आहे. कारण आपण फक्त आपलें कर्तव्य केलें असें ते म्हणतात व बक्षीस घेण्याचें आज तरी नाकारतात. तेव्हां पुढें त्यांना कधीं जरूरी पडल्यास, ही त्यांची एकनिष्ठ सेवा कंपनीनें लक्षांत घ्यावी."

बांद्याचे नबाब धर्मानें मुसलामान असले तरी ते बाजीराव पेशव्यांचे वंशज (मस्तानीपुत्र समशेरबहादर याचा वंश) होते. त्यामुळें पेशवे कुळांतील त्या वेळचे प्रमुख नानासाहेब, यांनीं इंग्रजांविरुद्ध शस्त्र उपसतांच, नबाबही घराण्याच्या अभिमानानें बंडांत सामील झाले. बांदा येथें बंडखोरांचें फारच मोठें ठाणें असल्यामुळें, किर्वीचें महूशीं सातआठ महिने साहजिकच दळणवळण तुटलें होतें. कारण पत्र व तार जाणें व पाठविणें त्या धामधुमींत शक्य नव्हतें. परंतु १९ एप्रील रोजीं बंडवाल्यांचा मोड झाल्यावर, माधवराव पेशव्यांनीं इंदुरास रेसिडंटला पत्र पाठवून आपली राजनिष्ठा व्यक्त केली व चित्रकूटच्या हद्दींत शांतता प्रस्थापित करण्याकरितां इंग्रजी सैन्यास आमंत्रण दिलें. व्हिटलाक किरवी-कडे येण्यास निघाला, तेव्हां माधवराव पेशवे दहा मैल स्वागताकरितां त्याला सामोरे गेले. परंतु त्या हलकट व नादान माणसानें त्या नऊ वर्षांच्या पोरास बंडखोर ठरवून कैदेंत टाकलें, व चित्रकूटची लूट करविली. चित्रकूट येथें अगणित द्रव्य व जवाहीर आहे, अशी खबर व्हिटलाकला लागली होती. त्यामुळें केवळ द्रव्यलोभानें त्यानें हें अन्यायी व नीच कृत्य केलें. चित्रकूटचें चिमुकलें राज्य खालसा करण्यांत आलें, व तेथील सर्व खाजगी मालमत्ता जप्त करून ती

व्हिटलाकनें आपल्या सैनिकांत वांटून दिली आणि आपला खिसा गरम करून घेतला. ह्या धडधडीत अन्यायामुळेंच रामचंद्रराव पेंडशानें इंग्रजांकडून बक्षीस स्वीकारण्याचें बहुधा नाकारलें असावें. कारण मालकाचा अन्याय नसतां त्यांचें राज्य जप्त झाल्यावर, कारभारी निर्लज्ज असला तरच बक्षीस घेईल, सचोटीचा कदापि घेणार नाहीं. सारांश, सर ह्यू रोजनें लढाया मारल्या व पराक्रम गाजविला, व व्हिटलाकनें आयत्या बिळावर नागोबा बनून बांदा व चित्रकूट येथील द्रव्य लाटलें. रोझनें झांशीची राणी व तात्या टोपी या नामांकित वीरांचा लागोपाठ चार पांच लढायांत पराभव केला नसता, तर व्हिटलाकला बांदा व चित्रकूट येथें बंडखोरांच्या जबड्यांत जातांच कसें आलें असतें? या जगांत कधीं कधीं हलकट व नालायक लोकांना नशीब हात देतें, याचें हें उदाहरण आहे. एक गोळीदेखील न झाडतां ‘बंडखोरांची राजधानी व्हिटलाकनें सर केली, व तेथील तोफा, बंदुकांचे कारखाने ( हे सत्यसृष्टींत अस्तित्वांत नसून, आपल्या लुटीचें समर्थन करण्याकरितां व्हिटलाकच्या कल्पित सृष्टींतून निर्माण झाले होते. ) जमीनदोस्त केले व इंग्रजांवरील एक मोठें संकट टाळलें,’ असा व्हिटलाकनें आपल्या पराक्रमाचा चापून खोटा रिपोर्ट पाठविला, व मिळालेल्या लुटीवर आपल्या एकट्याचा हक्क शाबीत केला.

बंडाच्या धामधुमींत नरगुंद, बांदा व चित्रकुट अशी तीन चिमुकलीं संस्थानें इंग्रजांच्या राज्यांत सामील झालीं. माधवराव पेशव्यांना पुढें नक्त नेमणूक करून देऊन इंग्रजांनीं बरेली येथें पेन्शनर म्हणून ठेवलें. चित्रकूट येथें बंड झालेंच नाहीं, व यदाकदाचित् झालें असें धरलें तरी, माधवरावांचें वय त्या-वेळीं केवळ नऊ वर्षांचें असल्यामुळें त्यांच्याकडे त्याचा मुळींच दोष लागूं शकत नाहीं; कारण ते अज्ञान होते व इंग्रज त्यांचे पालक होते, आणि इंग्रजांच्या तर्फे इंग्रजांच्या माणसामार्फतच संस्थानांतील कारभार चालला होता, ही गोष्ट लक्षांत ठेवून, हा इंग्रजी न्याय कोणीही पारखून घ्यावा !

---

*

# प्रकरण २५ वें.

# 'झांशीची संग्राम-देवता!'



बुंदेलखंडांतील या प्रसिद्ध व सुंदर राजधानींत एक महाराष्ट्र ब्राह्मण स्त्री आपल्या वैधव्याचे दिवस व्रतवैकल्यें करण्यांत व देवदर्शन आणि दानधर्मांत घालवीत होती. ती एका काळीं राजाची राणी होती. परंतु इंग्रजांच्या पोटांत तिचें राज्य गडप झालें. तिनें व तिच्या पतीनें हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें एक मुलगा दत्तक घेतला होता. परंतु इंग्रज कंपनीला तें दत्तविधान पटलें नाहीं. तिचें राज्य गेलें व महिना पांच हजार रुपयांची लहानशी पेन्शन तिच्या नशिबीं आली. हिंदु स्त्रियांचें वैभव पतीबरोबरच नष्ट होऊन त्या मृतप्राय होतात. नंतर त्या विरक्त संन्यासिनीप्रमाणें आपलें आयुष्य घालवितात. राणी लक्ष्मीबाई या नियमाला अपवाद नव्हत्या. दत्तक घेतलेल्या मुलाची, कुळाच्या व घराण्याच्या नांवलौकिकाप्रमाणें मुंज करण्यासाठीं, इंग्रजांच्या तिजोरींत शिल्लक असलेले तिचे पैसे तिला मिळेनात. इतकेंच नव्हे तर तिच्या नेमणुकीवर देखील कंपनीनें धाड आणली. तुमच्या नवऱ्याचें संस्थानी कर्ज फेडण्याची जबाबदारी तुम्हावर आहे, सबब तें कर्ज फिटेतोंपर्यंत तुमची पेन्शन बंद करण्यांत आली, असें राणीस कळविण्यांत आलें. राणीनें पुष्कळ लिहून पाहिलें कीं, 'माझ्या पतीचें सर्व राज्य तुम्ही खालसा केलें व सर्व खजिना जप्त केला. तेव्हां कर्ज फेडण्याची जबाबदारी आतां माझ्यावर नसून तुमच्यावरच आहे. पतीच्या इस्टेटीचा वारसा माझ्याकडे व माझ्या दुर्दैवी मुलाकडे येत नाहीं, तर कर्जाचा तेवढाच वारसा आमच्याकडे कसा येईल?' राणीसाहेबांचें उत्तर अगदीं सरळ होतें, आणि इंदूरचे रेसिडेंट सर हॅमिल्टन यांनीं राणीच्या म्हणण्याला पुष्टी दिली. परंतु राणीसाहेबांची पेन्शन पतीच्या कर्जाचें निमित्त करून बंद करण्यांत आली ती आली! संस्थानचे अनेक पिढीजाद आश्रित व त्यांचीं मुलेंमाणसें, यांच्या पालनपोषणाचा भार राणीसाहेबांवर पडला होता. शिवाय जुने कुळाचार व दानधर्म यांचा खर्च त्यांच्यामागें होताच. ज्या अनेक संस्थानी पिढीजाद नोकरांची, राज्य खालसा झाल्यामुळें नोकरी गेली होती, त्यांना मदत करणेंही राणीसाहेबांना भाग पडत असे. अशा स्थितींत त्यांची किती दैना होत असेल, व त्यांच्यामागें खर्चाची प्रत्यहीं किती काळजी व विवंचना लागली असेल, याची कोणाही खानदानी इसमास कल्पना करतां येईल. ही राजयोगिनी तपस्विनी अशा कष्टप्रद स्थितींतही धर्माचरण करून आपलें

आयुष्य सत्कारणीं लावण्याचा प्रयत्न करीत होती. परंतु झांशी येथें नित्य होणारी गोहत्या मात्र तिला पाहवेना. हिंदुमात्राचा प्राण गो-पूजनांत घुटमळत असतो. गाय ही माय, अशी भावना प्रत्येक हिंदूची असते. शिवाजीमहाराजांपासून गोब्राम्हणप्रतिपालन हेंच क्षत्रियांना आद्य कर्तव्य वाटत आलें आहे. तेव्हां राणीनें झांशी येथील गोहत्या थांबवावी, असा इंग्रज सरकारला विनंतीअर्ज केला. झांशी येथील अनेक लहानथोर नागरिकांनीं राणीसाहेबांच्या अर्जाला पाठिंबा दिला. परंतु तो अर्ज फेटाळण्यांत आला. आपल्या राजधानींत होणाऱ्या गोहत्त्येचें पाप आपणांस व आपल्या मृत पतीस लागतें अशी राणीची भावना झाली. अखेर झांशी शहर सोडून काशीस धर्माचरणाकरितां जाऊन राहण्याची परवानगी राणीनें मागितली! हें पत्र लिहितांना राणीस किती दुःख झालें असेल!! जेव्हां श्रीमंत गंगाधररावांच्या मृत्यूनंतर झांशी संस्थान खालसा करण्यांत आलें, तेव्हां झांशीवरील प्रेमानें उचंबळून 'मैं अपनी झांशी नहीं दूंगी' असें अभिमानपूर्वक इंग्रजांना बजावणारी राणी झांशी सोडून काशीस जाण्याची इच्छा करूं लागली, तेव्हां तिच्या मनाला अत्यंत यातना झाल्या असल्या पाहिजेत, हें उघड आहे. परंतु काशीवास विधात्यानें तिच्या नशीबीं लिहिला नव्हता! झांशी येथील प्रसिद्ध महालक्ष्मी देवीचे देवळाकरितां दोन गांव खर्चाकरितां म्हणून पूर्वी तोडून देण्यांत आले होते, तेदेखील जप्त करण्यांत आले. त्या सदाचरणी व पवित्र, दुर्दैवानें वैभवाच्या शिखरावरून खालीं दुःखाच्या दरींत लोटलेल्या, मानिनी संन्यासिनीच्या मनाला या धर्मच्छलामुळें किती दुःख झालें असेल.

१८५७ सालीं झांशींत १२ नंबरच्या पलटणींतील एक तुकडी, १४ नंबरचें घोडदळ व थोड्याशा तोफा आणि थोडेसे त्यावरचे गोलंदाज होते. मीरत व दिल्ली येथील हकीगती ऐकल्यानंतर देखील, झांशी येथें बंड होईल असें तेथील प्रमुख अधिकारी मेजर स्कीन यांस वाटलें नाहीं. कारण १८ मे रोजीं त्यांनीं आग्रा येथें लेफ्टनंट गव्हर्नरला लिहिलें कीं, 'येथील फौज कप्तान डनलापच्या पूर्ण कह्यांत आहे व येथील शिपायांना उलट दिल्ली व मीरत येथील शिपायांचा बंड केल्याबद्दल राग आला आहे.' परंतु या भरवंशाच्या म्हशीला पुढें लवकरच टोणगा झाला. जून महिन्यांत ठिकठिकाणच्या बंडाच्या बातम्या तेथें येऊन पोहोंचल्या. इंग्रजांना आतां भय वाटूं लागलें. बहुतेक इंग्रज आपल्या बायकामुलांसह व जवळचा पैसाअडका घेऊन किल्ल्यांत रहावयास गेले. फक्त फौजी अधिकारी तेवढे छावणींत राहिले. सात जून रोजीं झांशी येथील फौजेनेंही बंड पुकारलें. दोन

दिवसांपूर्वीं कांहीं इंग्रज अधिकाऱ्यांच्या बंगल्यांना आगी लागल्या होत्या. तेव्हां इंग्रज सावध झाले होते. परंतु सावध राहूनही कांहीं उपयोग नव्हता. राणीनें इंग्रजांना किल्ल्यांत अन्नपाणी पुरविण्याचा तीन दिवसपर्यंत यशस्वी प्रयत्न केला. परंतु बंडखोर शिपायांपुढें तिचें कांहीं चालेना. राणीनें इंग्रजांना साहाय्य देऊं केलें, परंतु तें इंग्रजांनीच झिटकारलें. राणीचें साहाय्य घेणें त्यांना कमीपणाचें वाटलें. त्यांना वाटत होतें कीं, आपण किल्ला उत्तम प्रकारें लढवूं शकूं. परंतु अखेर त्यांच्याच शिपायांनीं व पोलिसांनीं त्यांची कत्तल केली. फौजी रिसालदारानें आज्ञा केली व ती जेल दरोग्यानें अमलांत आणली. ७५ इंग्रज पुरुष, १९ स्त्रिया व २३ मुलें या कत्तलींत मारलीं गेलीं. राणीचें या कत्तलींत अंग नव्हतें अशी केनें कबूली दिली आहे. झांशीच्या कत्तलींतून वांचलेल्या मार्टिन नांवाच्या साहेबानें तर स्वच्छ लिहिलें कीं, राणीचा एकही नोकर बंडांत प्रथम सामील नव्हता व कत्तल पहिल्याच दिवशीं झाली. उलट राणीनें शक्य तेवढी इंग्रजांना मदत करण्याचाच प्रयत्न केला. इंग्रजांना दतिया येथें रातोरात निघून जाण्याचाही तिनें सल्ला दिला, परंतु तो त्यांनीं मानला नाहीं. बंडखोर शिपायांनीं उलट राणीपासून जबरदस्तीनें तीन लाख रुपये खंडणी मागितली, आणि राणीला प्रसंग ओळखून ती द्यावी लागली. खजीना लुटून, इंग्रजांचे बंगले जाळून फुंकून व या तीन लाखांची वांटणी करून बंडखोर शिपाई दिल्लीकडे चालते झाले. कारण कोठेंही देशी फौजेंत बंड झालें कीं, शिपाई आपल्या वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्यांना कंठस्नान घालून दिल्लीकडे रवाना होत असत. उत्तर हिंदुस्थानांतील ठिकठिकाणच्या प्रमुख छावण्या आपल्या हातीं ठेवणें, दिल्लीस जाण्याइतकेंच महत्वाचें आहे, हें त्यांना कळतच नसे. ते बंड पुकारून सरळ दिल्लीची वाट धरीत असत.

९ जून १८५७ पासून राणीसाहेबांनीं झांशीच्या राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. त्यामुळें इतर ठिकाणांप्रमाणें तेथील प्रजेवर गांवगुंडांकडून अत्याचार मात्र घडले नाहींत. कारण कोणतीच राजसत्ता नसली म्हणजे चोर दरोडेखोरांचें उत्तम फावतें. तसा कोणताच शोचनीय प्रकार झांशी येथें घडला नाहीं. राणीसाहबांचें राज्य परत त्यांच्या हातीं आलें. चालून आलेल्या संधीचा त्यांनीं योग्य तो फायदा घेतला. निरपराधी इंग्रज स्त्रीपुरुषांच्या कत्तलींत त्यांचें अंग मुळींच नव्हतें हें खरें, परंतु बंडाच्या उठावणींत त्यांचें मुळींच अंग नव्हतें, असें मात्र म्हणवत नाहीं. कारण ३१ मे रोजीं सर्वत्र बंड पुकारण्याचा शिपायांनीं व त्यांच्या पुढाऱ्यांनीं निश्चय केला होता. परंतु मीरत

येथील शिपायांनीं घाई केल्यामुळें बंड तीन आठवडे अगोदरच झालें, आणि ठिकठिकाणचे इंग्रज सावध होऊन ३१ मेची मार्गप्रतीक्षा करूं लागले. तेव्हां ३१ मे रोजीं बंड करण्यापासून कांहींच फायदा उरला नव्हता. ४ व ५ जून रोजीं कानपूर येथील शिपायांनीं बंड पुकारलें. तोंपर्यंत झांशीचे शिपाई स्वस्थ होते ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. कानपूरच्या बंडाळीची बातमी आल्यानंतरच झांशी येथें ७ जून रोजीं बंड झालें. नानासाहेब पेशवे व लक्ष्मीबाई राणीसाहेब यांचा लहानपणापासून घरोबा होता. कारण राणीसाहेबांचे वडील मोरोपंत तांबे हे पेशव्यांचे आश्रित होते, आणि पेशव्यांच्या कृपेनें व मदतीनें राणीचें लग्न झालें होतें. नानासाहेब लक्ष्मीबाईला आपली बहीण मानीत होते, आणि उलटपक्षीं राणीसाहेबांची पेशव्यांविषयीं बंधुप्रेमाबरोबर अत्यंत निष्ठाही होती. तेव्हां या महत्वाच्या प्रसंगीं त्यांचा एकमेकांशीं अगोदर पत्रव्यवहार झाला असल्यास नवल नाहीं. शिंदे-होळकरांपेक्षां राणीसाहेबांना पेशव्यांविषयीं अधिक आपलेपणा वाटत होता. त्यामुळें पेशव्यांच्याकरितां हातीं तलवार घेऊन, स्वराज्य पुन्हां स्थापण्याच्या निश्चयास त्या लागल्या असाव्या. त्यांना मेहनतीचा शोक लहानपणापासूनच होता व मोठेपणीं देखील रोज पहाटेस उठून त्या कसरत-शाळेंत जाऊन जोर, जोडी, मलखांब करीत असत. त्यामुळें त्यांचें शरीर सडपातळ असलें तरी कसदार होतें. घोड्यावर बसण्याचा व्यायाम तर त्या नित्य घेत असत. घोड्यावर बसण्यांत त्या अत्यंत पटाईत होत्या. घोडा मंडळावर धरणें, कुंदणावरून उडविणें, घोड्यावर बसून खंदक पार करणें ह्या त्यांच्या रोजच्या लीला होत्या. तलवार, जंबिया वापरण्यांत त्या कुशल होत्या. अशा बुद्धिमान, कर्तबगार व मानी स्त्रीनें आपल्या राज्याकरितां बंडांत उडी घेतली तर त्यांत नवल नाहीं व तिचा त्यांत दोषही नाहीं. बुंदेलखंडांतील प्रजाजनही बाईसाहेबांवर अतिशय खुश होते.

परंतु बाईसाहेबांनीं बंड पुकारलें तरी त्यांनीं अन्याय केला नाहीं किंवा निःशस्त्रांवर त्यांनीं शस्त्र उचललें नाहीं. इतकेंच नाहीं, तर इंग्रजांचे पगारी शिपाई पहिल्या दिवशीं बिथरले तेव्हां त्यांनीं इंग्रजांना शक्य तेवढी मदतच केली. शिपायांनीं व पोलिसांनीं इंग्रज स्त्रीपुरुषांची अमानुषपणें कत्तल केली, त्याबद्दल त्यांना वाईटच वाटलें. परंतु ती कत्तल थांबविणें त्यांच्या शक्तीबाहेर होतें. कारण इंग्रजांचे शिपाई राणीचा हुकूम मानण्यास तयार नव्हते. परंतु शिपाई दिल्लीस गेल्यावर, रस्त्यांत निर्दयपणें टाकून दिलेलीं इंग्रजांचीं प्रेतें त्यांनीं गोळा केलीं, व त्यांचे योग्य ते प्रेतसंस्कार केले. शिपायांच्या या अमानुष अत्याचाराबद्दल त्यांनीं

जबलपूरचे कमिशनर मेजर अर्स्कीन व आग्रा येथील कमिशनर कर्नल फ्रेजर, ह्यांना निषेधपत्रें लिहिलीं, व झालेल्या अत्याचारांत आपला मुळींच हात नव्हता असें त्यांना बजावलें. इंग्रजी सत्ता बुंदेलखंडांत पुन्हां पूर्णपणें स्थापन होईतोंपर्यंतच, देशांत बंडाळी माजून प्रजेवर गुंडांकडून अत्याचार होऊं नये, म्हणून आपण झांशी येथील राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं आहेत, असेंही त्यांना राणीनें लिहिलें. ह्यांत राणीसाहेबांचा मुत्सद्दीपणा उत्तम प्रकारें दिसून येतो. बंडाची संधी साधून त्यांनीं झांशीचें राज्य प्रथम आपल्या स्वाधीन करून घेतलें, व यदाकदाचित् बंडाचा मोड होऊन इंग्रज पुन्हां विजयी झाले, तर त्यांच्याकडून शाबासकी म्हणून, बक्षिसादाखल राज्य परत मिळविण्याचा मार्ग त्यांनीं आपल्याकडून खुला करून ठेवला. परंतु दुर्दैवानें तीं पत्रें वाटेंतच गहाळ झालीं!

राणी लक्ष्मीबाईनें गादीवर बसल्याबरोबर राज्याचा फारच छान बंदोबस्त केला. निरनिराळे अधिकारी नेमून करवसुली व न्यायदानाची व्यवस्था केली. आपल्या शिपायांकडून गस्त घालवून चोरडाकूंचा पराभव केला व झांशी प्रांतात सर्वत्र शांतता स्थापन केली. झांशी प्रांत राणी लक्ष्मीबाईच्या ताब्यांत आला, हें पाहून तिच्या पतीचा एक दूरचा भाऊबंद सदाशिव नारायण तिच्यावर चालून आला व स्वतः झांशीचे महाराज अशी पदवी धारण करून, झांशीपासून तीस मैल अंतरावर असलेला करेरा नांवाचा किल्ला त्यानें सर केला. हें पाहून राणीनें फौजेंत नवीन भरती केली व राजवाड्यांत आणि किल्ल्यांत पुरलेल्या जुन्या तोफा बाहेर काढल्या व त्यांना उजळा देऊन त्या युद्धोपयोगी केल्या. इतकें करूनच ही चतुर व शूर राणी थांबली नाहीं. सैन्य कितीही चांगलें असलें, तरी शस्त्रास्त्रें व दारूगोळा यांचा भरपूर पुरवठा असल्यावांचून लढाईंत यश मिळत नाहीं, हें पूर्णपणें ओळखून शस्त्रें तयार करण्यास तिनें अनेक कुशल कारागिरांना आज्ञा केली, व झांशी शहरांत दारूगोळा तयार करण्याचा नवा कारखाना उघडला. याप्रमाणें सज्ज होऊन तिनें सदाशिव नारायणावर स्वारी करून त्यास करेराहून ग्वाल्हेर येथें पळवून लावलें. बुंदेलखंडांतील ठाकुरांनीं या नव्या तोतया महाराजांना मदत न करतां, राणी लक्ष्मीबाई व तिचे दत्तक पुत्र दामोदरराव यांची झांशी प्रांतावरील सत्ता कबूल केली. याप्रमाणें राणीचा अंमल सर्व संस्थानभर सुरळित चालू झाला.

परंतु लवकरच झांशीपासून दीड दोन मैलांवर असलेल्या ओढछा गांवचा दिवाण नत्थेखान, हा दतियाच्या फौजेची मदत घेऊन झांशीवर चाल करून

आला व त्यानें झांशी शहराला वेढा दिला. राणी काय केवळ एक बाईमाणूस, तेव्हां या बाईपासून झांशीचें राज्य हिसकावून घेणें, ही नत्थेखानाला सहज गोष्ट वाटली ! बंडाळीचा फायदा घेऊन आपण आपलें राज्य झांशीस स्थापावें व राणीस तेथून हुसकावून द्यावें हा त्याचा मूळ हेतू. बाईमाणसाच्या व त्यांतून विधवा ब्राम्हण स्त्रीच्या हातून पराक्रम होणें शक्य नाहीं ही त्याची मनोभावना ! परंतु राणीनें झांशीच्या किल्ल्यावर इंग्रजी युनियन जॅक व पेशवाई भगवा झेंडा, अशीं दोन्ही निशाणें उभारून नत्थेखानाशीं जोराचा सामना दिला व त्याचा पराभव करून त्यास पळत परत फिरण्यास भाग पाडलें. स्वतः राणी मर्दानी वेषानें तटाच्या बुरजावर उभी राहून युद्धांत भाग घेत होती. तिचें असामान्य धैर्य पाहून बुंदेलखंडांतील ठाकुरांनीं तिच्या आधिपत्याखालीं लढण्याचें ठरविलें. नत्थेखान वापस गेला खरा, परंतु त्यानें त्या पराभवानें चिडून इंग्रज अधिकाऱ्यांना असें लिहून पाठविलें कीं, झांशीची राणी बंडखोरांना सामील झाली असल्यामुळें इंग्रजांच्या वतीनें आपण तिच्यावर चालून गेलों होतों. ह्यामिल्टन साहेबाला नत्थेखानाचें पत्र मिळाल्यामुळें त्याला तें खरें वाटलें व नत्थेखानाचा अंतस्थ कावा इंग्रजांना समजून आला नाहीं.

झांशी प्रांतांत राणीचें राज्य दहा महिनेपर्यंत एकसारखें चालू होतें, व त्यांच्या त्या अल्प कारकीर्दींत प्रांत फार सुखांत होता. कारण राणीची राज्यव्यवस्था चोख होती. राणीसाहेब कधीं पुरुषवेषांत तर कधीं स्त्रीवेषांत, पण रोज नियमानें दरबारांत येऊन कामकाज पहात असत. त्यांची बुद्धिमत्ता तीव्र असल्यामुळें कारभारी मंडळींना त्या भराभर हुकूम लिहावयास सांगून कामाचा फडशा पाडीत, तर कधीं स्वतःच हुकूम खरडीत असत. कारण तलवारीप्रमाणें लेखणीची विद्याही त्यांना उत्तम अवगत होती. ब्राह्मण सरदार सव्यसाची असल्यामुळेंच त्यांचें सर्वत्र वजन पडे, व त्यामुळेंच त्यांना हिंदुस्थानांत मोठेपणा प्राप्त झाला. पायांत पायजमा, अंगांत अंबव्याची बंडी, डोकीस टोपी घालून वर पागोट्यासारखी बांधलेली बत्ती, कमरेस काचा किंवा जरीचा दुपेटा व त्यास लटकावलेली तलवार, हा त्यांचा दरबारास जातेवेळचा पोषाख असे. स्त्रीवेषांत त्या पतिमरणामुळें पांढरा शुभ्र पोशाख करीत असत. केसांचा बुचडा बांधलेला असून नेसावयास पांढरा शालू व अंगांत स्वच्छ पांढरी चोळी असे. दरबारांत एक पडदपोशीची खोली असे. तेथें दरवाजाच्या आंत गादी घालून लोडाशीं त्या टेकून बसत असत, व सर्व न्यायनिवाडा स्वतः करीत. दर शुक्रवारीं व मंगळवारीं संध्याकाळीं मुलास बरोबर घेऊन त्या महालक्ष्मीच्या दर्शनास नियमानें जात असत.

तेवढ्या थोड्या अवधींत राणीनें आपलें प्रजाप्रेम व दयाळुत्व सर्वांच्या निदर्शनास आणून दिलें. झांशी रियासतींत बडवासागर म्हणून एक लहानसें गांव आहे. तेथें चोर लुटारूंनीं फार गोंधळ उडवून दिला. तेव्हां राणीनें तेथें जातीनें पंधरा दिवस मुक्काम करून चोरांना पकडलें, व त्यांच्या त्यांच्या अपराधाप्रमाणें, कांहींना फांशी तर कांहींना कैदेची याप्रमाणें शिक्षा देऊन प्रजेला निर्भय केलें. नत्थेखानाशीं लढाई चालू असतांना जे झांशीचे शिपाई युद्धांत जखमी होत, त्यांची सेवासुश्रूषा राणी जातीनें करीत असे, व त्यांच्या दुःखाचा भार हलका करी. शिपायांच्या ठिकाणीं असलेलें तिचें पुत्रप्रेम पाहून, शिपाई इतके आडमुठ असतांना देखील विरघळले व तिला मातेप्रमाणें ते मान देऊं लागले. मातेच्या सुखासाठीं पुत्र काय करणार नाहीं ? एकदां राणीसाहेब महालक्ष्मीच्या दर्शनाहून वाड्यांत परत येत असतां, हजारों भिकारी महालाच्या दाराशीं गोळा झालेले त्यांनीं पाहिले. उत्तर हिंदुस्थानांत थंडी फार पडते, त्यामुळें पुरेसे कपडे जवळ नसलेल्या लोकांचे हिवाळयांत अतोनात हाल होतात. भिकाऱ्यांनीं अतिशय केंविलवाण्या मुद्रेनें राणीला आपली दुःस्थिति निवेदन केली. राणीसाहेबांनीं दुसऱ्या दिवशीं शेकडों शिंपी राजवाड्यांत कामावर लावले व त्यांच्याकडून रूदार बंड्या व टोप्या तयार करविल्या. नंतर गांवांत दवंडी पिटवून गोरगरीब अठरापगड जातींचा रमणा भरविला, व प्रत्येक इसमाला एक रूभरित बंडी व टोपी, आणि एक घोंगडें दिलें. कोणाला लग्नाला पैसे नसले तर त्यानें राणीसाहेबाकडे खुशाल जावें. प्रत्येकाला त्यांच्या वाड्यांत मुक्तद्वार असे, व प्रत्येकाचें दुःखनिवारण आपल्याकडून होईल तितकें करण्यास त्या तत्पर असत. परंतु राणीच्या ह्या रामराज्याचा काल फारच अल्प काळ टिकला.

राणीला आपलें राज्य परत हवें होतें, व तेवढ्याकरितां ती बंडांत सामील झाली होती. पेशवेप्रभूशीं राजनिष्ठा हा दुय्यम उद्देश होताच. इंग्रजांनीं अत्यंत अन्यायाची वर्तणूक तिच्याशीं व तिच्या पुत्राशीं केली. तिचें राज्य बेकायदेशीरपणें खालसा करण्यांत आलें. तिला कोणत्या तरी उपायानें गेलेलें राज्य परत मिळवावयाचें होतें. इंग्रजांविषयीं व्यक्तिशः तिचा द्वेष नव्हता. त्यामुळें कंपनी सरकारविरुद्ध तिनें युद्ध पुकारलें असलें, तरी शिपायांनीं व गुंड बदमाशांनीं इंग्रजांवर—विशेषतः स्त्रियाबालकांवर केलेले अत्याचार तिला सर्वस्वी नापसंत होते, व म्हणूनच त्यांचा तिनें कडक निषेध केला व त्यांना शक्य तितका तिनें विरोधही केला. बंडाच्या प्रारंभीं तिची वर्तणूक अत्यंत मुत्सद्देगिरीची होती. कारण

झांशी ताब्यांत घेतल्यानंतर आपण केवळ इंग्रजांच्या वतीनेंच राज्यकारभार चालवित आहोंत, असें तिनें आग्रा व जबलपूर येथील इंग्रज अधिकाऱ्यांना लिहून कळविलें. त्याचप्रमाणें नत्थेखानाशीं झालेल्या लढाईत, झांशीच्या किल्ल्यावर मराठेशाही भगव्या झेंड्याबरोबर इंग्रजी यूनियन जॅकही तिनें फडकत ठेवलें. हेतु हाच कीं, इंग्रज यदाकदाचित् बंडांत विजयी झाले, तरी या गोष्टी लक्षांत घेऊन झांशीचें राज्य आपल्याकडे त्यांनीं पूर्ववत् चालू ठेवावें. दुर्दैवानें तिचीं पत्रें इंग्रज अधिकाऱ्यांना मिळालीं नाहींत, किंवा मिळालीं असलीं तरी त्यांच्या क्रोधाग्नींत त्या पत्रांच्या चिंधड्या उडाल्या असाव्यात; कारण नत्थेखानाचा पराभव केल्यानंतर देखील, तिनें इंग्रज अधिकाऱ्यांना आपण त्यांच्या वतीनेंच बंडखोर नत्थेखानाशीं लढाई दिली असें कळविलें; पण हें पत्र इंग्रजांना मिळालें नाहीं. तें नत्थेखानाच्या हातीं लागलें व तें त्यानें तसेंच दडपून ठेवलें. प्रारंभीं राणीचा असा दुहेरी धोरणी डाव होता, कारण तिची दृष्टि झांशीवर वेधली होती. कोणत्या तरी उपायांनीं आपली झांशी आपल्याकडे कायमची रहावी हाच तिचा हेतु होता, व त्या धोरणानेंच तिचें वर्तन चालू होतें.

प्रथम प्रथम बंडाच्या बातम्या बंडखोरांना अनुकूल अशाच येऊं लागल्या. सर्व उत्तर हिंदुस्थानभर बंडाची आग भडकली, व ती दक्षिणेंत देखील भडकून इंग्रजी सत्ता त्या आगींत जळून भस्म होईल, असें बंडखोरांना वाटलें. परंतु हा भ्रम लवकरच दूर झाला. दक्षिण बर्फाप्रमाणें थंडच राहिली! शीख व गुरखे इंग्रजांचे मित्र बनले. रजपूत आपल्या वंशपरंपरागत ब्रीदाप्रमाणें राजनिष्ठ राहिले. मध्यहिंदुस्थानांतील प्रमुख मराठे संस्थानिक शिंदे-होळकर यांनीं इंग्रजांचा पक्ष उचलूनआपल्या स्वतःच्या राज्यांतील बंडास प्रवृत्त झालेल्या शिपायांना व इतर गृहस्थांना थोपवून धरलें, किंवा ज्यांनीं बंडाची उसळी घेतली त्यांचा तेजोभंग केला. बंगाल, बहार, वायव्यप्रांत येथें बंडाची दंगल प्रारंभीं थोडीशी उसळली असली, तरी योग्य नेत्यांच्या अभावीं व सामान्य प्रजेची सहानुभूती मुळींच नसल्यामुळें केवळ सामान्य बंडाळी ठरली; व ती इंग्रजांनीं सहज शांत करून, बहुतेक ठिकाणीं आपली सत्ता पूर्ववत् लवकरच स्थापन केली. दिल्ली, कानपूर व लखनौ हींच काय तीं बंडाचीं केंद्रस्थानें बरेच दिवस तग धरून होतीं. दिल्ली हें तर बंडखोरांचें प्रमुख केंद्र होतें, व मोंगल बादशाहीची तेथें रीतसर स्थापना झाल्यामुळें बंडवाल्यांना मोठें नैतिक बल प्राप्त झालें होतें. परंतु लाखों काळ्या शिपायांचा पराभव करून २० सप्टेंबर रोजीं दिल्लीवर इंग्रजांनीं आपलें निशाण फडकवलें; मोंगल बादशाहा कैदेंत पडले व युवराज

कुत्र्याप्रमाणें भररस्त्यांत गोळ्या घालून मारले गेले. ही बातमी सर्वत्र पसरतांच बंडवाले हताश झाले. परंतु कानपूरच्या अंतर्वेदींत नानासाहेब पेशवे आपलें स्थान धरून होते. दुर्दैवानें त्यांच्या शौर्याचा फारसा उपयोग न होतां ६ डिसेंबर रोजीं इंग्रजांनीं पुन्हां एकदां कानपूर घेतलें, व नानासाहेब पेशव्यांना आपला जीव बचावण्याकरितां तेथून पळावें लागलें. परंतु थोर पुरुषांच्या धैर्याची आपत्कालींच कसोटी लागते. नानासाहेबांचा पराभव होऊन ते हताश झाले, तरी या शूर मानिनीनें त्यांना स्फूर्तिदायक संदेश पाठविला. राणीनें पाहिलें कीं बंडवाल्यांचा निभाव इंग्रजांपुढें लागत नाहीं. दुसरी एखादी सामान्य स्त्री असती, तर या वेळीं इंग्रजांना ताबडतोब शरण जाऊन आपला थोडाबहुत फायदा करून घेती. परंतु राणीची वर्तणूक अगदींच उलट झाली. बंडाच्या प्रारंभीं राणीनें इंग्रजांच्या मैत्रीचा थोडाबहुत आव तरी मुत्सद्देगिरीनें आणला होता. परंतु बंडवाल्यांवर पराभवाची आपत्ती कोसळली, हें पाहून तिनें त्यांची नेटानें बाजू घेतली व इंग्रजांशीं त्यांच्यातर्फे लढण्याची जोरानें तयारी चालविली. आभाळ फाटलेलें दिसत असून देखील ही बहाद्दर स्त्री डगमगली नाहीं. उलट तिनें पुढाकार घेऊन पराभूत पेशव्यांना व त्यांच्या फौजेला धीर दिला, व लढाईची कमाल करण्याचें ठरविलें. कानपूर घेतल्यानंतर नबाबी लखनौवर इंग्रजांनीं चढाई केली, व १७ मार्च रोजीं लखनऊ शहर इंग्रजांच्या पूर्ण ताब्यांत आलें. याप्रमाणें बंडाचीं तिन्ही मुख्य केंद्रें मोडून जमीनदोस्त झालीं, आणि त्यामुळें इंग्रजांना आपलें सर्व बळ एकवटून राणीवर चढाई करतां आली. इकडे या आठ नऊ महिन्यांत, दक्षिणेंतील फौज सर ह्यू रोज या हुशार सेनापतीच्या आधिपत्याखालीं औरंगाबाद, इंदोर, उज्जेन, मह्रू वगैरे ठिकाणची बंडाळी मोडीत व सर्वत्र स्थीरस्थावर करीत आणि इंग्रजी सत्तेचा खुंटा हालवून बळकट करीत करीत, झांशीच्या टापूंत येऊन पोहोंचली. त्यामुळें उत्तर हिंदुस्थानांतील इंग्रजी फौजेला अधिकच जोर चढला. दिल्ली–कानपूरच्या बंडखोरांवर इंग्रजांनीं कसा भयंकर सूड उगविला, याच्या बातम्याही झांशी येथें झिरपून झिरपून येऊं लागल्या. दिल्ली व कानपूर येथें झालेली बीजन झांशी येथें सर्वांना कळून चुकली. अलाहाबाद प्रांतांतील लष्करी कायदा व झटपटीच्या चौकशीनंतर हजारों इसमांना दिलेल्या फांशीची बातमी पूर्वी किती तरी दिवस सर्वांना कळून चुकली होती. परंतु त्यामुळें राणीचें धैर्य कमी होण्याऐवजीं उलट दुणावलें. एकदां धरलेली बाजू सोडावयाची नाहीं, असा तिनें आपल्या मनाशीं निश्चय केला. तिचें असामान्य धैर्य व कर्तबगारी,

यामुळें बंडाचें पुढारीपण पुढें तिच्याकडेच आलें, आणि आपल्या निश्चयास अनुसरून तिनें बंडवाल्यांचा उघड पक्ष घेऊन इंग्रजांशीं निकराचें युद्ध आरंभिलें.

१९ मार्च रोजीं सर ह्यू रोज झांशीजवळ असलेल्या चंचलपूर गांवीं येऊन पोहोंचला. भोंवतालची परिस्थिती पाहून झांशी एका धडाक्यांत सहज सर करतां येईल असें त्यास वाटलें. तेव्हां त्यानें राणीला निरोप पाठविला कीं, तुम्ही स्वतः, मोरोपंत तांबे, लक्ष्मणराव दिवाण, लालू बक्षी वगैरे प्रमुख आठ इसमांसह निःशस्त्र होऊन आमच्या छावणींत यावें. हा अपमानास्पद निरोप राणीनें अर्थातच धुडकावून दिला. कारण दिल्ली शहर घेतल्यानंतर इंग्रजी फौजेनें दिल्लीच्या बादशहाचा न्याय करण्याकरितां लष्करी कोर्ट मुकर करून, त्यास सहकुटुंब ब्रह्मदेशांत हद्दपारी व कैदेची शिक्षा सुनावली. शिवाय शहाजाद्यांना तर चौकशीशिवाय गोळ्या घालून रस्त्यांतच ठार मारलें. असली इंग्रजांची दयामय न्यायपरायणता राणीच्या कानांवर पूर्वीच आली असल्यामुळें, उरलेला एकच खरा वीरत्वाचा मार्ग तिनें धरला. तिच्या फौजेंत बुंदेले व अरब शिपाई होते, आणि त्यांच्या शौर्यावर तिचा पूर्ण भरंवसा होता. बाईसाहेबांनीं किल्ल्याच्या तटावर योग्य बंदोबस्त केला, आणि सर्व बुरुजांवर मोर्चे बांधून तोफा रोखून ठेवल्या आणि ठिकठिकाणचे गोलंदाज नेमून दिले. शहराचे तटावर जंग्या जंग्यांतून कडाबिनी घेतलेले शिपाई उभे केले, आणि निरनिराळ्या दरवाजांजवळ शिपायांच्या टोळ्या ठेवून त्यांच्यावर विश्वासू व दक्ष सरदार नियुक्त केले. गांवांतील बारुद तयार करण्याचा कारखाना जोरांत चालू ठेवून एकंदर लढाईचें सेनापतित्व स्वतः राणीसाहेबांनीं पत्करलें.

इंग्रजांची फौज मोठी व कवायती; त्यांच्या तोफा प्रचंड व पल्लेदार; युद्धसामग्रीची त्यांची तयारी जय्यत; त्यांच्या फौजेंतील शिपाई निरनिराळ्या ठिकाणीं संपादन केलेल्या विजयांमुळें फुरफुरलेले, उलटपक्षीं राणीची बाजू सर्वच दृष्टीनीं कमजोर! इंग्रजांनीं झांशीला वेढा दिला, तेव्हां हां हां म्हणतां झांशी काबीज करूं अशी त्यांना उमेद होती; परंतु हळूहळू त्यांचा भ्रमनिरास झाला. झांशीच्या राणीचें शौर्य व तेज रोज त्यांच्या प्रत्ययास नव्या स्वरूपांत येऊं लागलें. आपल्या सैन्याला उत्तेजित करीत ती स्वतः सर्वत्र फिरत असे. घारीप्रमाणें सूक्ष्म निरीक्षण करून जिकडे इंग्रजांचा नेटानें हल्ला होईल, तिकडे आपली फौज व फिरता तोफखाना एकवटून ती हल्ल्याचा प्रतिकार करी. इंग्रजांच्या तोफा बंद पाडण्याची कामगिरी जे गोलंदाज बजावीत, त्यांना सन्मानपूर्वक ती कडीं तोडे बक्षीस देत असे. परंतु नव्या येणाऱ्या मदतीमुळें इंग्रजांचें सैन्य रोज फुगत चाललें होतें.

आणि राणीला फक्त ईश्वरच एकटा साहाय्य करीत होता! कारण सर ह्यू रोजनें झांशीच्या सर्व वाटा रोखल्या; एवढेंच नव्हे तर झांशी काबीज केली म्हणजे आंत सांपडतील त्या लोकांचें आम्ही बीजन करूं, असे सर्व दूर जाहीरनामे प्रसिद्ध करवून राणीला बाहेरून मदत पोहोंचविण्याची हिंमत कोणाच्या अंगांत त्यानें उरूं दिली नाहीं. राणीचे रणशूर शिपाई व धाडशी गोलंदाज एकामागून एक इंग्रजांच्या तोफांना बळी पडूं लागले. इंग्रज दुर्बिणींचा उपयोग करीत असल्या-मुळें त्यांची गोलंदाजी अचूक होई. रात्रीच्या वेळीं तर हे तोफांचे लाल भडक गोळे आकाशांतून फिरतांना व फुटतांना पाहून लोकांच्या हृदयांत धडकी भरे. तोफांच्या सारख्या होणाऱ्या गडगडाटानें कानठळ्या बसून जात असत. त्यांतून जेव्हां जेव्हां इंग्रजांच्या तोफांतून कुलपी गोळ्यांचा वर्षाव होई, तेव्हां तर शहराची फार हानि होत असे. सैनिक तेवढेच या गोळ्यांना बळी पडत असें थोडेंच होतें? निरपराधी बायकामुलांची देखील प्राणहानि होऊं लागली. परंतु राणीच्या शौर्यानें सर्वांना हिंमत चढली. राणीचें अनुकरण करून अनेक तरुण स्त्रिया युद्धांतील कामगिरीचा वांटा उचलण्यास तयार झाल्या! त्यांच्यापैकीं कांहींनीं जखमी शिपा-यांची सेवासुश्रूषा चालविली, कांहींनीं हातीं हत्यारें घेऊन गस्त देण्याची कामगिरी पत्करली, तर कांहींजणी बारुद-गोळ्याची नेआण करूं लागल्या. शिपाई लढतां लढतां थकले असतां राणी जातीनें उत्तेजनपर दोन गोड शब्द बोलून त्यांच्यांत अवर्णनीय उत्साह उत्पन्न करी.

इकडे राणीनें पेशव्यांची कुमक मागितली. कानपूर येथें पेशव्यांचा पराजय झाल्यावर त्यांची फौज काल्पी येथें एकवटली होती. पेशव्यांजवळ तोफखाना होता, आणि शिवाय बारुद-गोळा तयार करण्यासाठीं एक मोठा कारखानाही त्यांनीं काल्पीस उघडला होता. पेशव्यांनीं इंग्रजांच्या फौजेवर चाल केल्यास, झांशी व काल्पी येथील दोन्ही फौजांच्या मध्यें सांपडून सर ह्यू रोजची चटणी होईल, असा राणीचा अंदाज होता, आणि युद्धकलेच्या दृष्टीनें हा डाव अत्यंत मार्मिक होता, यांत शंका नाहीं. त्यावेळीं तात्या टोपी हा पेशव्यांचा मुख्य सेनापती होता. त्याला ही योजना ताबडतोब पटली व तो दरकूच दरमजल करीत झांशीकडे निघाला. तात्या टोपीची फौज मदतीस आली हें ऐकून वेढयांतील शिपायांना अधिकच वीरश्री चढली, व त्यांनीं किल्ल्यांतून इंग्रजांवर नेटानें मारा चालू केला. परंतु सर ह्यू रोजजवळ सैन्यबळ भरपूर होतें. त्यानें झांशीचा वेढा तसाच चालवून

उरलेल्या फौजेनिशीं तात्यावर चढाई केली, व त्याचा पराभव केला. तात्या टोपी आल्या रस्त्यानें परत फिरला, परंतु त्याच्या जवळच्या तोफा मात्र त्याला तेथेंच टाकून जावें लागलें. कारण इंग्रजांनीं त्याचा पाठलाग चालविला. जंगलाला आग लावून देऊन त्यानें पाठलाग करणाऱ्या इंग्रजी फौजेला अडवून धरलें, व मिळालेल्या अवधीचा फायदा घेऊन आपली फौज मागें सुरक्षित नेली. तात्या टोपीची फौज चांगली बलवत्तर असूनही त्याचा पराभव झाला. इंग्रजांचा नेटाचा हल्ला बंडखोर शिपायांना फारसा सोसत नसे; फौज जर एका जागीं पाय रोखून लढाई देईल तरच समोरून येणाऱ्या हल्ल्याचा प्रतिकार करतां येतो, व चढाऊ लोकांची मुसंडी धैर्यानें तोंड देऊन नेटानें एकदां जिरविली, म्हणजे विजयाचा मार्ग सुलभ होतो. परंतु त्या विजयाकरितां तरी प्रथमारंभीं हजार पांचशें सैनिक बळी द्यावे लागतात. समोरून होणाऱ्या हल्ल्याचा अघाडीच्या फौजेवर सगळा जोर पडत असल्यामुळें त्यांची नुकसानी फार होऊन, आघाडीच्या पलटणींतले सैनिकच असल्या युद्धांत फार कापले जातात. बंडखोर शिपायांना विजय व लूट हवी होती. परंतु त्याकरितां कराव्या लागणाऱ्या स्वार्थत्यागाला त्यांची तयारी नव्हती. यामुळें इंग्रजी फौजेनें निकराचा हल्ला केल्याबरोबर बंडवाल्यांची आघाडी फुटून त्यांची पांगापांग होत असे, व त्या धांदलीमुळें पिछाडीची फौजही अस्ताव्यस्त होऊन बंडवाल्यांच्या कपाळीं रणांगणांतून पळून जाणें येई व इंग्रज विजयी होत. तात्या टोपी चतुर सेनानायक असला, तरी तो प्राणांना तळहातावरील फोड प्रमाणें जपणाऱ्या शिपायांच्या बळावर जय कसा मिळविणार ? फौजेचा पराभव मामुली रीतीप्रमाणें झाला, तरी युक्तीप्रयुक्तीनें आपल्या फौजेचा फारसा नाश होऊं न देतां त्यानें पीछेहाट स्वीकारली, व पाठलाग करणाऱ्या इंग्रजांना थोपवून धरलें. फौजेची फळी एकदां फुटली, म्हणजे पांगापांग झालेल्या फौजेची प्रत्यक्ष युद्धापेक्षां नंतरच्या पिछेहाटींतच अधिक खराबी होते. तात्या टोपीनें पराभव झाला तरी ती हानि मोठ्या चतुराईनें टाळली यांत संशय नाहीं !

तात्या टोपीच्या पराभवाची वार्ता कळतांच झांशीच्या फौजेचा धीर खचत चालला. इंग्रजांची निशाणबाजी अचूक व जोराची होऊं लागली. शहरांत ठिक-ठिकाणीं आगी लागल्या, वाडेच्या वाडे खचूं लागले व पुरुष, बायका व मुलें मरूं लागलीं. एक दिवस इंग्रजांच्या तोफांचा मारा किल्ल्यांतील पाणवठ्यावर चालू झाला. पाणी भरणारे ब्राम्हण कावडी वहातां वहातांच ठार झाले. पाण्याची हाकाहाक सुरू झाली. तेव्हां राणीसाहेबांनीं उलट निकराचा मारा करून इंग्रजं

तोफा बंद केल्या, व फौजेस पाणी पाजलें. शहरांत अन्नाचा दुष्काळ पडल्यामुळें बाईसाहेबांनीं गोरगरीबांकरितां अन्नछत्रें सुरू केलीं व ज्यांना तेथें येऊन जेवण्याची लाज वाटत होती, त्यांना चणे मुरमुरे व धान्य फुकट वांटण्याची तजवीज केली. अशी स्थिती चालू असतांना एके दिवशीं दुपारीं वाड्यासमोरील दारूच्या कोठारावर इंग्रजांचा एक गोळा येऊन फुटला, आणि एकदम मोठा आवाज होऊन लोकांच्या कानठळ्या बसल्या व सर्वत्र धूर व धूळ पसरली. सर्वांचे पोटांत धस्स झालें. जरा शांत झाल्यावर कळलें कीं, दारूच्या सर्व कोठाराचा भडका उडून आंत काम करणारे तीस पुरुष व आठ स्त्रिया ठार झाल्या, आणि चाळीस पंचेचाळीस माणसें शिवाय भाजून जखमी झालीं. राणीसाहेबांनीं त्या कामास आलेल्या लोकांचा व त्यांच्या कुटुंबियांचा योग्य तो परामर्ष घेतला. इंग्रजांच्या तोफांच्या माऱ्यानें कांहीं बुरुज ढांसळले. ते रात्रीच्या रात्रीं, गवंड्यांना काळीं वस्त्रे पांघरण्यास देऊन, त्यांच्यामारवीं विटाचुन्यानीं वाईनीं बांधवून काढले. एके दिवशी रात्रभर राणीसाहेबांच्या वाड्यावर तोफांचा मारा सारखा चालू राहिला. पण वाड्याच्या बांधकामास इतका उत्तम चुना वापरलेला होता कीं, ज्या ठिकाणीं गोळा पडे तेथेंच एक भोंक पडे. सबंध चुनेगच्चीस चाळणीसारखीं भोकें पडलीं व गोळे खालीं पडून आंतील सामानाचा, विशेषतः हंड्याझुंबरें व आयने यांचा चक्काचूर झाला, त्यामुळें तीनचार कुणबिणी कामास आल्या. एकंदर वाडा उभाच राहिल्यामुळें दुसरें नुकसान झालें नाहीं. राणीसाहेबांच्या वाड्यावरचा मारा झांशीच्या गोलंदाजांनीं मोठ्या शर्थीनें इंग्रजांच्या तोफा बंद पाडून चार घटकांनीं थांबविला.

याप्रमाणें एकामागून एक विपत्ती आल्या, तरी राणीचें धैर्य खचलें नाहीं. परंतु ४ एप्रील रोजीं गोरे शिपाई शहराच्या तटाला शिड्या लावून वर चढूं लागले. राणीच्या सैनिकांनीं त्यांचा प्रतिकार केला व त्यांच्याशीं निकराची लढाई दिली. रस्त्यारस्त्यांतून व घराघरांतून युद्ध सुरू झालें. राजवाड्याचे समोर फारच मोठी धुमश्चक्री उडाली. राणी जातीनें हातीं तलवार घेऊन आपल्या खास अरब स्वारांबरोबर इंग्रजांशीं दिवसभर सामना देत होती. समोर गोरा दिसतांच कापून काढण्याचा तिनें सपाटा चालविला. तलवारींच्या चकमकींत आपलें फारसें चालत नाहीं, हें पाहून गोऱ्या शिपायांनी भिंतीआड उभें राहून राणीच्या लोकांवर व खुद्द तिच्यावर गोळ्या झाडण्यास सुरवात केली. राजवाड्याचे एकूण एक रक्षक लढाईत पडेतोंपर्यंत, वाडा इंग्रजांच्या हातीं आला नाहीं. संध्याकाळपर्यंत लढाई चालू होती. संध्याकाळीं राणीनें किल्ल्याचा आश्रय घेतला,

परंतु तो तात्पुरताच होता. कारण सर्व शहर इंग्रजांच्या ताब्यांत गेल्यावर व बहुतेक फौज कापली गेल्यावर, सतरा दिवसांच्या लढाईत मोडकळीस आलेला किल्ला, युद्धसामग्रीच्या अभावीं प्रचंड इंग्रज फौजेविरुद्ध लढविणें अशक्य होतें. रात्रीं अंधार पडला असें पाहून राणी घोड्यावर स्वार झाली, पाठीमागें दत्तक चिरंजीव दामोदर यास बसवून शेल्यानें त्यास आपल्या पाठीशीं करकचून बांधून घेतलें, व हातांत तलवार घेऊन शत्रूची फळी फोडण्यास सिद्ध झाली. राणीचे विश्वासू सेवकही घोड्यावर स्वार झाले. राणीचे वडील मोरोपंत तांबे यांनीं जडजवाहीर व शिल्लक उरलेला खजीना हत्तीवर घातला व तेही झांशी सोडण्यास तयार झाले.

रात्रीं सर्व मंडळी किल्ल्यावरून उतरली व भर शहरांतून उत्तर दरवाजावाटे झांशीबाहेर पडली. परंतु ही मंडळी शहराबाहेर पडतात न पडतात, तोंच शहरांत ठिकठिकाणीं इंग्रजांचे चौकीपहारे बसले होते त्यांना ह्यांची चाहूल लागल्यामुळें, त्यांनीं इंग्रज फौजेस सावध केलें. तोफा धडाडूं लागल्या, व अंधारांतच इंग्रजांची एक तुकडी राणीस आडवी झाली; परंतु राणीनें शत्रूची फळी फोडून काल्पीचा मार्ग धरला. राणीचे बरेच विश्वासू सेवक त्या रात्रीं कामास आले. अनेक जिवास जीव देणारे सरदार ठार झाले, व कित्येकांची पांगापांग झाली. कारण अंधारांत रस्ता नीट दिसत नसल्यामुळें, चकमक झडतांच ज्याला जशी वाट सांपडली तसा तो पळाला. लेफ्टनंट बोकरच्या हाताखालील तुकडीनें २१ मैलपर्यंत तसल्या अंधारांतही राणीचा पाठलाग केला, परंतु राणी त्याच्या हातीं लागली नाहीं. ५ एप्रीलला सकाळीं झांशीच्या किल्ल्यावर इंग्रजांचें निशाण फडकूं लागलें. शहरांत जी बीजन उडाली तिचें वर्णन गोडशे भटजींच्या शब्दांत खालीं दिलें आहे. ते त्यावेळीं * झांशींत हजर होतेः—

"इकडे गोरे लोक चोंहों दरवाज्यांतून आंत शिरले ते बीजन करीत चालले. जितका ५ वर्षांवर व ८० वर्षांचे आंत पुरुष दिसत चालला तितका गोळीनें अगर तरवारीनें मारीत चालले व एकीकडून शहरास आग लावून दिली. ती प्रथम हलवाईपुऱ्यास लाविली. त्या वेळेस शहरांत दुःखाचा जो कल्लोळ उसळून गेला त्यास पारावार नाहीं. मेंढरांच्या कळपांत लांडग्यांनीं उडी घालतांच जशी त्या प्राण्यांची स्थिति होते, त्याप्रमाणें लोक भयानें आतुर होऊन जिकडे तिकडे सैरावैरा पळूं लागले. कांहीं पळतां पळतां मुडदे होऊन खालीं गळूं लागले. कोणी या गल्लींत

* श्री. चि. वि. वैद्य यांच्या 'माझा प्रवास' या पुस्तकावरून.

शीरे, कोणी घरांत अडचणींत लपे, कोणी दाढी मिशा उतरून स्त्रीचा वेष धारण करून बसे, कोणी शेतखान्यांत जाऊन लपे, याप्रमाणें जशी ज्यांस जीव बचाविण्याची युक्ति सुचली तसें तो करूं लागला. गोरे लोक शहरांत शिरून बीजन करूं लागले. असें समजतांच शहराचे मध्यभागीं भिड्यांचा बाग होता, त्यांत हजारों लोक चोहींकडून शिरले. तेथें गोरे येतांच सर्व लोक दीन होऊन जमिनीवर साष्टांग नमस्कार घालून करुण स्वरानें बोलूं लागले कीं, साहेब, आम्ही निरपराधी रयत आहों. आम्ही लढवय्ये नाहीं. आम्हांस दयाळू होऊन प्राणदान द्यावें, आम्हांस मारूं नये. अशी त्यांची करुण भाक ऐकतांच त्या सर्वत्रांचे नशीबानें गोऱ्यांवरील मुख्य ऑफिसरास दया आली. त्यानें त्या प्रणतांस अभयवचन देऊन व लागलींच बागेभोंवतीं पहारा ठेवून दरवाज्यास कुलुपें मारिलीं व हुकूम केला कीं बाहेरील लोक आंत येऊं देऊं नये, व आंतले बाहेर सोडूं नयेत. याप्रमाणें तीं माणसें, बायका पोरें मिळून वीस हजार त्या बागेंत वांचलीं गेलीं.

दुसरीकडे गोरे लोक घरांत शिरून मनुष्यांस ठार मारून सोनें व रुपें यांची लूट करूं लागले. घरांत शिरल्याबरोबर पुरुष सांपडला व त्यानें ताबडतोब आपला अर्थ गोरे लोकांच्या स्वाधीन केला तर तो जिवानिशीं सुटे. अर्थ लवकर निघाला नाहीं तर त्याचे हाल हाल करीत. कित्येक लोकांचे गळ्यांस त्याचे धोतराचा गळफांस करून रस्त्यावर नेऊन मारझोड करीत. त्याचे घरांत खणून पहात, भिंती फोडीत व अर्थ प्राप्त झाला म्हणजे त्यास गोळी घालून मारून टाकीत. जो पुरुष अर्थ देऊन सुटला तोच पुन्हा दुसरे गोरे लोकांचे हातीं सांपडला म्हणजे गोळीनें मारला जावा. गोरे लोकांनीं स्त्रियांस बुद्धिपुरःसर मारलें नाहीं. परंतु कांहीं कुलीनांच्या तरुण स्त्रिया, गोरे लोक पुढील दारीं आले म्हणजे ते आपल्यास बाटवितील या भीतीनें मागील दारीं विहिरींत जीव देत असत. कोठें असेंही झालें कीं, गोरा घरांत शिरून नवऱ्यास गोळी घालतो आहे तों त्याचे बायकोनें येऊन त्याच्या अंगास वेष्टन करावें. मग गोळी सुटून ती नवऱ्यास मारून त्या पतिव्रता स्त्रियेस लागून, तिच्या देहाचें जन्मजन्मांतरींचें सार्थक होत असे. गोळी बायकोस लागली असें पाहून गोऱ्यानें पुन्हा गोळी घालून नवऱ्यास ठार मारावें. याप्रमाणें कित्येक दृढव्रताच्या स्त्रिया मरण पावल्या, परंतु मुद्दाम स्त्रियांचा प्राणनाश किंवा विटंबना गोरे लोकांनीं केली नाहीं. इतका चांगुलपणा त्या पशुतुल्य सोजीर लोकांस कोठून येणार हें खरें; परंतु इंग्रज सरकारनें त्यांस दाबांत ठेवण्यासाठीं प्रत्येक सोल्जराबरोबर दोन दोन काळे शिपाई दिले होते. त्यांस

कप्तानसाहेबांचा असा हुकूम होता कीं, कोणी गोरा स्त्रियांचा अपमान किंवा घात करील तर त्यास तेथेंच गोळी घालून ठार मारून टाकावा. या इंग्रज सरकारच्या दूरदर्शी व न्यायी तजविजीमुळें बहुतकरून स्त्रियांस इजा झाली नाहीं. घरांत शिरल्यावर स्त्री दृष्टीस पडल्यास, गोरे लोकांनीं तिजपासून दूर उभें राहून तिचे अंगावरील सर्व वस्तावनी उतरून घ्यावी व तिच्यापासून सामोपचारानें जी माहिती निघेल त्याप्रमाणें घर शोधून सांपडेल तें वित्त घेऊन जावें. याप्रमाणें सायंकाळपर्यंत बीजन व लूट करून ते यमरूपी गोरे शिपाई रात्रीबद्दल शहराचा बंदोबस्त करून आपले गोटांत परत गेले.

दुसरे दिवशीं आदले दिवशींच्या प्रसंगाची आठवण होऊन, अपरात्रींच उठून रात्र सरली नाहीं तों बंब्यांत जाऊन बसलों. त्या दिवशीं फार माणसें मेलीं. गोरे दुरून दृष्टीस पडले म्हणजे जीव बचावण्याकरितां कित्येक लोक गवताचे गंजींत जाऊन लपले. तेथें गोरे येऊन त्यांनीं गवताच्या गंजी पेटवून दिल्या म्हणजे ते अग्नींत जळून जात. कित्येकांनीं गोरा आला असें पाहून विहिरींत उड्या घेतल्या; परंतु गोरे लोकांनीं विहिरीवर बसून पाण्यावर डोकें दिसूं लागतांच गोळ्यांचा भडिमार करून त्यांस तेथेंच मारलें. कित्येक लोक शेतखान्यांत लपून बसले होते, त्यांसही शोधून ठार मारलें. आमचे शेजारीं अग्निहोत्रीबुवाचें घर होतें. अग्निहोत्रीबुवा होम देऊन बाहेर येतात, तों घरांत दोन गोरे व गोरे लोकांचे बंदोबस्ताकरितां चार काळे शिपाई शिरले. गोरे जे गेले ते होमशाळेंत समोर गेले. तेथें अग्नीचे कुंडावर टोपल्या-पाट्या उपड्या घातलेल्या होत्या. गोरे लोकांस असें वाटलें कीं, यांत अर्थ आहे. म्हणून लाथेनें पाट्या उडवून पहातात तों राखाडी दृष्टीस पडली. यांत पुरलेला अर्थ असेल हें मनांत आणून आंत हात घातला, तों अग्नीच्या योगानें हात भाजले; मग ते गोरे अति क्रोधायमान होऊन अग्निहोत्री यास व त्याचे भावास व मुलास बंदुकीच्या गोळ्यांनीं ठार मारून, कांहीं सोनें रुपें होतें तें घेऊन दुसऱ्या घरीं गेले. एकंदर अग्निहोत्रीबुवासुद्धां त्यांचे घरचीं अकरा मनुष्यें मारलीं गेलीं! सर्व कुटुंबघातच झाला!! कित्येक लोक गोरा पाहून पळण्यास लागले. त्यांस रस्त्यांतच कडाबिनीच्या गोळ्यांनीं मारीत असत. भिडे यांचे बागेंतील सर्व मनुष्यें दोन दिवस उपाशीं होतीं. तिसरे दिवशीं पहाटेस दरवाज्यावर पाहारेकरी गोरे लोक होते त्यांनीं बागांत येऊन सर्वांस असें सांगितलें कीं, आपापले घरीं जाऊन भोजनाचा सरंजाम आणून येथें जेवणें करा. असें सांगतांच सर्व मनुष्यांस अत्यानंद झाला, व

घरीं धांवत धांवत जाऊन ज्याचा त्यानें सरंजाम आणला, व माणसें पुनः बागांत शिरलीं. त्यांत दुसरे लोकही जीव बचावण्याकरितां शिरले व तिसऱ्या दिवसाचे बीजनांतून वांचले गेले.

याप्रमाणें तीन दिवस बीजन करून शहरांत जितकें सोनें, रुपें, हिरे, पाच, मोतीं, पोंवळें सांपडलें, तितकें गोरे लोक घेऊन गेले. त्या वेळेस शहरांत कोट्यवधि रुपयांचा अर्थ गोरे शिपायांस सांपडला असेल. पुरुषाचें भाग्य फार चमत्कारिक आहे. तिसरे दिवशीं इंग्रजांचे लोक शहरचे वाड्यांत शिरले आणि तेथें सर्व प्रकारची लूट मांडली. सोनें, रुपें, पितळ, तांबें वगैरे सर्व जिन्नस इंग्रज सरकारनें लुटून आपले गोटांत नेला. त्यांत त्यांनीं कांहींएक अर्थ किंवा वस्त्र किंवा पात्र ठेवलें नाहीं. पोथ्यांचीं वेष्टणें यांवरसुद्धां त्यांची धाड येऊन पडली. झांशीची पुस्तकशाळा फार मोठी व उत्तम व्यवस्थेची होती. कारण झांशीचा सुभा पेशव्यापासून ज्या पुरुषांनीं मिळविला, त्या पुरुषापासून गंगाधरबावा ऊर्फ बाबासाहेब या शेवटच्या पुरुषापर्यंत, झांशीवाले पुस्तकांविषयीं फार उद्योगी झाले. चारहि वेदांचीं भाष्यें व सर्व शाखांचीं सूत्रें भाष्यांसहित, व परिशिष्टें भाष्येंसुद्धां व स्मृति टीकांसह दरोबस्त पुराणें, यांखेरीज ज्योतिषशास्त्राचे ग्रंथ व वैद्यकी ग्रंथ, असे बहुधा पृथ्वीवरचे सर्व तऱ्हेचे उपयुक्त ग्रंथ तेथें होते. झांशीपासून चारपांचशें कोसांवर नवा ग्रंथ असल्याचें कळतांच त्या शहरांत झांशीहून लेखक पाठवून ग्रंथ लिहून आणले होते. कारणपरत्वें ग्रंथ लागल्यास काशीक्षेत्रीं झांशीहून ग्रंथ पाहण्यास नेत असत. सर्व ग्रंथांस वेष्टणें फार मजबुतीचीं व फळ्या शिसव्याच्या होत्या. त्या प्रसंगांत इंग्रज सरकारनें पुस्तकांच्या फळ्या व वेष्टणें सोडून घेऊन, पुस्तकें धडाधड तिसरे मजल्यावरून रस्त्यांत टाकून दिलीं. त्या पोथ्यांचीं पानें वाऱ्याच्या योगानें रस्तोरस्तीं उडून जात होतीं. तसेंच फरासखान्यांतील जाजमें, लोड, तक्के, तंबू, पाले वगैरे सर्व गोटांत घेऊन गेले. नगारखान्यांत जाऊन सर्व नौबदी नगारे वगैरे फोडून तांब्याचीं भांडीं घेऊन गेले. याप्रमाणें वाड्याची अगदीं दुर्दशा करून टाकली. लक्ष्मीचें देवालयही लुटण्यास सोडलें नाहीं; देवीचे अलंकार, वस्त्र वगैरे सर्व सरंजाम लुटून नेला. मला वाटतें कीं, महालक्ष्मीस आपलाच राग येऊन तिचा सर्व सरंजाम तिला नकोसा झाला होता. उद्यांपासून हें बीजन बंद होणार म्हणून बीजनाचें काम त्या दिवशीं फार जारीनें व शिताफीनें चाललें होतें. घरांत शिरून कोनाकोपऱ्यांत अंधारांत लपलेलीं माणसें शोधून मारीत होते. धर्मशाळाही शोधल्या. देवळाचे गाभारेही शोधून

प्रेतांनीं भरून काढले. कोष्टीपुऱ्यांत अति प्राणनाश झाला, त्यांत बिचाऱ्या कांहीं बायकाही मारल्या गेल्या होत्या.''

गोडशेभटजींनीं झांशी येथील लुटीचें फारच बहारीचें वर्णन केलें आहे. प्रथम तीन दिवसपर्यंत इंग्रज शिपायांनीं सोनें व जडजवाहीर मनमुराद लुटलें. त्यानंतर मद्रासी शिपायांना गांवांतील तांब्यापितळेचीं भांडीं लुटण्याची परवानगी देण्यांत आली. त्यांच्या लुटींत साहजिकच पितळी देव्हारे व देवांच्या धातुमय मूर्ति यांचा समावेश झाला. मद्रासी शिपायांची पाळी झाल्यावर, हैदराबाद-वाल्यांचे शिपाई शहरांत लूट करण्यास शिरले, ते वस्त्रांची लूट करीत चालले. घरांत शिरून जेवढें वस्त्र म्हणून मिळेल, मग तें फाटकें धोतर असो किंवा पितांबर असो, तेवढें घेत चालले. चिरगुटें, पांघरुणें, सतरंज्या, गाद्या, बैठकी, जाजमें वगैरे सर्व भरून नेऊं लागले. ह्यानंतर इंग्रजांच्या इतर काळ्या शिपायांनीं धान्याची लूट चालविली. याप्रमाणें सात दिवस झांशीची लूट झाल्यावर आठवा दिवस उजाडतांच, इंग्रज कंपनी सरकारनें, 'खुल्क खुदाका मुल्क बादशहाका अंमल इंग्रज सरकारका,' अशी दवंडी पिटवून सर्व लोकांस निर्भय केलें. *

म्यालीसनच्या मताप्रमाणें फक्त पांच हजार देशी लोकांची झांशी येथें कत्तल उडाली. इतर देशी ग्रंथकारांच्या व तात्कालीन झांशीनिवासी लोकांच्या मतें झांशी येथें झालेल्या बीजनमध्यें २० हजार लोक ठार झाले. लूट किती झाली याची गणतीच करणें शक्य नाहीं. परंतु क्रोधाचा पहिला सपाटा ओसरल्यावर इंग्रजांनीं सर्वत्र स्थीरस्थावर केलें, शहरांत लागलेल्या किंवा लावलेल्या आगी विझवल्या, प्रेतांना अग्निसंस्कार दिला, व शहराची सफाई केली. झांशी येथें इंग्रजी अंमल पूर्ववत् सुरू झाला. राणीचे जे सरदार, किंवा इतर बंडवाले बुंदेले ठाकूर इंग्रजांच्या हातीं मधून मधून लागत, त्यांना राजवाड्या समोर फांशीं देण्यांत येत असे. राणीचे वडील मोरोपंत तांबे हे ४ तारखेला रात्रीं राणीबरो-

* [झांशी येथें झालेल्या लुटीची व बीजनाची, गोडशे भटजींनीं प्रत्यक्ष पाहून व अनुभवून त्या वेळीं लिहून ठेवलेली सविस्तर हकीगत, विद्वद्रत्न चिंतामणराव वैद्य यांच्या संशोधनानें उपलब्ध झाली आहे. ही वाचली म्हणजे दिल्ली, कानपूर व लखनौ येथील इंग्रजांनीं केलेल्या लुटीची व बीजनाची सहज कल्पना करतां येते. म्हणूनच ती ऐतिहासिक सत्याच्या सुदैवानें उपलब्ध झालेली हकीगत वर सविस्तर दिली आहे.]

बरच झांशीबाहेर पडले. परंतु उडालेल्या चकमकींत त्यांच्या मांडीवर वार झाला. त्यामुळें रक्तानें ते नाहून निघाले व त्यांना मजल मारवेना. शिवाय खजिन्याच्या हत्तीचें लटांबर त्यांच्याबरोबर होतें. तेव्हां त्यांनीं निरुपाय होऊन दतियाचा आश्रय घेतला. तेथील कारभारी मंडळींनीं फक्त त्यांना इंग्रजांच्या हवालीं केलें, व त्यांच्याबरोबरचें जडजवाहीर लुटून फस्त केलें. इंग्रजांनीं डोलींत घालून मोरोपंत तांब्यांना झांशी येथें आणलें व वाड्यासमोर नित्य नियमाप्रमाणें फांशी दिलें.

इकडे बाईसाहेब पुत्राला पाठीशीं बांधून सारखी मजल मारीत काल्पी येथें येऊन पोहोंचल्या. बाईसाहेब घोड्यावर बसण्यांत फार खंबीर असल्यामुळें इंग्रज सैन्याला चुकवून त्यांना काल्पीस पोहोंचतां आलें. अंगांत सर्व पुरुषी पोषाख, व जवळ धडोतीचें एक लुगडेंही नाहीं अशा विपत्तींत त्या होत्या. परंतु त्यांच्या येण्याची खबर लागतांच रावसाहेब पेशव्यांनीं त्यांचा यथायोग्य आदरसत्कार केला व पंधरा माणसांचा सरंजाम त्यांच्याकडे लावून दिला. त्यांच्या शौर्याची सर्वांनीं प्रशंसा केली व झालेल्या पराभवाबद्दल त्यांचें सांतवन केलें. परंतु बाईसाहेबांना फौजेचें आधिपत्य मात्र देण्यांत आलें नाहीं. कारण तात्या टोपीला स्वतांच्या शौर्याची घमेंड होती. एक लहानशी तुकडीच काय ती त्यांच्या स्वाधीन करण्यांत आली. झांशीचा बचाव सतरा दिवसपर्यंत निकरानें करणाऱ्या या वीर नारीकडे अधिक सैन्य त्या वेळीं सोंपविलें गेलें असतें, तर बरें झालें असतें.

झांशी सर केल्यानंतर व तेथें स्थीरस्थावर झाल्यावर सर ह्यू रोझनें काल्पीवर आपला मोर्चा वळविला. तात्या टोपीही युद्धासाठीं तयार होऊन पुढें सरकला. कुंच येथें दोन्ही सैन्यांची गांठ पडली, परंतु बंडवाल्यांचा पराभव होऊन त्यांना मागें हटावें लागलें. इंग्रजांचा तोफखाना जय्यत होता, व त्यांची हिंमत अचाट होती. उलट बंडवाल्यांचें धैर्य ( Morale ) विगलित झालें होतें. परंतु पराजय झाल्यावर तात्या टोपीनें आपल्या सैन्याची इतक्या व्यवस्थित रीतीनें व कुशलतेनें पीछेहाट चालविली कीं, इंग्रज सेनापती देखील चकित झाले. एका पलटणीनें शत्रूला तोंड देऊन गोळीबार करावा, व त्या आश्रयानें दुसऱ्या तुकडीनें मागें हटावें. नंतर मागें हटलेल्या तुकडीनें तोंड फिरवून शत्रूंवर गोळ्या झाडाव्या व पहिल्या पलटणीला मागें हटण्याची संधी द्यावी. याप्रमाणें बंडवाल्यांनीं व्यवस्थित माघार घेतली.

कुंचच्या लढाईनंतर काल्पीपासून सहा मैल अंतरावर असलेल्या गलौली येथें सर ह्यू रोजनें बंडवाल्यांना पुन्हा गांठलें. बांद्याचा नबाब दोन हजार फौजेनिशीं येथें तात्याला येऊन मिळाला होता. या लढाईंत राणीनें विलक्षण पराक्रम गाजविला. ती आपल्या स्वारांसह इंग्रज सैन्यावर मोठ्या धडाडीनें तुटून पडली व त्यांच्या तोफांवर चाल करून गेली. तिचा तो झंझावातासारखा आघात इंग्रज फौजेला सहन न होऊन ते मागें हटले. राणी गोलंदाज कापून इंग्रजांच्या तोफा हिरावून घेणार, तोंच एक उंटावरील तुकडी इंग्रजी फौजेच्या साहाय्यास आली. त्यामुळें इंग्रजांचा त्या दिवशीं पराभव टळला. एका इंग्रज अधिकाऱ्यानें म्यालेसनला सांगितलें कीं, त्या दिवसापासून उंट हा प्राणी मला फार आवडूं लागला. लवकरच इंग्रजी सैन्यानें काल्पीवर चढाई करून तें शहर आपल्या ताब्यांत घेतलें.

राणीच्या कर्तबगारीची व रणपटुत्वाची तात्या टोपी व रावसाहेब पेशवे यांना आतां ओळख पटल्यामुळें, ते तिच्या तंत्रानें चालण्यास सज्ज झाले. तात्या टोपीच्या फौजेचा लागोपाठ तीन चार लढायांत जरी पराभव झाला होता तरी ती फौज नष्ट झाली नव्हती. तात्या टोपीच्या कौशल्यानें तिची पांगापांग झाली नाहीं. राणीनें सुचविलें कीं 'एखाद्या मजबूत किल्ल्याच्या आश्रयास आपण गेल्याशिवाय आपला निभाव लागणार नाहीं. तेव्हां काल्पीच्या आसपास धावपळ करण्यापेक्षां ग्वाल्हेरीस जावें हें उत्तम. कारण तेथें मुरारचा किल्ला फार मजबूत आहे. शिवाय खुद्द पेशवे जातीनें तेथें गेल्यास त्यांच्या विरुद्ध लढाई देण्याचें साहस शिंद्याकडून होणार नाहीं. ग्वाल्हेरीहून मग आपणांस होळकर व पवार यांचें साहाय्य मागतां येईल, आणि दक्षिणेंतही उठवळ करतां येईल. पेशवाईसाठीं महाराष्ट्रांतून खास कुमक मिळेल, व दक्षिण देश आपला पाठपुरावा करील.' राणीचा सल्ला सर्वांना मानवला, व पेशवे आपल्या सरंजामासह ग्वाल्हेरकडे वळले. त्या वेळीं ग्वाल्हेरचे महाराज जयाजीराव शिंदे अल्पवयी होते, व राज्याचीं सूत्रें मुख्य प्रधान दिनकरराव राजवाडे यांच्या हातीं होतीं. त्यांच्या सल्ल्यानें पेशव्यांना विरोध करण्याचें शिंद्यांनीं ठरविलें. शिंद्यांची खास फौज मोठी नामांकित होती. सहा हजार पायदळ, दीड हजार घोडेस्वार व आठ तोफा घेऊन त्यांनीं मुरारपासून दोन मैलांवर तळ देऊन पेशव्यांशीं लढाई दिली. शिंद्यांच्या बऱ्याच पलटणी फितुर होऊन त्यांनीं पेशव्यांविरुद्ध लढण्याचें नाकारलें. शिंद्यांच्या हुजरातीच्या पथकानें मात्र पेशव्यांवर जोराचा मारा केला. परंतु राणीचे घोडेस्वार

शिंद्यांवर चालून गेले व गोलंदाज मारून त्यांनीं शिंद्यांच्या तोफा आपल्या कबजांत घेतल्या. राणीच्या स्वारांची व शिंद्यांच्या खास पथकाची चांगलीच हातघाईची लढाई जुंपली. शिंद्यांचा पराभव झाला, व ते व त्यांचे मंत्री राजवाडे आग्रा येथें इंग्रजांकडे निघून गेले. ग्वालेर शहर व मुरारचा किल्ला याप्रमाणें ३१ मे १८५८ रोजीं पेशव्यांच्या हातीं आला, व राणीची योजना सफल झाली. राणीचें शौर्य, कल्पनाचातुर्य व धडाडीच पेशव्यांच्या कामीं आली, आणि त्यांना हें अपूर्व यश लाभलें. बंडवाल्यांना नवा उत्साह चढला. कारण ग्वालेरचा खजिना व भरपूर युद्धसामग्री त्यांच्या पदरीं पडली. त्यांना नव्या फौजेची कुमक मिळाली व आपलीं पुढलीं सूत्रें हालविण्याला एक हक्काचें ठिकाण झालें.

परंतु पेशव्यांनीं या विजयाचा घ्यावा तसा फायदा घेतला नाहीं. त्यांनीं आपणाला ग्वालेर येथें राज्याभिषेक तर करून घेतला, व त्याप्रीत्यर्थ ब्राह्मण-भोजनें व शांत्या सुरू झाल्या. जिकडे तिकडे जलसे सुरू झाले. राणीनें फौजेची तयारी करण्याविषयीं अनेकवार त्यांना विनविलें, परंतु तिच्याकडे कोणींही लक्ष दिलें नाहीं. इंग्रज काल्पीस स्वस्थ बसणें शक्यच नव्हतें. कारण ग्वालेर बंडवाल्यांच्या हातीं अधिक दिवस राहिलें असतें, तर बंडाच्या ज्वाला मध्य व दक्षिण हिंदुस्थानांत पुन्हा भडकण्याचा संभव होता. इंग्रजी फौज ग्वालेरवर येऊन थडकली. जयाजीराव शिंदे इंग्रजी फौजेबरोबर होते. त्यांनीं अचानक हल्ला करून तात्या टोपीचा पराभव केला व मुरारचा किल्ला परत आपल्या ताब्यांत घेतला. रावसाहेब पेशवे आतां सावध झाले व ३१ मेच्या विजयाची धुंदी त्यांच्या डोळ्यांवरून उतरली. त्यांनीं आपली सर्व फौज एकत्र करून इंग्रजी फौजेशीं सामना दिला. शिंद्यांच्या पलटणी तोंपर्यंत बंडखोरांच्या बाजूस होत्या खऱ्या, परंतु त्यांनीं इंग्रजी फौजेच्या आघाडीस आपले छोटे मालक जयाजीराव शिंदे पाहतांच, मालकाविरुद्ध हत्यार उचलण्याचें नाकारलें. त्यामुळें पेशव्यांची बाजूच खचली, तरी पण राणीनें अतिशय निकराची लढाई दिली. ही मातब्बर लढाई तारीख १८ जून रोजीं झाली. बंडवाल्यांचा पराभव झाला तशी त्यांची पळापळ सुरू झाली. राणी घोड्यावर बसून पुरुषवेशांत लढतच होती. तिला अनेक जखमा लागल्या. तोंडावर तलवारीची व छातींत संगीनीची अशा दोन जबर जखमा लागून, ती घोड्यावरून खालीं पडतोंपर्यंत सारखी लढून शत्रूंना आपल्या तलवारीचें पाणी पाजीत होती. अनेक गोऱ्या शिपायांना तिनें त्या शेवटच्या महायुद्धांत कंठस्नान घातलें, व शेवटीं आपले प्राणही धारातीर्थीं

विसर्जन केले. तिच्या विश्वासू अनुचरांनीं तिचें प्रेत रणांगणांतून उचलून नेऊन त्याला रीतीप्रमाणें अग्निसंस्कार दिला, व तिची शेवटची इच्छा म्हणून तिच्या पुत्राचें इंग्रजांच्या क्रोधापासून, रानावनांत लपून छपून बंडाचा वणवा शांत होईतोंपर्यंत रक्षण केलें.

राणीच्या शौर्याचें तिच्या शत्रूंनींही कौतुक केलें आहे. सर ह्यू रोझानें तर बंड-वाल्यांपैकीं राणीचीच सर्वांत अधिक प्रशंसा केली आहे. राणीनें झांशीचा सतरा दिवस बचाव केला, झांशी शहर शेवटीं इंग्रजांनीं सर केल्यानंतर तिनें त्यांच्या हातावर पाहतां पाहतां तुरी दिल्या, व शेवटीं रातोरात शत्रूची फळी फोडून ती पसार झाली. ग्वालेर हस्तगत करण्याची युक्ती व धाडस, तिची रणकुशलता व सेनानायकत्व व्यक्त करतात. के व म्यालीसन ह्या दोघांनींही, निदान **हिंदी लोकांच्या दृष्टीनें तरी राणी आपल्या धर्माकरितां व स्वराज्याकरितां लढली**, अशी इतिहास साक्ष देईल अशी स्पष्ट कबूली दिली आहे. तिचें राज्य खालसा करण्यांत अन्याय झाला, व पुढेंदेखील तिच्याशीं इंग्रजांची वर्तणूक खुनशीपणाची होती, अशी इंग्रज लेखकांनींच कबूली दिली आहे. लार्ड कर्झनसारख्या ऍंग्लोफोबीयानें पछाडलेल्या अरे-रावालादेखील तिच्याबद्दल प्रशंसोद्गार काढावे लागले. झांशी येथें झालेल्या इंग्रजां-च्या कत्तलींत तिचें अंग नव्हतें, ही गोष्ट तेथें प्रत्यक्ष हजर असलेल्या व कत्तलींतून सुदैवानें वाचलेल्या इंग्रजांच्या मुखानेंच परस्पर सिद्ध झाली आहे. तिच्या तेजस्वी स्वभावाला प्रजाहिततत्परतेची व दयाळुत्वाची जोड होती, हें दहा महिन्यांच्या अल्प कारकीर्दींत तिनें सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें. दत्तकपुत्राला तिनें भर बंडाळींत व युद्धाच्या दंगलींत पाठीशीं बांधून कसें सारखें संभाळलें, हें पाहिलें म्हणजे तिच्या पुत्रप्रेमाचें कौतुक वाटून अंगावर रोमांच उभे राहतात. आपलें गेलेलें राज्य परत मिळविण्याकरितां तिनें प्राप्त झालेल्या संधीचा उत्तम फायदा घेतला. प्रारंभीं जरी मुत्सद्दीपणाच्या धोरणानें तिनें इंग्रजांशीं जुळतें घेण्याचा प्रयत्न केला, तरी पेशव्यांवर आपत्ती येतांच व बंड अयशस्वी झालें असें स्पष्ट दिसून आल्यावर, तिनें पेशव्यांची बाजू उघडपणें स्वीकारून मृत्यु येईतोंपर्यंत त्यांचा पाठपुरावा केला. नानासाहेबांना ती भाऊ मानीत असे. तेव्हां त्यांच्या आपत्कालीं ती भगिनीप्रेमानें धावून गेली व आपलें मानलेलें नातें तिनें जगाला खरें करून दाखविलें. मृत्युसमयीं राणीचें वय केवळ २३ वर्षांचें होतें. या लहान वयांत हातीं तलवार धरून, सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितींत अचाट पराक्रम करणें व स्वधर्माकरितां आणि स्वराज्याकरितां धारातीर्थीं शयन करणें, ही गोष्ट

कसलेल्या वीरपुरुषाला देखील अत्यंत भूषणास्पद आहे! राणी ही एक अबला होती, परंतु वेळ येतांच ती विद्युल्लतेप्रमाणें हिंदुस्थानच्या इतिहासांत चमकून गेली. एक नाजुक, सडपातळ बांध्याची, केतकीप्रमाणें गौरवर्ण, नाकीडोळी नीटस, अशी अत्यंत सुंदर रमणी, तासचे तास घोड्यावरील मांड ढळूं न देतां हातांतील समशेरीनें शत्रूच्या रुधिराचा भूमातेला अभिषेक करतांना पाहून, तिच्या शिपायांना ती प्रत्यक्ष महिषासुर-मर्दिनी देवी अंबिका वाटली असल्यास त्यांत नवल नाहीं. तिच्या तेजानें व सौंदर्यानें तिचे शिपाई दिपून तिचे दास बनले असले व त्यांना विलक्षण आवेश चढून तिच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं अचाट पराक्रम केला असल्यास, त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं. ही स्वातंत्र्याची ज्योती, ही हिंदु रमणींची मूर्तिमंत वीरता, ही स्वधर्माची मूर्ती, ही स्वर्गीय तेजस्विता क्षणभर तळपली व अस्तास गेली! परंतु हिंदु धर्माचें मुख तिनें उज्वल केलें! महाराष्ट्र रमणींच्या कीर्तीत तिनें महत्वाची भर टाकली व स्वातंत्र्याकरितां महाराष्ट्र ललना अति लहान वयांत देखील प्राणांचें मोल सहज लीलेनें देऊं शकतात, हें तिनें जगाला दाखवून दिलें. बंड मोडलें, परंतु बंडाची स्मृती आजही नष्ट झाली नाहीं. बरें बंडाची स्मृती पुढेंमागें दुर्दैवानें नष्ट झाली, तरी राणीची स्मृती नष्ट होणें शक्य नाहीं. ती नांवाप्रमाणें महाराष्ट्राचीच नव्हे तर अखिल आर्यावर्ताची लक्ष्मी होती. ही स्वातंत्र्य-लक्ष्मी १८ जून १८५८ (जेष्ट शुद्ध ६) रोजीं अस्तास गेली.

हिंदुस्थानच्या इतिहासांत राणीचें नांव अजरामर राहील. कोणत्याही देशांतील प्रजाजनांनीं तिच्या नांवाचा जयघोष करून तिचें अहर्निश स्मरण करावें व तिच्या पुण्यप्रद स्फूर्तीनें स्वतांचा उद्धार करून घ्यावा, एवढी मोठी तिची योग्यता होती. जगांतील थोर रमणीरत्नांत राणीचा नंबर अवश्य लागेल. राणीची पुण्य-तिथी व राणीचें पुण्य-स्मरण हें मृतांना चैतन्य देईल व आळशांच्या अंगांत उत्साह उत्पन्न करील.

प्रकरण २६ वें

# बिहारचें कुंवरसिंह आणि अमरसिंह.



उत्तर हिंदुस्थानांत जिकडे तिकडे बंडाचा वणवा भडकला असतां बिहार प्रांतही अगदींच स्वस्थ बसला नव्हता. तेथेंही वणव्याची आंच पोहोंचली होती. असंतुष्टतेमुळें प्रतिकाराची खुमखुमी मनांत असूनही, योग्य प्रसंगाच्या अभावीं सुप्तावस्थेंत असलेला द्वेषाग्नि, ही आंच मिळतांच पेट घेऊं लागला. अग्नीला फुंकर घालण्याचें पाप तेवढें, त्या वेळचे पटन्याचे कमिशनर टेलरसाहेब यांचे माथीं आलें. तें असें.

ईस्ट इंडिया कंपनी म्हणजे बोलून चालून बनिया कंपनी. तिची दृष्टि साहजिकच पैशावर होती. न्याय अन्याय, दया माया, सारासार विचार या सर्व गोष्टी कंपनीनें पैशाखालीं दडविल्या होत्या. मोंगल बादशहाच्या वेळीं अवाढव्य जहागिरींच्या उत्पन्नावर मिजास मारणारे कित्येक सरदार व जहागीरदार होते. वर बादशाही खजिन्यांत थोडासा भरणा केला म्हणजे आपल्या जहागिरीपुरते हे स्वतंत्र असत. यांना कोणी हिशोब मागत नसे, व हे कोणाला कधीं हिशोब देत नसत. मोंगलांचें राज्य नष्ट झाल्यावर या ऐतखाऊंचा गांवगन्ना कंपनीच्या हातीं आला. एवढेंच नव्हे, तर सारावसूली वगैरे बाबतींत पूर्वी होत असलेली सुलतानशाही देखील मावळली; आणि उलट सारावसूली नेमक्या वेळीं पैन पै होऊं लागली. तेव्हां या ऐतखाऊ मिजासखोरांची तब्यत गरम झाली. त्यांना वाटे कीं हे कोण गोमाजी कापशे आमच्या चैनींत ढवळाढवळ करायला आले? पण असली लोडाशीं टेकून, हुक्याचे झुरके घेत केलेली कंपनीची टवाळी चालण्यासारखी नव्हती. कंपनी सरकारचे नोकर वेळच्यावेळीं सारा वसूल करूं लागले, आणि सरकारी देण्याची दिरंगाई व टाळाटाळ करणारांना कडक शिक्षा देऊं लागले. तेव्हां या लोकांचे डोळे उघडले. आतां त्यांना वाटूं लागलें कीं, हें प्रकरण ढिल्या कारभारी मोंगलाईपेक्षां जरा बिकट दिसतें. यांच्याशीं झुंजच खेळली पाहिजे, त्याशिवाय हे वठणीवर येणें कठिण. पण कंपनीशीं झुंज खेळणें म्हणजे थट्टा नव्हती. सामान्य जनसमूहाला व अज्ञानी शेतकऱ्यांना, बादशाही ऐवजीं कंपनीचें राज्य झालेलें पाहून विशेष कांहींच वाटलें नाहीं. कारण त्यांनीं अशा कित्येक राज्यांची उलथापालथ झालेली

पाहिली होती. त्यांचीं कामें पूर्वीप्रमाणेंच सुरळीत चालली होतीं. त्यांना 'कोउ नृप होउ हमै का हानि' असें वाटत होतें. त्यांचें कांहींच नफा नुकसान त्यामुळें होत नव्हतें. कसून मेहेनत करावी व जमीन देईल तें पोटाला खावें, हा त्यांचा नित्याचा क्रम चालू होताच. ते मोंगलाईंतही कधीं श्रीमंत झाले नाहींत, व आतांही त्यांचें दारिद्र्य गेलें नाहीं. त्यांच्या नशिबाच्या पळसाला पूर्वीप्रमाणें तीनच पानें होतीं. नुकसान झालें तें जहागिरदारांचें! कारण पूर्वी बादशहाला किंवा नबाबाला ठरलेला खंड भरला व आल्या गेल्या अधिकाऱ्याला थोडा बहुत नजराणा दिला, म्हणजे आपल्या जहागिरीपुरते ते पूर्ण स्वतंत्र राजे असत. दिवाणी फौजदारी सर्व अधिकार तेच बळकावून बसले होते. त्यांची ती मिरासदारी कंपनीच्या अमलांत कमी झाली. उलट कंपनीचें राज्य झाल्यापासून थोड्या फार प्रमाणांत अंदाधुंदी आणि बेबंदशाही कमी झालेली होती. यामुळें असंतुष्ट जहागिरदार किंवा सरदार लोकांना जनतेचा पाठिंबा नव्हता. परंतु हे सरदार, जहागीरदार पदरीं थोडें फार सैन्य बाळगून असल्यामुळें, कोणी त्यांच्या वाटेस जात नसत. त्यांच्यापासून शेतकऱ्यांना थोडाबहुत त्रास झाला तरी ते बिचारे तो निमूटपणें सोसत. कारण लहानमोठ्यांच्या कोणत्याही व कसल्याही सामन्यांत अखेर मातीचें मडकेंच फुटावयाचें. परंतु शेतकऱ्यावर ते कुरघोडी करीत असले तरी कंपनीपुढें गाय बनत. कारण, आपल्या सैन्याच्या जोरावर कांहीं भांडण करावें, तर एकतर कंपनीशीं सामना करण्याजोगें मोठें सैन्य कोणाजवळ नव्हतें, आणि कंपनीच्या सामन्यांत टिकाव धरण्याला लागणारी शिस्त, द्रव्यबळ आणि लष्करी शिक्षण हीं त्यांचेजवळ नव्हतीं. म्हणून निमूटपणें कंपनीचा उपमर्द त्यांना सहन करावा लागत होता. ते शेतकऱ्यांना लाथा मारीत, व कंपनी त्यांना लाथा मारीत असे. सत्तावन सालीं दिल्ली आग्र्याला शिपायांनीं बंड केलेलें ऐकून, बिहारमधले हे असंतुष्ट जहागीरदारही खडबडून जागे झाले. त्यांच्या भोंवतालच्या लाळघोट्या तमासगिरांनींही त्यांना उत्तेजन दिलें, व बंडास त्यांना प्रवृत्त केलें.

त्या वेळीं अशी एकंदर परिस्थिति होती. या क्षुब्ध वातावरणाची जाणीव कंपनीच्या नोकरांनाही होतीच. बिहारच्या कमिशनरानें देखील वातावरणांतला हा फरक ओळखून वेळींच सावधगिरी घेतली. त्यानें संशयित लोकांचीं हत्यारें हिसकून घेतलीं, आणि वहिमी लोकांच्या पुढाऱ्यांना अटकेंत ठेविलें. या पुढाऱ्यांपैकीं जे विशेष धाडशी व अपायकारक वाटले, त्यांना अधिकाऱ्यांनीं बेधडक फांशीं

दिलें. पण याच कारणांमुळें दुसरे कित्येक लोक सावध झाले. या सावध झालेल्या जमीनदारांपैकींच जगदीशपुरचा जहागिरदार कुंवरसिंह हा होता.

बिहार प्रांतांत आरा नांवाचें एक जिल्ह्याचें ठिकाण आहे. या आरा शहरापासून पश्चिमेच्या बाजूला सात कोसांवर जगदीशपुर नांवाची एक जहागीर होती. कुंवरसिंह हा तेथला जहागिरदार होता. जगदीशपुरास एक फार मजबूत असा किल्ला होता, आणि त्यांतच कुंवरसिंहाचा भव्य वाडा असे. कुंवरसिंह जातिवंत रजपूत होता. लहानपणापासून त्याला शिकारीचा आणि वीरोचित खेळांचा नाद असे. यामुळें त्यानें लिहिण्यावाचण्याकडे अगदींच दुर्लक्ष केलें. तरी युद्धकलेंत त्याचा हात धरील असा वीर त्या वेळीं बिहारमध्यें एकदेखील नव्हता. कुंवरसिंहाची छाप जिकडे तिकडे बसायचें मुख्य कारण हेंच. याकरितांच लोक कुंवरसिंहाला थर थर कांपू लागले. या कुंवरसिंहाचें सरकारदरबारींही बरेंच वजन असे.

याला आणखी तिघे भाऊ होते. यांचे वडील शाहजादासिंह मरतांना आपल्या मिळकतीची वांटणी करून गेले होते. या वाटणींत अर्थात मोठा भाग म्हणजे जहागिरीच्या तीन चतुर्थांश उत्पन्नाचा प्रदेश वडील मुलगा कुंवरसिंह याला मिळाला होता. उरलेल्या एक चतुर्थांशांत बाकीच्या तिघां भावांचे हिस्से होते. हे तिघे भाऊ दयाळसिंग, राजपतिसिंह आणि अमरसिंह आपापल्या हिश्शांची व्यवस्था स्वतंत्रपणें पहात असत. परंतु त्यांचा कारभार शिस्तवार आणि नीटनेटका नव्हता. तो बराचसा ढिलेपणाचा होता. यामुळें साहजिकच हे तिघे भाऊ कर्जबाजारी झाले. सावकारांनीं त्यांना त्यांच्या जहागिरीचा हिस्सा गहाण पडेपर्यंत कर्ज दिलें, आणि संधि सांपडतांच सर्व जहागीर घशाखालीं उतरविण्याचा डाव टाकला. सावकारांनीं कोर्टांत खटला भरल्यावर त्यांना डिक्री मिळाली. तेव्हां कुठें वडील बंधू कुंवरसिंहाचे डोळे उघडले. शेवटी त्यानें आपलें वजन खर्च करून, जहागिरीचें काम स्वतः पाहून बंधूंचें कर्ज फेडण्याचा मक्ता घेतला. परंतु कर्जाचे हप्ते वेळच्यावेळीं पटेनासे झाले, तेव्हां सरकारनें कुंवरसिंहाला नोटीस दिली कीं दोन महिन्यांत सर्व कर्ज फिटलें पाहिजे, नाहींतर जहागीर जप्त केली जाईल. याच सुमारास दंग्याची आग मीरत-कानपुराकडे भडकली होती. आणि कंपनीच्या या नोटिशीनें असंतुष्टतेच्या अग्नींत तेल ओतलें.

बिहारच्या कमिशनरनें प्रांतांतील असंतोष वाढतोसा दिसतांच, पुढाऱ्यांना अटकेंत ठेवण्याचा सपाटा चालविला हें मागें सांगितलेंच आहे. कुंवरसिंह हा

तेथील रजपुतांतला प्रमुख पुढारी व वजनदार जहागीरदार होता. त्याच्या धाड-सामुळें आणि शौर्याच्या जरबेमुळें लोक त्याचे अंकित झाले होते. लोक त्याला थरथर कांपत असत आणि तो म्हणेल तें करायला लोक नेहमीं तयार असत. कुंवरसिंह सरकारवर असंतुष्ट झाला होता, आणि या संधीचा फायदा घेऊन बंडखोरांस जाऊन मिळण्याचा त्यानें विचार केला. कारण त्यांत त्याचा फायदा होता. तो फायदा असा कीं, जप्त असलेली मोठी जहागीर त्याची त्याला परत मिळाली असती, आणि सावकारांच्या कर्जाच्या फेडीची भुणभुण त्याच्या मागची कायमची सुटणार होती. या गोष्टीची जाणीव कमिश्नर साहेबाला होतीच. यामुळें अधिकारीवर्गाला कुंवरसिंहाचा बराच संशय आला होता. म्हणून कमिश्नरनें त्याला अटकेंत ठेवण्याचा विचार केला. परंतु कुंवरसिंहाला उघडपणें अटक करणें धोक्याचें होतें. या करितां कमिश्नरनें त्याला भेटीचें बोलावणें पाठविलें. या बोलावण्याचा अर्थ काय, हें न समजण्या इतका कुंवरसिंह भोळा नव्हता. याच सुमाराला इतर कित्येक पुढाऱ्यांना कमिश्नरानें भेटीसाठीं बोलावून नेऊन अटकेंत ठेविलें आणि दुसऱ्या कित्येकांना बंडांत सामील असल्याच्या आरोपावरून फाशीं दिलें. या गोष्टीची जाणीव त्याला होती, म्हणून त्यानें आजारीपणाचें सोंग आणलें आणि कमिश्नरच्या भेटीला जाण्याचें टाळलें.

कुंवरसिंहाचे दोन प्रमुख आश्रित होते. एक रणदलनसिंह आणि दुसरा हरकिसनसिंह. हे दोघेही कुंवरसिंहाचे विश्वासू हस्तक होते. यांची मनापासून अशी इच्छा होती कीं कुंवरसिंहानें एकदम उघडपणें बंडखोरांना मिळावें. कारण दोन वर्षांपासून सर्व हिंदुस्थानभर ब्रह्मावर्त व लखनऊ येथील हस्तक फिरत होते, व असंतोषाच्या लुप्तप्राय ज्वाळा जेथें असतील त्यांचा ठाव ठिकाणा काढीत होते. संधी येतांच उघड बंड पुकारून वनिया कंपनीचा मोड करावा व आपलें गेलेलें वर्चस्व परत मिळवावें आणि हिंदुस्थानाचें नांव राखावें, असा गुप्तपणें ते ठिकठिकाणच्या असंतुष्ट लोकांना उपदेश करीत असत. त्या विषाचा परिणाम कुंवरसिंहाच्या हस्तकांवर झाला होता. कुंवरसिंहानें बंड करावें अशाबद्दल त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न ह्यापूर्वीही कित्येक वेळां झाला होता. परंतु कुंवरसिंह स्वतः कंपनी सरकारला भीत असल्यामुळें, असें वांकडें पाऊल टाकायला तो धजावला नाहीं. या हस्तकांना कमिश्नरच्या बोलावण्याच्या निमित्तानें उत्तम संधी मिळाली. या दोघांनींही कुंवरसिंहाचे मनांत असें भरवावयाचा प्रयत्न केला कीं, " तुम्ही एवढे स्वामिभक्त ! आजपर्यंत कंपनी सरकारचें हित

करण्याचा केवढा प्रयत्न तुम्ही केलात. तुरुंगांतल्या कैद्यांनीं संप केला, तेव्हां तुम्ही आपलें वजन खर्च करून तो संप मोडला आणि कैद्यांना शांत केलें. अशी किती तरी कामें तुम्ही सरकारच्या मदतीकरितां केलीं. पण या कंपनी सरकारला त्याचें कांहीं तरी महत्त्व वाटलें का? तुमच्या कामांबद्दल सरकारनें तुम्हाला कधीं शाबासकी दिली आहे का? बक्षीस देण्याच्या गोष्टी बाजूलाच राहिल्या, उलट तुमची जहागीर गडप करण्याचा सावकारांनीं डाव टाकला, त्या वेळीं सरकारनें तुमच्या विरुद्ध डिक्री दिली. इतकेंही करून सरकार थांबलें नाहीं. त्यानें उलट तुम्हालाच गोत्यांत आणण्याचा प्रयत्न केला. सावकारांचें कर्ज फेडण्याची तुम्ही स्वतः हमी घेतली होतीना? पण सरकारला कोठें तुमचा विश्वास होता? त्यांनीं कर्ज-फेडीची नोटीस तुम्हाला देऊन तुमची जहागीर जप्तींत काढली. आज बिहार प्रांतांत तुमचें लोकांत किती वजन आहे तें पहा. तुमच्या शब्दाला केवढा मान आहे, परंतु सरकारला त्याची मुळींच क्षिति वाटत नाहीं. साऱ्या हिंदु-स्थानांतले लोक सरकारविरुद्ध बंड करीत आहेत. तुम्ही मात्र राजभक्तीमुळें आजपर्यंत येथें कोणत्याही प्रकारची गडबड होऊं दिली नाहीं. परंतु या सर्व गोष्टी विसरून हें सरकार तुमचाच संशय घेतें. तें तुम्हाला बंडखोरांचा नायक समजतें आणि तुम्हाला भेटीला बोलावून, फसवून अटक करण्याचा कट करितें. धिक्कार असो या सरकारला आणि धिक्कार असो तुमच्या राजनिष्ठेला! महाराज, हें सरकार मोठें दगाबाज आहे बरें? हें तुम्हाला नुसती अटक करूनच स्वस्थ बसणार नाहीं, तर तुम्हाला फांसावर देखील लटकावील! हें सरकार तुम्हाला अतःपर कधींही मोकळें सोडणार नाहीं. आज तुम्हीं कमिश्नरला भेटण्याची टाळाटाळ केली आणि 'अशुभस्य कालहरण' केलें, हें योग्यच झालें. पण एवढयानें तुमचें संकट सौम्य झालें किंवा टळलें असें नसून उलट तें अधिकच तीव्र झालें आहे. या म्हातारपणांत तुमच्यावर सरकारचा अविश्वास झाला आहे. तुम्हाला अटक करायला बोलावणें हा तुमचा उपमर्द आहे. हा तुमचा उघड उघड अप-मान आहे. हा अपमान तुम्ही सहन करणार काय? तुमच्यासारख्या बाणेदार माणसाचा अपमान करणें म्हणजे सापाच्या शेपटीवर प्रहार करणें आहे, याची जाणीव कंपनीसरकारला आपण करून दिली पाहिजे. पण हें सरकार तुमचा नुसता अपमान करून व तुम्हाला कैदेंत टाकून स्वस्थ बसणार नाहीं, तर तुम्हाला फांसावर चढवून अति निंद्यपणें ठार मारणार आहे. हें तुमचें मर' कांहीं केल्या टळत नाहींच. मग कांहीं आपलें भलें तरी करून

व आपल्या स्वाभिमानाला आणि धर्माला जागा. सर्व लोक कंपनीविरुद्ध धर्मासाठीं उठले असतांना, तुम्ही कंपनीला साहाय्य करणार कीं काय ? ' या व असल्या कित्येक गोष्टी सांगून रणदलनसिंहानें कुंवरसिंहाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. या वेळीं मात्र त्याला यश आलें. कुंवरसिंहाला यांपैकीं बऱ्याचशा गोष्टी पटल्या आणि त्याला वाटलें कीं, अशानें झालें तर आपलें हितच होईल. याप्रमाणें कुंवरसिंहाचें मन वळवून त्याच क्षणीं त्याच्याकडून बंडवाल्यांना मिळण्याची त्यांनीं संमति मिळविली. लोखंड तापलेलें आहे तोंपर्यंत घण मारण्याची ही संधी हरकिसनसिंहानें दवडली नाहीं. पडत्या फळाची आज्ञा घेऊन तो पाटणा नजीकच्या दानापुर छावणीकडे रवाना झाला. येथें फौजेंतील अधिकारी हिंदुस्थानी शिपायांबद्दल साशंक झालेले होतेच. अधिकाऱ्यांच्या हातून शिपायांच्या बाबतींत प्रसंगविशेषीं घडलेल्या क्षुल्लक चुकांना भयंकर अविश्वासाचें अवडंबर देऊन, हरकिसनसिंहानें शिपायांचीं मनें बंडासाठीं तयार केलीं. त्यानें स्पष्टच सांगितलें कीं, तुम्हाला बोलावून आणण्याकरितां जगदीशपुरच्या कुंवरसिंहानींच माझी नेमणूक केली आहे. आपण कोणत्याही रीतीनें संशयास्पद वर्तन केलें नसतां, अधिकारी आपल्यावर विश्वास ठेवीत नाहींत, आणि लवकरच ते आपल्याला निःशस्त्र करून देशोधडीला लावणार, अशी त्यानें शिपायांची येन केन प्रकारेण खात्री करून दिल्यामुळें, सैनिक एकाएकीं शस्त्रास्त्रें घेऊन छावणीच्या बाहेर पडले. अधिकाऱ्यांना हें काय गौडबंगाल झालें, हें प्रथम कळेना. ही बंडाळी पाहून क्षणभर ते आश्चर्यचकित झाले, व आपलें कर्तव्यकर्म विसरले. परंतु हा भर ओसरून सैनिकांना अडवून धरण्याचा प्रयत्न ते करीपर्यंत सैनिक आऱ्याच्या रस्त्याला देखील लागले. आऱ्याला येऊन पोहोंचतांच कुंवरसिंह घोड्यावर बसून त्यांना सामोरा गेला, आणि सर्व सैनिकांनीं मिळून मोठ्यानें कुंवरसिंहाच्या नांवाचा जयजयकार केला. या जयध्वनीनें त्यांनीं कुंवरसिंहाला आपला नायक नेमल्याची खूण पटविली आणि पावित्र्यांत उभे राहून त्याला सैनिकी सलाम ठोकला. कुंवरसिंहाचा भाऊ अमरसिंहही त्याला येऊन मिळाला, आणि अशा रीतीनें बिहार प्रांतानें बंडाचें निशाण उभारलें.

आऱ्याला ही गडबड सुरू होतांच इंग्रजांनीं आपल्या बायकामुलांना दानापुरास पाठविलें. शहरांत बंदोबस्ताकरितां पाटण्याहून शीख शिपायांना बोलावून घेतलें आणि आऱ्याच्या सरकारी खजिन्यांतील पांच लक्ष रुपयांची रोकड पाटण्याला पोहोंचविली. तसेंच बंडखोरांनीं हल्ला केलाच, तर निवाऱ्याची व बंदोबस्ताची

एखादी जागा असावी, म्हणून त्यांनीं एक मजबूत कोट असलेलें घर बांधिलें. या घराचा पुढें त्यांना फार उपयोग झाला. घर तयार होतांच तेथें रसदीचा व बारुदगोळयाचा सांठा करून सर्व इंग्रज त्या घरांत तळ देऊन राहिले.

२७ जुलई रोजीं दानापूरच्या सैनिकांनीं आरा येथील तुरुंगावर हल्ला केला आणि तुरुंग जमीनदोस्त करून तेथील सर्व कैद्यांना मुक्त केलें. सरकारी खजिना लुटला आणि त्यांनीं बरेचसे सरकारी कागदपत्र अग्निनारायणाच्या हवालीं केले.

इतकें झाल्यानंतर या लोकांनीं आपला मोर्चा इंग्रजांच्या आश्रयस्थानाकडे वळविला. तेथें यावेळीं १६ इंग्रज आणि ५० शीख एवढेच लोक होते. वास्तविक एवढयाशा लोकांचा पराजय करणें बंडखोरांना मुळींच कठिण नव्हतें. परंतु त्यांचेजवळ योग्य शस्त्रास्त्रांचा अभाव होता. त्यामुळें आश्रयस्थानांतल्या मूठभर लोकांना जेरीस आणणें त्यांना जड गेलें. इकडे या घरांत असलेले इंग्रज आणि शीख भिंतींतल्या झरोक्यांतून गोळया झाडीत आणि याप्रमाणें थोडेफार बंडखोर दररोज मरत. बंडखोरांनीं कोटाच्या भिंतीजवळ लांकूडफाटा जमवून त्याला आग लावून दिली. उद्देश असा कीं, त्याचा धूर घरांत जावा आणि आंतील लोकांना धुरानें गुदमरण्याची वेळ यावी. परंतु इंग्रजांच्या सुदैवानें उलट वारा सुरू झाल्यामुळें बंडखोरांची विद्या त्यांना स्वतःलाच फळली. तेव्हां त्यांनीं मिरच्यांचीं पोतीं तेथें जाळलीं आणि मेलेल्या घोड्यांची रास घराशेजारीं रचून ठेविली. इतके सगळे बरेवाईट प्रकार केले, परंतु एकदेखील सफल झाला नाहीं. सर्व प्रयत्न फुकट गेले. यावेळीं बंडखोरांनीं मोठी चिकाटी दाखविली व वेढयाचें कार्य नेटानें चालविलें. शेवटीं त्या घरांत बंद असलेल्या लोकांना एक मोठी अडचण आली. त्यांचे जवळचें पिण्याचें पाणी संपलें, आणि तहानेनें व्याकूळ झाले. शीख शिपायांनीं देखील इंग्रजांइतकेंच धैर्य आणि चिकाटी दाखविली. पाणी संपत आलेलें पाहून त्यांनीं त्या घरांतच विहीर खणण्यास सुरवात केली आणि एक दिवस आणि रात्रींत मिळून १८ फूट खोल विहीर खणली. इतकें खणल्यावर आंत पाणी लागलें. याप्रमाणें हा वेढा सात दिवसपर्यंत चालला. परंतु आंतील लोक बंडवाल्यांच्या हातीं लागले नाहींत. आयरनें येऊन त्यांची सुटका करी तोंपर्यंत, त्यांनीं स्वतांचें अशा संकटांत व विषम परिस्थितींत संरक्षण केलें. या मुदतींत बाहेरील इंग्रजांनीं आंत दोनदां मदत पोहोंचविण्याचा प्रयत्न केला. एकदां ४०० इंग्रज शिपायांची एक टोळी डनवरनें आणली. ही कुमक रात्रीच्या

वेळीं आली. परंतु त्यांची चाहूल लागतांच बंडवाल्यांनीं गोळीबार सुरू केला. कॅ. डनवरला गोळी लागली आणि तो पडला. तेव्हां बाकीचे लोक घाबरून वाट सांपडेल तिकडे पळत सुटले. त्यांचा बंडवाल्यांनीं निकरानें पाठलाग केला. कांहीं जण जवळच्या कालव्यांत बोटी सोडून गंगा नदींतून जावयाच्या इरायानें निघाले. परंतु अंधारांत वाट चुकून ते बंडवाल्यांच्या तडाक्यांत सांपडले. बंडवाल्यांनीं त्यांपैकीं कांहीं नावांना आगी लावल्या, कांहीं बुडविल्या, आणि कांहीं फोडून तोडून टाकिल्या. शेवटीं या ४०० शिपायांपैकीं फक्त ५० लोक कायते परत दानापुरला जाऊन पोहोंचले. तेव्हां तेथें फारच मोठा हाहाःकार उडाला.

याच सुमारास विन्सेन्ट आयरसाहेब आपला तोफखाना घेऊन कलकत्त्याहून अलाहाबादेस बंडवाल्यांवर चालून जात होता. जातांना त्यानें दानापुरास वाटेंत मुक्काम केला. तेव्हां त्याला तेथील दुर्घटना कळली. लागलीच आपला तोफखाना आणि दुसरे कित्येक लोक मदतीस घेऊन तो आऱ्याला जावयास निघाला. तो २६ जुलई रोजीं दानापुराहून निघाला. बक्सरवरून आऱ्याला जावयाचा त्याचा विचार होता, त्याप्रमाणें ता. ३० जुलईला तो बक्सरहून पुढें रवाना झाला.

इकडे आऱ्यांत कुंवरसिंह विजयी झाला. त्यानें शहरांत लुटालूट व जाळपोळ मात्र कांहीं होऊं दिली नाहीं. शहर त्याच्या हातीं लागलें, परंतु इंग्रजांचा लहानसा किल्लेकोट त्याच्या हातीं लागला नाहीं. इंग्रजांच्या पदरीं नोकरीस असलेले कांहीं बंगाली लोक कुंवरसिंहाच्या लोकांनीं कैद केले होते. पण कुंवरसिंहानें त्या सर्वांना पाटण्याला पाठवून दिलें. विन्सेन्ट आयर आऱ्याकडे येत आहे, ही बातमी कळतांच कुंवरसिंहानें त्याला वाटेंतच अडवावयाचा बेत ठरविला, आणि त्याप्रमाणें गजराजगंज नांवाच्या गांवीं त्याच्या फौजेनें तळ दिला. आयरसाहेब तेथें येतांच युद्ध सुरू झालें. पावसाळ्याचे दिवस होते. गोऱ्या सैन्याला पावसापाण्यांतून व चिखलांतून रस्ता काढावा लागला होता; यामुळें त्यांचे फार हाल झाले होते. तरी देखील शत्रू दिसतांच ते त्वेषानें त्यांच्यावर तुटून पडले. त्यांच्या तोफांच्या माऱ्यापुढें शत्रूंचें कांहींच चालेना. तेव्हां बंडवाल्यांना मागें हटावें लागलें. मागें हटत असतां बंडखोरांनीं रस्त्यांत लागणाऱ्या नदीचा पूल पाडून टाकला, यामुळें इंग्रजी फौजेला त्यांचा पाठलाग करीत नदीच्या पलीकडे जातां येईना. शेवटीं आयरसाहेबानें आपले लोक रेलवेच्या बांधावरून नेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें इंग्रज शिपाई रेलवेनें जाऊं लागतांच, कुंवरसिंहानें आपल्या लोकांना एका झाडीच्या

आड लपविलें आणि तेथून इंग्रजांवर चोरटा मारा सुरू केला. या गोळीबारामुळें इंग्रजांना पुढें चाल करून जाणें अशक्य झालें.

या लहानशा विजयामुळें बंडखोर शेफारून गेले; आणि ते इंग्रजी फौजे-जवळ येऊन तोफखाना काबीज करण्याचा प्रयत्न करूं लागले. या वेळीं युद्ध अगदीं हातघाईवर आलें. बराच वेळ संगिनींचें युद्ध झाल्यावर बंडखोरांचे कित्येक लोक जायबंदी झाले, कित्येक ठार झाले आणि बरेचसे कैद झाले. शिल्लक राहि-लेले लोक पळून गेले. कारण युद्धाला नेटानें तोंड देण्याची शिस्त बंडखोरांत नव्हती. शत्रूचा जोराचा हल्ला होतांच ते भयभीत होत व मागें हटत. शत्रू दुर्बल दिसला तरच त्यांना जोर चढे. अशा स्थितींत युद्धाचा निकाल ठरलेलाच होता. याप्रमाणें आयरसाहेब विजयी होऊन आगस्टच्या ३ तारखेला आऱ्याला पोहोंचला, व त्यानें तेथील शूर शिपायांची सुटका केली. आरा येथें हा पराजय झाल्यावर कुंवरसिंह जगदीशपुराला पळून गेला. आऱ्याला सांपडलेल्या सर्व बंडखोर कैद्यांना फांशीची शिक्षा देण्यांत आली. आयरसाहेबानें आऱ्याला राहणाऱ्या सर्व लोकांना निःशस्त्र केलें. सुमारें एक आठवडा आऱ्यांत शांतता प्रस्थापित करण्यास त्याला लागला. त्यानंतर आयरसाहेब जगदीशपूरच्या वाटेला लागला.

आयरसाहेब जगदीशपुरावर चाल करून येणार ही जाणीव कुंवरसिंहाला होतीच. म्हणून त्यानें वाटेंतच साहेबाला अडविण्याकरितां जागोजागीं टोळ्या पसरल्या होत्या. परंतु त्याचे वाटेंतील अडवणुकीचे सर्व उपाय फुकट जाऊन साहेब जगदीशपूरला पोहोंचला. साहेब जवळ आलेला पाहतांच कुंवरसिंह गांव सोडून चालता झाला. साहेबाचा कुंवरसिंहाला पकडण्याचा बेत फुकट गेला. तरी त्यानें गांवावर चांगलाच सूड उगविला. जगदीशपुरास असलेलीं धान्याचीं कोठारें फोडून सर्व धान्य त्यानें हस्तगत केलें, आणि नंतर कुंवरसिंहाचा सर्व वाडा जाळून पोळून साफ करून टाकिला. कुंवरसिंहाच्या भावांचीं घरेंही अशाच रीतीनें धुळीस मिळालीं. वाड्यांत सांपडलेली मालमत्ता लुटण्यांत आली.

याप्रमाणें जगदीशपूर आणि आरा हीं दोन्ही शहरें आपल्या ताब्यांत घेऊन, तसेंच बंडाचा पूर्ण सूड उगवून इंग्रज सैन्य दानापूरला परत आलें. परंतु कुंवरसिंह अजून जिवंत होता. तो ससरामच्या डोंगरांत लपून बसला होता. त्यानें आपल्या बायकापोरांना सासुरवाडीस पोहोंचविलें होतें. म्हणून त्यांच्याविषयीं त्याला मुळींच काळजी नव्हती. त्याचे सहचर रणदलनसिंह आणि हरकिसनसिंह हे दोघे त्याचे

बरोबरच होते. आतां पुढें काय करावयाचें ? या प्रश्नाचा विचार करण्याकरितां ससरामच्या डोंगरांत बंडवाल्यांची एक गुप्त सभा भरली. त्यावेळीं कुंवरसिंहाच्या डोळ्यांत आंसवें आलीं. तेव्हां त्याच्या मित्रांनीं त्याला विचारिलें, "महाराज, आपल्याला एवढें वाईट कसलें वाटत आहे ? युद्धांत आपला पराजय झाला याचें का आपल्याला वाईट वाटतें ? "

कुंवरसिंहानें उत्तर दिलें, "वीरहो, मला वाईट वाटतें तें या पराभवाबद्दल नव्हे. लढाईला उभें राहिल्यावर कधीं जय व कधीं पराजय व्हायचाच. परंतु ज्या उद्देशानें मी या बंडांत सामील झालों, तो उद्देश साध्य होईलसें दिसत नाहीं, म्हणून मला वाईट वाटतें. आज जर माझा मुलगा हयात असता तर मला निर्भय-पणें मृत्यूला तोंड देतां आलें असतें. कारण मग मला खात्री वाटली असती कीं, पूर्वजांनीं मिळविलेला जमीनजुमला त्यानें पुन्हा मिळविला असता. परंतु वंश-परंपरेनें चालत आलेलें वतन मीं गमाविलें आहे, याचें मला वाईट वाटतें. तुम्ही माझे जिवलग साथी खरे, माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे, तुमच्या शौर्या-नेंच टोपीवाल्यांना कित्येकदां रणांगण सोडून पळ काढावा लागला; परंतु आप-ल्याला ज्या शत्रूशीं लढावयाचें आहे, त्याच्या तोडीची युद्धकला तुम्हाआम्हांला अवगत नाहीं. आणि म्हणूनच आपल्याला वारंवार हार खावी लागत आहे. मी तर ८० वर्षांचा म्हातारा. मी आतां अधिक काय करूं शकणार ? "

यावेळीं अमरसिंह पुढें झाला आणि म्हणाला, " महाराज, मी आपला कनिष्ठ बंधु. मी आपल्याला पुत्राप्रमाणेंच आहें. आपणही मला वडिलांप्रमाणें पूज्य आहांत. आपण एवढी काळजी कां करितां ? या आजच्या सभेंत मी असा पण करितों कीं, आपण अंगिकारिलेलें कार्य तडीस नेईन तेव्हांच मी शस्त्र खालीं ठेवीन. आणि आपल्या आशीर्वादानें, तसेंच रणदलनसिंह व हरकिसनसिंह यांसारखे सिंहाचे छावे मदतीला असल्यानें मला खात्री आहे कीं, हें कार्य तडीस जाणारच. या दोघांसारखे मित्र मदतीला असल्यावर टोपीवाल्यांची काय कथा ? त्यांचा धुव्वा हां हां म्हणतां उडवीन. त्या चकमकींत आपल्याजवळ तोफा नव्हत्या. नाहींतर आयरसाहेबच काय पण प्रत्यक्ष गव्हर्नर जनरल आला असता, तरीदेखील त्याचें आपल्यापुढें कांहीं चाललें नसतें, इतकें शौर्य आपण दाखविलें. "

अमरसिंहाचें भाषण ऐकून म्हाताऱ्याचा कंठ सद्गदित झाला. त्यानें अमर-सिंहाला प्रेमानें आलिंगन देऊन शाबासकी दिली. त्याच सभेंत देशाच्या

निरनिराळ्या भागांतून सैन्य गोळा करण्याचा आणि टोपीवाल्यांच्या बरोबरीनें युद्धाची सामग्री जमविण्याचा बेत ठरला. तसेंच हें सैन्य गोळा झाल्यावर टोपीवाल्यांवर जोराचा हल्ला करण्याचेंही ठरलें. इतकें झाल्यानंतर सभा विसर्जन झाली आणि निरनिराळे लोक निरनिराळ्या भागांतून सैन्य आणि सामुग्री जमविण्याकरितां रवाना करण्यांत आले.

याच सुमारास इंग्रज सरकारनें अशी द्वाही फिरविली कीं, कुंवरसिंहाचें डोकें कापून आणणारास ५० हजारांचें इनाम मिळेल. यामुळें कुंवरसिंहाच्या दुर्दैवाची व अपयशाची करुण कहाणी दश दिशांना विदित झाली, परंतु त्याचा परिणाम मात्र अपेक्षेच्या अगदीं उलट झाला. कुंवरसिंहाला धरून देणें किंवा मारणें, यापेक्षां त्याला हरतऱ्हेनें मदत करण्याचेच अधिक प्रयत्न लोकांकडून झाले. कोणी त्याच्या सैन्यांत नोकरी धरली; कोणी त्याला रुपया पैसा पुरविला; कोणी त्याला दारुगोळा मिळवून देण्याचा गुप्त प्रयत्न केला. कित्येकांनीं अशी प्रत्यक्ष मदत केली, तर दुसऱ्या कित्येकांनीं, त्याचे हस्तक या कामगिरीवर गांवांत आले असतां त्यांचे विषयीं सरकारी अधिकाऱ्यांना बातमी पुरविली नाहीं, किंवा कुंवरसिंहाच्या हालचाली कळत असतांही त्या गुप्त ठेवण्याचीच विशेष खबरदारी घेतली. अशा रीतीनें अनेक लोकांनीं त्याला अप्रत्यक्षपणें मदत दिली.

कुंवरसिंह नवी फौज गोळा करीत उत्तर व पश्चिम या दिशांकडे दूरपर्यंत जाऊन आला. यानंतर दिल्लीला जाण्याचा त्याचा विचार होता. पण दिल्लीला इंग्रजांनीं आपली सत्ता पुन्हा प्रस्थापित केल्याची वार्ता ऐकून तो तसाच पुढें अयोध्येस गेला. तेथें त्याला कित्येक लोक येऊन मिळाले. या लोकांनिशीं त्यानें आजमगडावर हल्ला केला. तेथें इंग्रजांचा मिलमॅन नांवाचा सेनापति होता. हल्ल्यांत त्याचा दोनवेळां पराभव झाला. परंतु अलाहाबाद येथून लॉर्ड मार्ककार एक मोठी फौज घेऊन मिलमॅनच्या सहाय्यास आला. त्या दोघांनीं मिळून कुंवरसिंहाचा पराभव केला आणि आजमगडावरून त्याला पिटाळून लाविलें.

दुसरी एक फौज लखनऊहून जनरल लुगार्ड आणीत होता. कुंवरसिंहाच्या फौजेनें लुगार्डला अडविण्याची शिकस्त केली, पण तिला त्यांत यश आलें नाहीं. आतां इंग्रज आपला पाठलाग करणार हें सांगायला फारशी बुद्धि खर्च करण्याचें कारण नव्हतें. यास्तव कुंवरसिंहानें नघाई गांवीं शत्रूला तोंड देण्याचें ठरविलें. येथें कॅ. डगलसनें त्याचेवर हल्ला केला. तेव्हां कुंवरसिंहानें आपल्या फौजेच्या निरनिराळ्या तुकड्या केल्या व एका तुकडीला डगलसला गुंतवून ठेवण्याची कामगिरी

सांगितली, आणि त्याच्या फौजेच्या बाकीच्या तुकड्या ती संधी साधून त्या गर्दीत निरनिराळ्या मार्गांनीं पसार झाल्या. रात्रीं पुन्हा सर्व फौज एकत्र झाली आणि रातोरात घोग्रानदी उतरून गेली. तरीदेखील डगलसनें त्याचा पिछा सोडला नाहीं. पुन्हा एकदां हातघाईची लढाई जुंपली. रात्र होतांच कुंवरसिंहाचे लोक गंगानदी उतरून जाण्याच्या खटपटीला लागले. पण हें काम त्यांना झटपट उरकतां आलें नाहीं. कारण डगलसनें ताडलें होतें कीं, बंडवाले संधी मिळतांच गंगानदी उतरून पलीकडे जाण्याचा प्रयत्न करणार. म्हणून त्यानें नदींतल्या नावा बुडवून त्या अपरिचित जागीं लपवून ठेविल्या होत्या. त्याचा दुसरा उद्देश असा होता कीं, बंडवाल्यांना चेपीत चेपीत नदीपर्यंत आणलें आणि नदी उतरून जाण्याचें साधन जवळ नसलें म्हणजे शत्रू झकत शरण येईल, व बिनशर्त हातीं लागेल. असें झालें म्हणजे कुंवरसिंहाला कैद करतां येईल. ज्याला धरून देण्याकरितां मोठें थोरलें बक्षीस कंपनीनें लावलें होतें, तो बंडवाल्यांचा नेता जर अशा रीतीनें पेंचांत सांपडून धरिला गेला, तर डगलसचें दुहेरी हित त्यायोगें झालें असतें. हा त्याचा डाव विचारपूर्वक योजिलेला होता यांत संशय नाहीं. कुंवरसिंह डगलसला चुकवीत चुकवीत नदीवर आला, तेव्हां त्याला कळलें कीं नदी पार करायला एक देखील नाव मिळविण्याजोगी नाहीं. हें कळतांच आपण कोणत्या पेंचांत सांपडलों हें कुंवरसिंहानें ताबडतोब ओळखलें, आणि म्हणूनच या व्यूहाचा भेद करण्याकरितां त्यानें आटोकाट प्रयत्न केला. कांहीं शिपाई शेजारच्या गांवांतून चौकशी करितां पाठविण्यांत आले व कांहीं नदींत उतरून नावा तेथें बुडविण्यांत आल्या आहेत कीं काय हें पाहूं लागले. हें सर्व काम थोडक्या वेळांत आणि गुप्तपणें व्हावयास हवें होतें. कारण शत्रू एकसारखा पाठलाग करीत होता. तो येण्याचे पूर्वी नदीचें पैलतीर गांठावयाचें होतें. शत्रूची हालचाल कळावी म्हणून कांहीं दूत निरनिराळ्या दिशांना पाठविण्यांत आले होते. डगलसच्या मनोराज्याप्रमाणें बंडखोर त्याला झुकांडी देऊन नदीच्या बाजूला पळाले. आतां आपले मनोरथ पूर्ण होणार, या आनंदांत मग्न होऊन त्यानें वाटेंत विश्रांतिस्तव थोडासा वेळ गमाविला. पण तो किती—तर फारच थोडा. कुंवरसिंहाच्या मागावर तो झपाट्यानें नदीकडे येऊं लागला. परंतु त्याचें मनोराज्य तेव्हां पूर्ण व्हावयाचें नव्हतें. कारण कुंवरसिंहाच्या लोकांना गांवांतील रहिवाश्यांनीं मदत दिली आणि नावा लपविलेलें ठिकाण त्यांना दाखवून दिलें. एवढेंच नव्हे तर कुंवरसिंहासह त्याचें सारें सैन्य, गांवकऱ्यांनीं सुखरूप पैलतीरास पोंहोंचविलें.

## ४७३ बिहारचे कुंवरसिंह, अमरसिंह.

याप्रमाणें डगलसचा बेत हाणून पाडून, शत्रू येण्याचे पूर्वी सुरक्षितपणें पैल तीर गांठल्याबद्दल कुंवरसिंहाला आनंद झाला. त्याच्या सोबत्यांना व सैनिकांनाही अर्थातच फार आनंद झाला होता. याप्रीत्यर्थ उत्सव करण्याची सैनिकांना उत्सुकता वाटूं लागली. त्यांचा नायकही या आनंदाच्या भरांत त्यांच्या म्हणण्याला कबूल झाला. आनंदाच्या भरांत त्याला मागचें पुढचें धोरण राहिलें नाहीं. सैनिकांनीं आणि साथीदारांनीं मिळून कुंवरसिंहाची जंगी मिरवणूक काढली. ती मिरवणूक थाटाची होती. सर्वात पुढें पायदळ सैन्य ऐटींत चाललें होतें, त्याच्या मागें घोडेस्वार होते आणि त्यांच्या मागें उत्तम प्रकारें शृंगारलेल्या हत्तीवर कुंवरसिंहाला बसविलें होतें. त्याच्या एका बाजूस त्याचा भाऊ अमरसिंह याचा हत्ती होता आणि त्याच्या मागें त्याचा जणूं उजवा हातच, अशा रणदलनसिंहाचा हत्ती होता. कुंवरसिंहाच्या डोक्यावर छत्र धरिलें होतें आणि चवरी धरणारे त्याच्या दोन्ही बाजूंस उभे होते. अशा थाटाची ही बंडखोरांच्या राजाची मिरवणूक, शत्रूचा उपहास करण्याकरितांच कीं काय, नदीच्या बाजूनें निघाली. एवढयाशा विजयानें किंवा विजयाभासानें शेफारून आनंदोत्सव करणें व पाठीवर आलेल्या शत्रूंना सामना किंवा हुलकावणी देण्याचा विचारही मनांत न आणणें, ही गोष्ट बंडवाल्यांच्या अगदीं अंगवळणी पडली होती. इकडे इंग्रजी सैन्य गंगेच्या कांठीं येऊन थडकलें. शत्रूला विजयानंदानें उन्मत्त होऊन उद्दामपणें मिरवितांना पाहून कॅ. डगलसचें पित्त खवळलें. तो अतिशय संतापला. त्याचा डाव शत्रूनें हाणून पाडल्यामुळें तो आधींच अतिशय चिडला होता. 'शत्रूनें आपल्या हातावर तुरी दिल्या एवढेंच नव्हे, तर आपल्याला चिडविण्याकरितां आपल्या समोर शत्रूनें मुद्दाम थाटामाटानें मिरवणूक काढिली. आपल्यापुढें पळतां भुई थोडी झाली असूनही, नदीपलीकडे गेल्याबरोबर शत्रू इतका उद्दाम बनला कीं, आमच्याविषयींच्या बेफिकिरीचें प्रदर्शन त्यानें मजसमोर मांडलें.' यामुळें त्यानें दांत ओंठ करकरां चावले, आणि आतां काय करावें याचा क्षणभरच विचार केला. लागलीच त्यानें तोफा डागण्याचा आपल्या गोलंदाजांना हुकूम दिला. एका तोफेचा नेम कुंवरसिंहाच्या छत्रावर नेमका धरण्यांत आला असल्यामुळें, छत्रधार व रणदलनसिंह लागलीच हत्तीवरून खालीं आले. तोफेचा गोळा कुंवरसिंहाच्या हाताला चाटून गेला, आणि जखमी होऊन तोदेखील हत्तीवरून खालीं पडला. इतकें होतें न होतें तोंच मिरवणूक उधळून गेली, आणि ज्याला जी वाट दिसेल त्या वाटेनें तो पळत सुटला. याप्रमाणें बंडखोरांची

दाणादाण झाली. या धांदलींत शिपायांनीं कुंवरसिंहाला तेथेंच विव्हळत टाकलें नाहीं, हेंच त्यांचें शहाणपण. कुंवरसिंहानें जखमी झालेला हात कापून टाकण्यास आपल्या अनुयायास सांगितलें, व मोठ्या कष्टानें एकानें तें काम पुरें केलें. यानंतर कुंवरसिंहाला जगदीशपुराला नेलें. तेथें त्याचा पूर्वीचा वाडा व पूर्वीचा राजेशाही थाट आतां उरला नव्हता. एका झोंपडीवजा घरांत त्याला ठेविलें होतें आणि तेथेंच त्याचे साथीदार विषण्ण मनानें त्याची शुश्रूषा करीत होते. परंतु या शुश्रूषेंत त्यांना यश न येतां, जखमेमुळें भरलेल्या तापांत व परिश्रमांनीं आलेल्या ग्लानींत कुंवरसिंहाचें प्राणोत्क्रमण झालें.

कुंवरसिंह अत्यवस्थ असतां त्याच्या समाचाराला भलें मोठें सैन्य जमा झालें होतें. त्याचे सैनिक त्याला फार चाहात असत. म्हणून देशभर पसरलेले सर्व शिपाई या वेळीं एकत्र जमा झाले होते. जवळच आऱ्याला असलेला इंग्रज सेनापती ली ग्रँट, याला ह्या जमावाची दहशत बसली. आणि म्हणून त्या जमावाची पांगापांग करण्याकरितां ली ग्रँट त्यांच्यावर चाल करून गेला. परंतु यावेळीं त्याला हारच खावी लागली. मरतां मरतां ली ग्रँटचा कुंवरसिंहानें पराभव केला. कुंवरसिंह मरेतोंपर्यंत आपल्या सैन्याला उत्तेजन देत होता आणि अमरसिंहाचा आपल्या मागें सांभाळ करण्यास सैनिकांना विनवीत होता. त्याची मरणसमयींची शेवटची इच्छा, त्या शोकसंतप्त स्थितींतही पूर्ण करण्याचा शिपायांनीं निश्चय केला. त्यांनीं एकमतानें अमरसिंहाला आपला नायक निवडलें. या वेळीं कुंवरसिंहाविषयीं असलेल्या कृतज्ञताबुद्धीनें प्रेरित होऊन, आणखीही कित्येक लोक अमरसिंहाला येऊन मिळाले. या वेळीं अमरसिंहाला परिस्थिति फार अनुकूल होती. त्याच्या अधिकारांत असलेलें परंतु इंग्रजांशीं बिथरलेलें सैन्य या वेळीं एका ठिकाणीं जमा झालें होतें. केवळ याच एका गोष्टीनें, बिहार प्रांतांतील राजनिष्ठ लोकांचा आणि विशेषतः इंग्रज अधिकारी व सेना यांचा थरकांप झाला होता. कुंवरसिंहासारख्या वीर पुरुषाला मरणसमयीं दिलेलें वचन अगदीं ताजें असल्यानें, सर्व सैन्य नव्या जोमानें लढण्यास तयार झालें होतें. त्यांचा नायक अमरसिंह देखील किरकोळ नव्हता. तो कुंवरसिंहाच्या तोडीचा वीर नसला, तरी त्याच्यांत ध्येयनिष्ठा दांडगी होती. ससरामच्या पहाडांत केलेली प्रतिज्ञा त्याच्या मनःचक्षूंपुढें अहोरात्र दिसत होती. याप्रमाणें नव्या दमाचे नवे नायक आणि नव्या जोमाचे त्याचे अनुयायी एकत्र झाल्यामुळें, एक प्रकारचा अननुभूत उत्साह त्या सर्वांत

खेळूं लागला. अमरसिंहानें लवकरच आऱ्याच्या सेनापतीला पहिला हात दाखविण्याचें ठरविलें.

डगलसही या वेळीं आऱ्यांतच होता. ली ग्रँट व डगलस या दोघांनीं बंडखोरांच्या संख्याबलाचा अंदाज काढला आणि मदतीकरितां आणखी सेना मागविली. ही बातमी अमरसिंहाला कळतांच त्यानें ठरवून टाकिलें कीं, ह्या येऊं घातलेल्या मदतनिसांना वाटेंतच गांठून पिटाळून लावलें पाहिजे. जर हे सर्व इंग्रज एकत्र झाले, तर आऱ्यावर हल्ला करून तें ठाणें हस्तगत करणें कठिण होईल. ही शहाणपणाची युक्ति ताबडतोब त्यानें अमलांत आणली. त्यानें आपलें सर्व सैन्य जगदीशपुराजवळच्या जंगलांत लपवून ठेविलें आणि तेथून निरनिराळ्या दिशांकडून येणाऱ्या कुमकी सैन्यावर हल्ले चढविणें सुरू केलें. ता. ८ एप्रिलला लुगार्ड साहेब बिहिया नांवाच्या गांवीं जाऊन पोहोंचला. तेथून त्यानें एक तुकडी आऱ्याला पाठविली आणि तो स्वतः ससरामचा सेनापति करफिल्ड याची वाट पहात बसला. त्याच दिवशीं अमरसिंहाच्या एका तुकडीनें त्याच्यावर छापा घातला. कित्येक दिवस हें युद्ध चालू राहिलें. लुगार्डला अशी भीति पडली कीं, आतां येथेंच माझी इतिश्री होते कीं काय. येन केन प्रकारेण तेथून निसटण्याचा उपाय तो शोधूं लागला आणि जगदीशपुर तेथून जवळच असल्यानें, त्याच बाजूला शिताफीनें मागें हटण्याचा तो प्रयत्न करूं लागला. तो जगदीशपुराला पोहोंचतांच अमरसिंहानें त्याचा पाठलाग बंद केला, आणि आपली फौज घेऊन तो परत जंगलांत निघून गेला.

अमरसिंहाला पाठलागाचें कार्य सोडून परत जातांना पाहून लुगार्डला चेव आला आणि तोच उलट बंडवाल्यांचा पाठलाग करूं लागला. पण बंडवाल्यांनीं त्याला चांगलेंच चकविलें. त्याच्या हातीं कोणीच लागलें नाहीं. इकडून तिकडे आणि तिकडून इकडे, अशा येरझारा घालीत त्याला जंगलांतून भटक्या मारीत फिरावें लागलें. ता० ११ मे रोजीं सेनापति करफिल्ड आला आणि पिवटो नांवाच्या गांवाजवळ लुगार्डला येऊन मिळाला. करफिल्ड साहेबाचा ससरामपासून येथपर्यंतचा प्रवास कांहीं मोठ्या सुखासमाधानानें झाला नाहीं. वाटेंत किती तरी ठिकाणीं अमरसिंहाच्या फौजेनें त्याची वाट अडविली. बंडवाल्यांचें तत्व असें होतें कीं, साधेल तर या मदतनिसांना परत पाठवावयाचें, व हें नच साधलें तर निदान त्यांच्यापैकीं बऱ्याच लोकांना वाटेंत जायबंदी तरी करावयाचें. आणि या त्यांच्या गनिमी काव्याच्या युद्धनीतीमुळें इंग्रजी फौजेला फार त्रास झाला. कारण शत्रु समोरून सामना देईना.

तो चोरून अचानक हल्ले चढवी, व नंतर जंगलांत जाऊन लपे. ११ मेपासून २७ मेपर्यंत दोन्ही सैन्यांच्या लहानमोठ्या अनेक चकमकी झाल्या. त्यांत कधीं बंडखोरांची सरशी होई तर कधीं टोपीवाल्यांची. आरा आणि जगदीशपूरच्या भोंवतालीं असलेल्या जंगलाचा कोपरानकोपरा अमरसिंहाला माहीत होता. यामुळें या जंगलांतील गुप्त स्थानीं आपला तळ देऊन अमरसिंह ऐटींत राहिला होता. तेथें फौजेसह लपून, त्यानें आपले हेर इंग्रजांच्या हालचालींची बातमी काढण्याच्या कामावर नेमले होते. त्यांच्याकडून बातमी लागतांच अमरसिंहानें इंग्रज सैन्यावर अचानक तुटून पडावें, व थोडी कापाकापी आणि थोडी लुटालूट करून जंगलांत पुन्हा पळून जावें. शत्रूला गैरसावध स्थितींत गांठून पुन्हा त्यांच्यावर तुटून पडावें. असें सारखें चालू होतें. यामुळें इंग्रजी सैन्य अगदीं जेरीस आलें. रणमैदानांत समोरासमोर उभें राहून मर्दुमकी गाजवावयाची त्यांना हौस व इच्छा असे, पण अपरिचित रानांवनांतून जात असतां, अवचित आलेला हल्ला परतविणें त्यांना जड जाऊं लागलें. त्यांनीं अमरसिंहाला जगलांतून हुसकून लावण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु या प्रयत्नांत त्यांना यश आलें नाहीं. तसेंच खुल्या मैदानांत अमरसिंहाला आणून तेथें युक्ति-प्रयुक्तीनें युद्धाला तोंड देणें त्याला भाग पाडावें, असाही प्रयत्न इंग्रजांनीं करून पाहिला. पण तो साध्य झाला नाहीं.

बंडखोरांच्या एका टोळीनें डुमराव शहराजवळची इंग्रजांची निळी कोठी लुटली. दुसरीनें बक्सरजवळचा राजापुर गांव लुटला. तिसऱ्या टोळीनें रेलवे आफीस लुटलें. याप्रमाणें जिकडे तिकडे बंडखोरांनीं धुमाकूळ माजविला, आणि सर्वांना 'त्राहि भगवन्' म्हणावयाला लाविलें. इंग्रज अगदीं हताश झाले. त्यांच्या प्रयत्नांना यश कसें तें येईना. शत्रू थोडे असले तरी समोरा समोर तोंड देईनात व त्यामुळें त्यांचा बींमोड करणें कठिण जाऊं लागलें. शेवटीं या चोरट्या लढाईच्या प्रकाराला कंटाळून लुगार्ड आपल्या जागेचा राजीनामा देऊन विलायतेस निघून गेला. ही संधी साधून अमरसिंहानें आपलीं सर्व ठाणीं परत मिळविलीं. जिकडे तिकडे त्याच्या विजयाचा दुंदुभी गर्जू लागला. या विजयामुळें आणखीही कित्येक लोक त्याला येऊन मिळाले. याप्रमाणें वडील बंधूसमोर केलेली प्रतिज्ञा बऱ्याच अंशानें थोड्या वेळाकरितां कां होईना, त्यानें सिद्धीस नेली. कांहीं दिवस तर असें वाटूं लागलें कीं, शहाबाद जिल्ह्यांतून इंग्रजी सत्तेचें पार उच्चाटन झालें. पण ही स्थिति फारच थोडे दिवस टिकली.

इंग्रजांवर असा विजय या प्रांतांत कोणींच मिळविला नव्हता. बंडखोर आपल्या उत्कर्षाच्या शिखरावर पोहोंचले होते. त्यांच्या यशाची परमावधि झाली होती. यापेक्षां अधिक काम त्यांच्याकडून होणें अशक्य होतें. कारण ते मूठभर होते व इंग्रजांची सत्ता अत्यंत प्रबल व व्यवस्थित होती. तेव्हां यापुढें त्यांच्या अवनतीला सुरवात झाली. लुगार्डची जागा डगलसला मिळाली. त्याला आपल्या नव्या कार्यक्षेत्रांत पदार्पण करण्याच्या वेळींच एक अपशकून झाला. त्याला अशी बातमी लागली कीं, 'गयेचा तुरुंग फोडून बंडखोरांनीं आंतील कैद्यांना मोकळें केलें. बंडखोरांना पोलिसांचें साह्य आहे आणि त्यांच्या मदतीनें शहरांतील सर्व इंग्रजांना त्यांनीं हाकलून लाविलें. एवढेंच नव्हे तर आऱ्यांतील फौजेंतही त्यांनीं फंदफितुरी पसरविली आहे.' ही हकीकत ऐकून ब्रिगेडियर डगलस मोठ्या काळजींत पडला. तो अमरसिंहाला जगदीशपुरांतून हांकलून लावण्याच्या उद्योगास नेटानें लागला.

इकडे अमरसिंहही आरा जिंकून घेण्याची खटपट करूं लागला. त्यानें तेथील घोडेस्वारांना सळो कीं पळो करून सोडिलें. तेव्हां डगलसनें आपल्या सैन्याच्या ७ तुकड्या केल्या, आणि त्या निरनिराळ्या बाजूनें जगदीशपुराच्या आसमंतात पसरून ठेविल्या. त्याचा विचार असा होता कीं, सर्व बंडखोर एका ठिकाणीं जगदीशपुरांत जमले म्हणजे त्या सर्वांवर चारी बाजूनें तुटून पडावयाचें, व त्यांचा निकाल उडवावयाचा. ही व्यवस्था ता. १३ आक्टोबरला पुरी झाली. त्यानंतर दुसरेच दिवसापासून त्याच्या फौजेच्या बंडखोरांशीं चकमकी होऊं लागल्या. इंग्रजी फौजेचा डाव असा होता कीं, साधलें तर बंडखोरांना वेगवेगळें गांठून चीत करावयाचें, आणि हें न साधलें तर त्यांना चेपीत चेपीत जगदीशपुरांत नेऊन कोंडावयाचें. ह्या धोरणानें आतां चकमकी होऊं लागल्या. यांपैकीं बहुतेकींत जरी बंडखोर हरले, तरीदेखील ते चीत न होतां हळू हळू युक्तीनें मागें हटूं लागले. ह्या वेळपर्यंत बंडखोरांना काळ अनुकूळ होता. परंतु आतां मात्र त्यांच्या सद्दीचा जोर संपला, आणि त्यांचा प्रत्यक्ष काळच रणमैदानावर येऊन थडकला. नामांकित सेनापति सर हेनरी हॅवेलॉक याचा मुलगा मेजर हॅवेलॉक याच वेळीं डगलसला येऊन मिळाला. तो लुगार्ड किंवा डगलस सारखा पेद्रू नव्हता. त्याचे घोडेस्वार कसलेले लढवय्ये होते. ते रणमैदानावर येतांच युद्धाचें पारडें फिरलें. त्यांनीं जोराचा हल्ला करितांच बंडखोरांनीं कच खाल्ली. आतांपर्यंत त्यांची पुच्छ-प्रगति आस्ते आस्ते चालू होती, पण हॅवेलॉकच्या स्वारांचा मारा सुरू

होतांच बंडखोरांनीं जोराचा पळ काढिला. नेहमींप्रमाणें कोठें तरी अवघड जागीं लपून बसावयाचें असा त्यांचा विचार होता. परंतु हॅवेलॉकनें त्यांना क्षणभर देखील दृष्टीआड होऊं दिलें नाहीं. शेवटीं जंगलांतून जातांना बंडखोर पांगले व निरनिराळ्या वाटांनीं पळून गेले.

मेजर हॅवेलॉक तसाच पुढें निघाला. तेव्हां त्याची 'नोनार' ग्या गांवीं अमरसिंहाशीं गांठ पडली. अमरसिंहाला हॅवेलॉकच्या पलटणीनें गाजविलेला पराक्रम कळला होता, व तोही निकराच्या लढाईला तयार होता. आणि साधल्यास इंग्रज सेनापतीला चांगलाच हात दाखवावयाचा त्याचा इरादा होता. पण त्यानें फुकट हात दाखवून अवलक्षण मात्र करून घेतलें. हॅवेलॉकच्या स्वारांच्या पराक्रमापुढें बंडखोरांचा मुळींच टिकाव लागला नाहीं. अमरसिंहाच्या घोड्याला लढाईंत बरीच मोठी जखम झाली व तो निरुपयोगी होऊन पडला. तेव्हां स्वतः अमरसिंहाला आपले प्राण घेऊन रणांगणांतून पायींच पळत सुटावें लागलें. त्याला दूर पळतांना पाहून दोघे घोडेस्वार त्याचे मागें धावले. आपला पाठलाग होत आहे असें पाहून अमरसिंह पेंचांत पडला. कारण घोडेस्वारांपुढें तो पायीं कितीसा दूर पळणार ? परंतु दैवयोगानें, त्याला थोड्याशा अंतरावर एक उंसाचा भलामोठा मळा दिसला. लागलाच तो त्या मळ्याच्या रोखानें पळाला. त्यानें मळ्यांत पाऊल टाकावयास आणि स्वार तेथें येऊन पोहोंचण्यास एकच गांठ पडली. परंतु अमरसिंहानें इतक्यांत प्रसंगावधान राखून हातांतील पिस्तूल झाडलें. तेंही अशा बेतानें कीं, घोडेस्वार त्याला शोधण्याकरितां मळ्यांत शिरण्याच्या इरादानें घोड्यावरून खालीं उतरताहेत, तोंच ठों ठों असे दोन आवाज झाले, आणि दोघेही स्वार धाडकन जमिनीवर पडले. अमरसिंह तेथून लागलीच पसार झाला. त्याच्या शिपायांची मात्र पांगापांग झाली. ते जंगलांत शिरले परंतु हॅवेलॉकनें सगळें जंगल पालथें घातलें; तेव्हां ते बंडखोर पहाडावर पळून गेले, आणि तेथेंच लपून बसले. पण हॅवेलॉकनें त्यांना तेथेंही चैन पडूं दिलें नाहीं. तेथेंही त्यानें बंडखोरांचा पाठलाग केला, व त्यांना हुडकून काढून त्यांचा समूळ नाश केला.

याप्रमाणें बिहारमधील बंड मोडलें व बंडाचा नायनाट झाला. बंडखोरांपैकीं कांहीं मेले, कांहीं परागंदा झाले, व उरलेले फांशी गेले. अमरसिंह मात्र इंग्रजांच्या हातीं सांपडला नाहीं. तो उसांच्या मळ्यांतून जो नाहींसा झाला तो झालाच. त्याचा पुढें पत्ताच लागला नाहीं. बिहारवर इंग्रज सरकारचें पुन्हा पूर्ववत् निष्कंटक राज्य सुरू झालें. जिकडे तिकडे शांतता स्थापन झाल्यावर कुंवरसिंहाची

जहागीर त्याच्या नातलगांना सरकारनें बहाल केली, व लोकांचीं मनें आपल्याकडे ओढून घेतलीं. बंडाचीं मुख्य केंद्रें मोडलीं गेलीं व सर्व प्रमुख ठिकाणें इंग्रजांच्या हातीं आल्यावरदेखील, ज्यांनीं पळत्या छिपत्या लढाईनें इंग्रजांना बरेच दिवस त्रास दिला, त्यांत या बिहार प्रांतांतील वीर बंधूंची अवश्य गणना केली पाहिजे. हे दोघे बंधू व रणशूर सेनापति तात्या टोपी यांच्या व्यक्तिशः शौर्यानें व रणनैपुण्यानें, १८५७ सालीं बंड मोडूनही तें पूर्णपणें मिटलें नाहीं व बंडाची कालमर्यादा लांबली.

---

प्रकरण २७ वें.

## सेनापती तात्या टोपी



नानासाहेब पेशव्यांनीं कानपुरास बंड पुकारलें, तेव्हां त्यांचे नातलग, आश्रित व नोकर हे साहजिकच बंडांत सामील झाले. मालकाच्या मागोमाग जाणें हेंच खऱ्या स्वामिभक्त नोकरांचें कर्तव्य होय, व तें त्यांनीं बजावल्याबद्दल त्यांना मुळींच दोष देतां येणार नाहीं. उलटपक्षीं पेशव्यांच्या पंक्तीस निरंतर लाडूजिलबीचीं जेवणें झोडणाऱ्या या आश्रितांनीं, संकटकालीं पेशव्यांचा त्याग केला असता तर तें दूषणास्पदच ठरलें असतें. नानासाहेबांबरोबर, पुतणे रावसाहेब व बंधु बाळासाहेब पेशवे साथ करून होतेच, परंतु तात्या टोपी व जळका रामभाऊ या दोघां प्रमुख आश्रितांनीं देखील त्यांना केव्हांही दगा दिला नाहीं. लहानपणीं फटाके तयार करीत असतां सोरा व गंधक यांचा भडका उडून रामभाऊ जळाला व त्याचें तोंड कुरूप झालें होतें. त्यामुळें त्याला जळका रामभाऊ असेंच सर्व म्हणत असत. हा धाडशी होता, परंतु स्वरूपाप्रमाणें मनाचा हलका असल्यामुळें अजीमुल्ला वगैरे मुसलमानांशीं त्याचें बरेंच रहस्य जुळत असे. आणि अजीमुल्लाबरोबरच तो अस्तास गेला, व त्याच्याप्रमाणेंच खुनशी व क्रूर नामर्दाईच्या कृत्यांनीं त्यानें आपलें तोंड कायमचें काळें करून घेतलें. तात्या टोपी हा दिसण्यांत सुंदर व रुबाबदार असे. मनानें उदार व दिलदार असल्यामुळें लोकांचा त्याच्यावर चटकन विश्वास बसत असे. तो देशस्थ ब्राह्मण असून मूळचा अहंमदनगर जिल्ह्याचा रहिवाशी होता. त्याचें वय बंडाचे वेळीं सरासरी पन्नास

वर्षांचें होतें. हा शूर तर होताच, परंतु त्याबरोबरच मधुर भाषणाची त्याच्या शौर्याला जोड मिळाली होती. नानासाहेबांचा हा प्रमुख सल्लागार होता.

कानपूर येथें प्रथम बंड झालें, तेव्हां बंडाचें पुढारीपण नानासाहेबाकडे असलें तरी फौजेचीं सूत्रें त्यांच्या हातीं नव्हतीं. कारण इंग्रजांच्या देशी पलटणींनीं बंड केलें असल्यामुळें, त्यांच्यावरील जमादार सुभेदार आपल्याच आढयतेंत असत व स्वतांला ते लष्करी दर्दी समजत असल्यामुळें, नानासाहेब किंवा तात्या टोपी यांचे हुकूम मानावयास ते तयार नसत.

परंतु १७ जुलै १८५७ रोजीं इंग्रजांनीं बंडवाल्यांचा मोड करून कानपूर शहर त्यांच्याकडून परत जिंकून घेतलें, तेव्हां बंडखोर शिपायांपैकीं अनेक मारले गेले व इतरांची पांगापांग झाली. तात्या टोपीनेंही त्या वेळीं इतरांबरोबर कानपूर शहर सोडलें. परंतु तो स्वस्थ बसला नाहीं. त्यानें कानपुराहून ४६ मैलांवर असलेल्या काल्पीवर, आपल्या थोड्याशा फौजेनिशीं हल्ला करून तें ठाणें आपल्या ताब्यांत घेतलें, आणि तेथून तो सैन्याची जुळवाजुळव करूं लागला. ग्वालेरच्या फौजेशीं त्यानें संधान बांधून तेथील लढवय्या पलटणी अनुकूळ करून घेतल्या. काल्पी येथें लष्करी कारखाना खोलून त्यानें युद्धसामग्रीचीही जुळवाजुळव चालविली. त्याच्या चतुराईनें व रणपटुत्वामुळें त्याजजवळ बरीच फौज जमली. कानपूरच्या पहिल्या लढाईनंतर बंडखोरांचा तोच सेनापति होता; आणि १८ जुलै १८५७ पासून तों ७ एप्रील १८५९ पर्यंत, त्यानें स्वतांच्या हिंमतीवर जवळजवळ दोन वर्षें इंग्रजांशीं सामना दिला. मराठ्यांची रणनीति त्याला ऐकून ठाऊक होती, आणि संधी मिळाल्यावर त्यानें ती प्रत्यक्ष अमलांत आणून दाखविली.

कानपूरपासून तों ग्वालेरपर्यंत ठिकठिकाणीं तात्या टोपीनें आपल्या चौक्यापहारे बसविले व तो सर्व मुलूख आपल्या ताब्यांत आणला. सेनापती विंडह्याम कानपुरास बसून, लखनौ येथील वेढयांत सांपडलेल्या इंग्रजी फौजेसाठीं सामानसुमानाचा पुरवठा तयार करण्यांत गुंतला होता. मुख्य सेनापती सर कॉलीन क्यांपबेल, यानें आपल्या फौजेनिशीं कानपूर सोडून लखनौची वाट धरली हें पाहून, तात्या टोपीनें कानपुरावर परत हल्ला करण्याचें ठरविलें. यमुना नदी उतरून भगिनीपूर, अकबरपूर, शिवली व शिवराजपूर हीं गांवें तात्यानें १० ते २० नव्हेंबरच्या दरम्यान मोठ्या तडफीनें काबीज केलीं. इंग्रजी फौजेची रसद याच रस्त्यानें जात असल्यामुळें त्यांच्या रसदीचा मार्ग बंद झाला. तेव्हां सेनापती विंडह्याम

पुढें सरकला व पांडू नांवाच्या लहानशा नदीच्या कांठीं दोन्ही फौजांची गांठ पडली. तात्याचा येथें प्रथम लहानसा पराभव होऊन त्याला आपली फौज थोडीशी मागें घ्यावी लागली. परंतु विंडह्यामलाही तेथें सुरक्षितता वाटेना. तो परत कानपूरला जाण्याची तयारी करूं लागला, हें पाहून दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याच्या उजव्या व डाव्या बगलांनीं तात्या टोपीनें जोराचे हल्ले चढविले व त्याला कचाटींत धरलें. तात्याच्या व्यूहरचनेमुळें इंग्रजी फौजेची दाणादाण उडली व त्यांचे तीनशें शिपाई मारले गेले. तेव्हां निरुपाय होऊन उरलेली इंग्रजी फौज सेनापती व्हीलरनें उभारलेल्या मातीच्या कोटांत जाऊन दडली, व कानपूर शहर तात्याच्या हातीं आलें. तात्या टोपीच्या हातीं पांच लाख रुपये, अकरा हजार काडतुसांच्या पेट्या, पांचशें तंबू व इतर बरेंच युद्धोपयोगी सामान लागलें. लखनौला पाठविण्यासाठीं हें सामान एकत्र करण्यांत आलें होतें. तात्याच्या शिपायांनीं आपल्या उपयोगाच्या वस्तू तेवढया घेतल्या व उरलेल्यांना आग लावून दिली. २७ नव्हेंबरपासून कानपूरवर परत बंडवाल्यांचें राज्य सुरू झालें, व सेनापती विंडह्यामला किल्लेकोटाचा आश्रय घेऊन काळजींत व चिंतेंत रात्री काढाव्या लागल्या.

विंडह्यामचा याप्रमाणें पराभव झाल्याबरोबर, त्यानें क्यांपबेलकडे दूत पाठवून एकंदर हकीकत कळविली व ताबडतोब साहाय्य मागितलें. सर कॉलिन क्यांपबेल आपली फौज घेऊन ताबडतोब कानपुरास धावून आले. ते ३० नव्हेंबरला संध्याकाळीं तेथें येऊन पोहोंचले. परंतु त्यांच्याबरोबर लखनौ येथील इंग्रजी छावणींतील बायकामुलें व अनेक आजारी आणि जखमी लोक होते. त्यांची प्रथम त्यांनीं प्रयागकडे रवानगी करून दिली, व मग सड्या स्वारीनिशीं बंडवाल्यांशीं सामना दिला. ६ डिसेंबर रोजीं ही लढाई झाली व तात्या टोपीचा पराजय झाला. शिपायांचा विचार शिवराजपूर येथें गंगा उतरून अयोध्या प्रांतांत जाण्याचा होता. परंतु सेनापती होपग्रांटनें तेथें त्यांच्यावर जोराचा हल्ला करून त्यांना पिटाळून लावलें. शिपायांच्या पंधरा तोफा होपग्रांटच्या हातीं लागल्या. ११ डिसेंबर रोजीं होपग्रांट ब्रह्मावर्त येथें गेला व नानासाहेबांचा वाडा, आणि तेथील उरलींसुरलीं मंदिरें त्यानें जमीनदोस्त केलीं. वाड्यांतील विहीरींत त्याला तीस लाख रुपयांचा ऐवज मिळाला. नानासाहेब गंगा उतरून ब्रम्हावर्तास आले होते, परंतु पराभव होतांच ते ताबडतोब गंगापार झाले.

तात्याटोपीनें यानंतर काल्पीस पुन्हा तळ दिला व सर ह्यू रोझच्या फौजेशीं मातबर लढाया दिल्या. परंतु प्रत्येक वेळीं त्याचा पराभवच झाला.

त्यामुळें झांशीच्या राणीस त्याचें सहाय्य झालें नाहीं. पराभव झाल्यानंतर फौज बचावून सुरक्षित जागीं कशी आणावी, ही महत्वाची लष्करी विद्या त्याला चांगली अवगत होती. यामुळें त्याचा पराभव झाला तरी तो पुन्हा सामन्याला तयारच असे. चढावाचें धोरण मात्र त्याला साधलें नाहीं. किंबहुना पूर्वीदेखील मराठ्यांना इंग्रजांशीं केव्हांही समोरासमोर जोराची टक्कर देतां आली नाहीं. मराठे मोंगलावर तुटून पडत, व त्यांची दाणादाण उडवीत असत. परंतु शत्रूचा हल्ला आला, तरी चिकाटीनें जागा धरून हल्लयाला इंग्रजी सेना तोंड देते व शत्रूंच्या हल्लयाचा जोर कमी झाल्यावर व त्यांची रचना मोडून ते अव्यवस्थित व विस्कळित झाले म्हणजे उलट त्यांना चोप देत असते. ही इंग्रजी चिकाटी मराठी फौजेला केव्हांच साधली नाहीं. उलट, तोफांचा मारा करून इंग्रजांनीं जोराचा हल्ला चढविला, म्हणजे मराठी फौजेची फळी तेव्हांच फुटत असे, व मागें वळण्याचा मार्ग ते धरीत. तात्याटोपी हा महाराष्ट्र सेनानी असल्यामुळें मराठी गनीमी काव्याच्या युद्धनीतीचे गुणदोष त्याच्या फौजेंतही शिरले होते. त्यामुळें त्याचा वारंवार पराजय होऊनही त्याचा मोड होईना.

६ डिसेंबर १८५७ पासून तों १८ जून १८५८ पर्यंत, तात्याटोपीनें इंग्रजांशीं अनेक लढाया दिल्या. ग्वालेरच्या लढाईनंतर तात्या टोपी आपली उरलीसुरली मोडलेली फौज घेऊन वायव्येकडे निघाला. परंतु इंग्रजांनीं त्याचा एकसारखा पाठलाग चालविला, तरी तात्या हातीं लागेना. ग्वालेर, झांशी, गुणा, शिप्री व नशीराबाद, अशा पांच ठिकाणच्या पलटणी तात्यास पकडावयास सज्ज होऊन बसल्या होत्या. बंडवाल्यांचा पूर्ण मोड होऊन सर्व हिंदुस्थानभर इंग्रजी सत्ता पूर्वी-प्रमाणें स्थापन झाली, व बंडवाल्यांना एकही निवाऱ्याची जागा उरली नाहीं. तरी तात्या टोपीचा उत्साह मावळला नाहीं. तो एकदम मोठमोठ्या मजला मारी व एखाद्या ठिकाणीं अवचित प्रगट होऊन इंग्रजी फौजेशीं सामना घेई. इंग्रजी फौजेचें छाप्याच्या आकस्मिकतेमुळें थोडेंबहुत नुकसान होई. बाजू आपल्या अंगावर शेकते असें पाहतांच तो पुन्हा अदृश्य होई व पाठलाग करणाऱ्या इंग्रजी फौजेला चुकवीत चुकवीत दुसरीकडे, कोणाच्या ध्यानींमनीं नसतां प्रगट होत असे. त्याची चोहों-कडून नाकेबंदी झाली, त्याची फौज कंटाळून हळुहळु कमी होऊं लागली, जवळचें द्रव्य नाहींसें झालें, मदतीची अपेक्षा उरली नाहीं, रानावनांतून सारखें विश्रांती न घेतां पळावें लागत असल्यामुळें अन्नपाणी वेळेवर मिळण्याची भ्रांति पडूं लागली, तरी अशा विपत्तींतही पेशव्यांच्या तर्फे तात्या टोपी इंग्रजांशीं लढतच

होता. मराठ्यांची गुरीला वॉरफेअर म्हणजे कशी असते, याचें त्यानें इंग्रजांना प्रत्यक्ष उदाहरण दाखवून दिलें.

ग्वालेरहून जयपूर येथें जाण्याचा तात्याचा विचार होता, परंतु जयपूरला इंग्रजसेना जाऊन थडकली हें पाहतांच तो माधोपूर व नंतर तेथून इंद्रगडला गेला. पावसाळ्यामुळें चंबळ नदीला पूर चढला होता. यामुळें तात्याला भीलवाडा गांवाकडे जावें लागलें. तेथें राबर्टससाहेबाच्या तुकडीशीं तात्याची चकमक उडाली. या लढाईंत तात्यानें फारच शौर्य दाखविलें. परंतु इंग्रजांच्या फौजेचा जोर दिसतांच त्यानें इंग्रजांना अडविण्याकरितां एक लहानशी तुकडी सामन्याला ठेवून, बाकीच्या फौजेनिशीं नदी पार केली. राबर्टसजवळ रिसाला नसल्यामुळें तात्याचा पाठलाग त्याला करतां आला नाहीं. १३ आगस्टला तात्या टोपी श्रीनाथद्वाराच्या दर्शनाला गेला. देवदर्शन व पूजा संपल्यावर त्याला कळलें कीं इंग्रजी सेना जवळ येऊन थडकली, व त्याचा मार्ग रोखून ती उभी आहे. तात्यानें इंग्रजांशीं लढण्याचा खूप आव आणला, पण पाहतां पाहतां इंग्रजांच्या हातावर तुरी देऊन तो पसार झाला. झपाट्यानें चंबळ नदी उतरून तो झालरापाटण येथें पोहोंचला व पेशव्यांच्या नांवानें राण्यापासून त्यानें पंचवीस लाख रुपये खंडणी मागितली. राण्यानें निरुपाय होऊन पांच लाख रुपये तात्याला दिले व त्यास वाटेला लावलें. तात्याला उत्साह आला व त्यानें आपल्या शिपायांचे थकलेले पगार वांटले. नंतर तेथून इंदूरला जाऊन होळकरांचें साहाय्य मागण्याचा त्याचा विचार होता. परंतु इंग्रजांची बरीच मोठी फौज त्याची इंदूरला जाण्याची वाट अडवून बसली असल्यामुळें, त्याला राजगड येथें जावें लागलें.

इतक्यांत ग्वालेरपासून ४४ मैल दूर असलेल्या नरवर येथील जमीनदारानें ग्वालेर दरबारविरुद्ध लढाई पुकारली, व पावरी किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. इंग्रजांनीं लगेच त्या किल्ल्याला वेढा दिला, तेव्हां जमीनदारानें इंग्रजांना निरोप पाठविला कीं, 'आम्ही तुमच्याशीं पूर्ववत मैत्रीच चाहातों. आमचा तंटा फक्त ग्वालेर दरबारशीं आहे, तरी तुम्ही त्यांत पडूं नये व कोणताच पक्ष स्वीकारूं नये.' परंतु इंग्रजांना ही गोष्ट रुचणें शक्य नव्हतें. त्यांना हिंदुस्थानांत सार्वभौम सत्तेचा मान हवा होता, व त्या नात्यानें आपल्या हुकमतीखालीं सर्वत्र शांतता स्थापन करावयाची होती. त्यांनीं अर्थातच किल्ल्यावर निकराचा हल्ला करून तो आपल्या ताब्यांत घेतला. मानसिंह व त्याचा चुलता अजितसिंह हे पळून गेले व त्यांनीं तात्याटोपीजवळ आश्रय मागितला. उदारहृदयी तात्यानें त्यांना आश्रय देऊन,

आपल्या फौजेंत अधिकाराच्या जागा दिल्या. तात्यानें नंतर सिरोंज येथील जंगलांत आठ दिवस मुक्काम करून, आपल्या थकल्या भागल्या सैनिकांस विश्रांति दिली व नंतर ईशागडावर चाल केली. तेथून तात्यानें चंदेरीच्या किल्ल्यावर हल्ला चढविला. परंतु तोफखाना नसल्यामुळें किल्ला तात्याच्या हातीं लागला नाहीं. नंतर तात्या गंगरौलीस गेला, तेथें इंग्रजांच्या सैन्यावर त्यानें छापा घातला व इंग्रज सावध झाल्यावर जंगलांतून आडमार्गानें तो ललितपूर येथें जाऊन पोहोंचला. इंग्रजांच्या फौजेच्या तुकड्या तात्याचा सावलीप्रमाणें सारखा पाठलाग करीत होत्या, व त्याला चारी बाजूंनीं वेढीत होत्या. परंतु तशा स्थितींतही नर्मदा नदी उतरून दक्षिणेंत जाण्याचा महत्त्वाचा डाव तात्यानें टाकला. दक्षिणेंत गेलों म्हणजे पेशव्यांचा महाराष्ट्र पेशव्यांना भरपूर मदत करील, अशी तात्याला उमेद होती. इंग्रज फौजा त्याचा दक्षिणेचा मार्ग पूर्णपणें रोखून बसल्या होत्या. परंतु तात्यानें प्रथम विंध्याद्रीच्या तराईंतील घोर अरण्यांत प्रवेश करून इंग्रजांना झुकांडी दिली व नर्मदा नदी उतरून तो दक्षिणेस यावयास निघाला. ही बातमी वाऱ्याप्रमाणें सर्वत्र पसरली व महाराष्ट्रास एक लहानसा विजेचा धक्काच बसला. त्यावेळीं बंड मोडलें असलें, तरी तात्या टोपीच्या नांवाचा दरारा सर्वांवर बसला होता. 'तात्या टोपी आला रे आला' अशी हूल नर्मदेच्या दोन्ही तीरांवरील शहरांत व आसमंतांतील प्रदेशांत वारंवार उठत असे, व मग रहिवाशांची आणि तेथील कंपनीच्या अधिकाऱ्यांची जी कांहीं घाबरगुंडी उडे, ती विचारूं नका. खांडवा, बऱ्हाणपूर, जबलपूर, सिहोरा, नरसींगपूर वगैरे अनेक ठिकाणींही तात्या टोपीची झळ लागून गेली. तात्या आल्याची अफवा उडून लोकांची घाबरगुंडी उडे, त्यावेळीं खरोखर तात्या तेथून फार दूर असे. परंतु वाटेल त्या आडरस्त्यानें, सर्वांची नजर चुकवून शेंपन्नास मैलांची एका दिवसांत तो मजल मारीत असल्यामुळें, लोकांना त्याच्या बाबतींत अशक्य गोष्टी शक्य वाटूं लागल्या. परंतु मुबईचे गव्हर्नर एल्फिन्स्टन व मद्रासचे हॅरीस या दोघांनीं बंडाची वावटळ दक्षिणेंत उठूं दिली नाहीं, व कुठें किंचित् हालचाल झाली ती तत्काळ दडपून टाकली. जमखिंडीकरांच्या पदरीं सैन्यांत असलेले बक्षीबंधू व नरगुंदचे अधिपती यांनीं बेळगांवच्या आसपास थोडीबहुत टुरटुर केली, परंतु सामान्य जनतेचें त्यांना काडीमात्र सहाय्य न झाल्यानें त्यांची चळवळ इंग्रजांनीं तात्काळ जमीनदोस्त केली. इकडे तात्याचा इंग्रजांनीं अत्यंत नेटानें पाठलाग चालविल्यामुळें त्याला नर्मदानदी ओलांडून पुन्हां उत्तरेस जावें लागलें. कोरेगांव येथें इंग्रजांनीं त्याच्यावर फारच

जोराचा हल्ला चढविला, व त्याच्या फौजेचें बरेंच नुकसान केलें. परंतु तात्यानें नर्मदा नदी पुन्हां एकदां ओलांडली व इंग्रजी फौजेचा डोळा चुकवून आपण बडोद्याच्या रोखानें चाल करून गेला. तात्या बडोद्याहून पन्नास मैलांवर येऊन ठेपला, परंतु इंग्रजी फौज अंगाशीं भिडल्यामुळें तो छोटे उदेपूर येथें गेला. इंग्रजांनीं त्याला तेथें गांठलें तेव्हां तो मंदोसरकडे निघाला. झीरापूर येथें इंग्रजांनीं त्याच्यावर पुन्हां एकदां जोराचा हल्ला चढविला, तेव्हां तो बरोड येथें गेला. तेथून तो दीसा येथें गेला, व नंतर अलवार राज्यांत घुसून शिकारा येथें पोहोंचला. या दोन्ही ठिकाणीं तात्याच्या व इंग्रजांच्या निकराच्या लढाया झाल्या, व तात्याच्या फौजेची पूर्ण खराबी झाली. रावसाहेब पेशवे तात्याला सोडून आपला जीव वांचविण्याकरितां नेपाळकडे चालते झाले, व तात्यानें पारण येथील घोर जंगलांत आपलें ठाणें दिलें! तात्याजवळ त्या वेळीं फौज मुळींच उरली नव्हती, कारण एक वर्षभर त्यानें इंग्रजाशीं ज्या लढाया दिल्या त्यांत त्याचे बरेचसे सैनिक गारद झाले, व उरलेले धांवपळीला कंटाळून त्याला सोडून चालते झाले. एक स्वयंपाकी, एक नोकर, दोन घोडे व सामान वाहण्याकरितां एक तट्टू, एवढाच कायतो या शूर व धाडशी सेनापतीजवळ सरंजाम राहिला. अशा विपत्कालीं त्याच्या प्रिय मित्र मानसिंगानें इंग्रजांशीं खलबत केलें, व स्वतांच्या फायद्याकरितां तात्याची अज्ञातवासाची जागा त्यांना दाखवून देण्याचें कबूल केलें. याच मानसिंगाला तात्यानें मागें आश्रय देऊन मित्राप्रमाणें वागविलें होतें. परंतु तोच आतां त्याचा गळा कापावयास तयार झाला!

तात्या नाहीं तरी जिवावर उदार झाला होता. त्याला प्रथम आशा वाटत होती कीं, हैदराबादचे निजाम मोंगल बादशाहीला मदत करतील. परंतु निजाम व भोपाळच्या बेगम, हे दोन्ही प्रमुख मुसलमानी संस्थानिक इंग्रजांशीं पूर्णपणें एकनिष्ठ राहिले. मुसलमानांनीं पुकारलेल्या धर्मयुद्धांत ते सामील झाले नाहींत, इतकेंच नव्हे, तर बंडखोरांचा बींमोड करण्याच्या कामीं त्यांनीं इंग्रजांना शक्य तें साहाय्यच केलें. रजपूत राजे तर बोलून चालून राजनिष्ठेचे पुतळे! हिंदुस्थानावर कोणाचेंही साम्राज्य प्रस्थापित होवो, रजपूत राजे आपापलीं चिमकुलीं संस्थानें सांभाळून, कोणालाही सार्वभौम मानून मुजरा करावयास व आपली राजनिष्ठा दाखविण्यास सदैव तत्पर असतात. तात्याला, शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे मराठे संस्थानिक, पेशव्यांना मदत करतील अशी फार आशा होती. त्या आशेवरच तो इंग्रजी फौजेशीं विषम परिस्थितीला न जुमानतां सारखी झुंज घेत होता. पेशवाईचे सरदार व पेशव्यांनीं उत्पन्न केलेले संस्थानिक, पेशवाईची पुन्हां प्राणप्रतिष्ठा

करावयास झटतील असा त्याला भ्रम होता. परंतु पेशव्यांचा व छत्रपतींचा महाराष्ट्र, त्या वेळीं बर्फाप्रमाणें थंड होता! वारसाच्या अभावीं साताराचें राज्य तर अन्यायानें नुकतेंच खालसा झालें होतें, परंतु इंग्रज कंपनीच्या त्या अन्यायानें महाराष्ट्राला त्या वेळीं चीड आली नाहीं, व तात्याच्या साहाय्याला कोणीच कळवळून तळमळून धावलें नाहीं. परंतु तात्यानें आपलें कर्तव्य केलें, व आपल्या जवळचा शेवटचा शिपाई नाहींसा होईतोंपर्यंत, अतिशय बिकट परिस्थितींत इंग्रजाशीं युद्ध चालविलें, व आपली स्वामिनिष्ठा जगाला पटवून दिली.

मानसिंहानें तात्याची प्रथम भेट घेतली, व 'तीनचार दिवसांत मी थोडेसे शिपाई, कांहीं दारूगोळा, व थोडीबहुत अन्नसामुग्री घेऊन तुझ्या मदतीस येतों असें त्यास वचन दिलें. तूं मात्र तोंपर्यंत ही जागा सोडून जाऊं नकोस, कारण मग जंगलांत तुला धुंडाळून तुझी भेट घेणें अशक्यप्राय होतें,' असें त्यास बजावलें. तात्या त्याच्या भरवंशावर राहिला. सात एप्रिल १८५९ रोजीं मध्यरात्रीं मानसिंग इंग्रजी फौज घेऊन त्याच्या ठाण्यावर गुपचुप आला. तात्या टोपी शांतपणें झोंप घेत होता. आपलें कर्तव्य केलें असल्यामुळें तशा विपत्कालींही त्याच्या मनाला समाधान वाटत होतें, व त्यामुळें त्याला गाढ झोंप लागली होती. त्याला झोंपेंतच मीडसाहेबानें मोठ्या बहादुरीनें (वारे बहादुरी!) पकडलें! मानसिंहाला गेलेलें जमीनदारी राज्य बहाल करण्यांत आलें, व त्याच्या इंग्रजनिष्ठेची वाहवा झाली!

तात्याटोपीला शिप्री येथें नेण्यांत आलें व त्याच्यावर लष्करी कोर्टापुढें खटला करण्यांत आला. इंग्रजांविरुद्ध बंड पुकारून लढाई दिल्याचा एकच आरोप त्याच्यावर ठेवण्यांत आला होता. तात्यानें आपल्या बचावार्थ फारच सडेतोड जबानी दिली. तो म्हणाला, 'मी इंग्रजांचा नोकर कधींच नव्हतों, त्यामुळें मी बंडखोर ठरत नाहीं. मी इंग्रजी राज्यांत जन्मलों नाहीं, व इंग्रजांशीं राजनिष्ठ राहण्याची मी कधीं शपथही घेतली नाहीं. मी पेशव्यांचा नोकर व मी त्यांचेंच अन्न खाल्लें. त्यांच्याशीं राजनिष्ठ राहणें हेंच माझें कर्तव्य होतें, व तें मीं पूर्णपणें बजावलें. त्यांनीं आपलें गेलेलें राज्य परत मिळविण्यासाठीं खटपट चालविली व मी केवळ त्यांच्या आज्ञा पालन केल्या. खरा स्वामिभक्त सेवक, धन्याची आज्ञा पालन करणें हें एकच कर्तव्य जाणतो. पेशव्यांच्या आज्ञेनें व पेशव्यांच्या वतीनें मी तुमच्याशीं युद्ध केलें व अनेक समोरासमोर लढाया दिल्या. मी कोणाचा घातपात

केला नाहीं, किंवा कधीं इंग्रजांच्या बायकामुलांची हत्या केली नाहीं. युद्धांत माझा पराभव झाला, व मी तुमच्या हातीं लागलों, म्हणून मी दोषी ठरूं शकत नाहीं. शत्रूचा सेनापती हातीं लागल्यावर त्याच्याशीं जसें सन्मानाचें वर्तन करावयास पाहिजे, तसेंच तुम्ही माझ्याशीं ठेवणें योग्य ठरेल. युद्धांत जयापजय हा नशीबाचा खेळ आहे, परंतु शूरानें शूराला यथायोग्य मान देऊन त्याचा गौरवच केला पाहिजे. मी तुमचा प्रजाजन नव्हतों व नाहीं. मी पेशव्यांचा प्रजाजन आहें, व मी त्यांच्याशीं राजनिष्ठा व स्वामिभक्ती दाखविली, व त्यांच्या आज्ञा पालन केल्या. तेव्हां तुम्ही लादलेला बंडाचा आरोप मजवर मुळींच लागू होत नाहीं.'

परंतु या बाणेदार वीराच्या अपूर्व स्वामीभक्तीचें व युद्धकौशल्याचें कौतुक न करतां, तात्या टोपीला लष्करी कोर्टानें दोषी ठरवून फांशीची शिक्षा सुनावली व १८ एप्रील रोजीं त्याला फांशी देण्यांत आलें. याप्रमाणें या शूर, चतुर व दिलदार सेनापतीचा दुःखद अंत झाला. याच्या युद्धकौशल्याची अनेक इंग्रज सेनापतींनीं वाखाणणी केली आहे. मराठ्यांची गोरीला वॉरफेअर (छाप्याची छिपती लढाई) त्याला पूर्णपणें अवगत होती. संधी साधून तो अनेक शहरें सर करी व आपल्या फौजेला दाणापाणी, व दारुगोळा यांचा पुरवठा करून घेई. निरनिराळ्या ठिकाणांवर छापे घालून त्यानें खंडणी गोळा केली व आपल्या फौजेची गरज भागविली आणि हें सर्व, इंग्रज फौजा त्याला कोंडींत धरून त्याचा सारखा पाटलाग करीत असतां त्यानें केलें. नऊ दिवसांत ब्रिगेडीअर पार्कला २४० मैल व तितक्याच दिवसांत ब्रिगेडीअर समरसेटला २३० मैल त्यानें नाचविलें. कर्नल होम्सनें वाळवंटी मैदानांतून २४ तासांत ५४ मैल त्याचा पाठलाग केला, आणि ब्रिगेडिअर होनरनें ४ दिवसांत त्याच्या पाठीस लागून १४५ मैलांची मजल मारली, व समरसेटनें ४८ तासांत ७० मैल त्याचा पाठलाग केला. इतक्या झपाट्याच्या मजला इंग्रज फौज मारीत असतां देखील तात्या टोपी त्यांच्या हातीं लागला नाहीं. तेव्हां तात्याच्या धडाडीचें व तडफीचें वर्णन करावें तितकें थोडेंच होईल. राघो भरारीची आठवण या तात्या टोपीनें सर्वांना करून दिली. तात्या टोपीवर बंडाचा अपराध लागू करून फांशीची शिक्षा देणें कितपत न्याय्य होतें, याबद्दल केनें आपल्या ग्रंथांत चर्चा करून शंका प्रदर्शित केली आहे, व त्याच्या बाबतींत योग्य न्याय झाला नाहीं असें दर्शविलें आहे. परंतु उपयोग काय !

---

## प्रकरण २८ वें.

# दुहाती अत्याचार !

१८५७ सालच्या बंडांत जर कोणतीही गोष्ट मनाला लागून राहिली असेल तर ती त्या समयीं घडलेल्या अत्याचारांची होय. दिल्ली, झांशी व कानपूर येथें इंग्रजांच्या बायकामुलांची कत्तल करण्यांत आली. लढाईंत हजारों लोकांना मृत्यू आला तरी त्याचें कोणाला फारसें वाईट वाटत नाहीं, कारण लढाई म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूचें तांडव-नृत्यच होय. परंतु निरपराधी बायकामुलांची कत्तल झाली म्हणजे कोणालाही संताप येईल व त्याचें रक्त संतापानें उसळावयास लागेल. या निरपराध्यांच्या कत्तली मनुष्यजातीस कालिमा आणतात, आणि त्यांचा कितीही निषेध केला तरी तो अपुराच ठरेल. या कत्तलीबरोबरच स्त्रियांवर जर अत्याचार करण्यांत आले व त्यांच्या अब्रूची विटंबना करण्यांत आली, तर त्या नीचपणाला सीमाच नाहीं. १८५७ सालीं बंडवाल्यांनीं केलेल्या कत्तली व अत्याचार यांचीं तिखटमीठ लावून केलेलीं भडक वर्णनें, हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील विलायती वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालीं, व तीं सर्वस्वी खरीं असतील असें समजून इंग्लंडांतील जनता व हिंदुस्थानांतील गोरे लोक अतिशय खवळले व सुडाच्या बेफाम व बेछूट गोष्टी बोलूं लागले. परंतु पुढें बंडाचा वणवा शांत झाल्यावर जेव्हां या अत्याचारांची बारकाईनें चौकशी सुरू झाली, तेव्हां अनेक साक्षीपुराव्यानिशीं हे सर्व अत्याचार मिथ्या व काल्पनिक कादंबरीवजा ठरले. जस्टीन म्याकार्थीनें आपल्या प्रसिद्ध ऐतिहासिक ग्रंथांत लिहिलें आहे, " सुदैवानें, स्त्रियांवर केलेले अत्याचार व त्यांच्या झालेल्या विटंबना या गोष्टी खोट्या ठरल्या. कोणत्याही इंग्रज स्त्रीला नागडीउघडी करण्यांत आलें नाहीं, व कोणावरही जुलूमजबरदस्ती झाली नाहीं. इंग्रज स्त्रिया कैदेंत असतांना त्यांना धान्य दळावयाचें काम जबरीनें देण्यांत आलें. परंतु या शिक्षेला कोणी अत्याचार म्हणणार नाहीं." या बाबतींत आणखी हवे तेवढे उतारे व तेही इंग्रजांच्या ग्रंथांतीलच देतां येतील. बंडवाल्यांवर फासलेलें अत्याचाराचें काजळ याप्रमाणें पुसलें गेल्यावर, बायकामुलांची कत्तल हा एकच गुन्हा त्यांच्यावर शाबीत होतो. परंतु कोणत्याही देशांत बंड किंवा क्रांति झाल्यावर या गोष्टी निषेधार्ह असल्या, तरी दंगलींत त्या घडून येतातच. त्याबद्दल एकट्या हिंदी लोकांनाच दोष देण्यांत अर्थ नाहीं. हिंदी लोक गोऱ्या लोकांप्रमाणेंच माणसें आहेत. कांहीं इंग्रज ग्रंथकारांनीं वर्णन केल्याप्रमाणें,

गोरे तेवढे देव व काळे तितके राक्षस खास नाहींत. १८२१ सालीं ग्रीस देशानें टर्कीविरुद्ध बंड पुकारलें तेव्हां काय झालें! फिंडले आपल्या ग्रीस देशाच्या इतिहासांत म्हणतो, "शांतपणें वागून शेतीचा व्यवसाय करणारीं वीस हजार (बायका व मुलें मिळून) तुर्क–माणसें, निरपराधी असलीं तरी ग्रीक लोकांच्या रागास बळी पडलीं! त्यांची एकजात कत्तल करण्यांत आली!! खुद्द इंग्लंड व स्कॉटलंड देशांच्या पूर्वी आपसांत लढाया चालू असतांना इंग्रजांनीं स्कॉच लोकांवर काय कमी अत्याचार केले? कलोडनच्या लढाईनंतर ड्यूक आफ कंबरलंडनें काय विलक्षण अत्याचार केले. "माणसांची हत्या, स्त्रियांचे भ्रष्टाकार, मुलांची कत्तल व गांवांना आगी या अनेकविध घोर पातकांनीं त्यानें आपले हात विटाळले. पन्नास मैलांच्या टापूंत एक घर किंवा झोपडी उरली नाहीं व माणसांबरोबर जनावरांची देखील कत्तल करण्यांत आल्यामुळें सर्वत्र निर्मनुष्यच नव्हे, तर निर्जीव स्मशान झालें." १८२४ सालीं डेमेरारा येथें किंवा १८६५ मध्यें जमेकांत गोऱ्या लोकांनीं काळ्यांवर काय कमी अत्याचार केले? सारांश निरापराधी लोकांच्या अमानुष कत्तली करणारे राक्षस फक्त हिंदुस्थानांतच आहेत असें नाहीं.

आणि या कत्तली कोणीं केल्या? बंड झालें त्या वेळीं बंडखोर शिपाई गांवांतील तुरुंग फोडून आंतील कैद्यांना मोकळे करीत असत. या कैद्यांत थोडेसे सुस्वभावी परंतु दुर्दैवानें शिक्षा झालेले लोक असले, तरी यांच्यांत मुख्य भरणा चोर, दरवडेखोर, डाकू, खुनी यांचाच असे. झालेल्या बंडाळीचा फायदा घेऊन हे दुष्ट लोक वाटेल त्या क्रूर पापकर्मानें आपले हात बेधडक कलंकित करीत व लोकांवर आपली दहशत बसवीत. अनेक वेळां यांच्याकडे अशा दुष्ट कृत्यांचें पुढारीपण येई. कानपूरला अझीझन नांवाची एक बाजारबसवी स्वतांला बेगम म्हणवूं लागली, आणि कानपूरला जेव्हां इंग्रज स्त्रियांची कत्तल करावयास एकही हिंदी शिपाई तयार होईना, तेव्हां या दुष्ट कुलटेनें मुसलमान खाटिक जमा करून त्यांच्या करवीं त्या निरपराधी स्त्रियांची व अनाथ बालकांची कत्तल करविली. या दुष्ट व घातकी वर्तनाचा कितीही निषेध केला तरी तो थोडाच होईल. परंतु प्रत्येक राष्ट्रांत थोडेबहुत क्रूरकर्मे व हिंसक द्विपाद असतात, आणि बंडाळीच्या वेळीं समाजाचा त्यांच्यावरील वचक नाहींसा होऊन त्यांना मोकळें मैदान सांपडतें. परंतु त्यांच्या काळ्या वर्तनानें सबंद राष्ट्राची किंमत ठरविणें व राष्ट्रास दोष देणें हें खास अन्यायाचें ठरेल. बंडांत दिल्ली, कानपूर व झांशी या तीन ठिकाणींच काय त्या इंग्रजांच्या मोठ्या प्रमाणावर अशा कत्तली झाल्या. बंडवाल्यांनीं फक्त

इंग्रज तेवढेच वेंचून मारले असें नाहीं, तर हिंदी ख्रिस्ती लोकांनाही तोच भूर्दंड आपल्या धर्मांतराबद्दल भरावा लागला. इंग्रजांचा विचार सर्व हिंदुस्थान ख्रिस्ती करावयाचें आहे, अशी खोटी अथवा अतिशयोक्तीची अफवा सर्वत्र पसरली असल्यामुळें धर्मवेड्या बंडवाल्यांनीं प्रत्येक ख्रिस्ती माणसाला—मग तो काळा किंवा गोरा असो—आपला शत्रू लेखलें व त्याची कत्तल केली. दिल्ली व झांशी येथील कत्तली बंडाच्या पहिल्या वावटळींतच करण्यांत आल्या, आणि इंग्रजांच्या कांहीं निमकहलाल देशी शिपायांनींच निमकहराम होऊन आपले हात रक्तानें बरबटले. मोंगल बादशाहा, किंवा राणी लक्ष्मीबाई यांचा या कत्तलीशीं काडीमात्र संबंध नव्हता. उलट इंग्रजांच्या बायकामुलांना शक्य तेवढी मदत करण्याचाच त्यांनीं प्रयत्न केला. त्यांचे प्रयत्न त्यावेळीं फलद्रूप झाले नाहींत म्हणून त्यांना दोष देतां येणार नाहीं. कारण त्यावेळीं कोणाचाच पायपोस कोणाच्या पायांत नव्हता.

पण कानपूर येथील कत्तल फार निराळ्या स्वरूपाची आहे. सेनापती व्हीलरनें मातीचा किल्लेकोट उभारून आपलें व आपल्या बायकामुलांचें शक्य तेवढें संरक्षण केलें, व कित्येक दिवसपर्यंत वेढ्यांत सांपडल्यामुळें इंग्रजांच्या अत्यंत हालअपेष्टा झाल्या तरी त्यांनीं बंडखोरांना मुळींच दाद दिली नाहीं. बंडखोरांची प्रचंड संख्या व त्यांनीं केलेला तोफांचा भयंकर मारा, यांना न जुमानतां कानपूरच्या इंग्रजांनीं आपलें स्वतःचें अत्यंत शौर्यानें व चिकाटीनें बरेच दिवस रक्षण केलें. लढाईत, उन्हाची झळ लागून, उपासमारीनें व रोगराईनें अनेक इंग्रज बायकामुलें त्या वेढ्यांत मरण पावलीं, परंतु तो मातीचा जुजबी किल्लेकोट बंडवाल्यांच्या हातीं लागला नाहीं. अशा स्थितींत बंडवाल्यांनीं इंग्रजांशीं तह केला व त्यांना त्यांच्या बायकामुलांसह प्रयागकडे सुरक्षित जाऊं देण्याचें कबूल केलें. बंडवाल्यांच्या शब्दावर विश्वास ठेवून इंग्रज आपला आसरा सोडून गंगाकिनारीं आले. ह्यांच्यापैकीं कित्येक जखमी झालेले होते व त्यांच्याबरोबर बायकामुलांचें लटांबर होतें. बंडवाल्यांनीं तेव्हां विश्वासघात केला, व तेथें त्या शूर निधड्या छातीच्या इंग्रजांची कत्तल केली. त्यांना नावांत प्रथम बसूं दिलें व नंतर किनाऱ्यावरून त्यांच्यावर, ते असहाय्य स्थितींत असतां भडिमार केला. अनेक लोक मारले गेले. नंतर त्यांच्या स्त्रियामुलांना बिबीघरांत कैद करून ठेवण्यांत आलें. परंतु इंग्रजी सेना बाहेरून कानपूरवर चालून आली, तेव्हां घाईघाईनें त्या बिचाऱ्या दीन व दुर्दैवी जीवांची हत्त्या करण्यांत आली, व त्यांचीं प्रेतें एका विहिरींत फेकण्यांत आलीं. ह्या नामर्दाईच्या कृत्यानें बंडवाल्यांना काळिमा लागला

यांत संशयच नाहीं. कोणाच्या मतें झाली गोष्ट नानासाहेबांना मान्य नव्हती, व बंडखोरांनीं त्यांचे हुकूम धाब्यावर बसवून ही कत्तल केली हें क्षणभर खरें मानलें तरी, नानासाहेबांसारख्या थोर पेशव्याला व बंडाच्या पुढाऱ्याला त्या धामधुमींत आपल्या अनुयायांवर काडीमात्र वचक ठेवतां आला नाहीं, ही गोष्ट शिल्लक राहते. जेथें बडवाले नानासाहेबांपेक्षां अझीझन नायकिणीचा हुकूम शिरसावंद्य मानतात, तेथील अधःपात कसा वर्णन करावा ! कानपूरच्या विश्वासघातकी कत्तलीचा दोष प्रत्यक्षपणें नसला, तरी अप्रत्यक्षपणें नानासाहेब पेशव्यांना खास चिकटतो.

हिंदी लोक स्वभावतः राजद्रोही खास नाहींत. मग इंग्रजांचे निमकहलाल देशी शिपाई निकमहराम कसे बनले ? इंग्रजांनीं हिंदुस्थान देश तरवारीच्या जोरावर जिंकला, परंतु त्या तलवारी पेलणारे हात देशी शिपायांचे होते. जो पैसा देईल त्याची नोकरी बजवावी व आपल्याच भाईबंदांच्या गळ्यांवर खुशाल सुरी फिरवावी, असें शिक्षण ईस्ट इंडिया कंपनीनें देशी शिपायांना दिलें. औधमध्यें तेथील प्रजाजनांच्याच पलटणी उभारावयाच्या व त्याच पलटणी औधच्या नबाबाविरुद्ध उभ्या करून त्यांच्या जोरावर औध प्रांताचे लचके तोडावयाचे व वर खंडणी उकळावयाची, ही कंपनीची पूर्वापार चाललेली शहाजोग राजनीति होती. हिंदी लोकांचीं कोंबडी अपापसांत झुंजवून कंपनीनें हिंदुस्थानचें राज्य संपादन केलें. जो पैसा देईल तो मालक. त्याची आज्ञा मानतांना व पाळतांना धर्म व देश आणि भाईबंद यांचा मुळीं विचारच करावयाचा नाहीं, ही कंपनीची शिकवणूक ! पण १८५७ सालीं ही गुरूची विद्या अखेर गुरूलाच फळली ! हिंदी शिपायांना पैसा हें कुलदैवत वाटूं लागलें. द्रव्याकरितां द्रोह करणें पाप नाहीं अशी त्यांची भावना बनली होती. किंवा कंपनीनें स्वार्थांध होऊन त्यांची तशी भावना बनविली होती, असें म्हटल्यास अधिक शोभेल. मग दुसरीकडे लुटीचा संभव दिसतांच ते तिकडे धावून गेले तर त्यांत नवल कोणतें ? इंग्रजांविरुद्ध बंड करणें अधिक किफायतीचें वाटल्यामुळें शिपायांनीं इंग्रजांची नोकरी लाथेच्या ठोकरीसरशी जमीनदोस्त केली व बंडाची वेसण आपल्या नाकांत अडकवून घेतली. त्यामुळें त्यांच्या बंडखोरीला फारच थोडें निमित्त पुरलें, आणि बंडापूर्वी इंग्रजांचीं पापें कशीं सांचलीं होतीं याची जाणीव आरंभींच्या प्रकरणांतील चर्चा वाचून कोणालाही होईल. स्वभावतः राजनिष्ठ असलेले हिंदी शिपाई बंडखोर बनले व त्यांनीं अनेक अत्याचार करून आपले हात रक्तानें माखून घेतले. कंपनीचें पाप याप्रमाणें फळाला आलें !

बंडवाल्यांचे हात रक्तानें भरले असले तरी त्यांना दोष देणाऱ्या इंग्रजांचे हात कोठें शुभ्र होते ? इंग्रजांनींही अनेक अत्याचार केले व विलायतेंतील आणि हिंदुस्थानांतील इंग्रजी वर्तमानपत्रांनीं, बंडासंबंधी अवाच्या सवा लेख व खोट्या बातम्या छापून इंग्रज शिपायांना अत्याचार करण्यास प्रवृत्त केलें. दिल्ली, कानपूर, झांशी येथील प्रमुख कत्तली व इतर बारीकसारीक ठिकाणें जमेस धरून, इंग्रजांचे (एकंदर बायकामुलें धरून) जास्तींत जास्ती दोन हजार लोक बंडवाल्यांच्या कोपाला बळी पडले. परंतु मोबदल्यादाखल उलट इंग्रजांनीं जो रक्ताचा सडा देशभर शिंपडला त्याची वाट काय ? बंडांत हजर असलेल्या अनेक देशी लोकांच्या जबान्या या सुडाच्या हकीगती विस्तारानें देतात. बंड प्रत्यक्ष पाहिलेल्या व सुदैवानें बंडाच्या आगींतून वांचलेल्या कांहीं हिंदी गृहस्थांनीं आपले अनुभव त्या वेळीं ग्रथित करून ठेवले आहेत. त्यांपैकीं थोडेफार Modern Reviewत व इतरत्र प्रसिद्ध झाले आहेत, परंतु बरेच काळाच्या उदरांत इंग्रजांच्या भीतीनें दडले. कारण बंडासंबंधी हिंदी माणसानें लिखाण प्रसिद्ध करतांच इंग्रजांच्या नाकास मिरच्या झोंबत व ऐतिहासिक सत्याला त्यांच्या लेखी राजद्रोहाचें स्वरूप चढे. असे थोडेबहुत देशी लेख आजही उपलब्ध आहेत, परंतु ऐतिहासिक सत्यमापनाच्या कसोटीस लावतांना जगाच्या दरबारीं त्यांना योग्य किंमत कदाचित् देण्यांत येणार नाहीं, म्हणून खुद्द इंग्रज लेखकांच्या उताऱ्यांनींच हा गोरा सूड कसा होता याची कल्पना देण्याचा प्रयत्न येथें केला आहे. सर जॉन के आपल्या प्रसिद्ध इतिहासांत लिहितो,

" ६ जून रोजीं पास झालेला लष्करी कायदा पुकारण्यांत आला. इंग्रज लष्करी व मुलकी अधिकाऱ्यांची, हिंदी लोकांचे—मग ते कोणत्याही वयाचे किंवा पुरुष किंवा स्त्रिया असल्या तरी, न्यायनिवाडे करण्यांत किंवा न करतांही त्यांना फांशी देण्यांत अहमहमिका सुरू झाली. उत्तरोत्तर ही रक्ताची तहान वाढतच चालली. गव्हर्नर जनरलनें ब्रिटिश पार्लमेंटाला पाठविलेल्या कागदपत्रांत ही गोष्ट नमूद आहे कीं, अपराधी बंडखोरांबरोबरच, निरपराधी वृद्ध, स्त्रिया व मुलें यांचेंही बलिदान झालें. त्यांना मुद्दाम फांसावर चढविण्यांत आलें नाहीं. परंतु गांवेंचीं गांवें उभीं जाळण्यांत आलीं तेव्हां ते मृत्युमुखीं पडले व कांहीं चुकून बंदुकांना बळी पडले. आम्ही कोणांवर दयामाया दाखविली नाहीं, व हिंदी लोकांच्या शरीरांची गोळ्या झाडून चाळणी करण्यांत फार गंमत येते, अशी बढाई इंग्रज लोक उघड उघड मारूं लागले व आपल्या मित्रमंडळीला आपलीं हीं असलीं बडेजावीचीं कृत्यें लिहून कळविण्यांत पुरुषार्थ मानूं लागले. उच्च सरकारी अधिकाऱ्यांच्या खासगी पसंतीनें प्रसिद्ध

झालेल्या एका पुस्तकांत असें म्हटलें आहे कीं, तीन महिनेपर्यंत आठ गाड्या रात्रंदिवस चौरस्त्यावर किंवा बाजारांत फांशीमुळें लटकत असलेलीं प्रेतें जमा करण्यांत गुंतल्या होत्या. सहा हजार लोकांना याप्रमाणें सहजासहजीं मुक्ती मिळाली व तीही सहजगत्या ! × × × मिस्तर चेंबर किंवा मिस जेनींग्ज यांना एका काळ्या इसमानें तोडून टाकलें हें वाचून इंग्रज ज्याप्रमाणें संतापानें लाल होतात, त्याचप्रमाणें आपल्याला अपरिचित नांवें असलेल्या अनेक हिंदी लोकांच्या स्त्रिया, माता व मुलें इंग्रजांच्या सुडाला बळी पडलीं, या गोष्टी आपल्याविरुद्ध देवाच्या दरबारीं नमूद आहेत, हें विसरतां कामा नये. ''

कर्नल नीलनें तर कलकत्त्याहून प्रयागास चालून जातांना बंडवाल्यांना धक्का बसविण्यासाठीं गांवेंच्या गांवें जाळलीं व हजारों माणसें सबंध रस्ताभर दुतर्फा बाजूस असलेल्या झाडांवर फांशीस लटकावून दिलीं. त्याच्याच पत्रावरून निदान पांच हजार लोकांचा त्यानें अशा तडकाफडकी रीतीनें निकाल लावला. नीलची याप्रमाणें स्वदस्तुरची कबूली असल्यामुळें या कत्तलीचा प्रश्नच उरत नाहीं. कानपूरचें हत्याकांड कानीं आल्यावर संतप्त झाल्यामुळें नीलच्या हातून हे अत्याचार घडले, असें मुळींच नाहीं. कानपूरची अघोरी कत्तल होण्यापूर्वीच, नीलनें केवळ देशी लोकांवर इंग्रजी सत्तेचा दरारा स्थापन करण्याकरितां हे उपाय योजले. इंग्रज इतिहासकारांपैकीं कांहींनीं नीलच्या कबुलीजबाबावर लढविलेली मल्लिनाथी फार मजेदार आहे. ''नील केवढा धर्मपरायण पुरुष—खरा खरा ख्रिस्ती तो! त्याच्या हातून असे अत्याचार होणें शक्यच नाहीं. अतिश्रमामुळें थकून उत्पन्न झालेल्या भ्रमिष्ट मनःस्थितींत त्यानें बहुधा ही अतिशयोक्तीची कबुली ईश्वराला संतुष्ट करण्याकरितां दिली असावी.'' काय मजेदार कोटीक्रम हा! परंतु ख्रिस्ती लोक त्या वेळीं सुडानें प्रेरित होऊन ख्रिस्ती धर्माच्या आज्ञा साफ विसरले होते. 'निकलसनसारख्या शूर व तरूण सेनापतीचा देखील, हातीं लागतील त्यांना ठार करावयाचा व त्यांचा तडकाफडकी सोक्षमोक्ष लावावयाचा बाणा होता', असें कूपर लिहितो. मॅजेंडीनें आपल्या पत्रांत लिहिलें आहे कीं, 'हातीं लागलेल्या लोकांना गोळ्या घालण्यांत किंवा फांशी देण्यांत आमचा सर्व दुपारचा वेळ खर्च होत असे. निकोलसननें—ज्याचें वर्णन **ईश्वराचा एक शांतवृत्तीचा परंतु पराक्रमी सेवक,** असें इतिहासकारांनीं केलें आहे—एडवर्डसाहेबाला एका पत्रांत लिहिलें कीं, "बंडखोरांना जीवंत जाळण्याचें किंवा त्यांची कातडी सोलून काढण्याचें

एखादें बील लार्डसाहेबाकडून पास करून घेतलें पाहिजे. अत्याचार करणारे बंडवाले केवळ फांशीच्या साध्या शिक्षेवर सुटणार या कल्पनेनें मला वेड लागतें." पुढें एका पत्रांत तो लिहितो, "बंडवाल्यांना हालहाल करून मारिलें पाहिजे. बायबलमध्यें देखील अपराध्याला फटके मारण्याबद्दल अनुज्ञा आहे. × × × × जर माझ्या हातीं अधिकार असता तर मी या लोकांचे कल्पनातीत हालहाल केले असते, व शांत वृत्तीनें आणि माझ्या सदसद्विवेकबुद्धीला न दुखवतां मरणाला दुसऱ्या दिवशीं तयार झालों असतों." काशीचे कमिशनर हेनरी टकर यांना तर स्पष्टपणें असें लिहिण्यांत आलें कीं, "पूर्वेकडील देशांत लोकांच्या मनांत प्रथम दारुण भीति उत्पन्न करून राज्यकर्त्यांविषयीं दरारा प्रस्थापित केला पाहिजे. परंतु मूळच्या तुमच्या दयाळु स्वभावामुळें हें कार्य तुमच्या हातून कितपत पार पडेल याबद्दल शंका वाटते." केच्या वर्णनाप्रमाणें तर इंग्रज स्वयंसेवकांच्या टोळया, लोकांना फांशी देण्याकरितां प्रयाग–काशीहून बाहेर पडत व भोंवतालच्या खेड्यापाड्यांत हे झटपट चौकशीचे फार्स उरकून लोकांना फांशी देत, व झाड प्रेतांनीं उत्तम प्रकारें शृंगारलें म्हणून बढाई मारीत. ख्रिस्ती धर्माचीं उच्च तत्वें गोऱ्यागोऱ्यांचा जेथें संबंध येईल तेथेंच उपयोगांत आणावींत; काळयागोऱ्यांचा संबंध आला म्हणजे त्यांना पार गुंडाळून ठेवून अनन्वित वर्तन करावें, असा इंग्रजी अधिकाऱ्यांचा त्या वेळीं पायंडा पडला होता. युरोपियन लोकांच्या या अमानुष वर्तनानें संतापून लार्ड क्यानिंगनें महाराणी व्हिक्टोरियाला लिहिलें, "ज्या शहाण्यासुर्त्या, सुशिक्षित लोकांनीं आपल्या वर्तनानें इतरांना उदाहरण घालून द्यावें, त्यांच्यांत सारासार विचार सोडून सुडाची अशी दुष्ट भावना प्रबल झाली आहे कीं, आपल्या देशबांधवांचें वर्तन पाहून प्रत्येकाला लज्जेनें खालीं मान घालावी लागेल. चाळीस ते पन्नास हजार लोकांना फांशी देणें किंवा गोळ्या घालून ठार मारणें न्याय्य किंवा शक्यदेखील नाहीं, या गोष्टीचा विचार दहांत एकदेखील करीत नाहीं." महाराणी व्हिक्टोरियानें या पत्राला उत्तर दिलें, "येथील लोकदेखील हिंदुस्थानविषयक बाबींत, एकंदरींत ख्रिस्ती धर्माला लांछनास्पद अशा भावना धरतात व मतें प्रगट करतात. लॉर्ड क्यानिंगला या बाबतींत जें दुःख झालें असेल व जो संताप आला असेल, त्यांत राणीदेखील त्याची वांटेकरी आहे." २१ आक्टोबर १८५७ च्या अंकांत टाइम्सनें लिहिलें, "रणांगणावर शिपायांचा नायनाट करणें हा पुष्कळांना बंडाचा अगदीं पुळचट असा शेवटचा अध्याय वाटेल." बंडवाल्यांच्या नायनाटापेक्षां

बंडाचा कांहीं तरी अधिक रंगदार शेवट व्हावा, अशी त्या वेळच्या इंग्रजांची उठावणी होती. त्यामुळें इंग्रज शिपायांच्या व त्यांच्या अधिकाऱ्यांच्या हातून अनेक अत्याचार झाले. या अत्याचारांचा रसेलनें मोठ्या धीटाईनें निषेध केला. त्यानें कानपुराहून पत्र लिहिलें, "सूड घेण्याचे हे राक्षसी प्रकार ख्रिस्ती धर्माला मुळींच शोभत नाहींत. मुसलमान लोकांना डुकराच्या कातड्यांत शिवून बंद करणें, डुकराची चर्बी त्यांच्या अंगभर चोपडणें व तशा स्थितींत त्यांना तोफेच्या तोंडीं देऊन परलोकास पाठविणें, हिंदू लोकांकडून त्यांना धर्मदृष्ट्या निषिद्ध असलेलीं कृत्यें मृत्यूपूर्वी करविणें–या गोष्टी आम्हांला खरोखरच लांछनास्पद आहेत. कैद्यांना अशा प्रकारच्या मानसिक यातना देणें व त्यांचे धर्मपर हाल करणें–कोणत्या तोंडानें या अनधिकारी गोष्टी करून आम्ही युरोपला तोंड दाखवूं ?" एका पाद्री साहेबाच्या बायकोनें मोठ्या ऐटींत लिहिलें आहे, "शिपायांनीं पुष्कळसे कैदी पकडले व त्यांच्याकडून जबरीनें चर्चची इमारत झाडवून घेतली. त्यांच्या जातीला व धर्माला विटाळ पडत असल्यामुळें ते कांकूं करीत होते, परंतु संगिनींच्या जोरावर त्यांच्याकडून तें कृत्य करविण्यांत आलें. पुष्कळांना वाटलें कीं आपण चुकारतदूरणा न करतां निमूटपणें ही गोष्ट केली, तर नशीबाची फांशीं चुकेल व जीव वांचेल. परंतु ती त्यांची समजूत चुकीची ठरली. कारण त्यांना आपला धर्म बुडवूनही अखेर फांशीं जावें लागलें." सारांश, बंडखोरांना निष्ठुरपणें कडक शिक्षा देण्यांत येऊन त्यांचें इहलोकींचें वास्तव्य संपुष्टांत आणण्यांत येत असेच, परंतु मरतांना मनाचें समाधान व धार्मिक शांततादेखील त्यांच्या वांट्यास येऊं देत नसत. कारण धर्मनिषिद्ध कृत्यें हातून घडल्यामुळें परलोकचें सुखदेखील आपणाला अंतरलें, या कल्पनेनें मरतांना कैद्यांना अत्यंत मानसिक यातना भोगाव्या लागत. शारीरिक हालांचें महत्त्व या यातनांपुढें कांहींच नव्हतें.

मेजर रेनाड कानपूरला तेथील वेढ्यांत सांपडलेल्या इंग्रजांच्या मदतीकरितां घाईनें धावून जात असतां, कर्नल नीलनें नकाशांत त्याला "रस्त्यावरील कांहीं गांवें दाखवून दिलीं, व त्यांची जाळपोळ करून तेथें राहणाऱ्या सर्व रहिवाशांची सरसकट कत्तल करण्याची आज्ञा केली. बंडखोर पलटणींतील सर्व शिपाई, जे आपली हालहवाल नीट रीतीनें देऊं शकणार नाहींत त्यांना फांशीं देण्यांत यावें. फत्तेपूर शहर ताब्यांत घेऊन तेथील पठाण–पुरा जमीनदोस्त करून, सांपडतील त्यांची कत्तल उडवावी. जर तेथील प्रमुख बंडखोर छोटेसाहेब हातीं लागले तर त्याचें डोकें कापून तें शहरांतील एखाद्या मुख्य इमारतीवर लटकावून द्यावें." सेनापतीच्या

च्या आज्ञा पालन करण्यांत वाटेंत बराच वेळ मोडल्यामुळें, रेनाड कानपूरला योग्य वेळीं जाऊन पोहोंचूं शकला नाहीं, व त्यामुळें सेनापती व्हीलर व त्यांचे सैनिक यांची लवकर सुटका न झाल्यामुळें, त्यांना आपल्या प्राणांस मुकावें लागलें. कानपूरची अघोरी कत्तल होण्यापूर्वींच्या या गोष्टी आहेत. सारांश, बंड मोडतांना इंग्रजांनीं काडीची दयामाया दाखविली नाहीं. इंग्रजांचें वर्तन जर उदार व दयाळुपणाचें असतें, तर बंडाचा बींमोड फार लवकर झाला असता व रक्ताच्या नद्या वाहिल्याही नसत्या. २४ आक्टोबर १८५७ च्या टाईम्समध्यें मांटगामेरी मार्टिननें लिहिलें, "बंडवाले शरण येऊन दिल्ली शहर केव्हांच आमच्या ताब्यांत आलें असतें. परंतु बंडवाले शरण येणार कसे? कारण त्यांची कत्तल केल्याशिवाय इंग्रज शिपायांचें समाधान होणार नाहीं, ही गोष्ट त्यांना पुरतेपणीं कळून चुकली होती. × × × आणि आमच्या हातून त्यांना तेंच मिळेल." ग्रीथेडनें देखील एका पत्रांत लिहिलें आहे कीं, ."एका मौलवीनें मोठ्या धीटाईनें बंडवाल्यांना उपदेश केला कीं, तुम्हाला जय मिळण्याची काडीमात्र आशा नाहीं. तेव्हां तुम्ही इंग्रजांना शरण जाऊन तह करा. परंतु इंग्रजांना तहाची जरूरी नव्हती. मृत्यूशिवाय दुसरा मित्र बंडखोरांना उरला नव्हता." बंडवाले मग जीवावर उदार झाले तर त्यांत नवल तें कोणतें? औधच्या बेगमसाहिबानें १८५८ सालच्या आरंभीं आपल्या लखनौ येथील बंडखोर सैनिकांना उद्देशून जो जाहीरनामा प्रसिद्ध केला त्यांत तिनें म्हटलें, "इंग्रजांनीं लोकांच्या अपराधांची क्षमा केली, ही गोष्ट कोणी कधीं स्वप्नांत देखील झालेली पाहिली नसेल!" कानपूरच्या कत्तलीपूर्वी "बनारसला कांहीं पोरें बंडाचें निशाण फडकवीत व बाजा वाजवीत वाजवीत रस्त्यानें मिरवीत गेलीं. या अपराधाबद्दल त्या सर्वांना लष्करी कोर्टानें बहुमतानें फांशीची शिक्षा सुनावली. लष्करी कोर्टांतील एका न्यायाधीशाच्या डोळ्यांना या प्रकारानें पाणी आलें, व त्या मुलांची शिक्षा रद्द करण्याबद्दल त्यानें मुख्य अधिकाऱ्याची अतिशय विनवणी केली, परंतु त्याच्या विनंतीचा कांहींच उपयोग झाला नाही." बंडवाले यामुळें जीवावर उदार होऊन लढत होते व मृत्यू त्यांच्यापुढें आ वासून उभा असल्यामुळें, त्यांच्या हातूनही अनेक अत्याचार घडले. "खास कानपूरच्या कत्तलीची गोष्ट घेतली तरी, हॅवेलॉक बंडवाल्यांचा सर्वत्र पराभव करीत कानपूरवर चालून आला तेव्हांच निराशेनें व्याप्त झालेल्या शिपायांनीं इंग्रज बायका मुलांची स्वतः कत्तल केली नसली, तरी खाटीक त्यांची कत्तल करीत असतां त्यांना प्रतिबंधही केला नाहीं. पूर्वी बेत

ठरवून तो अमलांत आणून ही कत्तल झाली असें थोडेंच आहे ?" मांटगामेरी मार्टिन म्हणतो, "इंग्रज बायकामुळें बंडवाल्याकडे ओलीस आहेत असें एकदां ठरवून टाकलें असतें तर त्यांची कत्तलही झाली नसती, व कैदेंतही त्यांची व्यवस्था नीट ठेवण्यांत आली असती. परंतु बंडखोरांशीं असें बोलणेंचालणें करावयास इंग्रज तयारच नव्हते. बंडवाल्यांना जीवदान देण्याची गोष्टच त्या वेळीं कोणाला रुचत नव्हती. हिंदुस्थान देशभर विखुरलेल्या इंग्रजी ठाण्यांतील लोकांच्या मनोवृत्ती तपासल्या असत्या तर आरंभीं देशी फौजेवर आंधळेपणाचा विश्वास व बेफिकीरी, बंड झाल्यावर अवास्तव व फाजील धास्ती, आणि शेवटीं लष्करी कायदा उर्फ अविचारी कत्तल—असा चित्रपट दिसला असता."

कानपूरच्या विहिरीप्रमाणें पंजाबांत उजनाला येथेंही एक विहीर आहे व त्या वेळचे अमृतसरचे डेप्युटी कमीशनर कूपरसाहेब, यांचें नांव नानासाहेबांइतकेंच इतिहासप्रसिद्ध व्हावयास हवें होतें. परंतु इंग्रज इतिहासकार त्यांच्या पराक्रमाचें वर्णन आपल्या ग्रंथांतून मुद्दाम वगळतात व त्यामुळें बिचाऱ्या कूपरची प्रसिद्धीची हौस आजवर पूर्ण झाली नाहीं. लाहोर येथील २६ नंबरच्या देशी पलटणीनें बंड केलें व मेजर स्पेन्सर या अधिकाऱ्याला ठार मारलें. प्रकाशसिंग नांवाच्या शिपायानें बंडाचा पुढाकार घेतला. तेथील इंग्रजांना ही गोष्ट कळतांच त्यांनीं व शीखांनीं मिळून बंडखोरांवर सारखा तोफांचा मारा केला व १२०० शिपायांपैकीं बहुतेकांना यमलोकीं रवाना केलें. उरलेले शिपाई आपला जीव घेऊन पळाले, व रावीनदी उतरून पैलतीर गांठण्यास बघूं लागले. परंतु अमृतसरहून कूपरसाहेबानें त्यांचा पाठलाग करून त्यांना जेरीस आणलें. सरासरी दीडशें लोक नदींत बुडून किंवा गोळ्या लागून ठार झाले. एका दिवसांत अन्नपाण्यावांचून ४० मैलांची मजल मारल्यामुळें बंडवाले अतिशय थकून गेले होते, व पळण्याचें आणि नदी पोहून जाण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत उरलें नव्हतें. तेव्हां त्यांनीं नदींतील एका लहानशा बेटाचा आश्रय घेतला. कूपरसाहेबांनीं नदींत त्यांच्या मागोमाग होड्या घातल्या व त्यांना गांठलें. कूपरसाहेब जवळ आलेले पाहतांच पन्नाससाठ बंडखोरांनीं नदींत उड्या टाकल्या व शिपाई त्यांच्यावर गोळ्या झाडून त्यांना ठार करणार तोंच, कूपरसाहेबांनीं त्यांना ठार न मारतां जिवंत पकडण्याचा आपल्या सैनिकांना हुकूम दिला. बिचारे दोन्ही हात जोडून साहेबाला शरण आले व दयाळुपणाबद्दल साहेबाला त्यांनीं धन्यवाद दिले. कारण त्यांना वाटलें कीं साहेब आपला कोर्टांत न्याय करून कैदेच्या शिक्षा फर्मावील.

एकंदर २८२ बंडखोर कूपरसाहेबाच्या हातीं लागले. कूपरसाहेब रुक्ष माणूस नव्हता. तो ईश्वरभक्तिपरायण आणि काव्यमय वृत्तीचा माणूस होता! कारण त्याच्याच शब्दांत या प्रसंगाचें वर्णन करावयाचें म्हणजे, " सूर्य आपल्या सोनेरी किरणांनीं पाण्याला झळाळी देत होता, आणि हात जोडून दीनमुद्रेनें उभ्या राहिलेल्या बंडवाल्यांच्या सावल्या त्या चमकणाऱ्या जलांत लांबवर प्रतिबिंबित झाल्या होत्या. बंडवाल्यांनीं मनांत आणलें असतें तर पुनः एकदां धुमश्चक्री उडून आमचें थोडेंबहुत नुकसान व प्राणहानि झाली असती. परंतु ईश्वर आमच्या बाजूस असल्यामुळें त्यांना तशी बुद्धी न होतां ते निमूटपणीं आमच्या स्वाधीन झाले. इतक्यांत पावसाच्या जोराच्या सरी आल्यामुळें त्यांचा आम्ही ताबडतोब निकाल लावूं शकलों नाहीं. परंतु पाऊस थांबल्यावर विखुरत्या ढगांमधून चंद्राचें सुंदर मुख बाहेर डोकावून पाहूं लागले व जमीनीवर सांचलेल्या पाण्याच्या असंख्य थारळांत व झुळझुळणाऱ्या चिमुकल्या ओहोळांत चंद्रबिंबांच्या अनेक प्रतिमा दिसूं लागल्या, तेव्हां बंडखोरांना त्यांच्या आयुष्याचा शेवट सटवाईनें त्यांच्या भालीं कसा लिहिला आहे हें दाखविण्याकरितांच जणूं चंद्रानें हा सहस्रमुखी अवतार घेतला असें वाटूं लागलें." कूपरसाहेबाचें काव्यमय वर्णन बाजूस सारून सरळ बोलावयाचें म्हणजे, त्या रात्रीं सर्व बंडखोरांना एका लहानशा कोटडींत डांबून ठेवण्यांत आलें. ता. १ आगस्ट रोजीं सकाळीं शीख शिपायांच्या मदतीनें कोठडींतून त्या दुर्दैवी कैद्यांना हळूहळू बाहेर काढण्यांत येऊन, त्यांच्या दहा दहा जणांच्या टोळ्या करण्यांत येऊन त्यांना गोळ्या घालून ठार करण्यांत येऊं लागले. याप्रमाणें १५० कैद्यांची कत्तल झाल्यावर त्या भयंकर देखाव्यानें गोळ्या घालणाऱ्या शिपायांपैकीं एकाला चक्कर आली, तेव्हां घटकाभर विश्रांतीदाखल म्हणून या भयानक नाटकाचा पडदा पाडण्यांत आला. थोड्या वेळानें दुसऱ्या अंकाला सुरवात झाली. २३७ लोक ठार मारण्यांत आले, परंतु उरलेले कैदी कांहीं केल्या खोलीच्या बाहेर येईनात. तेव्हां कूपरसाहेबाला आश्चर्य वाटलें, कारण आधल्या रात्रीं त्यानें स्वतः मोजून २८२ कैदी आंत कोंडले होते. खोलीचे दरवाजे सताड उघडून आंत जाऊन पाहतात तों काय, आंत ४५ कैदी थकवा, भूक, तहान, भीती व उष्णता यामुळें मरून पडले होते. एका दिवसांत लढाईनंतर ४० मैलांची मजल मारून ते थकले होते. परंतु त्यांना कैद केल्यावर त्यांची कोणी विचारपूस करून पाण्याचा थेंबही पाजला नाहीं, मग अन्नाची गोष्ट दूरच राहिली. तशा स्थितींत ती खोली लहान असल्यामुळें सर्वांना पुरेशी हवादेखील रात्रीं मिळाली नाहीं.

कलकत्त्याच्या अंधारकोठडीची ही नवीन विलायती आवृत्ती काढून, कूपरसाहेबानें सुराजुद्दौल्याचा पुरता नकशा उतरला. तीं प्रेतें बाहेर उजेडांत फरफटत आणण्यांत आलीं. शिपायांची गोळ्या घालण्याची मेहनत अनायासेंच वांचली, व काडतुसांचीही बचत झाली. आतां या प्रेतांचें काय करावें हा कठिण प्रश्न कूपरसाहेबापुढें येऊन पडला. परंतु त्याच्या सुदैवानें जवळच एक खोल कोरडी विहीर असल्यामुळें तीं प्रेतें त्या विहिरींत लोटण्यांत आलीं. विहिरींत पाणी नसल्यामुळें रोगराई पसरण्याचा संभवही उरला नाहीं. कूपरसाहेबाला या आपल्या पराक्रमाची इतकी धन्यता वाटली कीं, त्यानें त्याचें सविस्तर वर्णन केलें आहे. जान लॉरेन्सनें कूपरचें तत्काळ अभिनंदन केलें. लारेन्सनंतर राबर्ट मांटगामेरी पंजाबचा लेफ्टनंट गवर्नर झाला. त्यानेंही कूपरला पत्र लिहून त्याच्या "पराक्रमाचा गौरव केला, व तुझ्या पराक्रमानें आणि तडकाफडकीच्या बाणेदार वर्तनानें यापुढें पंजाबभर शांतता राहील व उरलेल्या देशी पलटणी बंडांत सामील होणार नाहींत," अशी आशा व दृढ विश्वास प्रकट केला. मांटगामेरी कूपरला आणखी पुढें लिहितो, "कालपर्यंत येथील दुसऱ्या तीन पलटणी डळमळीत होत्या, परंतु आतां त्या राजनिष्ठेपासून खात्रीनें चळणार नाहींत. त्या चळल्या तर अर्थातच मला बरें वाटेल, कारण मग त्यांपैकीं एकही मनुष्य मी मोकळा जाऊं देणार नाहीं." मांटगामेरीनें कूपरला लिहिलें कीं, "थोडेसे लोक येथेंही माझ्याकडे पाठवून दे, म्हणजे अमृतसरला काय घडलें याचें वर्णन ते येथें सर्वांसमक्ष करतील, व त्याशिवाय तुझ्याकडील बातमीवर येथील लोकांचा पूर्ण भरवंसा बसणार नाहीं. शिवाय येथील सैन्यावर वचक बसविण्याकरितां थोडेसे लोक उदाहरणादाखल फांशी देण्याकरितां मला अगत्य हवे आहेत." एका शिपायाला इतक्या जखमा लागल्या होत्या कीं त्याला धड चालतां येत नव्हतें. शिवाय ४१ लोक कूपरनें इकडून तिकडून गोळा केले व वरिष्ठाच्या हुकुमाप्रमाणें त्या ४२ जणांची लाहोरला ताबडतोब रवानगी करून दिली. तेथें त्या सर्वांना तोफांच्या तोंडीं देऊन उडविण्यांत आलें. "याप्रमाणें ४८ तासांच्या आंत ५०० लोक कायदेशीर रीतीनें जगांतून नाहींसे झाले," असें कूपर अखेर लिहितो व शेवटीं सर्वांना बजावतो कीं, "कानपूरला एक विहीर आहे खरी, परंतु उजनाला येथेंदेखील एक विहीर आहे" ही गोष्ट लक्षांत ठेवा. ग्रीथेडनें यासंबंधीं दिल्लीहून पत्र लिहिलें कीं, "दोघां इंग्रजांच्या वधाबद्दल ५०० लोकांची परलोकीं कायदेशीर रवानगी करण्यांत आली, ही गोष्ट सर्वांच्या मनांत उदाहरणादाखल चांगली ठसेल! कूपरचें प्रथम सर्वांनीं अभिनंदन केलें,

तरी एकंदर सविस्तर हकीगत कळतांच चोहोंकडून त्याचा निषेध होऊं लागला व पुढें पुढें तर इंग्रजांना त्या गोष्टीची लाज वाटूं लागून इतिहासांतून ते कूपर–पुराणाच्या नामनिर्देशदेखील करीनासे झाले. परंतु असें कां व्हावें? सर्व देशांत कांहीं असे राक्षसी वृत्तीचे लोक असतात. नानासाहेब पेशव्यांचा उठल्यासुटल्या निषेध करून त्याला शिव्यांची लाखोली वाहणाऱ्या इंग्रज इतिहासकारांनीं, कूपरचा पराक्रम दृष्टिआड कां करावा? नानासाहेबांच्या कृत्याबद्दल अखिल हिंदी राष्ट्राला दोष देणें जितकें गर्ह्य, तितकेंच कूपरबद्दल इंग्रजी राष्ट्राला दोषी ठरविणें चुकीचें ठरेल, हें आम्हांस कळतें.

शीख लोकांचा व मुसलमानांचा मूळचा द्वेष, कारण शीखांची मोगल बादशहांनीं, विशेषतः औरंगजेबानें फार छळणूक केली होती. शिवाय, मुसलमान व पुरभय्या शिपायांच्या देशी पलटणींनीं इंग्रजांच्या बाजूनें लढून शीखांचा पराभव करून पंजाबचें स्वातंत्र्य हरण केलें, ही गोष्ट शीख विसरले नव्हते. त्यांनींही बंडांत सुडाचे जुने बेत उगवून घेतले. मावब्रे थॉमसननें सर हेनरी कॉटनला एक आपला अनुभव सांगितला, " एकदां एक शीख शिपाई माझ्या तंबूंत आला व मला सलाम करून म्हणाला, ' हुजूर, कैद्यांची व्यवस्था आम्ही कशी लावली हें पाहण्याची तुम्हाला इच्छा असेल. ' मी तात्पुरत्या तुरुंगाकडे ताबडतोब गेलों व तेथें जाऊन पाहिलें तों कैद्यांना उघडें करण्यांत येऊन त्यांच्या आंगभर डोक्यापासून पायापर्यंत, शिपाई लालभडक सांडशांनीं डाग देऊन त्यांना भाजून काढीत होते. त्यांच्या त्या यातना मला पाहवेनात, म्हणून मी आपल्या पिस्तुलाच्या गोळ्या त्यांच्या मस्तकांत झाडून त्यांना त्या यमपुरींतून कायमचे मुक्त केलें. " मोंगलांचें दिल्ली शहर सर करण्यांत शीखांनीं विलक्षण शौर्य दाखविलें, व शहर लुटून आणि सांपडतील त्या रहिवाशांना ठार करून आपला जुना राग शांत केला, आणि शीख गुरूंच्या तेथें झालेल्या हत्यांचा पुरापुरा सूड उगविला. इंग्रजांनीं त्यांच्या मनोरचनेचा बंड मोडण्याच्या कामीं पुरापुरा उपयोग करून घेतला. "दिल्ली येथें एका बंडखोर शिपायाला, शीख व युरोपीयन शिपायांनीं मिळून संगिनींनीं त्याच्या तोंडावर प्रथम अनेक जखमा करून, नंतर त्याला शेकोटीवर जीवंत जाळलें, व आपण भोंवतालीं शेकत, गप्पा मारीत व ती मौज पहात स्वस्थ बसले!" या प्रसंगाचें लेफ्टनंट मॅजेंडीनें केलेलें वर्णन वाचलें म्हणजे अंगावर कांटा उभा राहतो, व आपण एकोणिसाव्या शतकांतील इतिहास वाचीत आहों कीं काय असा क्षणभर संशय येतो. दिल्ली, कानपूर, झांशी व लखनौ या चार ठिकाणीं इंग्रजांनीं

हिंदी लोकांची सरसहा कत्तल केली. यापैकीं पहिल्या तीन ठिकाणीं इंग्रज बायका-मुलांची बंडखोरांकडून प्रारंभीं कत्तल झाली असल्यामुळें, तीं शहरें जिंकून घेणाऱ्या इंग्रज शिपायांची सुडाची भावना प्रबळ होऊन, त्यांचीं मनें त्यांच्या ताब्यांत राहिलीं नाहींत असें म्हणतां तरी येईल. परंतु लखनौ येथील कत्तलीला हीदेखील सबब सांगतां येण्यासारखी नाहीं. नबाबांचें राज्य इंग्रजांनीं खालसा केलें म्हणून, बेगमेचा अर्थात् पर्यायानें नबाबाचा पक्ष घेऊन शिपाई लढावयास सज्ज झाले. तेथें इंग्रजांची कत्तल झाली नव्हती, परंतु शहर घेतल्यानंतर संगिनीचें पाणी सांपडेल त्याला पाजण्यांत आलें व संगिनींतून सुटले त्यांना दोरीची दीक्षा मिळाली. जंगबहादूरच्या हाताखालील गुरख्यांनींच पांच हजार लोकांचे बळी घेतले. कारण औधमधूनच नेपाळवर मागें शिपायांच्या पलटणी चालून गेल्या होत्या, व त्यांच्या साहाय्यानेंच इंग्रजांनीं नेपाळचा पराभव केला होता. शीखांना व गुरख्यांना इंग्रजांवर आपला राग काढतां आला नाहीं, तरी **दैवो दुर्बलघातकः** या न्यायानें हिंदी बंडखोर शिपाई मात्र त्यांच्या रागाला बळी पडले.

दिल्ली शहर इंग्रजांच्या ताब्यांत आल्यावर " किल्लेकोटाच्या आंत सांपडलेल्या सर्व काळ्या लोकांना कंठस्नान घालण्यांत आलें, आणि ही संख्या बरीच मोठी होती, कारण कांहीं कांहीं घरांत तर ४० ते ५० लोक लपून बसलेले आढळले. हे बंडखोर नसून शहराचे सामान्य रहिवाशी होते, व आम्ही त्यांना क्षमा करूं व न्यायानें वागवूं या भरंवशावर शांत होते. परंतु त्यांची अखेर निराशा झाली हें सांगावयास मला फार आनंद वाटतो." याप्रमाणें मांटगामेरी मार्टिननें बॉंबे टेलिग्राफ वर्तमानपत्राला दिल्लीच्या कत्तलीची हकीगत लिहून कळविली आहे. "दयेसाठीं प्रार्थना भाकीत असलेल्या निरुपद्रवी नागरिकांना गोळ्या घालून ठार मारण्यांत आलें, आणि भीतीनें थरथर कांपत असलेल्या म्हाताऱ्यांचे तुकडे तुकडे करून टाकण्यांत आले," ही कबूली होम्सनें आपल्या पुस्तकांत दिली आहे. १६ नव्हेंबर १८५७च्या टाइम्सच्या अंकांत, मार्टिननें या कत्तलीची पूर्वी दिल्ली येथें नादीरशहानें केलेल्या कत्तलीशीं तुलना केली आहे. बंडखोर शिपाई दिल्ली शहर इंग्रजांच्या ताब्यांत जातांच चौफेर उधळले, आणि गरीब व सुखवस्तु रहिवाशांना आपल्या प्राणांस मुकून बंडाचें प्रायश्चित्त भोगावें लागलें. झांशी व कानपूर येथें याच प्रकाराची पुनरावृत्ती झाली, आणि इंग्रजांचे पांढरे हात रक्तानें माखले जाऊन लालभडक झाले. इंग्रज शिपायांनीं कोठेंही बुद्धिपुरस्सर स्त्रियांची हत्या केली नाहीं, ही गोष्ट मात्र लक्षांत ठेवण्यासारखी आहे. परंतु जाळपोळींत व दंगलींत चुकून अनेक स्त्रिया प्राणांस

मुकल्या, आणि कांहीं स्त्रियांना त्यांच्या घरच्या पुरुषांनींच, त्या इंग्रजांच्या हातीं लागल्यास त्यांची बेइज्जत होईल या भीतीनें, ठार मारिलें. दिल्ली येथें एका घरांतच १४ स्त्रियांना कोणीतरी त्यांचे गळे कापून ठार मारलें होतें, व इंग्रज शिपाई तेथें जाऊन पोहोंचले तेव्हां त्यांचीं प्रेतें त्यांना आढळलीं, व एक पुरुष जो तेथें हजर होता, त्यानें इंग्रज शिपायांना सांगितलें कीं त्यांच्या घरधन्यांनीं तुमच्या भीतीनें प्रथम त्यांना ठार मारलें व नंतर ते स्वतः कट्टन मेले. जोहाराची ही पुनरावृत्ती म्हणावयाची! मार्टिननें टाइम्सच्या एका पत्रांत ही हकीगत लिहिली आहे.

काळ्या लोकांविषयींचा इंग्रज शिपायांचा द्वेष त्यावेळीं इतक्या थरास पोहोंचला होता कीं, "दिल्ली येथील इंग्रजांच्या छावणींत जे सैस, भिस्ती, गवत कापणारे, मजूर, पालखी वहाणारे काळे नोकर रात्रंदिवस खपत होते, त्यांना इंग्रज शिपाई अतिशय वाईट रीतीनें वागवीत असत. एकंदर बंडांत हे खासगी नोकर अत्यंत स्वामिनिष्ठेनें वागले, व त्यांनीं आम्हांला परोपरीनें आपला जीव धोक्यांत घालून मदत केली. परंतु दिल्ली शहर सर झाल्यावर तेथील रहिवाशांची—त्यांपैकीं बरेच जण आमचे हितचिंतक होते—सरसकट कत्तल करण्याची आज्ञा मिळाली. तेव्हां कांहीं इंग्रज शिपायांचें एवढयानें समाधान न होऊन ते आमच्या छावणींतील सर्व काळया नोकरानांही भरीस भर म्हणून गोळया घालून ठार करण्यांत यावें, अशी आपल्या वरिष्ट अधिकाऱ्याकडे शिफारस करूं लागले." दिल्लीच्या वेढयाची हकीगत तेथील पाद्यानें लिहिली आहे त्यांतील हा उतारा आहे. या खासगी नोकरांच्या साहाय्यानें व अपूर्व स्वामिभक्तीनें अनेक इंग्रजांचे प्राण वांचले व इंग्रजी राज्य बंडांतून शीरसलामत बाहेर पडलें. विन्सेंट स्मिथनें म्हटलें आहे कीं, "मानवतेचा गौरव वाढविणारी राजनिष्ठा, दया व निःस्वार्थी सेवा, यांचीं अनेक उदाहरणें खास बंडाच्या काळींदेखील काळया लोकांच्या चरित्रांतून देतां येतील." इतकें असूनही इंग्रज शिपाई त्यांची चेष्टा व छळ करावयास तयारच!

लष्करी कायदा पुकारल्याबद्दल व तो उत्तर हिंदुस्थानांत लागू केल्याबद्दल लॉर्ड क्यानिंगला कोणीच दोष देणार नाहीं. कारण बंडांत तो अवश्यच होता. सर जॉर्ज क्यांपबेलच्या शब्दांत "**कोणत्याही लष्करी इसमाला वाटेल त्याचा जीव घेण्याची व वाटेल त्याची मालमत्ता लुटण्याची सदर परवानगी,**" या स्वरूपांत असलेला लष्करी कायदा लागू करतांना, आपल्या हाताखालील अधिकाऱ्यांनीं त्याचा दुरुपयोग करूं नये म्हणून त्यांच्यावर जितका वचक ठेवावयास पाहिजे होता तितका लॉर्ड क्यानिंगला ठेवतां आला नाहीं. "तो स्वतां दयाळू असला

तरी प्रत्यक्ष व्यवहारांत त्याच्या मताला व इच्छेला न जुमानतां, हाताखालील अधिकाऱ्यांनीं जो धुडगूस घातला त्याबद्दल तो खास दोषी ठरतो." "आमचे अन्न खाल्लेले व आमच्या नोकरींत असलेले शिपाई आमच्याविरुद्ध उठले व हातीं सांपडतील त्या इंग्रज अधिकाऱ्यांची त्यांनीं क्रूरपणें हत्या केली. उलट-पक्षीं, आमच्या प्रजेनें बनेल तोंपर्यंत इंग्रजांना मदतच केली व प्रसंगविशेषीं त्यांचे प्राण वांचविले. तेव्हां बंडखोर शिपाई व औधचे इतर प्रजाजन यांना एकाच मापानें तोलून, एकाच लष्करी कायद्याखालीं भरडून काढणें अन्यायाचें ठरेल." क्यांपबेलप्रमाणेंच म्यार्जेंडीनें देखील आपलें मत दिलें आहे. "निर-पराधी लोकांच्या रक्तानें हात बरबटलेल्या बंडखोर शिपायांत व औधच्या मुलकी प्रजेंत कायद्यानें कांहींच फरक न दाखविल्यामुळें, अनेक निरपराधी लोक बळी पडले ही दुःखद गोष्ट होय. कारण या लोकांनीं आलेल्या संधीचा फायदा घेऊन आपलें गेलेलें राज्य व सत्ता परत मिळविण्याचा प्रयत्न—फारतर तो मूर्खपणाचा म्हणतां येईल—केला होता. त्यांची बाजू अगदींच दुष्ट नव्हती व सत्याचा त्यांना थोडाबहुत पाठिंबाही होता. तेव्हां आमचे बंडखोर शिपाई सोडून इतर लोकांवर थोडी दया दाखविली गेली असती तर बरें झालें असतें." रसेलनें हेंच तत्त्व पुढें जोरानें प्रतिपादन केलें आहे. तो म्हणतो, "एक तर हें निवळ शिपायांचें बंड होतें, किंवा देशांतील लोकांच्या सहानुभूतीनें उभारलेलें शिपायांचे बंड होतें. पहिली गोष्ट खरी धरली, तर देशांतील लोकांना व सुखवस्तु प्रजाजनांना दंड ठोठावणें व फांशीच्या शिक्षा देणें अत्यंत अन्यायाचें ठरेल. त्याचप्रमाणें आम्ही शिकवून तयार केलेल्या व आम्हीं दिलेलीं हत्यारें घेऊन आमच्यावर उठलेल्या फौजेला सामान्य जनतेनें विरोध केला नाहीं, म्हणून त्यांना सरांस शिक्षा देणें कसें रास्त ठरेल? कांहीं काळपर्यंत शिपा-यांच्या हातीं सर्व सत्ता आली होती, मग मनांत असलें तरी त्यांना विरोध कोण करूं शकणार? लोकांची बंडखोरांना सहानुभूती होती असें धरून चाललें तरी, निष्क्रिय सहानुभूती शिक्षार्ह कशी ठरेल? शिपायांना रणांत खुशाल ठार करा, आपल्या शत्रूंचें लढाईत निर्दालन करा, व आपल्या अधिकाऱ्यांचे ज्यांनीं खून केले व निरपराधी स्त्रियांना किंवा मुलांना मारलें त्या बंडखोर शिपायांना खुशाल फांशी द्या. परंतु या जिल्ह्यांत दुष्ट कृत्यें घडलीं किंवा येथें बंडखोरांनीं आपलें ठाणें दिलें, म्हणून सर्व जिल्ह्याला शिक्षा करणें हें अन्याय्यच नव्हे तर मूर्खपणाचें ठरेल."

लॉर्ड क्यानिंगनें जारी केलेल्या लष्करी कायद्याचे दुष्परिणाम त्याच्या नजरेस येतांच, क्रूरपणानें अधिकार गाजविलेल्या अनेक मुलकी अधिकाऱ्यांचा लष्करी अधिकार त्यानें काढून घेतला, आणि गांवांची जाळपोळ सर्रास करूं नये म्हणून हुकूम दिले. प्रयाग येथें नीलसाहेबानें जें फांशीचें सत्र उघडलें होतें त्यावर तोडगा म्हणून त्यानें ग्रांटची रवानगी मध्यप्रांताकडे केली. त्याच्यावर त्यामुळें सर्वत्र टीकेची झोड उठली. 'Clemency Canning—दयेचा पुतळा म्हणून क्यानिंगची, आणि Anti-hangman Grant-फांशीविरोधी म्हणून ग्रँटची वर्तमानपत्रांतून टवाळी होऊं लागली. प्रथम प्रथम त्याच्या आज्ञा खालचे अधिकारी जुमानीतना. परंतु त्याच्याच धोरणानें वागल्यास देशांत लवकर शांतता प्रस्थापित होईल, असें पुढें जॉन लॉरेन्सला वाटूं लागून त्यानें त्याला पाठिंबा दिला. बंडाची आग पूर्णपणें भडकली असतां विलायतेंत डिझरायलीनें क्यानिंगचा जोरानें पाठपुरावा केला. त्यानें आपल्या एका जाहीर भाषणांत म्हटलें, "इंग्लंडच्या निशाणावर **न्याय** या शब्दाऐवजीं **सूड** हा शब्द लिहिण्यांत यावा असें आपलें मत जे प्रतिपादन करतात, त्यांच्याविरुद्ध मी नम्रपणें परंतु असंदिग्ध रीतीनें आपलें मत प्रदर्शित करतों. इंग्रजी शिपायानें नानासाहेबांचा नमूना आपल्या डोळ्यांपुढें ठेवावा या उपदेशाचा मी स्पष्ट शब्दांत निषेध करतों. जुलमांचें उत्तर जुलूम करून द्यावें, ही कल्पना मला नापसंत आहे." याप्रमाणें वरून पाठिंबा मिळाल्यामुळें लार्ड क्यानिंगचें दयाळू धोरण यशस्वी झालें व बंडाची आग इतर प्रांतांत भडकली नाहीं. लार्ड क्यानिंगची प्रथम चेष्टा करणाऱ्या टाइम्सनें देखील (६ फेब्रुवारी १८५८) पुढें अशी कबुली दिली कीं, "शिपायांची सरसकट कत्तल करण्यांत आली असती तर कदाचित् मुंबई व मद्रास येथील पलटणींनीं देखील बंडाचा झेंडा उभारला असता." लार्ड क्यानिंगच्या दयाळु वर्तनानें व वृत्तीनें इंग्रजी राज्य या वावटळींतून सहीसलामत पार पडलें, व कैद्याच्या तोंडून 'मैं नहिं किया' हे शब्द ऐकतांच 'मैंने किया' असें समजून, संतापानें बेफाम होऊन कैद्यास फांशी लटकविणारा लष्करी कायदा व त्याचे अंमलदार यांच्या बेफाम वर्तनाला आळा बसला. देशी लोकांच्या भाषेशीं अपरिचित असल्यामुळें लष्करी अधिकऱ्यांच्या हातून त्यावेळीं अजाणतेपणानें जे घोर अन्याय घडले, त्याची कल्पना सर्वत्र प्रसिद्ध असलेली वरील साधी गोष्ट कोणासही आणून देईल. आपला जीव वांचविण्यासाठीं एका कैद्यानें अधिकाऱ्यांची अतोनात प्रार्थना केली, 'तेव्हां दुसरे तीन बंडखोर फांशी देण्याकरितां तूं माझ्या हवालीं करशील व त्यांच्याविरुद्ध पुरावा देशील तर

मोबदल्यांत मी तुझे प्राण वांचवीन,' ही पाटणा येथील कमीशनर टेलर यांची न्यायनीति प्रसिद्ध झाली असली, तरी इतिहासांत अप्रसिद्ध राहिलेले त्यांचे अनेक भाईबंद त्या वेळीं हिंदुस्थानांत होते. पाटण्याप्रमाणेंच आग्रा, सहाराणपूर, पंजाब व पेशावर येथील न्याय-मनसुबे चालले होते. तोफेच्या तोंडीं उडवून दिलें म्हणजे कैद्यांच्या शरीरांच्या चिंधड्या उडत व ठिकाणावर त्यांचा कांहींच मागमूस उरत नसे. त्यामुळें त्या भेसूर मरणाचें सर्वांना भय वाटे. परंतु लोकांना दहशत बसविण्याकरितां, या शिक्षा सार्वजनिक जागीं भर चवाठ्यावर, सर्वांना एकत्र गोळा करून त्यांच्यासमोर पंजाबांत व पेशावर येथें देण्यांत आल्या. पुढें सर-सेनापती झालेल्या (लॉर्ड) राबर्टसारख्या उमद्या, दिलदार व शूर तरुणाची त्यावेळीं कशी वृत्ती होती, हें २६ फेब्रुवारी १८५८ रोजीं त्यानें आपल्या घरीं लिहिलेल्या पत्रावरून दिसून येईल. "प्रिय हॅरीयट, आमच्याविरुद्ध बंड केलेल्या शिपायांची व दुष्टांची मला दया येते, असें तूं मुळींच समजूं नकोस. उलट, माझ्यापेक्षां अधिक क्रोधसंतप्त थोडेच इंग्रज सांपडतील. एखादा कैदी पकडून आणला म्हणजे त्याला फांशी देण्याचा आग्रह धरणारांत माझाच पहिला नंबर लागतो." परंतु लार्ड क्यानिंगच्या उदार धोरणानें हे सर्व अत्याचार शांत झाले. कारण सरकारच्या मनांत हिंदु व मुसलमान यांचा प्राण जाईतोंपर्यंत छळ करावयाचा आहे, अशी लोकांची त्या वेळीं समजूत होत चालली होती, असें गवर्नर जनरलनें २४ डिसेंबर १८५७ रोजीं भर कौन्सिलांत जाहीर केलें. इंग्रज अधिकाऱ्यांचीं कृत्येंच तशीं होतीं. इंग्रजांचे अत्याचार त्या वेळीं हजर असलेल्या इंग्रजांच्या शब्दांतच वर दिले आहेत. ह्या अत्याचारांचीं हिंदी लोकांनीं केलेलीं वर्णनें आम्हाला व्यक्तिशः उपलब्ध असलीं, तरी तीं मुद्दामच दिलीं नाहींत. कारण वर दिलेल्या वर्णनावरून इंग्रज शिपाई, देशी बंडखोर फौजेला क्रूरपणांत खास हार जाणार नाहींत अशी प्रत्येकाची खात्री पटेल. हा अत्याचारांचा कोळसा जितका उगाळावा तितका तो काळाच होणार. **त्यावर पडदा टाकणें व झाल्या गोष्टी विसरणें हेंच इष्ट आहे.** परंतु इंग्रज इतिहासकार काळ्या शिपायांचीं दुष्कृत्यें इतिहासग्रंथांतून रसभरित रीतीनें वर्णन करून, आपल्या कृत्यांवर पांघरूण घालीत असल्यामुळें ही दुसरी बाजू उघडी करून दाखविणें भाग आहे. कादंबऱ्या, गोष्टी, इतिहास, प्रवासवर्णनें, पत्रव्यवहार, चरित्रें, या सर्वांतून, बंडाच्या वेळीं हिंदी शिपायांच्या हातून व त्यांच्या पुढाऱ्यांकरवीं घडलेल्या अत्याचारांच्या खऱ्याखोट्या गोष्टी पुष्कळदां मुद्दाम फुगवून सांगून, जगांत हिंदुस्थानचें मुख इंग्रज लेखकांनीं कलंकित केलें आहे, व हिंदी लोकांच्या

स्वामिनिष्ठेवर, सत्यप्रियतेवर, शांतताभिलाषेवर, देशाभिमानावर व न्यायपरायणतेवर अनेकवार शिंतोडे उडविले आहेत. तेव्हां दुसरी बाजू दाखवून बंडांत जे अत्याचार घडले व जीं दुष्कृत्यें करण्यांत आलीं तीं दोन्ही बाजूंकरवीं झालीं, एवढें सिद्ध करण्याकरितांच हा खटाटोप करावा लागला, व हें प्रकरण विस्तारानें लिहावें लागलें. इंग्रज व हिंदी या दोन्ही राष्ट्रांनीं या मागील गोष्टी विसरणें जरूर आहे; कारण त्याशिवाय दोघांनाही आज गत्यंतर नाहीं. परंतु इंग्रज लेखकांनीं आपली पक्षपाती दृष्टि प्रथम सोडली पाहिजे. हिंदी शिपायांच्या अत्याचारांची प्रसंगीं अप्रसंगीं, वेळीं अवेळीं अतिशयोक्तीची उजळणी करून हिंदी राष्ट्राला लाजवावयाचें व आपल्या स्वतांच्या वर्तनाविषयीं मूग गिळून बसावयाचें, हा परस्परांतील प्रेम वाढविण्याचा खरा मार्ग नव्हे. परंतु इंग्रजांनीं सर्रास याच कुटिल मार्गाचें आजपर्यंत अवलंबन केलें. आपण स्वतः आज सत्तर वर्षे बंडाबद्दल एकतर्फी मजकूर वाटेल त्या स्वरूपांत वाटेल तितका लिहून प्रसिद्ध केला, परंतु हिंदी लोकांची बाजू जगापुढें मांडली जाण्याला मात्र राजद्रोहाच्या कायद्याचा बागुलबोवा उभारून पूर्णपणें प्रतिबंध करण्यांत येत असे. या बाबतींत एका पत्रांत ( Saturday Review ) एडवर्ड थामसन या निःपक्षपाती इंग्रज लेखकाचा जो लेख नुक्ताच प्रसिद्ध झाला आहे तो फार मननीय आहे. त्यांतील महत्वाचा उतारा जरा लांब असला तरी मुद्दाम खालीं दिला आहे.

" As for the Mutiny, I still hold that our histories of that desperate and cruel episode are the unworthiest things in all our historical writing. It came close to us, and the valour of our people was beyond all praise. But it is time we ceased to write Indian history as Judges in our own cause.

Holmes denies that we have written onesided histories of the Mutiny or from one-sided evidence. His list of native sources is one in which trial and court-martial evidence bulks largely—evidence of men with a rope round their necks. He must know that during seventy years Englishmen have been free to

say what they liked about the Mutiny, and no book has been proscribed because it was offensive to our Indian fellow-citizens; but accounts by Indians have been proscribed. Savarkar's book was written from English sources, because he was not a native of the Mutiny area and because he compiled it in London. He could not have compiled it in India. He could not there have got hold of one per cent of the sources so freely accessible to Mr. Holmes and myself. I refused to read Savarkar till after my book was published; when I did read him I was surprised that Sir Valentine Chirol should have thought his book well written. But Savarkar is not the only Indian who has written a proscribed book on the Mutiny.

To sum up, we are free, Indians are gagged in this matter. They must have an appeal against our writers' Judgement on episodes in their connection with us. I regard 'The Other Side of the Medal' as merely a necessary sanitary measure."

"बंडाविषयीं माझें अजूनही असें मत आहे कीं, त्या दुष्ट व अमानुष प्रसंगाचे आम्हीं लिहिलेले इतिहास आमच्या सर्व ऐतिहासिक लिखाणांत नालायकीचे आहेत. बंड आपल्या लगतच्या काळांत झालें व आपल्या लोकांच्या शौर्याची जितकी तारीफ करावी तितकी थोडीच होईल. परंतु आपण स्वतः एक पक्षकार असतां, न्यायाधीश म्हणून आपल्या खटल्याचा निवाडा आपणच देण्याचें जितक्या लवकर टाकून देऊं तितकें बरें!

एकतर्फी पुराव्यावर भिस्त ठेवून आम्ही बंडाचा एकतर्फी इतिहास लिहिला ही गोष्ट होम्स नाकारतो. परंतु होम्सचे देशी आधार म्हणजे, गळ्याभोंवतीं फांसाच्या दोराचें वेष्टन असतां आरोपींनीं भीतीनें मुलकी किंवा लष्करी कोर्टापुढें दिलेले कबूली जबाब होत. बंडासंबंधी वाटेल तें लिहावयास आज

सत्तर वर्षेपर्यंत (१८५७-१९२७) इंग्रज लेखकांना पूर्ण मोकळीक होती, व आमच्या हिंदी नागरिकांचीं मनें दुखावल्याबद्दल त्यांपैकीं एकही पुस्तक जप्त झालें नाहीं. परंतु हिंदी लोकांनीं लिहिलेले बंडाचे इतिहास मात्र जप्त झाले आहेत. सावरकर बंडाच्या टापूंतील रहिवाशी नव्हते व त्यांनीं आपलें पुस्तकही इंग्रजी आधारांवरच विलायतेंत लिहिलें. हिंदुस्थानांत त्यांना तें लिहिणें शक्य नव्हतें. मला व होम्सला जीं साधनें उपलब्ध होतीं त्यांचा एक शतांश हिस्सा त्यांच्या हातीं तेथें लागला नसेल. माझें पुस्तक प्रसिद्ध होईपर्यंत मी सावरकरांचें पुस्तक वाचलें नाहीं. परंतु मीं तें वाचलें, तेव्हां सर व्हॅलेंटाइन चिरोलला तें पुस्तक चांगलें लिहिलें गेलें असें वाटलं, या गोष्टीचें आश्चर्य वाटलें. परंतु बंडासंबंधी ज्यांचें पुस्तक जप्त झालें आहे असे सावरकरच एकटे लेखक नाहींत.

सारांश, आपणाला या विषयावर वाटेल तें लिहावयास मुभा आहे, परंतु हिंदी लोकांची या बाबींत मुस्कटदाबी झाली आहे. इंग्रजांमुळें हिंदुस्थानच्या इतिहासांत ज्या गोष्टी घडल्या, त्यासंबंधी आमच्या इतिहासलेखकांनीं प्रदर्शित केलेल्या मतावर टीका करण्याचा व आपली बाजू मांडण्याचा हिंदी लोकांना अवश्य हक्क असला पाहिजे. माझें The Other Side of the Medal हें पुस्तक ऐतिहासिक शुद्धतेच्या दृष्टीनें आवश्यक असें मी समजतों."

थामसनच्या ह्या लेखावरून, इंग्रजी राजवटींतील या अपूर्वाईच्या सशस्त्र बंडासंबंधी गेल्या ५० वर्षांत एकही स्वतंत्र* पुस्तक मराठी भाषेंत कां लिहिलें गेलें नाहीं याचा चटकन खुलासा होईल. हल्लीं काळ बदलला आहे व इंग्रजांना अप्रिय असलेल्या विषयाची केवळ ऐतिहासिक सत्याच्या व शुद्धतेच्या दृष्टीनें चर्चा व छाननी करावयास हरकत नाहीं या समजुतीनेंच, हिंदुस्थानच्या इतिहासांत घडलेल्या ५७ च्या बंडाच्या नवलकथेचा इतिहास या पुस्तकांत सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. सत्य पुष्कळ वेळां अप्रिय असतें, परंतु जगांत सत्यापरता धर्म नाहीं, व इतिहासाला तर त्याच्याशिवाय दुसरा आधार नाहीं. तेव्हां ७० वर्षेपर्यंत तऱ्हेतऱ्हेनें १८५७ च्या बंडाची हकीगत जी इंग्रज

* रा. ब. पारसनीसकृत 'राणी लक्ष्मीबाईचें चरित्र' व रा. ब. वैद्यांनीं संपादलेली 'माझा प्रवास' ही गोडशे भटजींची बखर, हीं दोन्ही पुस्तकें अत्यंत सुंदर असलीं तरी त्यांत आलेली बंडाची हकीगत स्वाभाविकच आनुषंगिक व त्रोटक आहे.

ग्रंथकारांनीं वर्णन केली, त्याबरोबरच त्या प्रसंगाची दुसरी हिंदी लोकांच्या तर्फेची बाजू समतोलपणें देण्याचा हा प्रयत्न आहे. कारण दोन्ही बाजू समोरासमोर मांडल्याशिवाय ऐतिहासिक सत्याचा निर्णय लागत नाहीं. म्हणून हें अप्रिय परंतु पथ्यकर काम करावें लागलें. थॉमसनसारख्या इंग्रज लेखकांनीं हीच दृष्टि आजकाल ठेवली आहे, ही अभिनंदनीय गोष्ट होय. अखेरीस रमेशचंद्र दत्तांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, " मुलांकरितां लिहिलेल्या इतिहासांतून तरी निदान बंडाचा हा काळा भाग हद्दपार करण्यांत यावा. क्लाईव्ह व वेलिंगटन यांच्या वेळेपासून हिंदुस्थानांत काळ्या-गोऱ्यांच्या अनेक लढाया झाल्या. परंतु **दोन्ही बाजूंनीं** असे गुन्हे व जाणून बुजून अत्याचार करून युद्धाला १८५७ सालाप्रमाणें कधींही कलंकित केलें नाहीं. स्वधर्म व स्वराज्य यांच्याकरितां हातीं शस्त्र घेतलेल्या बंडखोरांनीं, निरपराधी व असहाय स्त्रिया-मुलांच्या राक्षसी, अघोरी व अमानुष कत्तलीनें आपल्या हेतूला व ध्येयाला लांछन लावलें व स्वतांस काळिमा आणला. उलटपक्षीं, इंग्रजी फौजेनें शत्रूवर चालून जातांना शेंकडों मैल रस्त्यावरील खेडींपाडीं जाळून व लोकांना फांशी देऊन मुलूख बेचिराख केला. बंडखोर हरून पळून गेल्यानंतर देखील इंग्रज जेत्यांनीं दिल्लीच्या रहिवाशांची कत्तल केली, आणि बंडांत सामील नसलेल्या उत्तर हिंदुस्थानांतील हजारों नागरिकांना ब्रिटिश लष्करी कमिशनरांनीं फांशी दिले." आक्सफोर्ड प्रेसच्या अलीकडे प्रसिद्ध झालेल्या इतिहासांत, " बंडांत जीं घोर कृत्यें व **जे अत्याचार दोन्ही बाजूंनीं घडले** त्यांची आठवणदेखील दुःखद होते " असा ह्या गोष्टीचा मोघम उल्लेख असून दत्ताचाच अनुवाद केला आहे.

---

प्रकरण २९ वें

# बंडाची अखेरी



[१]

ता. १० मे १८५७ रोजीं मीरत येथें बंडाची पहिली ठिणगी पडली व लवकरच सर्व उत्तर हिंदुस्थानभर बंडाचा वणवा पेटला. १८ जुलै रोजीं कानपूर व २० सप्टेंबरला दिल्ली, हीं प्रमुख शहरें बंडवाल्यांच्या हातून इंग्रजांनीं जिंकून घेतल्यामुळें बंडाची चार महिन्यांतच कंबर मोडली. विशेषतः दिल्ली शहर इंग्रजांच्या हातीं लागल्यानंतर व मोंगल बादशाहा त्यांच्या कैदेंत पडल्यावर, बंडवाल्या शिपायांचा सर्वस्वी आधारच तुटला. कारण मोंगल बादशाहाची दिल्लीच्या गादीवर स्थापना करून त्यांनीं सर्व हिंदुस्थान देशभर एक विजेची लाट उसळून दिली होती. भुरव्या व उपरी, परकीय कंपनीचें राज्य नष्ट होऊन जुन्या खानदानी मोंगल बादशाहाची स्थापना झाली, तर मनांतून त्याबद्दल पुष्कळांना सहानुभूतीच वाटत होती. परंतु मोंगल बादशाहा इंग्रजांच्या कैदेंत सांपडला व त्याचे शहाजादे हडसननें भर रस्त्यावर गोळ्या घालून ठार मारले, ही बातमी सर्वत्र पसरतांच लोकांना इंग्रजांचा अतोनात संताप आला असला, तरी त्यांच्या सामर्थ्याची सर्वांना पुरी जाणीव झाली, व इंग्रजी सत्तेचा दरारा पूर्ववत बसला. १८५७ सालचें बंड जर केवळ शिपायांचें असतें तर २० सप्टेंबरलाच त्याची परिसमाप्ति झाली असती. हें बंड प्राधान्येंकरून शिपायांचें होतें यांत शंका नाहीं. परंतु तें केवळ शिपायांचें बंड नव्हतें. तें स्वातंत्र्ययुद्धही नव्हतें, सामान्य जनता मनानें कदाचित् नसली तरी कृतीनें बंडाविषयीं उदासीन होती. उलट अनेक हिंदी लोकांनीं इंग्रजांना परोपरीनें मदत केल्यामुळें अनेक इंग्रजांचे प्राण बचावले, व बंडवाल्यांवर चालून जाणाऱ्या फौजेला अनेक हिंदी लोकांनीं परोपरीची मदत केली. कोणी रसद पुरविली, कोणी बंडवाल्यांचा मार्ग सांगितला, कोणी बंडवाल्यांच्या चुगल्या केल्या, तर कोणी बंडवाल्यांना पकडून दिलें. हिंदुस्थानांतील सामान्य जनता तरी राज्ययंत्राविषयीं पूर्वकालीं उदासीन असे. देशांत केवढीही क्रांति होवो, एक राजा जाऊन दुसऱ्याचें राज्य होवो, किंवा राजघराण्यांची आलटापालट होवो, सामान्य लोक

आपल्या शेतीभातीच्या जीवनव्यवसायांत मग्न असत. हिंदुस्थान हा मुख्यतः कृषिप्रधान देश असल्यामुळें लोक आपली शेती राबण्यांत गुंग असत. जो मागावयाला येईल त्याला ठराविक खंड वर्षांतून एकदां द्यावयाचा, एवढाच त्यांचा राज्यकारभाराशीं संबंध असे. अधिकारी दवऱ्यावर निघाले, म्हणजे ती एक टोळधाडीप्रमाणें कधीं मधीं येणारी दैवी आपत्ती समजून, त्यांच्या रसद-बिगारीचा बोजा प्रसंगविशेषीं लोकांना उचलावा लागे. न्याय मनसुबा, गांवरान, चराई, शेतांचे बांध मर्यादा व हक्क, लाकूड फांटा, चोरचिलटांचा बंदोबस्त, हीं त्यांच्या नित्य सार्वजनिक व्यवहाराचीं कामें पंचायतीमार्फतच होत असत. हे पंच त्यांचेच व त्यांच्यांतीलच असत. शिक्षणाचें काम ग्रामोपाध्याय बहुधा करी व त्याला गांवकरीच वृत्ती देत असत. विहिरी, धर्मशाळा बांधणें हीं धर्मादायाचीं पुण्यकृत्यें समजलीं जात असल्यामुळें ज्याला अनुकूळ असे, तो यथाशक्ति या कामीं खर्च करी व आपलें नांव आपल्यामागें चालेल व ही इहलोकाची पुण्याई स्वर्गांत कामीं पडेल या आशेवर संतुष्ट रहात असे. लोकांजवळ हत्यारें असल्यामुळें व्यक्तीच्या किंवा समष्टीच्या पराक्रमावर, जीविताच्या व मालमत्तेच्या संरक्षणाकरितां ते अवलंबून रहात असत. तेव्हां या बहुसंख्याक लोकांना देशांत कोणाचेंही राज्य असलें तरी त्याचें सोयरसुतक वाटत नसे. शिपाई, सरदार, दरकदार, मानकरी, व अंमलदार असे जे थोडेसे लोक राज्ययंत्रांत प्रत्यक्ष गुरफटले असत, व त्यावरच ज्यांचें जीवित, मानमरातब व कर्तबगारी अवलंबून असे, त्यांना मात्र राज्यक्रांतीचा फारच मोठा धक्का सहन करावा लागे, व त्यामुळें ते अशा प्रसंगीं एकवटून राज्यक्रांतीला विरोध करण्यांत आपलें तनमनधन खर्चीत असत. कारण त्यांतच त्यांचा स्वार्थ असे. जर एखादी राज्यक्रांती यशस्वी झाली, तर नव्या राजवटीचा जम नीट जमेतोंपर्यंत, जुन्या राजवटीचे घटक नवीचा अतोनात द्वेष करून तिचा पाडाव करण्याचा साहजिकच उद्योग करीत व त्या दिशेनें त्यांचा अटोकाट प्रयत्न चाले.

१८५७ सालच्या बंडाला सामान्य जनता उदासीन असल्यामुळें स्वातंत्र्ययुद्ध म्हणतां येत नाहीं. परंतु ज्यांचीं राज्यें लॉर्ड डलहौसीनें अन्यायानें खालसा करून तेथें कंपनीची घडी नुक्तीच बसविली होती, तेथील जुन्या राजवटींतील दुखावलेल्या व्यक्तींनीं या बंडांत सामील होऊन इंग्रजी सत्तेला शक्य तेवढा विरोध केला व जमल्यास इंग्रजी सत्तेचें उच्चाटन करून त्या जागीं आपली सत्ता पूर्ववत् स्थापण्याचा कसून प्रयत्न केला. लखनौ व झांशी येथील राज्यें खालसा

केल्यामुळें, व नानासाहेब पेशव्यांची पेन्शन बंद केल्यामुळें, या टापूंतील प्रमुख व्यक्तींनीं इंग्रजांविरुद्ध तलवार उपसली. औध प्रांत नुक्ताच खालसा केला गेला असल्यामुळें, जुन्या नबाबींतील अनेक सरदार–मौलवी–शिपायांचीं वतनें नष्ट झालीं होतीं. त्यामुळें त्यांची स्थिती खालावली व मानसन्मान बंद झाला. त्या राज्याशीं ज्या अनेक लोकांचे हितसंबंध गुंतले होते, त्यांनीं अर्थातच स्वहक्क संपादनार्थ बंडांत उडी घेतली. नागपूर, सातारा हीं मोठीं राज्येंही लॉर्ड डलहौसीच्या राज्यतृष्णेला बळी पडलीं होतीं. निजामाचा वऱ्हाड प्रांतही इंग्रजांच्या घशांत नुक्ताच गेला होता. तें शल्य आजदेखील निजामच्या मनांत खुपत आहे, इतकी ती हानि मोठी होती. परंतु पुळचट व मानसन्मानाची फारशी चाड नसलेल्या व्यक्ती बंडाचें धाडस करूं शकत नाहीं. त्यांना संताप आला तरी ते मनाशीं जळफळत, बायकांप्रमाणें बोटें मोडीत व शिव्या श्राप देत बसतील. हातावर शीर घेऊन, जीव जहागीर व बैठेंसुख यांच्यावर तिलांजली देऊन बंडाच्या आगींत उडी घेणें हें सामान्याचें काम नव्हे. त्याला अचाट कर्तबगारी व विलक्षण साहस व लोकोत्तर धैर्य लागतें. देशांत एकदां प्रस्थापित झालेल्या सत्तेविरुद्ध केलेलें बंड बहुधा अयशस्वी ठरतें. कारण बंडखोर उपरे व उचले ठरतात, आणि जुन्या स्थापित राजवटीला ती सुसज्ज असल्यामुळें, वाटेल तेथून वाटेल तितकें साहाय्य मिळवितां येतें. चालू असलेल्या राज्ययंत्राचा जुन्या राजवटीला सहज फायदा मिळतो. अशा वेळीं सामान्य व्यक्ति देशांत स्थापित असलेल्या सरकारला साहाय्य करून व तन्निमित्त त्यांच्या कृपेनें पदरांत पडणारी मीठभाकरीची शिदोरी आनंदानें खाऊन, आपलें घर सांभाळतात. असामान्य व्यक्तींना मात्र हें सामान्य जीवन दुस्सह होतें. सत्ता प्राप्त करून पूर्वीच्या वैभवावर चढणें, किंवा त्या प्रयत्नांत नष्ट होऊन जाणें, हें दोनच मार्ग त्यांना पसंत पडतात. झांशीची राणी लक्ष्मीबाई व नानासाहेब पेशवे यांची अशा असामान्य कर्तबगारीच्या धाडशी व पराक्रमी व्यक्तींतच गणना करावी लागेल. त्यांनीं बंडांत उडी घेतल्यामुळें शिपायांचें बंड केवळ शिपायांपुरतें मर्यादित न राहतां त्याला व्यापक स्वरूप प्राप्त झालें. त्यामुळें दिल्लीच्या मोंगल बादशाहीचें भूत इंग्रज मांत्रिकानें हस्तगत केल्यानंतरही बंडाचा जोर कमी झाला नाहीं. १८५७ चें सर्व वर्ष व १८५८ सालाचा प्रथमार्ध बंडाचा मोड करण्याकरितां इंग्रजांना लागला. १७ जून १८५८ रोजीं ग्वालेर येथें बंडवाल्यांचा सर ह्यू रोझनें फारच मोठा पराभव केला व बंडवाल्यांची सेनानी झांशीची राणी धारातीर्थी शयन करती झाली, त्या दिवशीं बंडाचा शेवट झाला असें म्हणावें लागतें. तात्या

टोपी तर पुढेंही बरेच दिवस लढत होता. नानासाहेब पेशवे व झांशीची राणी यांच्या उत्साहानें बंडाला थोडेंसें व्यापक स्वरूप प्राप्त झालें, व त्यांच्या उदाहरणानें औधची बेगम व मौलवी, पाटणा येथील कुंवरसिंह, अमेथीचे राजा लाल माधवसिंह, शंकरपूरचे बेणीमाधवसिंह, बांद्याचे नबाब, ही सर्व मंडळी आपली गेलेली सत्ता, राज्य व वैभव परत मिळविण्याकरितां, आपापल्या अनुयायांसह बंडांत सामील झाली. त्यामुळें बंडाला राज्यक्रांतीचें रूप आलें नाहीं, तरी इंग्रजी सत्तेमुळें दुखावलेले बरेच पराक्रमी व धाडशी लोक बंडांत सामील झाले व बंडाला दोन राजकीय पक्षांतील युद्धाचें स्वरूप प्राप्त झालें !

त्याचप्रमाणें १८५७ च्या बंडाला हिंदुस्थानचें स्वातंत्र्ययुद्ध असेंही नांव देतां येत नाहीं. कारण दक्षिण हिंदुस्थान बंडांत सामील झालें नाहीं, व उत्तर हिंदुस्थानांतील एक लहानसा टापू सोडून सामान्य जनता बंडाविषयीं उदासीन होती. उलट शीख व गुरखे शिपायांनीं इंग्रजांना अतोनात सहाय करून व आपलें शक्तिसर्वस्व एकवटून बंडाचीं पाळेंमुळें खणून काढण्यास दुजोरा दिला. **हिंदुस्थान हा आपला सर्वांचा देश व आपण सर्व हिंदु**, अशी भावना त्या वेळीं जागृत असती तर हा प्रकार घडला नसता. हिंदी लोक हिंदी लोकांविरुद्ध लढले नसते. हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे व आपण सर्व हिंदी आहोंत, ही अलीकडे कॉंग्रेसच्या उद्योगानें उदित झालेली भावना आहे. फार जुन्या काळीं हिंदुस्थानांत कदाचित् ती अस्तित्वांत असली, तरी मध्यंतरींच्या काळांत तिचा मागमूसही लागत नव्हता. नाहींपेक्षां त्या वेळीं शस्त्रास्त्रांत व शास्त्रीय ज्ञानांत साधारण तुल्यबळ असलेल्या, पांच हजार मैलांवरून आपलें घरदार सोडून आलेल्या मूठभर इंग्रजांचें राज्य, या विस्तीर्ण व लोकसंख्येनें सकस देशांत स्थापनच झालें नसतें. एकराष्ट्रीयत्वाची हिंदुस्थानांत त्यावेळीं भावना असती, तर हिंदुस्थानच्या इतिहासांत कंपनीचा पैसा खाऊन, हिंदी लोकांविरुद्ध हिंदी लोक लढत असल्याचा देखावा आपणांस दिसला नसता. एकराष्ट्रीयत्वाची भावना ही अलीकडील आहे. तेव्हां आजच्या स्वराज्योन्मुख हिंदी राष्ट्राच्या भावनांचा १८५७ च्या बंडावर आरोप करणें चुकीचें ठरेल. आजच्या काळांतून तिकडे दृष्टी फेंकली तर तसा भास होण्याचा संभव आहे. परंतु लाल रंगाच्या चष्म्यांतून सृष्टी घटकाभर लाल दिसली, तरी तो तिचा खरा रंग आहे असें कोणी म्हणणार नाहीं. तेव्हां १८५७ च्या बंडाला हिंदी लोकांचें स्वातंत्र्य-युद्ध म्हणतां येणार नाहीं. तसें असते तर दक्षिण बर्फाप्रमाणें थंड बसली नसती व शीख आणि गुरखे बंडवाल्यांव

चालून गेले नसते. स्वातंत्र्ययुद्धांत सर्व राष्ट्र उठावें लागतें. सर्व लोक लढत असतात असें नाहीं, परंतु सामान्य जनता स्वातंत्र्येच्छु वीरांना शक्य ती सहानुभूति दाखवून साहाय्य करीत असते. व्यक्तिशः दहापांच राष्ट्रद्रोही लोक कोणत्याही राष्ट्रांत कोणत्याही काळीं निपजतात, व आपल्या पानावर तूपपोळी घेण्याकरितां ते आपल्या देशबांधवांचे गळे कापावयास तयार होतात. परंतु स्वातंत्र्ययुद्धांत सामान्य जनता उदासीन राहत नाहीं. ती प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष स्वजातीय व स्वधर्मीय लढाऊ लोकांस साहाय्य करीत असते. १८५७ च्या बंडांत मुसलमान, पुरभय्ये व मराठे अशा तीन जातींनीं मुख्यतः भाग घेतला. दिल्लीची मोंगल बादशाही व लखनौची नबाबी, या दोन्ही सत्ता मुसलमानी असल्यामुळें मुसलमान शिपायांचें बंडांत अग्रेसरत्व असावें हें साहजिक होतें. इंग्रज पलटणींत मुख्य भरती बिनडोक्याच्या पुरभय्यांची असल्यामुळें, गाईची चरबी काडतुसांना लावून इंग्रज आपली जात बाटविणार या गोष्टीवर त्यांचा सहज विश्वास बसून ते बंडांत सामील झाले. आजदेखील 'आठ पुरभय्ये व नऊ चुले' ही म्हण शब्दशः खरी करून दाखविण्याइतके पुरभय्ये कर्मठ आहेत. नानासाहेब पेशवे व राणी लक्ष्मीबाई यांनीं स्वराज्यसंपादनार्थ, या चालून आलेल्या संधीचा फायदा घेण्याचें ठरवून बंडांत पुढाकार घेतला. त्यामुळें उत्तरेकडील मराठ्यांनाही बंडांत सामील व्हावेंसें वाटलें. परंतु उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांची वस्ती फारच थोडी आहे. देशी संस्थानांत व इतरत्र उत्तरेकडील इंग्रजी राज्यांत, ज्या थोड्याशा मराठा पलटणी होत्या त्या बंडांत सामील झाल्या. दक्षिणेंतील मराठी पलटणी व महाराष्ट्र देश मात्र त्या वेळीं शांत होता. त्यामुळें बंडांत कांहीं थोड्याशा मराठ्यांनीं व्यक्तिशः फार पराक्रम गाजविला असला, व मराठा सरदारांच्या शौर्यामुळें बंडाची कालमर्यादा लांबली असली तरी मुसलमान व पुरभय्ये ह्यांच्या संख्येच्या मानानें फारच थोडे मराठे बंडांत सामील झाले होते.

१८५७ च्या बंडाला हिंदी लोकांचें स्वातंत्र्य-युद्ध हें नांव देतां येत नाहीं, हें वर आपण पाहिलेंच. त्याचप्रमाणें ती पूर्णपणें राज्यक्रांतीही नव्हती; कारण मोंगल बादशाहीची दिल्लीच्या गादीवर पहिल्या धडाक्यांत बंडवाल्यांनीं स्थापना करून, बादशहाचे नांवानें जाहीरनामे काढले व सर्वत्रांना इंग्रजांशीं लढण्यास व त्यांना हिंदुस्थानांतून हांकून देण्यास फर्माविलें. परंतु हैद्राबादचा निजाम व भोपाळची बेगम, हे मोंगलबादशाहीचे प्रमुख व मातब्बर सरदार आपल्या बादशहाच्या आज्ञेनुसार जिहाद पुकारून, बंडवाल्यांना सामील झाले नाहींत. उलट त्यांनीं

बंडवाल्यांविरुद्ध इंग्रजांच्या पारड्यांत आपलें सामर्थ्य टाकून बंडाचा मोड करविला. त्याचप्रमाणें पेशवाई पुन्हा स्थापन करण्याचा पुकारा करून नानासाहेबांनीं बंडांत उडी घेतली, तरी शिंदे, होळकर, गायकवाड, वगैरे पेशवाईंतील जुने थोर व मातब्बर सरदार बंडांत सामील झाले नाहींत. उलट त्यांनीं बंड मोडण्याच्या कामीं इंग्रजांना शक्य तेवढें साहाय्य करून, ते इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिले. बरें, ब्राह्मण पेशवाईबद्दल महाराष्ट्राला व मराठ्यांना आणि त्यांच्या सरदारांना आदर नव्हता असें म्हटलें, तर सातारचे छत्रपती प्रतापसिंह यांच्याबद्दल इंग्रजांनीं इतका अन्याय केला, व त्यांचा आणि अप्पासाहेबांचा असे दोघेही दत्तक नामंजूर करून अप्पासाहेबांच्या मृत्यूनंतर सातारचें राज्य खालसा केलें, तरी मराठे सरदारांना कोठें चेव आला ? विलायतेंत छत्रपतींच्या वतीनें प्रचंड चळवळ करून निराश झालेला रंगोबापूजी बंडापूर्वीं थोडे दिवस हिंदुस्थानांत परत आला होता. बंडाची संधी साधून त्यानेंही स्वराज्याचा बाहुटा उभारला, परंतु त्याला कोणींही मदत दिली नाहीं. त्यानें मात्र आपली स्वामिभक्ती शेवटपर्यंत गाजविली, व त्याचे नातलग इंग्रजांच्या हातीं सांपडून फांशी दिले गेले. सारांश एक राजवटी बदलून दुसरी स्थापन करूं पाहणारी ही राज्यक्रांतिही नव्हती; किंवा असली तरी तिचा व्याप फारच लहानशा टापूपुरता मर्यादित होता. अखिल हिंदुस्थानानें ती कल्पना पटून उचलली नाहीं ! त्याचप्रमाणें हें केवळ इंग्रज इतिहासकार म्हणतात त्याप्रमाणें केवळ शिपायांचें बंडही नव्हतें. कारण तसें असतें तर त्याचा, दिल्ली शहर परत इंग्रजांनीं काबीज केल्याबरोबर मोड झाला असता. तें इतकें रेंगाळलें नसतें व त्यानें इंग्रजांना इतका त्रासही दिला नसता. परंतु इंग्रजी सत्तेमुळें दुखावलेल्या, अन्यायानें चिडलेल्या व वैभवहीन झालेल्या थोड्याशा पराक्रमी व्यक्ती या बंडांत सामील होऊन, त्यांनीं आपली गेलेली सत्ता व राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न केला. दुर्दैवानें त्यांना अपेक्षेप्रमाणें साहाय्य न मिळाल्यामुळें तो प्रयत्न अयशस्वी झाला. इंग्रजांनीं दुखावलेल्या थोड्याशा कर्तबगार व असामान्य व्यक्तींचें हें संघटन होतें. शिपायांच्या धर्मभावनादेखील इंग्रजांच्या राजवटींत दुखावल्या गेल्या असल्यामुळें त्यांचा या पुढारी व्यक्तींनीं योग्य उपयोग करून घेतला, व त्यांची शक्ती आपल्या कार्यास जुंपली. स्वाभिमानी व स्वराज्य आणि स्वधर्माच्या प्रेमानें वेडावलेल्या मूठभर शूर लोकांचा परधर्मी इंग्रजी सत्तेवर हा हल्ला होता, व अशा उच्च भावनांनीं प्रेरित झालेले फारच थोडे लोक या बंडांत सामील झाल्यामुळें

कांहींच फळ आलें नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं; त्यांचा आत्मत्याग व शौर्य हीं अगदींच फुकट गेलीं नाहींत.

[ २ ]

बंड अयशस्वी होण्याचें मुख्य कारण म्हणजे, बंड पुकारण्यापूर्वी जशी संघटना करण्यांत आली तशी ती पुढें टिकली नाहीं. अडाणी व आडमुठ्या शिपायांवर बंडाची मुख्य मदार होती व त्यांना आपले विचार ठरीव तारखेपर्यंत मनांतल्या मनांत दडवून ठेवतां आले नाहींत. एखाद्या मुलाला एखादें नवें खेळणें मिळालें, म्हणजे त्याचा उपयोग करून पाहण्यास तो जसा अधीर होतो, तशीच बंडवाल्या शिपायांची स्थिति झाली. ३१ मेपर्यंत शांत राहून नेहमींप्रमाणें वरिष्ठांच्या आज्ञा निमूटपणें बजावण्याविषयीं पुढाऱ्यांची बजावून सांगी असतां, आपण लवकरच स्वतंत्र होणार या पोटांतील विचारानें शिपाई आपल्या अधिकाऱ्यांशीं उर्मटपणानें वागूं लागले. त्यामुळें शिपायांची बेदिली लक्षांत येऊन कांहीं इंग्रज अधिकारी सावध झाले. मीरत येथील शिपायांनीं पुढाऱ्यांच्या आज्ञेचें भान न राहून २१ दिवस पूर्वींच अतिप्रसंग केला व ३१ मे रोजीं सर्वत्र एकसमयावच्छेदेंकरून पुकारलें जाणारें बंड १० मे रोजींच सुरू झालें, व इंग्रजांना गैरसावध गांठण्याची चतुर मसलत शिपायांच्या उतावीळपणानें फुकट गेली. इंग्रज सावध झाले, व त्यांनीं आपलीं बचावाचीं साधनें योजून ठेवलीं व चढावाची तयारी चालविली. बंड सुरू झाल्यावर तर ही शिस्त अगदींच मावळली, आणि शिस्तीच्या अभावीं लढाई जिंकणें अशक्य आहे.

प्रारंभीं सर्व काम एकजुटीनें चाललें असलें, तरी बंडवाल्यांत हिंदु व मुसलमान हे दोन स्वाभाविक पक्ष ताबडतोब निर्माण झाले. ही स्वाभाविक तेढ वाढूं नये म्हणून नानासाहेबांनीं दिल्ली येथें मोंगल बादशाहीची निर्विघ्नपणें स्थापना होऊं देऊन तिला उचलून धरलें, व पेशवाईचें ठाणें ब्रम्हावर्त येथें स्थापन केलें. दिल्ली व कानपूर यांच्या दरम्यान बरेंच अंतर असल्यामुळें, बंडानें स्थापन झालेल्या प्रमुख मुसलमानी व हिंदु सत्तांत विरोधाचा लवलेश न येतां त्या गुण्यागोविंदानें वागून इंग्रजांचें उच्चाटन करतील, असा चतुराईचा डाव नानासाहेबांनीं योजला होता. परंतु नानासाहेबांचा हस्तक अजीमुल्ला व कानपूर येथील बंडखोर मुसलमान शिपाई नानासाहेबांच्या आज्ञा पालन करीनात. सेनापतीच्या आज्ञा लढाईच्या प्रसंगीं शब्दशः पालन न करून कसें चालावें ?

नानासाहेबांना पदच्युत करून नन्हेखान नांवाच्या एका गुंडाला कानपूरचा नबाब करण्याच्या गोष्टी मुसलमान शिपाई आपल्या औट घटकांच्या राज्यांतच बोलूं लागले. तात्या टोपीपेक्षां अझीझन या वेश्येच्या आज्ञा अधिक तत्परतेनें पाळल्या जाऊं लागल्या. बंडांत हिंदु-मुसलमान हे दोन प्रवाह प्रारंभीं नसले तरी पुढें पुढें स्वतंत्र वाहूं लागल्यामुळें बंडवाल्यांची शिस्त मावळली व त्यांच्या पराक्रमाचा विचका झाला ! बंडवाल्यांना एकत्र रोखून धरण्यांतच पुढाऱ्यांच्या शक्तीचा व्यय होऊं लागला, व नव्या योजना त्यांना आंखावयास वेळ मिळेना.

इंग्रजांचा पक्ष सोडून आम्ही तुमचा पक्ष स्वीकारला त्याअर्थी आम्हाला अधिक पगार द्या, अशी बंडखोर शिपायांनीं मागणी सुरू केली, व दिवसेंदिवस त्या मागणीचा स्वर चढत्या उद्दाम भाषेंत येऊं लागला. बंडवाल्यांनीं प्रथम ठिकठिकाणचे इंग्रजी खजिने लुटल्यामुळें त्यांना लुटीची चटक लागली, व आपला खिसा गरम करण्याकरितां गांवांतील हिंदुमुसलमान शिष्टांना व श्रीमंतांना लुटण्याची, ते आपल्या वरिष्ठांजवळ परवानगी मागूं लागले. ही परवानगी देण्यांत आली नाहीं, म्हणजे ते अधिकाऱ्यांना अधिकोत्तरें बोलून अखेरीस कायदा आपल्या हातीं घेत व गांवांतील धनिक लोकांना निरनिराळ्या उपायांनीं पिळून काढीत. ठाण्यावर सावध राहून कवायत करणें व पहारा देणें हीं कामें बंडवाल्या शिपायांना कंटाळवाणीं वाटूं लागलीं. इंग्रजी फौजेप्रमाणेंच जर शिस्तीच्या कचाट्यांत वागावयाचें, तर मग त्या स्वराज्याचा उपयोग काय, अशी त्यांची भावना बनली होती. स्वच्छंदानें वागून मौज करण्याकरितां आम्ही बंडांत सामील झालों, व इंग्रजांचें शिस्तीचें कडक जूं पार झुगारून दिलें, अशीं तर्कटें ते लढवूं लागले. त्यामुळें मौज मारण्याकरितां व सांपडली तर लूट करण्यास ते नेहमीं छावणी सोडून शहरभर किंवा आसमंतात फिरत असत. लढाई चालू असली तरी देखील ठाण्यावर फारच थोडी फौज वेळेवर सांपडे.

प्रत्येक बंडवाला शिपाई स्वतःला अत्यंत शूर व धाडसी समजून सरदार होऊं पाही. परंतु सर्व शिपायांना सरदाऱ्या कशा मिळाव्यात ? त्यामुळें शिपायाशिपायांत चुरस उत्पन्न होई. त्याचप्रमाणें प्रमुख सेनापती कोणीं व्हावें म्हणून सुभेदार सुभेदारांत झटापटी उडत. मोठा अधिकार म्हणजे जाडा पगार, कमी काम व अधिक चैन, अशी व्याख्या असल्यामुळें शिपायांची मनधरणी करतां करतां व आपली खासगी तिजोरी आणि प्रसंगीं स्त्रीधन वापरून, आणि घरांतले डागडागिने मोडून त्यांचें समाधान करतां करतां पुढाऱ्यांच्या नाकीं नव आले. प्रत्येक-

जण स्वतांस शाहणा समजत असल्यामुळें आपल्याच चालीनें चाले. बंडवाल्यांत मोठा भरणा या देशी फितुर शिपायांचा होता, व त्यांची मनस्थिति अशी बेताल भडकलेली असल्यामुळें त्यांच्या पराक्रमाला हरताळ फासला गेला. नानासाहेब पेशवे, झांशीची राणी, व लखनौची बेगम, यांचे खासगी शिपायी व अनुयायी बंडांत सामील झाले होते. ते जिवास जीव देणारे व पूर्ण शिस्तीनें वागणारे होते. कारण स्वराज्य व स्वधर्म, आणि उज्वल स्वामिनिष्ठा या गुणांनीं प्रेरित झाल्यामुळें ते बंडाच्या आखाड्यांत उतरले होते. परंतु त्यांची संख्या अल्प असल्यामुळें एकंदर बंडवाल्यांचें नीतिबल वाढूं शकलें नाहीं. तरीपण या शूर व स्वार्थत्यागी लोकांच्या जोरावरच पुढाऱ्यांनीं इंग्रजी सत्तेविरूद्ध इतके दिवस तग धरला.

बंडखोर शिपायांचें वर्तन असें उच्छृंखल असल्यामुळें त्यांच्या हातून फारसा पराक्रम झाला नाहीं. कानपूरचा वेढा हें बंडवाल्यांच्या नादानपणाचें उत्तम उदाहरण आहे. पोत्यांत वाळू भरून व मातीचे वर लेप देऊन जनरल व्हीलरनें आपल्या बचावापुरता तात्पुरता एक किल्लेकोट बनविला, व शिपायांनीं बंड पुकारल्यावर त्यानें त्या कोटाच्या आधारानें बंडवाल्यांशीं जोराचा सामना दिला. तो मातीचा व वाळूचा कोट पाहून बंडखोर शिपाई चेष्टेनें त्यास निराशेचा किल्ला म्हणूं लागले. परंतु तोफांचा भडिमार करूनही बंडवाल्यांना तो कोट सर करतां आला नाहीं. बचाव करणारे मूठभर इंग्रज, शिवाय त्यांच्या गळयांत बायकामुलांचें लटांबर, आणि त्यांच्याभोंवतीं हजारों बंडवाल्यांचा गराडा पडलेला, बंडखोरांना द्रव्य, अन्नसामग्री व दारुगोळा याचा उत्तम व भरपूर पुरवठा, आणि उलट इंग्रजांना पाणी आणण्याकरितांसुद्धां गोळयांच्या वर्षावांतून जावें लागे, अशा विषमस्थितींतदेखील बंडवाल्यांना तो फुसका व तकलादी कोट जिंकून घेतां आला नाहीं. इंग्रजांना अन्नसामग्री व दारुगोळयाचा तुडवडा पडला, कॉलऱ्याची सांथ त्यांच्या छावणींत फैलावली, रहावयाला जागा नसल्यामुळें बायका मुलांना व इंग्रज शिपायांना संवय नसतांही भर उन्हाळयांत उघड्यांत दिवस काढावे लागून झळ लागल्यामुळें लोक मृत्युमुखीं पडूं लागले, तरी बंडवाल्यांना अनेक छापे घालून व तोफांचा दणदणाट करूनही, तो कोट सर करतां आला नाहीं. आणि पराक्रमानें जी गोष्ट त्यांना करतां आली नाहीं ती अखेर विश्वासघातानें व कपटानें त्यांनीं घडवून आणली. सेनापती व्हीलरनें जर बंडवाल्यांवर विश्वास टाकला नसता तर कदाचित् नीलची कुमक येईतोंपर्यंत त्याला आपला बचावही करतां आला असता. कारण त्याच्या शिपायांत त्राण उरलें नसलें, तरी बंडखोरांत हिंमत

व खरें शौर्य कोठें होतें ? त्यांच्यांत शिपायांपेक्षां सरदारांचीच संख्या अधिक फुगली होती. जो प्रकार कानपूरचा तोच लखनौचा. लाखों बंडखोर शिपाई व तेही इंग्रजांच्या तालमींत वाढलेले, इंग्रजी फौज वापरीत असलेलीं शस्त्रास्त्रें वापरणारे व इंग्रजांचा तोफखाना हातीं लागलेला, तरीदेखील लखनौ येथील लहानशी इंग्रजी छावणी बंडवाल्यांना सर करतां आली नाहीं. व्हीलरपेक्षां सर हेनरी लॉरेन्सनें छावणीची व तात्पुरत्या तटबंदीची जागा निवडण्यांत अधिक चतुराई दाखविल्यामुळें लखनौ शेवटपर्यंत लढत राहिलें, व लखनौसच फितुर देशी फौजेचा चक्काचूर उडाला. ३० मे १८५७ रोजीं लखनौ येथें बंडाचें पहिलें शिंग फुंकलें गेलें व १७ मार्च १८५८ रोजीं बंडवाल्यांचा क्यांपबेलनें पुरता मोड करून इंग्रजी सत्तेची पूर्ववत् स्थापना केली. म्हणजे लखनौ येथील इंग्रजांनीं सरासरी नऊ दहा महिने लाख दीडलाख बंडवाल्यांना दाद दिली नाहीं. मध्यंतरीं मात्र प्रथम हॅवेलॉकनें व नंतर आउट्रॅमनें बंडखोरांची फळी फोडून वेढयांतील इंग्रजांना मदत पोहोंचविली, व तेथील बायकामुलें सुरक्षितपणें दुसरीकडे काढून नेलीं. हींच दोन उदाहरणें बंडवाल्यांचा नादानपणा सिद्ध करतील.

उलटपक्षीं दिल्ली येथें जवळजवळ एक लाख बंडवाले जमले असतां आणि दिल्लीचा मजबूत किल्ला त्यांच्या हातीं आधारास असतां, इंग्रजांनीं साडेतीन महिन्यांच्या आंत बंडवाल्यांचा पुरता मोड करून दिल्ली शहर आपल्या कबज्यांत घेतलें. ही इंग्रजांची धडाडी व शौर्य पाहिलें म्हणजे बंडखोर नेभळट वाटूं लागतात. शत्रूवर जोराचा हल्ला करण्याची बंडवाल्यांना हिंमतच होत नसे. नेटाचा हल्ला केल्याशिवाय शत्रू आटोक्यांत येणार कसा, व त्याची फळी फुटणार तरी कशी ? परंतु शत्रूवर जोरानें तुटून पडणें ही सोपी गोष्ट नाहीं. चढाईमुळें लढाईचा शेवट जरी आपल्या बाजूनें लागण्याचा संभव असतो, तरी प्रारंभीं अनेक पलटणी गारद होतात, व हजारों शिपायांचे जीव गमवावे लागतात. बंडवाल्या शिपायांना लूट हवी होती, परंतु मृत्यु नको होता. त्यामुळें धडाडीनें शत्रूवर चालून स्वतां कटून जाण्यास—परंतु त्यामुळें बाकीच्या फौजेचा मार्ग सुलभ करून देण्यास—कोणतीच बंडखोर पलटण तयार होत नसे. प्रत्येक बंडखोर शिपाई आपला जीव बचावून लढत असे. त्यामुळें प्रत्येक चकमकींत इंग्रजांचा विजय होई व बंडखोर मागें हटून दुसरा टापू पायाखालीं घालीत. उलट इंग्रजी फौज प्रत्येक लढाईंत बंडवाल्यांच्या मध्यावर नेटानें हल्ला करी व त्यांची फळी फोडून त्यांना मागें हटावयास लावी. थोड्याशा फौजेनिशीं केलेलें हें धाडस

अंगलट येण्याचा फार संभव असतो. कारण जोराच्या हल्ल्यामुळें शत्रूचा मध्य जरी मागें रेटला गेला, तरी शत्रूंनीं आपल्या उजव्या व डाव्या बगला युक्तीनें पण दणक्यानें पुढें सरकावल्या, म्हणजे चाल करून जाणारी फौज शत्रूच्या जबड्यांत सांपडून तिचें मूळ छावणीशीं दळणवळण तुटतें, व तिला गारद होणें किंवा शरण जाणें याशिवाय अन्य मार्गच उरत नाहीं. परंतु बंडखोरांना इतका आत्मविश्वास व इतकी चिकाटी कोठें होती ? शत्रूचा जोराचा हल्ला आला म्हणजे मागें हटावयाचें, एवढाच ठराविक क्रम त्यांना ठाऊक होता. स्वतां शत्रूवर जोरानें चालून जावयाचें नाहीं, व शत्रू चालून आला म्हणजे दोन्ही बगला पुढें सरसावून व फक्त मध्यें शत्रूंचा मारा खात खात व शिपायांचें बलिदान देत देत मागें हटवून, शत्रूंना कचाटींत धरावयाचें नाहीं, असा बंडवाल्यांचा जणूं निर्धारच असे. बंडवाल्यांची ही दुर्बलता पाहून इंग्रज अतोनात धाडशी बनले, व सामान्य युद्धनीतीचे सिद्धांत बाजूस सारून ते प्रत्येक लढाईंत प्रथमदर्शनींच शत्रूच्या मध्यावर जोरानें तुटून पडून त्यांची दाणादाण उडवूं लागले. शत्रुपक्ष प्रबल व बहुसंख्याक असला म्हणजे कमजोर बाजूला हें पिछेहाटीचें धोरण बरें पडतें, व त्या बाजूचा तात्पुरता बचाव होऊन सपशेल पराभव टळतो. परंतु शत्रूपेक्षां आपण प्रबल व बहुसंख्याक असलों म्हणजे ही पीछेहाट मारकच होते. तशा परिस्थितींत त्यावेळीं शत्रूवर चालून जाऊन, व प्रसंगीं त्यांच्या एका शिपायाकरितां आपले दोन शिपाई बळी देऊन त्यांचा मोड करणें अत्यावश्य असतें. परंतु बंडवाल्या शिपायांत ही मर्दुमकी नव्हती ! त्यामुळें अल्पसंख्याक इंग्रज प्रत्येक लढाईंत विजय मिळवून पाऊल पुढें टाकूं लागले, आणि बहुसंख्याक बंडवाल्यांची सारखी पीछेहाट होत असे. प्रत्येक पिछेहाटींत त्यांना रणांगणावर आपल्या थोड्याशा तोफा टाकून देऊनच मागें सरावें लागे. कारण पीछेहाट करतांना तोफांचें लटांबर जवळ बाळगणें, व तें अवजड लोढणें गळ्यांत अडकवून पळणें अशक्यच होतें.

बंडवाल्यांच्या याप्रमाणें बऱ्याच तोफा नष्ट झाल्या व कांहीं इंग्रजांच्या हातीं लागल्या. त्यामुळें बंडवाल्यांचें आसुरी बळ कमी झालें व इंग्रजांचें तेवढ्या प्रमाणानें वाढलें. कारण त्या वेळच्या लढायांत विजयाची भिस्त तोफांवरच बऱ्याच मोठ्या प्रमाणांत असे. शिवाय एकसारख्या होणाऱ्या पराभवामुळें बंडवाल्यांचा उत्साह निमाला व विजयामुळें इंग्रजांचा दुणावला. बंडवाल्या फौजेंतील अनेक शिपाई स्वसंरक्षणाकरितां आपला पाय हळुहळु मागें घेऊन

घरची वाट सुधारूं लागले. लोकांची सहानुभूती आधींच बंडवाल्यांच्या बाजूस फारशी नव्हती, जी थोडीबहुत होती ती बंडवाल्यांनीं आपल्या औट घटकांच्या राज्यांत आपल्या द्रव्यलालसेनें व बेताल वर्तनानें गमावली होती, आणि त्यांचा पराभव होऊन इंग्रजांचें पाऊल पुढें पडूं लागलें तशी तर ती अगदीं संपुष्टांतच आली! बंडवाल्यांना रसद मिळण्याची अडचण पडूं लागली, व त्यामुळें बरेच शिपाई कंटाळून घरीं जाऊन स्वस्थ बसले. लवकरच इंग्रजी फौज बहुसंख्याक व बंडवाले अल्पसंख्याक झाले, परंतु नोव्हेंबर १८५७ पासून तात्या टोपीसारखा छिपत्या छाप्यांचा व मराठेशाही गनीमी काव्याचा पुरस्कर्ता व चतुर सेनापती बंडवाल्यांना मिळाल्यामुळें, त्यांनीं इंग्रजांना बरेच दिवस दाद दिली नाहीं. याच मराठेशाही लढाऊ नीतीला 'गनीमी कावा' हें नांव आहे. लपून छपून एखाद्या गांवावर छापा घालून फौजेकरितां दाणावैरण व द्रव्य मिळविणें, शत्रूंची लहानशी तुकडी आढळल्यास तिच्यावर अचानक छापा घालून साधल्यास तिचा मोड करणें, व शत्रू प्रबळ आहे असें कळतांच युक्तीनें पीछेहाट करून आपलें सैन्य सुरक्षित जागीं नेणें, हीच जुनी शिवाजी महाराजांची युद्धनीति होय, व याच नीतीनें वागून प्रचंड मोंगल बादशाही फौजांना व अफाट सत्तेला न जुमानतां त्यांनीं मराठी स्वराज्य स्थापन केलें. कमजोर बाजूला ही रणनीति फारच उपयोगी पडते. यांत कावा कांहींच नाहीं. तेव्हां 'गनीमी कावा' या शब्दयोजनेऐवजीं 'छिपता छापा' हा शब्दसमूह या रणनीतीचा अधिक चांगला बोध करतो. जेव्हां सर्व खान, प्रसाद, नबाब, सिंह थंडावले तेव्हां बंडखोरांची मोडकी नाव तात्या टोपीनें आपल्या हातीं घेतली, व शिवाजी महाराजांचें अनुकरण करून एक वर्षभर इंग्रजांना झुंजत ठेवलें. शिवाजी महाराज व मल्हारराव होळकर यांच्या जोडीसच तात्या टोपीला बसवावें लागेल, इतकी मराठी युद्धनीती त्यानें आपलीशी केली होती व इंग्रजांविरुद्ध त्या रणनीतीच्या जोरावर एकसारखी झुंज घेतली. परंतु छापे व पीछेहाट सारखी करून जय कसा मिळणार? त्याच्यायोगानें फौजेचा तात्पुरता बचाव होतो व शत्रूंचा पुढें केव्हां तरी मोड करण्याची संधी मिळते. जय मिळविण्याकरितां केव्हांतरी समोरासमोर संधी साधून कां होईना पण शत्रूची गांठ घेतलीच पाहिजे. सामान्य जनता अनुकूल असली तर अशी संधी मागेंपुढें कधीं तरी येण्याचा संभव असतो व शत्रूशीं केव्हांतरी समोरासमोर निकराचा सामना देऊन त्याचा पराभव करावयास सांपडतें. परंतु तात्या टोपीनें दांताच्या कण्या केल्या व परोपरीनें तोंड वेंगाडलें तरी त्याला मराठा

संस्थानिकांचें व महाराष्ट्र जनतेचें साहाय्य मिळालें नाहीं. त्यामुळें त्याचा पराक्रम लोकांना दिसला तरी त्याला फळ आलें नाहीं.

बंडाची मुख्य मदार ज्यांच्यावर होती ते इंग्रजी सेनेंतले फितुर शिपाई नीतिदृष्ट्या कसे कमकुवत होते, याचें वर विवेचन केलें आहे. त्यामुळें बंडवाल्यांतील निरनिराळे खान, प्रसाद, नबाब, सिंह हे बंडवाल्या पक्षांतून गळूं लागले, या गोष्टीचें कोणास नवल वाटणार नाहीं. परंतु या गळतीला इंग्रजी ' साम दाम दंड भेद ' अशी चतुर्विध नीतिच मुख्यतः कारणीभूत झाली. पहिल्या झपाट्यास इंग्रजांनीं सांपडेल त्याला फांशी देण्याचा किंवा गोळी घालून ठार मारण्याचा सपाटा चालविला. फक्त बंडवाल्यांनाच देहांत शिक्षा देण्यांत आल्या असें नाहीं, तर बंडवाल्यांबद्दल ज्यांची यत्किंचित देखील सहानुभूती आहे असा इंग्रजी अधिकाऱ्याला संशय येई, त्याचें धड शेजारच्या चिंचेवर लटकूं लागे. गांवचे गांव जाळण्यांत आले, आणि रस्त्यावरील दुतर्फा असलेलीं झाडें प्रेतांनीं शृंगारलीं गेलीं. हा शृंगार मोठ्या गमतीचा होई. कोणी कमळाप्रमाणें तर कोणी अर्धचंद्राकार, तर कोणी 8 आठ या इंग्रजी अक्षराच्या आकृतीप्रमाणें झाडावर हा प्रेतांचा साज चढवीत, व याप्रमाणें मोठ्या चढाओढीनें इंग्रज अधिकारी आपल्या सौंदर्यप्रियतेचें प्रदर्शन करीत ! इंग्रजांचा दरारा प्रस्थापित झाल्यावर भेदास सुरवात झाली. ज्यांनीं प्रत्यक्ष बंडांत भाग घेतला त्यांना शिक्षा केल्या जातील, परंतु जे फक्त हुल्लडीमुळें बंडांत सामील झाले असतील ते ताबडतोब शरण आल्यास त्यांना माफी मिळेल, असे जाहीरनामे प्रसिद्ध झाले. दंडनीतीमुळें भेकड व भेदनीतीमुळें अनिश्चयी लोक याप्रमाणें बंडवाल्यांना सोडून गेल्यावर, साम आणि दामाचे अखेरीस प्रयोग करण्यांत आले. १ नव्हेंबर १८५८ रोजीं प्रसिद्ध झालेला ' राणीचा जाहीरनामा ' हा सामनीतीचा अत्यंत यशस्वी व सुंदर प्रयोग होय. दामानेंही अनेक वेळां चोख रीतीनें आपलें काम बजावलें. मानसिंगाला लालुच देऊनच तात्या टोपी इंग्रजांच्या हातीं लागला ! पेशव्यांशीं घरभेदीपणा केला असला तरी इंग्रजांशीं अप्रतिम राजनिष्ठा राखल्याबद्दल, पेशव्यांचे आश्रित नारायण रामचंद्र सुभेदार ब्रम्हावर्तास कायमचे वंशपरंपरागत जहागीरदार झाले ! हीं त्या काळचीं नातूपंथी उदाहरणें वाटेल तितकीं देतां येतील !! ' दाम करी काम ' ही म्हण सार्थ आहे खरी !!! सारांश इंग्रजांच्या पराक्रमाप्रमाणेंच किंबहुना त्याहीपेक्षां अधिक त्यांचा मुत्सद्दीपणा बंड मोडण्याच्या कामीं आला.

इंग्रजांच्या धोरणी नीतीनें बंडवाल्यांत दोन पक्ष झाले होते. पुष्कळ ठिकाणीं बाप किंवा चुलता इंग्रजांच्या वतीनें त्यांच्या पलटणींत राहून लढत असे, तर उलटपक्षीं मुलगा किंवा पुतण्या बंडवाल्यांना सामील झालेला असे. यामुळें युद्धापूर्वी व युद्धानंतरही समोरासमोर ठाकलेल्या शत्रुसैन्यांत लढणाऱ्या व्यक्तींचें बरेंच दळणवळण चालत असे, व हुक्याचे झुरके मारीत मारीत त्यांचें तासनतास संभाषण चाले. लढाईची चकमक सुरू होतांच शत्रुत्व व एरवीं मैत्री, असें ह्या लोकांचें धोरण असे. ह्या अनैसर्गिक वार्तालापांचा फायदा इंग्रजांना हटकून मिळे! कारण, इंग्रजी फौजेचें लढाईचें धोरण इंग्रज अधिकारी आंखीत असत, व शेवटपर्यंत लष्करी हालचालीचे डावपेंच त्यांच्या पदरच्या काळ्या शिपायांना कळत नसत. कारण त्यांच्या बाजूनें लढत असले तरी इंग्रज काळ्या शिपायांवर फारसा विश्वास टाकीत नसत. उलट बंडवाल्यांचे लष्करी डावपेंच सर्व शिपायांना ठाऊक असत, व गप्पांच्या ओघांत भान न राहून हीं तरुण बंडखोर पोरें, त्या गोष्टी इंग्रजांकडील आपल्या वडीलधाऱ्या माणसांजवळ ओकून टाकीत! शत्रूंच्या हालचालीचा याप्रमाणें आगाऊ सुगावा लागत असल्यामुळें इंग्रज सावध रहात व त्याप्रमाणें ते डावावर प्रतिडाव योजून हटकून यशस्वी होत. गुलसराईचे राजे इस्टेट वांचविण्याकरितां इंग्रजांच्या तर्फे, तर त्यांचे वडील चिरंजीव इस्टेटीची पर्वा न करतां बंडवाल्यांना सामील झालेले! अशीं अनेक उदाहरणें त्या वेळीं घडलीं होतीं. वडील व अनुभवी माणसें सामान्यतः व्यवहाराच्या दृष्टीनें स्वार्थी असतात व त्या दृष्टीनें चालत्या गाडीबरोबर चालत जातात. उलट, तरुण भावनावश असल्यामुळें प्रसंगीं स्वार्थपरायणता बाजूस सारून स्वधर्म, स्वदेश व स्वराज्य यांचा बंदा गुलाम होऊं शकतो व त्याकरितां तो जिवाचीही पर्वा करीत नाहीं. बंडांत आधींच फार थोडे लोक सामील झालेले, व जे झाले त्यांत हे घरांतील घातक पक्षभेद! मग बंडवाल्यांचे पुढारी कितीही उत्तम व कर्तबगार असले, तरी तें बंड यशस्वी कसें व्हावें?

नानासाहेब व झांशीची राणी, आणि औधची बेगम यांच्या मनांत राज्यक्रांति करावयाची होती. इंग्रजी सत्ता उलथून पाडून त्या जागीं हिंदुस्थानांत पूर्ववत् मोंगल बादशाही व पेशवाई स्थापन करावयाची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. त्या धोरणानेंच त्यांनीं आपलें जाळें विणलें; परंतु सामान्य जनता या क्रांतीविषयीं उदासीन होती, आणि पातशाहीचे व पेशवाईचे जुने सरदार बंडाच्या नेत्यांच्या अपेक्षेप्रमाणें बंडांत सामील झाले नाहींत. कंपनीच्या अन्यायाबद्दल त्यांना मनांतून

चीड आली असली, तरी आपलें घरदार संभाळण्याकरितां इंग्रजांचा पक्ष स्वीकारणेंच त्यांना इष्ट वाटलें. यामुळें ही राज्यक्रांति फुसकी ठरली व तिला बंडाचें स्वरूप प्राप्त झालें. जनतेची पेशवाईची व पातशाहीची आणि त्या काळच्या वैभवाची आठवण बुजली नव्हती, परंतु तिच्या मनाचा ओढाही फारसा त्या वैभवाकडे नव्हता. इंग्रजी अमलाचें खरें स्वरूप लोकांना त्यावेळीं पुरतेपणीं कळावयाचें होतें. आगगाड्या, तारायंत्रें, पोष्ट, दवाखाने, शाळा या मोहमयी इंग्रजी सुधारणांना जनता त्या वेळीं भाळली होती. कारण या सर्व गोष्टींचा हिंदुस्थानांत तेव्हां नुक्ताच प्रारंभ झाला होता. देशी संस्थानिकांनीं व लोकांनीं इंग्रजांना मदत करूनच बंडाचा बींमोड केला!

३]

बंडांतील प्रमुख पुढाऱ्यांचें काय झालें, हा प्रश्न दुःखद असला तरी या ठिकाणीं त्याचें उत्तर दिलेंच पाहिजे. कारण त्याशिवाय इतिहासाची सांगता होणार नाहीं. इंग्रजांनीं दिल्लीशहर परत घेतल्यावर वृद्ध मोंगल सम्राट बहादूरशहानें शहरापासून साडेतीन मैल अंतरावर असलेल्या हुमायूनच्या कबरस्थानांत आसरा घेतला होता. क्याप्टन हडसननें २० तारखेला बादशहाला तेथून पकडून आणलें व तेव्हांपासून तिमूरच्या इतिहासप्रसिद्ध घराण्यांतील या शेवटच्या पुरुषाच्या नशीबीं कैद आली. २१ तारखेला हडसनला कळलें कीं, बादशहाचे दोन शहाजादे व एक नातू तेथेंच लपून आहेत. हडसननें त्यांना गिरफ्तार करण्याविषयीं वारंट घेतलें व आपल्याबरोबर एक स्वारांची तुकडी नेऊन त्यांना कैद केलें. परंतु शहरांत त्यांना परत आणतेवेळीं त्या दुष्टानें वाटेंतच गाडी थांबविली, राजपुत्रांना गाडींतून बळजबरीनें खालीं उतरावयास लावून त्यांना कपडे उतरण्याची आज्ञा दिली, व ते तसे उघडे व निःशस्त्र असतां स्वतां त्यांच्यावर पिस्तुलानें गोळ्या झाडून त्यांचा खून केला! खुद्द बादशहाची २७ जानेवारी १८५८ पासून लष्करी कोर्टापुढें चौकशी चालू झाली. इंग्रजी सत्तेविरुद्ध बंड उभारल्याचा, बंडास उत्तेजन दिल्याचा, हिंदुस्थानचा बादशहा म्हणून आपल्या नांवाची द्वाही फिरविल्याचा, ४९ इंग्रजांची अप्रत्यक्षपणें हत्या केल्याचा, असे अनेक आरोप बादशहावर लादण्यांत आले. चाळीस दिवसपर्यंत हा चौकशीचा फार्स चालून अखेर बादशहास दोषी ठरविण्यांत आलें व त्या वृद्ध पुरुषास जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा सुनावण्यांत आली. ब्रम्हदेशांत पेगू येथें इंग्रजांच्या कैदेंत बादशहाचा अखेर अंत झाला. बादशहा तरी या आचरट न्यायाच्या फार्सांत दुसरा काय जबाब देणार?

तो म्हणणार कीं 'मूळ हिंदुस्थानचें राज्य माझें, व मीच येथील खरा बादशहा. तुमच्या बनीया कंपनीनें तें कपटानें हरण केलें. मी माझें राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न केला, तर त्यांत गुन्हा कसला होणार ? तुम्हीं जिंकलें म्हणून तुम्ही माझी चौकशी करीत आहांत. व दोषी ठरवून लहरीप्रमाणें कमजास्त शिक्षाही कराल ! पण यांत गुन्हा कोणता ? मी ४९ इंग्रजांच्या हत्येबद्दल कदाचित् जबाबदार असलों, तर तुम्ही हजारों काळ्या लोकांच्या हत्येबद्दल जबाबदार आहांत. पण तुम्ही जेते पडलां, तेव्हां तुमचा न्याय कोण करणार ?'

बिहारमधील जमीनदार कुंअरसिंग यानें देखील इंग्रजी फौजेशीं बरीच पळती लढाई केली, व इंग्रजी फौजेला विश्रांती मिळूं दिली नाहीं. कुंवरसिंहाचें वय ८० वर्षांचें होतें तरी त्याच्या अंगीं तरुणाची चपळाई होती. २३ एप्रिल १८५८ रोजीं लीग्रांडच्या हाताखालील इंग्रजी सैन्याशीं समोरासमोर सामना घेऊन इंग्रजांचा त्यानें पराभव केला. परंतु म्हातारपणीं ही पळती लढाई चालू ठेवण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं उरलें नाहीं. सात महिनेपर्यंत त्यानें इंग्रजांना दाद दिली नाहीं. अखेर २६ एप्रिल १८५८ रोजीं तो मरण पावला. तापाचें निमित्त म्हातारपणीं मरण्यास पुरेसें होतें. कुंवरसिंहाच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ अमरसिंह यानें तीच पद्धती चालवून इंग्रजांना बरेच दिवस झुलविलें. परंतु ता. १९, २० व २१ या दिवशीं लागोपाठ त्याच्या तुकडीवर सारखे हल्ले चढवून क्याप्टन डगलसनें त्याच्या सैन्याची दाणादाण उडविली. तेव्हां त्याचे बरेच सैनिक मारले गेले व उरलेले कैमूरच्या पहाडांत पळून गेले. परंतु २४ नव्हेंबर रोजीं तेथेंही त्यांना गांठून डगलसनें त्यांचा धुवा उडविला. अमरसिंह मात्र तेव्हांपासून नापत्ता झाला, मग तो त्या धुमश्चक्रींत मारला गेला कीं काय कोण जाणे ! त्याच्या मुलाबाळांकडे त्याची जमीनदारी मात्र इंग्रजांनीं तशीच राहूं दिली. जगदीशपूरचा नक्त खजिना इंग्रज शिपायांनीं मागेंच लुटला होता.

ता. १७ मार्च १८५८ रोजीं लखनौ शहर काबीज करून इंग्रजी सत्ता पूर्णपणें प्रस्थापित केल्यावर, प्रांतभर सर कॉलिन क्यांपबेलनें बंडवाल्यांचा सारखा पाठलाग चालविला. कारण लखनौ इंग्रजांच्या हातीं पडल्यावर बंडवाले औध प्रांतांत धुमाकूळ घालीत होते. क्यांबेलनें हळुहळु औध प्रांत पुन्हा आपल्या कबजांत घेतला. लखनौच्या प्रसिद्ध मौलवीकडे तिकडील बंडवाल्यांचें पुढारीपण होतें. मौलवी अत्यंत शूर व चिकाटीनें लढणारा होता. मौलवीनें इंग्रजी फौजेचा डोळा

चुकवून ५ जून रोजीं पोवेन गांवावर हल्ला केला. परंतु तेथील राजा इंग्रजांचा मित्र असल्यामुळें त्यानें गांवकुसाचे दरवाजे बंद केले. मौलवी हत्तीवर बसून आपल्या फौजेला हुकूम देत होता. त्यानें दरवाजा तोडण्याचा आपल्या शिपायांना हुकूम दिला. हें पाहून राजाच्या भावानें हातांत बंदूक घेऊन, अचूक निशाणबाजी करून मौलवीचा कपाळमोक्ष केला. मौलवीच्या मृत्यूमुळें बंडवाल्यांची लवकरच पांगापांग झाली, व औधमधील बंडाचीं पाळेंमुळें खणून निघालीं. औधची बेगम नेपाळच्या तराईंत पळून गेली. ती इंग्रजांच्या हातीं सांपडली नाहीं, व तिचें वर्तमानही पुढें ऐकूं आलें नाहीं.

झांशीची राणी लक्ष्मीबाई १८ जून १८५८ रोजीं ग्वालेर येथें इंग्रजांशीं लढतां लढतां रणांगणावर पडली. राणी अत्यंत शूर होती व नेहमीं जीवावर उदार होऊन लढत असे. बंडवाल्यांचें एकंदर धोरण पिछेहाटीचें असतां, राणी आपल्या विश्वासू स्वारांसह इंग्रजांवर बेदरकारपणें चालून जात असे. तिनें प्रत्येक लढाईंत इंग्रजांच्या फौजेची फार खराबी केली. गुलोलीच्या लढाईंत तर इंग्रजी तोफांवर ती चालून गेली, व केवळ दैवयोगानें उंटांची तुकडी इंग्रजांच्या कुमकेस आल्यामुळें इंग्रज गोलंदाजांची कत्तल वांचली, व इंग्रजाविरुद्ध डोलूं लागलेले लढाईचें पारडें उलटलें ! राणीच्या चढाऊ धोरणामुळेंच ती प्रत्येक लढाईंत मृत्यूच्या तोंडाशींच संगर करीत असे, आणि अखेरीस ग्वालेरच्या लढाईंत बंडवाले चौखुर उधळले असतां राणीनें तेथेंच रणांगणावर आपला देह ठेवला.

बरेच बंडवाले पुढारी आपापल्या सैन्यासह नेपाळच्या हद्दींत घुसले होते. कारण इंग्रजांनीं सारखा पाठलाग चालविल्यामुळें त्यांना इंग्रजी हद्दींत आसऱ्याला जागाच उरली नाहीं. परंतु तेथें जंगबहादूरच्या गुरख्या शिपायांची व त्यांची गांठ पडून त्यांना गुरख्यांशीं लढाई द्यावी लागली. कारण जंगबहादूरनें इंग्रजांचा पक्ष स्वीकारला होता. शस्त्रास्त्रें नसलेले, विपत्तीनें गांजलेले, पळतां पळतां थकलेले, रानावनांतून भटकावें लागल्यामुळें आजारानें जर्जर झालेले बंडवाले गुरख्यांच्या मुलुखांत गुरख्यांशीं कसे लढणार ? बरेचसे प्रमुख बंडवाले उडालेल्या चकमकींत मारले गेले. शंकरपूरचा राणा वेणीमाधव, गोंडाचा राजा देवीबक्श व बाळाराव पेशवे हे त्या लढाईंत मारले गेले, अशी वदंता आहे. नव्हेंबर १८५८ च्या अखेरीस ही नेपाळच्या तराईंतील शेवटची लढाई झाली, असा अंदाज आहे.

पेशव्यांचा शूर सेनापती तात्या टोपी ह्या मानसिंगाच्या मित्रद्रोहामुळें इंग्रजांच्या हातीं ७ एप्रिल १८५९ रोजीं लागला. त्यानें आपल्या युद्धकौशल्यानें इंग्रजी फौजांना खूप नाचवलें. त्याच्या शौर्याची व रणचातुर्याची इंग्रजांनीं अतोनात तारीफ केली आहे. आपल्या धन्याची आज्ञा पालन करून इंग्रजांशीं लढण्याचा अपराध त्या स्वामिभक्त व इमानी वीरावर लादण्यांत आला, आणि न्यायाच्या फार्सानंतर १८ एप्रिल रोजीं त्यास फांशी देण्यांत आलें। ह्या न्याय झाला नाहीं, असें इंग्रज ग्रंथकारदेखील ध्वनित करतात. तात्याला फांशी दिल्यानंतर बऱ्याच दिवसांनीं, इंग्रजांनीं स्वतांच्या समाधानार्थ कानपूरला चौकशी चालवून तेथील कत्तलीचा दोष तात्याच्या माथीं मारला ! पण तो खरा कोण मानील ? कारण प्रथम शिक्षा देणें व नंतर गुन्हा शाबीद करणें हा क्रम अपूर्व होय !!

फरुखाबादच्या नबाबांनीं इंग्रजांच्या पायां पडून आपले प्राण वांचविले व ते मक्केच्या यात्रेला निघून गेले. बांद्याच्या नबाबांनींही इंग्रजांना शरण जाऊन आपल्यासाठीं सालिना चार हजार रुपयांची पेन्शन मंजूर करून घेतली.

आणि नानासाहेब पेशवे ! त्यांना पकडून फांशीं देण्याकरितां इंग्रजांचे हात सारखे वळवळत होते. कारण कानपूरच्या कत्तलीबद्दल ते अप्रत्यक्ष रीत्या तरी जबाबदार होते. परंतु ते इंग्रजांच्या हातांत सांपडले नाहींत. बंडाचा पुरता मोड झाल्यावर ते नेपाळच्या हद्दींत चालते झाले. त्यांचा पुढें कांहींच पत्ता न लागल्यामुळें व बंडांतील ते एक प्रमुख पुढारी असल्यामुळें त्यांच्याविषयीं नाना प्रकारच्या अफवा उठल्या. कोणी म्हणत ते तिबेटांत व तेथून चीनच्या मार्गानें रशियांत गेले. तीन वर्षांपूर्वीं गायकवाड हद्दींत पकडलेला प्रमुख दरवडेखोरदेखील नानासाहेबाशीं साहचर्याचें नातें जोडूं लागला ! परंतु नानासाहेब पेशवे अशा वाममार्गात पडणारे नव्हते. इंग्रज बायकामुलांची दुर्दैवानें कानपूर येथें कत्तल झाल्यामुळें निरनिराळ्या इंग्रज लेखकांनीं संतापून नानासाहेबाला नरराक्षसच ठरविलें आहे. इंग्रजांना नानासाहेबांचा संताप येण्याला योग्य कारण घडलें होतें यांत शंकाच नाहीं. परंतु, त्यांच्या वडिलांचें राज्य घेऊन वर त्याप्रीत्यर्थ मिळणारी त्यांची पेन्शन बंद करणाऱ्या इंग्रजांचाही त्यांना अतोनात संताप आला होता, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. कानपूरच्या कत्तलींत नानासाहेबांचें प्रत्यक्ष अंग फारच कमी होतें. उलट पेशव्यांच्या घरच्या बायकांनीं

इंग्रज बायकामुलांची कत्तल झाल्यास आपण अन्नपाणी वर्ज करूं, असा सत्याग्रह धरल्याचा उल्लेख गोडशे भटजींच्या बखरींत आहे. परंतु तें कसेंही असलें तरी, नानासाहेबांकडे बंडाचें नेतृत्व असतां कानपुरास कत्तल झाली खरी! तेव्हां नानासाहेब इंग्रजांच्या दृष्टीला मानवी राक्षस, अत्याचारी सैतान किंवा शुद्ध पशू दिसले असल्यास नवल नाहीं. कारण सुडाच्या कल्पनेनें डोळे एकदां फिरले म्हणजे दृष्टी आंधळी होते. परंतु बंडापूर्वी अनेक इंग्रजांनीं—ज्या ज्या इंग्रजांचा नानासाहेबांशीं संबंध आला त्या सर्वांनीं, त्यांना दिलदार, सुंदर, मनमोकळे, मिठास व स्वागत-तत्पर आणि सभ्य म्हटलें आहे. परंतु १८५७ नंतर ही वर्णनाची भाषा विलयास गेली व नराधम, पिशाच, राक्षस, पशू हीं विशेषणें त्या जागीं अवतीर्ण झालीं! परंतु इंग्रज लेखक क्रोधाच्या सपाट्यांत हीं पूर्वोक्त वर्णनें व स्तुतिपर उद्गार विसरले, तरी काळ व इंग्रजी भाषा यांनीं तीं नमूद करून ठेवलीं आहेत. १८५७ संबंधी लिहिणाऱ्या इंग्रज लेखकांची अतिशयोक्ति या दोन उद्गारांतील जमीन-अस्मानाच्या अंतरानें स्पष्ट दिसून येते. आणि इंग्रजांनीं दिलेल्या शिव्या शब्दशः खऱ्या मानल्या तरी, नानासाहेबासारखा दिलदार व सालस तरुण इंग्रजांचा कट्टा द्वेष्टा बनला, या गोष्टीची लज्जा इंग्रज राजनीतीला नाहींच कीं काय? कारण कंपनीची बनियेगिरीच या विलक्षण रूपांतराचें कारण होय!

नानासाहेबांचा शेवट कसा झाला, याबद्दल तर्ककुतर्क करीत बसण्याचें कारण नाहीं. ते रशियांत गेले नाहींत व दरोडेखोरांच्या संगतींत त्यांनीं दिवस काढले नाहींत. ते इंग्रजांच्या हातीं लागले नाहींत, यामुळें त्यांची फांशी व कदाचित् त्याहीपेक्षां अधिक होणारी विटंबना टळली. परंतु बंडानंतर ते लवकरच मृत्यूच्या हवालीं झाले. नानासाहेबांची बहीण व शेवटचे पेशवे श्रीमंत बाजीरावसाहेब यांची कन्या कुसुमावती ऊर्फ बयाबाईसाहेब आपटे यांच्यापेक्षां अधिक विश्वसनीय साक्षीदार कोण मिळणार? त्यांच्या मुखानें बाहेर आलेली हकीगत खालीं दिली आहे. यांचें सासरचें नांव सरस्वतीबाई व ग्वालेर येथील प्रसिद्ध सरदार बाबासाहेब आपटे यांचे चिरंजीव रावसाहेब आपटे यांना ह्या दिल्या होत्या. ह्या अत्यंत नीतिमान, दयाशील व परम धार्मिक वृत्तीच्या होत्या. त्यांना दीर्घायुष्य लाभल्यामुळें त्या अगदीं अलीकडे म्हणजे १९१७ सालीं वारल्या. त्यांनीं आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस काशीक्षेत्रीं काढले! परंतु १९१३ सालीं त्या दक्षिणेंत आल्या होत्या, तेव्हां त्यांनीं खालील हृदयद्रावक हकीगत सांगितली. ती त्यांच्याच शब्दांत दिली आहे:—

"नानासाहेब नेपाळकडे गेले खरे, पण तेथें त्यांस कोणी आश्रय देईना! नेपाळच्या हद्दींत शिरावें तर तेथील राजानें त्यांना हुसकावून लावावें! बरें परत इंग्रजी हद्दींत यावें तर इंग्रजांचें सुदर्शनचक्र रात्रंदिवस नानांच्या पाह्याऱ्यावरच असे! नानांच्या जिवास अहोरात्र चैन म्हणून नसे. सुमारें चौदा महिनेपर्यंत त्यांना या हद्दींतून त्या हद्दींत व त्या हद्दींतून परत या हद्दींत असें सारखें गोते खात राहावें लागलें. शेवटीं या श्रमांनीं व हालअपेष्टांनीं त्यांना ताप आला, व तो दोषी ठरला.

नानासाहेब तापानें बेशुद्ध होऊन पडले तरी नेपाळकरांनीं त्यांची गय न करतां आपल्या सीमेंतून निघून जाण्याची आमच्या मागें तंगी लावली! तेव्हां जवळच्या लोकांनीं आम्हां बायकांची रवानगी शेजारच्या खेड्यांत केली, व नानासाहेब यांस दिवखरी गांवाजवळच्या रानांत एका लहानशा ओढयाच्या जवळ चारपांच शेलक्या स्वारांनिशीं पाठवून दिलें. त्या ठिकाणीं थोड्याशा वेळानें नानासाहेबांनीं आपला देह ठेविला! भोंवतालच्या मंडळींनीं त्यांच्या शवाचें यथाविधी दहन केलें व अस्थी घेऊन ती मंडळी, आम्ही बायकामंडळी होतों तेथें आली. मी तेथें त्या मंडळींत होतेंच. नानासाहेबांची उतरक्रिया माझ्या देखतच झाली. त्या वेळीं माझें वय बारा वर्षांचें होतें.

नानासाहेबांचा असा शोचनीय अंत झाला. पुढें रावसाहेब ( नानासाहेबांचे पुतणे व दादासाहेबांच्या पत्नी रोहिणीबाई यांनीं घेतलेले दत्तक चिरंजीव ) आपला परिवार सोडून ग्वालेरकडे चालते झाले. पण ते सियालकोटच्या जवळपास असतांना एका मराठा जातीच्या इसमानें इंग्रजांस त्यांची बातमी दिली! ती लागतांच त्यांस पकडण्यांत येऊन फांसावर चढविण्यांत आलें. त्यांच्या पत्नीचीही अशीच कांहीं गत झाल्याचें ऐकिवांत आहे. पण नक्की कांहीं कळत नाहीं."

पेशव्यांच्या घराण्यांतील दोन थोर पुरुषांचा याप्रमाणें शेवट झाला. रावसाहेब १८६२ सालीं कानपुरास फांसी दिले गेले. त्यांना पंजाबांतून कानपूर येथें आणण्यांत आलें व त्यांच्यावर रीतीप्रमाणें बंडाच्या आरोपाबद्दल खटला झाला, व त्यांत ते दोषी ठरले, व त्यांना फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली. इंग्रजांनीं असे एकतर्फी मुकद्दमे करून व त्या आधारें अनेक लोकांना कानपूरच्या कत्तलीबद्दल दोषी ठरवून आपल्या सुडाच्या भावनेला न्यायाचें रूप देण्याचा कसा

प्रयत्न केला, याची चर्चा पूर्वी झालीच आहे. त्यांतलाच हाही एक फार्स होता. विश्वासघातकी व दीडदमडीच्या खुशामती व लाळघोट्या साक्षीदारांच्या जबान्यांवर या खटल्यांची उभारणी असे. साक्षीदारांची उलटतपासणी व वकील यांची बंदी असतां हा झटपट निकाल आणखी कसा होणार ? नानासाहेबांचे सर्वांत धाकटे बंधु बाळाराव ऊर्फ बाळासाहेब हे लढाईतच कामीं आले. याप्रमाणें पेशवे व त्यांचे वंशज स्वाभिमानासाठीं, स्वधर्मासाठीं व स्वराज्यासाठीं नष्ट झाले. आणि याप्रमाणें बाजीरावाचें पातक त्यांच्या पुत्रांनीं आपल्या पराक्रमानें व स्वार्थत्यागानें धुवून काढलें ! परंतु नानासाहेबांच्या नांवाला कानपूरचें गालबोट अखेर लागलेंच !

बंडवाल्यांची अगणित संपत्ती इंग्रजांनीं लुटून फस्त केली. दिल्ली, कानपूर लखनौ व झांशी, येथें तर बंडवाल्यांबरोबर शहरचे निरपराधी नागरिकही नागवले गेले. ही लूट इंग्रज शिपायांना व त्यांच्या अधिकाऱ्यांना बहाल करण्यांत आली. अनेक शतकें जमलेली दिल्लीची अफाट संपत्ती इंग्रज शिपायांच्या द्वारा विलायतेस पोहोंचली. बंडांत भाग घेतलेला प्रत्येक इंग्रज सैनिक व अधिकारी गबर होऊनच विलायतेस परत गेला. इंग्रजांच्या द्रव्यलालसेला न्यायअन्याय दिसलाच नाहीं. किर्वी ऊर्फ चित्रकूट येथील संस्थानिक माधवराव पेशवे हे बालवयी असून इंग्रजांचे पूर्ण पक्षपाती होते. परंतु तेथें बंड झालें तेव्हां त्यांचे स्वाभाविक कांहींच चाललें नाहीं. बंडाच्या धामधुमींत त्यांच्या रक्षणाचा भार इंग्रजांवर होता. परंतु इंग्रजांचा तेथें पत्ताच नव्हता. पुढें झांशी सर ह्यू रोझनें जिंकल्यावर व्हिटलॉक चित्रकूट येथें पोहोंचला; बिचारे माधवराव पेशवे व त्यांचे दूरचे नातलग नारायणराव व पेंडसे कारभारी, हे सर्व त्याच्या स्वागतार्थ सामोरे गेले. परंतु त्या लहान मुलांना बंडखोर ठरवून व्हिटलॉकनें कैद केलें व चित्रकुटांतील अगणित द्रव्यसंपत्ती मनमुराद लुटली. चार कोटीपेक्षा अधिक ऐवज व्हिटलॉक व त्याच्या शिपायांना तेथें प्राप्त झाला. ही हकीगत कळतांच सर ह्यू रोझनें त्या लुटीवर आपला हक्क सांगितला ! कारण बुंदेलखंडांतील मोहिमेचे सर्वाधिकार त्याच्याकडे होते. दोघांतील ही तक्रार पुढें कोर्टांत गेली, त्यामुळें हें अन्यायानें बरबटलेलें काळेंकुट्ट प्रकरण उघडकीस तरी आलें ! ज्यांच्या रक्षणाचा भार इंग्रजांवर होता, त्यांचें रक्षण न करतां उलट त्यांनाच बंडखोर ठरवून कैद करणें ह्याला काय नांव द्यावें ! मुलांची इस्टेट जप्त करून खाऊन फस्त करणारे पालक व त्यांनीं दिलेला न्याय अपूर्वाईचाच म्हटला पाहिजे ! केवळ द्रव्यलोभानें व्हिटलॉकनें हा अन्याय केला यांत शंकाच नाहीं.

के व म्यालेसन या दोघांनींही या अन्यायाचा सडकून निषेध केला आहे. परंतु उपयोग काय? इंग्रजांनीं त्या अन्यायाची भरपाई कोठें केली? हा एक उघडा नागडा अन्याय पाहिला, म्हणजे बंडाच्या गर्दीत ठिकठिकाणीं असे किती तरी अन्याय घडले असतील असें वाटून मन साशंक होतें. झांशीची राणी लक्ष्मीबाई हिचा दत्तक मुलगा दामोदरराव ऊर्फ आनंदराव याच्या बाबतींत असाच अन्याय करण्यांत आला. त्यांचें दत्तविधान नामंजूर करून लॉर्ड डलहौसीनें झांशीचें राज्य खालसा केलें, तेव्हां दामोदररावाचा खाजगी इस्टेटीवरील हक्क शाबीद धरण्यांत आला. इंग्रजांच्या खजिन्यांत जमा असलेले रुपये 'अज्ञानाचे' म्हणून, राणी ते मुलाच्या मुंजीकरितां मागत असतांना तिच्या हवालीं इंग्रजांनीं केले नाहींत. राणीनें बंड केलें तेव्हां दामोदरराव अज्ञान बालक होते व इंग्रज त्यांच्या इस्टेटीचे कायदेशीर पालक होते. तेव्हां राणीच्या अपराधाबद्दल अज्ञान दामोदररावांची जमा जप्त करण्यास इंग्रजांस अधिकार कसा पोहोंचला? दामोदररावांना त्यामुळें गरीबींतच दिवस काढावे लागले. त्यांची इस्टेट त्यांना मिळाली नाहीं. ती त्यांच्या आईच्या बंडाच्या अपराधाबद्दल जप्त झाली! वड्याचें तेल वांग्यावर उडालें! मोठ्या मीनतवारीनें त्यांना दीडशें रुपये महिना पेनशन मंजूर झालें. इंग्रजांचा द्रव्यलोभ मोठा कठिण! माशानें एकदां गिळलेलें माणीक परत कसें मिळणार? बंडामध्यें इंग्रजी शिपायांचे खिसे चांगलेच गरम झाले. दिल्ली, लखनौ, ब्रम्हावर्त व झांशी हीं प्रमुख संस्थानी शहरें श्रीमंतीनें फुललेलीं होतीं. हीं ताब्यांत घेतल्यानंतर शिपायांनीं तेथें मनमुराद लूट केली. इतर ठिकाणींही शिपायांना कांहीं मिळालें नाहीं अशांतला भाग नाहीं. कानपूर शहर नवें असलें तरी भरभराटींत होतें. बिठूर व चित्रकूट येथें पेशव्यांच्या घराण्यांतील अगणित संपत्ती इंग्रजांच्या हातीं लागली. बांदा, शंकरपूर वगैरे लहानसहान ठिकाणींही इंग्रजांचे हात पिवळे झाले. बंड प्रत्यक्ष पाहिलेल्या तत्कालीन इंग्रजानें असे लिहिलें आहे कीं, प्रत्येक इंग्रज शिपायानें आपल्याबरोबर परत विलायतेला निदान दहा दहा हजार रुपये बंडांतील लुटीच्या हिश्शाचे नेले. (Martin's Indian Empire, Vol. II, Page 449 note) बंडांतील गोऱ्या शिपायांची ही आमदानी लक्षांत घेतां, इंग्रजांचे अधिकारी व सेनापती यांचीं घरें सोन्यानें मढवून निघालीं असतील, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. गवर्नर जनरलनें शिपायांचा या लुटीवरील हक्क कायदेशीर ठरविल्यामुळें इंग्रजांचा द्रव्यलोभ फोफावला, व सेनापती व्हिटलॉकनें तर न्यायाच्या नांवानें कसे दरोडे घातले, हें चित्रकूट प्रकरणांत

पाहिलेंच आहे. याप्रमाणें बंडाच्या निमित्तानें हिंदुस्थानांतील पिढयानपिढया सांठविलेली अगणित संपत्ती गोऱ्या शिपायांबरोबर व त्यांच्या अधिकाऱ्यांबरोबर विलायतेस रवाना झाली. क्रिमीयन युद्धांत गेलेले शिपाई हात हालवीत परत येतात, तर हिंदुस्थानांतील बंडाची मोहीम आटोपतांच शिपायांचा खिसा गरम होतो, हें पाहून हिंदुस्थानच्या संपत्तीचा विलायतेस बोलबोला झाला, व सुवर्णभूमि हें हिंदुस्थानचें नांव सर्वांना सार्थ वाटलें. ही संपत्ती नेल्यामुळें लोकांच्या अंगावर कसे ओरखडे पडले याची मात्र तिकडे कोणाला फारशी माहिती झाली नाहीं !

[४]

१८५७ च्या बंडापासून इंग्रजी सत्ता किती प्रबल आहे हें हिंदी लोकांना कळून चुकलें. इंग्रज लोक हिंदुस्थानापासून पांच हजार मैल दूर अंतरावर राहात असले, तरी त्यांची हिंदुस्थानावरील पकड अतिशय बळकट व चिकाटीची आहे, हें हिंदी लोकांना कळून आलें. त्यावेळीं आजच्याप्रमाणें हिंदुस्थानभर रेल्वेचें जाळें पसरलें नव्हतें. रेल्वे नुक्तीच कोठें तेव्हां हिंदुस्थानांत डोकावत होती. त्यामुळें फौजेच्या हालचाली तडफीनें होणें शक्य नव्हतें. फौजेला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जावयाचें म्हणजे पायपीटच करावी लागे. रसद, दारुगोळा यांचा वारंवार पुरवठाही जलदीनें होणें शक्य नव्हतें. शिवाय इंग्रजी राज्ययंत्राची घडीदेखील त्या वेळीं आजच्या प्रमाणें नीट बसली नव्हती. एखादा स्क्रू सहज मोडे व यंत्राची चाल वेडीवांकडी होई, व पुन्हा दुरुस्ती होईतोंपर्यंत यंत्र उत्तम काम देत नसे. त्या वेळीं हिंदुस्थान देश सशस्त्र होता. प्रत्येक नागरिकाच्या घरीं चार दोन हत्यारें तरी असतच असत. शिवाय लढाईचें शास्त्र आजच्याप्रमाणें परिणतावस्थेला पोहोंचलें नव्हतें. विमानें, ट्यांक, मशीन गन्स, अतिशय लांब पल्ल्याच्या तोफा, बांबगोळे, डायनामाईट, मोटारी, बिनतारी संदेशवाहक या सर्व आजच्या नवीन लष्करी शोधांचा त्यावेळीं हिंदुस्थानांतील इंग्रजी फौजेस उपयोग माहित नव्हता. शिवाय इंग्रजांच्या तालमींत वाढलेले व इंग्रजी कवायत शिकून तरबेज झालेले व इंग्रजांचींच हत्यारें वापरणारे देशी शिपाई बंडांत सामील झाले होते, त्यामुळें इंग्रजांचीं हत्यारें व इंग्रजी रणनीति त्यांनीं इंग्रजांविरुद्ध मनमुराद उपयोगांत आणली. इंग्रजांचें अंध अनुकरण बंडवाल्या शिपायांच्या अंगीं इतकें मुरलेलें होतें कीं, स्वधर्माकरितां इंग्रजांविरुद्ध लढणारे शिपाई शत्रूवर चालून जातांना 'God save the Queen—Long live our Queen—happy and glorious–long to reign over us '—ईश्वर राजाचें (त्या वेळीं

राणीचें ) संरक्षण करो, हें इंग्रजी राष्ट्रगीत मोठ्या उत्साहानें ब्यांडच्या चालीवर, इंग्रजी ब्यांड वाजवीत वाजवीत म्हणत असत. बंडवाल्यांना या राष्ट्रगीताचा अर्थ कळत नसे, परंतु युद्धास निघतांना ब्यांडच्या चालीवर हा मंत्र म्हणावयाचा, एवढीच तांत्रिक विद्या ते जाणत असत. याप्रमाणें सर्व गोष्टी अनुकूल असूनही इंग्रजांचा मोड झाला नाहीं, व इंग्रज या देशांतून गेले नाहींत. थोड्याच दिवसांत बंडाचा मागमूसही उरला नाहीं, व इंग्रजी सत्तेची पकड हिंदुस्थानावर पूर्वीपेक्षां अधिक आवळून बसली.

पुढें इंग्रजी राज्ययंत्राची घडी उत्तम बसली, व हिंदी राष्ट्रास स्वराज्योन्मुख करणारी काँग्रेस जन्मास येण्यापूर्वी हिंदी राष्ट्रास पूर्णपणें निःशस्त्र करण्यांत आलें. रेलवे व तारायंत्रांचें जाळें देशभर विणलें गेलें, व आधुनिक जगांतील सर्व शास्त्रीय शस्त्रास्त्रें व उपकरणें इंग्रजी फौजेपुढें हात जोडून उभीं राहिलीं. तेव्हां नव्या सुरू झालेल्या हिंदी राजकारणांतून सशस्त्र बंडाच्या कल्पनेचें अशक्य म्हणून समूळ उच्चाटन झालें यांत नवल नाहीं. इंग्रजांविरुद्ध सशस्त्र बंड करणें व तें यशस्वी करून दाखविणें या दोन्ही गोष्टी अशक्य कोटींतील आहेत व दिवसेंदिवस त्या अधिकाधिक अशक्य होत आहेत, ही गोष्ट सर्वांना पटली. कारण इंग्रजांचें लष्करी सामर्थ्य, वैभव, संपत्ती व सत्ता हीं हिंदी लोकांच्या मानानें गेल्या सत्तर वर्षांत कल्पनातीत वाढलीं आहेत. त्यामुळें उदयोन्मुख हिंदी राष्ट्राचें राजकारण सनदशीर व शांततामय या दुहेरी रुळांवर आलें आहे. या नव्या राजकारणाचा आदि '**अर्जविनंत्या**' व अंत '**करबंदीची चळवळ**' हा आहे. या नव्या राजकारणाच्या आद्यंतामध्यें इतकें विलक्षण अंतर असलें तरी सनदशीर व शांततामय मार्गांवरीलच ते दोन्ही खुंट होत. १८५७ च्या बंडानें एकंदर परिस्थितीचें यथार्थ रूप हिंदी राष्ट्राला दाखवून, नव्या चळवळीचा व स्वराज्यसंपादनाचा एकच मोकळा असलेला मार्ग आक्रमण्यास शिकविलें.

ज्याप्रमाणें १८५७ च्या बंडानें हिंदी राष्ट्राला व हिंदी लोकांना धडा मिळाला, त्याचप्रमाणें बंडापासून इंग्रजांना देखील पुष्कळ गोष्टी शिकतां आल्या. हिंदी लोकांच्या हातीं शस्त्रें असलीं तर वेळप्रसंगीं कसा अनर्थ घडण्याचा संभव असतो हें इंग्रजांना प्रत्यक्ष अनुभवानें कळून आलें व त्या अनुभवापासून ते शहाणपणें शिकले. हिंदु-मुसलमानांची एखाद्या आगंतुक कारणानें तात्पुरती एकी झाली, तरी या संस्कृती मूलतः भिन्न असल्यामुळें एकीची बेकी होण्यास फारच

थोडीं कारणें पुरतात, व मुद्दाम प्रयत्न केला तर हिंदुस्थानांतील या दोन प्रजाजनांतील प्रमुख संघांत कायमची आडवी भिंत बांधतां येते. मुसलमानांच्या अत्याचारांमुळें इंग्रजांना ५७ सालीं त्यांचा अतोनात संताप आला, तरी पुढें या आडदांड लोकांना चुचकारणें व त्यांना इंग्रजी संस्कृतींत राबविणें हेंच राजकारणाच्या दृष्टीनें त्यांना इष्ट वाटूं लागलें. बंडांत मुसलमान व पुरभय्ये शिपायांचाच भरणा विशेष असतांही, महाराष्ट्रीय सेनानायकांच्या अभावीं बंडवाल्यांना आपला पराक्रम विशेष कोठेंच दाखवितां आला नाहीं. उलटपक्षीं, नानासाहेब पेशवे, झांशीची राणी लक्ष्मीबाई व सेनापति तात्या टोपी यांच्या नेतृत्वाखालीं त्याच बंडवाल्यांनीं इंग्रजांना कित्येक दिवस दाद दिली नाहीं. हीं तीनही माणसें महाराष्ट्रीय व विशेषतः महाराष्ट्र ब्राम्हण असल्यामुळें, महाराष्ट्र ब्राम्हणांच्या बुद्धिसामर्थ्यांकडे व उपजत लोकनेतृत्वाकडे इंग्रज साशंक चिकित्सेनें पाहूं लागले. हिंदी लोकांच्या धर्मांत हात घालणें वावगें आहे हें त्यांना कळून चुकलें, व राजेरजवाडे, संस्थानिक, आणि इनामदार यांचें पूर्वापार चालत आलेल्या वतनावरील विलक्षण प्रेम पाहून, त्यांचा आपल्या राज्याच्या व सत्तेच्या बळकटीसाठीं उपयोग करून घेण्याचें धोरण त्यांनीं आंखलें व तें नक्की केलें. संस्थानें खालसा करण्याऐवजीं तीं कायम ठेवून, इंग्रजी सत्तेचे बालेकिल्ले त्यांना बनविण्याची धोरणी दृष्टी यापुढें इंग्रजांनीं निश्चित केली. व्यावहारिक दृष्ट्या बोलावयाचें म्हणजे बंड अयशस्वी झालें, व इंग्रजांचा जय झाला असेंच म्हटलें पाहिजे. परंतु जरा खोलवर विचार केला, बंडाचीं ग्रंथारंभीं चर्चा केलेलीं विविध कारणें लक्षांत घेतलीं, व बंडवाल्यांच्या मानसिक तत्वज्ञानावर नजर पुरविली, म्हणजे बंड यशस्वी झालें असेंच म्हणावें लागेल. हिंदु-मुसलमानांच्या धर्मांत हात घालून, त्यांच्या पुरातन चालीरीतींना न जुमानतां 'हम करेसो कायदा' अशा रीतीनें वागण्याची इंग्रजांची जी घातुक संवय होती तिला आळा बसला. संस्थानिकाला औरस पुत्र नाहीं, तर कर त्याचें राज्य खालसा ! त्यानें हिंदुधर्माप्रमाणें दत्तक घेतला तर तो नामंजूर करावयाचा ! कारण काय तर इंग्रजी राज्यकर्त्यांची केवळ लहर ! हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दत्तक व औरस पुत्रांच्या हक्कांत काडीमात्र भेद नाहीं. जो औरस पुत्राला अधिकार तोच दत्तकाला अधिकार ! आणि मेल्यानंतर श्राद्ध करून पाणी द्यावयास एखाद्याला पुत्र नसला, तर मृत्यूनंतर केवळ तोच माणूस नव्हे तर त्याचे सर्व पितर नरकांत जातात ही हिंदूंची धर्मभावना ठाऊक असूनही, त्यांनीं घेतलेल्या दत्तकांना कंपनीनें मान्यता दिली नाहीं.

कारण काय, तर ख्रिस्ती धर्मांत दत्तक घेण्याची चाल प्रचारांत नाहीं! परंतु आपल्या धर्मकल्पना दुसऱ्यावर जबरीनें लादणें व त्यांचें आचारस्वातंत्र्य नष्ट करणें, हें राजकारण नव्हे व औदार्य तर नव्हेच नव्हे. बरें दत्तक नामंजूर केला तरी राज्य खालसा करण्याचा कंपनीला काय अधिकार पोहोंचत होता. ख्रिस्ती धर्मांप्रमाणें तुम्हांला दत्तक मंजूर करवेना, तर राजाचे काका, मामा, चुलता, पुतण्या, पुतणी, भाची, चुलतभाऊ, चुलतबहीण वगैरे जे अनेक भाऊबंद असतील, त्यांच्या पैकीं ज्याचा वारसा जवळचा ठरत असेल त्याला गादीवर बसविणें कंपनीचें काम होतें. हिंदु धर्म पसंत नसेल तर ख्रिस्ती धर्मशास्त्राच्या मताप्रमाणें जो भाऊबंद तुम्हाला जवळचा नातेवाईक वाटत असेल, त्याचा वारसा कबूल करून त्याला गादीवर बसविणें सार्वभौम सत्तेचें कर्तव्य होतें. परंतु कंपनीला अनिवार राज्यलोभ सुटला असल्यामुळें तर्कशास्त्र गुंडाळून ठेवून कंपनीनें न्याय-अन्याय पाहिला नाहीं. राज्याच्या वारसदारीचा प्रश्न उद्भवला म्हणजे दत्तकपुत्र नामंजूर, परंतु खाजगी मालमत्तेचा प्रश्न पुढें आला कीं तोच नामंजूर दत्तक मंजूर ठरून वारसदार होऊं लागला! याला न्याय कीं नीति म्हणतां येईल? ही केवळ झोटिंग पादशाही होती!

आणि १८५७ च्या बंडामुळें संस्थानिकांच्या बाबत होणारी ही न्यायनिवाड्याची विटंबना बंद पडली. नानासाहेब पेशवे व झांशीची राणी लक्ष्मीबाई यांनीं आपलें सर्वस्व गमावून अखेर आपल्या प्राणांची आहुती या यज्ञांत दिली व यज्ञाची सांगता केली. परंतु त्यामुळें इंग्रजांना त्यांचा संताप आला असला तरी सर्व हिंदी संस्थानिकांनीं कृतज्ञतापूर्वक त्यांचें नित्य स्मरण करणें व त्यांना प्रत्यहीं तिलांजलि देणें जरूर आहे. कारण कांहीं तरी खरें खोटें निमित्त उभें करून, संस्थानेंच्या संस्थानें गिळंकृत करून त्यांना तांबडा रंग फासण्याची इंग्रजी नीती त्या दिवसापासून सपशेल बदलली. १८५७ सालानंतर किती तरी छोटे मोठे संस्थानिक निपुत्रिक मरण पावले, परंतु त्यांना दत्तक घेण्याची परवानगी मिळाली, व त्यांच्या दत्तकांकडे राज्याचा वारसाही चालविण्यांत आला. औंध प्रांताप्रमाणें कित्येक संस्थानांत राज्यकारभाराची हेळसांड होऊन बेबंदशाही माजली, परंतु त्या सबबीवर कोणतेंही संस्थान १८५७ नंतर खालसा करण्यांत आलें नाहीं. इंग्रजांनीं संस्थानांचा कारभार तात्पुरता आपल्या हातीं घेऊन व तो शक्य तितका सुधारून परत त्या त्या संस्थानिकांच्या किंवा त्यांच्या वारसांच्या स्वाधीन केला. पंजाबचे महाराजा धुलीपसिंह किंवा चित्रकूटचे माधवराव पेशवे यांच्यासारख्या

अज्ञान बाल-राज्यकर्त्यांशीं इंग्रजांनीं असें सर्वस्वापहारक अन्यायी वर्तन केलें नाहीं. १८५७ चें बंड झालें नसतें तर आजला औषधाला देखील एक संस्थान हिंदुस्थानांत उरलें नसतें. कारण हिंदुस्थान एकछत्री व एकतंत्री करणें हें त्यावेळीं इंग्रजांचें ध्येय होतें व त्या ध्येयाला अनुसरून त्यांचें वर्तन व राजनीति होती. अनेक इंग्रज अधिकाऱ्यांनीं हें अनेकदां स्वच्छ लिहिलें होतें, आणि एखादी संधी साधून व एखादें निमित्त पाहून संस्थानें खालसा करण्याचा डाव कंपनीनें योजला होता. परंतु १८५७ च्या बंडानंतर ही राजनीति बदलली व संस्थानांचें पुढें संरक्षण झालें. त्यामुळें निदान हिंदी संस्थानिकांनीं तरी नानासाहेब पेशवे व राणी लक्ष्मीबाई यांच्याविषयीं कृतज्ञता दाखविणें, हें त्यांचें कर्तव्यच आहे.

१८५७ च्या बंडापूर्वी हिंदुस्थानांत **ईस्ट इंडिया कंपनीचें** राज्य होतें. एलीझाबेथ राणीनें हिंदुस्थानशीं व्यापार करण्याकरितां या कंपनीला सनद दिली, त्या सनदेंत साहसी गुंडांची संस्था (Society of Adventurers) म्हणून या कंपनीचा नामनिर्देश केला आहे. ता. ३ आक्टोबर १६९० रोजीं या संस्थेच्या चालकांनीं हिंदुस्थानांत कोणत्याही महत्त्वाच्या जागीं सच्छील माणसाला न नेमण्याचा ठराव केला. कारण संस्थेच्या कारभारांत सभ्य गृहस्थांचा (Gentlemen या इंग्रजी शब्दांत किती उत्तम गुणांचा समावेश होतो हें इंग्रजी प्राचीन ग्रंथाच्या वाचकांना ठाऊक असेलच. मूळ ठरावांत हाच इंग्रजी शब्द वापरला आहे. आणि सतराव्या व अठराव्या शतकांत, न्यायी, उदार, सत्यप्रिय, शीलवान व कर्तव्यदक्ष अशा पुरुषाचा या शब्दानें बोध होत असे.) शिरकाव झाला, तर धाडशी गुंड कंपनींतून आपलें आंग काढून घेतील व वर्गणी देणें बंद करतील अशी भीति व्यक्त केली आहे [Bruce's Annals of the East India Company, Vol. I, page 128]. येन केन प्रकारेण धाडसाच्या व गुंडगिरीच्या जोरावर द्रव्य संपादन करणाऱ्या या टोळीच्या हातांत हिंदुस्थानचें राज्य आलें. कंपनीनें व तिच्या हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांनीं राज्य व द्रव्य संपादन करतांना कसे अनाचार केले याचें थोडेंबहुत वर्णन वॉरन हेस्टिंग्जच्या खटल्यांत उघडकीस आलें. आपल्या भांडवलावर सपाटून व्याज सुटावें, व प्रचंड नफ्यामुळें कंपनीच्या शेअरची किंमत अवाच्या सवा वाढावी असें साहजिकच कंपनीचें धोरण असे. या बनियेगिरी पद्धतीचें व राज्यकारभाराचें स्वभावतः वांकडें आहे. कंपनीच्या फायद्याकरितां येथील अधिकारी न्यायाच्या कल्पना गुंडाळून ठेवीत. एखादा न्यायप्रिय सद्गृहस्थ कंपनीच्या

बाण्याविरुद्ध हिंदुस्थानांत चुकून नेमला गेला, तरी '**पैसा पाठवा**' या विलायतें-तील डायरेक्टरांच्या तगाद्यानें तो रडकुंडीस येई, व कोणत्या तरी मार्गांनें येथील लोकांकडून पैसा उकळून त्याला विलायतेस पाठवावा लागे; व आपल्या अन्न-दात्यांना संतुष्ट करणें भाग पडे. नफ्याच्या दृष्टीनें कोणत्याही देशाचा राज्यकारभार चालविला म्हणजे कसे घोर अन्याय घडून येतात, व प्रजेवर कसा जुलूम होतो याचें उत्तम उदाहरण, एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व विसाव्या शतकाच्या आरंभीं आफ्रिका खंडांतील बेलजियमच्या अंमलाखालीं असलेल्या कांगो प्रांतांत घडलें आहे, तें वाचावें. बेलजियम लोकांनीं पैशाच्या अनिवार लालसेनें तेथील गरीब व दुबळया लोकांवर जे भयंकर अनाचार केले त्याचें दिग्दर्शन देखील करावयास ही लेखणी समर्थ नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीच्या द्रव्यलोभी कारभारावर पुढें पुढें पार्लमेंटची थोडीशी देखरेख होऊं लागली, तरी कंपनीचा येथील कारभार पक्षपाती, अन्यायाचा, लोभी व जुलमी होता. कारण कंपनीचे बरेच हिस्सेदार पार्लमेंटचे सभासद असत व मुनाफ्यांत त्यांची भागी असल्यामुळें ते अन्याया-विषयीं मूग गिळून बसत. असल्या कंपनीच्या राजवटीविरुद्ध बंडवाल्यांनीं युद्ध पुकारलें, आणि बंडवाल्यांचा व्यावहारिक दृष्टया पराभव झाला, तरी तात्विक दृष्टीनें बंड यशस्वी झालें असेंच म्हटलें पाहिजे. कारण बंडाच्या ज्वाळा पूर्णपणें शमण्यापूर्वींच, बंडवाल्यांना साध्य न झालें तर खुद्द ब्रिटिश पार्लमेंटनें ईस्ट इंडिया कंपनीचें उच्चाटन करून हिंदुस्थानचें राज्य आपल्या हातीं घेतलें. ता. २ आगष्ट १८५८ रोजीं या कायद्यावर महाराणी विक्टोरियाची सही झाली, आणि तेव्हांपासून इंग्लंडचें कायदेशीर राज्य हिंदुस्थानवर सुरू झालें. दयाशील व न्यायी बुद्धी ठेऊन ज्यानें आपलें मन शेवटपर्यंत समतोल ठेवलें, व आपल्या दयाळु धोरणानें बंड विझवून हिंदुस्थानांतील लोकांना निर्भय केलें, त्या थोर मनाच्या लॉर्ड क्यानिंगला राणीचा हिंदुस्थानांतील पहिला प्रतिनिधी होण्याचा मान मिळाला, व तेव्हांपासून हिंदुस्थानांत येणारा प्रत्येक गवर्नर जनरल इंग्लंडच्या राजाचा प्रतिनिधी म्हणून हिंदुस्थानांत वावरतो.

हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें राणीनें आपल्या हातीं घेतल्यानंतर लवकरच, म्हणजे ता. १ नव्हेंबर १८५८ रोजीं राणीनें आपला सुप्रसिद्ध जाहीरनामा प्रसिद्ध केला. या जाहिरनाम्याला हिंदुस्थानांतील लोक स्वराज्याची सनदच मानतात. लॉर्ड कर्झनसारख्या कांहीं बादशाही वृत्तीच्या अरेरावांना हा जाहीरनामा म्हणजे अशक्य असा कागदाचा कपटा वाटला असला, तरी इतर इंग्रजी मुत्सद्दी

व सर्व हिंदी लोक त्याची खरी योग्यता ओळखून आहेत, व त्याला सर्वजण योग्य तो मानही देतात. १८५७ च्या पूर्वी कंपनीचा येथील राज्यकारभार ज्या रीतीनें चालू होता, त्याच्याशीं हा जाहीरनामा पडताळून पाहिला म्हणजे बंडाचीं कारणें किती न्याय्य होतीं, व बंड लष्करी दृष्टया मोडलें तरी बंडवाल्यांच्या बहुतेक सर्व अटी इंग्रजांनीं कशा कबूल केल्या व बंडास कारण झालेली त्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचें कसें आश्वासन दिलें, या गोष्टी प्रत्ययास येतात. या उदार घोषणेनें व कंपनीच्या मृत्यूनें हिंदी प्रजा संतुष्ट झाली व बंडाचे शेवटचे निखारेही क्षणभरांत विझून थंड झाले. कारण कंपनीची राक्षसी भूक अशी प्रबल झाली होती कीं मोटमोठीं राज्यें व संस्थानें खालसा करूनच केवळ ती निवत नसे, तर लहानमोठे जमीनदार व इनामदार यांचे पूर्वापार व वंशपरंपरागत हक्क देखील इनाम कमीशन व थॉमसनपद्धती यांच्या तडाक्यांत सांपडून नष्ट होऊं पहात होते. त्यामुळें प्रजेला घोर विवंचना लागली होती. राणीच्या उदार जाहीरनाम्यानें दैवयोगानें गळफांस तुटावा इतका लोकांना आनंद झाला, व कंपनीचा संबंध तुटल्याबद्दल त्यांच्या चित्ताला समाधान झालें, इतका कंपनीच्या राज्याचा त्यांना वीट आला होता. राणीचा हा सुप्रसिद्ध जाहीरनामा खालीं दिला आहेः—

**हिंदुस्थानांतील सर्व राजेरजवाडे, संस्थानिक व प्रजाजन यांस–**

१. ईस्ट इंडिया कंपनीच्या हातून हिंदुस्थानचा राज्यकारभार काढून घेऊन तो आम्हीं प्रत्यक्ष आपल्या हातीं घेतला आहे.

२. तेव्हां प्रजेनें यापुढें आमच्याशीं किंवा आमच्या वंशजाशीं व वारसाशीं राजनिष्ठ रहावें, व हिंदुस्थानचा राज्यकारभार चालविण्यास आम्ही जे अधिकारी नेमूं किंवा प्रतिनिधी पाठवूं, त्यांच्या आज्ञा यथायोग्य पालन कराव्या.

३. लॉर्ड क्यानिंगला आम्ही आमचे पहिले प्रतिनिधी मुकर केलें आहे. आमच्या स्टेट सेक्रेटरीमार्फत त्यांना जे वेळोवेळीं हुकूम जातील त्या धोरणानें त्यांनीं तेथें वागावें.

४. आमच्या इच्छेस येई तोंपर्यंत व आमच्या आज्ञा ते पालन करतील तोंपर्यंत, कंपनीनें पूर्वी हिंदुस्थानांत नेमलेल्या नोकरांना आम्ही आमच्या नोकरींत घेत आहोंत.

**५ राजेरजवाड्यांशीं व संस्थानिकांशीं कंपनीनें जे तह किंवा करारनामे केले असतील, ते आमच्याकडून बिनाउजर शब्दशः**

**पाळले जातील,** आणि संस्थानिकही ते योग्य रीतीनें पाळतील अशी आम्हांस आशा आहे.

६. **आम्हाला आमचें हल्लींचें राज्य वाढविण्याची मुळींच इच्छा नाहीं.** आणि आमच्या राज्यांत कोणी शिरूं पाहील तर त्याचा आम्ही जसा प्रतिकार करूं, त्याचप्रमाणें इतरांच्या राज्यांत घुसण्यास आम्ही आमच्या अधिकाऱ्यांस मंजूरी देणार नाहीं. आमच्या स्वतांप्रमाणेंच हिंदी संस्थानिकांचे हक्क, मान व अधिकार यांची आम्ही सादर मर्यादा ठेवूं. आणि अंतर्गत शांतता व सुराज्य यांच्यामुळें वाढणारें वैभव व घडून येणारी सामाजिक सुधारणा, यांत राजेरजवाड्यांनीं व प्रजेनें भागीदार व्हावें असें आम्ही इच्छितों.

७. **आमच्या इतर प्रजाजनांशीं जें आमचें नातें आहे तेंच हिंदी प्रजेशीं आम्ही ठेवूं** आणि ईश्वरी कृपेनें आमचें कर्तव्य यथाशक्ती व मनः-पूर्वक पार पाडण्याची खटपट करूं.

८. ख्रिस्ती धर्मावर जरी आमचा पूर्ण विश्वास असला, तरी आमचीं धार्मिक मतें कोणत्याही प्रजाजनांवर लादण्याची आमची इच्छा नाहीं. विवक्षित धर्ममतां-बद्दल कोणाचा छळ करण्यांत येऊं नये, व कोणावर कृपादृष्टिही दाखविली जाऊं नये, आणि **सर्व धर्मांच्या अनुयायांस कायद्याचें समान व निःपक्षपाती संरक्षण मिळावें,** असें आम्ही फर्मावितों. आणि आमच्या प्रजेपैकीं कोणा-च्याही धर्मांत किंवा पूजनांत कोणत्याही प्रकारची यत्किंचित देखील ढवळाढवळ कोणी केली तर ती आम्हास खपणार नाहीं, व तसें वागणारा अधिकारी आमच्या अवकृपेस पात्र होईल.

९. आणि आमची अशी इच्छा आहे कीं, आमच्या प्रजेपैकीं **कोणत्याही धर्माचे व वर्णाचे लोक असले तरी, शिक्षण, लायकी व शील यांचाच फक्त विचार केला जाऊन** सर्वांच्या **निरनिराळ्या अधिकारांच्या जागांवर निःपक्षपात दृष्टीनें नेमणुका केल्या जातील.**

१०. **हिंदी लोकांचें आपल्या जमिनीवर किती प्रेम असतें व पूर्वापार वतना-**बद्दल त्यांना किती जिव्हाळा वाटतो याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे, आणि योग्य तें सरकारदेणें दिलें म्हणजे त्यांच्या हक्कांचें संरक्षण करण्याची आम्ही हमी घेतों, आणि नवे कायदे करतांना किंवा जुन्यांची अंमलबजावणी करतांना

लोकांचे पूर्वापार हक्क, चालीरीती व वहिवाटी यांजकडे जरूर लक्ष दिलें जाईल.

११. अंतर्गत शांतता प्रस्थापित झाल्यावर देशांतील उद्योगधंद्यांना उत्तेजन देणें, सार्वजनिक उपयोगाचीं व सुधारणेचीं कामें हातीं घेणें व त्यांची वाढ करणें, आणि एकंदर देशांतील प्रजेच्या फायद्याकरितां राज्यकारभार करणें, हेंच ध्येय ठेवण्याची आमची उत्कट इच्छा आहे. प्रजेचें वैभव हीच आमची शक्ती, प्रजेची तृप्ती हीच आमची शाश्वती, व प्रजेची कृतज्ञता हेंच आमचें उत्तम बक्षीस असें आम्ही समजूं. लोकांच्या कल्याणाकरितां या वर निर्दिष्ट केलेल्या इच्छा अमलांत आणण्याचें सामर्थ्य तो सर्वशक्तिमान प्रभू आम्हाला व आमच्या हाताखालील अधिकाऱ्यांना देवो.

किती उदार, दूरदर्शी व उच्च ध्येयवादी घोषणा ही ! याशिवाय इंग्रज अधिकाऱ्यांची प्रत्यक्ष हत्या ज्यांनीं केली नव्हती, व बायकामुलांच्या कत्तलीनें ज्यांनीं आपले हात विटाळले नव्हते अशा सर्व बंडखोरांना, ते १ जानेवारी १८५९ च्या आंत शरण आल्यास बिनशर्त माफी दिल्याबद्दलचीं कांहीं कलमें त्या जाहिरनाम्यांत नमूद आहेत. परंतु त्यांना फक्त तात्कालीन महत्व आहे. लॉर्ड क्यानिंगची दयामय वृत्ती राणीला पसंत पडली या गोष्टीचें तें शब्दचित्र आहे. परंतु वर दिलेलीं अकरा कलमें वाचलीं म्हणजे बंडवाल्यांच्या सर्व मागण्या राणीनें कबूल केल्या असेंच म्हणावें लागतें. संस्थानिकांचे हक्क अबाधित राहिले, पूर्ण धर्मस्वातंत्र्य मिळालें, काळ्या गोऱ्यांतील पक्षपात नष्ट झाला, लोकांच्या पूर्वापार वतनांचें रक्षण झालें, मुलकी व लष्करी अधिकारांच्या जागा सररास हिंदी लोकांना मोकळ्या झाल्या, उद्योगधंद्यांचें संरक्षण होऊन त्यांची वाढ झाली, सर्वत्र शांतता होऊन देशांत सोन्याचा धूर निघूं लागला, प्रजा सुखी व संपन्न झाली, सार्वजनिक उपयुक्ततेचीं व सुधारणांचीं कामें देशांत वाढूं लागलीं— म्हणजेच त्या राज्याला रामराज्य असें म्हणतात. आणि महाराणी विक्टोरियाच्या या उदार जाहिरनाम्यांत या सर्व गोष्टी स्पष्ट व असंदिग्ध शब्दांत मांडल्या गेल्या आहेत. मग हा जाहिरनामा प्रसिद्ध झाल्यावर बंडखोर तरी अधिक काय मागणार ? बंड शांत झालें, लोकांनीं मनोभावानें उत्सव करून राणीच्या नव्या राजवटीचा आदर, सप्रेम व सानंद स्वीकार केला. राणीच्या जाहिरनाम्याची सर्वत्र

प्रशंसा होऊं लागली. हिंदुस्थानच्या स्वराज्याची सनद–हिंदुस्थानचा म्याग्ना-कार्टा–अशीं ह्या जाहिरनाम्याला दिलेलीं प्रशंसापर संबोधनें तो वाचून सार्थ वाटूं लागतात व त्यांत अतिशयोक्ति भासत नाहीं. तो जाहीरनामा शब्दशः अमलांत आला असता तर या देशांत खरोखरच रामराज्य स्थापन झालें असतें. परंतु प्रत्यक्ष अनुभवांत व व्यवहारांत जाहिरनाम्यांतील गोड, उदार व समतेचीं वचनें कितपत उतरलीं व तीं प्रत्यक्ष आचरणांत न आल्यामुळें काय कटु परिणाम झाले हें पाहण्याचें काम या ग्रंथाचें नव्हे. कारण या जाहिरनाम्यानें बंडाची परिसमाप्ति झाली, व बंडाचा व्यवहाराच्या भाषेंत मोड झाला तरी तात्त्विक दृष्ट्या बंड यशस्वी झालें हें या जाहिरनाम्यानेंच सिद्ध केलें; कारण बंडामुळें हिंदुस्थानांत राज्यक्रांति अखेर झालीच. कंपनीचें ह्या देशांतून उच्चाटन करावयाचें, ही बंडवाल्यांची इच्छा त्या ना त्या रूपानें सफल झाली! तेव्हां काळ्या गोऱ्या नटांनीं हिंदुस्थानच्या रंगभूमीवर केलेल्या १८५७ च्या अघोरी नाटकावर या जाहिरनाम्याचा पडदा टाकून ग्रंथ-समाप्ति करणें व बंडाचा यथातथ्य इतिहास रेखाटण्याच्या संकल्पानें सहा वर्षांपूर्वी हातांत धरलेल्या लेखणीला थोडासा विसावा देणें जरूर आहे.

